

ॐ

# छान्दोग्योपनिषत्

( श्रीशाङ्करभाष्यसमेता. )

( अध्याय १ ते ६ )

संपादक,

चिंतामण गंगाधर भानु, बी. ए.


प्रकाशक,

दामोदर सांवळाराम आणि मंडळी,

प्रिंटर्स, पब्लिशर्स, एजंट्स् इत्यादि, ठाकुरद्वार-मुंबई.

सन १९२० इ.

कृत्य कृतो ग्रन्थः छांदोग्यः " असा विग्रह करतां येईल. हें उपनिषद् दशोपनिषदांतील क्रमांकाप्रमाणें नववें उपनिषद् आहे. जरी बारीकसारीक उपनिषदें धरून १०८ उपनिषदें आज अस्तित्वांत आहेत, तरी त्यांपैकीं मुख्य उपनिषदें दहाच असून त्यांपैकीं हें एक मोठें उपनिषद् आहे. ह्या उपनिषदाचे आठ अध्याय असून प्रत्येकांत पंधरापासून चौवीस पावेतों खंडें आहेत. उपनिषदांत विशेषतः अध्यात्मज्ञान असल्यामुळें आत्मानात्मविवेक केलेला सर्वत्र आढळतो; व त्याला जोडून जागोजागीं तत्पुष्ट्यर्थ अनेक कथाहि आढळतात. आतां वाचकांच्या ध्यानीं ह्या उपनिषदांतील गोषवारा येण्याकरितां संक्षेपांत प्रत्येक अध्यायाचें सारांशरूपानें अर्थदर्शन करितों.

**अध्याय १:**—ह्या पहिल्या अध्यायांत एकंदर खंडें तेरा असून 'ॐ हेंच अक्षर आहे' या मंत्रानें आरंभ करून त्यांत सामाच्या अवयवाचें विवेचन केलें आहे; व त्या अवयवांच्या उपासनेपासून प्रत्येकीं मिळणारें फळहि दर्शित केलें आहे; व शेवटीं तेराव्या खंडांत स्तोमाक्षरांचेंहि फलासह विवरण केलें आहे. ह्याप्रमाणें पहिल्या अध्यायांत सामावयव सांगितलें आहे.

**अध्याय २:**—पूर्वाध्यायांत सामावयवाची उपासना सांगून ह्या दुसऱ्या अध्यायांत अवयवीची उपासना सांगितली आहे. ह्या अध्यायांत एकंदर चौवीस खंडें आहेत. पैकीं पहिल्या सात खंडांत पांच प्रकारच्या सामाची म्हणजे 'हिंकार' प्रस्ताव, उद्गीथ, प्रतिहार व निधन, ह्या पांचांची उपासना कशी करावी; तें सांगून त्यांच्या देवता; उपासनाविधिहि सांगितले. नंतर आठव्या खंडापासून एकवीस खंडांपर्यंत सात आदित्यादि सामांची उपासना सांगून आदित्याच्या कोणत्या रूपाला कोणत्या सामावयवाचें रूप प्राप्त होतें, ह्याबद्दल कोष्टक देऊन सिद्ध केलें आहे. नंतर बाविसाव्या खंडांत कोणत्या देवतेचें कोणत्या स्वरांत गायन करावें, वगैरे सांगून तेविसाव्या खंडांत सामावयव उद्गीथोंकार निराळा; व शुद्ध ओंकार निराळा, हें दाखवून चोविसाव्या खंडांत प्रातःसवन, माध्यान्हसवन व सायंसवन यांच्या देवता व त्यांची उपासना सांगून व त्यांचें फलवर्णन केलें आहे. अशा प्रकारें ह्या दुसऱ्या अध्यायाची समाप्ति केली आहे.

**अध्याय ३:** ह्या अध्यायांत एकंदर खंडें एकोणीस असून त्यांत स्वतंत्र-रीतीनें आदित्योपासना व तिचें फल वर्णन केलें आहे. पहिल्या पांच खंडांत यज्ञफल व कर्मफल सांगून तीनहि सवनांच्या वेळचीं सूर्याचीं स्वरूपें दर्शविलीं आहेत. नंतर पुढें अध्यायसमाप्तीपर्यंत आदित्यच ब्रम्ह आहे, असें सिद्ध करून दिलें आहे.

**अध्याय ४:**—ह्या अध्यायांत सतरा खंडें आहेत; व त्यांत वायु व प्राण हे ब्रह्माचे चरण असल्यामुळें त्यांची अवश्य उपासना करावी वगैरे स्पष्टरीतीनें सांगि-

न चाद्वैतात्मविज्ञानादन्यत्राऽऽत्यन्तिकी निःश्रेयसप्राप्तिः । वक्ष्यति हि—"अथ येऽन्यथाऽतो विदुरन्यराजानस्ते क्षय्यलोका भवन्ति । विपर्यये च स स्वराड्भवति" इति ।

**शिष्य**—तात्पर्य, ब्रह्मात्मैक्य-ज्ञान-विज्ञान झाल्याशिवाय अत्यंत श्रेष्ठ जो पुरुषार्थ ( निश्रेयस, मोक्ष ) तो प्राप्त होत नाहीं, असें झालें.

**सिद्धान्ती**—होय. आत्मैक्यज्ञान झाल्याव्यतिरिक्त आत्यंतिक निश्रेयसाची प्राप्ति होत नाहीं. पुढेंही सातव्या अध्यायांत सांगतील कीं, " पण आम्ही म्हणतों आहों त्या व्यतिरिक्त ' दुसरा मार्ग आहे. माझ्याहून निराळा दुसरा कोणी तरी माझा राजा आहे, त्याची मला उपासना केली पाहिजे.' असें ज्यांस वाटतें त्यांना क्षय्यलोकाची, जन्ममरणात्मकलोकाची. प्राप्ति होते." पण ' एतद्विलक्षण ज्ञान ज्या विद्वान्पुरुषाला झालें, मीच आत्मा आहें, सर्वत्र आत्मस्वरूप भरलें आहे, परमात्माही मीच आहे. ' असें ज्ञान ज्याला झालें, तो स्वराट् होतो. तो स्वतः परमात्मा होतो. त्याला स्वाराज्याची प्राप्ति होते.

तथा द्वैतविषयानृताभिसंधस्य बन्धनं तस्करस्येव तप्तपरशुग्रहणे बन्धदाहभावः संसारदुःखप्राप्तिश्चेत्युक्त्वाऽद्वैतात्मसत्याभिसंधस्यातस्करस्येव तप्तपरशुग्रहणे बन्धदाहाभावः संसारदुःखनिवृत्तिर्मोक्षश्चेति । अत एव न कर्मसहभाव्यद्वैतात्मदर्शनम् ।

**सिद्धान्ती**—तात्पर्य, द्वैतात्मकता हाच अनृत विषय ज्याच्या चिंतनाचा आत्मा झाला आहे, जो द्वैताभिमानी आहे; तो बद्ध असतो. बद्ध झालेला तस्कर (चोर तप्त परशूचें म्हणजे तापलेल्या लोहखंडाचें ग्रहण करील, तर त्याला बंधाचा आणि तप्तलोहापासून उत्पन्न होणाऱ्या दाहाचा अनुभव येतो. त्याचप्रमाणें द्वैताभिमान्याला संसाराची व संसारजन्य दुःखाची प्राप्ति होते, असें प्रथम सांगितलें. आतां, ' अद्वैत आत्मा हेंच सत्य आहे. ' असें निश्चित ज्ञानविज्ञान ज्याला दृढ झालें, तो मुक्त असतो. वस्तुतः तो तस्कर नसतो. पण लोकांच्या दृष्टीनें तस्कर असेल तरी, व त्याला परशूचें ग्रहण करावें लागलें तरी, त्याला स्वतःला* ( त्याच्या जाणीवेला ) बंधाची किंवा तप्तजन्य

---

* पूर्वकालीं अपराधी आहे किंवा नाहीं, आरोपी खरें बोलतो किंवा खोटें बोलतो, हें सिद्ध करण्यासाठीं दिव्यें करीत. मराठेशाहीपर्यंत दिव्याची पद्धति जिवंत होती. तापलेलें लोखंड हातांत धरणें, तप्त-तैलपात्रांत घातलेला रवा काढणें, इत्यादि दिव्य प्रकार असत. इजा झाली म्हणजे आरोपी अपराधी व झाली नाहीं, म्हणजे तो सच्चा असें ठरवीत. त्या पद्धतीला अनुसरून वरील भाष्यांत विधान केलें आहे.

# अनुक्रमणिका.

ॐ तत्सद्ब्रह्मणे नमः ।

# छान्दोग्योपनिषत्.

## आचार्यांचा उपोद्घात.

ओमित्येतदक्षरमित्याद्यष्टाध्यायी छान्दोग्योपनिषत् । तस्याः संक्षेपतोऽर्थजिज्ञासुभ्य ऋजुविवरणमल्पग्रन्थमिदमारभ्यते ।

**सिद्धान्ती**—'ॐ' हें अक्षर' इत्यादि मंत्र हा छांदोग्य उपनिषदाची अष्टाध्यायी प्रारंभित आहे. या उपनिषदांत आठ अध्याय आहेत; आणि या उपनिषदाला 'ॐ इति' 'या अक्षरानें' आरंभ झाला आहे. या उपनिषदाचें स्वल्प व यथार्थ पण सरळ व बालबोध विवरण अर्थ–जिज्ञासूंसाठीं संक्षेपतः करावें, या संकल्पानें आम्हीं या आमच्या अल्पग्रंथाला प्रारंभ करितों.

तत्र संबन्धः । समस्तं कर्माधिगतं प्राणादिदेवताविज्ञानसहितमर्चिरादिमार्गेण ब्रह्मप्रतिपत्तिकारणम् । केवलं च धूमादिमार्गेण चन्द्रलोकप्रतिपत्तिकारणम् । स्वभावप्रवृत्तानां च मार्गद्वयपरिभ्रष्टानां कष्टाऽधोगतिरुक्ता ।

**शिष्य**—येथें आचार्यांनीं आकस्मिकच आरंभ कसा केला ?

**सिद्धान्ती**—संबंध, प्रयोजन, अधिकारी आणि विषय हें अनुबंधचतुष्टय सांगितल्या शेरीज श्रीमदाचार्य कोणत्याही ग्रंथाला आरंभ करीत नाहींत. प्रथमतः **संबंध** सांगतात. ऐका:–समस्त म्हणजे विहित आणि प्रतिषिद्ध हें कर्म पूर्वकांडांत (कर्मकांडांत) श्रुतीनें सांगितलें आहे. (१) प्राणादि देवतांचें विज्ञान प्राप्त करून घेऊन श्रुतिविहित कर्म केलें असतां, म्हणजे **ज्ञानकर्मांचा समुच्चय करून** कर्म केलें असतां, अर्चिरादि मार्गानें (देवयानमार्गानें) कार्यब्रह्मापर्यंत अधिकारी जीव जातो. म्हणजे त्याला **हिरण्यगर्भाची प्राप्ति** होते. (२) तसेंच, **ज्ञानविरहित कर्म** केलें असतां म्हणजे प्राण, अग्नि, इत्यादि देवतांचें स्वरूप समजून न घेतां, केवळ श्रुतिविहित मात्र कर्म करणाऱ्या जीवाला धूमयान (पितृयाण) मार्गानें **चंद्रलोकाची प्राप्ति** होते; आणि (३) या दोन्हीही मार्गांचा अवलंबन न करितां अज्ञानी जीवाची जी **स्वाभाविक प्रवृत्ति** असते, तिच्या अनुरोधानें मात्र कर्म करणारे पुरुष अत्यंत कष्टप्रद अशा **अधोगतीला**, पशुपक्ष्यांच्या जन्माला

जातात. अशा तीन मार्गांनीं जाणाऱ्या किंवा तीन प्रकारचीं कर्मे करणाऱ्या पुरुषांस तीन प्रकारची फलप्राप्ति होते, असें कर्मकांडांत सांगितलें आहे.

न चोभयोर्मार्गयोरन्यतरस्मिन्नपि मार्गे आत्यन्तिकी पुरुषार्थसिद्धिरित्यतः कर्मनिरपेक्षमद्वैतात्मविज्ञानं संसारगतित्रयहेतूपमर्देन वक्तव्यमित्युपनिषदारभ्यते।

**शिष्य**—म्हणजे ? देवयानमार्गानें गेलें किंवा पितृयाणमार्गानें गेलें तरी श्रेष्ठतम जो पुरुषार्थ तो प्राप्त होत नाहीं. तसेंच, स्वभावसिद्ध कर्मप्रवृत्ति झाली, तर अत्यंत निकृष्ट अवस्था प्राप्त होते; असें झालें. सारांश, केवळ स्वाभाविक किंवा अशास्त्रीय कर्म असो; केवळ श्रुतिविहित शास्त्रोक्त कर्म असो; किंवा श्रुतिविहित उपासनापूर्वक शास्त्रोक्त व ज्ञानसमुच्चित कर्म असो; संसाराची म्हणजे जन्ममरणाची यातायात चुकत नाहीं, असें झालें.

**सिद्धान्ती**—आचार्य म्हणतातः—देवयान किंवा पितृयाणमार्गांपैकीं कोणत्याही मार्गाचें संपादन केलें असतां आत्यंतिक पुरुषार्थाची ( मोक्षाची ) सिद्धि होत नाहीं. हिरण्यगर्भलोकांत जा किंवा चंद्रलोकांत जा, तेथें तेथें राहून कर्मफलाचा उपभोग कमी जास्ती वर्षे घ्या, पुनः जन्म हा ठेवलेलाच आहे. जन्ममरणाची यात्रा ज्ञानसंहित कर्मानें किंवा केवळ कर्मानें संपत नाहीं. अशास्त्रीय कर्मांचें फल तर हा देह ठेविला कीं, दुसरा अधम देह; पुनः मरण, पुनः जन्म, असें कष्टतर चक्र सारखें चालू राहतें. म्हणून ह्या अनर्थांच्या निवारणार्थ ह्या उपनिषदाला आरंभ केला आहे. ह्या तिन्ही प्रकारांनीं भवचक्राचें बंधन सुटत नाहीं. असो; असा हा अनर्थकारी कर्ममार्ग आहे. संसाराच्या ज्या तीन गती आतांच सांगितल्या, त्यांचें आदिकारण अविद्या हें आहे. परमात्मा आणि जीवात्मा एक नाहींत, असें ( अ ) ज्ञान किंवा अशा ( आ ) ज्ञानाचा आभास असणें, याचेंच नांव अविद्या हें आहे. ही अविद्या किंवा संसाराचा हा आदि हेतु निवृत्त झाल्याशिवाय कष्टतर संसार–यात्रा संपत नाहीं. हा संसार जर संपवावयाचा असेल, तर कर्मनिरपेक्ष अद्वैत आत्मज्ञान संपादिलें पाहिजे.

**शिष्य**—कर्मनिरपेक्ष म्हणजे काय ?

**सिद्धान्ती**—'मी कर्म करणारा आहे' असा अभिमान आणि 'कर्माचें फळ मला मिळावें' ही वासना जिवंत आहेत, तोंपर्यंत आपलें सर्व व्यवहार कर्मसापेक्ष, कर्मबद्ध, कर्मावलंबी असतात. ही स्थिति, हें अज्ञान नाहींसें झालें, 'मी जीवात्मा स्वरूपतः परमात्मा आहें, म्हणून मला कर्तृत्वाचा अभिमान नसावा आणि मी फलभोक्ता नाहीं म्हणून कर्मफलाची वासना असणें इष्ट नाहीं व कोणत्याही प्रकारें आवश्यक नाहीं.' असें ज्ञान झालें, म्हणजे विद्वान् जीव कर्मनिरपेक्ष होतो; आणि त्याला मोक्षाची प्राप्ति होते. जीवानें कर्मतंत्र न राहतां स्वतंत्र व्हावें, जडतंत्र न राहतां आत्मतंत्र असावें, हा जीवाचा पुरुषार्थ आहे. हा साध्य झाला म्हणजे संसार संपतो.

न चाद्वैतात्मविज्ञानादन्यत्राऽऽत्यन्तिकी निःश्रेयसप्राप्तिः। वक्ष्यति हि—"अथ येऽन्यथाऽतो विदुरन्यराजानस्ते क्षय्यलोका भवन्ति। विपर्यये च स स्वराड्भवति" इति।

**शिष्य**—तात्पर्य, ब्रह्मात्मैक्य-ज्ञान-विज्ञान झाल्याशिवाय अत्यंत श्रेष्ठ जो पुरुषार्थ ( निश्रेयस, मोक्ष ) तो प्राप्त होत नाहीं, असें झालें.

**सिद्धान्ती**—होय. आत्मैक्यज्ञान झाल्याव्यतिरिक्त आत्यंतिक निश्रेयसाची प्राप्ति होत नाहीं. पुढेंही सातव्या अध्यायांत सांगतील कीं, " पण आम्ही म्हणतों आहों त्या व्यतिरिक्त ' दुसरा मार्ग आहे. माझ्याहून निराळा दुसरा कोणी तरी माझा राजा आहे, त्याची मला उपासना केली पाहिजे.' असें ज्यांस वाटतें त्यांना क्षय्यलोकाची, जन्ममरणात्मकलोकाची. प्राप्ति होते." पण ' एतद्विलक्षण ज्ञान ज्या विद्वानपुरुषाला झालें, मीच आत्मा आहें, सर्वत्र आत्मस्वरूप भरलें आहे, परमात्माही मीच आहे. ' असें ज्ञान ज्याला झालें, तो स्वराट् होतो. तो स्वतः परमात्मा होतो. त्याला स्वाराज्याची प्राप्ति होते.

तथा द्वैतविषयानृताभिसंधस्य बन्धनं तस्करस्येव तप्तपरशुग्रहणे बन्धदाहभावः संसारदुःखप्राप्तिश्चेत्युक्त्वाऽद्वैतात्मसत्याभिसंधस्यातस्करस्येव तप्तपरशुग्रहणे बन्धदाहाभावः संसारदुःखनिवृत्तिर्मोक्षश्चेति। अत एव न कर्मसहभाव्यद्वैतात्मदर्शनम्।

**सिद्धान्ती**—तात्पर्य, द्वैतात्मकता हाच अनृत विषय ज्याच्या चिंतनाचा आत्मा झाला आहे, जो द्वैताभिमानी आहे; तो बद्ध असतो. बद्ध झालेला तस्कर (चोर तप्त परशूचें म्हणजे तापलेल्या लोहखंडाचें ग्रहण करील, तर त्याला बंधाचा आणि तप्तलोहापासून उत्पन्न होणाऱ्या दाहाचा अनुभव येतो. त्याचप्रमाणें द्वैताभिमान्याला संसाराची व संसारजन्य दुःखाची प्राप्ति होते, असें प्रथम सांगितलें. आतां, ' अद्वैत आत्मा हेंच सत्य आहे. ' असें निश्चित ज्ञानविज्ञान ज्याला दृढ झालें, तो मुक्त असतो. वस्तुतः तो तस्कर नसतो. पण लोकांच्या दृष्टीनें तस्कर असेल तरी, व त्याला परशूचें ग्रहण करावें लागलें तरी, त्याला स्वतःला* ( त्याच्या जाणीवेला ) बंधाची किंवा तप्तजन्य

---

* पूर्वकाळीं अपराधी आहे किंवा नाहीं, आरोपी खरें बोलतो किंवा खोटें बोलतो, हें सिद्ध करण्यासाठीं दिव्यें करीत. मराठेशाहीपर्यंत दिव्याची पद्धति जिवंत होती. तापलेलें लोखंड हातांत धरणें, तप्त-तैलपात्रांत घातलेला रवा काढणें, इत्यादि दिव्य प्रकार असत. इजा झाली म्हणजे आरोपी अपराधी व झाली नाहीं, म्हणजे तो सच्चा असें ठरवीत. त्या पद्धतीला अनुसरून वरील भाष्यांत विधान केलें आहे.

ह्याची खबर नसते. अशीच मुक्त झालेल्या पुरुषाची स्थिति असते. जीवन्मुक्त पुरुषाला बंधाचें किंवा तापत्रयाचें वर्तमान असत नाहीं. सारांश, आत्मैक्याचें ज्ञान झालें, म्हणजे सर्व सांसारिक दुःखांची आत्यंतिक निवृत्ति होते. याळाच मोक्ष असें म्हणावयाचें. ज्यापक्षीं द्वैतजन्य उपासना आणि कर्म यांची अपेक्षा आत्मज्ञान्याला नसते, त्यापक्षीं अद्वैतज्ञान-विज्ञान होण्याला कर्मांची, कर्मासह ज्ञानाची, किंवा ज्ञानासह कर्माची अपेक्षा असत नाहीं, हें उघड झालें. तात्पर्य, उपासना किंवा कर्म ह्यांस अद्वैताचें ज्ञानविज्ञान देण्याचें किंवा मोक्ष संपादविण्याचें सामर्थ्य नाहीं. अनित्य कर्माला व कर्मफळाला नित्य आत्मा दिसणें शक्य नाहीं. तम व प्रकाश यांचें साहचर्य नसतें, तसें कर्म व अद्वैतज्ञान यांचेंही साहचर्य नसतें. निष्काम कर्म आणि निष्काम उपासना चित्तशुद्धि करतील; पण आत्मसाक्षात्काराचें सामर्थ्य त्यांस नाहीं.

क्रियाकारकफलभेदोपमर्देन सदेकमेवाद्वितीयमात्मैवेदं सर्वमित्येवमादिवाक्यजनितस्य बाधकप्रत्ययानुपपत्तेः । कर्मविधिप्रत्यय इति चेत् । न । कर्तृभोक्तृस्वभावविज्ञानवतस्तज्जनितकर्मफलरागद्वेषादिदोषवतश्च कर्मविधानात् । अधिगतसकलवेदार्थस्य कर्मविधानादद्वैतज्ञानवतोऽपि कर्मेति चेत् । न । कर्माधिकृतविषयस्य कर्तृभोक्त्रादिज्ञानस्य स्वाभाविकस्य सदेकमेवाद्वितीयमात्मैवेदं सर्वमित्यनेनोपमर्दितत्वात् । तस्मादविद्यादिदोषवत एव कर्माणि विधीयन्ते । नाद्वैतज्ञानवतः । अत एव हि वक्ष्यति-"सर्व एते पुण्यलोका भवन्ति । ब्रह्मसंस्थोऽमृतत्वमेति" इति ।

**सिद्धान्ती**—क्रिया, कारक, फल, इत्यादि भेदांची सर्वथा निवृत्ति झाल्यामुळें 'सद्रूपी आत्मा एक आणि अद्वितीय आहे, हें दृश्य भास्य सर्व स्वरूपतः आत्माच आहे' इत्यादि श्रुतिवाक्यांपासून उत्पन्न होणारें ज्ञान-विज्ञान ज्या विद्वानाला झालें, त्याला कोणत्याही प्रकारानें कर्माची अपेक्षा असत नाहीं.

**शिष्य**—स्वयंभू मोक्षसिद्धीसाठीं या विद्वानाला फलोत्पादि कर्म करावें लागत नाहीं. त्याचप्रमाणें कर्म केलें नाहीं, तर मोक्षसंपादनाला प्रत्यवाय ( अडचण ) उत्पन्न होईल, असेंही मानण्याचें त्याला कारण नसतें. पापपुण्यातीत झालेल्या पुरुषाला श्रुतिविहित कर्माचें अकरण बाधक होणें शक्य नाहीं व निषिद्ध कर्म तर तो करितच नाहीं. एवंच, श्रुतिविहित कर्मकथा संपते.

**पूर्व०**—असें कसें होईल? 'पुरुषानें यज्ञ करावा' असा विधि श्रुती सांगत नाहींत काय? सर्वांनीं कर्म केलें पाहिजे, अशी श्रुतीची आज्ञा प्रत्यक्ष प्रतीत होत आहे. नाहीं काय?

**सिद्धान्ती**—नाहीं. 'मी कर्ता आहें,' 'मी भोक्ता आहें' असें ज्याचें जीव-स्वरूप-विषयक ज्ञान असतें, जो परमार्थदृष्टीनें अज्ञानी असतो. त्याला स्वतःच्या-अज्ञानानें निर्माण केलेलें कर्मफलविषयक काम, क्रोध, इत्यादि उपाधी असतात. श्रुतीनें विहित केलेलें कर्म त्यानें केलें पाहिजे. रागद्वेषादि विकारांनीं उपहित झालेला देहादिकाभिमानी जोव कर्म जर करितोच, कर्म जर होणारच, तर कोणतें कर्म केव्हां व कसें करावें, हें श्रुती उपलक्षणद्वारा सांगतात. श्रुती सर्वज्ञ असतात; म्हणून त्यांचा उपदेश आपण ऐकिला पाहिजे, हें ठीक. पण रागद्वेषातीत आत्मज्ञान्याला 'कर्म कर' असें सांगण्याचा अधिकार श्रुतीला नाहीं.

**पूर्व०**—अमळ जपून बोला. कारण सकल वेदार्थाचें ज्ञान ज्यानें संपादन केलें आहे, त्याला सुद्धां 'कर्म कर' असें श्रुतीनें सांगितलें आहेच. नाहीं? तात्पर्य, अद्वैतज्ञान्यांनींही श्रुत्युक्त कर्म केलेंच पाहिजे.

**सिद्धान्ती**—नाहीं. आत्मज्ञान्याला 'कर्म कर' म्हणून सांगण्याचें कारणच श्रुतीला उरत नाहीं. कारण कर्तृत्वभोक्तृत्वादि ज्यांस आकार आहे, असे ज्ञानाचे विषय श्रुतीच्या अधिकारांतील आहेत. 'मी कर्ता' 'मी भोक्ता' असें (एवंप्रकारक) ज्ञान ज्याला असतें, तो मात्र कर्म करण्याला अधिकारी असतो. कर्तृत्वभोक्तृत्वाचें ज्ञान हें तर स्वाभाविक आहे. ब्रह्मदेवापासून अत्यंत सूक्ष्म जीवापर्यंतच्या सर्व प्राण्यांस हें कर्तृत्वभोक्तृत्वाचें ज्ञान जन्मादारभ्य असतें. 'मीं कर्म करावें' 'मी कर्मफलाचा उपभोग घ्यावा' असें निरक्षर गोपाळांस अथवा साक्षर पंडितांसही वाटत असतें. म्हणून या अज्ञांना मात्र 'अमुकप्रकारें कर्म करा,' व 'अमुकप्रकारें विषयांचा उपभोग घ्या' असें सांगण्याचा श्रुतीला अधिकार आहे. परंतु 'सद्रूपी एकच अद्वितीय आत्मा आहे. आत्माव्यतिरिक्त दुसरें कांहीं नाहीं.' असें श्रुतिवाक्यांच्या समन्वयानें व महावाक्यांनीं ज्याला ज्ञानविज्ञान झालें, त्याचें कर्तृत्वभोक्तृत्व-विषयक अज्ञान नष्ट होतें. असें झालें असल्यामुळें 'तूं अमुक कर' असें सांगण्याचा अधिकार कर्मकांडी श्रुतीस पोहोंचतच नाहीं. तात्पर्य, अविद्येनें उपहित झालेल्या पण कल्याणेच्छू जीवांस मात्र श्रुतीनें अनेकप्रकारचीं संशोधक कर्मे सांगितलीं आहेत. या फलोत्पादक किंवा चित्तशोधक कर्मांचा शुद्ध-चित्त झालेल्या जीवन्मुक्तांशीं कोणात्याही प्रकारचा संबंध नाहीं. सारांश अद्वैतज्ञान्याला कर्म सांगितलें नाहीं. फार काय? श्रुति पुढें असेंही म्हणेल कीं, 'सर्व ब्रह्मचारी, गृहस्थ आणि वानप्रस्थ—कर्म करणारे, हे पुण्य लोक अथवा पुण्य श्लोक आहेत.' पण 'सदैव ब्रह्मचिंतन करणारा पुरुष मात्र अमृतत्वाची प्राप्ति करून घेतो.' या दोन निरनिराळ्या वाक्यांवरून कर्माधिकृतांनीं कर्म करावें, ब्रह्मज्ञाला कर्मांची अपेक्षा नाहीं, असें श्रुतीचें मनोगत स्पष्ट दिसतें.

तत्रैतस्मिन्नद्वैतविद्याप्रकरणेऽभ्युदयसाधनान्युपासनान्युच्यन्ते । कैवल्यसंनिकृष्टफलानि चाद्वैतादीषद्विकृतब्रह्मविषयाणि " मनोमयः प्राणशरीरः " इत्यादीनि कर्मसमृद्धिफलानि च कर्माङ्गसंबन्धीनि । रहस्यसामान्यान्मनोवृत्तिसामान्याच्च । यथाऽद्वैतज्ञानं मनोवृत्तिमात्रं तथाऽन्यान्यप्युपासनानि मनोवृत्तिरूपाणीत्यस्ति हि सामान्यम् । कस्तर्ह्यद्वैतज्ञानस्योपासनानां च विशेषः । उच्यते । स्वाभाविकस्याऽऽत्मन्यक्रियेऽध्यारोपितस्य कर्त्रादिकारकक्रियाफलभेदविज्ञानस्य निवर्तकमद्वैतविज्ञानम् । रज्ज्वादाविव सर्पाद्यध्यारोपलक्षणज्ञानस्य रज्ज्वादिस्वरूपनिश्चयः प्रकाशनिमित्तः । उपासनं तु यथाशास्त्रसमर्थितं किंचिदालम्बनमुपादाय तस्मिन्समानचित्तवृत्तिसंतानकरणं तद्विलक्षणप्रत्ययानन्तरितमिति विशेषः

**पूर्व०**—तुमचें म्हणणें जर खरें मानलें, तर याही उपनिषदांत तीनप्रकारच्या उपासनांचा उपन्यास केला आहे, याची वाट कशी लावावयाची ?

**सिद्धान्ती**—ऐका-या अद्वैतविद्येच्या प्रकरणांत ज्या तीन उपासना सांगतल्या आहेत, त्या अभ्युदयसाधक आहेत. मुमुक्षू जीवांची चित्तशुद्धि करण्याला यांचा अत्यंत उपयोग होतो. हाच उत्कृष्ट अभ्युदय होय; कारण; या उपासनांपासून जीं फळें प्राप्त होतात, तीं कैवल्याच्या म्हणजे मोक्षाच्या अत्यंत संनिध असतात.

**शिष्य**—म्हणजे काय ?

**सिद्धान्ती**—अद्वैतात्मक जें ब्रह्मज्ञानविज्ञान आहे, त्यापासून फारच थोड्या अंतरावर विद्यमान असणारीं हीं फळें असतात. हीं फळें क्रममुक्तीचा सर्व पंथ सुकर करितात. आतां ब्रह्माला केव्हांही स्वरूपतः विकार होत नाहींच. आपण अज्ञानी जीवदशेंत मात्र असें समजतों कीं, अत्यंत श्रेष्ठ जें सगुणब्रह्म आहे, तेंच परब्रह्म होय. सगुणब्रह्म हा परब्रह्माचा अल्पसा विकार श्रेष्ठ उपासकाला मात्र ब्रह्मतः भासत असतो. सारांश या सगुणब्रह्मापर्यंत नेणाऱ्या या उपनिषदांत प्रथमतः सांगितलेल्या उद्गीथादि उपासना आहेत. " हिरण्यगर्भ मनोमय आहे, प्राण हेंच त्याचें शरीर आहे ' असें समजून सगुणब्रह्माची उपासना करावी," असें येथें सांगितलें आहे. या व इतर श्रेष्ठ उपासनांनीं कोणतें फल प्राप्त होतें म्हणशील, तर श्रुति म्हणते कीं, सर्व फलापेक्षां श्रेष्ठ फलसमृद्धि येथें मिळते. अर्थातच ह्या उपासना कर्मांग आहेत, म्हणजे कर्मांचा संबंध येथें येतो. या उपासना कर्माचें अंग तरी असतात किंवा या उपासनांचें कर्म हें अंग असतें. तात्पर्य, कर्मोपासनेचा हा समुच्चय आहे.

**पूर्व०**—कर्मसंबंधी उपासनांचा उल्लेख ज्ञानकांडांत काय म्हणून ?

**सिद्धान्ती**—हा उद्देश सकारण आहे. आत्मज्ञानाचें व येथें विहित केलेल्या उपासनांचें रहस्य एकच आहे. 'आत्मा एक आहे' असें उपनिषद् सांगणार आणि येथील उपासनाही 'परमात्मा एकच आहे.' असें समजून त्याचें भजन करणार. याप्रमाणें उभयतांचेंही रहस्य एकच आहे. तसेंच दोन्हींमध्यें ही एकाकार मनोवृत्तीची सामान्य अपेक्षा असते. परोक्ष अद्वैतज्ञान **मनोवृत्तीला** होतें. येथें सांगितलेल्या उपासनाही **मनोवृत्तिरूपी** आहेत, तात्पर्य उभयतांचें रहस्य एक व स्थान म्हणजे मनोवृत्तित्वही एक, म्हणून या कर्मांगसंबंधी उपासना ज्ञानकांडांत सांगितल्या आहेत.

**पूर्व०**—इतका जर सारखेपणा उभयतांमध्यें आहे, तर ज्ञान आणि उपासना हीं दोन्हीं एकच आहेत, असें तुम्ही कां म्हणत नाहीं ! येथें कांहीं विशेष असेलसें दिसत नाहीं. असला तर सांगा आम्हाला !

**सिद्धान्ती**—उभयतांमध्यें भेदकारी विशेष आहे. पहा:—आत्मा हा स्वतः अक्रिय आहे. तथापि तो कर्ता आहे, क्रियाफलाचा भोक्ता आहे, इत्यादि-प्रकारचे अध्यारोप जीव स्वभावतःच करीत असतात. या स्वाभाविक अज्ञानानें उत्पन्न केलेल्या अध्यारोपांची निवृत्ति करणें, हें अद्वैतज्ञानाचें व्रत आहे. रज्जु-आदि पदार्थांवर सर्पादिकांचा जो आरोप आपण जीव स्वभावतः म्हणजे मंदाधिकारजन्य अज्ञानानें करीत असतों, त्या त्या आरोपांची निवृत्ति ज्ञानरूपी दीपादिकांच्या प्रकाशसाह्यानें होते आणि रज्जु आदि पदार्थांचें यथार्थस्वरूप निश्चित होतें. त्याप्रमाणें अद्वैतज्ञानप्रकाशानें अज्ञाननिवृत्ति होते. आत्म्यावर स्वभावतः जे आरोप केले जातात, त्यांची निवृत्ति ज्ञानानें करितां येते. **अद्वैतज्ञान अज्ञानाची व मिथ्याज्ञानाची निवृत्ति करितें.** समजलें ? आतां, उपासना काय करते म्हणाल, तर ऐकाः—प्रामाणिक शास्त्रानें सिद्धांतरूपानें सांगितलेलें कोणतें तरी आलंबन स्वीकृत करून त्याच्या ठिकाणीं एकाग्र चित्तवृत्तीचा ओघ समर्पित करणें आणि आलंबनाव्यतिरिक्त इतर पदार्थांचा अथवा पदार्थज्ञानांचा निरास करणें, हें उपासनेचें कार्य आहे. 'हा परमेश्वर आहे,' अशी भावना कोणत्या तरी शास्त्रसूचित पदार्थांवर उपासकास करावी लागते. उपासकाची ही भावना ज्या शालिग्रामादि पदार्थांवर असतें, तें आलंबन होय. ॐ हाही आलंबन होऊं शकतो. असो; चित्ताची अशी एकाग्रता शास्त्रोक्त उपासनेनें होते. सारांश, परमात्मा आणि जीवात्मा एक आहेत, ते निर्गुण आणि निष्क्रिय आहेत, हा अनुभव आत्मज्ञानानें होतो; आणि 'उपास्य निराळें, उपासक निराळा; हें उपास्य माझें कल्याण करील, मी कल्याणाचा उपभोक्ता होईन,' इत्यादि ज्ञान ( अथवा परमार्थदृष्टीनें अज्ञान ) उपासकास असतें. हा असा उभयतांमध्यें विशेष आहे. आत्मविज्ञानांत प्रत्यक्ष अनुभव आहे. उपासनेंत श्रद्धा आहे.

तान्येतान्युपासनानि सत्त्वशुद्धिकरत्वेन वस्तुतत्त्वावभासकत्वाद्द्वैतज्ञानोपकारकाण्यालम्बनविषयत्वात्सुसाध्यानि चेति पूर्वमुपन्यस्यन्ते । तत्र कर्माभ्यासस्य दृढीकृतत्वात्कर्मपरित्यागेनोपासन एव दुःखं चेतःसमर्पणं कर्तुमिति कर्माङ्गविषयमेव तावदादावुपासनमुपन्यस्यते ।

**सिद्धान्ती**—या सर्व ईश्वरार्पणबुद्धीनें केलेल्या उपासना सत्त्वशुद्धि करणाऱ्या आहेत आणि म्हणून त्या आत्मवस्तूचें अवभासन करण्याला उपयोगी पडतात. किंवा आत्मवस्तूचें परोक्ष दिग्दर्शन या उपासना करितात. म्हणून त्या चित्तशोधक होतात. अर्थात् यांस अद्वैतज्ञानावर कांहीं अंशीं उपकार करणाऱ्या उपासना असें म्हणतात. निर्गुणाचें ज्ञान दुःसाध्य आहे, तसें उपासनात्मक कर्म नाहीं. उपासनेंत आलंबनाचा स्वीकार केला असतो. म्हणून मंद पुरुषांस शोधक उपासनांचें अनुष्ठान सुसाध्य होतें.

**शिष्य**—आत्मस्वरूपाचा मार्ग सुकर करणाऱ्या ह्या उपासना आलंबनद्वारा सुसाध्य आहेत, म्हणूनच त्यांचा प्रथमतः श्रुतीनें निर्देश केला आहे, असें वाटतें !

**सिद्धान्ती**—होय. अनेक जन्मोजन्मीं जीवासह उत्क्रमण करीत असणाऱ्या वासनांमुळें प्राकृत पुरुषाचा कर्माभ्यास दृढ झालेला असतो. अशा पुरुषास एकदम 'कर्म सोडा आणि शुद्ध निर्गुणाची उपासना करा' असें सांगितलें, तर केवळ निर्गुणाचे ठिकाणीं चित्त समर्पण करण्याला प्राकृत पुरुष समर्थ होणार नाहींत. असें हें सर्व जाणून श्रुतिमाउलीनें जीवांच्या कल्याणासाठीं याही उपनिषदांत कर्मांगभूत उपासनेचा प्रारंभींच उपन्यास केला आहे.

---

## मंत्र पहिला.

**ओमित्येतदक्षरमुद्गीथमुपासीत ।**
**ओमिति ह्युद्गायति तस्योपव्याख्यानम् ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थ**—ॐ इति ( ॐकार हाच ) **एतत् अक्षरं उद्गीथं उपासीत** (हें अक्षर, उद्गीथ हाय, अशी उपासना करावी) **हि** ( कारण ) **ॐ इति उद्गायति** ( ओं असा प्रारंभ करूनच सामवेदीय गानाचें अनुष्ठान होतें ) **तस्य उपव्याख्यानं** ( त्याचें हें उपव्याख्यान, त्याचें हें गुणधर्मादि कथन आहे ) सारांश, सर्व धार्मिक कर्माला व तात्त्विक विचाराला ॐ असें म्हणून आरंभ होतो. अतएव 'ॐकार उद्गीथ आहे,' अशी भावना धरून ॐकारोपासना प्रत्येक मुमुक्षूनें केली पाहिजे ॥ १ ॥

ओमित्येतदक्षरमुद्गीथमुपासीत । ओमित्येतदक्षरं परमात्मनोऽभिधानं नेदिष्ठम् । तस्मिन्हि प्रयुज्यमाने स प्रसीदति, प्रियनामग्रहण इव लोकः । तदिहेतिपरं प्रयुक्तमभिधायकत्वाद्व्यावर्तितं शब्दस्वरूपमात्रं प्रतीयते । तथा चार्चादिवत्परस्यात्मनः प्रतीकं संपद्यते । एवं नामत्वेन प्रतीकत्वेन च परमात्मोपासनसाधनं श्रेष्ठमिति सर्ववेदान्तेष्ववगतम् । जपकर्मस्वाध्यायाद्यन्तेषु च बहुशः प्रयोगात्प्रसिद्धमस्य श्रैष्ठ्यम् । अतस्तदेतदक्षरं वर्णात्मकमुद्गीथशब्दवाच्यमुपासीत । कर्माङ्गावयवभूत ॐकारे परमात्मप्रतीके दृढामैकाग्र्यलक्षणां मतिं संतनुयात् । स्वयमेव श्रुतिरोंकारस्योद्गीथशब्दवाच्यत्वे हेतुमाह—ओमिति ह्युद्गायति । ओमित्यारभ्य हि यस्मादुद्गायत्यत उद्गीथ ओंकार इत्यर्थः । तस्योपव्याख्यानं तस्याक्षरस्योपव्याख्यानमेवमुपासनमेवंविभूत्येवं फलमित्यादिकथनमुपव्याख्यानम् । प्रवर्तत इति वाक्यशेषः ॥ १ ॥

**सिद्धान्ती**—ॐकार नामक उद्गीथाची उपासना करणें अवश्य आहे. कारण, ॐ हा अक्षरात्मक शब्द असा आहे कीं, तो परमात्म्याचें अत्यंत निकट असणारें नांव आहे. परमात्म्याचें यथार्थ स्वरूप प्रकट करणारें आणि म्हणून अत्यंत योग्य व अत्यंत संनिध असणारें 'ॐ' हें नांव परमात्म्याचें आहे. यथार्थ स्वरूप प्रकट करितें म्हणून हें नांव परमात्म्याला अत्यंत प्रियकर आहे.

**शिष्य**—प्रियकर नांवाची उपासना केली असतां, परमात्मा प्रसन्न झालाच पाहिजे. व्यवहारांतही आपण प्रिय नांवानें संबोधिलें, तर कोणीही पुरुष प्रसन्नच होतो. पण भगवन् ! मंत्रांत 'ॐ इति' असा प्रयोग कां केला आहे, बरें ?

**सिद्धान्ती**—'इति' ह्या पदानें एक मोठें कार्य होतें. तुला ठाऊकच आहे कीं, परमात्मस्वरूप वर्णन करितांना वाणी शिणते व परत फिरते. आतां, 'ॐ'कार हें परमात्म्याचें नांव आहे, अशी समजूत झाली, तर शब्दाला ब्रह्मस्वरूप सांगतां येतें, असा जीवांस भ्रम होईल. तो होऊं नये म्हणून 'इति' पदाची योजना आहे. परमात्मसंबंधानें ॐकाराला स्वतःचा असा कांहीं अर्थ नाहीं. परब्रह्माचा वाचक ॐकार नव्हे. येथें केवळ शब्दस्वरूप मात्र घेणेंचें आहे, इतका अर्थ 'इति' शब्दानें सिद्ध होतो. '**ॐकार**' **शब्द मात्र** परमात्म्याचें नांव आहे. **तें सार्थ नाहीं.** हें समजावें म्हणून 'इति' ह्या पदाची योजना केली. ॐकार पाहिला किंवा ऐकिला कीं, परमात्म्याचें स्मरण व्हावें, परमात्म्याचें स्मारक मात्र हें आहे, असें समजावें, हा श्रुतीचा हेतु आहे. असो; आपण विष्णूची शालिग्रामानें किंवा शंकराची बाणानें

अर्चा करितों, नर्मदावर गणपतीची संपादणूक करून नर्मदेची पूजा केली असतां, ती गणपतीला समर्पित होते, असें समजतोंच कीं नाहीं? ह्याचप्रमाणें ॐ कार परमात्म्याचें प्रतीक आहे, चिन्ह आहे, अशी भावना ठेवावी व परमात्म्याची उपासना करावयाची असेल, तर मंदाधिकाऱ्यानें ॐ काराची उपासना करावी, असा श्रुतीचा उपदेश आहे.असो; तेव्हां ॐ हें परमात्म्याचें (१) प्रियकर नांव आहे, म्हणून व (२) तें त्याचें प्रतीक आहे; म्हणून सर्व वेदांतकथन करणारीं उपनिषदें म्हणतात कीं, ॐ कारोपासना हें सर्वश्रेष्ठ साधन आहे.

**शिष्य०**—तात्पर्य, परमात्मोपासना करण्याचीं जीं काय अनेक साधनें आहेत, त्यांत ॐकाररूपी उपासना हें श्रेष्ठ साधन आहे. वेदांतांतच काय, पण वैदिक कर्म करितांना, जप, स्वाध्याय इत्यादि करितांना प्रथम व शेवटीं आपण 'ओं' असा सामान्यतः उच्चार करितों, हें मलाही विदित आहे. असो; अक्षर म्हणजे अविनाशी?

**सिद्धान्ती**—हा अर्थ ठीक आहे. पण येथें 'अक्षर म्हणजे वर्णात्मक पद' असा अर्थ आहे. ॐ हें अक्षर उद्गीथाचा अवयव आहे; म्हणून ॐ लाही 'उद्गीथ' असें लक्षणेनें म्हणतात. तात्पर्य, उद्गीथ नामक ॐ ह्या वर्णात्मक अक्षराची उपासना करावी. ही उपासना सर्वांच्या शेवटीं होते, म्हणून ही सर्वश्रेष्ठ उपासना आहे.

**शिष्य**—कशी करावी उपासना! भगवन्!

**सिद्धान्ती**—कर्मांगाचा एक अवयव असूनही परमात्म्याचें प्रतीक असणारा जो हा ॐ, त्याच्याठिकाणीं परमात्मदृष्टि ठेऊन दृढ म्हणजे एकाग्र चिंतन करावें. दीर्घकालपर्यंत ॐ चा म्हणजे उद्गीथाचा मात्र प्रत्यय असेल, चित्तांत दुसरा विषय नसेल, तरच दृढ चिंतन केलेसें होतें.

**पूर्व०**—'उद्गीथ म्हणजे ॐ,' ह्या अर्थाला कांहीं आधार!

**सिद्धान्ती**—किती तरी! लांब कशाला! श्रुति आपण स्वतःच उद्गीथ म्हणजे 'ॐ' का हें सांगत आहे. प्रथमतः 'ॐ' या पवित्र अक्षराचा उच्चार करूनच उद्गानाला आरंभ होतो. म्हणून उद्गीथ म्हणजे ॐ होय. उद्गीथाचा उपक्रम ॐ नें, उपसंहार ही ॐनें होतो; म्हणून सर्व उद्गीथ ॐकारप्रकाशक अथवा ॐ आहे. असो; या ॐचें उपव्याख्यान करण्यास श्रुति प्रवृत्त होत आहे; असें समजावें.

**शिष्य**—उपव्याख्यान म्हणजे?

**सिद्धान्ती**—उपासना अमुक प्रकारें करावी, त्याच्या विभूती अशा अशा आहेत, या उपासनेचें फल या या प्रकारचें आहे, इत्यादि गुणधर्म कथन करणें; म्हणजे उपव्याख्यान होय. हें करण्याला श्रुति प्रवृत्त होत आहे, असा तात्पर्यार्थ आहे ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**एषां भूतानां पृथिवी रसः; पृथिव्या आपो रसः। अपामोषधयो रसः; ओषधीनांपुरुषो रसः; पुरुषस्य वाग्रसो; वाच ऋग्रस; ऋचः साम रसः; साम्न उद्गीथो रसः ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थ**—एषां भूतानां रसः पृथिवी; पृथिव्याः रसः आपः; अपां रसः ओषधयः; ओषधीनां रसः पुरुषः; पुरुषस्य रसः वाक्; वाचः रसः ऋक्; ऋचः रसः साम; साम्नः रसः उद्गीथः ( या चराचर पदार्थांचा रस पृथ्वी, पृथ्वीचा जळ, जळाचा ओषधी, त्यांचा पुरुष, पुरुषाचा रस वाणी, वाणीचा ऋक्, ऋचांचा साम, त्यांचा उद्गीथ रस आहे ) हें रसाष्टक आहे ॥ २ ॥

एषां चराचराणां भूतानां पृथिवी रसो गतिः परायणमवष्टम्भः । पृथिव्या आपो रसोऽप्सु ह्योता च प्रोता च पृथिव्यतस्ता रसः पृथिव्याः । अपामोषधयो रसोऽप्परिणामत्वादोषधीनाम्; तासां पुरुषो रसोऽन्नपरिणामत्वात्पुरुषस्य । तस्यापि पुरुषस्य वाग्रसः । पुरुषावयवानां हि वाक्सारिष्ठा । अतो वाक् पुरुषस्य रस उच्यते । तस्या अपि वाच ऋग्रसः सारतरा । ऋचः साम रसः सारतरम् । तस्यापि साम्न उद्गीथः प्रकृतत्वादोंकारः सारतरः ॥ २ ॥

**सिद्धान्ती**—या येथें आपल्यांस जीं चराचर भूतें ( वस्तू ) दृश्यमास्य आहेत, त्यांचा रस पृथ्वी होय.

**शिष्य**—म्हणजे सर्व पदार्थांची गति म्हणजे उत्पत्ति, परायण म्हणजे स्थिति व अवष्टंभ म्हणजे प्रलय पृथ्वी आहे. पृथ्वीपासून सर्वांची उत्पत्ति, येथें त्यांची स्थिति आणि पृथ्वींत त्यांचा लय होतो. सारांश, सर्वकारण ( रस ) पृथ्वी आहे. **पृथ्वीचें** अधिष्ठान ( रस ) **जळ**; जळांमध्येंच पृथ्वी ओतप्रोत भरली आहे. अपांचे ओषधी, त्यांचे पुरुष, त्याची वाणी, वाणीचें अधिष्ठान ऋचा, त्यांचें साम, आणि सामाचें अधिष्ठान उद्गीथ होय.

**सिद्धान्ती**—ओषधींचा उगम जळापासून अथवा जळाचा परिणाम ओषधी, म्हणजे अन्न. अन्नापासून पुरुष, पुरुषाच्या अवयवांत वाणी श्रेष्ठ असते, हें प्रसिद्धच

आहे; म्हणून वाणी हा पुरुषरस ! वाणींत ऋचा श्रेष्ठ; ऋग्वेदाचें सार म्हणजे सामवेद आणि सामवेदाचें सार म्हणजे उद्गीथ, आपला प्रस्तुतचा विषय आहे, हें सांगण्याची अपेक्षा नाहींच आहे.

**पूर्व०**—पण ओषधी या अपांचें अधिष्ठान नव्हत. रस म्हणजे अधिष्ठान, कारण, असा अर्थ केला, तुम्हीं !

**सिद्धान्ती**—जलांचें कार्य तरी ओषधी आहेत. अहो ! गाईचा रस तो गोरस, असें म्हणतों ना आपण ! अशाच प्रकारें पुढील अर्थांची योजना करावी. कोठें कार्य, कोठें उत्तम वस्तु, कोठें सुखकर पदार्थ, असे 'रस' शब्दाचे निरनिराळे अर्थ श्रुतीला इष्ट आहेत. असो; सामांचा उच्चार ॐकारविहीन केला, तर तो फलप्रद होत नाहीं. याप्रमाणें पृथ्वी इत्यादि अष्टरस झाले ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**स एष रसानाꣳ रसतमः परमः परार्ध्योऽष्टमो यदुद्गीथः ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थ**—**यत् उद्गीथः, सः एषः रसानां रसतमः, परमः, परार्ध्यः, अष्टमः,** ( जो उद्गीथ आहे, तो हा सर्व रसांत अत्यंत उत्तम रस आहे, अतिश्रेष्ठ आहे, महास्थानयोग्य आणि आठवा आहे ) ॥ ३ ॥

एवं स एष उद्गीथाख्य ॐकारो भूतादीनामुत्तरोत्तररसानामतिशयेन रसो रसतमः । परमः, परमात्मप्रतीकत्वात् । परार्ध्योऽर्धं स्थानं परं च तदर्धं च परार्धं तदर्हतीति परार्ध्यः, परमात्मस्थानार्हः; परमात्मवदुपास्यत्वादित्यभिप्रायः । अष्टमः पृथिव्यादिरससंख्यायां यदुद्गीथो य उद्गीथः ॥ ३ ॥

**सिद्धान्ती**—याप्रमाणें उद्गीथ नांवाचा जो ओंकार आहे, तो भूतादिकांचे जे उत्तरोत्तर श्रेष्ठ रस आहेत, त्यांच्याहून अतिशय श्रेष्ठ असा रस आहे. तो 'परम' आहे, कारण तो परमात्म्याचें प्रतीक आहे. तसेंच, पर म्हणजे श्रेष्ठ असें अर्ध ( स्थान ) आहे, तें परार्ध आणि या स्थानाला जो योग्य तो परार्ध्य होय. परमात्म्याच्या प्रकाशनाला याच्या व्यतिरिक्त दुसरें कांहीं स्थान योग्यच नाहीं; ओंकार हाच योग्य आहे. तात्पर्य, परमात्म्याची जशी आपण विचारानुसंधानानें उपासना करितों व करावी, तशाच उपासनेला हा ॐ परमात्मप्रतीक योग्य आहे.

**शिष्य—**हा आठवा रस म्हणजे पृथ्वी, जल, ओषधी, पुरुष, वाणी, ऋक्, आणि साम या सात उत्तरोत्तर श्रेष्ठ रसांहून निराळा, हा 'ॐ' कसा आहे? तर हा रसश्रेष्ठ, परमात्मरूप, परमश्रेष्ठ स्थानाला योग्य असा आहे.

**सिद्धान्ती—**याप्रमाणें हें ॐकारगुणवर्णन झालें. या विशेषणांनीं युक्त अशा ॐकाराची विचारानुसंधानरूपी उपासना करावी. प्रतीकाची उपासना देवास पावते ॥३॥

---

**मंत्र चवथा.**

**कतमा कतमर्क्कतमत्कतमत्साम कतमः कतम उद्गीथ इति विमृष्टं भवति ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थः—कतमा कतमा ऋक्; कतमत् कतमत् साम; कतमः कतमः उद्गीथः** ( ऋग्जातींतील कोणती ऋचा, सामजातींतील कोणतें साम आणि उद्गीथवर्गांतील कोणता उद्गीथ समजून ध्यावा? ) **इति विमृष्टं भवति** ( हें आतां आक्षेपपूर्वक विचार करून ठरवावयाचें आहे ) ॥ ४ ॥

वाच ऋग्रस इत्युक्तम्। कतमा सर्क्कतमत्तत्साम कतमो वा स उद्गीथः। कतमा कतमेति वीप्साऽऽदरार्था। ननु "वा बहूनां जातिपरिप्रश्ने डतमच्"। न ह्यत्र ऋग्जातिबहुत्वं कथं डतमच्प्रयोगः। नैष दोषः। जातौ परिप्रश्नो जातिपरिप्रश्न इत्येतस्मिन्विग्रहे जातावृग्व्यक्तीनां बहुत्वोपपत्तेः। न तु जातेः परिप्रश्न इति विगृह्यते। ननु जातेः परिप्रश्न इत्यस्मिन्विग्रहे कतमः कठ इत्याद्युदाहरणमुपपन्नं जातौ परिप्रश्न इत्यत्र तु न युज्यते। तत्रापि कठादिजातावेव व्यक्तिबहुत्वाभिप्रायेण परिप्रश्न इत्यदोषः। यदि जातेः परिप्रश्नः स्यात्कतमा कतमेत्यादावुपसंख्यानं कर्तव्यं स्याद्विमृष्टं भवति विमर्शः कृतो भवति ॥ ४ ॥

**सिद्धान्ती—**ऋचेचा रस साम, सामाचा उद्गीथ इत्यादि तर सांगितलेंच. आतां ऋगादिकांची विशेष व्यक्ति कळावी, एतदर्थ वरील तीन प्रश्नांचा अवतार आहे.

**शिष्य—**ती कोणती ऋग्जाति, कोणती सामजाति, कोणती उद्गीथजाति हें ठरवावयाचें आहे, हें ठीक आहे. आतां येथें 'कतमा, कतमा' अशी प्रश्नार्थक सर्वनामांची

द्विरुक्ति आहे, ती केवळ आदरार्थ आहे. ऋगादिकांचें जातिज्ञान व्हावें, अशी भारी उत्कट उत्कंठा उपासकांस आहे. एतत्सूचक हीं पदें आहेत. होयना ?

**पूर्व०**—श्रुतीनें येथें व्याकरणसूत्राच्या नियमाला गुंडाळून ठेविलें वाटतें ? ' अनेक जातींपैकीं कोणत्या जातीची वस्तु आहे, हें ठरविण्यासाठीं ' कतम ' या प्रश्नार्थक सर्वनामाचा उपयोग विकल्पेंकरून करितात ' असा सूत्राचा अर्थ आहेना ?

**शिष्य**—मग ?

**पूर्व०**—येथें (या अध्ययनाच्या व्यवहारांत) ऋगादिकांच्या पुष्कळ जाती आहेत, असा अर्थ तर अभिप्रेत नाहीं. तेव्हां येथें ' कतम ' पदाचा उपयोग नाहीं. नव्हे ! तो अनर्थकारी आहे. ऋक्सामादिकांच्या प्रत्येकीं पुष्कळ जाती असल्या, तर गोष्ट निराळी होती. तसें म्हणण्याला प्रमाणही नाहीं. तात्पर्य सूत्राप्रमाणें ' कतम ' प्रयोग अनिष्ट आहे. आणि म्हणून श्रुतिप्रणीत प्रश्न ही उत्पन्न होत नाहींत.

**सिद्धान्ती**—असें काय ! सूत्रांतील ' जातिपरिप्रश्न ' या समस्तपदाचा सप्तमी तत्पुरुषाच्या पद्धतीनें विग्रह केला म्हणजे झालें. ऋग्जाति, सामजाति, उद्गीथजाति, या अनेक जाती आहेत, व **यांतील प्रत्येक जातींत अनेक व्यक्ती म्हणजे अनेक ऋचा, अनेक सामें व अनेक उद्गीथ आहेत.** तेव्हां अनेक ऋचांतील कोणती ऋचा, इत्यादि प्रश्न उत्पन्न होऊन उपपन्नही होतात. अर्थात् येथें ' कतमा '-च्या विकल्पानें उपयोग सूत्रान्वयेंच होतो.

**पूर्व०**—विग्रहच मुळीं ' अनेक जातींपैकीं कोणती जाति ' असा केला पाहिजे. तुम्ही करितां, तसा विग्रह व्याकरणशुद्ध नाहीं. व्याकरणांत ' कतमः कठः ' असें उदाहरण घेतलें आहे व " अनेक जातींतील ' कोणत्या जातीची कठ जाति ' हें समजून घ्यावयाची इच्छा असणाऱ्यानें असा प्रश्न करावा, " असें सांगितलें आहे. अशा दृष्टीनें आमची विग्रह-पद्धति उपपन्न होते.

**सिद्धान्ती**—असा आग्रह कां ! तुम्हीं उद्धृत केलेल्या वृत्तिकारांच्या उदाहरणांत कठजातींतच अंतर्भूत होणाऱ्या अनेकव्यक्तींपैकीं कोणती व्यक्ति ! हें निर्णीत करावयाचें असल्यास आम्ही म्हणतों, असाच विग्रह केला पाहिजे. तुमचा विग्रह येथें उपयोगी नाहीं.

**पूर्व०**—दोन्ही तऱ्हेनें विग्रह सिद्ध होत आहे, तर तुमचाच विग्रह खरा, असा तुमचा तरी हट्ट कां ?

**सिद्धान्ती**—हट्टाचें कारण काय ! श्रुतीनें जें उदाहरण घेतलें आहे, त्यांत ऋचांची, सामांची व उद्गीथांची एक एकच जाति आहे. ' वा बहूनां इत्यादि ' या सूत्राचा तुम्ही म्हणतां तसा विग्रह केला तर श्रुतीचें उदाहरण ' उन्मत्ताच्या गायना-

प्रमाणें त्याज्य आहे,' असें होईल. पण असें कोणें केव्हांही इष्ट नाहीं. शिवाय, घेतलेल्या उदाहरणाच्या सिद्धीसाठीं उपसंख्यान म्हणजे जास्त माहिती घ्यावी लागते. पण तशी माहिती येथें नाहीं. असो; आतां 'कोणती ऋचा, कोणतें साम, कोणता उद्गीथ,' यांची व्यवस्था तर लागली पाहिजे ? तेव्हां 'जातीमधील कोणती व्यक्ति' असा सप्तमीतत्पुरुषी समासविग्रह करूनच व्यवस्था लाविली पाहिजे. असो; कोणती ऋचा, कोणतें साम, कोणता उद्गीथ, याचा यापुढें विमर्श म्हणजे विचार करून निर्णय ठरवावयाचा ॥ ४ ॥

---

## मंत्र पांचवा.

**वागेवर्क्प्राणः सामोमित्येतदक्षरमुद्गीथः । तद्वा एतन्मिथुनं यद्वाक्च प्राणश्चर्क्च साम च ॥ ५ ॥**

**अन्वय व अर्थः—वाक् एवं ऋक्; प्राणः सामः 'ॐ इति' एतत् अक्षरं उद्गीथः** ( वाणी हीच ऋचा, प्राण हाच साम, ॐ हें अक्षरच उद्गीथ होय ) **यत् वाक् च प्राणः च, तत् एतत् वै मिथुनं; ऋक् च साम च-मिथुनं**—( जें वाणी आणि प्राण मिळून होतें, तें हें प्रसिद्ध मिथुन आहे. तसेंच ऋक् व साम मिळून एक मिथुन होतें ) चवथ्या मंत्रांतील प्रश्नत्रयास या मंत्रांत उत्तरें दिली आहेत ॥ ५ ॥

विमर्शे हि कृते सति प्रतिवचनोक्तिरुपपन्ना वागेवर्क्प्राणः सामेति । वागृचोरेकत्वेऽपि नाष्टमत्वव्याघातः पूर्वस्माद्वाक्यान्तरत्वादाप्तिगुणसिद्धय ओमित्येतदक्षरमुद्गीथ इति । वाक्प्राणावृक्सामयोनी इति वागेवर्क्प्राणः सामेत्युच्यते । यथाक्रममृक्सामयोन्योर्वाक्प्राणयोर्ग्रहणे हि सर्वासामृचां सर्वेषां च साम्नामवरोधः कृतः स्यात् । सर्वर्क्सामावरोधे चर्क्सामसाध्यानां च सर्वकर्मणामवरोधः कृतः स्यात् । तदवरोधे च सर्वे कामा अवरुद्धाः स्युः । ओमित्येतदक्षरमुद्गीथ इति भक्त्याशङ्का निवर्त्यते । तद्वा एतदिति मिथुनं निर्दिश्यते । किं तन्मिथुनमित्याह यद्वाक्च प्राणश्च सर्वर्क्सामकारणभूतौ मिथुनम् । ऋक्च साम चेति ऋक्सामकारणावृक्सामशब्दोक्तावित्यर्थः । न तु स्वतन्त्रमृक्च साम च मिथुनम् । अन्यथा

हि वाक्च प्राणश्चेत्येकं मिथुनमृक्साम चापरं मिथुनमिति द्वे मिथुने स्याताम् । तथा च तदेतन्मिथुनमित्येकवचननिर्देशोऽनुपपन्नः स्यात् । तस्मादृक्सामयोन्योर्वाक्प्राणयोरेव मिथुनत्वम् ॥ ५ ॥

**सिद्धान्ती**—दिलेल्या प्रश्नांचा विचार करून निश्चय ठरवावा आणि नंतर उत्तर द्यावें, हा न्याय आहे. तसेंच उत्तर या मंत्रांत दिलें आहे. तें असें: वाणी हीच ऋचा, प्राण हाच साम होय. वाणीचा रस ऋचा आहे, असें सांगितल्यावर कोणती ऋचा वाणीचा रस अथवा सार आहे, असा प्रश्न उत्पन्न झाला. त्याला श्रुतीचें उत्तर हें कीं, वाणी हीच ती ऋचा होय.

**पूर्व०**—'वाणीचा रस ऋचा आहे' असें सांगून तुम्ही एकंदर रसाष्टक सिद्ध केलें; आणि आतां 'वाणी हीच ऋचा' असें म्हणतां. तेव्हां तुमचें अष्टक नाहींसें होऊन त्याच्या ऐवजीं रससप्तक येणार ?

**सिद्धान्ती**—नाहीं नाहीं. अहो ! पूर्वीचें वाक्य व तद्रहस्य हीं दोन्हीं निराळीं; आणि आतांचें वाक्य व तद्रहस्य हीं निराळीं आहेत. त्या वाक्यांत रसतम कोणतें हें ठरविलें. येथें आप्तिगुण ठरवावयाचा आहे.

**शिष्य**—म्हणजे ?

**सिद्धान्ती**—म्हणजे 'ऋचेवर वाणीला संपन्न करा, ऋचेवर वाग्दृष्टि ठेवा' असा उपदेश करावयाचा आहे. समजलें ? ॐ रसतम आहे, असें तेथें सांगितलें. वाणी येथें संपादनीयत्व-गुणाची आहे असें सांगावयाचें आहे.

**पूर्व०**—कशावरून ?

**सिद्धान्ती**—कारण श्रुतिवाक्य पहा; "ॐ हें अक्षर उद्गीथ अशी भावना ठेवा, हें श्रुतीचें वाक्य आप्तिगुणप्रदर्शक आहे. असो; तेव्हां या दृष्टीनें श्रुतीच्या रसाष्टकाला कांहीं एक बाधा होत नाहीं. असो; ती ऋक् वाणीच होय, तें साम प्राणच होय, असें समजा, अशी भावना ठेवा,' कारण, तें उद्गीथ ॐ हें अक्षर होय, असें श्रुति म्हणत आहे.

**पूर्व०**—पण हें म्हणण्याचें समर्थन करण्याला कांहीं युक्ति आहे, का 'बाबावाक्यं प्रमाणं' ?

**सिद्धान्ती**—वाणी ही ऋचेचें उगमस्थान आहे ना ? मग कार्यावर कारणाची लक्षणा केली, यांत बिघडलें काय ? तसेंच, सामगायनाला बळ लागतें ना ? तोच प्राण होय. सारांश, ऋचा हें जें कार्य, त्याचें कारण वाणी आहे; व सामरूपी कार्याचें प्राण. हें कारण. हें परिणाम पावलें म्हणजे कार्य होतें. एवंच कारण व कार्य हीं एकच आहेत, हेंही ठरतें. म्हणून श्रुतिमाता ऋचेला 'वाणी' या नांवानें व सामाला 'प्राण'

या नांवानें उपासनासौकर्यासाठीं संबोधितें. समजलें ? शिवाय, ऋक्सामांच्या योनी ( उत्पत्तिस्थानें ) वाणी व प्राण; या द्वयीचें ग्रहण केलें, म्हणजे सर्व ऋचांचा व सर्व सामांचा अंतर्भाव सहजासहजीं केला असें होतें. याप्रमाणें सर्व ऋचांचा व सर्व सामांचा अंतर्भाव वाक्प्राणांत ( वाणी व प्राण या मिथुनांत ) उपासनाभावनेनें झाला, म्हणजे ऋग्वेदानें व सामवेदानें साध्य होणाऱ्या सर्व कर्मांचाही अवरोध होतो, वाक्प्राणाच्या वर्तुळांत सर्व कर्मांचा समावेश होतो. झालें ? पण सर्व शास्त्रोक्त कर्में शास्त्रीय वासनांपासून निर्माण होतात. कर्मांचा तर आपण समावेश वाक्प्राण वर्तुळांत केला. तेव्हां अर्थातच सर्व काम ( वासना ) ही या वर्तुळांत आलेसें झालें. आतां, ॐकारोपासना सर्व वासना तृप्त करिते, ॐकारोपासनेनें सर्व इच्छा परिपूर्ण होतात, हें पुढें श्रुति सांगणार आहे. तेव्हां त्या दृष्टीनें ॐकार व ऋक्साम ( वाणी–प्राण ) यांचा संबंध सिद्ध करण्यासाठीं श्रुति असें म्हणते. याचप्रमाणें सर्व वाक्प्राणजन्य उद्गीथाचा समावेश 'ओं' या पवित्र अक्षरांत होतो. हा 'ॐ उद्गीथ आहे' उद्गीथाचा अवयव नव्हे बरें काय ? असो; उद्गीथाचा संबंध वाक्प्राणाशीं उघड आहे, म्हणून सर्व कामांचा ( वासनांचा ) समावेश करणारे वाक्प्राणाशीं नित्य संबद्ध असलेल्या उद्गीथालाही परंपरेनें सर्व वासनांचा समावेश करितां येऊन त्यांस नियमबद्ध करितां येतें. असो; आतां त्या ह्या मिथुनाचा विचार—

**शिष्य**—कोणतें मिथुन आणखी ? भगवन् !

**सिद्धान्ती**—सर्व ऋक्सामांचें कारण असणारें वाक्प्राण नामक मिथुन होय.

**पूर्व०**—ऋक् आणि साम हें एक दुसरेंच मिथुन घ्या !

**सिद्धान्ती**—नाहीं. मंत्रांतील 'ऋक् च साम च' हीं पदें स्वस्वकारणांसाठीं, वाक्प्राणांसाठीं उपयोगिलीं आहेत.

**पूर्व०**—ऋक्साम हें स्वतंत्रच मिथुन आहे, असें समजून दोन मिथुनांची कल्पना करावी. वाक्प्राण हें एक मिथुन आणि ऋक्साम हें दुसरें मिथुन, अशीं हीं दोन मिथुनें होतात.

**सिद्धान्ती**—असें समजण्याचें कारण नाहीं. शिवाय, मंत्रांत 'तें हें मिथुन' असा एकवचनी प्रयोग आहे. दोन मिथुनें घेतल्यास मंत्रांतील वाक्य उपपन्न होत नाहीं. म्हणून ऋक्सामांचें कारण असणारें जें वाक्प्राणांचें मिथुन तेंच घेणें व एकच मिथुन आहे, असें समजणें, योग्य होय. मंत्रांतील उपक्रमाचा भंग करणें हें कांहीं योग्य नव्हे. असो; मिथुन ( मेहुण ) एकच आहे, हें ठरलें ॥ ५ ॥

---

## मंत्र सहावा.

**तदेतन्मिथुनमोमित्येतस्मिन्नक्षरे सꣳसृज्यते यदा वै मिथुनौ समागच्छत आपयतो वै तावन्योन्यस्य कामम् ॥ ६ ॥**

अन्वय व अर्थः—'ओं इति;' एतस्मिन् अक्षरे तत् एतत् **मिथुनं संसृज्यते** ('ओं ह्याच' अक्षरामध्यें तें हें-वाक्प्राण-मिथुन संसृष्ट होतें. ॐ हें शब्दस्वरूपी अक्षर आहे) **यदा वै मिथुनौ समागच्छतः, तौ अन्योन्यस्य कामं आपयतः वै** (जेव्हां मिथुनांतील दोन्हीं अवयव परस्परसमागमित होतात, तेव्हां त्या उभयतांच्या सर्व कामना परिपूर्ण होतात; हा सर्व साधारण नियम आहे. तसेंच वाक्प्राणात्मक मिथुन संगत झालें म्हणजे उभयतांचे काम पूर्ण होतात) ॥ ६ ॥

तदेतदेवंलक्षणं मिथुनमोमित्येतस्मिन्नक्षरे संसृज्यते। एवं सर्वकामावाप्तिगुणविशिष्टं मिथुनमोंकारे संसृष्टं विद्यत इत्योंकारस्य सर्वकामावाप्तिगुणवत्त्वं प्रसिद्धम्। वाङ्मयत्वमोंकारस्य प्राणनिष्पाद्यत्वं च मिथुनेन संसृष्टत्वं मिथुनस्य कामापयितृत्वं प्रसिद्धमिति दृष्टान्त उच्यते। यथा लोके मिथुनौ मिथुनावयवौ स्त्रीपुंसौ यदा समागच्छतो ग्राम्यधर्मतया संयुज्येयातां तदाऽऽपयतः प्रापयतोऽन्योन्यस्येतरेतरस्य तौ कामम्। तथा च स्वात्मानुप्रविष्टेन मिथुनेन सर्वकामाप्तिगुणवत्त्वमोंकारस्य सिद्धमित्यभिप्रायः ॥ ६ ॥

**सिद्धान्ती**—मागच्या मंत्रांत वाक्प्राणात्मक मिथुनाचीं जीं लक्षणें सांगितलीं आहेत, त्या लक्षणांनीं युक्त असणारें वाक्प्राणमिथुन 'ओं' या शब्दस्वरूपी अक्षरामध्यें संसृष्ट झालें. वाणी आणि प्राण यांचा परस्पर समागम 'ॐ' या अक्षरामध्यें झाला, म्हणजे हें सर्वकामांची (वासनांची) आवाप्ति करून देणारें मिथुन, सकल मनकामना पूर्ण करण्याचा विशेष गुण असणारें हें मिथुन, ओंकारामध्यें राहून अन्योन्योपकारक होतें आणि अर्थातच ओंकाराला 'सर्व कामना परिपूर्ण करणारा' असें नांव प्राप्त होतें. तात्पर्य, 'ओंकार सर्वकामनापरिपूरक आहे' अशी त्याची यथार्थसिद्धि होते.

**शिष्य**—म्हणजे, वाक्प्राणांच्या मिथुनानें ओंकार संसृष्ट होतो. ओंकार वाङ्मय आहे; आणि प्राणजन्य आहे, हें प्रसिद्ध आहे. तेव्हां ही संसृष्टि सहज सिद्ध आहे. बरें मग?

**सिद्धान्ती**—आतां, परस्परोपकारक मिथुनाचा संगम झाला असतां सर्व कामनांची परिपूर्ति होते, हें व्यवहारांतही आपल्यास दिसतें.

**शिष्य**—मी सुचवित आहे, हें उदाहरण ग्राम्य, प्राकृत, आहे. पण विषयाची समजूत करण्याला ठीक आहे, असें मला वाटतें. भगवन्! या ग्राम्य उदाहरणाचा उच्चार केल्याबद्दल आपण मला क्षमा करावी. जेव्हां परस्परांचे उपकारक अवयव असणारीं स्त्रीपुरुषें ग्राम्य संग्राम करण्यासाठीं एकत्र होतात, जेव्हां त्यांचा संगम होतो, तेव्हां उभयतांच्याही विषयकामना परिपूर्ण होण्यास संधि मिळते व पुढें तृप्ति होते; असें म्हणतातही. हें दंपत्य एकमेकांस आनंद देणारें फल निर्माण करितें, असें म्हणतात. पुन: क्षमा मागून मी म्हणतों कीं, या संसारीं पतिपत्नींला एकमेकांच्या संगमापासून अन्योन्यांस आनंद देतां घेतां येतो, त्याप्रमाणें ओंकारामध्यें प्रवेश करून संसृष्ट झालेल्या 'वाक्प्राण' नामक सर्वकामद मिथुनाच्या साह्यानें ओंकारालाही 'सर्वकामावाप्तित्वाचा' गुण प्राप्त होतो. नव्हे?

**सिद्धान्ती**—समजुतीसाठीं तूं दृष्टांत दिलास, तो योग्यच आहे. असो; याप्रमाणें ॐकाराचा 'सकलकामनापरिपूर्ति' हा धर्म आहे हें सिद्ध झालें ॥ ६ ॥

तदुपासकोऽप्युद्गाता तद्धर्मा भवतीत्याह—

**शिष्य**—शिवाय, ओंकाराची उपासना करणारा जो उद्गाता, त्यालाही पूर्वोक्त ओंकारगुणाच्या फलाचा लाभ होतो. तो सकलकामनापरिपूर्ण होतो कसें तें ऐका:—

---

## मंत्र सातवा.

**आपयिता ह वै कामानां भवति य एतदेवं विद्वानक्षरमुद्गीथमुपास्ते ॥ ७ ॥**

**अन्वय व अर्थ:**—यः विद्वान् एवं एतत् उद्गीथम् अक्षरम् उपास्ते वै कामानाम् आपयिता ह भवति (जो कोणी पूर्वोक्तस्वरूपानें उद्गीथ अक्षराची, ओंकारांची उपासना करितो, तो सर्वकामनांचा संपादक होतो; त्याचे यजमानाचे सर्व काम त्या यजमानाला प्राप्त होतात ॥ ७ ॥

आपयिता ह वै कामानां यजमानस्य भवति य एतदक्षरमेवमाप्तिगुणवदुद्गीथमुपास्ते तस्यैतद्यथोक्तं फलमित्यर्थः। "तं यथा यथोपासते तदेव भवति" इति श्रुतेः ॥ ७ ॥

**सिद्धान्ती**—आप्तकाम करण्याचा गुण असणाऱ्या 'उद्गीथ अक्षराची जो उद्गाता यजमानासाठीं उपासना करितो, त्याच्या यजमानाला आतांच सांगितलेलें सर्व फल मिळतें. 'जी भावना ठेवून उपासक उपास्याची उपासना करितो, त्या भावनेच्या रूपानुसार उपासकाला फल मिळतें. तो भावनारूप होतो.' अशी श्रुति प्रमाण आहे.

**पूर्व०**—मूळमंत्रांत 'आपयिता' हा शब्द आहे. 'आप्त' हें पद नाहीं.

**सिद्धान्ती**—कांहीं चिंता नाहीं. उद्गाता हा यज्ञकार्मातील एक ऋत्विज आहे. यजमानासाठीं हे ऋत्विज हविर्दान किंवा उपासना करितात. तेव्हां यजामानाच्या प्रेरणेनें व यजमानासाठीं उद्गात्यानें केलेली उपासना यजमानालाच फलप्रद व्हावयाची, हा न्याय आहे. हें मनांत आणून श्रुतीनें 'आपयिता' या पदाची योग्य योजना केली आहे ॥ ७ ॥

---

## मंत्र आठवा.

**तद्वा एतदनुज्ञाक्षरं यद्धि किंचानुजानात्योमित्येव तदाहैषो एव समृद्धिर्यदनुज्ञा समर्धयिता ह वै कामानां भवति य एतदेवं विद्वानक्षरमुद्गीथमुपास्ते ॥ ८ ॥**

**अन्वय व अर्थः**—**तत् एतत् अनुज्ञाक्षरं वै** ( तें हें अनुज्ञाख्यापक अक्षर आहे. ॐकार अनुज्ञासूचक आहे ) **यत् किंच हि अनुजानाति, तत् 'ओं' इति एव आह** ( आपण जेव्हां अनुमोदन देतों. तेव्हां कबूल असलेल्या गोष्टीला 'ओं'–होय–असेंच म्हणतों ) **यत् अनुज्ञा, एषा उ समृद्धिः एव** ( जी म्हणून अनुज्ञा, संमति, आहे, ती समृद्धीची व संपत्तीचीच दर्शक होते ) **यः एवं विद्वान् एतत् उद्गीथं अक्षरं उपास्ते कामानां समर्धयिता ह वै भवति** ( म्हणून जो कोणी पूर्वोक्त लक्षणात्मक उद्गीथ अक्षराची, ओंकाराची, उपासना करितो, तो यजमानाच्या सर्व कामनांचा संपादक होतो ॥ ८ ॥

**समृद्धिगुणवांश्चोंकारः । कथम्—तद्वा एतत्प्रकृतमनुज्ञाक्षरमनुज्ञा च साऽक्षरं च तत् । अनुज्ञाऽनुमतिरोंकार इत्यर्थः । कथमनुज्ञेत्याह श्रुतिरेव । यद्धि किंच यत्किंच लोके ज्ञानं धनं वाऽनुजानाति**

विद्वान्धनी वा तत्रानुमतिं कुर्वन्नोमित्येव तदाह । तथा च वेदे "त्रयस्त्रिंशदित्योमिति होवाच" इत्यादि । तथा च लोकेऽपि तवेदं धनं गृह्णामीत्युक्त ओमित्याह । अत एषा उ एवैषैव समृद्धिर्यदनुज्ञा सा समृद्धिस्तन्मूलत्वादनुज्ञायाः । समृद्धो ह्योमित्यनुज्ञां ददाति तस्मात्समृद्धिगुणवानोंकार इत्यर्थः । समृद्धिगुणोपासकत्वात्तद्धर्मा सन्समर्धयिता ह वै कामानां यजमानस्य भवति य एतदेवं विद्वानक्षरमुद्गीथमुपास्त इत्यादि पूर्ववत् ॥ ८ ॥

**सिद्धान्ती**—ओंकार हा समृद्धिगुणवंत आहे.

**शिष्य**—म्हणजे कसें ?

**सिद्धान्ती**—ॐ हा आपला प्रकृत विषय आहे. अनुज्ञा म्हणजे अनुमति, संमति. ॐ हा अनुमतिदर्शक असून पुनः अक्षर आहे. ॐ ( होय ) म्हटल्यानें आपण ऐकिलेल्या गोष्टीला आपली संमति आहे, असें दर्शित होतें. हा संमतिदर्शक ओंकाराचा धर्म स्मृतिप्रसिद्ध तर आहेच; पण श्रुति ही स्वतः त्याचा हा गुण व्यवहाररूपानें प्रकट करीत आहे. ती म्हणते: व्यवहारांतही ज्या ज्ञानाला विद्वान् संमति देतो किंवा ज्या धनासंबंधानें धनिक अनुमति देतो, त्या ज्ञानाच्या संबंधानें विद्वान् व धनासंबंधें धनिक 'ओं ( होय )' असें म्हणून आपली संमति व अनुमति हे उभयताही प्रकट करितात. पुनः, वेदांतही अशीच व्यवस्था आहे. "देव तेहतीस आहेत" असें याज्ञवल्क्य म्हणाल्यावर 'होय (ओं)' असें म्हणून शाकल्यानें आपली संमति दिली." पुनः आणखी, 'तुझें हें धन मी घेतों' असें व्यवहारतः ठरल्यावर धन घेणारानें म्हटलें, म्हणजे धनदाता 'ओं ( होय )' असें म्हणून आपली संमति देतो.

**पूर्व०**—हें सर्व ठीक झालें. पण 'ओंकार समृद्धिगुणक आहे,' असें सांगून तुम्ही विषयाचा उपक्रम केला, त्याची काय वाट ?

**सिद्धान्ती**—अंमळ दमानें घ्या. श्रुतिच तुमच्या शंकेची निवृत्ति करीत आहे. ऐका:—जी म्हणून समृद्धि असते, ती अनुज्ञासूचक म्हणजे अनुज्ञा-( अनुमति )-सूचक असते, व तीच समृद्धिही असते.

**पूर्व०**—कशावरून ?

**सिद्धान्ती**—अहो ! अनुमतीचें मूळ कारणच समृद्धि असते. जो समृद्ध असेल, ज्ञानसंपन्न किंवा धनसंपन्न असेल, तोच निश्चित झालेल्या सिद्धांताला व ठरलेल्या व्यवहाराला अनुमति देतो. ज्ञानच नाहीं ज्याला, तो संमति देणार कसली व धनच नाहीं, तो व्यवहार ठरवून 'होय' असें म्हणेल, तरी कसा ? असो; तेव्हां 'ओं म्हणजे अनुज्ञा' प्रकट झाल्यावर तेथें समृद्धि आहे, असें समजतें. तात्पर्य, ओंकार

समृद्धिगुणवंत आहे, हें ठरलें. ओंकाराचें हें असें स्वरूप समजून घेऊन व त्याची दृ ठेऊन जो उद्गीथ अक्षराची उपासना करितो, तो आपल्या यजमानाचे सर्व इष्ट वि त्याला मिळवून देतो, इत्यादि अर्थ मागच्या मंत्रांत आपण केलाच आहे ॥ ८ ॥

---

## मंत्र नववा.

**तेनेयं त्रयी विद्या वर्तत ओमित्याश्रावयत्योमिति शꣳसत्योमित्युद्गायत्येतस्यैवाक्षरस्यापचित्यै महिम्ना रसेन ॥ ९ ॥**

**अन्वय व अर्थः—तेन इयं त्रयी विद्या वर्तते** ( या अक्षराच्या ओंकाराच्या, साह्यानें ऋग्वेदादि तिन्ही विद्या प्रवृत्त होतात ) **'ओं' इति आश्रावयति, 'ओं' इति शꣳसति. 'ओं' इति उद्गायति** ( 'ॐ म्हणा' असें अध्वर्यु सांगतो, 'ॐ' असें होता म्हणतो व ॐ म्हणून उद्गाता गातो ) **एतस्य एव अक्षरस्य अपचित्यै महिम्ना रसे**न ( ह्या अक्षराच्या माहात्म्यानें व रसानें ह्या ॐकाराची, परमात्मप्रतीकाची पूजा करावी, एतदर्थ अध्वर्यु-आदि यज्ञयागादि कर्मे ॐकारपूर्वक करितात ) ॥ ९ ॥

अथेदानीमक्षरं स्तौत्युपास्यत्वात्प्ररोचनार्थम् । कथं, तेनाक्षरेण प्रकृतेनेयमृग्वेदादिलक्षणा त्रयी विद्या त्रयीविद्याविहितं कर्मेत्यर्थः । न हि त्रयी विद्यैवाऽऽश्रावणादिभिर्वर्तते कर्म तु तथा प्रवर्तत इति प्रसिद्धम् । कथमोमित्याश्रावयत्योमिति शंसत्योमित्युद्गायतीति लिङ्गाच्च सोमयाग इति गम्यते । तच्च कर्मैतस्यैवाक्षरस्यापचित्यै पूजार्थम् । परमात्मप्रतीकं हि तत् । तदपचितिः परमात्मन एव सा । "स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विन्दति मानवः" इति स्मृतेः । महिम्ना रसेन; किंचैतस्यैवाक्षरस्य महिम्ना महत्त्वेन ऋत्विग्यजमानादिप्राणैरित्यर्थः । तथैतस्यैवाक्षरस्य रसेन व्रीहियवादिरसनिर्वृत्तेन हविषेत्यर्थः । यागहोमाद्यक्षरेण क्रियते । तच्चाऽऽदित्यमुपतिष्ठते । ततो वृष्ट्यादिक्रमेण प्राणोऽन्नं च जायते । प्राणैरन्नेन च यज्ञस्तायते । अत उच्यतेऽक्षरस्य महिम्ना रसेनेति ॥ ९ ॥

**सिद्धान्ती**—येथपर्यंत ॐकाराचे गुण, त्याची उपासना व तदुपासनेचें फल, या गोष्टी सांगितल्या. आतां, जनमनाची प्रवृत्ति या उपास्य ॐकाराकडे व्हावी, म्हणून श्रुति ॐकाराची स्तुति प्रारंभित आहे. ऐका: आपला प्रस्तुत विषय जो ॐकार आहे, त्याच्या मात्र साह्यानें ऋग्वेदादि त्रयी ( तिन्ही वेद ) सिद्ध होते. म्हणजे वेदत्रयींत जें कर्म विहित केलें आहे, तें सिद्ध होतें.

**पूर्व०**—विद्येच्या प्रकरणांत कर्मांची भानगड कशाला ?

**सिद्धान्ती**—काय म्हणावें तुम्हाला ? अहो ! आश्रवणादि जीं कर्में आतांच मंत्रांत उल्लेखिलीं आहेत, तीं काय ऋग्वेदादि संहितेनेंच करावयाचीं असतात ? आश्रवण, शंसन, उद्गान इत्यादि उल्लेखिलेलीं कर्में यज्ञादिकर्मांतच अंतर्भूत होतात, हें जगप्रसिद्ध आहे. असो; अध्वर्यु ' मंत्र म्हणा ' असें ॐकारोच्चारपूर्वक होत्यास सांगतो. होता ॐपूर्वक मंत्र म्हणतो, ॐपूर्वक हविर्दान होतें आणि नंतर शेवटीं उद्गाता ॐपूर्वक सामगायन करीत असतो. दर्शपूर्णमासादिकांत हा प्रकार दिसत नाहीं व अग्निष्टोमादिकांत दिसतो, म्हणून मंत्रांतील उल्लेख सोमयागसंबंधी आहे, हें आश्चर्यवादि तिन्ही कर्मांच्या समाहारी चिन्हांवरून स्पष्ट होतें. असो; हें सर्व आश्रावणादि कर्म वस्तुतः ओंकार अक्षराच्या पूजेप्रीत्यर्थच होतें. ओंकार परमात्म्याचें प्रतीक आहे, हें आपण मागेंच समजून घेतलें आहे. तेव्हां ओंकाराची पूजा म्हणजे तात्पर्यतः परमात्मपूजाच होय. 'आपापल्या कर्मांनीं त्याची ॐकाराची, परमेश्वराची, अर्चा यथासांग करून जीव सिद्धि मिळवितात ' असें श्रीमद्भगवद्गीता-स्मृतीमध्येंही म्हटलें आहे. वर्णाश्रमविहित कर्म करून परमात्म्यास संतुष्ट केलें असतां त्याच्या प्रसादानें उपासकास इष्ट फल प्राप्त होतें. तात्पर्य, आपलें सर्व कर्म भगवत्पर असावें, हा श्रीकृष्णाचा आशय आहे. ॐकार सर्वेश्वराचें प्रतीक. तेव्हां, ॐकारपूजा म्हणजे भगवत्पूजा होय. म्हणून ॐकारपूर्वक कर्म करावें व तें त्याला मान्य होईल, असें मानून त्यालाच समर्पण करावें. असो:—

**शिष्य**—मंत्रांतील 'महिम्ना ' व 'रसेन,' या पदांचा काय अर्थ ?

**सिद्धान्ती**—महिम्ना म्हणजे महत्त्व. येथें महत्त्व म्हणजे यज्ञांतील ऋत्विजांचे व यजमानाचें प्राण होत. कोणतेंही कर्म प्राणाच्या साह्यानें होतें. तसेंच, प्राण हा ॐकाराचा एक घटक आहे, ॐकाराचा जनक आहे, हें आपण आतांच पाहिलें. असो; या अक्षराचा रस म्हणजे व्रीहि, यव इत्यादिकांच्या सशास्त्र संग्रहानें सिद्ध होणारा हवि होय. कर्माला अक्षरात्मक मंत्राची आवश्यकता असते. तेव्हां कर्म श्रौतस्मार्त असो किंवा संसारिक असो, तेथें ॐकारमहिमा जो प्राण व ॐकाररस जो हवि, यांची म्हणजे उपादान व निमित्त या कारणांची अपेक्षा असते. म्हणून ॐकारसाह्यानें सर्व कर्म वस्तुतः होतें. जीवानें मात्र समजलें पाहिजे. ॐकार पूजार्थ माझें कर्म आहे, अशी त्याची भावना असली पाहिजे. " 'ॐ' पूर्वक केलेलें यज्ञयागादि कर्म सूर्यदेवतेला अर्पण होतें. नंतर तें अर्पित कर्म वृष्टिप्रमुख परंपरेनें

प्राणरूप होतें. प्राण व अन्न हींच यज्ञाचीं मुख्य उपकरणें आहेत.'' यज्ञसंतानार्च
दोन मुख्य दोन संरक्षक अंगें आहेत; आणि म्हणूनच श्रुति म्हणते कीं ॐकारम
( प्राण व ॐकाररस ( हवि ) यांच्या साह्यानें ॐकारपूजार्थ कर्म करून बुद्धि
याज्ञिक ॐकारमाहात्म्य वाढवितो ॥ ९ ॥

---

## मंत्र दहावा.

**तेनोभौ कुरुतो यश्चैतदेवं वेद यश्च न वेद। नाना तु विद्या चाविद्या च यदेव विद्यया करोति श्रद्धयोपनिषदा तदेव वीर्यवत्तरं भवतीति खल्वेतस्यैवाक्षरस्योपव्याख्यानं भवति ॥ १० ॥**

**इति प्रथमाध्यायस्य प्रथमः खण्डः ॥ १ ॥**

अन्वय व अर्थः— यः च एतत् एवं वेदः यः च न वेदः
उभौ कुरुतः ( ज्याला ॐकारस्वरूपाचें ज्ञान आहे तो व ज्याला
ज्ञान नाहीं तो, असे उभयतांही शास्त्रविहित कर्म करितात ) नाना
विद्या अविद्या च ( विद्या व अविद्या हीं परस्परविलक्षण आहेत )
एव विद्यया श्रद्धया उपनिषदा करोति, तत् एव वीर्यवत्तरं भव
( जें कांहीं विद्यासाह्यानें, श्रद्धासाह्यानें व उपनिषत्साह्यानें जीव करि
तें जास्त वीर्यवान् कर्म होतें ) इति खलु एतस्य एव अक्षरस्य उ
व्याख्यानं भवति ( याप्रमाणें या ओंकाराचेंच, उद्गीथ अक्षराचें, हें
उपव्याख्यान झालें ) ॥ १० ॥

तत्राक्षरविज्ञानवतः कर्म कर्तव्यमिति स्थितमाक्षिपति—तेनाक्षरेणोभौ यश्चैतदक्षरमेवं व्याख्यातं वेद यश्च कर्ममात्रविदक्षरयाथात्म्यं न वेद तावुभौ कुरुतः कर्म। तयोश्च कर्मसामर्थ्यादेव फलं स्यात्किं तत्राक्षरयाथात्म्यविज्ञानेनेति। दृष्टं हि लोके हरीतकीं भक्षयतोस्तद्रसाभिज्ञेतरयोर्विरेचनम्। नैवम्। यस्मान्नाना तु विद्या चाविद्या च। भिन्ने हि विद्याविद्ये। तुशब्दः पक्षव्यावृत्त्यर्थः। नोंकारस्य कर्माङ्गत्वमात्रविज्ञानमेव रसतमाप्तिसमृद्धिगुणवद्विज्ञानं किं तर्हि ततोऽभ्याधिकम्। तस्मात्तदङ्गाधिक्यात्फलाधिक्यं युक्त-

मित्यभिप्रायः । दृष्टं हि लोके वणिक्शबरयोः पद्मरागादिमणिविक्रये वणिजो विज्ञानाधिक्यात्फलाधिक्यम् । तस्माद्यदेव विद्यया विज्ञानेन युक्तः सन्करोति कर्म श्रद्धया श्रद्दधानश्च सन्नुपनिषदा योगेन युक्तश्चेत्यर्थः । तदेव कर्म वीर्यवत्तरमविद्वत्कर्मणोऽधिकफलं भवतीति । विद्वत्कर्मणो वीर्यवत्तर[त्व]वचनादविदुषोऽपि कर्म वीर्यवदेव भवतीत्यभिप्रायः । न चाविदुषः कर्मण्यनधिकारः । औषस्त्ये काण्डेऽविदुषामप्यार्त्विज्यदर्शनात् । रसतमाप्तिसमृद्धिगुणवदक्षरमित्येकमुपासनम् । मध्ये प्रयत्नान्तरादर्शनात् । अनेकैर्हि विशेषणैरनेकधोपास्यत्वात्खल्वेतस्यैव प्रकृतस्योद्गीथाख्यस्याक्षरस्योपव्याख्यानं भवति ॥ १० ॥

इति प्रथमाध्यायस्य प्रथमः खण्डः ॥ १ ॥

**सिद्धान्ती**—आतां—

**पूर्व०**—थांबा. या पुढें ऐकण्याची आमची इच्छा नाहीं. मागच्या मंत्रांत स्पष्ट सांगितलें कीं, विद्वानानें कर्मच केलें पाहिजे. आतां तुमच्या ज्ञानाची आम्हांस बिलकुल अपेक्षा नाहीं.

**सिद्धान्ती**—श्रुतीचें म्हणणें तरी ऐकून घ्याल. आतां पर्यंत ॐकाराचें स्वरुप, तद्गुण, तदुपासनाफल यांचें जें व्याख्यान झालें, तें ज्याला समजलें, तो विद्वान् होय. आणि ॐस्वरूपादि न समजतां जो कर्म मात्र करितो, तो श्रुतिदृष्टीनें अविद्वान् होय. हे उभयतांही श्रुतिविहित कर्म करितात.

**पूर्व०**—व कर्मानुसार त्यांस फलही मिळतें. कर्माचें सामर्थ्यच असें आहे कीं,कर्मकर्त्याला तत्तत्कर्मजन्य फल मिळावें. असें जर आहे, तर ज्ञानाची प्राप्ति करून घेऊन काय करावयाचें आहे ? ॐकार अक्षराचे गुण समजून जास्त अशी फलप्राप्ति होणें शक्य नाहीं. व्यवहारांत बाळहिरड्याचें गुणधर्म जाणणाऱ्यानें व न जाणणाऱ्यानें अशा उभयतांनीं बाळहिरड्या घेतल्या तर उभयतांनाही रेचच होणार. येथें गुणधर्म ठाऊक असोत वा नसोत; कर्माचा परिणाम ( औषध घेण्याचा परिणाम ) हा व्हावयाचाच.

**सिद्धान्ती**—तसें नाहीं. कारण, विद्या म्हणजे उपासना आणि अविद्या म्हणजे कर्म, या उभयताचें स्वरूप अत्यंत भिन्न आहे.

**शिष्य**—मंत्रांत 'तु' शब्द आहे, तो यांनीं केलेल्या पूर्वपक्षाचा निरास श्रुति करीत आहे, हें दाखविण्यासाठीं असावा ?

**सिद्धान्ती**—होय. आतां 'ॐकार हा कर्माचें मात्र अंग आहे,' एवढेंच विज्ञान असलें म्हणजे त्याचें रसतमत्व, त्याची सकल कामनावाप्ति व गुणधर्म आणि त्याचें समृद्धिगुणत्व या सर्वांचें ज्ञान असतेंच असें नाहीं. हें ज्ञान कर्मांगज्ञानाहून अधिक असतें. कर्मांगज्ञानांत याचा अंतर्भाव होत नाहीं.

**शिष्य**—रसतमादि गुणविज्ञान कर्मांगविज्ञानापेक्षां जास्त आहे, म्हणून जास्त विज्ञानाचें फलही जास्तच असलें पाहिजे. व्यवहारांतही आपण पाहतों कीं, एखाद्या पद्मरागादिकासारखें बहुमोल रत्न चतुर सराफानें व शबरानें ( अज्ञानी किंवा रानटी माणसानें ) बाजारांत विकावयास नेलें असतां रत्नपारख्या सराफास रत्नाची खरी किंमत ठाऊक असते, म्हणून त्याला म्हणून त्याला फलही जास्त मोठें मिळतें. पण शबराला चारदोन आणे देऊन वाटेला लावितात !

**सिद्धान्ती**—म्हणूनच श्रुति म्हणत आहे कीं, 'जो कोणी विज्ञानानें युक्त असून श्रद्धापुरःसर योगैकनिष्ठेनें कर्म करितो, त्याचें तेंच कर्म जास्त वीर्यशाली होतें. अविद्वानानें केलेल्या कर्माला जितकें व ज्या योग्यतेचें फल मिळतें, त्यापेक्षां जास्त व जास्त योग्यतेचें फल विद्वानाला मिळतें.

**शिष्य**—मंत्रांतील उपनिषत् शब्दाचा अर्थ आपण 'दृढनिष्ठा, एकाग्रता, योगयुक्तता' असा केला आहे. हें नीटच आहे. ज्ञान, श्रद्धा आणि एकनिष्ठता हीं मानसिक साधनें सिद्ध असतील, तर कर्मफळ अधिक योग्यतेचें मिळतें, असें आपण सांगितलें. त्यावरून अविद्वानानेंही कर्म केलें असता त्यालाही त्या कर्माचें फल मिळतें, असें झालें ?

**सिद्धान्ती**—असें असलेंच पाहिजे. 'कर्मकर्त्याला कर्मफल मिळालेंच पाहिजे.' हा आर्यशास्त्रांचा सिद्धांत आहे.

**पूर्व०**—पण जो कर्मस्वरूपासंबंधें अविद्वान् आहे, त्याला कर्म करण्याचा अधिकारच नसतो ना ?

**सिद्धान्ती**—असें नाहीं. उषस्तिकांडांत ( या अध्यायाचें दहावें खंड पहा ) अविद्वानांना सुद्धां ऋत्विजत्व प्राप्त झालें आहे, असें आढळून येतें. असो; रसतमत्व, आप्तिगुणत्व आणि समृद्धिगुणवत्त्व हे ओंकाराचे गुण आहेत; तथापि, सर्वत्र उपास्य दैवत एकरूपी असून उपासनाही एकच आहे. प्रत्येक ठिकाणीं 'उपासीत' असा विधि सांगितला नाहीं. आतां तीन गुण आहेत, म्हणून येथें दुसरा कोणताही विधि उत्पन्न झाला, तरी निराळें फल सांगितलें नाहीं, व म्हणून निराळें उपास्यही होत नाहीं. यद्यपि अनेक विशेषणें येथें आहेत आणि विविध प्रकारानें उपासना इष्ट आहे; तथापि उपास्य एकच आहे, असें फलश्रुती निरनिराळ्या सांगितल्या नाहींत, यावरून समजावें. असो; उद्गीथ नांवाचे ओंकाररूपी अक्षर एकच उपास्य आहे. तेंच प्रकृत आहे. म्हणून आतांपर्यंत झालेलें व्याख्यान ओंकाराचेंच आहे असें समजावें. प्रकरण एकच आहे. म्हणून ही सर्व ओंकाराची उपासना आहे आणि या उपासनेचें प्रकार निराळे आहेत; तरी एकच फल श्रेष्ठप्रतीचें आहे, हें समजावें, म्हणून ओंकाराचे गुणधर्म येथें सांगितले आहेत ॥ १० ॥

पहिल्या अध्यायाचा प्रथमखंड संपला ॥ १ ॥

---

# द्वितीय खंड.

## मंत्र पहिला.

**देवासुरा ह वै यत्र संयेतिर उभये प्राजापत्यास्तद्ध देवा उद्गीथमाजह्रुरनेनैनानभिभविष्याम इति ॥ १ ॥**

अन्वय व अर्थः—**देवासुराः यत्र ह वै संयेतिरे** ( ज्या निमित्तासाठीं देव आणि असुर यांच्यामध्यें संग्राम झाला ) **उभये प्राजापत्या** ( देव आणि दानव हे उभयतां ही प्रजापतीचे पुत्र होते ) **तत् ह अनेन एनान् अभिभविष्यामः इति देवाः उद्गीथं आजह्रुः** ( असुरांचा पराभव त्या निमित्तानें उद्गीथानें आपल्यास करतां येईल, असें समजून देवांनीं उद्गीथाचा आश्रय केला ) सारांश जयापजयासाठीं देवदानवांमध्यें युद्ध सुरु झालें. तेव्हां देवांनीं उद्गीथाचा आश्रय करून राक्षसांचा पराभव करण्याचा निश्चय केला ॥ १ ॥

देवासुरा देवाश्चासुराश्च । देवा दीव्यतेर्द्योतनार्थस्य शास्त्रोद्भासिता इन्द्रियवृत्तयः । असुरास्तद्विपरीताः स्वेष्वेवासुषु विष्वग्विषयासु प्राणनक्रियासु रमणात्स्वाभाविक्यस्तमआत्मिका इन्द्रियवृत्तय एव । ह वा इति पूर्ववृत्तोद्भासकौ निपातौ । यत्र यस्मिन्निमित्त इतरेतरविषयापहारलक्षणे संयेतिरे । संपूर्वस्य यततेः संग्रामार्थत्वमिति संग्रामं कृतवन्त इत्यर्थः । शास्त्रीयप्रकाशवृत्त्यभिभवनाय प्रवृत्ताः स्वाभाविक्यस्तमोरूपा इन्द्रियवृत्तयोऽसुराः । तथा तद्विपरीताः शास्त्रार्थविषयविवेकज्योतिरात्मानो देवाः स्वाभाविकतमोरूपासुराभिभवनाय प्रवृत्ता इत्यन्योन्याभिभवोद्भवरूपः संग्राम इव सर्वप्राणिषु प्रतिदेहं देवासुरसंग्रामोऽनादिकालप्रवृत्त इत्यभिप्रायः । स इह श्रुत्याऽऽख्यायिकारूपेण धर्माधर्मोत्पत्तिविवेकविज्ञानाय कथ्यते प्राणविशुद्धिविज्ञानविधिपरतया । अत

उभयेऽपि देवासुराः प्रजापतेरपत्यानीति प्राजापत्याः । प्रजापतिः कर्मज्ञानाधिकृतः पुरुषः । " पुरुष एवोक्थमयमेव महान्प्रजापतिः " इति श्रुत्यन्तरात् । तस्य हि शास्त्रीयाः स्वाभाविक्यश्च करणवृत्तयो विरुद्धा अपत्यानीव तदुद्भवत्वात् । तत्तत्रोत्कर्षापकर्षलक्षणनिमित्ते ह देवा उद्गीथमुद्गीथभक्त्युपलक्षितमौद्गात्रं कर्माऽऽजह्रुराहृतवन्तः । तस्यापि केवलस्याऽऽहरणासंभवाज्ज्योतिष्टोमाद्याहृतवन्त इत्यभिप्रायः । तत्किमर्थमाजह्रुरित्युच्यते । अनेन कर्मणैनानसुरानभिभविष्याम इत्येवमभिप्रायाः सन्तः ॥ १ ॥

**सिद्धान्ती**—देवासुर म्हणजे देव आणि असुर होत. देव हा शब्द 'दिवु=क्रीडा किंवा द्युति' इत्यादि अर्थात्मक धातूपासून सिद्ध झाला आहे. असो; येथें देव या शब्दाचा अर्थ शास्त्रानें प्रकाशित झालेल्या इंद्रियवृत्ती होत.

**शिष्य**—अर्थात् असुर हे देवांहून विलक्षण असतात; म्हणून अनेकप्रकारच्या विषयांमध्यें, आपल्या असूमध्यें म्हणजे प्राणनशक्तींमध्यें रममाण होणारे, असा अर्थ होतो.

**सिद्धान्ती**—म्हणजे स्वाभाविक अज्ञानानें लिप्त झालेल्या तमःपूर्ण इंद्रियवृत्ती हा असुर शब्दाचा अर्थ आहे. तात्पर्य शास्त्रानें चोखाळलेल्या इंद्रियवृत्ती हा देव शब्दाचा अर्थ आणि स्वाभाविक अज्ञानांत मग्न झालेल्या इंद्रियवृत्ती हा असुर शब्दाचा अर्थ येथें प्रकृत आहे. केवळ जीवनक्रियेला अनुकूल असणाऱ्या प्राणनकर्मांमध्यें स्वाभाविक अज्ञानानें रममाण असणाऱ्या इंद्रियवृत्ती हा असुर शब्दाचा अर्थ आहे.

**पूर्व०**—असाच अर्थ कां घ्यावयाचा ?

**सिद्धान्ती**—कारण 'हा अध्यात्म विषय आहे' असा उपसंहार श्रुतीनें केला आहे. तेव्हां 'देव व असुर' या शब्दाचे व्यक्तिशरीरपरच अर्थ केले पाहिजेत. उपक्रम आणि उपसंहार एकस्वरूपी असावे, हा शास्त्राचा नियम आहे. असो; मंत्रांतील 'ह' 'वै' हे दोन्ही निपात पूर्ववृत्ताचे ( इतिहासाचे ) स्मारक आहेत. देवदानवांमध्यें ( शास्त्रसंस्कृत इंद्रियवृत्ती व अज्ञानतंत्र जीवनानुकूल इंद्रियवृत्ती यांमध्यें ) पूर्वी संग्राम झाला.

**शिष्य**—हा संग्राम कशाबद्दल झाला ?

**सिद्धान्ती**—परस्परांचे विषयाचा ( मालमत्तेचा ) अपहार करावा, या हेतूनें हें युद्ध उभयतांमध्यें सुरू झालें.

**शिष्य**—'यत्' धातुला 'सं' हा उपसर्ग लागला म्हणजे संग्राम करणें असा अर्थ होतो; हें नीटच आहे.

**सिद्धान्ती**—विषयाचा अपहार करावयाचा, तो कसा हें सांगतों. स्वभावतः तमोगुणानें युक्त असणाऱ्या राक्षसी इंद्रियवृत्तींनीं असा संकल्प केला कीं, आपण शास्त्रानें संस्कृत झालेल्या इंद्रियवृत्तींचा व निष्कामप्रणीत पुरुषार्थांच्या तंत्रानें चालणाऱ्या विवेकप्रकाशाचा, पराभव करावा. तसेंच, शास्त्राचें जें मनोगत आहे, तत्प्रेरित विवेकानें प्रकृतिशुद्ध झालेल्या दैवी इंद्रियवृत्तींनीं स्वभावसिद्ध ( अज्ञानी ) राक्षसी इंद्रियवृत्तींचापराभव करण्याचा, म्हणजे परिच्छिन्नविषयांसंबंधानें मुग्ध अज्ञानीवृत्तींचा अभिमानअसतो, त्याला नाहींसें करण्याचा, संकल्प केला. परस्परांचा पराभव करावा, आणि जीवदेहावर आपलें स्वामित्व स्थापित करावें, हा सुरासुरांचा संकल्प होता. या विवेचनावरून तुमच्या हेंही लक्षांत येईल कीं, हा संग्राम प्रत्येक प्राण्याच्या देहरूपी रणांगणावर अनादिकालापासून चालत आला आहे. उद्धारक शास्त्र—ज्ञान आणि स्वभावसिद्ध अज्ञान, या उभयतांमध्यें यादवी नित्य सुरू आहे, हें तात्पर्य होय. श्रुतीनें येथें आख्यायिकेच्या म्हणजे गोष्टीच्या रूपानें या युद्धाचा अवतार केला आहे; तो अशासाठीं कीं धर्म आणि अधर्म यांची उत्पत्ति कशी होते, यांचें स्वरूप काय, इत्यादि विवेक सर्व जीवांस कळावा. अर्थात् या सांगण्यानें प्राणाची विशुद्धि हाच विषय आहे ज्याचा तें ज्ञान सर्वांस व्हावें, प्राणशुद्धि कशी होते, हें सर्वांस कळावें; आणि प्राणशोधकमार्गाचें अवलंबनाचा सर्वांस उपदेश करावा, एतदर्थ ही युद्धाची अप्रस्तुत आख्यायिका श्रुतीनें मुद्दाम अवतारिली आहे. तुम्हांस हें सांगावयास नकोच कीं, इंद्रियें विषयविन्मुख करणें हा जीवांचा धर्म आहे. तीं विषयोन्मुख झालीं, तर पापाची उत्पत्ति होते. म्हणून इंद्रियांची विषयप्रवणता ( विषयोपभोगासंबंधानें लोलुपता ) प्रयत्नपूर्वक नाहींशी करावी, हा उपदेश करण्याचा श्रुतिहेतु आहे. असो; श्रुत्यभिप्रायाप्रमाणें 'देव आणि असुर' या शब्दांचे आपण अध्यात्मपर अर्थ केले आहेत. उभयताही प्रजापतिपुत्र आहेत, असें श्रुतिस्मृतिपुराणें सांगतात. प्रजापति म्हणजे कर्म आणि ज्ञान यांस अधिकारी असणारा पुरुष होय.

**पूर्व०**—रूढ अर्थ कां नाहीं ? 'पुरुष' हा प्रजापति शब्दाचा कसा अर्थ व्हावा ?

**सिद्धान्ती**—'पुरुष हाच उक्थ आहे, हाच 'महान्' सर्वश्रेष्ठ प्रजापति आहे' अशी श्रुति प्रमाण आहे. या पुरुषाच्या शास्त्रशुद्ध आणि तमःस्वभावात्मक इंद्रियांमध्यें परस्परविरोध उत्पन्न होतो. हीं दोन्हीं प्रकारचीं परस्परविरोधी इंद्रियें पुरुषापासूनच उत्पन्न होतात; म्हणून त्यांना 'प्रजापतीचीं अपत्यें' असें म्हटलें. असो; आपला उत्कर्ष व्हावा; आणि शत्रूचा अपकर्ष व्हावा हा उभयतांचाही हेतु होता. 'तत्' म्हणजे 'तत्र' म्हणजे त्या निमित्तानें देवांनीं उद्गीथाचा आश्रय केला.

**शिष्य**—आश्रय केला म्हणजे ?

**सिद्धान्ती**—उद्गीथ भक्ति ( ओंकार हा उद्गीथाची एक भक्ति म्हणजे अवयव-प्रकार आहे ) हेंच आहे, उपलक्षण ज्याचें, त्या औद्गात्र कर्माचा आश्रय देव करिते झाले. देव उद्गाते झाले, देवांनीं आपल्याकडे उद्गात्याचें कर्म घेतलें. आतां केवल नुसत्या उद्गात्रकर्माचें गृहण करितां येणें शक्य नाहीं; तेव्हां या 'आहरणाचा' ( घेण्याचा, आश्रय करण्याचा ) अर्थ असा करावयाचा कीं, देवांनीं ज्योतिष्टोमादि यज्ञ करण्यास आरंभ केला. ज्योतिष्टोमांत औद्गात्र कर्म येतें. असो; हें यज्ञकर्म केलें असतां असुरांचा पराभव आपल्या करितां येईल, असा देवांचा समज होता. तात्पर्य, विषयोन्मुख असणाऱ्या इंद्रियवृत्तींचा पराभव करण्यासाठीं शास्त्रशुद्ध इंद्रियवृत्तींनीं ज्योतिष्टोमादि शास्त्रविहित कर्म करण्यास आरंभ केला ॥ १ ॥

यदा च तदुद्गीथं कर्माऽऽजिहीर्षवस्तदा—

**सिद्धान्ती**—जेव्हां देवांनीं तें उद्गीथ कर्म आश्रय करण्याचा संकल्प केला, तेव्हां—

---

## मंत्र दुसरा.

**ते ह नासिक्यं प्राणमुद्गीथमुपासांचक्रिरे तꣳ हासुराः पाप्मना विविधुस्तस्मात्तेनोभयं जिघ्रति सुरभि च दुर्गन्धि च पाप्मना ह्येष विद्धः ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः—ते नासिक्यं प्राणम् उद्गीथम् उपासांचक्रिरे ह** ( देवांनीं नासिकेमधून वाहणारा प्राण हाच उद्गीथ आहे, अशी भावना ठेऊन प्राणदृष्टीनें त्याची उपासना केली ) **असुराः तं ह पाप्मना विविधुः** ( असुरांनीं त्या नासिकगत प्राणाला पापानें वेधून टाकिलें ) **तस्मात् तेन सुरभि च दुर्गंधि च उभयं जिघ्रति** ( म्हणून सुगंध आणि दुर्गंध अशा दोन्ही गंधांचा वास (पाप या निमित्तानें) घ्राणेंद्रियाला येतो ) **हि पाप्मना एषः विद्धः** ( कारण, पापानें हा घ्राणप्राण विद्ध झाला आहे ) ॥ २ ॥

ते ह देवा नासिक्यं नासिकायां भवं चेतनावन्तं घ्राणं प्राणमुद्गीथकर्तारमुद्गातारमुद्गीथभक्त्योपासांचक्रिरे [ उपासनं ] कृतवन्त इत्यर्थः । नासिक्यप्राणदृष्ट्योद्गीथाख्यमक्षरमोंकारमुपासांचक्रिर इत्यर्थः । एवं हि प्रकृतार्थपरित्यागोऽप्रकृतार्थोपादानं च न

कृतं स्यात् । खल्वेतस्यैवाक्षरस्येत्योंकारो ह्युपास्यतया प्रकृतः । ननूद्गीथोपलक्षितं कर्माऽऽहृतवन्त इत्यवोच इदानीमेव कथं नासिक्यप्राणदृष्ट्योंकारमुपासांचक्रिर इत्यात्थ । नैष दोषः । उद्गीथकर्मण्येव हि तत्कर्तृप्राणदेवतादृष्ट्योद्गीथभक्त्यवयवश्चोंकार उपास्यत्वेन विवक्षितो न स्वतन्त्रोऽतस्तादर्थ्येन कर्माऽऽहृतवन्त इति युक्तमेवोक्तम् । तमेवं देवैर्वृतमुद्गातारं हासुराः स्वाभाविकतमआत्मनो ज्योतीरूपं नासिक्यं प्राणं देवं स्वोत्थेन पाप्मनाऽधर्मासङ्गरूपेण विविधुर्विद्धवन्तः संसर्गं कृतवन्त इत्यर्थः । स हि नासिक्यः प्राणः कल्याणगन्धग्रहणाभिमानासङ्गाभिभूतविवेकविज्ञानो बभूव । स तेन दोषेण पाप्मसंसर्गी बभूव । तदिदमुक्तमसुराः पाप्मना विविधुरिति । यस्मादासुरेण पाप्मना विद्धस्तस्मात्तेन पाप्मना प्रेरितो घ्राणः प्राणो दुर्गन्धिग्राहकः प्राणिनाम् । अतस्तेनोभयं जिघ्रति लोकः सुरभि च दुर्गन्धि च । पाप्मना ह्येष यस्माद्विद्धः । उभयग्रहणमविवक्षितम् । यस्योभयं हविरार्तिमार्छतीति यद्वत् । यदेवेदमप्रतिरूपं जिघ्रतीति समानप्रकरणश्रुतेः ॥ २ ॥

**सिद्धान्ती**—नासिकेमध्यें अथवा घ्राणेंद्रियामध्यें विद्यमान असणारा प्राण तो घ्राणप्राण होय. हा उद्गीथाचा कर्ता म्हणजे उद्गाता. 'आमच्यासाठीं तूं उद्गीथाचें गायन कर' अशी घ्राणप्राणाला उद्गातृत्व देणारी श्रुति प्रमाण आहे.

**पूर्व०**—घ्राणप्राण तर अचेतन आहे. हा उद्गाता कसा होणार?

**सिद्धान्ती**—ही शंका नसावी, म्हणूनच आचार्यांनीं घ्राणप्राणाला 'चेतनावंत' असें विशेषण दिलें आहे. घ्राणेंद्रियाशीं मनोबुद्धिद्वारा जीवात्म्याचा संबंध नित्य असतो. असो; देवांनीं 'उद्गीथभक्ति' शब्दानें लक्षित होणाऱ्या नासिकागत प्राणाच्या दृष्टीनें उद्गीथ नामक ओंकाराची उपासना करण्यास आरंभ केला.

**शिष्य**—ओंकार हाच घ्राणप्राण आहे अशी दृष्टि ठेऊन देवांनीं ओंकाराची उपासना केली. असा अर्थ समजावयाचा?

**सिद्धान्ती**—होय. असा अर्थ केला म्हणजे प्रकृत मंत्रांत जीं पदें आहेत, त्यांचा अर्थ सोडून दिला व अप्रकृत अर्थ घेतला असें होत नाहीं.

**शिष्य**—म्हणजे?

**सिद्धान्ती**—उद्गातृदृष्टीनें प्राणोपासना हा प्रकृत विषय आहे, उद्गीथभक्तिदृष्टि हा प्रकृत नाहीं. समजलें? केवळ उद्गीथशब्दाची उपलक्षणा केली म्हणजे

अर्थ न सोडतां इष्टापत्ति होते, अथवा इष्ट अर्थाची प्राप्ति होते. ' खरोखर पाहिलें असतां उद्गीथ अक्षरांचा इत्यादिमध्यें ' जो ओंकार आहे तो उपास्य-दृष्टीनें प्रकृत आहे, म्हणजे येथें ओंकाराचें प्रकरण चाललें आहे. ( अध्याय १ खं० १ मं० १० पहा. )

पूर्व०—आतांच तुम्ही म्हणालांत कीं, उद्गीथानें उपलक्षित झालेलें कर्म ( ज्योतिष्टोमादि यज्ञ ) देवांनीं स्वीकृत केलें, यज्ञास आरंभ केला; तें विसरून नासिक्यप्राणाच्या दृष्टीनें ओंकाराची उपासना देवांनीं केली, ओंकार हाच नासिक्य प्राण आहे, असें समजून ओंकाराची उपासना केली, असें पुनः म्हणतां ! हें काय प्रकरण आहे ?

सिद्धान्ती—हा कांहीं दोष नव्हे. पहा कीं, उद्गीथ कर्मामध्येंच ( ज्योतिष्टोमामध्यें ) उद्गीथ कर्माची कर्त्री जी प्राणदेवता तिचें स्वरूप मनांत आणून उद्गीथाचा प्रकार ( अवयव ) जो ओंकार, त्या उद्गीथ ओंकाराची उपासना येथें विवक्षित आहे. स्वतंत्र सर्वव्यापी ओंकाराची उपासना येथें सांगावयाची नाहीं. अर्थात् उद्गीथ ओंकाराच्या उपासनेसाठीं ज्योतिष्टोमादि कर्माचा स्वीकार देवांनीं केला. [ध्येयत्वानें नव्हे, हो !] हें म्हणणें योग्यच आहे. असो; याप्रमाणें देवांनीं स्वीकृत केलेला जो उद्गाता म्हणजे नासिक्य प्राण तो असुरांनीं विद्ध केला, दूषित केला.

शिष्य—असुर म्हणजे स्वभावतः तमोरूप. त्यांची वृत्ति तामसीच असावयाची. अर्थात् त्यांनीं प्रकाशरूप नासिक्य प्राणाला स्वार्जित पापकर्मांनीं अथवा अधर्माच्या आसक्तीनें दूषित केलें, हें बरोबरच झालें. असुरांनीं आसुरी कर्म करूं नये, तर काय करावें ?

तात्पर्य प्रकाशरूप असणारें घ्राण दुष्ट झालें. होयना ?

सि०—होय. त्या पापी लोकांच्या ( वृत्तींच्याच म्हणा ) संसर्गानें असें झालें, कीं नासिकागत प्राणाला एक विलक्षण अभिमान उत्पन्न झाला.

शि०—कसला अभिमान ?

सि०—मीं कल्याणगंधाचा ( सुगंधाचा ) ग्राहक आहे, असा त्याला अतिरिक्त अभिमान झाला. या अभिमानामुळें त्याचें विवेकविज्ञान ( तारतम्य ज्ञान ) प्रायः किंचित्कर झालें. या अभिमानदोषानें—

शि०—असुरांनीं उत्पन्न केलेला हा दोष ?

सि०—होय. घ्राणप्राण पापानें संसृष्ट झाला, पापलिप्त झाला. म्हणून आप्त त्यांस असें म्हणतां येतें कीं, व श्रुतीनेंही असें म्हटलें आहे कीं, ' असुरांनीं नासिक्य-प्राणाचा वेध केला. अथवा त्याचें पुण्यस्वरूप भग्न केलें. हा नासिक्य प्राण पापलिप्त झाला म्हणून त्याची पापवृत्ति ही प्रेरक झाली. त्याच्यावर [त्या घ्राणप्राणावर] पाप-

वृत्तीचें स्वामित्व स्थापित झालें. असें झालें, म्हणून जीवाचा घ्राणेंद्रियस्थित प्राण दुर्गंधीचाही ग्राहक झाला. परिणाम हा झाला कीं, लोकांना सुगंध आणि दुर्गंध यांचा प्रत्यय एकाच घ्राणेंद्रियानें येऊं लागला. घ्राणेंद्रियाचें मूळ स्वरूप सौगंध-ग्रहणाचें; पण राक्षसनीं तें स्वरूप भग्न केल्यामुळें अथवा अभिमानरूपी पापाचा स्पर्श झाल्यामुळें घ्राणेंद्रियाला सुगंधींचा व दुर्गंधीचा प्रत्यय येतो! कारण, हा पापविद्ध आहे.

पू०—पापानें, घ्राणेंद्रिय दुष्ट झालें आहे,' असें जर प्रत्यक्ष श्रुति म्हणत आहे, तर घ्राणाला दुर्गंधीचा मात्र प्रत्यय यावा, सुगंधीचा येऊं नये. ज्ञानजन्य प्रत्यय पुण्यजन्य हवा. असें असतां दोन्हीं प्रकारचा प्रत्यय झाला येतो, असें कसें ह्मणतां?

सिद्धान्ती—ऐका, कर्मकांडांत सांगितलें आहे कीं, द्रवात्मक (पातळ किंवा पुरोडाशादि हवीला काकादि अपवित्र प्राण्यांचा स्पर्श झाला असतां पंचशरा-रूपी ओदनाचा हवि द्यावा. म्हणजे दोन्हीप्रकारचीं पातकें नाहींशीं होतात. त्या-प्रमाणें आपल्या स्वरूपगत स्वभावाला अनुरूप अशा दुर्गंधीचा प्रत्यय घेणारा घ्राणप्राण होतो' अशी बृहदारण्यकांत श्रुति आहे, दुर्गंधिग्रहण मात्र तेथें प्रा-मुख्यानें जरी सांगावयाचें आहे, तरी 'केवळ पापानेंच नाहीं' असा त्या उपनिषदांत वाक्यशेष असल्यामुळें त्याला दोन्ही प्रकारच्या गंधाचा प्रत्यय येतो हें स्पष्ट आहे. श्रुतीनें केवळ पापजन्य दुर्गंधीचा मात्र उल्लेख केला आहे, दोन्ही गंधांचा केला नाहीं. शेवटीं 'पुण्यानें तो संसृष्ट झाला' असें येथें म्हटलें नाहीं, त्याचें कारण तो घ्राणप्राण पापविद्ध झाला, इतकेंच येथें वक्तव्य आहे ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**अथ ह वाचमुद्गीथमुपासांचक्रिरे ताꣳ हासुराः पाप्मना विविधुस्तस्मात्तयोभयं वदति सत्यं चानृतं च पाप्मना ह्येषा विद्धा ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थः—अथ वाचं उद्गीथं उपासांचक्रिरे ह; असुराः तां पाप्मना विविधुः; तस्मात् तया सत्यं च अनृतं च उभयं वदति हि पाप्मना एषा विद्धा** (नंतर वाणीरूपी उद्गात्याची दृष्टि ठऊन देवांनीं उद्गीथगत ओंकारोपासना केली, परंतु राक्षसांनीं वाणीच्या स्वरू-पाचा आपल्या पापवृत्तीनें भंग केला म्हणून मनुष्यांची वाणी सत्य आणि

असत्य असें दोन्हीं प्रकारचें भाषण करिते. कारण, तामसी पापानें ती
लिप्त झाली आहे ) ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा.

**अथ ह चक्षुरुद्गीथमुपासांचक्रिरे तद्धासुराः पाप्मना विविधुस्तस्मात्तेनोभयं पश्यति दर्शनीयं चादर्शनीयं च पाप्मना ह्येतद्विद्धम् ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थः—अथ चक्षुः उद्गीथं उपासांचक्रिरे; असुराः तत् पाप्मना विविधुः; तस्मात् तेन दर्शनीयं च अदर्शनीयं च उभयं पश्यति; हि एतत् पाप्मना विद्धं** ( अर्थ वरीलप्रमाणेंच आहे, वाणीच्या स्थानीं चक्षु आणि सत्यासत्याच्या ठिकाणीं ' दर्शनीय ' म्हणजे दिसण्यांत सुरूप आणि ' अदर्शनीय ' म्हणजे कुरूप ह्या पदांची योजना करावयाची आहे ) ॥ ४ ॥

---

## मंत्र पांचवा.

**अथ ह श्रोत्रमुद्गीथमुपासांचक्रिरे तद्धासुराः पाप्मना विविधुस्तस्मात्तेनोभयꣳ शृणोति श्रवणीयं चाश्रवणीयं च पाप्मना ह्येतद्विद्धम् ॥ ५ ॥**

**अन्वय व अर्थः—अथ ह श्रोत्रं उद्गीथं उपासांचक्रिरे; असुराः तत् पाप्मना विविधुः; तस्मात् तेन श्रवणीयं च अश्रवणीयं च उभयं शृणोति; हि पाप्मना एतत् विद्धं** ( अर्थ वरीलप्रमाणेंच. हें कर्णेंद्रियाचें वर्तमान आहे; तेव्हां कर्ण व श्रवणीय व अश्रवणीयपदांची योजना करावयाची ) ॥ ५ ॥

## मंत्र सहावा.

**अथ ह मन उद्गीथमुपासांचक्रिरे तद्धासुराः पाप्मना विविधुस्तस्मात्तेनोभयꣳ संकल्पयते संकल्पनीयं चासंकल्पनीयं च पाप्मना ह्येतद्विद्धम् ॥६॥**

अन्वय व अर्थः—अथ ह मनः उद्गीथं उपासांचक्रिरे; तत् पाप्मना विविधुः; तस्मात् तेन संकल्पनीयं च असंकल्पनीयं च संकल्पयते; हि पाप्मना एतत् विद्धं (हे मनाचें वर्तमान आहे. अर्थ वरीलप्रमाणेंच) ॥ ६ ॥

मुख्यप्राणस्योपास्यत्वाय तद्विशुद्धत्वानुभवार्थोऽयं विचारः श्रुत्या प्रवर्तितः । अतश्चक्षुरादिदेवताः क्रमेण विचार्याऽऽसुरेण पाप्मना विद्धा इत्यपोह्यन्ते । समानमन्यत्, अथ ह वाचं चक्षुः श्रोत्रं मन इत्यादि । अनुक्ता अप्यन्यास्त्वग्रसनादिदेवता द्रष्टव्याः । "एवमु खल्वेता देवताः पाप्मभिः" इति श्रुत्यन्तरात् ॥ ३ ॥ ४ ॥ ५ ॥ ६ ॥

सिद्धान्ती—श्रुतीनें हा येथपर्यंत जो विचार केला आहे, तो कांहीं एक विशेष अभिप्राय मनांत धरूनच केला आहे. तिला मुख्यतः मुख्यप्राणाची उपासना विहित करावयाची आहे. तो मुख्य प्राण स्वरूपतः विशुद्ध आहे. हा अनुभव जीवाला यावा म्हणून श्रुतीनें ही इतर प्राण आणि इंद्रियें यांच्या स्वरूपाची मीमांसा केली. यासाठींच तिनें चक्षुप्रमुख देवतांचा म्हणजे इंद्रियांचा विचार येथपर्यंत क्रमशः केला आणि हीं सर्व इंद्रियें राक्षसीपापानें स्वरूपदुष्ट झालीं आहेत, असें सांगून तीं उपास्य नाहींत, असें ठरविलें. तीनपासून सहापर्यंत मंत्र आहेत, त्यांचें स्पष्टीकरण दुसऱ्या मंत्राच्या स्पष्टीकरणाप्रमाणेंच आहे' असें समजावें. स्पर्शेंद्रिय, रसनेंद्रिय, इत्यादिकांचा उल्लेख केला नाहीं, तथापि हीं हीं इंद्रियें पापमग्न झालेलीं आहेत असें समजावें.' याचप्रमाणें 'या सर्व देवताही त्वचा, रसना, इत्यादि (इंद्रियें) पापानें लिप्त झालेलीं आहेत,' ही श्रुति प्रमाण आहे (बृह० १।३।६) ॥ ३ ॥ ४ ॥ ५ ॥ ६ ॥

---

## मंत्र सातवा.

**अथ ह य एवायं मुख्यः प्राणस्तमुद्गीथमुपासांचक्रिरे तꣳ हासुरा ऋत्वा विदध्वंसुर्यथाऽश्मानमाखणमृत्वा विध्वꣳसेत ॥ ७ ॥**

**अन्वय व अर्थः**—अथ ह यः एव अयं मुख्यः प्राणः तं उद्गीथं उपासांचक्रिरे ( नंतर, जो हा मुख्य प्राण आहे त्याची दृष्टि ठेऊन उद्गीथाची देवांनीं उपासना केली ) असुराः तं ऋत्वा विदध्वंसुः ह ( राक्षस त्या मुख्य प्राण्याच्या जवळ गेले, परंतु तेथें जातांच त्यांचा विनाश झाला ) यथा आखणं अश्मानं ऋत्वा विध्वंसेत ( एखादा न खणण्यास येण्यासारखा अतिकठिण खडक फोडण्याचा प्रयत्न केला असतां फोडणारें हत्यार नष्ट होतें, त्याप्रमाणें या राक्षसांचा नाश झाला ) ॥ ७ ॥

आसुरेण पाप्मना विद्धत्वाद्घ्राणादिदेवता अपोह्याथानन्तरं य एवायं प्रसिद्धो मुखे भवो मुख्यः प्राणस्तमुद्गीथमुपासांचक्रिरे तं हासुरा पूर्ववदृत्वा प्राप्य विदध्वंसुर्विनष्टा अभिप्रायमात्रेण। अकृत्वा किंचिदपि प्राणस्य कथं विनष्टा इत्यत्र दृष्टान्तमाह—यथा लोकेऽश्मानमाखणं न शक्यते खनितुं कुद्दालादिभिरपि भेत्तुं न शक्योऽऽखग एवाऽऽखणस्तमृत्वा सामर्थ्याल्लोष्टः पांसुपिण्डः ऋत्यन्तराचाश्मनि क्षिप्तोऽश्मभेदनाभिप्रायेण तस्याश्मनः किंचिदप्यकृत्वा स्वयं विध्वंसेत विदीर्येतैवं विदध्वंसुरित्यर्थः ॥ ७ ॥

**सिद्धान्ती**— घ्राणादि सर्व देवता म्हणजे इंद्रियें आसुरी पापानें लिप्त झाल्यामुळें मुख्य उपासनेला अयोग्य झालीं, हें आतांपर्यंत सांगितलें. नंतर हा म्हणजे सर्व प्रसिद्ध असणारा जो मुखगत प्राण त्याची दृष्टि ठेऊन देवांनीं उद्गीथाची उपासना केली. ओंकार ह्या प्रतीकावर मुख्यप्राणाची स्थापना करून मुख्य प्राणदृष्टीनें ओंकारोपासना देवांनीं केली. तें पाहून असुरांनीं या मुख्य प्राणाला पापमग्न करण्याचा प्रयत्न करण्याचा निश्चय केला. ते तेथपर्यंत गेले, तों तेथें त्यांचा नाश झाल्यासारखेंच झालें. त्यांच्या प्रयत्नानें प्राणाचें तर स्वरूप बिघडलें नाहींच, पण असुरांचा मात्र नाश झाला !

**सिद्धान्ती**—तो कसा ? प्राणाला पापविद्ध करणाऱ्या असुरांचाच नाश कसा झाला ?

**शिष्य**— आपण व्यवहारांत नित्य पाहतों कीं, सुरुंग किंवा कोणतें तरी हत्यार घेऊन सुद्धां जो खडक खणतां येत नाहीं, तो वज्रप्राय खडक खणण्यासाठीं कुद्ळीसारखें गरीब हत्यार त्यावर टाकलें तर त्या खडकाला तर कोणतीही इजा होत नाहीं, पण घेतलेलें हत्यार मात्र फुटून किंवा तुटून जातें !" अत्यंत कठिण खडकावर लोष्ठ ( पांसुपिंड-मातीचा गोळा ) टाकला असतां तो स्वतःच

फुटून जातो' हीं श्रुति प्रमाण आहे. तात्पर्य मुख्य प्राणाविरुद्ध पापाचें राक्षसांचें कांहीं चालत नाहीं. त्यांचे सर्व प्रयत्न व्यर्थ झाले म्हणजे त्यांचा प्रकरणीं पुरा पराभव झाला, म्हणजे नाश झाला. म्हणून मुख्यप्राण सदैव राहतो ॥ ७ ॥

---

## मंत्र आठवा.

**एवं यथाऽश्मानमाखणमृत्वा विध्वंसत एवं हैव ते स विध्वंसते य एवंविदि पापं कामयते यश्चैनमभिदासति स एषोऽश्माखणः ॥ ८ ॥**

**अन्वय व अर्थः—एवं यथा आखणं अश्मानं ऋत्वा विध्वं** ( याप्रमाणें न खणतां येण्यासारख्या किंवा न फोडतां येण्यासारख खडकावर कुदळीसारखें हत्यार फुटून जातें ) **एवं ह यः एवंवि पापं कामयते, च यः एवं अभिदासति, सः विध्वंसते एव** ( याचप्रमाणें जो प्राणज्ञाता आहे, त्याच्या विरुद्ध पापी आचरण करण्या किंवा त्याचा नाश करण्याची जो इच्छा करितो, शत्रुत्वानें जो वाग तो पापात्मा पुरुष स्वतःचा घात करून घेतो ) **सः एषः अश्माख** ( कारण प्राणज्ञ पुरुष कठिण खडकासारखा अभंग असतो ) तात्प प्राणज्ञपुरुषाचा कोणालाही घात करितां येत नाहीं ॥ ८ ॥

एवं विशुद्धोऽसुरैरधर्षितत्वात्प्राण इति । एवंविदः प्राणात्मभूतस्येदं फलमाह—यथाऽश्मानमिति । एष एव दृष्टान्तः । एवं हैव स विध्वंसते विनश्यति । कोऽसावित्याह—य एवंविदि यथोक्तप्राणविदि पापं तदनर्हं कर्तुं कामयत इच्छति यश्चाप्येनमभिदासति हिनस्ति प्राणविदं प्रत्याक्रोशताडनादि प्रयुङ्क्ते सोऽप्येवमेव विध्वंसत इत्यर्थः । यस्मात्स एष प्राणवित्प्राणभूतत्वादश्माखण इवाश्माखणोऽधर्षणीय इत्यर्थः । ननु नासिक्योऽपि प्राणो वाय्वात्मा यथा मुख्यस्तत्र नासिक्यः प्राणः पाप्मना विद्धः प्राण एव सन्न मुख्यः कथम् । नैष दोषः । नासिक्यस्तु स्थानकरणवैगुण्याद्विद्धो वाय्वात्माऽपि सन् मुख्यः स्थानदेवताबलीयस्त्वान्न विद्ध इति

युक्तम् । यथा वास्यादयः शिक्षावत्पुरुषाश्रयाः कार्यविशेषं कुर्वन्ति नान्यहस्तगतास्तद्वद्दोषवद्‌प्राणसचिवत्वाद्विद्धा प्राणदेवता न मुख्यः॥८॥

**सिद्धान्ती**—वर सांगितल्याप्रमाणें असुरांस अथवा पापी इंद्रियवृत्तींस मुख्य-प्राणाला भ्रष्ट करितां येत नाहीं. म्हणून तो विशुद्ध असतो आणि उपासनेला योग्य होतो. जो मुमुक्षु मुख्यप्राणाची उपासना करितो, त्या प्राणात्मभूत पुरुषाला कोणती फलप्राप्ति होते, तें श्रुति दृष्टांतरूपानें सांगत आहे. त्या पुरुषाचा नाशच होतो—

**शिष्य**—कोणत्या पुरुषाचा भगवन् ? प्राणज्ञ उपासकाचा तर नाश होणें शक्यच नाहीं.

**सिद्धान्ती**—अरे ! प्राणज्ञ उपासकाचा घात करण्यासाठीं पापाचरण कर-ण्याची ( त्याचा नाश करण्याची ) जो पुरुष इच्छा करितो आणि शत्रुत्वबुद्धीनें त्याचा नाश करण्याचा प्रयत्न करितो—

**शिष्य**—नाश करणें म्हणजे ?

**सिद्धान्ती**—त्याच्या विरुद्ध ओरडणें, त्याला ताडण करणें, इत्यादि प्रकारांनीं जो पापी त्याला त्रास देतो, त्याचा नाश करूं इच्छितो, तो आपल्या स्वतःचाच नाश करून घेतो.

**शिष्य**— बरोबर आहे. प्राणवेत्ता उपासक प्राणात्मा झाल्यामुळें मागच्या मंत्रांतील अश्माखणाप्रमाणें हा प्राणात्मा पुरुष अधर्षणीय असतो, अजिंक्य असतो. पृथ्वीच्या उदरांत घट्टरीतीनें बसलेल्या खडकाचें मातीच्या गोळ्यानें बरें वाईट कांहीं होत नाहीं. मातीचा गोळा किंवा कुदळीसारखें हत्यार फुटून तुटून नाहींशीं मात्र होतात त्याप्रमाणेंच हा प्रकार समजावयाचा.

**पूर्व०** -अहो ! नासिका–रंध्रांतून वाहणारा प्राणही मुख्य प्राणाप्रमाणेंच वायु आत्मक आहे. असें असतां नासिकागत प्राण मात्र पापानें विद्ध होतो, असें म्हणतां; आणि त्याच जातीचा असणारा मुख्य ( मुखांतून जाणारा येणारा ) प्राण विद्ध होत नाहीं, असें सांगतां हें कसें ?

**सिद्धान्ती**—हा कांहीं दोष नव्हे. नासिकागत प्राण यद्यपि वायु-आत्मक आहे; तथापि तो स्थानकरण झाला आहे, ( नासिका हें जें स्थान त्या स्थानाशीं याचा संबंध आहे, म्हणून नासिका–वायूला विशेष विषयाच्या आसक्तीचें वैगुण्य प्राप्त झालें आहे ) आणि या परिच्छिन्न स्थानाच्या वैगुण्यामुळें तो विद्ध झाला. पण मुख्य प्राण स्थानदेवतेच्या बलानें विद्ध झाला नाहीं. समजलां ? हें योग्यच झालें. पुनः; मुख्य प्राणवायूला विशेष स्थान नाहीं, म्हणून विशेष विषयाचाही संबंध त्याला प्राप्त होत नाहीं.

शिष्य—निग्रहानुग्रह करणें किंवा तासणें, तोडणें ज्याला अवगत आहे त्याचीं उपकरणें त्याच्याच हातांत असतील, तर मात्र तीं आपआपलीं विशे कार्यें करण्यास समर्थ होतात. पण तींच उपकरणें दुसऱ्याच्या हातांत असतील त तें कार्य होत नाहीं.

सिद्धान्ती—विषयासक्तिदोषानें पूर्ण असलेलें जें नासिक त्याचें सचिवत्व पत्करिलें म्हणून घ्राणदेवता विद्ध झाली. दोषसंपर्क नसल्यामुळें मुख्य प्राणाल पापानें जर्जर केलें नाहीं. असो; हा विषयासक्तीच्या अभिमानाचा अभाव आणि विशुद्ध देवतेच्या बलाचा प्रभाव होय ॥ ८ ॥

---

## मंत्र नववा.

**नैवैतेन सुरभि न दुर्गन्धि विजानात्यपहतपाप्मा ह्येष तेन यदश्नाति यत्पिबति तेनेतरान्प्राणानवति । एतमु एवान्ततोऽवित्त्वोत्क्रामति व्याददात्येवान्तत इति ॥ ९ ॥**

**अन्वय व अर्थः—न एव एतेन सुरभि, न दुर्गंधि, विजानाति** ( ह्या मुख्याच्या योगानें लोकांस सुगंध किंवा दुर्गंध जाणतां येत नाहीं, पण नाकानें जाणतां येतो ) **हि एषः अपहतपाप्मा** ( कारण हा विनष्टपाप आहे ) **तेन यत् अश्नाति, यत् पिबति, तेन इतरान् प्राणान् अवति** ( म्हणून मुखद्वारा जें खातो व पितो, त्या खाण्यापिण्यानें हा मुख्य प्राण इतर प्राणांचें संरक्षण करितो ) **एतं उ एव अंततः अवित्वा उत्क्रामति, व्याददाति एव अंततः** ( ह्याचाच शेवटीं विरह प्राप्त झाल्यामुळें इतर प्राण उत्क्रांत होतात. म्हणून शेवटीं—मरणप्रसंगीं मुमुर्षु मुख—विदारण करितो, आपलें तोंड उघडें ठेवितो. ) सारांश, मुख्य प्राण शुद्ध असून स्वेतरांचा प्राणसंरक्षक आहे. हा प्राण अन्नपान करीनासा झाला म्हणजे इतर प्राण नाहींसे होतात. मुख्य प्राणावर सर्वांचें जीवन अवलंबून आहे ॥ ९ ॥

**यस्मान्न विद्धोऽसुरैर्मुख्यस्तस्मान्नैवैतेन सुरभि दुर्गन्धि वा विजानाति, घ्राणेनैव तदुभयं विजानाति लोकः। अतश्च पाप्मका-**

योदर्शनादपहतपाप्माऽपहतो विनाशितोऽपनीतः पाप्मा यस्मात्सोऽयमपहतपाप्मा ह्येष विशुद्ध इत्यर्थः । यस्माच्चाऽऽत्मंभरयः कल्याणाद्यासङ्गवत्त्वाद्घ्राणादयो न तथाऽऽत्मंभरिर्मुख्यः किं तर्हि सर्वार्थः । कथमिति, उच्यते—तेन मुख्येन यदश्नाति यत्पिबति लोकस्तेनाशितेन पीतेन चेतरान्घ्राणादीनवति पालयति । तेन हि तेषां स्थितिर्भवतीत्यर्थः । अतः सर्वंभरः प्राणोऽतो विशुद्धः । कथं पुनर्मुख्याशितपीताभ्यां स्थितिरेषां गम्यत इति, उच्यते—एतं ( तमु एव ) मुख्यं प्राणं मुख्यप्राणस्य वृत्तिमन्नपाने इत्यर्थः । अन्ततोऽन्ते मरणकालेऽवित्त्वाऽलब्ध्वोत्क्रामति । घ्राणादिप्राणसमुदाय इत्यर्थः । अप्राणो हि न शक्नोत्याशितुं पातुं वा । तेन तदोत्क्रान्तिः प्रसिद्धा घ्राणादिकलापस्य । दृश्यते ह्युत्क्रान्तौ प्राणस्याशिशिषा । अतो व्याददात्येवाऽऽस्यविदारणं करोतीत्यर्थः । तद्ध्यन्नालाभ उत्क्रान्तस्य लिङ्गम् ॥ ९ ॥

**सिद्धान्ती**—मुख्य प्राणाचा वेध असुरांस करितां येत नाहीं, म्हणून तो लोकांस सुगंध–दुर्गंधांचा अनुभव देत नाहीं व लोकांसही घ्यावा लागत नाहीं. घ्राणेंद्रियानें मात्र उभयप्रकारचा गंध लोकांस घ्यावा लागतो. तेव्हां हें उघडच झालें कीं, मुख्य प्राणाला पापाचा किंवा पाप्यांचा संस्पर्श होत नाहीं. अर्थात् हा अपहतपाप्मा म्हणजे पापविनष्ट असतो. म्हणजे तो स्वतः विशुद्ध असतो. पापलेपाचें कार्य यावर होत नाहीं; म्हणून हा विनष्टपाप असतो, शुद्ध असतो. शिवाय, घ्राणादि सर्व प्राणांस कल्याणादिकारित्वाचा व कल्याणादिकाचा अभिमान असतो; म्हणून ते सर्व आत्मंभरि ( स्वार्थी, स्वतःचे मात्र कल्याण करणारे ) असतात. पण मुख्य प्राण आत्मंभरि नाहीं, 'अपस्वार्थी' नाहीं. तो सर्वांसाठीं काम करणारा असतो. म्हणूनही तो विशुद्ध आहे. स्वेतरसेवा करणारे ज्ञानी लोक प्रायः शुद्धसत्त्व असतात.

**शिष्य**—हा मुख्य प्राण इतरांसाठीं काय करितो ?

**सिद्धान्ती**—ऐक: 'मुख्य प्राणाच्या साह्यानें जें आपण खातों, पितों, त्या खाण्यापिण्यानें हा प्राण इतर घ्राणादिकांचें संरक्षण करून त्यांस तृप्तही करितो. तात्पर्य, तो त्यांस अन्नपान पुरवितो, म्हणून ते जिवंत राहतात. असा हा सर्व देहसंघाताला जिवंत ठेवणारा मुख्य प्राण सर्वंभर आहे, सर्वांचें कल्याण करणारा आहे. अर्थात् परोपकार करणारा तो प्राण विशुद्ध आहे, यांत नवल तें काय ?

**पूर्व०**—मुख्य प्राणानें खानपान केलें, म्हणजे मात्र इतरांची स्थिति कायम राहते, असें म्हणण्याला प्रमाण काय ?

**सिद्धान्ती**—ऐका: ह्या प्राणाशीं इतरांचा संबंध सुटला किंवा अन्नपान ही जी मुख्य-प्राणाची वृत्ति आहे, ती सुटली, तात्पर्य अन्नपान मिळेनासें झालें, म्हणजे मरणकाल प्राप्त होतो; आणि घ्राणादि प्राणसमुदायाला शरीर सोडून जावें लागतें. मुख्य प्राणाशीं संबंध सुटला, म्हणजे कोणत्याही इतर प्राणांला खातां पितां येत नाहीं आणि म्हणून त्या घ्राणादि समुदायाला उत्क्रांत व्हावें लागतें. हा तर तुमचा आमचा रोजचा अनुभव आहे. मुख्यप्राणानें उत्क्रांत होण्याची इच्छा धारण केली, कीं घ्राणादिकलाप (घ्राणादिसमुदाय) अन्नपानशून्य होतात.

**पूर्व०**—मरणकालीं घ्राणप्राणादिकांस भूक तहान नसते, म्हणून ते उत्क्रांत होतात, खाण्या-पिण्यास नसतें, म्हणून ते उत्क्रांत होतात, असें नाहीं.

**सिद्धान्ती**—असें अनुभवाविरुद्ध काय बोलतां? मुख्य प्राण उत्क्रांत होत असण्याच्या वेळीं इतर प्राणांस तहान व भूक असते, हें स्पष्ट दिसतें.

**शिष्य**—तें कसें भगवन्?

**सिद्धान्ती**—अरे! मरणाचा क्षण प्राप्त झाला असतां प्रायः सर्व जीवांचें मुख पसरलेलें असतें; हें तूं पाहिलें नाहींस काय? अन्न हवें असलें, म्हणजेच आपण बहुधा तोंड उघडतों. तेथील अन्नाशनास समर्थ असणारा प्राण नाहींसा झाला म्हणजे इतरांस क्षुधा असते, तरी त्या घ्राणप्राणादिकांस अन्न मिळत नाहींसें होतें. इतरांस क्षुधा असते, तरी त्या घ्राणप्राणादिकांस अन्न मिळत नाहीं. अन्नपानाची प्राप्ति न होणें हें मुख्यप्राणाच्या उत्क्रांतीचें स्पष्ट चिन्ह आहे. मुख्यप्राण उत्क्रांत झाला कीं, सर्व देहकलाप विनष्ट होतो. यावरूनच मुख्यप्राणावर सर्वांचें अस्तित्व अवलंबून असतें, हें स्पष्ट आहे ॥ ९ ॥

---

## मंत्र दहावा.

**तꣳ हाङ्गिरा उद्गीथमुपासांचक्र एतमु एवाऽऽङ्गिरसं मन्यन्तेऽङ्गानां यद्रसः ॥ १० ॥**

**अन्वय व अर्थः**—**तं उद्गीथं अंगिराः उपासांचक्रे ह** (त्या मुख्यप्राणावर अंगिरा नामक ऋषीनें उद्गातृदृष्टि ठेऊन उद्गीथाची अथवा त्याचा अवयव झालेल्या ओंकाराची उपासना केली) **एतं उ एव आङ्गिरसं मन्यन्ते** (म्हणून या प्राणाला 'आंगिरस' नांवानें संबोधितात) **यत् अंगानां रसः** (कारण तो अंगांचा प्राण असून तो रस आहे. याला 'आंगिरस' म्हणतात, त्याचें कारणही हेंच आहे)॥ १० ॥

तं हाङ्गिरास्तं मुख्यं प्राणं हाङ्गिरा इत्येवं गुणमुद्गीथमुपासांचक्र उपासनं कृतवान्बको दाल्भ्य इति वक्ष्यमाणेन संबध्यते । तथा बृहस्पतिरित्यायास्य इति चोपासांचक्रे बक इत्येव संबन्धं कृतवन्तः केचित् । एतमु एवाऽऽङ्गिरसं बृहस्पतिमायास्यं प्राणं मन्यन्त इति वचनात् । भवत्येवं यथाश्रुतासंभवे, संभवति तु यथाश्रुतमृषिचोदनायामपि श्रुत्यन्तरवत् । तस्माच्छतार्चिन इत्याचक्षत एतमेव सन्तमृषिमपि । तथा माध्यमा गृत्समदो विश्वामित्रो वामदेवोऽत्रिरित्यादिऋषीनेव प्राणमापादयति श्रुतिः । तथैतानप्यृषीन्प्राणोपासकानङ्गिरोबृहस्पत्यायास्यान्प्राणं करोत्यभेदविज्ञानाय । ' प्राणो ह पिता प्राणो माता " इत्यादिवच्च । तस्मादृषिरङ्गिरा नाम प्राण एव सन्नात्मानमङ्गिरसं प्राणमुद्गीथमुपासांचक्र इत्येतत् । यद्यस्मात्सोऽङ्गानां प्राणः सन्नसस्तेनासावाङ्गिरसः ॥ १० ॥

**सिद्धान्ती**—विशुद्धि नामक गुण असणाऱ्या मुख्य प्राणात्म्याच्या दृष्टीनें उद्गीथावयव जें ओंकार अक्षर त्याची उपासना विहित केली. आतां, या पुढील मंत्रांत अंगिरादि गुण त्यांत आहेत, असें समजून प्राणोपासना सांगणार. तो मुख्यप्राण अथवा त्या मुख्यप्राणाचे पूर्वोक्त गुण ज्या उद्गीथामध्यें संपादित झाले आहेत, तो ओंकाररूपी उद्गीथ होय. त्याची ऋषीनें उपासना ( आंगिरसगुणयुक्त प्राण आहे, या दृष्टीनें ) केली. कोणी ? दाल्भ्यबकानें. ह्या वाक्याचा तेराव्या मंत्रांत उल्लेखिलेल्या दाल्भ्यबकाशीं संबंध आहे; तसाच 'अकराव्या व बाराव्या मंत्रांतील बृहस्पति आणि आयास्य यांच्याशीही या तेराव्या मंत्रवाक्याचा संबंध आहे, असें कोणी म्हणतात. केवळ दहाव्या मंत्रांतील अंगिराशीं मात्र संबंध आहे, असें नव्हे.

**शिष्य**—हें मला कांहीं समजलें नाहीं ?

**सिद्धान्ती**—श्रुतीनें इतरत्र असें सांगितलें आहे कीं, "ब्रह्मवेत्ते ऋषी प्राणाला 'आंगिरस,' 'बृहस्पति' आणि 'आयास्य' या नांवानें ओळखतात." म्हणजे आंगिरस, बृहस्पति व आयास्य अशा दृष्टी ठेऊन दाल्भ्यबकानें प्राणाची एकनिष्ठ उपासना केली; म्हणून या सर्वांचे गुण प्राणरूप होऊन यांचींच नांवें व गुण प्राणाला मिळालीं. हा श्रुत्यर्थ आहे. तात्पर्य दाल्भ्यबकानें उपासना केली, ती हा मुख्य प्राण आंगिरसादि गुणवान् आहे, असें समजून केली.

**पूर्व०**—मंत्रांतील पदांचा संबंध ठीक जुळत असतां व अंगिरा हा कर्ता असतां हा भलताच संबंध तुम्हीं काय म्हणून जुळवून देत आहांत ?

सिद्धान्ती- श्रुतीची जशीं पदें आहेत, तसा त्या पदांच्या अर्थानें हा संबंध यद्यपि सहज संभवत नाहीं; तथापि युक्तीच्या वाटेनें हा संबंध जुळतो. श्रुतीनें यद्यपि अंगिरा, बृहस्पति, इत्यादि शब्दांनीं मात्र येथें प्राणोपदेश केला नाहीं, तथापि ऐतरेयक श्रुतीनें तो केला आहे; व तो स्पष्ट आहे. शिवाय गुणत्रयविशिष्ट जी प्राणोपासना—

शिष्य--गुणत्रय म्हणजे रसतमत्व, आप्तिमत्व आणि समृद्धिगुणवत्त्व असे जे मागें ओंकाराचे तीन गुण सांगितलेत, तें हें गुणत्रय होय ?

सिद्धान्ती--बरोबर आहे. ह्या ऋषिनामक तीन गुणांनीं विशिष्ट असणाऱ्या प्राणाची उपासना करण्याला कोणताही बाध उत्पन्न होत नाहीं. प्राणोपासना केली म्हणजे उपासकाचें नांव प्राणास मिळतें, हें श्रुतीनेंच सांगितलें आहे. तेव्हां अंगिरादि जीं श्रुत्युक्त प्रधान नांवें त्यांचा बाध न होतां ज्यांनीं ज्यांनीं प्राणोपासना केली, त्यांचें त्यांचें प्राणाला नांव प्राप्त होतें, हें म्हणणें अयुक्त नव्हे किंवा प्राणोपासक ऋषींनीं जो उपदेश केला तो टाकणेंही योग्य नव्हे. तेव्हां दाल्भ्य-बकानें ही उपासना केली असें म्हणणें योग्यच आहे. हा युक्तीचा पक्ष झाला. आतां ऐतरेयकामध्यें प्रत्यक्ष श्रुतिच आम्हीं म्हणतों असें सांगती झाली आहे. हें तूं विसरला नसशीलच. तात्पर्य, दाल्भ्यबकानें अंगिरादि गुणयुक्त प्राणोपासना केली, हें म्हणणें श्रुतीला व युक्तीला धरूनच आहे. याच न्यायानें ऋषि-शरीरांत राहणाऱ्या प्राणालाही 'शतर्ची' असें म्हणतात. त्याचप्रमाणें * माध्यम म्हणजे गृत्समद, विश्वामित्र, वामदेव, अत्रि, भरद्वाज इत्यादि ऋग्वेद मंडलांचे द्रष्ट्या ऋषींस श्रुतीनें प्राण हें नांव दिलें आहे.

शिष्य -शतर्ची म्हणजे प्रथम मंडलांतील सूक्तें पाहणारे द्रष्टे ऋषि; आणि गृत्समद, विश्वामित्र इत्यादि द्वितीय तृतीयादि मंडलांचें ऋषि; होत.

सिद्धान्ती—ठीक आहे. जशीं त्या प्राणोपासक ऋषींनीं आपापलीं नांवें प्राणास दिलीं, त्याचप्रमाणें येथें उल्लेखिलेल्या अंगिरस, बृहस्पति आणि आयास्य यांचीं हीं गुणदर्शक नांवें श्रुतीनें प्राणास दिलीं आहेत. तात्पर्य, हेही अंगिरादि ऋषी प्राणरूप झाले. श्रुतीनें हें सांगितलें, तें केवळ सर्वत्र अभेद आहे. हें स्पष्ट करण्यासाठीं होय. 'प्राण हा पिता, प्राण ही माता' इत्यादि श्रुती प्रमाणच आहेत. असो; वाक्यांतील अव्यवहित संबंध निराबाध राहूनही या सर्व विवेचनाचा निष्कर्ष हा निघतो कीं, अंगिरा ऋषि स्वतः प्राण असूनही आपल्या स्वतः-चीच म्हणजे 'अंगिरस' नामक प्राणाची ओंकारप्रतीकानें उपासना करिता झाला.

शिष्य—अंगिरस हें नांव सार्थ आहे काय ?

---

* पहिलें व शेवटलें मंडल सोडून देऊन बाकींच्या ऋग्वेद मंडलांचे द्रष्ट्या ऋषींस माध्यम म्हणतात. 'माध्यमास्तृप्यन्तु' असें आपण तर्पणवेळीं म्हणतोंच !

सिद्धान्ती—हेंचसें काय ? शतर्ची, गृत्समद इत्यादि सर्व नांवें साभिप्राय आहेत. सर्व देहादि संघाताच्या अवयवांचा प्राण असून पुनः त्यांचा रस म्हणजे आत्मा असणारा तो अंगिरस होय. इतर ऋषींचीं हीं नांवें अशींच सार्थी आहेत आणि सर्वांचा सामान्यतः प्राणविषयक अर्थ आहे ॥ १० ॥

---

## मंत्र ११ व १२ बारावा.

**तेन तꣳ ह बृहस्पतिरुद्गीथमुपासांचक्र एतमु एव बृहस्पतिं मन्यन्ते वाग्घि बृहती तस्या एष पतिः ॥ ११ ॥**

**तेन तꣳ हाऽऽयास्य उद्गीथमुपासांचक्र एतमु एवाऽऽयास्यं मन्यन्त आस्याद्यदयते ॥ १२ ॥**

**अन्वय व अर्थः—बृहस्पतिः तं ह उद्गीथं उपासांचक्रे; हि वा बृहती; तस्याः एषः पतिः; तेन एतं उ एव बृहस्पतिं मन्यंते** ( बृहस्पतीनें मुख्य प्राणदृष्टीनें उद्गीथाची उपासना केली. वाणी श्रेष्ठ आणि विस्तीर्ण आहे. तिचा हा पति आहे, म्हणून त्याला बृहस्पति असें नांव आहे. आणि ह्या गुणामुळें बृहस्पति हेंच नांव प्राणालाही मिळतें) ॥ ११ ॥

**अन्वय व अर्थः—आयास्यः तं उद्गीथं उपासांचक्रे; यत् आस्यात् अयते तेन एतं उ एव आयास्यं मन्यंते** ( आयास्यानें प्राणदृष्टीनें उद्गीथाची उपासना केली. ज्यापक्षीं आस्यात् म्हणजे मुखांमधून प्राण अयते म्हणजे बाहेर जातो, त्यापक्षीं याला 'आयास्य' हें नांव प्राप्त झालं. आणि प्राणोपासक आयास्यानें आपलें नांव प्राणास देण्याची योग्यता मिळविली. म्हणजे 'आयास्य' हें नांव ब्रह्मवेत्ते प्राणास देतात ॥ १२ ॥

तथा वाचो बृहत्याः पतिस्तेनासौ बृहस्पतिः । तथा यद्यस्मादास्यादयते निर्गच्छति तेनाऽऽयास्य ऋषिः प्राण एव सन्नित्यर्थः । तथाऽन्योऽप्युपासक आत्मानमेवाऽऽङ्गिरसादिगुणं प्राणमुद्गीथमुपासीतेत्यर्थः ॥ ११ ॥ १२ ॥

सिद्धान्ती—या दोन्हीं मंत्राचा अर्थ दहाव्या मंत्राप्रमाणेंच समजून घ्यावयाचा आहे. श्रीमत् आचार्यांस या मंत्रांसंबंधीं विशेष कांहीं सांगावयाचें नव्हतें. त्यांनीं आपल्या भाष्यांत बृहस्पति आणि आयास्य या श्रुतिप्रणीत नांवांचें निर्वचन केलें आहे, ऐका: सर्वव्यापी वाणीचा पति म्हणून बृहस्पती' हें नांव देवगुरूला मिळालें; तसेंच मुखांतून बाहेर जाणारा जो तो आयास्य होय. मुखांतून प्राणच बाहेर जातो. म्हणून, आयास्य हाहीं प्राणरूपच आहे.

सारांश, अंगिरादि सर्व ऋषी स्वतः उपासक असून प्राणगुण होते. त्यांनीं आपण स्वतः स्वगुणवंत प्राणाची उपासना केली. उपास्य आपण आणि उपासक आपण असा प्रकार होय! त्याचप्रमाणें आपणच स्वतः अंगिरसादि गुण असणारे आत्मरूपी प्राण आहों; अशी दृष्टि ठेऊन उद्गीथाची उपासना कोणीही करावी, हें तात्पर्य आहे ॥ ११ ॥ १२ ॥

---

## मंत्र तेरावा.

**तेन तꣳ ह बको दाल्भ्यो विदांचकार । स ह नैमिशीयानामुद्गाता बभूव स ह स्मैभ्यः कामाना-गायति ॥ १३ ॥**

**अन्वय व अर्थः—दाल्भ्यः बकः तेन तं ह विदांचकार** ( दाल्भ्य-बक याला प्राणोपासनेनें प्राणस्वरूप समजलें ) **सः नैमिशीयानां उद्गाता बभूव ह** ( तो नैमिषीयांचा उद्गाता झाला ) **सः एभ्यः कामान् आगायति स्म ह** ( तो नैमिषीयांस कामाचा आगाता झाला ) ॥ १३ ॥

न केवलमङ्गिरःप्रभृतय उपासांचक्रिरे। तं ह बको नाम दल्भ्य-स्यापत्यं दाल्भ्यो विदांचकार यथादर्शितं प्राणं विज्ञातवान्। विदित्वा च स ह नैमिशीयानां सत्रिणामुद्गाता बभूव। स च प्राणविज्ञानसामर्थ्यादेभ्यो नैमिशीयेभ्यः कामानागायति स्म हाऽऽ-गीतवान्किलेत्यर्थः ॥ १३ ॥

सिद्धान्ती—अंगिरसप्रभृति ऋषींनींच उपासना केली असें नाहीं. दल्भ्य कुलांत उत्पन्न झालेल्या बकानें, दाल्भ्यबकानें, प्राणाचें स्वरूप श्रुतीनें गायिलें आहे; तसेंच यथार्थ समजून घेतलें. हें स्वरूप समजून घेतल्यावर दाल्भ्यबक नैमिषीय

ऋषी यज्ञसत्र करीत होते, तेथें त्यांचा उद्गाता झाला आणि आपल्या प्राणविज्ञानाच्या सामर्थ्यानें प्राप्त झालेल्या आपल्या गायनाच्या जोरावर नैमिषीयांचे सर्व काम त्यांस प्राप्त करून देता झाला. तात्पर्य, आपल्या ज्ञानसामर्थ्यानें बकदाल्भ्य नैमिषीय ऋषींचे सर्व काम पुरविता झाला. हे ऋषी नैमिषारण्यांत यज्ञसत्रें चालवीत असत, हें तुला ठाऊकच आहे ॥ १३ ॥

---

## मंत्र चवदावा.

**आगाता ह वै कामानां भवति य एतदेवं विद्वानक्षरमुद्गीथमुपास्त इत्यध्यात्मम् ॥ १४ ॥**

**इति प्रथमाध्यायस्य द्वितीयः खण्डः ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः—यः एवं विद्वान् एतत् अक्षरं उद्गीथं उपास्ते कामानां आगाता भवति ह वै** ( जो कोणी विद्वान् प्राणदृष्टीनें त्रिगुणात्मक उद्गीथअक्षराची ( ॐची ) उपासना वर सांगितल्याप्रमाणें करितो, तो आपल्या सामर्थ्यानें यजमानांच्या इच्छा पूर्ण करणारा होतो ) **इति अध्यात्मं** ( हें अध्यात्मवर्णन येथें संपलें ) ॥ १४ ॥

तथाऽन्योऽप्युद्गाताऽऽगाता ह वै कामानां भवति य एवं विद्वान्यथोक्तगुणं प्राणमक्षरमुद्गीथमुपास्ते तस्यैतद्दृष्टं फलमुक्तम् । प्राणात्मभावस्त्वदृष्टम् । "देवो भूत्वा देवानप्येति" इति श्रुत्यन्तरात्सिद्धमेवेत्यभिप्रायः । इत्यध्यात्ममेतदात्मविषयमुद्गीथोपासनमित्युक्तोपसंहारोऽधिदैवतोद्गीथोपासने वक्ष्यमाणो बुद्धिसमाधानार्थः ॥ १४ ॥

इति प्रथमाध्यायस्य द्वितीयः खण्डः ॥ २ ॥

**सिद्धान्ती** —जो कोणी उद्गाता आतांच वर सांगितलेले अंगिरादि सर्व प्राणगुण लक्षांत ठेऊन त्या प्राणदृष्टीनें अक्षर जें उद्गीथ (ॐ) त्याची उपासना करितो, तो आपले व यजमानाचे सर्व काम ( इच्छा ) पूर्ण करितो. हें दृष्ट फल श्रुतीनें

सांगितलें आहे. तथापि, या प्राणोपासक ज्ञानीं उद्गात्याला प्राणस्वरूप प्राप्त होतें, हें अदृष्ट फल होय.

**पूर्व०**—श्रुति तर हें फळ सांगत नाहीं ?

**सिद्धान्ती**—' देव होऊन देवाकडे जातो ' अशी दुसरी श्रुति आहे, ती आम्ही म्हणतों, त्याचें पूर्ण समर्थन करिते. याप्रमाणें अध्यात्माचें वर्णन झालें. अध्यात्मदृष्टीनें उद्गीथाची उपासना कशी करावी, याचें विवेचन आतांपर्यंत झालें. हें दाखविण्यासाठीं मंत्रांतील शेवटचीं दोन उपसंहारात्मक पदें श्रुतीनें उपयोजिलीं आहेत.

**पूर्व०**—हें येथें सांगण्याचें कारण काय ?

**सिद्धान्ती**—कारण हें आहे कीं, अधिदैविक उपासना पुढें सांगणें आहे, हें श्रुतीला सुचवावयाचें आहे. अध्यात्मविषयक उद्गीथोपासनाच काय ती आहे, अशी श्रोत्यांस उद्वेगजनक चिंता उत्पन्न होईल, ती होऊं नये व पुढें वर्णन येणारच आहे, या आश्वासनानें बुद्धीला धैर्ययुक्त समाधान वाटावें, म्हणून अध्यात्माचा म्हणजे शरीरस्थ प्राणोपासनेचा उपसंहार येथें श्रुतीनें प्रत्यक्ष शब्दांनीं केला आहे. हें सर्वथा योग्य आहे, असें तुम्हांसही वाटलें पाहिजे ॥ १४ ॥

प्रथम अध्यायांतील द्वितीय खंडाची समाप्ति झाली.

# प्रथम अध्याय तिसरा खंड

## मंत्र पहिला.

**अथाधिदैवतं, य एवासौ तपति तमुद्गीथमुपासीतोद्यन्वा एष प्रजाभ्य उद्गायति। उद्यꣳस्तमो भयमपहन्त्यपहन्ता ह वै भयस्य तमसो भवति य एवं वेद ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—अथ अधिदैवतं** ( यानंतर देवताविषयक दृष्टीनें उद्गीथाची उपासना करण्याचे प्रकरणाला आरंभ करावयाचा ) **यः एव असौ तपति** ( जो हा आदित्यच तपन करितो, प्रकाश व उष्णता देतो ) **तं उद्गीथं उपासीत** ( त्या आदित्याच्या दृष्टीनें उद्गीथाची उपासना करावी ) **कारण—उद्यन् वै प्रजाभ्यः एषः उद्गायति** ( उदय पावून सर्व लोकांसाठीं हा आदित्य उद्गान करीत असतो ) **उद्यन् तमः भयं अपहंति** ( उगवत असतां किंवा स्वतः उगवून अंधकार व त्यापासून उत्पन्न होणारें भय विनष्ट करितो ) **य एवं वेद, भयस्य तमसः अपहंता भवति** ( हें ज्ञान ज्याला होतें, तो भयाचा आणि अंधकाराचा नाश करितो ) प्रकाशमय आदित्याची उद्गीथरूपानें उपासना करणारा ज्ञानी पुरुषभयाचा आणि तमाचा विनाशक होतो ॥ १ ॥

अथानन्तरमधिदैवतं देवताविषयमुद्गीथोपासनं प्रस्तुतमित्यर्थोऽनेकधोपास्यत्वादुद्गीथस्य य एवासावादित्यस्तपति तमुद्गीथमुपासीताऽऽदित्यदृष्ट्योद्गीथमुपासीतेत्यर्थः । तमुद्गीथमित्युद्गीथशब्दोऽक्षरवाची सन्कथमादित्ये वर्तत इति, उच्यते – उद्यन्नुद्गच्छन्वा एष प्रजाभ्यः प्रजार्थमुद्गायति प्रजानामन्नोत्पत्त्यर्थम् । न ह्यनुद्यति तस्मिन्व्रीह्यादेः पक्तिः स्यादत उद्गायतीवोद्गायति, यथैवोद्गाताऽन्नार्थमत उद्गीथः सवितेत्यर्थः । किंचोद्यन्नैशं तमस्तज्जं च भयं प्राणिनामपहन्ति तमेवंगुणं सवितारं यो वेद सोऽपहन्ता नाशयिता ह वै भयस्य जन्ममरणादिलक्षणस्याऽऽत्मनस्तमसश्च तत्कारणस्याज्ञानलक्षणस्य भवति ॥ १ ॥

**सिद्धान्ती**—अथ म्हणजे आध्यात्मिक प्राणदृष्टीनें उद्गीथोपासनेचें प्रवचन झाल्यानंतर आदित्य-देवताविषयक उद्गीथोपासनेला आरंभ करावयाचा आहे. उद्गीथाची उपासना जशी आध्यात्मिक-प्राणरूपानें करावयाची, तशी आधिदैविक आदित्यादिरूपानेंही त्याची उपासना करणें अत्यंत इष्ट आहे. उद्गीथाची उपासना अनेकप्रकारांनीं करितां येते व तशी करणें हें आपलें कर्तव्य आहे. असो; हा जो आदित्य म्हणजे सूर्य तपतो, तपश्चर्या करितो व सर्व जगांस प्रकाश देतो, त्याच्या दृष्टीनें उद्गीथाची उपासना करावी. आदित्यच उद्गीथ आहे, अशी भावना धरून ओंकाराची उपासना करावी.

**पूर्व०**—उद्गीथ हा शब्द तर अक्षरवाची आहे, हें प्रकरणावरून स्पष्ट आहे. पण, आदित्य शब्द प्रकाशवाची आहे. तेव्हां ह्या दोन भिन्न अर्थ असणाऱ्या शब्दांचें सामानाधिकरण्य श्रुतीनें कसें केलें ? एकार्थक दोन शब्द एकाच कारकाशीं संबद्ध असतील, तर त्यांचें सामानाधिकरण्य होतें. येथें तर तसा प्रकार नाहीं.

**सिद्धान्ती**—ऐका, श्रुति काय म्हणते तें: आदित्य उदयाचलावर येत असतो किंवा वर चढत असतो, तेव्हां सर्व लोकांसाठीं अन्न उत्पन्न व्हावें, एतदर्थ तो उद्गान करीत असतो. तो जर उगवलाच नाहीं तर व्रीहि-आदिकरून धान्यें पिकत नाहींत. असो; उद्गाता अन्नाप्रीत्यर्थ आगान करितो, त्याप्रमाणें हा सूर्यही उगवून उद्गात्याचें (आगानाचें) काम करितो, उद्गाता होतो. तसेंच; हा उगवल्याबरोबर रात्रिसंबंधी सर्व अंधकार आणि अंधकारासंबंधानें प्राण्यांना उत्पन्न होणारें भय, हीं नष्ट होतात. अशाप्रकारचें सवितृगुणांचें ज्ञान ज्याला होतें, तोही भयाचा नाश करणारा होतो.

**शिष्य**—भय कसलें भगवन् !

**सिद्धान्ती**—जन्ममरणाचें भय प्रत्येक संसाऱ्याच्या मागें लागलें आहेना ! सवितृ-गुणवेत्त्याचें हें भय नाहींसें होतें; अथवा या भयाचा विनाश होतो. तसेंच त्याच्या अंतःकरणांतील सर्व अंधकार आणि ज्याच्यापासून भय आणि अंधकार उत्पन्न होतात, तें अज्ञान यांचाही विनाश होतो.

**शिष्य**—अज्ञान हें अंधकाराचें लक्षणच आहे; अज्ञान असलें कीं अंधकार असावयाचाच !

**सिद्धान्ती**—याप्रमाणें आदित्यदृष्टि ठेऊन जो उद्गीथाची उपासना करितो; व स्वतः उद्गाता होतो, तो भयाचा, अंधकाराचा आणि अज्ञानाचा नाश करून टाकतो ॥ १ ॥

यद्यपि स्थानभेदात्प्राणादित्यौ भिन्नाविव लक्ष्येते तथाऽपि न स तत्त्वभेदस्तयोः । कथम्--

सिद्धान्ती--यद्यपि स्थानभेदानें प्राण आणि आदित्य हे निरनिराळेसे दिसतात; तथापि परमार्थतः त्यांच्यामध्यें भेद नसतो.

शिष्य--हें कसें ?

सिद्धान्ती--ऐका--

---

## मंत्र दुसरा.

**समान उ एवायं चासौ चोष्णोऽयमुष्णोऽसौ स्वर इतीममाचक्षते स्वर इति प्रत्यास्वर इत्यमुं, तस्माद्वा एतमिमममुं चोद्गीथमुपासीत ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः**--**असौ उष्णः च अयं च उष्णः; इमं स्वरः इति आचक्षते, अमुं " 'स्वर' इति, 'प्रत्यास्वरः' इति;" अयं च असौ च समानः उ एव** ( तो सूर्य उष्ण आहे; आणि हा प्राण उष्ण आहे; या प्राणाला 'स्वर' असें म्हणतात, त्या सूर्यालाही 'स्वर' आणि 'प्रत्यास्वर' असें म्हणतात; म्हणून हा प्राण आणि तो सूर्य हे समान गुणाचे आहेत व समान नामाचे आहेत ) **तस्मात् इमं अमुं च एतं उद्गीथम् उपासीत वै** ( म्हणून त्यावर म्हणजे ह्या प्राणावर आणि त्या सूर्यावर भावना ठेऊन उद्गीथाची प्राणदृष्टीनें व सूर्यदृष्टीनें उपासना करावी ) सारांश, प्राण आणि सूर्य हे उभयतां गुणानें व नांवानें एकच आहेत, म्हणून प्राणदृष्टीनें आणि सूर्यदृष्टीनें उद्गीथाची उपासना करावी ॥ २ ॥

समान उ एव तुल्य एव प्राणः सवित्रा गुणतः सविता च प्राणेन । यस्मादुष्णोऽयं प्राण उष्णश्चासौ सविता । किंच स्वर इतीमं प्राणमाचक्षते कथयन्ति तथा स्वर इति चामुं सवितारम् । यस्मात्प्राणः स्वरत्येव न पुनर्मृतः प्रत्यागच्छति । सविता त्वस्त-

मित्वा पुनरप्यहन्यहनि प्रत्यागच्छति । अतः प्रत्यास्वरः; अस्माद्गुणतो नामतश्च समानावितरेतरं प्राणादित्यौ । अतः सतत्त्वाभेदादेतं प्राणमिममसुं चाऽऽदित्यमुद्गीथमुपासीत ॥ २ ॥

सिद्धान्ती—स्थानभेद आहे तरी प्राण हा सूर्याशीं गुणानें तुल्य आहे, आणि सूर्य ही प्राणाशीं गुणानें तुल्य आहे. कारण (१) हा प्राण उष्ण आहे, आणि तो सूर्यही उष्ण असतो.

शिष्यः—बरोबर आहे. प्राणवायूच्या उष्णतेनें पिंडाची व्यवस्था ठीक चालते; आणि सूर्याच्या उष्णतेनें ब्रह्मांडाची व्यवस्थाही नीट चालते.

सिद्धान्ती—आणखी (२) प्राणाला 'स्वर' असें ब्रह्मवेत्ते म्हणतात, आणि सूर्यालाही 'स्वर' अथवा 'प्रत्यास्वर' असें नांव आहे.

शिष्यः—स्वर म्हणजे ?

सिद्धान्ती—'स्वरति' म्हणजे जो जातो, तो स्वर म्हणजे जाणारा. प्राण जाणारा आहे. तो विनष्ट झाला असतां पुनः मृतदेहाकडे परत येत नाहीं. गमन ही त्याची क्रिया आहे. ज्या स्थूल देहाला सोडून तो जातो, त्या स्थूल देहांत तोच प्राण पुनः परत येत नाहीं.

पूर्व०—मग सूर्याचीहि तशीच स्थिति असते, त्यालाही 'स्वर' असें नांव असावें. श्रुतीनें प्रत्यास्वर असें आणखी दुसरें नांव त्याला कां दिलें आहे ?

सिद्धान्ती—कारण, अस्ताला गेल्यानंतर पुनः पुनः तो प्रत्येक दिवशीं ह्या भूर्भुवादि लोकाला ( सामान्यतः त्या त्याच स्थानीं ) परत येतो. या-प्रमाणें तो स्वर आहे, आणि प्रत्या-स्वरही आहे. एवंच उभयतां उष्ण-प्रकृतीचे आहेत. उभयतां गमनशील आहेत. म्हणून उभयतांस 'स्वर' असें नांव आहे. सूर्य पुनः परत येतो, म्हणून त्याला प्रत्यास्वरही म्हणतात, इतकेंच. याप्रमाणें सारखा गुण असणारे व एकच नांवानें संबोधिले जाणारे हे प्राण व सूर्य आहेत. अर्थात्, उभयतां परस्पर समसमान आहेत. यांच्यामध्यें कोणताही ( तत्त्वाचा किंवा दुसरा कसला ) भेद नाहीं. हें ज्ञान करून घेऊन प्राणादित्यांच्या दृष्टीनें उद्गीथाचा अवयव जो ओंकार त्याची उपासना मुमु-क्षूनें करावी ॥ २ ॥

## मंत्र तिसरा.

**अथ खलु व्यानमेवोद्गीथमुपासीत यद्वै प्राणिति स प्राणो यदपानिति सोऽपानः । अथ यः प्राणापानयोः संधिः स व्यानो यो व्यानः सा वाक् तस्मादप्राणन्ननपानन्वाचमभिव्याहरति ॥ ३ ॥**

अन्वय व अर्थः—**अथ खलु व्यानम् एव उद्गीथम् उपासीत** (यानंतर व्यान—दृष्टीनें उद्गीथाची उपासना करावी) **यत् वै प्राणिति सः प्राणः; यत् अपानिति सः अपानः** (जीव जो वायु बाहेर टाकतो त्याला प्राण असे म्हणावें; आणि जो वायू आंत घेतला जातो त्याला अपान असें म्हणावें) **अथ प्राणापानयोः यः संधिः सः व्यानः** (आणि प्राण आणि अपान यांचा जो संधी कारितो, प्राणापानांस जो एकत्र आणितो, त्याला व्यान असें म्हणतात) **यः व्यानः सा वाक्** (जो व्यान आहे तीच वाणी होय) **तस्मात् अप्राणन् अनपानन् वाचं अभिव्याहृति** (म्हणून प्राण आणि अपान ह्यांचे व्यापार न कारितां लोक शब्दाचा उच्चार कारितात) सारांश, प्राण आणि अपान यांच्यामध्यें जो वायूचा अवकाश असतो, जो विशेष वायु असतो तो वाणीचा प्रवर्तक आहे; म्हणून प्राणापानव्यापार स्तब्ध ठेविले असतांही व्यानाच्या सामर्थ्यानें आपल्यांस बोलतां येतें ॥ ३ ॥

अथ खल्विति प्रकारान्तरेणोपासनमुद्गीथस्योच्यते व्यानमेव वक्ष्यमाणं प्राणस्यैव वृत्तिविशेषमुद्गीथमुपासीत । अधुना तत्सतत्त्वंनिरूप्यते—यद्वै पुरुषः प्राणिति मुखनासिकाभ्यां वायुं बहिर्निःसारयति स प्राणाख्यो वायोर्वृत्तिविशेषो यदपानित्यपश्वसिति ताभ्यामेवान्तराकर्षति वायुं सोऽपानोऽपानाख्या वृत्तिः । ततः किमिति, उच्यते—अथ य उक्तलक्षणयोः प्राणापानयोः संधिस्तयोरन्तरा वृत्तिविशेषः स व्यानः; यः सांख्यादिशास्त्रप्रसिद्धः श्रुत्या विशेषनिरूपाणान्नासौ व्यान इत्यभिप्रायः । कस्मात्पुनः प्राणापानौ हित्वा महताऽऽयासेन व्यानस्यैवोपासनमुच्यते । वीर्यवत्क-

र्महेतुत्वात्। कथं वीर्यवत्कर्महेतुत्वमित्याह—यो व्यानः सा वाक्। व्यानकार्यत्वाद्वाचः। यस्माद्व्याननिर्वर्त्या वाक्तस्मादप्राणन्ननपानन्प्राणापानव्यापारावकुर्वन्वाचमभिव्याहरत्युच्चारयति लोकः॥ ३॥

सिद्धान्ती—याप्रमाणें आध्यात्मिक आणि आधिदैविक उद्गीथोपासना सांगितल्या आणि या खंडाच्या दुसऱ्या मंत्रांत त्या उभयतांचें एकीकरणही केलें.

शिष्य—आध्यात्मिक प्राण आणि आधिदैविक सूर्य एकच आहेत, असें सांगितलें.

पूर्वपक्षी—संपला! तर मग कारभार?

सिद्धान्ती—नाहीं. या नंतर उद्गीथाची आध्यात्मिक उपासना आणखी एका प्रकारानें सांगावयाची आहे. कोणती ती? ऐका: व्यान नामक जो प्राणाचा वृत्तिविशेष आहे, त्याच्या दृष्टीनें (व्यानाची दृष्टि ठेऊन) उद्गीथाची उपासना करावी, असें श्रुतीस सांगावयाचें आहे.

शिष्य—व्यान हा मुख्यप्राणाचा वृत्तिविशेष आहे, त्याचा एक प्रकार आहे, असें आपण म्हणतां. तेव्हां त्याचें लक्षण काय, तें कृपा करून सांगावें.

सिद्धान्ती—हें काम प्रत्यक्ष श्रुति स्वतःच करीत आहे. ती उपपत्तीसह व्यानाचें लक्षण सांगत आहे. अंमळ थांबा आणि ऐका—आपल्या मुखनासिकांच्या द्वारानें आपण जो वायु बाहेर टाकतों, त्याला 'प्राण' असें म्हणतात. हा वायूचा एक प्रकार (वृत्तिविशेष) आहे. त्या मुखनासिक द्वारांनींच जो वायु आपण आंत ओढून घेतों, त्याला अपान हें नांव मिळालेलें आहे.

शिष्य—म्हणजे ज्याच्या साह्यानें आपण जीवाचें संरक्षण करूं शकतों, तो प्राणवायु आणि ज्याच्या साह्यानें आपण उच्छ्वास करितों, तो अपानवायु असें समजावयाचें. नाभीपासून वर संचार करणारा तो प्राणवायु आणि नाभीच्या खालील प्रदेशांत संचारणारा तो अपानवायु होय.

पूर्वपक्षी—व्यानाचें लक्षण सांगावयाचें असें म्हणतां आणि प्राणापानांचीं कर्में सांगत बसतां, हें काय?

सिद्धान्ती—ऐका—प्राणापानाचे व्यापार सांगण्याचा क्रम योग्यच आहे. श्वास घेणें व टाकणें ही प्राणापानांचीं कर्में आहेत. या दोन प्रकारांच्या मध्यें असणारा (या दोन प्रकारांस जोडणारा) मुख्य प्राणवायूचा जो तिसरा प्रकार आहे, वृत्तिविशेष आहे, त्याला व्यान असें म्हणतात.

पूर्वपक्षी—सांख्य, योगी आणि इतर शास्त्री व्यानाचें निराळें लक्षण देतात. स्कंध, मर्म इत्यादि ठिकाणीं राहणारा जो वायु त्याला व्यान असें सांख्यादि शास्त्रें म्हणतात.

सिद्धान्ती—श्रुतीनें व्यानवायूचें विशेष स्वरूप येथें सांगितलें आहे, म्हणून सांख्यादि शास्त्रांना संमत असणारें व्यानस्वरूप श्रुतीला येथें इष्ट नाहीं. प्राणापानांचा संधि करणारा जो वायु तोच येथें तिला अभीष्ट आहे. या व्यानवायूची दृष्टि ठेवून उद्गीथोपासना करावी हें श्रुतीला अभीष्ट आहे.

पूर्वपक्षी—काय हो! प्राणापान एकीकडे ठेवून व्यानाची उपासना श्रुतीनें मुद्दाम सांगितली आहे, याचें काय तात्पर्य? प्राणापानांच्या आश्रयानें मात्र जो विद्यमान असतो, त्या व्यानवायूचें प्रस्थ येवढें कां? इतके मोठे आयास घेऊन श्रुति व्यानोपासनाच कां सांगत आहे?

सिद्धान्ती—कारण, त्याचें कर्मच वीर्यशाली आहे. तो वीर्यशाली कर्मांचा मुख्य हेतु आहे; त्यापासून वीर्यशाली कर्म उत्पन्न होतें.

शिष्य—हें कसें?

सिद्धान्ती—जो व्यान तीच वाणी. शब्दोच्चार करणें हें व्यानाचें मात्र कार्य आहे. ज्यापक्षीं वाणी व्यानाचें अपत्य आहे, त्यापक्षीं आपण सर्वजण जो शब्दोच्चार करण्यास समर्थ होतो, तें शब्दोच्चारणसामर्थ्य प्राणापानव्यापारांस एकीकडे ठेऊन मात्र आपल्यांस येतें, असें म्हटलें पाहिजे.

शिष्य—तात्पर्य, वाणीचा व्यापार प्राणवायूनें होत नाहीं किंवा अपानवायूनेंही होत नाहीं. या दोघांचें व्यापारसाह्य न घेतां आपण शब्दोच्चार करितों, वाणीचा व्यापार चालवितों.

सिद्धान्ती—आणि म्हणूनच वीर्यशाली कर्मांचा उत्पादक व वाणीजनक जो व्यानवायु त्याची उपासना अथवा त्याची दृष्टि ठेऊन उद्गीथाची उपासना श्रुतीनें विहित केली आहे ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा.

**या वाक्सर्क्तस्मादप्राणन्ननपानन्नृचमभिव्याहरति यर्क्तत्साम तस्मादप्राणन्ननपानन्साम गायति यत्साम स उद्गीथस्तस्मादप्राणन्ननपानन्नुद्गायति ॥४॥**

**अन्वय व अर्थः—या वाक् सा ऋक्** ( जी वाणी तीच ऋचा ), **तस्मात् अप्राणन् अनपानन् ऋचं अभिव्याहरति** ( म्हणून प्राणव्यापार व अपानव्यापार न करितां आपण ऋग्वेदांतील ऋचा म्हणतों ) **या ऋक् तत् साम; तस्मात् अप्राणन् अनपानन् साम गायति**

( जी ऋक्, ऋचा, तेंच साम; म्हणून प्राणापानव्यापार अविद्यमान असतांना मात्र सामें गातां येतात ) **यत् साम सः उद्गीथः तस्मात् अप्राणन् अनपानन् उद्गायति** ( जें साम तोच उद्गीथ; म्हणून प्राणापान अविद्यमान असतां आपणांस उद्गान करितां येतें ॥ ४ ॥

**तथा वाग्विशेषामृचमृक्संस्थं च साम सामावयवं चोद्गीथमप्राणन्नन पानन्व्यानेनैव निर्वर्तयतीत्यभिप्रायः ॥ ४ ॥**

**सिद्धान्ती**—याच न्यायानें वाणीच्या एका प्रकाराला ऋचा म्हणतात. ऋचामध्येंच सामांचें वास्तव्य असतें. उद्गीथ हा सामाचा एक अवयव आहे. तेव्हां असा सिद्धांत निष्पन्न होतो कीं, प्राणापानांचे व्यापार स्तब्ध असले तरी ( प्राणापानाच्या व्यापाराचा कोणताही संबंध नसला तरी ) एका व्यानवायूच्या साह्यानें आपल्याला उद्गीथाचें उद्गान करितां येतें. आतांच सांगितल्याप्रमाणें हा उद्गीथ परंपरेनें वाणीचा प्रकार आहे; आणि वाणीच्या व्यापाराला प्राणापानांच्या व्यापाराची मुळीच अपेक्षा नाहीं ॥ ४ ॥

---

## मंत्र पांचवा.

**अतो यान्यन्यानि वीर्यवन्ति कर्माणि यथाऽग्नेर्मन्थनमाजेः सरणं दृढस्य धनुष आयमनमप्राणन्ननपान्स्तानि करोत्येतस्य हेतोर्व्यानमेवोद्गीथमुपासीत ॥ ५ ॥**

**अन्वय व अर्थः—यानि अन्यानि वीर्यवन्ति कर्माणि** (जीं कांहीं आणखी दुसरीं वीर्यशालीं कर्में आहेत ) **यथा अग्नेः मंथनं, आजेः सरणं, दृढस्य धनुषः आयमनं** ( जसें अग्नीचें मंथन, मर्यादेचें अतिक्रमण, दृढ धनुष्याचें आकर्षण ) **अप्राणन् अनपानन् तानि करोति** ( प्राणनिरपक्षेनें व अपानानिरपेक्षेनें हीं कर्में जीव करितो ) **अतः एतस्य हेतोः व्यानम् एव उद्गीथम् उपासीत** ( म्हणून म्हणजे या कारणासाठीं व्यानदृष्टीनें मात्र उद्गीथाची उपासना करावी ) ॥ ५ ॥

न केवलं वागाद्यभिव्याहरणमेवातोऽस्मादन्यान्यपि यानि वीर्यवन्ति कर्माणि प्रयत्नाधिक्यनिर्वर्त्यानि यथाऽग्नेर्मन्थनमाजेर्मर्यादायाः सरणं धावनं दृढस्य धनुष आयमनमाकर्षणमप्राणन्ननपानंस्तानि करोति। अतो विशिष्टो व्यानः प्राणादिवृत्तिभ्यः। विशिष्टस्योपासनं ज्यायः फलवत्त्वाद्राजोपासनवत्। एतस्य हेतोरेतस्मात्कारणाद्व्यानमेवोद्गीथमुपासीत नान्यद्वृत्त्यन्तरम्। कर्मवीर्यवत्तरत्वं फलम्॥ ५॥

**सिद्धान्ती**—केवल वाणीप्रमुख व्यापारच व्यानद्वारा आपण करितों, असें नाहीं. तर याच्याशिवाय आणखी दुसरे सुद्धां वीर्यशाली व्यापार आपण व्यानसाह्यानें करितों. विशेष प्रयत्न जोरानें केला, तरच हीं कर्में सिद्ध होतात, म्हणून यांस वीर्यशालीं कर्में म्हणावयाचें.

**शिष्य**—अशी कोणतीं तीं वीर्यशालीं कर्में ?

**सिद्धान्ती**—अग्नीचें मंथन करणें, जी कांहीं मर्यादा केली असेल तिच्यापलीकडे धांवून जाण्यांत पहिलेंपण मिळविणें, बळकट धनुष्याचें प्रत्यंचेच्या द्वारानें आकर्षण करणें, इत्यादि हीं वीर्यशालीं कर्में होत. हीं सर्व प्राणापाननिरपेक्ष आहेत. म्हणून व्यान हा प्राणापानादि मुख्य वायूच्या प्रकारांहून निराळा प्राणवृत्तिविशेष आहे. अर्थात् व्यानवायु हा मुख्यप्राणाचा विशेष प्रकार आहे. विशिष्टाची उपासना केली असतां ती नेहमीं जास्त फलप्रद होते. म्हणून विशेष उपासनेला श्रेष्ठत्व आहे. विशेष पुरुषाची म्हणजे राजाची उपासना केली असतां तत्काल जास्त फल देते. या कारणासाठीं व्यानदृष्टि मात्र ठेऊन उद्गीथाची उपासना करावी, अन्य वायुप्रकारांच्या दृष्टी ठेऊन उपासना करूं नये.

**शिष्य**—अधिक वीर्यशालीं कर्में करितां येतात, हें या विशिष्ट-उपासनेचें फल आहे ? होय ना ?

**सिद्धान्ती**—होय; अधिक सामर्थ्याचीं कर्में करणें इष्ट असल्यास व्यानदृष्टीनें मात्र उद्गीथाची उपासना करावी, हें श्रुतीला सांगावयाचें आहे॥ ५॥

---

## मंत्र सहावा.

**अथ खलूद्गीथाक्षराण्युपासीतोद्गीथ इति। प्राण एवोत्प्राणेन ह्युत्तिष्ठति वाग्गीर्वाचो ह गिर इत्याचक्षतेऽन्नं थमन्ने हीदꣳसर्वꣳस्थितम्॥ ६॥**

**अन्वय व अर्थः—अथ खलु उद्गीथाक्षराणि 'उद्गीथः' इति उपासीत** ( आतां यानंतर खरोखर उद्गीथामध्यें जीं निरनिराळीं अक्षरें आहेत, तीं प्रत्येकीं उद्गीथ आहेत, असें समजून त्यांची उपासना करावी ) **प्राणः एव उत्** ( 'उत्' हाच प्राण. उत् हें अक्षर आहे ) **हि प्राणेन उत्तिष्ठति** ( कारण प्राणसामर्थ्यानें आपण उठतों ) **वाक् गीः, वाचः ह गिरः इति आचक्षते** ( गी हें अक्षर व वाणी आहे, कारण वाणीलाच गिरा असें म्हणतात ) **थं अन्नं, हि इदं सर्वं अन्ने स्थितं** ( थ हें अक्षर अन्न होय. कारण, हें सर्व अन्नामध्यें स्थित झालें आहे ) सारांश, उद्गीथ या शब्दांतील सर्व अक्षरें **उद्गीथस्वरूपी** आहेत असें समजून उपासना करावी. 'उत्' हा प्राण 'गीः' ही वाणी आणि 'थ' हें अन्न होय ॥ ६ ॥

अथाधुना खल्वुद्गीथाक्षराण्युपासीत भवत्यक्षराणि मा भूवन्नित्यतो विशिनष्टि—उद्गीथ इति। उद्गीथनामाक्षराणीत्यर्थो नामाक्षरोपासनेऽपि नामवत एवोपासनं कृतं भवेदमुकमिश्रा इति यद्वत्। प्राण एवोत्, उदित्यस्मिन्नक्षरे प्राणदृष्टिः। कथं प्राणस्योत्त्वमित्याह—प्राणेन ह्युत्तिष्ठति सर्वोऽप्राणस्यावसाददर्शनादतोऽस्त्युदः प्राणस्य च सामान्यम्। वाग्गीः। वाचो ह गिर इत्याचक्षते शिष्टाः। तथाऽन्नं थमन्ने सर्वं स्थितमतोऽस्त्यन्नस्य थाक्षरस्य च सामान्यम् ॥ ६ ॥

सिद्धान्ती—आतां यापुढें 'उद्गीथाच्या अक्षरांची उपासना करावी,' असा उपदेश आहे. या वाक्याचा अर्थ असा नव्हे कीं, उद्गीथ शब्दांत उत्, गीः आणि थ अशीं जीं तीन अक्षरें आहेत त्यांची उत् अशी, गीः अशी, निरनिराळी उपासना करावी. कदाचित् अशी उपासना करण्याची भ्रांति होईल, म्हणून श्रुति सांगत आहे कीं, हीं सर्व अक्षरें उद्गीथाचीं नांवें आहेत, असें समजून त्यांची उपासना करावी.

शिष्य—म्हणजे कसें ?

सिद्धान्ती—व्यवहारांत कृष्णमिश्र, विष्णुमिश्र अशीं नांवें असतात. कृष्णमिश्राची उपासना करा, असें सांगितलें म्हणजे आपण जशी कृष्णमिश्र या नांवाची उपासना न करितां त्या नांवानें जो वाच्यपुरुष, त्या पुरुषाची उपासना करितों, त्याप्रमाणें 'उत्' 'गी' आणि 'थ' हीं उद्गीथाचीं नांवें आहेत,

म्हणून उत् इत्यादि अक्षरांची उपासना न करितां उत् अक्षरानें वाच्य जो उद्गीथ त्याची उपासना करावयाची, असा श्रुतीचा अभिप्राय आहे.

पूर्व०—असें कशावरून समजावयाचें ?

सिद्धान्ती—उद्गीथ या शब्दांतील उत् हें अक्षर प्राणरूप आहे. म्हणून त्या अक्षरांचें ठिकाणीं प्राणाची दृष्टि करावी.

शिष्य—म्हणजे प्राणदृष्टीनें उत् या अक्षराची उपासना करावयाची आहे. प्राण हा उद्गीथ आहे, हें आपण मागेंच ठरविलें आहे. असेंच ना ?

सिद्धान्ती—होय आतां—

पूर्व०—पण 'उत्' हें प्राणाचें नांव आहे, प्राणाला 'उत्' हें नांव प्राप्त होतें, हें सिद्ध कराल कीं नाहीं ?

सिद्धान्ती—अहो ! आपण सर्व उत् म्हणजे वर उठतों, सर्व व्यवहार करितों, हालचाल करितों, तें सर्व प्राणाच्याच साह्यानें ना ? प्राण नसेल तर सर्व चराचर व्यवहारशून्य होतें, हालचाली स्तब्ध होतात, हें आपण पाहात नाहीं काय ? सारांश, 'उत्' या अक्षराचें प्राणाशीं उत्कृष्टप्रकारचें समानगुणत्व आहे. 'उत्' हें प्राणाचें प्रतीक आहे, अशी भावना करण्यास श्रुति सांगत आहे. तसेंच, गी हें अक्षर वाणीचें प्रतीक आहे. ही सर्वप्रसिद्ध गोष्ट शिष्टसंमतच आहे. गिरा हे वाणीचें नांव आहे. वाणी उद्गीथ आहे, हें आतांच ठरविलें. आपण मागच्या मंत्रांत शेवटीं 'थ' हें अक्षर अन्नाचें प्रतीक आहे, कारण अन्नामध्यें हें सर्व विश्व स्थित होतें व 'थ' चा अर्थ स्थित होणें हा आहे, असें ठरविलें. याप्रमाणें 'थ' चें व अन्नाचें साम्य आहे. कारण थ हे अक्षर 'उद्गीथ' शब्दालाही स्थिति देतें. या प्रमाणें 'उत्' 'गीः' आणि 'थ' हीं तीन अक्षरें प्राण, वाणी आणि अन्न यांची प्रतीकें होतात आणि प्राणादि तिन्ही उद्गीथवाचक आहेत, हें आपण मागें समजून घेतलें आहे ॥ ६ ॥

---

## मंत्र सातवा.

**द्यौरेवोदन्तरिक्षं गीः पृथिवी थमादित्य एवो-द्वायु र्गीरग्निस्थ ँ सामवेद एवोद्यजुर्वेदो गीर्ऋग्वे-दस्थं दुग्धेऽस्मै वाग्दोहं यो वाचो दोहोऽन्नवानन्नादो भवति य एतान्येवं विद्वानुद्गीथाक्षराण्युपास्त उद्गीथ इति ॥ ७ ॥**

**अन्वय व अर्थः—द्यौः एव ' उत् ' अंतरिक्षं ' गीः ', पृथ्वी ' थं '** ( द्यु लोक हा ' उत् ', अंतरिक्ष ' गीः ' आणि पृथ्वी ' थ ' आहेत. सारांश स्वर्लोक, भुवर्लोक आणि भूलोक यांचीं प्रतीकें ' उत् ' ' गीः ' आणि ' थ ' हीं आहेत ) **आदित्यः एव ' उत् ', वायुः ' गीः, ' अग्निः ' थं '** ( याचप्रमाणें आदित्यः हा ' उत्, ' वायु हा ' गी ' आणि अग्नि हा ' थ ' आहे ) **सामवेदः एव ' उत्, ' यजुर्वेदः ' गीः, ' ऋग्वेदः ' थं '** ( तसेंच ' उत् ' हाच सामवेद, ' गीः हा यजुर्वेद आणि ' थ ' हा ऋग्वेद होय ) **अस्मै वाक् दोहं दुग्धे** ( उपासकाकरितां वाणी दोहन करीत असते ) **यः वाचः दोहः** ( जो हा दोह वाणी करिते ) **यः विद्वान् एवं एतानि उद्गीथाक्षराणि ' उद्गीथः ' इति उपास्ते, अन्नवान् अन्नादः भवति** ( जो कोणी उद्गीथाक्षरांचें हें स्वरूप समजून घेऊन त्यांची ' उद्गीथ ' या स्वरूपानें उपासना करितो, तो अन्नवान् आणि अन्नभोक्ता होतो ) सारांश, उद्गीथां-तील अक्षरें हीं भूर्भुवादि लोक, अग्नि वायु आदि देवता, आणि ऋग्वेदादि वेद आहेत, असें समजून जो उपासना करितो, त्याच्यावर वाणी प्रसन्न होते आणि तो संपन्न व आनंदी होतो ॥ ७ ॥

त्रयाणां श्रुत्युक्तानि सामान्यानि तानि तेनारूपेण शेषेष्वपि द्रष्टव्यानि । द्यौरेवोदुच्चैः स्थानात् । आदित्य एवोदूर्ध्वत्वात् । वायुर्गीरग्न्यादीनां गिरणात् । अग्निस्थं याज्ञीयकर्मावस्थानात् । सामवेद एवोत्स्वर्गसंस्तुतत्वात् । यजुर्वेदो गीर्यजुषां प्रत्तस्य हविषो देवतानां गिरणात् । ऋग्वेदस्थमृच्यध्यूढत्वात्साम्नः । उद्गीथा-क्षरोपासनफलमधुनोच्यते—दुग्धे दोग्ध्यस्मै साधकाय । का सा, वाक्, कं दोहम् । कोऽसौ दोह इत्याह—यो वाचो दोहः । ऋग्वेदा-दिशब्दसाध्यं फलमित्यभिप्रायस्तद्वाचो दोहस्थं स्वयमेव वाग्दो-ग्ध्यात्मानमेव दोग्धि । किंचान्नवान्प्रभूतान्नाऽन्नादश्च दीप्ताग्निर्भ-वति, य एतानि यथोक्तान्येवं यथोक्तगुणान्युद्गीथाक्षराणि विद्वा न्सन्नुपास्त उद्गीथ इति ॥ ७ ॥

सिद्धान्ती—मागच्या मंत्रांत उद्गीथ शब्दाच्या अक्षरांमध्यें आणि प्राणादिकांमध्यें जें उत्कृष्ट साम्य आहे, तादात्म्य आहे, तें सांगितलें. त्याच पद्धतीस अनुसरून इतर पदार्थांचे ठिकाणींही या अक्षरांचें तादात्म्य आहे, असें समजून घ्यावें, असा श्रुतीचा अभिप्राय जाणून आचार्य म्हणत आहेत—

शिष्य—हें कसें समजावें ?

सिद्धान्ती—स्वर्लोक उंच स्थानीं आहे, म्हणून तोच ' उत्; ' अंतरिक्ष सर्वलोकांचें गिरण करितें, सर्वभुवनांस गिळून टाकितें, अंतर्भूत करितें, म्हणून तें ' गी ' आणि सर्व प्राण्यांचें वसतिस्थान पृथ्वी आहे म्हणून ती ' थ ' होय. त्याचप्रमाणें वर उंच असणारा आदित्य हा ' उत् ' अग्निप्रमुख देवांस अंतर्भूत करणारा, गिळणारा वायु हा ' गीः ' ( संवर्गविद्या पहा ) आणि सर्व यज्ञयागादि कर्मांत स्थित व विद्यमान असणारा अग्नि हा ' थ ' असें समजून घ्यावें. सामवेद हाच स्वर्ग आहे, अशी त्याची स्तुति केली आहे, म्हणून तोच स्वर्ग म्हणजे ' उत्, ' यजुर्वेदांतील मंत्रांनीं विधिपूर्वक दिलेले हवी ( यजुषा स्वाहा) देवता गीर्ण करितात, स्वीकृत करितात, गिळून टाकतात, म्हणून यजुर्वेद हा ' गीः ' आणि सर्व सामाचें आश्रयभूत स्थान असणारा जो ऋग्वेद तो ' थ ' अशी दृष्टि ठेऊन उद्गीथांतील अक्षरांची उद्गीथ-दृष्टीनें उपासना करावयाची आहे.

शिष्य—याप्रमाणें उद्गीथ-शब्दांतील ' उत् ' ' गीः ' आणि ' थ ' हीं तीन अक्षरें अनुक्रमें, प्राण, वाणी व अन्न या अध्यात्माचीं, स्वर्लोक, भुवर्लोक आणि भूलोक या अधिलोकांची, अदित्य, वायु आणि अग्नि या अधिदैविक देवतांची आणि सामवेद, यजुर्वेद आणि ऋग्वेद ह्या आधिवेदांची प्रतीकें आहेत. तात्पर्य, प्रत्येक अक्षर सर्व अध्यात्मादि दृष्टींनीं उद्गीथस्वरूपी आहे, असें समजून उद्गीथ-दृष्टीनें या अक्षरांची उपासना कर्तव्य आहे, असें झालें.

सिद्धान्ती—पण श्रुतीनें या मंत्रांत सांगितलें नाहीं, तरी गेल्या मंत्रांत सांगितलें आहे, 'म्हणून प्राण, वाणी आणि अन्न ही अध्यात्मक दृष्टि ही विसरावयाची नाहीं,' हें तूं स्पष्ट सांगितलेंस हें ठीक झालें. तात्पर्य हीं तिन्हीं अक्षरें अध्यात्मिक आधिलौकिक, अधिदैविक आणि आधिवैदिक स्वरूपांची प्रतीकें आहेत आणि यादृष्टीनें हीं अक्षरें उद्गीथस्वरूपी आहेत, अशी भावना ठेऊन कल्याणार्थी पुरुषानें उपासना करावी.

पूर्व०—या अक्षरांची उपासना केली असतां फलप्राप्ति तरी काय होणार आहे ?

सिद्धान्ती—काय विचारावें ? साधकाला या उपासनेपासून उत्कृष्ट फलप्राप्ति होत असते.

**पूर्वपक्षी**—फल देतें तरी कोण ?

**सिद्धान्ती**–कोण म्हणजे ! वाणी. वाणी काय फल देते, असें विचाराल तर ऐका: ह्या उपासनेनें ऋग्वेदादि वेदांतील मंत्राक्षरांचें उच्चारण उत्कृष्टप्रकारचें होतें. सर्व मंत्र आपल्या स्वाधीन होतात. प्रत्यक्ष वाणी स्पष्ट उच्चाराचें सामर्थ्य आपण होऊन देतें, हें उत्कृष्ट फल आहे. दूध तापवून विरजलें आणि नंतर दोहन केलें असतां जशी नवनीताची प्राप्ति दूध आपण होऊन करून देतें, त्याप्रमाणें वाणी देवी आपलेंच दोहन करून आपण स्वतः स्वस्वरूपानें साधकांस प्राप्त होते. आणखी; हीं जीं उद्गीथाचीं अक्षरें व त्यांचें स्वरूप सांगितलें आहे, तीं अक्षरें आणि त्यांचीं निरनिराळी स्वरूपें व गुण जो शास्त्रविधीनें समजून घेतो आणि उद्गीथ-दृष्टीनें त्यांची उपासना करितो, तो विद्वान् व अन्नवान् होतो.

**शिष्य**—म्हणजे त्याच्यापाशीं अन्नसंचय मोठा होतो ?

**सिद्धान्ती**—होय, आणि तो अन्नाद म्हणजे अन्नभोक्ता होतो. त्याचा जठराग्नि प्रदीप्त असतो.

**शिष्य**—प्राण, वाणी, अन्न इत्यादि 'उत्,' 'गीः' आणि 'थ' यांची स्वरूपें आणि उत्थान करणें, गिरण करणें, स्थिति देणें इत्यादि गुण हें सर्व उपासकानें शास्त्रोक्त–पद्धतीनें आधीं समजून घेऊन मग त्या अक्षरांची उद्गीथ–दृष्टीनें उपासना केली तर हें फळ म्हणजे विद्वत्ता आणि संपन्नता हीं प्राप्त व्हावयाचीं.

**सिद्धान्ती**—होय. पण प्रत्येक अक्षर उद्गीथाचें नांव आहे, हें विसरावयाचें नाहीं ॥ ७ ॥

---

## मंत्र आठवा.

**अथ खल्वाशीः समृद्धिरुपसरणानीत्युपासीत येन साम्ना स्तोष्यन्स्यात्तत्सामोपधावेत् ॥ ८ ॥**

**अन्वय व अर्थ—अथ खलु आशीः समृद्धिः उपसरणानि इति उपासीत** ( आतां सर्व आमच्या वासनांची समृद्धि होईल, असें यांचें ध्यान करावयाचें आहे, उपासना करावयाची आहे. तो प्रकार असा ) **येन साम्ना स्तोष्यन् स्यात् तत् साम् उपधावेत्** ( साममंत्रानें स्तुति करावयाची असेल, त्या मंत्राचें चिंतन करावें ) ॥ ८ ॥

अथ खल्विदानीमाशीः समृद्धिराशिषः कामस्य समृद्धिर्यथा भवेत्तदुच्यत इति वाक्यशेषः । उपसरणान्युपसर्तव्यान्युपगन्त-

न्यानि ध्येयानीत्यर्थः । कथम् इत्युपासीत एवमुपासीत । तद्यथा—येन साम्ना येन सामविशेषेण स्तोष्यन् स्तुतिं करिष्यन्स्या-द्भवेदुद्गाता तत्सामोपधावेदुपसरेच्चिन्तयेदुत्पत्त्यादिभिः ॥ ८ ॥

सिद्धान्ती—आतां यानंतर म्हणजे वाणीप्रभृतींची समृद्धि झाल्या नंतर ज्याला काम्य उपासना करावयाची आहे, त्यानें फलप्राप्त्यर्थ काय करावें, हें हें प्रसंगतः सांगितलें आहे. आपले जे 'आशीः' म्हणजे काम ( इष्ट फलें ) असतील, त्यांच्या समृद्धीसाठीं कशी उपासना करावी, ते ते काम प्राप्त करून घेण्यासाठीं या अक्षरांचें कोणत्या प्रकारानें ध्यान करावें, तें आतां सांगितलें आहे.

शिष्य—म्हणजे 'अमुकप्रकारानें उपासना करा,' असा श्रुतीनें उपदेश केला आहे. असो; कशी उपासना करावयाची ही ?

सिद्धान्ती—ज्या विशेष साममंत्रानें स्तुति केली असतां उद्गाता आप्तकाम होईल, त्या सामाचें किंवा साममंत्राचें उपाधावन करावें, म्हणजे चिंतन करावें. त्या मंत्राची उत्पत्ति कशी, अथवा त्याचा द्रष्टा कोण, त्याचा छंद कोणता, देवता कोणती, इत्यादि सर्व समजून घेऊन त्या त्या विशेष मंत्राची ध्यानरूपी उपासना करावी. असो; हा प्रकार पुढें सांगितलाच आहे. ॥ ८ ॥

---

## मंत्र नववा.

**यस्यामृचि तामृचं यदार्षेयं तमृषिं यां देवताम-भिष्टोष्यन्स्यात्तां देवतामुपधावेत् ॥ ९ ॥**

**अन्वय व अर्थ:—यस्यां ऋचि स्यात् तां ऋचं, यदार्षेयं स्यात् तं ऋषिं, यां देवतां अभिष्टोष्यन् स्यात् तां देवतां उपधावेत** ( ज्या ऋचेमध्यें तें साम असेल त्या ऋचेचें उपासनापूर्वक चिंतन, जो द्रष्टा ऋषि असेल, त्याचें स्मरणपूर्वक चिंतन आणि त्या मंत्रांत ज्या देव-तेची स्तुति असेल त्या देवतेचें उपासनापूर्वक ध्यान उपासकानें करावें ) ॥ ९ ॥

यस्यामृचि तत्साम तां चर्चमुपधावेद्देवतादिभिः । यदार्षेयं साम तं चर्षिम् । यां देवतामभिष्टोष्यन्स्यात्तां देवतामुपधावेत् ॥९॥

सिद्धान्ती—ज्या ऋग्वेदमंत्रांतून तें साम उत्पन्न झालें असेल, त्या ऋचेची उपासना देवतादिकांसह करावी. तसेंच तें साम ज्या ऋषीनें दृष्ट असेल, ज्या ऋषीची व ज्या देवतेची स्तुति अभीष्ट असेल त्या देवतेची चिंतनिका करावी ॥ ९ ॥

---

## मंत्र १० वा.

**येन च्छन्दसा स्तोष्यन्स्यात्तच्छन्द उपधावेद्येन स्तोमेन स्तोष्यमाणः स्यात्तं स्तोममुपधावेत् ॥१०॥**

**अन्वय व अर्थः—येन छंदसा स्तोष्यन् स्यात्, तत् छंदः उपधावेत्; येन स्तोमेन स्तोष्यमाणः स्यात्, तं स्तोमं उपधावेत्** ( ज्या छंदानें स्तुति करावयाची असेल, त्या छंदाचें व ज्या स्तोमानें स्तुति करावयाची असेल त्या स्तोमाचेंही चिंतन करावें ) ॥ १० ॥

येन च्छन्दसा गायत्र्यादिना स्तोष्यन्स्यात्तच्छन्द उपधावेत्। येन स्तोमेन स्तोष्यमाणः स्यात्। स्तोमाङ्गफलस्य कर्तृगामित्वादात्मनेपदं स्तोष्यमाण इति। तं स्तोममुपधावेत् ॥ १० ॥

सिद्धान्ती—साममंत्राचा जो गायत्री किंवा इतर उष्णिक्, अनुष्टुभ् इत्यादि छंद असेल त्या छंदाचें स्मरण करून स्तुतिपाठकानें त्या छंदाचें चिंतन करावें. तसेंच ज्या स्तोमामध्यें किंवा सोमहविर्दानाच्या सूक्तामध्यें तो मंत्र असेल, त्या स्तोमाचें चिंतन करून स्तुति करणाऱ्या साधकानें त्या स्तोमाची उपासना करावी. स्तोम हा सोमयागामध्यें त्रिवृत्, पंचदश, सप्तदश, एकविंश या स्वरूपानें प्रसिद्ध आहे.

शिष्य—स्तोष्यमाण हा आत्मनेपदी प्रयोग कां आहे ?

सिद्धान्ती—स्तोमाच्या चिंतनाचें जें अंगभूतफल आहे, त्याची प्राप्ति स्तुति करणाऱ्या साधकालाच व्हावयाची आहे, म्हणून आत्मनेपदाची योजना आहे ॥ १० ॥

---

## मंत्र अकरावा व बारावा.

**यां दिशमभिष्टोष्यन्स्यात्तां दिशमुपधावेत् ॥११॥**

**आत्मानमन्तत उपसृत्य स्तुवीत कामं ध्यायन्नप्रमत्तोऽभ्याशो ह यदस्मै स कामः समृध्येत यत्कामः स्तुवीतेति यत्कामः स्तुवीतेति ॥ १२ ॥**

**इति प्रथमाध्यायस्य तृतीयः खण्डः ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थः—यां दिशं अभिष्टोष्यन् स्यात् तां दिशं उपधावेत्** ( ज्या दिशेला अभिव्याप्त करून देवतास्तुति करावयाची आहे, त्या दिशेचें चिंतन करून उपासना करावी) **अंततः आत्मानं उपसृत्य कामं ध्यायन् अप्रमत्तः स्तुवीत** ( शेवटीं, उद्गात्यानें आपलें स्वरूप ध्यानांत आणून, अप्रमत्त राहून आणि आपल्या इष्ट वासनांचें ध्यान करून त्या स्वरूपाची उपासना करावी ) **यत् अस्मै कामः, सः अभ्याशः समृध्येत** ( त्याला जी जी इष्ट वासना असेल ती त्याची वासना लौकरच पूर्ण होईल ) **यत् कामः स्तुवीत इति, यत् कामः स्तुवीत, इति** ( ज्याचा जो काम असेल त्यानें तत्कामप्रीत्यर्थ उपासनापूर्वक स्तुति करावी. अशी श्रुतीची आज्ञा आहे ) ॥ ११ । १२ ॥

यां दिशमभिष्टोष्यन्स्यात्तां दिशमुपधावेदधिष्ठात्रादिभिः ॥११॥

आत्मानमुद्गाता स्वरूपं गोत्रनामादिभिः सामादीन्क्रमेण स्वं चात्मानमन्ततोऽन्त उपसृत्य स्तुवीत । कामं ध्यायन्नप्रमत्तः स्वरोष्मव्यञ्जनादिभ्यः प्रमादमकुर्वंस्ततोऽभ्याशः क्षिप्रमेव ह यद्यत्रास्मा एवंविदे स कामः समृध्येत समृद्धिं गच्छेत् । कोऽसौ, यत्कामो यः कामोऽस्य सोऽयं यत्कामः संस्तुवीतेति । द्विरुक्तिरादरार्था ॥१२॥

इति प्रथमाध्यायस्य तृतीयः खण्डः ॥ ३ ॥

**सिद्धान्ती**—ज्या दिशेला सन्मुख होऊन स्तोत्र म्हणावयाचें असेल त्या दिशेच्या अधिष्ठात्या इंद्रादि देवतांसह व त्या दिशेच्या विशेष धर्मासह त्या दिशेचें चिंतन करावें. असो; पूर्वीच्या मंत्रांत साम, ऋचा, इत्यादि जो क्रम सांगितला आहे, तो क्रम संपूर्ण झाल्यानंतर शेवटीं उद्गात्यानें आपल्या स्वतःच्या स्वरूपाचें चिंतन करून त्याची उपासना करावी.

पूर्व०—स्वरूप म्हणजे तुमचें नेहमींचें आत्मस्वरूप कीं काय ?

**सिद्धान्ती**—नव्हे. आपण व्यवहारदृष्टीनें विचार करीत आहोंत. म्हणून येथें स्वरूप म्हणजे आपलें गोत्र, नाम, वर्ण, आश्रम इत्यादि मिळून जें स्वरूप होतें, त्याची उपासना करावी. कामी उपासकानें आपल्यास जो काम अभीष्ट आहे, त्याचें चिंतन अखंड ठेवावें. आणि स्वतः अप्रमत्त असावें.

**शिष्य**—अप्रमत्त म्हणजे ?

सिद्धान्ती—मंत्रोपासना करीत असतां मंत्रांतील पदांचे स्वर, अक्षरांचीं स्थानें, व स्वरव्यंजनादि, या सर्वांच्या संबंधानें उपासकानें कोठेंही प्रमाद होऊं देतां कामाचें नाहीं. मंत्रांचा उच्चार स्पष्ट, स्वच्छ आणि शास्त्रोक्त असावा. असो; याप्रमाणें सामादिक्रमानें स्तुति करणारा सकाम आणि ज्ञानी उद्गाता आपल्या कामांचा ( वासनांचा ) अनन्यचिंतक असेल आणि अप्रमत्त असेल, तर त्या उद्गात्याचे सर्व काम लौकरच परिपूर्ण होतील.

शिष्य—कोणता उद्गाता ?

सिद्धान्ती—ज्या कोणा उद्गात्याचा कोणताही शिष्टसंमत इष्टविषय असेल, त्या विषयाचें दृढचिंतन व दृढप्रयत्न करणारा तो उद्गाता मात्र उद्गीथाचें स्तवन करण्याला अधिकारी आहे. या उद्गात्यानें वर सांगितल्याप्रमाणें एकनिष्ठ उद्गीथ उपासना केली असतां त्याचे सर्व काम परिपूर्ण होतात. आदराप्रीत्यर्थ द्विरुक्ति केली आहे, हें सांगणें नलगे ॥ ११ ॥

प्रथम अध्यायाचा तृतीय खण्ड संपूर्ण.

---

## खंड चवथा.

---

### मंत्र पहिला.

**ओमित्येतदक्षरमुद्गीथमुपासीतोमिति ह्युद्गायति तस्योपव्याख्यानम् ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः**—‘ ॐ ’ इति, एतत् अक्षरं उद्गीथं उपासीत् ( ॐ ह्या नांवानें, अक्षर ह्या दृष्टीनें, उद्गीथाची उपासना करावी ) ॐ इति हि उद्गायति ( ॐ असेंच उद्गाता गान करितो ) तस्य उपव्याख्यानं ( त्याचे व्याख्यानाला आतां आरंभ करितों ) ॥ १ ॥

ओमित्येतदित्यादिप्रकृतस्याक्षरस्य पुनरुपादानमुद्गीथाक्षराद्युपासनान्तरितत्वादन्यत्र प्रसङ्गो मा भूदित्येवमर्थम् । प्रकृतस्यैवाक्षरस्यामृताभयगुणविशिष्टस्योपासनं विधातव्यमित्यारम्भः । ओमित्यादि व्याख्यातम् ॥ १ ॥

सिद्धान्ती--मध्यें प्रासंगिक प्रकरण आलें होतें, त्यामुळें पूर्वापर संबंध तुटला; तो पुनः जुळविण्यासाठीं श्रुति म्हणतेः 'ॐ हें पद, हें नांव, जें प्रकृत अक्षर आहे, त्याच्या दृष्टीनें उद्गीथोपासना करावी;' इत्यादि मंत्राचा जो पुनः उल्लेख केला आहे—

शिष्य—या उपनिषदांतील पहिला मंत्र या मंत्रांतील पदांनींच घटित झाला आहे. मग पुनः पुनः हा उल्लेख कां आहे बरें ?

सिद्धान्ती—तुला हें समजलें पाहिजे होतें, आतांच आम्ही सूत्ररूपानें बोललों, त्यावरून! असो; अक्षराची म्हणजे ओंकाराची उपासना प्रकृत आहे. परंतु उद्गीथाक्षरांची उपासना करावी, इत्यादि मजकूर मध्यंतरीं आल्यामुळें प्रकृत असलेली ओंकाराची उपासना ध्यानांत राहणार नाहीं; आणि उपासनेची प्रवृत्ति भलतीकडेच जाईल; हें संकट मनांत आणून श्रुतीनें पहिल्या अध्यायांतील पहिल्या खंडाच्या पहिल्या मंत्राचा पुनः उल्लेख केला आहे. असो; प्रकरणास प्रकृत, व अमृत, अभय इत्यादि गुणविशिष्ट जो ओंकार, त्याची उपासना विहित करावी; एतदर्थं पुनः हा मंत्रारंभ आहे. मंत्राचा अर्थ काय आहे तो मागेंच सांगितला आहे. तेव्हां त्याचा पुनः उच्चार करण्याचें कारण नाहीं. ॥ १॥

---

## मंत्र दुसरा.

**देवा वै मृत्योर्बिभ्यतस्त्रयीं विद्यां प्राविशꣳस्ते छन्दोभिरच्छादयन्यदेभिरच्छादयꣳस्तच्छन्दसां-छन्दस्त्वम् ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः—मृत्योः बिभ्यतः देवाः वै त्रयीं विद्यां प्राविशन्** ( मृत्यूला भिणारे देवांनीं विद्यात्रयीमध्यें प्रवेश केला ) **छंदोभिः ते अच्छादयन्** ( त्यांनीं आपल्यास छंदोमंत्रांनीं झांकून घेतलें ) **यत् एभिः अच्छादयन्, तत् छंदसां छंदस्त्वं** ( मंत्रांनीं आपल्यास देव आच्छादिते झाले, म्हणून मंत्रांना किंवा छंदांला छंद हें नांव प्राप्त झालें)॥२॥

देवा वै मृत्योर्मारकाद्बिभ्यतः किं कृतवन्त इत्युच्यते । त्रयीं विद्यां त्रयीविहितं प्राविशन्प्रविष्टवन्तो वैदिकं कर्म प्रारब्धवन्त इत्यर्थः । तन्मृत्योस्त्राणं मन्यमानाः । किंच ते कर्मण्यविनियुक्तै-श्छन्दोभिर्मन्त्रैर्जपहोमादि कुर्वन्त आत्मानं कर्मान्तरेष्वच्छादयं-

श्छादितवन्तः। यद्यस्मादेभिर्मन्त्रैरच्छादयंस्तत्तस्माच्छदसां मन्त्राणां छादनाच्छन्दस्त्वं प्रसिद्धमेव ॥ २ ॥

**सिद्धान्ती**—मृत्यूला म्हणजे स्वरूपविनाशाला देव भीत होते. मारक जे पापी असुर किंवा आपलीं पापप्रवण इंद्रियें यांची भीति देवांस म्हणजे सात्त्विक इंद्रियांस असे; म्हणून त्यांनीं विद्यात्रयीमध्यें प्रवेश केला.

**शिष्य**—विद्यात्रयींत प्रवेश केला, याचा अर्थ तिन्ही वेदांत जें कर्म विहित केलें आहे, तें कर्म करण्याला आरंभ केला असाच ना ?

**सिद्धान्ती**—होय. तात्पर्य कीं, त्यांनीं वैदिककर्मांचा अंगीकार केला. हें कर्म केलें असतां आपल्यास मृत्यूचें भय नाहीं, अशी त्यांची श्रद्धा होती. म्हणून त्यांनीं मृत्युतारक जें वेदविहित कर्म तें करण्याला आरंभ केला.

**शिष्य**—छंद म्हणजे काय ?

**सिद्धान्ती**—छंद म्हणजे मंत्र. सर्व मंत्रांचा विनियोग सर्वत्र होत नाहीं. तेव्हां कोणतें तरी एक विशिष्ट कर्म करण्यासाठीं ज्या मंत्रांचा विनियोग केला जातो, ते मात्र सोडून देऊन बाकीच्या मंत्रानीं किंवा छंदांनीं हे भ्यालेले देव जप, होम इत्यादि कर्में करूं लागले. अर्थात् त्यांनीं इतर कर्मांमध्यें आपलें संरक्षण या व इतर मंत्रांच्या साह्यानें करून घेतलें. मंत्रांचें आच्छादनच त्यांस झालें ! छंद म्हणजे प्रार्थनामंत्र असाही अर्थ आहे.

**शिष्य**—आणि ज्या अर्थीं या मंत्रांनीं देवांस आच्छादित करून त्यांचें मृत्यूपासून संरक्षण केलेंसें देवांस वाटलें, त्या अर्थीं मंत्रांला छंद हें नांव यथायोग्यच प्राप्त झालें, हें सर्वपरीनें नीटच आहे ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

### तानु तत्र मृत्युर्यथा मत्स्यमुदके परिपश्येदेवं पर्यपश्यदृचि साम्नि यजुषि। ते नु विदित्वोर्ध्वा ऋचः साम्नो यजुषः स्वरमेव प्राविशन् ॥ ३ ॥

**अन्वय व अर्थः—यथा उदके मत्स्यं परिपश्येत् एवं तत्र ऋचि, साम्नि यजुषि तान् उ मृत्युः पर्यपश्यत्** ( मत्स्यमारक उदकामध्यें मत्स्यांला पाहतो, त्याप्रमाणें ऋग्वेद, सामवेद आणि यजुर्वेद यांमध्यें असणाऱ्या कर्मठ देवांना सुद्धां मृत्यूनें पाहिलें ) **वित्वा ते नु ऋचः साम्नः**

**यजुषः ऊर्ध्वाः स्वरं एव प्राविशन्** ( मृत्यु आपल्यास पाहत आहे, असें जाणून देव ऋग्वेदादिकांनीं सांगितलेल्या कर्मांपासून निवृत्त झाले. कर्माचें अतिक्रमण त्यांनीं केलें आणि स्वरामध्यें प्रवेश केला ) ॥ ३ ॥

तांस्तत्र देवान्कर्मपरान्मृत्युर्यथा लोके मत्स्यघातको मत्स्यमुदके नातिगम्भीरे परिपश्येद्बडिशोदकस्रावोपायसाध्यं मन्यमान एवं पर्यपश्यद्दृष्टवान्मृत्युः कर्मक्षयोपायेन साध्यान्देवान्मेन इत्यर्थः । क्वासौ देवान्ददर्शेत्युच्यते— ऋचि साम्नि यजुषि । ऋग्यजुःसामसंबन्धिकर्मणीत्यर्थः । ते नु देवा वैदिकेन कर्मणा संस्कृताः शुद्धात्मानः सन्तो मृत्योश्चिकीर्षितं विदितवन्तः । विदित्वा च त ऊर्ध्वा व्यावृत्ताः कर्मभ्य ऋचः साम्नो यजुष ऋग्यजुःसामसंबद्धात्कर्मणोऽभ्युत्थायेत्यर्थः । तेन कर्मणा मृत्युभयापगमं प्रति निराशास्तदपास्यामृताभयगुणमक्षरं स्वरं स्वरशब्दितं प्राविशन्नेव प्रविष्टवन्तः । ओंकारोपासनपराः संवृत्ताः । एवशब्दोऽवधारणार्थः सन्समुच्चयप्रतिषेधार्थः । तदुपासनपराः संवृत्ता इत्यर्थः ॥ ३ ॥

सिद्धान्ती—माशांचा घात करणारा कोळी जसा फार खोल नसणाऱ्या पाण्यामध्यें, उथळ पाण्यामध्यें, बागडणारे मासे पाहतो—

शिष्य—पाहतो म्हणजे ?

सिद्धान्ती—बडिश म्हणजे गळ. त्यानें व स्रवणारे उदकाच्या उपायानें, अर्थात् गळाच्या साह्यानें व पाण्याच्या ओसरण्यानें हे मासे आपल्याला सहज धरितां येतील, असा त्याचा निश्चय होतो. त्याचप्रमाणें वेदत्रयीनें सांगितलेल्या कर्मांत लुडबुडणारे देव कर्मफलाच्या समाप्तीनंतर वासनांचे पाश आपण टाकिले असतां आपल्यास सहज धरितां येतील, असा मृत्यूचा सिद्धांत ठरला. कर्माचा क्षय व्हावयाचाच. तो झाल्याबरोबर हे देव आपल्यास सांपडणार, असें त्यानें आपल्या मनांत ठरविलें.

शिष्य—देव तर कर्माच्या मागें लपले होतेना ?

सिद्धान्ती—होय. पण बोलून चालून कर्मफलें अनित्य असतात. त्यांचा क्षय केव्हांतरी व्हावयाचाच. तेव्हां कर्मक्षय झाला कीं, आपल्या ताब्यांत हे कामवश देव आलेच पाहिजेत; असें त्याला वाटलें.

शिष्य—ऋग्वेदादि संबंधी कर्मसुद्धां अनित्यच असतें काय ?

**सिद्धान्ती**—कर्म म्हटलें कीं तें अनित्यच असावयाचें; तथापि वेदानें सांगितलेलीं कर्में हे देव यथाशास्त्र करित असत; त्यामुळें त्यांचे आत्मे कांहींसे शुद्ध झालेले होते. याप्रमाणें संस्कृत झालेल्या देवांना 'मृत्यूला अभीष्ट काय आहे? आपल्यास ( देवांस ) मारण्याची संधि केव्हां येईल, याची तो कशी वाट पाहत आहे' इत्यादि गोष्टी सहज कळल्या. ह्या आपल्यास कळत नाहींत, कारण आपण वेदोक्त किंवा तत्सदृश कर्में यथाशास्त्र करीत नाहीं. असो—

**शिष्य**—म्हणजे ज्ञानी देवांस अनित्यकर्म हें आपलें संरक्षण करूं शकणार नाहीं असें कळलें.

**सिद्धान्ती**—हें समजल्याबरोबर ऋग्वेदादि तिन्ही वेदांनीं विहित केलेल्या व तत्संबंधी कर्मांपासून ते परावृत्त झाले. अर्थात् अनित्य कर्मांचा त्यांनीं त्याग केला. भयकारी मृत्यूचा पराभव करण्याचा संभव कर्मानें सिद्ध होत नाहीं, कर्मसाह्यानें मृत्यु टाळतां येत नाहीं, असें देवांस कळलें आणि त्यांनीं सर्वथा कर्मत्याग केला. कर्मातीतत्व, अमृतत्व आणि अक्षयत्व हे गुण ज्या अक्षराचे आहेत, त्या स्वरात्मक अक्षराचा म्हणजे कर्मांच्या पलीकडे आणि वर असणाऱ्या ओंकाराचा आश्रय करून त्यांत देव संनिविष्ट झाले.

**शिष्य**—ओंकारांत संनिविष्ट झालें, म्हणजे ओंकाराची उपासना करण्याला त्यांनीं आरंभ केला. हें नीट आहे. त्यांनीं वैदिक सकाम कर्मांचा त्याग केला आणि मानसिक उपासनेचा स्वीकार केला असें झालें. परंतु मंत्रांत 'स्वरं एव,' अशीं पदें आहेत. त्यांपैकीं मला "एव" या पदाचा अभिप्राय कळत नाहीं.

**सिद्धान्ती**—एव शब्दानें उपासनेकडे मात्र लक्ष वेधलें. शिवाय कर्म आणि उपासना यांचा समुच्चय करण्याचें कोणाच्या मनांत येईल, असें जाणून 'एव' शब्दानें श्रुति या समुच्चयाचा निषेध करित आहे. तात्पर्य, ते ओंकारोपासनेमध्यें अभिरत झाले. वैदिक आणि अवैदिक सर्व सकामकर्म टाकून देऊन, विषयोपयोगी कर्मांचा संन्यास करून, त्यांनीं चित्तशोधक ओंकारोपासनेचा आश्रय केला ॥ ३ ॥

**कथं पुनः स्वरशब्दवाच्यत्वमक्षरस्येत्युच्यते—**

**पूर्व०**—परंतु ओंकार ह्या अक्षराला 'स्वर' हें नांव कसें प्राप्त झालें? स्वर हा शब्द ओंकाराचा वाचक कसा होतो? हें प्रथम सांगाल कीं नाहीं? ॐकारामध्यें उदात्त, अनुदात्त, स्वर, असा कांहीं प्रकार ऐकिवांत नाहीं.

**सिद्धान्ती**—ऐका—

## मंत्र चवथा.

**यदा वा ऋचमाप्नोत्योमित्येवातिस्वरत्येवं सामैवं यजुरेष उ स्वरो यदेतदक्षरमेतदमृतमभयं तत्प्रविश्य देवा अमृता अभया अभवन् ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थः—यदा वै ऋचं आप्नोति, ॐ इति एव अतिस्वरति** ( जेव्हां ऋचेचें कोणी अध्ययन करितो, तेव्हां ती ऋचा मोठ्या आदरानें ओंकाराचा उच्चार करून म्हणत असतो ) **एवं साम, एवं यजुः** ( साम आणि यजु यांचाही उच्चार याप्रमाणेंच ओंकारपूर्वक होतो ) **एषः उ स्वरः** ( तो हा ओंकार स्वरच आहे ) **यत् एतत् अक्षरं** ( ज्यापक्षीं ॐ अक्षर आहे ) **अमृतं, अभयं** ( त्यापक्षीं ॐ अमृत आहे आणि अभय आहे ) **तत् प्रविश्य देवाः अमृताः अभयाः अभवन्** ( त्यामध्यें प्रवेश करून देव अमृत आणि अभय झाले ) ॥ ४ ॥

यदा वा ऋचमाप्नोत्योमित्येवातिस्वरत्येवं सामैवं यजुः । एष उ स्वरः । कोऽसौ, यदेतदक्षरमेतदमृतमभयं तत्प्रविश्य यथागुणमेवामृता अभयाश्चाभवन्देवाः ॥ ४ ॥

**सिद्धान्ती**—मंत्र ऋग्वेदांतलि असो, सामवेदांतील किंवा यजुर्वेदांतलि असो, जेव्हां कोणताही वैदिक अध्ययनानें हे मंत्र आपलेसे करून घेतो, तेव्हां त्या मंत्राचा उच्चार तो तो वैदिक ओंकारपूर्वक 'अतिस्वरति' म्हणजे मोठ्या आदरबुद्धीनें करीत असतो. ओंकारपूर्वक उच्चार केला, तरच वेदत्रयींतील मंत्र वेदपाठकाला सम्यग् रीतीनें अवगत होतात. म्हणून ओंकार हाही स्वररूपी आहे. हा अमृत आणि अभय ब्रह्माचें प्रतीक आहे, म्हणून तोही अमृत आणि अभय आहे. अर्थात् देवांनीं ओंकारांत प्रवेश केल्यानंतर अथवा ओंकाराची शास्त्रोक्त एकनिष्ठ उपासना केल्यानंतर देवही अमृत आणि अभय झाले. ब्रह्मबुद्धीनें ओंकाराचें ध्यान करणाऱ्या देवांस मृत्यूची भीति नाहींशी झाली, हें तात्पर्य आहे ॥ ४ ॥

मंत्र पांचवा.

**स य एतदेवं विद्वानक्षरं प्रणौत्येतदेवाक्षरꣳ स्वरममृतमभयं प्रविशति तत्प्रविश्य यदमृता देवास्तदमृतो भवति ॥ ५ ॥**

**इति प्रथमध्यायस्य चतुर्थः खण्डः ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थः—यः एवं विद्वान् एतत् अक्षरं प्रणौति, सः एतत् एव अक्षरं, अमृतं अभयं स्वरं, प्रविशति** ( जो हें सर्व जाणणारा विद्वान् या अक्षराची उपासनापूर्वक स्तुति करितो, तो ह्या अक्षरामध्यें म्हणजे अमृत आणि अभय देणाऱ्या स्वरामध्यें प्रवेश करितो ) **तत् प्रविश्य यत् देवाः अमृताः तत् अमृतः भवति** ( आणि ओंकारांत प्रवेश केल्यानंतर ज्या कारणासाठीं देव अमृत झाले, त्याच कारणामुळें हा विद्वान्‌ही अमृत होतो ॥ ५ ॥

स योऽन्योऽपि देववदेवैतदक्षरमेवममृतमभयगुणं विद्वान्प्रणौति स्तौति। उपासनमेवात्र स्तुतिरभिप्रेता। स तथैवैतदेवाक्षरं स्वरममृतमभयं प्रविशति। तत्प्रविश्य च राजकुलं प्रविष्टानामिव राज्ञोऽन्तरङ्गबहिरङ्गतावन्न परस्य ब्रह्मणोऽन्तरङ्गबहिरङ्गताविशेषः। किं तर्हि यदमृता देवा येनामृतत्वेन यदमृता अभूवंस्तेनैवामृतत्वेन विशिष्टस्तदमृतो भवति न न्यूनता नाप्यधिकताऽमृतत्व इत्यर्थः ॥४॥

इति प्रथमाध्यायस्य चतुर्थः खण्डः ॥ ४ ॥

शिष्य--मंत्रांत 'नुति' म्हणजे स्तुति हा शब्द आहे.

सिद्धान्ती—स्तुतीचा अर्थच येथें उपासना हा आहे. असो; ह्या ज्ञानी उपासकानें देवांप्रमाणें अक्षरोपासना केली असतां त्याला त्यांत प्रवेश करितां येतो.

पूर्व०---प्रवेश झाला तरी अमरत्व आणि अभयत्व हीं उपासकाला कशीं प्राप्त व्हावयाचीं ? अहो ! कोणीही राजगृहामध्यें प्रवेश केला असतां राजाच्या अंतःपुरामध्यें त्याचा प्रवेश होतोच, असें नाहीं. तेथें ही 'आंत-बाहेर' ( अंतरंगांतील माणसें, बाहेरचीं माणसें ) असा पक्षपात असतो. तेव्हां ओंकारामध्यें प्रवेश केला, ओंकाराची उपासना केली, तरी निर्भय अमृतत्व कसें मिळणार ?

सिद्धान्ती–तुम्ही म्हणतां तसा राजगृहांत प्रपंच असतो, हें खरें. परंतु परब्रह्माच्या राज्यांत अंतरंग–बहिरंग असा भेदच नाहीं तेथें सर्वत्र एकरसता आहे. प्रवेश झाला कीं तो अंतर्यामांतच व्हावयाचा. तेव्हां प्रवेश करितांक्षणींच देवांस जें अमृतत्व आणि अभयत्व मिळालें, तेंच अमृतत्व आणि अभयत्व कोणाही ज्ञानी उपासकास मिळतें. येथें म्हणजे अमृतत्वामध्यें एकीकडे कमीपणा व दुसरीकडे जास्तपणा असा भेदप्रकार असणें शक्य नाहीं. सर्वत्र एकरसत्व असतें. म्हणून ज्ञानी उपासकानें ब्रह्मप्रतीक असणाऱ्या ओंकाराची शास्त्रोक्त उपासना केली, तर तो अमृत होतो; यांत शंका नाहीं ॥ ५ ॥

पहिल्या अध्यायाचा चवथा खंड संपला.

---

## खंड पांचवा.

प्राणादित्यदृष्टिविशिष्टस्योद्गीथस्योपासनमुक्तमेवानूद्य प्रणवोद्गीथयोरेकत्वं कृत्वा तस्मिन्प्राणरश्मिभेदगुणविशिष्टदृष्ट्याऽक्षरस्योपासनमनेकपुत्रफलमिदानीं वक्तव्यमित्यारभ्यते––

सिद्धान्ती—प्राणदृष्टीनें आणि आदित्यदृष्टीनें विशिष्ट असणाऱ्या उद्गीथाची उपासना सांगितली, तिचा अनुवाद करून स्वरूपतः ती एकाप्रकारें कमी योग्यतेची आहे, असें श्रुति सांगेल. नंतर प्रणव आणि उद्गीथ या उभयतांचें स्वरूप एकच आहे, असें सांगणार आहे; आणि नंतर त्या एकत्वामध्येंच प्राण आणि रश्मि ( सूर्यकिरण ) यांच्यांमध्यें जें अनेकत्व आहे, तोच विशेष गुण आहे; अशा दृष्टीनें अक्षराची उपासना श्रुति सांगणार आहे. या उपासनेचें फल अनेकपुत्रप्राप्ति हें आहे. हें सांगण्यासाठीं श्रुतीनें या खंडाला आरंभ केला आहे, ऐका––

---

### मंत्र पहिला.

**अथ खलु य उद्गीथः स प्रणवो यः प्रणवः स उद्गीथ इत्यसौ वा आदित्य उद्गीथ एष प्रणव ओमिति ह्येष स्वरन्नेति ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—अथ खलु यः उद्गीथः, सः प्रणवः; यः प्रणव सः उद्गीथः इति** ( खरोखर पाहतां जो उद्गीथ तोच ऋग्वेद्यांचा प्रणव आणि जो प्रणव तोच सामवेद्यांचा उद्गीथ होय ) **एषः उद्गीथः प्रणवः असौ आदित्यः वै** ( हा उद्गीथ अथवा प्रणव म्हणजेच तो आदित्य होय ) **हि एषः ॐ इति स्वरन् एति** ( कारण ॐ असा उच्चार करीतच हा आदित्य मार्गक्रमण करितो ) ॥ १ ॥

अथ खलु य उद्गीथः स प्रणवो बह्वृचानां यश्च प्रणवस्तेषां स एव च्छान्दोग्य उद्गीथशब्दवाच्यः। असौ वा आदित्य उद्गीथ एष प्रणवः। प्रणवशब्दवाच्योऽपि स एव बह्वृचानां नान्यः। उद्गीथ आदित्यः। कथम्। उद्गीथाख्यमक्षरमोमित्येतदेष हि यस्मात्स्वरन्नुच्चारयन्ननेकार्थत्वाद्धातूनाम्। अथवा स्वरन्गच्छन्नेति। अतोऽसावुद्गीथः सविता ॥ १ ॥

सिद्धान्ती—खरोखर पाहिलें असतां उद्गीथ हा बह्वृचांचा ( ऋग्वेद्यांचा ) प्रणव आहे. आणि ऋग्वेद्यांचा जो प्रणव तोच छांदोग्यामधील उद्गीथ शब्द आहे, त्या प्रणवाचा वाच्य आहे. तात्पर्य, दोन्ही वेदांत विद्यमान असणारे उद्गीथ आणि प्रणव हे शब्द अपरपर्याय आहेत ( समान-अर्थक आहेत ). श्रुतीनें मागें सांगितलें कीं, आदित्यदृष्टीनें उद्गीथाची उपासना करावी. उद्गीथ हा प्रणव आहे; म्हणजे प्रणवशब्दानें वाच्य आहे. प्रणव हा ऋग्वेदी शब्द. तेव्हां ऋग्वेद्यांचा प्रणव म्हणजेच उद्गीथ अथवा आदित्याचें प्रतीक होय. तात्पर्य, प्रणव म्हणजे उद्गीथ. हाच आदित्य होय.

शिष्य—हें कसें ?

सिद्धान्ती—उद्गीथ नांवाचें अक्षर जो 'ओं इति' शब्द तो उच्चारीत, ॐ असा उच्चार करीत, हा सूर्य मार्गक्रमण करितो. स्वर याचा अर्थ उच्चार करणें असाही होतो.

पूर्वपक्षी—तो कसा ?

सिद्धान्ती—धातूला अनेक अर्थ असतात, असा शास्त्रवेत्त्यांचा सिद्धांत आहे. किंवा 'स्वरन्' याचा अर्थ 'गच्छन् ( जाणारा, जात असणारा )' असा घेतला तरी प्रत्यवाय नाहीं. नित्य मार्गक्रमण करणारा सविता प्राण्यांचें व्यापार ठीक चालावे, एतदर्थ ॐ अशी अनुज्ञा ( परवानगी ) देत आपलें मार्गक्रमण करितो. म्हणून हा उद्गीथच सविता म्हणजे सूर्य आहे. सूर्याला ओंकारत्व प्राप्त होतें, तें या प्रकारानें होय ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**एतमु एवाहमभ्यगासिषं तस्मान्मम त्वमेकोऽसीति ह कौषीतकिः पुत्रमुवाच रश्मींस्त्वं पर्यावर्तयाद्बहवो वै ते भविष्यन्तीत्यधिदैवतम् ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः—'एतं उ एव अहं अभ्यगासिषं'** ( याचेंच खरोखर मी स्तोत्ररूपी गायन आजपर्यंत गायिलें आहे ) **'तस्मात् मम त्वं एकः असि' इति ह कौषीतकिः पुत्रं उवाच** ( 'म्हणून तूं माझा एकच मुलगा आहेस' असें कौषीतकि आपल्या मुलाला म्हणाला ) **त्वं रश्मीन् पर्यावर्तयात्** ( म्हणून—तूं अनंतरश्मींचें आवृत्तीसह ध्यान कर ) **बहवः ते भविष्यन्ति वै** ( म्हणजे तुला पुष्कळ मुलगे होतील ) **इति अधिदैवतं** ( याप्रमाणें अधिदैवताचें व्याख्यान झालें ) ॥ २ ॥

तमेतमु एवाहमभ्यगासिषमाभिमुख्येन गीतवानस्म्यादित्यरश्म्यभेदं कृत्वा ध्यानं कृतवानस्मीत्यर्थः । तेन तस्मात्कारणान्मम त्वमेकोऽसि पुत्र इति ह कौषीतकिः कुषीतकस्यापत्यं कौषीतकिः पुत्रमुवाचोक्तवान् । अतो रश्मीनादित्यं च भेदेन त्वं पर्यावर्तयात्पर्यावर्तयेत्यर्थः । त्वंयोगात् । एवं बहवो वै ते तव पुत्रा भविष्यन्तीत्यधिदैवतम् ॥ २ ॥

**सिद्धान्ती**—"आदित्याचे अनंत रश्मी (किरण) आहेत. पण ते सर्व अभिन्न आहेत, एकस्वरूप आहेत,' असें समजून मी त्या ह्या आदित्याचें मुख्यतः स्तुतिपूर्वक गायन केलें. आदित्य हा एकस्वरूपी उद्गीथाची प्रतिमा आहे, असें समजून मीं उपासना त्या दृष्टीनें केली. ह्यामुळें परिणाम असा झाला कीं, मला तूं एकटाच मुलगा झालास !" याप्रमाणें कुषीतकाचा मुलगा कौषीतकि आपल्या पुत्राला म्हणाला. नंतर त्यानें पुत्राला असा उपदेश केला कीं, सूर्यकिरण अनंत आहेत, परस्परभिन्न आहेत, आदित्य एकस्वरूपी नाहीं; तेव्हां आदित्याचें किंवा रश्मीचे दृष्टीनें उद्गीथाचें तूं आवृत्तिपूर्वक ध्यान करशील, तेव्हां ते किरण भिन्न भिन्न स्वरूपाचे आहेत. असें जाणून उद्गीथध्यान कर; असें केलेंस तर तुला अनेक पुत्रांची प्राप्ति होईल.'

**शिष्य**—पण मंत्रांत तर 'पर्यावर्तयात्' असा तृतीयपुरुषी विनियोग आहे आणि आपण तर द्वितीय पुरुषी म्हणजे मध्यम पुरुषी अर्थ केला. हें काय ? त्वं असें मूळ मंत्रांत पद आहे म्हणून कीं काय ?

सिद्धान्ती—होय. सूर्य अनेकरूपी व त्याचे किरणही अनंतरूपी आहेत, असें समजून त्या दृष्टीनें उद्गीथाचें (प्रणवाचें) ध्यान करण्याचा उपदेश संततिवृद्धीसाठीं कौषीतकीनें आपल्या पुत्रास केला. असो; याप्रमाणें अधिदैवत-मूलक उपासनेचा प्रकार झाला. अध्यात्म-उपासनेचा प्रकार पुढच्या मंत्रांत सांगतील. ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**अथाध्यात्मं; य एवायं मुख्यः प्राणस्तमुद्गीथमुपासीतोमिति ह्येष स्वरन्नेति ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थः—अथ अध्यात्मं** (आतां अध्यात्माचें स्वरूप सांगावयाचें) **यः एव अयं मुख्यः प्राणः तं उद्गीथं उपासीत** (जो हा मुख्य प्राण आहे, त्याच्या दृष्टीनें उद्गीथाची म्हणजे ओंकाराची उपासना करावी) **हि एषः ॐ इति स्वरन् एति** (कारण, ओं असा उच्चार करीत किंवा जीं काय कार्यें होतात त्यांस अनुमोदन देत मुख्य प्राण चालतो, इतर इंद्रियांस प्रवृत्त करितो) ॥ ३ ॥

अथानन्तरमध्यात्ममुच्यते। य एवायं मुख्यः प्राणस्तमुद्गीथमुपासीतेत्यादि पूर्ववत्। तथोमिति ह्येष प्राणोऽपि स्वरन्नेत्योमिति ह्यनुज्ञां कुर्वन्निव वागादिप्रवृत्त्यर्थमेतीत्यर्थः। न हि मरणकाले मुमूर्षोः समीपस्थाः प्राणस्योंकरणं शृण्वन्तीति। एतत्सामान्यादादित्येऽप्योंकरणमनुज्ञामात्रं द्रष्टव्यम् ॥ ३ ॥

**सिद्धान्ती**-यानंतर अध्यात्मरूपी उद्गीथाची उपासना सांगतात. जो हा आपला मुख्य प्राण आहे, त्याची दृष्टि ठेवून उद्गीथाची म्हणजे ओंकाराची उपासना करावी, इत्यादि अर्थ पूर्वीच्या मंत्रांत सांगितल्याप्रमाणेंच आहे. त्याचप्रमाणें, (सूर्याप्रमाणें) हा प्राण सुद्धां ओंकाराचा उच्चार करीत किंवा वाणि आदि इंद्रियांची प्रवृत्ति स्व-कार्याकडे व्हावी एतदर्थ त्यांस अनुमोदन देत, प्रकट होतो. कारण आपल्यास असेंही दिसतें कीं, मरणसमय प्राप्त झाला असतां समीपवर्ती लोकांस मुख्य प्राणकृत ओंकाराचा उच्चार त्यावेळीं ऐकावयास येत नाहीं. कारण उघडच आहे कीं, मुमूर्षूच्या सर्व इंद्रियप्रवृत्ति निःस्तब्ध झालेल्या असतात, म्हणून त्यांना प्राणाच्या अनुमोदनाची आवश्यकता नसते. इंद्रियें जिवंत असलीं, कार्य करित असलीं,

म्हणजे प्राण अनुज्ञा देतो; आणि प्राणानें अनुज्ञा दिली नाहीं, असें दिसलें म्हणजे इंद्रियें स्तब्ध झालीं, मेलीं, असें समजावें. म्हणून ओंकाराचें (किंवा अनुज्ञेचें) स्थान प्राणामध्येंच आहे, हें स्पष्ट होतें. असो; अनुज्ञा देणें हें काम प्राणाकडून होतें, तसेंच आदित्याकरवीं होतें. कारण प्राण आणि आदित्य यांच्यांमध्यें उद्गीथत्व हें सामान्य आहे. उभयतांमध्येंही तें दृग्गोचर होतें. म्हणून आदित्यामधील ओंकारोच्चार हाही अनुज्ञामात्रच आहे, असें ठरतें ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा.

**एतमु एवाहमभ्यगासिषं तस्मान्मम त्वमेकोऽसीति ह कौषीतकिः पुत्रमुवाच; प्राणाꣳस्त्वं भूमानमभिगायताद्बहवो वै मे भविष्यन्तीति ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थः—'एतं उ एव अहं अभ्यगासिषं' 'तस्मात् मम त्वं एकः असि' इति कौषीतकिः पुत्रं उवाच** (या मंत्रभागाचा अर्थ याच खंडांतील दुसऱ्या मंत्राच्या भागाप्रमाणें आहे) **'त्वं प्राणान् भूमानं अभिगायतात्'** (म्हणून तूं प्राण अनेक आहेत, असें समजून त्यांच्या दृष्टीनें ओंकाराचें स्तुतिपूर्वक ध्यानावर्तन कर) **बहवः मे भविष्यन्ति वै इति** (मला पुष्कळ पुत्र होतील—असें समजून, अशी वासना ठेवून, तूं अनेक प्राणांच्या दृष्टीनें ॐकारध्यान कर; असा कौषीतकीचा स्वपुत्राला उपदेश होता) ॥ ४ ॥

एतमु एवाहमभ्यगासिषमित्यादि पूर्ववदेव । अतो वागादीन्मुख्यं च प्राणं भेदगुणविशिष्टमुद्गीथं पश्यन्भूमानं मनसाऽभिगायतात् । पूर्ववदावर्तयेत्यर्थः । बहवो वै मे मम पुत्रा भविष्यन्तीत्येवमभिप्रायः सन्नित्यर्थः । प्राणादित्यैकत्वोद्गीथदृष्टेरेकपुत्रत्वफलदोषेणापोदितत्वाद्रश्मिप्राणभेददृष्टेः कर्तव्यता चोद्यतेऽस्मिन्काण्डे बहुपुत्रफलत्वार्थम् ॥ ४ ॥

**सिद्धान्ती**—मंत्रांतील पहिल्या भागाचा अर्थ व स्पष्टीकरण याच खंडांतील दुसऱ्या मंत्राप्रमाणें आहे. असो; कौषीतकि म्हणतो:—'वाणि आदि व मुख्य प्राण हीं प्रत्येकीं भिन्नस्वरूपाचीं आहेत, अशी दृष्टि ठेवून भेदविशिष्ट (अनेकरसी स्वरूपाच्या) उद्गीथाची, मनःपूर्वक ध्यानासह आवृत्ति कर. 'आपल्याला

पुष्कळ पुत्र असावेत ' असा तुझा हेतु असेल, तर प्राण जसा अनेक भेदांनीं संघटित आहे, तसाच उद्गीथही आहे; असें समजून तूं उद्गीथाची प्राणदृष्टीनें उपासना कर. ही केलीस तर तुला बहुपुत्रप्राप्ति होईल. सारांश, आदित्य व प्राण हे प्रत्येकी एकरस आहेत, अशी दृष्टि ठेवून मीं एकरस उद्गीथाची उपासना केली, म्हणून मला एक पुत्राची प्राप्ति झाली. तुझ्या मनांतून हा दोष नसावा असें असेल, तर सूर्य-रश्मी अनेक आहेत, प्राण भिन्नभिन्न आहेत, अशी दृष्टि ठेवून तूं उद्गीथाची उपासना कर ' असा कौषीतकीचा उपदेश आहे. अर्थात् येथें रश्मी-भेद-ऋषि-दृष्ट आहे व प्राणभेद-ऋषि-दृष्ट आहे. असें सांगून उद्गीथाची उपासना ह्या दृष्टीनें करावी, अशी आज्ञा श्रुतीनें केली आहे. फळ बहुपुत्रप्राप्ति हें आहे.

शिष्य—मंत्रांतील भूमानं याचा अर्थ ' बहुत्व स्वीकारून ' ' बहुत्वगुण-विशिष्ट ' असा करावयाचा आहे ॥ ४ ॥

---

## मंत्र पांचवा.

**अथ खलु य उद्गीथः स प्रणवो यः प्रणवः स उद्गीथ इति होतृषदनाद्धैवापि दुरुद्गीतमनुसमाहरतीत्यनुसमाहरतीति ॥ ५ ॥**

**इति प्रथमध्यायस्य पञ्चमः खण्डः ॥ ५ ॥**

**अन्वय व अर्थः—अथ खलु यः उद्गीथः सः प्रणवः; यः प्रणवः सः उद्गीथः इति** ( याचा अन्वयार्थ पहिल्या मंत्रांत झाला आहे ) **होतृ-षदनात् ह एव अपि दुरुद्गीतं अनुसमाहरति इति** ( हौत्र-स्थानापासून शास्त्रोक्त कर्म होत असतांही जें कांहीं उद्गात्यानें चुकून दुष्ट उद्गान केलें, त्याचें अनुसंधान, संस्करण, वरील ज्ञानानें होतें ) ॥ ५ ॥

अथ खलु य उद्गीथ इत्यादिप्रणवोद्गीथैकत्वदर्शनमुक्तं तस्यैतत्फलमुच्यते—होतृषदनाद्धोता यत्रस्थः शंसति तत्स्थानं होतृषदनं हौत्रात्कर्मणः सम्यक्प्रयुक्तादित्यर्थः। न हि देशमात्रात्फलमाहर्तुं शक्यम्। किं तद्धैवापि दुरुद्गीतं दुष्टमुद्गीतमुद्गानं कृतमुद्गात्रा स्वकर्मणि क्षतं कृतमित्यर्थः। तदनुसमाहरत्यनुसंधत्त इत्यर्थः। चिकित्सयेव धातुवैषम्यसमीकरणमिति ॥ ५ ॥

इति प्रथमाध्यायस्य पञ्चमः खण्डः ॥ ५ ॥

**सिद्धान्ती**—यानंतर 'पहिल्या मंत्रांत उद्गीथ आणि प्रणव यांचें एकत्व आहे' असें जें सांगितलें, तें समजलें असतां काय प्रफलप्राप्ति होते, ती या मंत्रांत सांगतात. ऐका–' होतृषदन ' म्हणजे होत्याचें सदन किंवा स्थान; होता जेथें बसतो तें स्थान म्हणजे होतृषदन. तेथून–

**शिष्य**—याचा काय संबंध ?

**सिद्धान्ती**—होता आपल्या स्थानावर बसून जें काय कर्म करावयाचें आहे, तें शास्त्रोक्त विधीनें करीत असतो. या विध्युक्त कर्माचें फल असें होतें कीं,–

**पूर्वपक्षी**—अहो ! मंत्रांत स्थानाचा निर्देश आहे, कर्माचा नाहीं ?

**सिद्धान्ती**—पण स्थानापासून मात्र कधीं फल मिळतें काय ? फल मिळतें तें कर्मापासून. स्थानावर बसून आपण कर्म करितों. म्हणून स्थानशब्दावर लक्षणा करून त्याचा कर्म हा अर्थ केला. असो; उद्गात्यानें आपल्या कर्मामध्यें जर कांहीं चुकी केली असेल, अशास्त्रोक्त सामें गायिलीं असतील, किंवा अशास्त्रोक्त पद्धति स्वीकारिली असेल, तर त्याच्या ह्या दूषित कर्मानें जो कांहीं कमीपणा होतो, तो होत्याच्या सम्यक् कर्मानें नाहींसा होतो. याप्रमाणें सर्व कर्म शुद्ध होतें. होत्यानें प्रणवाचा उच्चार करून जें सम्यक् कर्म केलें असतें, त्याच्याच योगानें मात्र उद्गात्याचें दुष्ट कर्म शुद्ध होतें; संस्कृत होतें; कारण प्रणव आणि उद्गीथ हीं दोन्हीं एकस्वरूपी आहेत, असें विज्ञान उद्गात्याला चिकित्सापूर्वक झालें असलें म्हणजे त्या ज्ञानाच्या माहात्म्यानें स्वकर्मांत झालेले प्रमाद होत्याच्या योग्य प्रणवसाह्यानें नाहींसे होतात; हें त्याला विदित असतें. उद्गात्याच्या प्रमादाला हेंच प्रायश्चित्त आहे. योग्य चिकित्सा म्हणजे औषधोपचार झाला, म्हणजे विषम धातूंचें समीकरण होतें. शैत्याचा अतिरेक उष्ण योजनेनें नाहींसा होतो ! ॥ ५ ॥

पहिला अध्याय पंचम खंड समाप्त.

## खंड सहावा.

अथेदानीं सर्वफलसंपत्त्यर्थमुद्गीथस्योपासनान्तरं विधित्स्यते—

**सिद्धान्ती**—यानंतर आतां ज्योतिष्टोमजन्य ऐश्वर्यादि सर्व फलाची प्राप्ति व्हावी, एतदर्थ उद्गीथाची उपासना दुसऱ्या रीतीनें विहित करावयाची आहे—

## मंत्र पहिला.

**इयमेवर्गग्निः साम तदेतदेतस्यामृच्यध्यूढं साम तस्मादृच्यध्यूढं साम गीयत इयमेव साऽग्निरमस्तत्साम ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—इयं एव ऋक्, अग्निः साम** ( ही पृथिवी ऋचा आहे आणि अग्नि हा साम आहे ) **तत् एतत् साम एतस्याम् ऋचि अध्यूढं** ( तें हें अग्नि–नांवाचें साम ह्या पृथ्वीरूपी ऋचेमध्यें अध्यूढ–आश्रित झालेलें आहे ) **तस्मात् ऋचि अध्यूढं साम गीयते** ( म्हणून ऋचेमध्यें अध्यूढ झालेलें साम आम्ही गातों ) **इयं एव सा** ( ही पृथ्वी 'सा' आहे ) **अग्निः अमः** ( अग्नि हा 'अम' आहे ) **तत् साम** ( असा तो 'साम'–सा+अम–शब्द पृथ्वीरूप आणि अग्निरूप आहे) सारांश, ऋचारूपी पृथ्वीमध्यें सामरूपी अग्नि अधिष्ठित होतो; म्हणून ऋचेमध्येंच साम प्राप्त होतो, अशी श्रुतीची कल्पना आहे. सामामध्यें 'सा' व 'अम' असे दोन शब्द आहेत. 'सा' हा पृथ्वीवाचक आणि 'अम' हा अग्निवाचक शब्द आहे. म्हणून साम हा शब्द पृथ्वी आणि अग्नि यांचा वाचक होतो, पृथिव्यग्निद्वयाचा 'साम' वाचक आहे ॥ १ ॥

इयमेव पृथिव्यृक् । ऋचि पृथिवीदृष्टिः कार्या । तथाऽग्निः साम । साम्न्यग्निदृष्टिः । कथं पृथिव्यग्न्योर्ऋक्सामत्वमिति । उच्यते । तदेतत्तदेतदग्न्याख्यं सामैतस्यां पृथिव्यामृच्यध्यूढमधिगतमुपरिभावेन स्थितमित्यर्थः । ऋचीव साम । तस्मादत एव कारणादृच्यध्यूढमेव साम गीयत इदानीमपि सामगैः । यथा च ऋक्सामनी नात्यन्तं भिन्ने अन्योन्यं तथैतौ पृथिव्यग्नी । कथम्, इयमेव पृथिवी सा सामनामार्धशब्दवाच्या; इतरार्ध शब्दवाच्योऽग्निरमस्तदेतत्पृथिव्यग्निद्वयं सामैकशब्दाभिधेयत्वमापन्नं साम । तस्मान्नान्योन्यं भिन्नं पृथिव्यग्निद्वयं नित्यसंश्लिष्टमृक्सामनी इव । तस्माच्च पृथिव्यग्न्योर्ऋक्सामत्वमित्यर्थः । सामाक्षरयोः पृथिव्यग्निदृष्टिविधानार्थमियमेव साऽग्निरम इति केचित् ॥ १ ॥

सिद्धान्ती—ही पृथ्वी ऋचेच्या रूपानें असते.

शिष्य—म्हणजे ऋचेवर पृथ्वीदृष्टि करावी, असा श्रुतीचा उपदेश आहे. तसाच अग्नि हा साम आहे, असें समजून सामावर अग्निदृष्टि ठेवावी, असें श्रुतीला सांगावयाचें आहे. तात्पर्य, उपासकांनीं ऋचेकडे पृथ्वीदृष्टीनें आणि सामाकडे अग्निदृष्टीनें पहावें, हें श्रुतीस सांगावयाचें आहे. होय ना ?

सिद्धान्ती—होय. आपल्या कर्मांगाला संस्कृत करावयाचें आहे, म्हणून पृथ्वीकडे ऋक्दृष्टीनें न पाहतां ऋचेकडे पृथ्वीदृष्टीनें आणि सामाकडे अग्नि-दृष्टीनें पाहण्याला श्रुति सांगत आहे. ऋचा पृथ्वीरूपी आणि सामें अग्निरूपी देवता आहेत, अशी श्रेष्ठ भावना ठेवावयाची आहे.

पूर्व०—पण पृथ्वीला ऋचेचें व अग्नीला सामाचें स्वरूप कसें प्राप्त होतें, हें प्रथम सांगावयास पाहिजेना ?

सिद्धान्ती—ऐका; सामवेद हा सामान्यतः ऋग्वेदात्मक असतो, हें सुप्रसिद्ध आहे. म्हणून ऋग्वेद हें सामवेदाचें वसतिस्थान आहे. ऋचांमध्यें साम पहावयास मिळतें. आपल्याला सामें ऋचांमध्येंच सांपडतात. त्याप्रमाणें अग्नि पृथ्वीच्या आश्रयानें राहतो व पृथ्वीवर आपल्यास सांपडतो; म्हणून हें अग्नि नांवाचें साम ह्या पृथ्वी—नामक ऋचेमध्यें सांपडतें, ऋचेचा आश्रय घेऊन राहतें, असें समजून घेतलें पाहिजे. ज्या पक्षीं ऋचेच्या आश्रयानें सामें राहतात, त्यापेक्षां अग्नि-नांवाचें साम पृथ्वीनामक ऋचेच्या आश्रयानेंच असलें पाहिजे. म्हणून पृथ्वी देवता ऋग्रूपी होते आणि अग्निदेवता साम रूप होते.

शिष्य—अग्नि पृथ्वीच्या आश्रयानें राहतो, हें आपण पाहतों. सामें ऋग्वेदाच्या आश्रयानें असतात, हें वेदज्ञ पुरुष आपल्यास सांगतात. तेव्हां, या आश्रय-आश्रयी भावानें ऋचेवर पृथ्वीदृष्टि आणि सामावर अग्निदृष्टि ठेवावी आणि याप्रमाणें आपलें कर्म देवतारूप करावें, असा श्रुतीचा उपदेश आहे. असेंच ना ?

सिद्धान्ती—होय. आणि याच कारणासाठीं अद्यापि सुद्धां सामवेत्ते उद्गाते ऋचेच्या आश्रयानें राहणारीं सामें आहेत, असें जाणून सामांचें गायन करितात. शिवाय, ऋचा आणि सामें या परस्परांमध्यें अत्यंत भेद नाहीं, तसाच ऋचेची देवता पृथिवी आणि सामदेवता अग्नि यांच्यांमध्येंही परस्पर अत्यन्त भेद नसला पाहिजे, म्हणजे तीं द्रव्यें भिन्न भिन्न स्थानीं राहणारीं नसलीं पाहिजेत.

पूर्व०—हें कसें सिद्ध होणार ?

सिद्धान्ती—यज्ञयागादि कर्मांत अवश्य असणाऱ्या ऋचा आणि सामें यांचे कर्मांगप्रयोग ( विनियोग ) एककालींच होत असतात ना ? ऋग्वेदमंत्रांनीं

देवतांस बोलवावें आणि सामवेदीय मंत्रांनीं देवतांप्रीत्यर्थ गायन करावें, असाच व्यवहार याज्ञिक कर्मांमध्यें आपल्यास दिसतो. ऋचा आणि सामें यांचा परस्पर अत्यंत विरह केव्हांही होत नाहीं. तसाच पृथ्वी आणि अग्नि यांच्यांमध्यें होत नसला पाहिजे. शिवाय, पृथ्वी आणि अग्नि या दोन देवतांचा उल्लेख आपण एककालींच करितों.

पूर्व०—तो कसा बरें ?

सिद्धान्ती—ऐका: साम या शब्दांत 'सा' आणि 'अम' असे दोन शब्द आहेत. पृथ्वी स्त्रीलिंगी आहे म्हणून तिचा अवतार 'सा' हा शब्द करितो. आणि 'अम' हा दुसरा अर्ध, हा पुल्लिंगी शब्द, अग्नीचा वाचक आहे. याप्रमाणें साम एकच शब्द लिंगसामर्थ्यानें पृथ्वी आणि अग्नि यांचा एककालींच वाचक होतो, असें झालें. म्हणून पृथ्वी आणि अग्नि या देवता परस्परतः व्यभिचरत नाहींत, इतकेंच नव्हे तर नित्य संश्लिष्ट आहेत, एकास्थानीं राहणाऱ्या आहेत, असें ठरतें. यज्ञामध्यें ऋक्सामें एकस्थानीं राहतात, त्याप्रमाणें साम शब्दांत पृथ्वी आणि अग्नि यांचें एकत्र वास्तव्य आहे. या उभयघटित द्वैताला ऋकूत्व आणि सामत्व यांनीं अत्यंत अभेदत्व प्राप्त होतें. कोणी असेंही म्हणतात, कीं साम या शब्दांत सा आणि अम हे दोन शब्द आहेत. या दोन शब्दांवर पृथ्वीची आणि अग्नीची दृष्टि ठेवावी, एतदर्थ या मंत्राची योजना आहे. तात्पर्य एकच आहे. पृथिवी आणि अग्नि मिळून होणारें द्वैतही अनुक्रमें ऋक्साम आहे, असें म्हटलें काय किंवा साम या समस्त शब्दांतील दोन्ही अवयवांवर अनुक्रमें पृथ्वीची आणि अग्नीची दृष्टि ठेविली काय? फलश्रुति एकच आहे. पहिले पांच मंत्र अंगोपासनेप्रीत्यर्थ आहेत ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा व तिसरा.

**अन्तरिक्षमेवर्ग्वायुः साम; तदेतदेतस्यामृच्यध्यूढꣳ साम; तस्मादृच्यध्यूढꣳ साम गीयतेऽन्तरिक्षमेव सा वायुरमस्तत्साम ॥ २ ॥**

**द्यौरेवर्गादित्यः साम; तदेतदेतस्यामृच्यध्यूढꣳ साम; तस्मादृच्यध्यूढꣳ साम गीयते द्यौरेव साऽऽदित्योऽमस्तत्साम ॥ ३ ॥**

अन्वय व अर्थः—अंतरिक्ष एव ऋक्, वायुः साम; तत् एतत् साम एतस्यां ऋचि अध्यूढं; तस्मात् ऋचि अध्यूढं साम गीयते;

**अंतरिक्षं एव सा, वायुः अमः, तत् साम** ( येथें पृथ्वीच्या ठिकाणीं अंतरिक्ष व वायूच्या ठिकाणीं साम हा फेरबदल करावा आणि या मंत्राचा अर्थ पहिल्या मंत्राप्रमाणेंच आहे, असें समजावें. याचप्रमाणें पुढें येणाऱ्या तिसऱ्या मंत्राचाही अर्थ आहे ) ॥ २ ॥

**अन्वय व अर्थ—द्यौः एव ऋक्, आदित्यः सामः तत् एतत् साम एतस्यां ऋचि अध्यूढं; तस्मात् ऋचि अध्यूढं साम गीयते; द्यौः एव सा, आदित्यः अमः; तत् साम** (अर्थ वर दिलाच आहे)॥३॥

अन्तरिक्षमेवग्वायुः सामेत्यादि पूर्ववत् ॥ २ ॥ ३ ॥

सिद्धान्ती—अंतरिक्ष–देवता हीच ऋचा आणि वायु–देवता हें साम, इत्यादि व द्युलोक ऋचा, आदित्य साम होत. दोन्ही मंत्रांचा अर्थ पहिल्या मंत्राप्रमाणें समजून घ्यावा ॥ २ ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा.

**नक्षत्राण्येवर्क्चन्द्रमाः साम; तदेतदेतस्यामृच्यध्यूढꣳ साम; तस्मादृच्यध्यूढꣳ साम गीयते; नक्षत्राण्येव सा चन्द्रमा अमस्तत्साम ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थः—नक्षत्राणि एव ऋक्, चंद्रमाः सामः तत् एतत् साम एतस्यां ऋचि अध्यूढं; तस्मात् ऋचि अध्यूढं साम गीयते; नक्षत्राणि एव सा चंद्रमाः अमः; तत् साम** ( अर्थ वर झालाच आहे. ऋचा नक्षत्रदृष्टीनें व साम चंद्रमादृष्टीनें समजून घ्यावयाचीं. हा इतकाच भेद समजून घ्यावयाचा आहे. अर्थ तोच आहे) ॥४॥

नक्षत्राणामधिपतिश्चन्द्रमा अतः स साम ॥ ४ ॥

सिद्धान्ती—चंद्रमा नक्षत्रांचा अधिपति आहे म्हणून त्याला सामत्व प्राप्त होतें. याप्रमाणें पृथ्वी, अंतरिक्ष, द्युलोक आणि नक्षत्रें व अग्नि, वायु, आदित्य चंद्र, हीं द्वयें ( अंगद्वयें ) साम होतात ॥ ४ ॥

## मंत्र पांचवा.

**अथ यदेतदादित्यस्य शुक्लं भाः सैवर्गथ यन्नीलं परः कृष्णं तत्साम; तदेतदेतस्यामृच्यध्यूढꣳ साम तस्मादृच्यध्यूढꣳ साम गीयते ॥ ५ ॥**

**अन्वय व अर्थ—अथ यत् एतत् आदित्यस्य शुक्लं भाः, सा एव ऋक्** ( आतां यानंतर पुढें; आदित्याची जी ही शुभ्र प्रभा आहे, ती ऋक् होय ) **अथ यत् नीलं परः कृष्णं तत् साम** ( आणि आदित्याच्या अंतर्भागीं जो अत्यंत कृष्णभाग आहे, तें साम होय ) **तत् एतत् साम एतस्यां ऋचि अध्यूढं; तस्मात् ऋचि अध्यूढं साम गीयते** ( या मंत्रभागाचा अर्थ मागें आलाच आहे ) ॥ ५ ॥

अथ यदेतदादित्यस्य शुक्लं भाः शुक्ला दीप्तिः सैवर्क् । अथ यदादित्ये नीलं परः कृष्णं परोऽतिशयेन कार्ष्ण्यं तत्साम । तद्ध्येकान्तसमाहितदृष्टेर्दृश्यते ॥ ५ ॥

**सिद्धान्ती**—मागील मंत्रांत कांहीं अंगोपासनांचा अवतार केला आहे. ह्या मंत्रांत त्याचप्रकारची दुसरी एक उपासना सांगतात. ऐका—सूर्याची जी ही अत्यंत स्वच्छ आणि शुभ्र प्रभा अथवा तेज आहे, ती ऋक् आहे असें समजावें; म्हणजे ऋचेचे ठिकाणीं आदित्याच्या शुभ्र तेजाची दृष्टि ठेवावी. तसेंच आदित्यामध्यें जो अत्यंत नीलवर्णाचा, कृष्णवर्णाचा अतिशय दिसतो, ती नीलिमा साम आहे, असें समजावें. म्हणजे सामावर आदित्यस्थ नीलिमेची दृष्टि ठेवावी.

**पूर्व०**—अहो ! आदित्य अत्यंत तेजस्वी आहे, हें आम्हांस दिसतें. पण त्याच्या ठिकाणीं कृष्णवर्णाचा अतिशय आहे, हें आम्हांला तर कधीं दिसत नाहीं ! मग तुम्हालाच हा अनुभव कसा येतो, तें हरी जाणे !

**सिद्धान्ती**—असें काय करितां ! योग्याची अत्यंत एकाग्र दृष्टि शास्त्रसंस्कृत झाली, त्याला समाधिस्थिति प्राप्त झाली; म्हणजे त्याला सूर्यस्वरूपांत परमावधीची कृष्णता ( काळेपणा ) दृग्गोचर होते व त्याची कृष्णदृक् दृष्टि सामावर श्लिष्ट होते ॥ ५ ॥

## मंत्र सहावा.

**अथ यदेवैतदादित्यस्य शुक्लं भाः सैव साऽथ यन्नीलं परः कृष्णं तदमस्तत्सामाथ य एषोऽन्तरादित्ये हिरण्मयः पुरुषो दृश्यते हिरण्यश्मश्रुर्हिरण्यकेश आप्रणखात्सर्व एव सुवर्णः** ॥ ६ ॥

**अन्वय व अर्थः**—अथ यत् एव एतत् आदित्यस्य शुक्लं भाः **सा एव सा** ( याचप्रमाणें आदित्याचे ठिकाणीं जी ही शुक्लप्रभा असते तीच सामशब्दांतील ' सा ' होय ) **अथ यत् परः कृष्णं नीलं तत् अमः**(आणि आदित्यामध्यें जें परमावधीचें कृष्ण–तम–असतें तें साम शब्दांतील ' अम ' होय) **तत् साम** ( असा साम शब्द सिद्ध होतो) **अथ यः अंतरादित्ये एषः** हिरण्मयः पुरुषः दृश्यते **आप्रणखात् हिरण्यश्मश्रुः हिरण्यकेशः** ( आदित्याचा अंतर्यामी जो हा सुवर्णतुल्य तेजस्वी पुरुष दिसतो, आनखाग्र हिरण्यश्मश्रु आणि हिण्यकेश दिसतो ) **सर्वः एव सुवर्णः** [ तो सर्व सुवर्णतुल्य म्हणजे अत्यंत तेजस्वी आहे ] ॥ ६ ॥

ते एवैते भाः शुक्लकृष्णत्वे सा चामश्च साम । अथ य एषोऽन्तरादित्य आदित्यस्यान्तर्मध्ये हिरण्मयो हिरण्मय इव हिरण्मयः । न हि सुवर्णविकारत्वं देवस्य संभवति । ऋक्सामगेष्णत्वापहतपाप्मत्वासंभवात् । न हि सौवर्णेऽचेतने पाप्मादिप्राप्तिरस्ति येन प्रतिषिध्येत । चाक्षुषे चाग्रहणात् । अतो लुप्तोपम एव हिरण्मयशब्दो ज्योतिर्मय इत्यर्थः । उत्तरेष्वपि समाना योजना । पुरुषः पुरि शयनात्पूरयति वा स्वेनाऽऽत्मना जगदिति दृश्यते निवृत्तचक्षुर्भिः समाहितचेतोभिर्ब्रह्मचर्यादिसाधनापेक्षम् । तेजस्विनोऽपि श्मश्रुकेशादयः कृष्णाः स्युरित्यतो विशिनष्टि, हिरण्यश्मश्रुर्हिरण्यकेश इति । ज्योतिर्मयान्येवास्य श्मश्रूणि केशाश्चेत्यर्थः । आप्रणखात्प्रणखो नखाग्रं नखाग्रेण सह सर्वः सुवर्ण इव भारूप इत्यर्थः ॥ ६ ॥

**सिद्धान्ती**—मंत्रांत ‘ यदेवैतद् इत्यादि ’ जो मंत्रभाग आहे, त्याचा अर्थ मागील म्हणजे पांचव्या मंत्रांत झालाच आहे. त्याचें तात्पर्य सांगण्यासाठीं आचार्य श्रुतिमंत्रान्वयें म्हणतातः प्रभेचें शुक्लत्व हें ‘ साम ’ शब्दांतील ‘सा’ आणि परमावधीचें कृष्णत्व आहे, तें ‘ साम ’ शब्दांतील ‘ अम ’ आहे. याप्रमाणें हा ‘ साम ’ शब्द शुक्लकृष्णत्वानें सिद्ध होत आहे. आतां सूर्यबिंबाच्या अंतर्यामीं जो हिरण्मयासारखा हिरण्मय भाग आहे—

**पूर्व०**—‘ हिरण्मयासारखा ’ असें कोठून आणलेंत ? मंत्रांत ‘ हिरण्मय ’ शब्द आहे. तेथें ‘ इव ’ या शब्दाचा इवलासा सुद्धां गंध नाहीं. तेव्हां सूर्याच्या अंतर्यामीं सोन्याचा एखादा दागिना असेल, झालें !

**सिद्धान्ती**—उगीच शंका कां ? अहो ! येथें ‘ इव ’ शब्द नाहीं, हें आम्हांसही दिसतें आहे. पण आपल्याला युक्तिसिद्ध अर्थ करावयाचा आहे, नाहीं बरें ? आतां प्रथम तुम्हीच असें सांगा कीं, आदित्यासारख्या देवाचा अंतर्याम हिरण्मयाच्या विकारानें, सोन्याच्या विकारानें, कधीं तरी घटित होतो का ? तसेंच, ऋग्वेद आणि सामवेद हे कधीं सुवर्णाचे गेष्ण म्हणजे गायक किंवा घटकावयव होतात काय ? हेंही पहा. या खंडांतील आठव्या मंत्रांत ‘ ऋग्वेद व सामवेद हे गेष्ण आहेत ’ असें म्हटलें आहे. तेव्हां याच ८ व्या मंत्रांतील भावार्थ लक्षांत ठेवून आपल्यास अर्थ केला पाहिजे. शिवाय, सातव्या मंत्रांत हा आदित्याचा अंतर्यामी ‘ अपहतपाप्मा आहे ’ असें म्हटलें आहे. पण तुमच्या म्हणण्याप्रमाणें अर्थ घेतला, तर ‘ सुवर्ण पापशून्य झालें ’ असें म्हणण्याची पाळी येते. सुवर्ण बिचारें अचेतन. जड तें; त्याला पापपुण्य कसलें ? सुवर्णाला पापसंस्पर्शच नाहीं, पापकार्यच जर येथें नाहीं, तर ‘ तेथें पाप राहिलें नाहीं ’ असें सामान्य माणूस सुद्धां बोलणार नाहीं; मग श्रुति बोलेल, हा संभव तरी कुठला ? शेवटीं; अंतर्यामींचें वास्तव्य जीवाच्या नेत्रांत आहे असें पुढील सातव्या खंडांत म्हटलें आहे हेंही ध्यानांत ठेवा. जीवाच्या नेत्रांत सोनें आहे, असें कोणाला तरी भान असतें काय ? तात्पर्य, देवाचा अंतर्याम सुवर्णघटित असणें शक्य नाहीं, ऋक्साम सुवर्णाचें गायक किंवा घटकांश नसतात; सुवर्णांत पापलेश उत्पन्न होणें संभवनीय नाहीं व नेत्रांतही सुवर्ण असतें, असा प्रत्यय नाहीं. म्हणून सूर्याचा अंतर्यामीं सुवर्णविकार आहे, असें न समजतां लुप्तोपमा करून ‘ हिरण्य जसें तेजस्वी असतें, तसा हा तेजस्वी आहे ’ असा अर्थ करावा. तात्पर्य हें कीं, सूर्याचा अंतर्यामी ज्योतिर्मय, देदीप्यमान असतो. पुढेंही असाच शब्दप्रयोग येईल, तेथें असाच अर्थ करावा.

**शिष्य**—भगवन् ! हा तेजस्वी अंतर्यामी कोण ? मंत्रांत उल्लेखिलेला ‘ पुरुष ’ कीं काय ?

सिद्धान्ती—होय. पुरुषः याचें निर्वचन असें आहे:—'पुरि म्हणजे शरीरामध्यें जो 'शेते' म्हणजे निजतो किंवा असतो तो पुरुष होय. किंवा आपल्या स्वतःच्या आत्म्यानें जगताला जो पूर्णता देतो, तो पुरुष होय. असो; ब्रह्मचर्यादि साधनेंकरून जे कोणी समाधिस्थितीपर्यंत आले, ज्यांनीं आपले नेत्र विषयनिवृत्त करून अंतर्यामीं संलग्न केले, तात्पर्य, जे शांतिब्रह्माचा अनुभव घेऊं लागले, त्यांस मात्र हा आदित्याचा अंतर्यामी साक्षात्कृत होतो. सामान्य पुरुषांस तो साक्षात् दिसत नाहीं.

पूर्वपक्षी—हा अंतर्यामी तेजस्वी असेल. पण याच्या दाढीमिशा, डोक्यावरील केश हे तरी काळे असतील!

सिद्धान्ती—छे:! छे:!! नांव कशाला? अशी शंका कोणी काढील, म्हणून श्रुतीनें उल्लेखून सांगितलें आहे कीं, याचे केश, श्मश्रु इत्यादि सर्व हिरण्मय म्हणजे तेजस्वी असतें. तात्पर्य, मस्तकावरील केशापासून तों पायांच्या नखापर्यंत या पुरुषाचें शरीर तेजोघटित असतें. हा सर्वथा प्रकाशमय आहे ॥६॥

---

## मंत्र सातवा.

**तस्य यथा कप्यासं पुण्डरीकमेवमक्षिणी तस्योदिति नाम स एष सर्वेभ्यः पाप्मभ्य उदित उदेति ह वै सर्वेभ्यः पाप्मभ्यो य एवं वेद ॥ ७ ॥**

**अन्वय व अर्थः—यथा कप्यासं, तस्य पुण्डरीकं एव अक्षिणी** ( जसा कप्यास म्हणजे माकडाचें ढुंगण पांढरें असतें, त्याप्रमाणें त्यांचे नेत्र पुंडरीक म्हणजे पांढरे शुभ्र असतात ) **तस्य उत् इति नाम** [ त्याचें उत् हें नांव आहे ] **सः एषः सर्वेभ्यः पाप्मभ्यः उदितः** [ कारण तो सर्व पापांचें अतिक्रमण करून वर जातो ] **यः एवं वेद, सर्वेभ्यः पाप्मभ्यः उदेति ह वै** ( ज्याला हिरण्मय पुरुषाचें पूर्वोक्त स्वरूप पूर्ण समजलें, तो सर्व पापांपासून मुक्त होतो, यांत शंका नाहीं) ॥७॥

तस्यैवं सर्वतः सुवर्णवर्णस्याप्यक्ष्णोर्विशेषः। कथं तस्य यथा कपेर्मर्कटस्याऽऽसः कप्यासः। आसेरुपवेशनार्थस्य करणे घञ्। कपिपृष्ठान्तो येनोपविशति। कप्यास इव पुण्डरीकमत्यन्ततेज-

स्व्येवमस्य देवस्याक्षिणी। उपमितोपमानत्वान्न हीनोपमा। तस्यैवं गुणविशिष्टस्य गौणमिदं नामोदिति। कथं गौणत्वम्। स एष देवः सर्वेभ्यः पाप्मभ्यः पाप्मना सह तत्कार्येभ्य इत्यर्थः। य आत्माऽपहतपाप्मेत्यादि वक्ष्यति। उदित उद् गत उद्गत इत्यर्थः। अतोऽसावुन्नामा। तमेवंगुणसंपन्नमुन्नामानं यथोक्तेन प्रकारेण यो वेद सोऽप्येवमेवोदेत्युद्गच्छति सर्वेभ्यः पाप्मभ्यः। ह वा इत्यवधारणार्थौ निपातौ। उदेत्येवेत्यर्थः॥ ७॥

पूर्व०—हा पुरुष आनखाग्र सुवर्णवर्णी आहे, तेव्हां त्याचे नेत्रही पिंवळेच असले पाहिजेत.

सिद्धान्ती—नाहीं. त्याच्या नेत्राचा रंग विशेषतः निराळा असतो. कप्यासाप्रमाणें त्याचे डोळे पांढरे शुभ्र असतात.

शिष्य—कप्यास म्हणजे?

सिद्धान्ती—श्रीरामचंद्राचे साह्यकारी कपी तुम्हांस विदितच आहेत. यांच्या पृष्ठवंशाचा अंत कप्यास म्हणजे बसावयाची जागा. ही ज्या वर्णाची असते, त्या वर्णाचे नेत्र या अंतर्यामीचे असतात. कपीचा तो भाग पुंडरीकासारखा अत्यंत तेजस्वी असतो. पुंडरीक म्हणजे पांढरें कमळ. असो; त्या पुरुषाचे नेत्र पुंडरीकाप्रमाणें अति तेजस्वी असतात. पुंडरीक हा कप्यासाचा रंग. तेव्हां कप्यासाप्रमाणें या पुरुषाचे नेत्र सतेज शुभ्र असतात.

पूर्व०—कोण अश्लील आणि हीन उपमा ही! त्याचे नेत्रसुद्धां असलेच हीन असावेत.

सिद्धा०—अहो, भाषारसज्ञ! जरा दम धरा. श्रुतीनें कप्यासाची उपमा पुंडरीकाला देऊन त्या पुंडरीकाची उपमा देवनेत्राला दिली. यांत बिघडलें कोठें? ' पुंडरीकनेत्र ' हें तर गौरवाचें विशेषण आपण समजतों. याप्रमाणें आदित्याच्या अंतर्यामीं असणाऱ्या हिरण्यवर्ण व पुंडरीकाक्ष पुरुषाचें स्वरूपवर्णन झालें. आतां त्याचें नामवर्णन श्रुति करित आहे. ऐका. याप्रकारें गुणविशिष्ट असणाऱ्या पुरुषाचें ' उत् ' हें गुणवाचक अथवा गौण नाम आहे.

पूर्व०—' उत् ' हा काय गुण आहे बोवा?

सिद्धान्ती—सर्व पापें आणि तत्कार्यें म्हणजे जन्ममरणादिजन्य दुःखें—

शिष्य—' हा आत्मा अपहतपाप्मा आहे ' असें हीच श्रुति पुढें सांगणार आहे, नव्हे?

सिद्धान्ती—होय. त्यावरून हें सिद्ध होतें व श्रुतिही या मंत्रांत म्हणते कीं, सर्व पापें व पापजन्य कार्यें हीं अतिक्रांत करून हा देव त्यांच्या फार पलीकडे गेलेला

असतो. सर्व पापांच्या 'उत्=वर', सर्व पापांस अगोचर असा हा आहे; म्हणून याचें नांव 'उत्' आहे. आतां पुनः सांगावयास नकोच कीं, हें नाम व्यंजक (अर्थपूर्ण) आहे म्हणून.

शिष्य--हें स्वरूप समजलें, तर फलप्राप्ति?

सिद्धान्ती--याप्रमाणें पापशून्यत्वानें 'उत्' नाम प्राप्त झालेल्या या दिव्य हिरण्यवर्णी व पुंडरीकाक्ष पुरुषाचें जसें स्वरूप वर्णिलें आहे, तसें ज्याला यथार्थ समजलें, तोही सर्व पापांस अगोचर होतो. हें त्रिवार सत्य आहे ॥ ७ ॥

---

## मंत्र आठवा.

**तस्यर्क्च साम च गेष्णौ तस्मादुद्गीथस्तस्मात्त्वे-वोद्गातैतस्य हि गाता स एष ये चामुष्मात्पराञ्चो लोकास्तेषां चेष्टे देवकामानां चेत्यधिदैवतम् ॥ ८ ॥**

**इति प्रथमाध्यायस्य षष्ठः खण्डः ॥ ६ ॥**

**अन्वय व अर्थः—तस्य ऋक् च साम च गेष्णौ** ( त्या आदित्यांतर्यामी पुरुषाचे ऋग्वेद आणि सामवेद हे गेष्ण आहेत ) **तस्मात् उद्गीथः** ( म्हणून तो पुरुष उद्गीथ होतो ) **तस्मात् एतस्य हि गाता उद्गाता एव तु** ( म्हणून उद्गीथरूपी या पुरुषाचा जो गाता, तोही उद्गाता होतो ) **ये च अमुष्मात् पराञ्चः लोकाः, तेषां देवकामानां ईष्टे** ( या आदित्यलोकाच्या पलीकडे जे लोक आहेत, त्या लोकांवर व देवांच्या वासनांवर या आदित्यांतर्गत पुरुषाचें स्वामित्व आहे ) **इति अधिदैवतम्** ( हें आधिदैविक वर्णन झालें ) ऋक्साम ज्याचे घटक तो पुरुष उद्गीथ होतो; कारण उद्गीथाचे ऋक्साम घटक आहेत. त्याचे गायक उद्गाते होतात. हा अंतर्यामी आदित्यापलीकडील लोकांचा व देवांचा स्वामी आहे ॥ ८ ॥

तस्योद्गीथत्वं देवस्याऽऽदित्यादीनामिव विवक्षितत्वादाह–तस्य-र्क्च साम च गेष्णौ पृथिव्याद्युक्तलक्षणे पर्वणी। सर्वात्मा हि देवः। परापरलोककामेशितृत्वादुपपद्यते पृथिव्यग्न्यृक्सामगेष्णत्वम्। सर्व-

योनित्वाच्च। यत एवमुन्नामा चासावृक्सामगेष्णश्च तस्मादृक्साम-गेष्णत्वप्राप्तमुद्गीथत्वमुच्यते परोक्षेण परोक्षप्रियत्वाद्देवस्य तस्मादुद्गीथ इति। तस्मात्त्वेव हेतोरुद्‌ गायतीत्युद्गाता। यस्माद्ध्येतस्य यथोक्तस्योन्नाम्नो गाताऽसावतो युक्तोद्गातेति नामप्रसिद्धिरुद्गातुः। स एष देव उन्नामा ये चामुष्मादादित्यात्पराञ्चः परागञ्चनादूर्ध्वा लोकास्तेषां लोकानां चेष्टे न केवलमीशितृत्वमेव चशब्दाद्धारयति च। "स दाधार पृथिवीं द्यामुतेमाम्" इत्यादिमन्त्रवर्णात्। किंच देवकामानामीष्ट इत्येतदाधिदैवतं देवताविषयं देवस्योद्गीथस्य स्वरूपमुक्तम्॥ ८॥

इति प्रथमाध्यायस्य षष्ठः खण्डः॥६॥

सिद्धान्ती–हा आदित्यांतर्गत देवही वायुआदित्यादिकांप्रमाणें उद्गीथ होतो. हें सांगण्यासाठीं श्रुति म्हणते:—

शिष्य—हा देव उद्गीथ आहे, हें सांगण्याचें प्रयोजन काय?

सिद्धान्ती—कारण, सगुण परमात्म्याची उपासना उद्गीथ–प्रतीकद्वारा विहित करावयाची आहे. सर्वांतर्यामीही उद्गीथ आहे, अशी भावना झाल्याखेरीज त्याची उपासना साध्य होणेंच नाहीं.

शिष्य—आदित्यादिकांची दृष्टि ठेवून उद्गीथोपासना करावी, असें श्रुतीला सांगावयाचें आहे. पण परमात्म्याची संपादणूक उद्गीथावर कशी करितां येणार?

सिद्धान्ती—ऐका: ऋक्‌ आणि साम हे पृथिवी व अग्नि या रूपांनीं संपादित होतात, हें मागेंच सांगितलें. तेव्हां पृथिव्यादि लक्षणयुक्त जें ऋक्साममिथुन, तें सगुण परमात्म्याचें गेष्ण म्हणजे गायक होतें. 'सर्ववेद परमेश्वरीपदाचें वर्णन करितात' हें प्रसिद्धच आहे. तसेंच, हा देव सर्वांचा आत्मा आहे. पर आणि अपर भुवनांत राहणाऱ्या लोकांच्या कामादिवासनांचें व इच्छांचें नियंत्रण हा देव करितो. तेव्हां पृथिवीवह्निप्रमुख संपन्नतेनें युक्त असणारें ऋक्साममिथुन या सर्वकारण परमेशाचें घटक होतें, हें नीटच.

शिष्य—तात्पर्य, सर्वांचा आदि उत्पादक, आत्मतः पालक आणि ईशतः नियंता जो परमात्मा त्याचे सगुणस्वरूपांत ऋक्साम हे गायक किंवा घटकावयव असतात; असें झालें.

सिद्धान्ती—तेव्हां मागच्या मंत्रांत सांगितल्याप्रमाणें–'उत्‌' नाम धारण करणारा आणि या मंत्रांतील उपदेशाप्रमाणें हा ऋक्सामगेष्ण (ऋक्‌ आणि साम गेष्ण आहेत ज्याचे असा) देव होतो. म्हणून या 'उत्‌' नामक देवाला ऋक्सामजन्य गेष्णत्व प्राप्त होऊन हा देवच उद्गीथ होतो. वरील गुण

प्राप्त होतात, म्हणून हा उद्गीथ नामक होतो, असें श्रुति परोक्षतः सांगत आहे- हा देव उद्गीथ आहे, असें श्रुति प्रत्यक्ष सांगत नाहीं, तर तो 'उत्' नामक व ऋक्सामगेष्ण आहे असें दर्शवून तो उद्गीथ आहे, असें परोक्षतः सुचविते.

**शिष्य**—कारण 'देव परोक्षप्रिय आहेत,' अशी श्रुतिच आहे.

**सिद्धान्ती**—आणि या 'उत्' नामक देवाचें गायन करणारा गायक, हाही उद्गाता याच कारणासाठीं होतो. देव उद्गीथ, तेव्हां त्याचा गाता उद्गाता होतो. 'उत्'चा गाता तर तो आहेच.

**शिष्य**--ज्यापक्षीं उपरिनिर्दिष्ट गुणांनीं युक्त असणाऱ्या 'उत्' नामक देवा-प्रीत्यर्थ गायन करणारा गाता गातो, त्यापक्षीं त्या गायकास उद्गाता ('उत्' चा गाता) असें म्हणतात, तें योग्यच आहे. अर्थात् उद्गाता हें नांव सार्थ आहे, हें मला समजलें.

**सिद्धान्ती**—असा हा हिरण्यवर्ण, पुंडरीकाक्ष, अपहतपाप्मा, उद्गीथरूपी 'उत्' नामक जो पुरुष तो सगुणपरमात्माच असला पाहिजे. असो; त्याची, त्या प्रधानपुरुषाची, उपासना विहित करण्यासाठीं हा प्रपंच श्रुतीनें केला आहे. अंगोपासना सांगितल्यावर ही प्रधान उपासना सांगितली. आतां एकच गोष्ट सांगावयाची राहिली. आदित्यलोकाच्या पलीकडे व आदित्यलोकाच्याही वर जे लोक (भुवनें) आहेत, त्या लोकांवर या देवाचें स्वामित्व आहे व त्यांचा धारणकर्ताही हाच आहे.

**पूर्वपक्षी**—'धारणकर्ता' या अर्थाचा शब्द कोठें आहे मंत्रांत ?

**सिद्धान्ती**—'तो पृथ्वीचा व द्युलोकांचा धारण कर्ता आहे' अशी श्रुति आहे. शिवाय, मंत्रांत जो 'च (आणि)' शब्द आहे, तोही परमात्म्याचें आधारत्व स्पष्ट करितो. आणखी; आदित्यलोकाच्या ऊर्ध्वभागीं जे लोक आहेत, त्या लोकांचे अनेक अधिष्ठाते असतात. तेव्हां त्या त्या अधिष्ठात्यांचे जे इष्ट विषय असतात, विषयकामना असतात, त्यांचें निरंकुश नियंत्रणही हाच करितो. निरंकुश नियंत्रण परमात्म्याव्यतिरिक्त अन्य कोणास होणार ? असो; हें सर्व उपव्याख्यान अधिदैविक झालें.

**शिष्य**—म्हणजे उद्गीथ हा देवदेवेश्वर आहे किंवा देव हा उद्गीथ आहे, अशी दृष्टि ठेवून हें देवस्वरूपाचें किंवा देवरूपी उद्गीथाचें वर्णन झालें.

**सिद्धान्ती**—तात्पर्य, तेजःस्वरूप, पुंडरीकाक्ष, सर्वश्रेष्ठ, सर्वव्यापी, सर्वनियामक, सर्वथा स्वतंत्र, सर्वोपकारक आणि सर्वस्वामी परमात्मस्वरूपाचेंच हें वर्णन झालें. हें वर्णन ध्यानांत ठेवून त्या दृष्टीनें उद्गीथाची दैवी उपासना करावी; हा श्रुतीचा अभिप्राय आहे ॥ ८ ॥

**पहिल्या अध्यायाचा सहावा खंड संपला.**

# खंड सातवा.

## मंत्र पहिला.

**अथाध्यात्मं वागेवक्प्राणः साम तदेतदेतस्यामृच्यध्यूढ॑ साम तस्मादृच्यध्यूढ॑ साम गीयते वागेव सा प्राणोऽमस्तत्साम ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—अथ अध्यात्मं** ( आतां अध्यात्म उपासनेसंबंधानें सांगतात ) **वाक् एव ऋक्; प्राणः सामः तत् एतत् साम एतस्यां ऋचि अध्यूढं; तस्मात् ऋचि अध्यूढं साम गीयते; वाक् एव सा, प्राणः अमः; तत् साम** ( अर्थ मागचाच. मात्र पृथ्वी आणि अग्नि यांच्या स्थानीं वाणी आणि प्राण यांची योजना करावयाची. त्या मंत्रांत आधिदैविक उपासना सांगितली. येथें आध्यात्मिक उपासना आहे. प्रथम आध्यात्मिक अंगांची उपासना सांगून नंतर अंगीची म्हणजे प्रधानाची अंतर्यामीची उपासना येथें त्या प्रकरणांत सांगितली आहे ॥ १ ॥

अथाधुनाऽध्यात्ममुच्यते। वागेवक्प्राणः साम। अधरोपरिस्थानत्वसामान्यात् प्राणो घ्राणमुच्यते सह वायुना वागेव सा प्राणोऽम इत्यादि पूर्ववत् ॥ १ ॥

**सिद्धान्ती**—आतां यापुढें अध्यात्म म्हणजे शरीरीच्या शरीरासंबंधानें उपासना विहित करावयाची. येथें वाणी ही ऋचा आणि प्राण साम आहे; म्हणजे ऋचेवर वाग्दृष्टि ठेवावयाची आणि सामावर प्राणदृष्टि ठेवावयाची आहे.

**शिष्य**—वाणी आणि प्राण यांचा संबंध कसा ?

**सिद्धान्ती**—वाणी ही अधरस्थ म्हणजे खालच्या स्थानांत असते आणि प्राण उपरि म्हणजे वरच्या स्थानांत असतो. मागें सांगितल्याप्रमाणें ऋचेच्या पायावर साम स्थित होतो. तसेंच वाणीच्या आधारावर प्राणाची विद्यमानता असते. याचें स्पष्टीकरण हें आहे कीं, वायूसह जें घ्राणेंद्रिय आहे त्याला येथें प्राण म्हटलें आहे. म्हणजे प्राणाचें स्थान घ्राणांत आहे, असें झालें. वाणीचें स्थान मुख, तेव्हां, मुख खालीं आणि प्राण वर, असें होतें. सामशब्दांतील वाणी हीच

'सा' आहे आणि प्राण 'अम' आहे म्हणजे 'साम' (सा+अम) या शब्दाचे वाणी आणि प्राण हे घटक आहेत; सामाला सामत्व येतें तें असें ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**चक्षुरेवर्गात्मा साम तदेतदेतस्यामृच्यध्यूढꣳ साम तस्मादृच्यध्यूढꣳ साम गीयते । चक्षुरेव साऽऽत्माऽमस्तत्साम ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः—** चक्षुः एव ऋक्; आत्मा साम; तत् एतत् साम एतस्यां ऋचि अध्यूढं; तस्मात् ऋचि अध्यूढं साम गीयते; चक्षुः एव सा, आत्मा अमः; तत् साम (अर्थ पूर्वीप्रमाणेंच आहे. वाणी आणि प्राण यांच्या स्थानीं चक्षु आणि आत्मा यांची योजना करावयाची आहे) ॥ २ ॥

चक्षुरेवर्गात्मा साम । आत्मेति च्छायात्मा तत्स्थत्वात्साम ॥२॥

सिद्धान्ती—चक्षु हीच ऋक् आणि आत्मा साम आहे, अशी भावना करावयाची.

शिष्य—हा कोणता आत्मा ?

सिद्धान्ती—हा छायेमध्यें राहणारा आत्मा आहे; भोक्ता आत्मा नव्हे. आपल्या नेत्रांत जो छायात्मा राहतो, जें कनीनिकेच्या रूपानें आत्मबिंब असतें, तें नेत्रांमध्यें राहतें; हें प्रसिद्धच आहे. साम या शब्दांतील 'सा' हा अवयव चक्षुरूप आणि 'अम' हा अवयव आत्मरूप आहे ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**श्रोत्रमेवर्ङ्मनः साम तदेतदेतस्यामृच्यध्यूढꣳ साम तस्मादृच्यध्यूढꣳ साम गीयते । श्रोत्रमेव सा मनोऽमस्तत्साम ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थः—** श्रोत्रं एव ऋक्, मनः साम; तत् एतत् साम एतस्यां ऋचि अध्यूढं; तस्मात् ऋचि अध्यूढं साम गीयते, श्रोत्रं

एव सा, मनः अमः, तत् साम ( अर्थ पूर्वीप्रमाणेंच. चक्षूच्या स्थानीं श्रोत्र आणि आत्म्याच्या स्थानीं मन यांची योजना करावयाची आहे )॥३॥

श्रोत्रमेवर्ङ्मनः साम, श्रोत्रस्याधिष्ठातृत्वान्मनसः सामत्वम् ॥ ३ ॥

सिद्धान्ती—श्रोत्र हेंच ऋक् आणि मन हें साम आहे, अशी भावना ठेवावी. मन हें श्रोत्रेंद्रियाचें अधिष्ठातें असतें, म्हणून मनाला सामत्व प्राप्त होतें ॥ ३ ॥

---

**मंत्र चवथा.**

**अथ यदेतदक्ष्णः शुक्लं भाः सैवर्गथ यन्नीलं परः कृष्णं तत्साम तदेतदेतस्यामृच्यध्यूढꣳ साम तस्मा-दृच्यध्यूढꣳ साम गीयते । अथ यदेवैतदक्ष्णः शुक्लं भाः सैव साऽथ यन्नीलं परः कृष्णं तदमस्तत्साम ॥४॥**

अन्वय व अर्थः—अथ यत् एतत् अक्ष्णः शुक्लं भाः, सा एव ऋक्; अथ यत् नीलं परः कृष्णं, तत् सामः तत् एतत् साम एतस्यां ऋचि अध्यूढं; तस्मात् ऋचि अध्यूढं साम गीयते; अथ यत् एतत् अक्ष्णः शुक्लं भाः, सा एव सा, अथ यत् नीलं परः कृष्णं, तत् अमः; तत् साम ( याचाही अर्थ सहाव्या खंडांतील पांचव्या मंत्राप्रमाणें करावयाचा. तेथील सूर्याच्या शुभ्र प्रभेच्या स्थानीं जीवनेत्रांतील शुक्ल प्रभेची योजना करावयाची ) ॥ ४ ॥

अथ यदेतदक्ष्णः शुक्लं भाः सैवर्क् । अथ यन्नीलं परः कृष्णमा-दित्य इव दृक्शक्त्यधिष्ठानं तत्साम ॥ ४ ॥

सिद्धान्ती—यानंतर ही जी नेत्राची शुभ्र दीप्ति आहे, तीच ऋक् आहे, आणि जी अतिशय नील कृष्णता असते, ती साम आहे अशी भावना ठेवावी.

शिष्य—जशी आदित्यांतील नीलिमा प्रकाशक शक्तीचें अधिष्ठान असते, तशीच नेत्रांतील नीलिमा दृक्–शक्तीचें अधिष्ठान असते. होय ना ?

सिद्धान्ती—होय. सारांश, सहाव्या खंडांतील पांचव्या मंत्राप्रमाणेंच याही मंत्राचें स्पष्टीकरण आहे ॥ ४ ॥

---

## मंत्र पांचवा.

**अथ य एषोऽन्तरक्षिणि पुरुषो दृश्यते सैवर्क्तत्साम तदुक्थं तद्यजुस्तद्ब्रह्म तस्यैतस्य तदेव रूपं यदमुष्य रूपं यावमुष्य गेष्णौ तौ गेष्णौ तौ यन्नाम तन्नाम ॥ ५ ॥**

अन्वय व अर्थः—**अथ यः एषः पुरुषः अंतराक्षिणि दृश्यते** ( नंतर; जो हा पुरुष डोळ्याच्या अंतर्भागीं दिसतो ) **सा एव ऋक्, तत् साम, तत् उक्थं, तत् यजुः, तत् ब्रह्म** ( तीच ऋक्, तेंच साम, तेंच उक्थ, तेंच यजु आणि तेंच ब्रह्म आहे ) **यत् अमुष्य रूपं, तस्य एतस्य तत् एव रूपं** ( त्या आदित्यस्थ पुरुषाचें जें रूप आहे. तेंच त्या ह्याचें म्हणजे नेत्रस्थ पुरुषाचें रूप आहे ) **यौ अमुष्य गेष्णौ, तौ गेष्णौ; यत् नाम तत् नाम,** ( त्याचें जें गेष्णद्वय, तेंच याचें गेष्णद्वय आहे; आणि त्याचें जें नांव तेंच याचें नांव आहे; अशी भावना ठेवावी ) ॥ ५ ॥

अथ य एषोऽन्तरक्षिणि पुरुषो दृश्यते । पूर्ववत् । सैवर्गध्यात्मं वागाद्या पृथिव्याद्या चाधिदैवतम् । प्रसिद्धा च ऋक्पादबद्धाक्षरात्मिका । तथा साम । उक्थसाहचर्याद्वा स्तोत्रं सामोक्थं* शस्त्रमुक्थादन्यत्तथा यजुः स्वाहास्वधावषडादि सर्वमेव वाग्यजुस्तत्स एव । सर्वात्मकत्वात्सर्वयोनित्वाच्चेति ह्यवोचाम । ऋगादिप्रकरणात्तद्ब्रह्मेति त्रयो वेदाः । तस्यैतस्य चाक्षुषस्य तदेव रूपमतिदिश्यते । किं तद्यदमुष्याऽऽदित्यपुरुषस्य । हिरण्मय इत्यादि यदधिदैवतमुक्तम् । यावमुष्य गेष्णौ पर्वणी तावेवास्यापि चाक्षुषस्य गेष्णौ । यच्चामुष्य नामोदित्युद्गीथ इति च तदेवास्य नाम । स्थानभेदाद्रूपगुणनामातिदेशादीशितृत्वविषयभेदव्यपदेशाच्चाऽऽदित्यचाक्षुषयोर्भेद इति चेत् । न । अमुनाऽनेनैवेत्येकस्योभयात्मप्राप्त्यनुपपत्तेः । द्विधाभावेनोपपद्यत इति चेत् । वक्ष्यति हि स एकधा भवतीत्यादि । न । चेतनस्यैकस्य निरवयवत्वाद्द्विधाभावानुपपत्तेः । तस्मादध्यात्माधिदैवतयोरेकत्वमेव । यत्तु रूपाद्यतिदेशो भेदकारणमवोचो न तद्भेदावगमाय । किं तर्हि स्थानभेदाद्भेदाशङ्का मा भूदित्येवमर्थम् ॥ ५ ॥

---

* ‘ स्तोत्रं साम ऋक् शस्त्रं उक्थादन्यत् ’ हा पाठ बरा दिसतो.

ती—नंतर, ‘ हा जो नेत्राच्या अंतर्भागीं पुरुष दिसतो ’ इत्यादि मंत्र-
र्थ पूर्वीं विवरिलेल्या सहाव्या खंडांतील सहाव्या मंत्राच्या अर्था-
हे. वाणि–आदि पूर्वकथित ऋक्स्वरूपें अध्यात्म आणि पृथिव्यादि
आधिदैविक अशी दृष्टि ठेवावयाची आहे.

—याचें वर्णन सहाव्या आधिदैविक खंडांत आणि ह्या सातव्या अध्या-
त आलेंच आहे ? अंगोपासना संपून प्रधानोपासनेला येथें आरंभ झाला.

ती—होय; आणि म्हणूनच या पुरुष शब्दाचा अर्थ असा नव्हे
छायात्मा आहे.

—नेत्राच्या अंतर्भागामध्यें दिसतो म्हणतां आणि दुसऱ्या श्लोकांत
छायात्मा हा नेत्रांतर्भागी असणारा पुरुष नव्हे, असें म्हणतां; याचें
य ?

ती—ऐका. आपण आधिदैविकाचा विचार करतांना काय म्हटलें
ांचें चित्त शांत आणि समाहित झालें आहे, अशा पुरुषांना आदि-
तर्भागीं राहणारा पुरुष दिसतो, असें म्हटलें होतें; तें सांगणें विसरूं
प्रमाणें विशिष्ट अधिकारी पुरुषांना मात्र नेत्राच्या अंतर्भागीं एक पुरुष
श्रुतिवाक्यही विसरूं नका. श्रुतीनें ज्याप्रमाणें ऋचांचें स्वरूप सांगितलें
ध्यात्म व अधिदैविक रूप हें तोच नेत्रांतर्यामी पुरुष आहे. तुम्हांला
नकोच कीं, प्रत्येक ऋग्मंत्र पादबद्ध अक्षरांनीं सिद्ध झालेला असतो.
तो छायात्मक पुरुष आहे, हें स्पष्ट होतें. सामांचीही तीच व्यवस्था आहे.
ही पुरुष असून तो नियमित चरणांनीं व बद्ध अक्षरांनीं सिद्ध होतो.
त उक्थ शब्द आहे म्हणून सामशब्दाचा अर्थ स्तोत्र असाही करावा.

—उक्थ‡ हा ऋक्शस्त्रांचा एक विभाग आहे. शस्त्र म्हणजे सूक्त.
उक्थ आहे. पण शस्त्र हें उक्थाहून निराळें असतें. त्याचप्रमाणें स्वाहा
ट् यांनीं घटित सर्व यजु वाणीरूपच असतो; आणि तो वाणीसमूह
) तोच नेत्रांतर्भागीं राहणारा पुरुष आहे. याप्रमाणें सर्व ऋचा, सर्व
सर्व यजु तोच नेत्रांतस्थ पुरुष आहे.

—मागें आपण कारण सांगितलेंच आहे कीं, तो सर्वात्मक आणि सर्वांचें
न आहे; म्हणून तोच ह्या सर्व ऋचा, सर्व सामें व सर्वयजू आहे. होय ना ?

ती—होय, तोच ब्रह्म आहे; म्हणजे तिन्ही वेद तोच आहे. ऋग्वेदादि
ब्रह्म शब्द आला आहे व मंत्रांतही ‘ ऋक् ’ ह्याच साहचर्यानें ब्रह्म ह्या

---

‡ तिगीत=मंत्रसाध्यं=उक्थं; प्रतिगीतमंत्रसाध्ये=स्तोत्र. असे उभयतांत
त.

शब्द आला आहे. म्हणून ब्रह्म म्हणजे तिन्ही वेद असें समजावयाचें. पुनः; मंत्रामध्यें गेल्या खंडांतील सहाव्या मंत्रांत सांगितलेल्या ज्या दैवी हिरण्मय आदित्य पुरुषाचा उल्लेख केला आहे, त्याचें रूप आणि ह्या नेत्रांतर्यामी असणाऱ्या पुरुषाचें रूप एकच आहे. तसेंच, त्याचें जें गेष्णद्वय 'ऋक् साम' तेंच ह्या नेत्रस्थ पुरुषाचें गेष्ण आहे. आणि त्याचें जें 'उत्' आणि उद्गीथ नामद्वय सांगितलें, तेंच याचेंही आहे.

पूर्व०—आदित्यस्थ आणि नेत्रस्थ या दोन पुरुषांत (१) स्थानभेद आहे. म्हणून, (२) आदित्यस्थ पुरुषाचें रूप, गुण आणि नाम यांचा अतिदेश नेत्रस्थ पुरुषावर केला आहे म्हणून, आणि शेवटीं (३) त्याचे स्वामित्वाचे विषय आणि नेत्रस्थ पुरुषाच्या स्वामित्वाचे विषय हे निराळे आहेत (सहाव्या खंडांतील आठवा मंत्र आणि सातव्या खंडांतील सहावा मंत्र पहा.) म्हणून म्हणजे या तीन कारणांस्तव आदित्यस्थ आणि नेत्रस्थ पुरुषांमध्यें भेद असलाच पाहिजे ?

सिद्धान्ती—नाहीं. याच खंडांतील सातवा व आठवा मंत्र पहा; म्हणजे तुम्हांस दिसून येईल कीं, 'त्यानें' 'ह्यानें' असा दोन्ही पुरुषांसंबंधानें एकच सर्वनामाचा उपयोग केला आहे. आतां हे दोन पुरुष भिन्न आहेत, असें सांगण्याचा जर श्रुतीचा आशय असता तर 'अमुना' 'अनेन' असे एकार्थक सर्वनामी प्रयोग श्रुतीनें केलेच नसते. एकच उपासक पुरुष एकच साधनानें आदित्यस्थ व नेत्रस्थ पुरुषांची प्राप्ति करून घेतो, असें श्रुतिमंत्र सांगतात. म्हणून ते दोन्ही पुरुष एकरूपच असले पाहिजेत, हें स्पष्ट होतें. म्हणून येथें तुमची भेदकल्पना श्रुतीचा विरोध करिते.

पूर्वपक्षी—द्वैतभावनेनें ही उपपत्ति होतच आहे ना ?

शिष्य—कशी ?

पूर्व०—कारण पुढें श्रुतिच सांगेल कीं, 'एकरूपाचा, तो तीनरूपाचा होतो.' यावरूनच उभयतांमध्यें स्वरूपभेद आहे हें स्पष्ट आहे.

सिद्धान्ती—नाहीं. चैतन्य एक आहे. आणि तें निरवयव आहे. तेव्हां एक व अवयवशून्य वस्तु असेल तर ती द्वैताची उत्पत्ति कशी करणार ? चैतन्य सर्वदा एकच प्रकारचें असतें. म्हणून आध्यात्मिक आणि आधिदैविक हीं दोन स्वरूपें नाहींत, एकच स्वरूप आहे, असें सिद्ध होतें. आतां रूपादिकांच्या अतिदेशानें भेद उत्पन्न होतो असें तुम्ही म्हणाल, तर तो अतिदेश भेदज्ञान करून देण्याकरितां नाहीं. आदित्यस्थ व नेत्रस्थ पुरुष एक नसून भिन्न आहेत, हें ज्ञान करून घेण्याकरितां हा अतिदेश सांगितला नाहीं; तर स्थानभेदानें ते स्वरूपतः भिन्न आहेत' अशी शंका येऊं नये, म्हणून रूपादिकांचा अतिदेश केला आहे. तात्पर्य आदित्यस्थ आणि नेत्रस्थ पुरुष एकच आहेत ॥५॥

---

## मंत्र सहावा.

**स एष ये चैतस्मादर्वाञ्चो लोकास्तेषां चेष्टे मनुष्यकामानां (णां) चेति तद्य इमे वीणायां गायन्त्येतं ते गायन्ति तस्मात्ते धनसनयः ॥ ६ ॥**

**अन्वय अर्थः—– ये च एतस्मात् अर्वाञ्चः लोकाः, तेषां एषः सः ईष्टे मनुष्यकामानां च ईष्टे इति** ( येथून अलीकडचे जे लोक–भुवनें– आहेत, त्यांच्यावर आणि मनुष्यांच्या इच्छांवर त्याचें स्वामित्व असतें, असा प्रकार आहे ) **तत् ये इमे वीणायां एतं गायंति** ( म्हणून हें जाणून जे वीण्याच्या साह्यानें गायन करितात, ते ह्याचेंच गायन करितात ) **तस्मात् ते धनसनयः** ( म्हणून ते धनाचा लाभ प्राप्त करून घेतात ) ॥ ६ ॥

स एष चाक्षुषः पुरुषो ये चैतस्मादाध्यात्मिकादात्मनोऽर्वाञ्चोऽर्वाग्गता लोकास्तेषां चेष्टे मनुष्यसंबन्धिनां च कामानाम्। तत्तस्माद्य इमे वीणायां गायन्ति गायकास्त एतमेव गायन्ति। यस्मादीश्वरं गायन्ति। तस्मात्ते धनसनयो धनलाभयुक्ता धनवन्त इत्यर्थः ॥ ६ ॥

सिद्धान्ती—–आध्यात्मिक आत्म्याच्या आलीकडचीं जीं भुवनें आहेत, त्यांचा व तसेंच मनुष्यसंबंधीं ज्या उपासकांच्या इच्छा असतात, त्या सर्वांचा स्वामी ह्याच नेत्रस्थ पुरुष असतो. म्हणून जें हे ज्ञाते लोक त्याचें गायन करितात, तें हे ज्ञाते ह्याचेंच गायन करितात.

शिष्य—–म्हणजे ज्ञाते पुरुष नेत्रस्थ पुरुषाचें जें गायन करितात, तें गायन आदित्यस्थ पुरुषाप्रीत्यर्थच असतें ?

सिद्धान्ती—–बरोबर. आणि ईश्वराचेंच ते लोक गायन करितात, म्हणून त्यांना संपत्तीचा अत्यंत मोठा लाभ होतो. ते धनवान् होतात. ईश्वर जसा गायनयोग्य आहे, तसाच तो भक्तकामना पूर्ण करणारा आहे. त्याचें यथार्थ स्तोत्र गायिलें म्हणजे गायकाला इष्ट धनाचा लाभ होतो, यांत काय आश्चर्य आहे ? या फलप्राप्तीवरूनही आधिदैविक आणि आध्यात्मिक पुरुष एकच आहेत, असें सिद्ध होतें ॥ ६ ॥

## मंत्र सातवा.

**अथ य एतदेवं विद्वान्साम गायत्युभौ स गायति; सोऽमुनैव स एष ये चामुष्मात्पराञ्चं लोकास्ताꣳश्चाऽऽप्नोति देवकामाꣳश्च ॥ ७ ॥**

अन्वय व अर्थः—**अथ यः एतत् एवं विद्वान् साम गा उभौ सः गायति** ( याप्रमाणें ज्ञान असणारा जो पुरुष साम करितो, तो आपल्या गायनानें उभयतांस प्रसन्न करितो ) **सः अ एव** ( तो ह्याच आदित्याच्या साह्यानें ) **एषः सः ये च अमु पराञ्चः लोकाः तान् च देवकामान् च आप्नोति** ( हा लोक, त्या द्युलोकाच्या पलीकडे असणारे लोक—भुवनें—यांची प्राप्ति, तशीच कामांचीही प्राप्ति करून घेतो. सारांश, त्याचे सर्व आध्यात्मिक आधिदैविक काम ( इच्छा ) परिपूर्ण होतात ॥ ७ ॥

अथ य एतदेवं विद्वान्यथोक्तं देवमुद्गीथं विद्वान्साम गायत्यु स गायति चाक्षुषमादित्यं च । तस्यैवंविदः फलमुच्यते-सोऽमु वाऽऽदित्येन स एष ये चामुष्मात्पराञ्चो लोकास्तांश्चाऽऽप्नो आदित्यान्तर्गतदेवो भूत्वेत्यर्थो देवकामांश्च ॥ ७ ॥

सिद्धान्ती—याप्रमाणें उद्गीथ—उपासनेचा जो ज्ञानी उपासक आतांच तलेल्या गुणविशिष्ट आदित्य व नेत्रस्थ देवतांच्या दृष्टीनें उद्गीथाची करून ( उद्गीथ हा या देवतांचें प्रतीक आहे असें जाणून ) तदुपासना सामगायन करितो, तो नेत्रस्थ आणि आदित्यस्थ पुरुषांचें गायन करितो उपासना-ज्ञानाचें उपासकास फल काय होतें, म्हणाल तर ऐका:—ह्या त्याच्या साह्यानें हा लोक आणि ह्याच्या व द्युलोकाच्या पलीकडे असणा भुवनें तो उपासक प्राप्त करून घेतो. किंवा स्पष्ट सांगावयाचें म्हणजे तो आदित्याचा अंतर्यामी होतो. अर्थात् त्याला सर्वलोकप्राप्ति होते. तसेंच, जे कांहीं काम ( इष्टफलविषय ) असतात, त्यांचीही प्राप्ति याला होते ॥

---

## मंत्र आठवा व नववा.

**अथानेनैव ये चैतस्मादर्वाञ्चो लोकास्ताꣳश्चाऽऽप्नोति मनुष्यकामाꣳश्च तस्मादु हैवंविदुद्गाता ब्रूयात्**

**कं ते काममागायानीत्येष ह्येष कामागानस्येष्टे य एवं विद्वान्साम गायति साम गायति ॥ ९ ॥**

**इति प्रथमाध्यायस्य सप्तमः खण्डः ॥ ७ ॥**

अन्वय व अर्थः— **अथ अनेन एव ये च एतस्मात् अर्वाञ्चः लोकाः तान् च मनुष्यकामान् च आप्नोति** ( या मंत्रभागाचा अर्थ सातव्या मंत्राप्रमाणेंच आहे. 'आदित्यसाह्य,' 'द्युलोकाच्या पलीकडचे लोक' आणि 'देवकाम' यांच्या स्थानीं 'नेत्रस्थ–पुरुष–साह्य', 'द्यु लोकाच्या आलीकडचे लोक' आणि 'मनुष्यकाम' यांची योजना करावयाची ) **तस्मात् उ ह एवंवित् उद्गाता ब्रूयात्** ( म्हणून हें जाणणाऱ्या उद्गात्यानें यजमानाला विचारावें ) ॥ ८ ॥

अन्वय व अर्थः—**ते कं कामं आगायानि इति** ( तुझे कोणते इष्टफलासाठीं गायन करून मी तुला ते प्राप्त करून देऊं ? ) **एषः हि कामागानस्य ईष्टे** ( कारण हा मी उद्गाता आहें; आणि गायन करून इष्ट फल मिळवून देण्यास मी समर्थ आहें ) **यः एवं विद्वान् साम गायति, साम गायति** ( कारण हें ज्ञान असणारा जो विद्वान् सामगायन करितो, तो आपल्या गायनानें सर्व इष्ट विषय प्राप्त करून घेण्यास समर्थ होतो ) ॥ ९ ॥

अथानेनैव चाक्षुषेणैव ये चैतस्मादर्वाञ्चो लोकास्तांश्चाऽऽप्नोति मनुष्यकामांश्च चाक्षुषो भूत्वेत्यर्थः। तस्माद् हैवंविदुद्गाता ब्रूयाद्यजमानं कमिष्टं ते तव काममागायानीति। एष हि यस्मादुद्गाता कामागानस्योद्गानेन कामं संपादयितुमीष्टे समर्थ इत्यर्थः। कौऽसौ, य एवं विद्वान्साम गायति साम गायति। द्विरुक्तिरुपासनसमाप्त्यर्था ॥ ८ ॥ ९ ॥

इति प्रथमाध्यायस्य सप्तमः खण्डः ॥ ७ ॥

**सिद्धान्ती**—त्याचप्रमाणें चाक्षुष–( नेत्रस्थ )–पुरुषज्ञानाच्या साह्यानें मनुष्यलोकाच्या आलीकडचीं जीं भुवनें आहेत; आणि मनुष्याचे जे अभीष्ट विषय आहेत,

ते ते सर्व उद्गीथोपासक प्राप्त करून घेतो. कारण, नेत्रस्थ-पुरुषाचा ज्ञानी जो उपासक तो नेत्रस्थ पुरुषच होतो. म्हणून नेत्रस्थ–पुरुषाचें ज्ञान असणाऱ्या उद्गात्यानें यज्ञकर्त्या यजमानाला विचारावें कीं, 'कोणचा तुझा इष्ट विषय आहे, तो सांग ? मी तो इष्टविषय आपल्या गानानें तुला प्राप्त करून देण्यास समर्थ आहें.' उघडच आहे. जो स्वरूपज्ञ ज्ञानी सामगायन करितो, सामाचें गायन करितो, तो इष्ट विषयसिद्धि संपादित करण्याला समर्थ होतो.

शिष्य—'साम गायति' या पदांची द्विरुक्ति झाली आहे, ती आदरासाठीं असेल ?

सिद्धान्ती—आणि ती द्विरुक्ति ह्या प्रकृत उपासनाप्रकरणाचीही समाप्ति करिते ॥ ८ ॥ ९ ॥

पहिल्या अध्यायाचा सातवा खंड संपूर्ण.

---

## खंड आठवा.

### मंत्र पहिला.

**त्रयो होद्गीथे कुशला बभूवुः शिलकः शालावत्यश्चैकितायनो दाल्भ्यः प्रवाहणो जैवलिरिति ते होचुरुद्गीथे वै कुशलाः स्मो हन्तोद्गीथे कथां वदाम इति ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः**—शालावत्यः शिलकः, **चैकितायनः दाल्भ्यः, जैवलिः प्रवाहणः**, इति त्रयः **उद्गीथे कुशलाः बभूवुः ह** ( शलावताचा शिलक नामक शालावत्य, चिकितायनाचा पुत्र दाल्भ्य आणि जीवलाचा प्रवाहण नामक जैवलि, असे तिघे उद्गीथविद्येमध्यें कुशल होते झाले ) **ते उचुः, ह उद्गीथे कुशलाः स्मः वै** ( ते अन्योन्यांस म्हणते झाले कीं, आपण सर्वजण उद्गीथविद्येमध्यें निपुण झालों आहोंत, हें सुप्रसिद्ध आहे ) **हंत उद्गीथे कथां वदामः; इति** ( सर्वांचें संमत असेल तर आपण उद्गीथ विषयाची चर्चा करूं या; याप्रमाणें ते परस्पर बोलते झाले ॥ १ ॥

अनेकधोपास्यत्वादक्षरस्य प्रकारान्तरेण परोवरीयस्त्वगुणफलमुपासनान्तरमानिनाय । इतिहासस्तु सुखावबोधनार्थः । त्रयस्त्रिसंख्याकाः । ह इत्यैतिह्यार्थः । उद्गीथ उद्गीथज्ञानं प्रति कुशला निपुणा बभूवुः । कस्मिंश्चिद्देशे काले च निमित्ते वा समेतानामित्यभिप्रायः । न हि सर्वस्मिञ्जगति त्रयाणामेव कौशलमुद्गीथादिविज्ञाने । श्रूयन्ते ह्युषस्तिजानश्रुतिकैकेयप्रभृतयः सर्वज्ञकल्पाः । के ते त्रय इत्याह— शिलको नामतः शलावतोऽपत्यं शालावत्यः । चिकितायनस्यापत्यं चैकितायनः । दल्भगोत्रो द्व्यामुष्यायणो वा; प्रवाहणो नामतो जीवलस्यापत्यं जैवलिरित्येते त्रयस्ते होचुरन्योन्यमुद्गीथे वै कुशला निपुणा इति प्रसिद्धाः स्मः । अतो हन्त यद्यनुमतिर्भवतामुद्गीथ उद्गीथज्ञाननिमित्तां कथां विचारणां पक्षप्रतिपक्षोपन्यासेन वदामो वादं कुर्म इत्यर्थः । तथा च तद्विद्यसंवादे विपरीतग्रहणनाशोऽपूर्वविज्ञानोपजनः संशयनिवृत्तिश्चेति । अतस्तद्विद्यसंयोगः कर्तव्य इति चेतिहासप्रयोजनम् । दृश्यते हि शिलकादीनाम् ॥ १ ॥

**सिद्धान्ती**—उद्गीथ अक्षरांची उपासना हा वेळपर्यंत अनेक प्रकारांनीं विशद केली. आतां दुसऱ्या प्रकारानें उपासनेची आणखी एक तऱ्हा सांगावयासाठीं पुढील प्रकरणाचा अवतार केला आहे.

**शिष्य**—हेतु काय ?

**सिद्धान्ती**—आतांपर्यंत अध्यात्म आणि आधिदैवत अशा स्थानभेदानें मर्यादित झालेल्या परमात्म्याची दृष्टि ठेवून उद्गीथाची उपासना करावी, असें सांगितलें. तसेंच अखिल पापविनाश हें त्यांचें फलही सांगितलें. आतां या प्रकरणांत पर (श्रेष्ठ) आणि अवरीय (श्रेष्ठतर) गुण (परमात्म्यामध्यें असलेले गुण) उपासकानें आपल्या चित्तांत स्थापित करावयाचे आणि त्या दृष्टीनें उद्गीथाची उपासना विहित करावयाची; असा विषय सांगावयाचा आहे.

**शिष्य**—याचें फल काय ? भगवन् !

**सिद्धान्ती**—परब्रह्माची उपासना अत्यंत श्रेष्ठ फल देते. परब्रह्मदृष्टीनें उद्गीथ उपासना पराहून श्रेष्ठतर प्रतीचें फल देते. असो; हें प्रकरण येथें विवक्षित आहे. प्रथम इतिवृत्तांत सांगितला आहे, तो प्रकृत विषयाचें ज्ञान सुखानें व्हावें, एतदर्थ आहे. ऐका:—पूर्वी उद्गीथविषयाचें ज्ञान उत्कृष्ट असलेले असे तिघे पंडित एका ठिकाणीं कांहीं प्रसंगानें येते झाले.

शिष्य--स्थान, काल किंवा निमित्त यांचा अवतार 'बभूवुः' या शब्दांतून आपण केला आहे ?

सिद्धान्ती--होय. कदाचित् अशी शंका उत्पन्न होईल कीं, सर्व जगतांत आजपर्यंत उद्गीथ विज्ञानांत कुशल असे तीनच पुरुष उत्पन्न झाले कीं काय ? पण ही शंका येऊं नये, म्हणून एका काळीं व एका स्थानीं कांहीं प्रसंगानें कोणा तीन उद्गीथ कुशल पंडितांचा समागम झाला, ही ऐतिहासिक गोष्ट आचार्यांनीं स्पष्ट केली. तीन पुरुष एकत्र मिळाले, म्हणून सांगितलें. पण त्यांच्याशिवाय उषास्ति, जानश्रुति, कैकेय प्रभृति सर्वज्ञकल्प पंडित होते, हें श्रुतीवरून आपल्यासही ठाऊक आहे. तात्पर्य, अनेक उद्गीथ कुशल पुरुष झाले. त्यांतील तीन उद्गीथकुशल पंडित एकदां एके ठिकाणीं मिळाले, इतकाच कायतो अर्थ आहे. असो; शलावताचा अपत्य शालावत्य.-

शिष्य--त्याचेंच नांव शिलक. तसेंच चिकितायनाचा मुलगा चैकितायन. याचें नांव दाल्भ्य ?

सिद्धान्ती--असेंच नव्हे. दाल्भ्य हा दल्भ गोत्रोत्पन्न तरी होता किंवा तो द्व्यामुष्यायण तरी होता, असें येथें समजलें पाहिजे. ज्याला दत्तकदानादि कारणांपैकीं एकाद्या कारणानें दोन गोत्रें प्राप्त होतात, त्याला 'द्व्यामुष्यायण' असें म्हणतात. असो; जीवलाचा पुत्र प्रवाहण जैवली होय. शिलक, दाल्भ्य आणि प्रवाहण असे तीन उद्गीथपंडित सुप्रसिद्ध होते. ते परस्परांस म्हणाले कीं, आपण तिघेही जण उद्गीथविद्येमध्यें निपुण आहोंत. तेव्हां सगळ्यांचें अनुमत असेल, तर आपण उद्गीथोपासनेसंबंधानें विचारणा करूं या. शंका-प्रतिशंका काढून आपण या विषयाची विवादात्मक चर्चा करूं. विचारणा केली, म्हणजे कांहीं विपरीत ग्रह असतात ते नष्ट होतात, जें आपल्यास ठाऊक नसतें, त्याचें ज्ञान होतें आणि कांहीं संशय असतील तर तेही निरस्त होतात. विषयज्ञ पुरुष ते तद्विद्य होत. त्या पुरुषांशीं वादविवाद केला असतां वरील फलें मिळतात, हें हा वृत्तांत सांगण्याचें कारण आहे. शिलकादिकांस हें उत्तम फल मिळालें, हें श्रुति पुढें सांगणारच आहे ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**तथेति ह समुपविविशुः । स ह प्रवाहणो जैवलिरुवाच भगवन्तावग्रे वदतां ब्राह्मणयोर्वदतोर्वाचꣳ श्रोष्यामीति ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः—तथा इति** ( ठीक आहे असें म्हणून ) **समुपविविशुः** ( ते वादविवाद करण्यासाठीं एकत्र बसले ) **जैवलिः सः प्रवाहणः उवाच, ' भगवंतौ अग्रे वदतां; वदतोः ब्राह्मणयोः वाचं श्रोष्यामि ' इति** ( जैवलि प्रवाहण म्हणतातः—हे भगवंतांनो ! तुम्हीं प्रथम ( पूर्वीं ) चर्चा करण्यास लागा; तुम्ही उभयतांही ब्राह्मण आहांत; तुमचें बोलणें मी ऐकतों ) ॥ २ ॥

तथेत्युक्त्वा ते समुपविविशुर्होपविष्टवन्तः किल । तत्र राज्ञः प्रागल्भ्योपपत्तेः स ह प्रवाहणो जैवलिरुवाचेतरौ भगवन्तौ पूजावन्तावग्रे पूर्वं वदताम् । ब्राह्मणयोरिति लिङ्गाद्राजाऽसौ युवयोर्ब्राह्मणयोर्वदतोर्वाचं श्रोष्यामि । अर्थरहितामित्यपरे वाचमिति विशेषणात् ॥ २ ॥

**सिद्धान्ती**--' उत्तम आहे ' असें म्हणून ते सर्वजण उद्गीथाची चर्चा करण्याकरितां एकत्र बसले. तेव्हां जैवलि प्रवाहण हा राजा मोठा प्रगल्भ होता. तो म्हणाला--

**पूर्वपक्षी**—प्रवाहण राजा होता, हें कशावरून ?

**सिद्धान्ती**--त्याचें प्रगल्भपणाचें बोलणेंच ऐकाः–हे ब्राह्मणहो ! तुम्ही उभयतांही पूज्य आहांत, म्हणून तुम्ही प्रथमतः विषयाची चर्चा करावयास लागा. '

**शिष्य**—' ब्राह्मण ' हें पद श्रुतीनें उपयोजिलें आहे. हेंच, तो राजा होता, हें ठरवितें.

**पूर्व०**—तो ब्राह्मणेतर होता, हें ठरेल; तो राजा होता हें कसें ठरतें ?

**सिद्धान्ती**—त्याचें बोलणें प्रगल्भ आणि शिष्टाचाराचें आहे. ब्राह्मणांस तो ' भगवन् ' ह्या पदानें संबोधितो. शिवाय, त्याला आत्म–विश्वास होता असेंही पुढें दिसेल. असो; तो म्हणाला, हे भगवन् ! तुम्ही प्रथम प्रारंभ करा; तुमचें बोलणें मी शांतपणें ऐकून घेतों. ' कोणी असेंही म्हणतात कीं, राजानें ' **वाचं** ' असें पद उपयोजिलें आहे. त्यावरून त्या उभयतांचें बोलणें अर्थरहित होणार ! असेंही राजाला कळलें होतें. अशा प्रकारचें स्पष्ट बोलण्याचें धैर्य क्षत्रियाशिवाय दुसरीकडे सांपडणें शक्य नाहीं. यावरूनही तो क्षत्रिय होता असें ठरतें. ' वाचं ' याचा ' अर्थ आधुनिक मराठींत 'नुसती बडबड' असा केव्हां केव्हां होतो ॥२॥

---

## मंत्र तिसरा.

**स ह शिलकः शालावत्यश्चैकितायनं दाल्भ्यमुवाच हन्त त्वा पृच्छानीति पृच्छेति होवाच ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थः—शालावत्यः सः शिलकः चैकितायनं दाल्भ्यं उवाच ह; 'हंत, त्वा पृच्छानि' 'पृच्छ' इति ह उवाच** ( शालावत्याचा शिलक हा चैकितायन दाल्भ्याला म्हणालाः–हे भगवन् ! तुझी अनुमति असेल तर मी तुला प्रश्न विचारितों 'विचार;' असें दाल्भ्य म्हणाला ) ॥ ३ ॥

उक्तयोः स ह शिलकः शालावत्यश्चैकितायनं दाल्भ्यमुवाच—हन्त यद्यनुमंस्यसे त्वा त्वां पृच्छानीत्युक्त इतरः पृच्छेति होवाच ॥३॥

सिद्धान्ती—याप्रमाणें प्रवाहणानें सांगितल्यानंतर उभयतांपैकीं चैकितायन दाल्भ्याला तो शालावत्य शिलक म्हणालाः–' हे दाल्भ्य, तूं जर मला अनुज्ञा देशील, तर मी तुला एक प्रश्न विचारतों.' हें ऐकून दाल्भ्य म्हणालाः–' कांहीं हरकत नाहीं, विचार. ' ॥३॥

---

## मंत्र चवथा.

**का साम्नो गतिरिति स्वर इति होवाच स्वरस्य का गतिरिति प्राण इति होवाच प्राणस्य का गतिरित्यन्नमिति होवाचान्नस्य का गतिरित्याप इति होवाच ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थः—साम्नः का गतिः इति** ( ' सामाची गति काय असा प्रश्न विचारला ) **स्वर इति ह उवाच** ( ' त्याची गति स्वर ' असें उत्तर मिळालें) **स्वरस्य का गतिः? इति; 'प्राण इति' ह उवाच 'प्राणस्य का गतिः' इति 'अन्नं इति' ह उवाच। 'अन्नस्य का गतिः' इति ' आपः इति ' ह उवाच** ( स्वराची गति काय ? ' असें शिलकानें विचारलें, दाल्भ्य म्हणाला, ' प्राण ही त्याची गति आहे; ' ' प्राणाची

गति काय ; ' असें विचारतां ' अन्न ' आणि ' अन्नाची गति काय; ' तर ' आप म्हणजे जल; ' असें दाल्भ्यानें उत्तर दिलें. याप्रमाणें येथें प्रश्नोत्तरपरंपरा आहे, सामाची गति स्वर, स्वराची प्राण, प्राणाची अन्न, आणि अन्नाची जल अशी ही परंपरा आहे. गति म्हणजे आश्रय अथवा परायण—॥ ४ ॥

लब्धानुमतिराह—का साम्नः, प्रकृतत्वादुद्गीथस्य, उद्गीथो ह्यत्रोपास्यत्वेन प्रकृतः। "परोवरीयांसमुद्गीथम्" इति च वक्ष्यति। गतिराश्रयः परायणमित्येतत्। एवं पृष्टो दाल्भ्य उवाच—स्वर इति। स्वरात्मकत्वात्साम्नः। यो यदात्मकः स तद्गतिस्तदाश्रयश्च भवतीति युक्तं मृदाश्रय इव घटादिः। स्वरस्य का गतिरिति, प्राण इति होवाच। प्राणनिष्पाद्यो हि स्वरस्तस्मात्स्वरस्य प्राणो गतिः। प्राणस्य का गतिरित्यन्नमिति होवाच। अन्नावष्टम्भो हि प्राणः "शुष्यति वै प्राण ऋतेऽन्नात्" इति हि श्रुतेः। "अन्नं दाम" इति च। अन्नस्य का गतिरित्याप इति होवाच। अप्संभवत्वादन्नस्य॥ ४॥

**सिद्धान्ती**— प्रश्न करण्याची परवानगी मिळाल्यावर शिलकानें विचारलें, ' सामाची गति काय ? तें सांग.' प्रस्तुत उपास्यदृष्टीनें उद्गीथाचें प्रकरण चाललें आहे, म्हणून ' साम ' याचा अर्थ येथें उद्गीथ हा आहे. पुढेंही ' उद्गीथ हा सर्व श्रेष्ठ वस्तूंत अत्यंत श्रेष्ठ वस्तु आहे ' असें याच प्रकरणांत श्रुति सांगेल. तात्पर्य उद्गीथाची गति काय ? हा पहिला प्रश्न आहे.

शि०—गति म्हणजे ?

**सिद्धान्ती**—गति म्हणजे आश्रय, आधारस्थान किंवा परायण अथवा शेवटचें अधिष्ठान होय. हा प्रश्न ऐकून दाल्भ्य म्हणाला, ' स्वर ही सामाची गति आहे. ' साम स्वरात्मक असतो, जो ज्याचा आत्मा असतो तो त्याची गति किंवा आश्रय असतो ' असें म्हणणें योग्यच आहे. स्वर हा सामाचें व्यंजन करितो, त्याला प्रकट करितो ( म्हणजे त्याला आश्रयभूत होतो, सामाचा आत्मा होतो ) म्हणून स्वर हा सामाची गति आहे. घटाचा आश्रय जशी मृत्तिका, तसाच स्वर हा सामाचा आश्रय ( कारण, आधार ) आहे. ' स्वराची गति काय ? त्याचें परायण कोणतें ?' असें विचारतां ' ज्यापासून स्वराची उत्पत्ति होते, तो प्राण स्वराचें परायण आहे. ' 'प्राणाची गति काय ?' असें शिलकानें

विचारलें. तेव्हां 'प्राणाला आश्रय देणारें जें अन्न तें प्राणाचें परायण आहे.' हें उत्तर दाल्भ्यानें दिलें. 'अन्न जर नसेल तर प्राणाचें शोषण होतें' ही वाजसनेय श्रुति प्रमाण आहे. तसेंच 'गोवत्साच्या स्थानीं असणारा जो प्राण त्याचें दाम (दावें) अन्न आहे' अशी दुसरी श्रुति आहे. आणि 'अन्नाची गति काय?' असें विचारतां अन्नाची उत्पत्ति करणारें जल ही 'अन्नाची गति आहे.' असें उत्तर मिळालें. 'जलापासून अन्नोत्पत्ति होते, हें आपल्यास दिसतें.' "जलांनीं अन्नाची उत्पत्ति केली" अशी श्रुतिही आहे ॥ ४ ॥

---

## मंत्र पांचवा.

**अपां का गतिरित्यसौ लोक इति होवाचामुष्य लोकस्य का गतिरिति न स्वर्गं लोकमतिनयेदिति होवाच स्वर्गं वयं लोकꣳसामाभिसंस्थापयामः स्वर्गसꣳस्तावꣳहि सामेति ॥ ५ ॥**

**अन्वय व अर्थः—'अपां का गतिः' इति; 'असौ लोकः' इति ह उवाच । 'अमुष्य लोकस्य का गतिः' इति** ('जलाची गति काय?' या प्रश्नाला 'तो लोक' असें उत्तर मिळालें. 'त्या द्युलोकाची गति काय?' असा प्रश्न शिलकानें विचारला) **'न स्वर्गं लोकं अतिनयेत्' इति ह उवाच** (स्वर्गलोकाच्या पलीकडे सामाची गति नाहीं, असें दाल्भ्यानें उत्तर दिलें) **वयं स्वर्गं लोकं साम अभिसंस्थापयामः** (आम्हीं सामाची संस्थापना स्वर्गलोकामध्येंच करितों) **हि स्वर्गसंस्तावं साम इति** (कारण, सामाचें स्वर्गरूपानेंच संस्तवन होतें) याप्रमाणें हें दाल्भ्याचें म्हणणें आहे ॥ ५ ॥

अपां का गतिरित्यसौ लोक इति होवाच । अमुष्माल्लोकाद्वृष्टिः संभवति । अमुष्य लोकस्य का गतिरिति पृष्टो दाल्भ्य उवाच—स्वर्गममुं लोकमतीत्याश्रयान्तरं साम न नयेत्कश्चिदिति होवाचाऽऽह । अतो वयमपि स्वर्गं लोकं समाभिसंस्थापयामः । स्वर्गलोकप्रतिष्ठं साम जानीम इत्यर्थः । स्वर्गसंस्तावं स्वर्गत्वेन संस्तवनं

संस्तावो यस्य तत्साम स्वर्गसंस्तावं हि 'यस्मात्स्वर्गो वै लोकः साम वेद इति श्रुतिः' ॥ ५ ॥

सिद्धान्ती—'जलांची गति काय?' असें शिलकानें विचारलें; तेव्हां 'ज्या द्युलोकापासून पर्जन्यवृष्टि होते, तो द्युलोक सामाचें परायण आहे', असें दाल्भ्य म्हणाला. नंतर 'द्युलोकाची गति काय ?' असें विचारतां दाल्भ्य म्हणाला, 'स्वर्ग लोकाचें अतिक्रमण करून कोणीही सामाला स्वर्गाशिवाय दुसरें आश्रयस्थान पाहूं नये, असा नियम आहे. म्हणून आम्हीही स्वर्ग लोक हेंच सामाचें अथवा उद्गीथाचें शेवटचें आश्रयस्थान आहे, असें समजतों. तात्पर्य, साम हें स्वर्गलोकामध्यें प्रतिष्ठित होतें. स्वर्ग हेंच त्याचें अंतिम परायण आहे, असें आम्ही समजतों. तसेंच, स्वर्गत्व आहे, संस्तवन म्हणजे स्तुति ज्याची तें साम होय, असें सामाचें लक्षण आहे. साम स्वर्ग आहे असें म्हटलें म्हणजे सामाची स्तुति होते. कारण सामवेद हाच स्वर्गलोक आहे, असें जो जाणतो' इत्यादि श्रुतीचें वाक्य आहे॥५॥

---

## मंत्र सहावा.

**तꣳह शिलकः शालावत्यश्चैकितायनं दाल्भ्यमुवाचाप्रतिष्ठितं वै किल ते दाल्भ्य साम यस्त्वेतर्हि ब्रूयान्मूर्धा ते विपतिष्यतीति मूर्धा ते विपतेदिति ॥ ६ ॥**

**अन्वय व अर्थः—शालावत्यः शिलकः तं चैकितायनं दाल्भ्यं उवाच ह** ( चैकितायन दाल्भ्याला शालावत्य शिलक म्हणाला ) **दाल्भ्य ते साम अप्रतिष्ठितं वै किल** (हे दाल्भ्या! तुझें साम अप्रतिष्ठित आहे ) **यः तु एतर्हि ब्रूयात् ' ते मूर्धा विपतिष्यति इति ' ते मूर्धा विपतेत् इति** ( ह्या वेळीं ' तुझें मस्तक खालीं पडेल, ' असें जर कोणी ज्ञाता म्हणाला, तर तुझें मस्तक खालीं पडेल ) ॥ ६ ॥

तमितरः शिलकः शालावत्यश्चैकितायनं दाल्भ्यमुवाच—अप्रतिष्ठितमसंस्थितं परोवरीयस्त्वेनासमाप्तगति सामेत्यर्थः । वा इत्यागमं स्मारयति किलेति च, दाल्भ्य ते तव साम । यस्त्वसहिष्णुः सामविदेतर्ह्येतस्मिन्काले ब्रूयात्कश्चिद्विपरीतविज्ञानमप्रतिष्ठितं साम

प्रतिष्ठितमित्येवंवादापराधिनं मूर्धा शिरस्ते विपतिष्यति विस्पष्टं पतिष्यतीति । एवमुक्तस्यापराधिनस्तथैव तद्विपतेन्न संशयो न त्वहं ब्रवीमीत्यभिप्रायः । ननु मूर्धपातार्हं चेदपराधं कृतवानतः परेणानुक्तस्यापि पतेन्मूर्धा न चेदपराध्युक्तस्यापि नैव पतति । अन्यथाऽकृताभ्यागमः कृतनाशश्च स्याताम् । नैष दोषः । कृतस्य कर्मणः शुभाशुभस्य फलप्राप्तेर्देशकालनिमित्तापेक्षत्वात् । तत्रैवं सति मूर्धपातनिमित्तस्याप्यज्ञानस्य पराभिव्याहारनिमित्तापेक्षत्वमिति ॥६॥

**सिद्धान्ती**—यानंतर वादविवाद करणारा प्रतिपक्षी म्हणजे शालावत्य शिलक चैकितायन दाल्भ्याला म्हणालाः—हे दाल्भ्य, तुझें साम अप्रतिष्ठित आहे, त्याला कायमचें, न हालणारें स्थान मिळालें नाहीं. सर्व श्रेष्ठ स्थानांहून अतिश्रेष्ठ, कूटस्थ स्थान सामाला प्राप्त झालें नाहीं.म्हणून त्याची गति पूर्ण झाली नाहीं.तात्पर्य, त्याला कायमचा आश्रय मिळाला नाहीं. यद्यपि अनित्यात्मक स्वर्गस्थान त्याला मिळालें, तथापि त्याचें पुढें जाणें संपलें, असें झालें नाहीं. हा न्याय तुझ्या ध्यानांत असूं दे. ‘ सामाला पराकाष्ठेचें श्रेष्ठ आश्रयस्थान आहे, स्वर्ग हें त्याचें अंतिम आश्रयस्थान नव्हे; ’ असें श्रुति म्हणते. वै व ‘ किल ’ या पदांनीं हा सर्व अर्थ सुचविला. असो; शिलक म्हणाला, जर कोणी एखाद्या असहिष्णु सामवेत्त्यानें—

**शिष्य**—असहिष्णु म्हणजे ?

**सिद्धान्ती**—ज्याला मिथ्यां वचनाचें श्रवण सहन होत नाहीं, अशा सामवेत्त्यानें हें वाक्य जर ह्या कालीं ऐकलें—

**शिष्य**—ह्या कालीं म्हणजे ?

**सिद्धान्ती**—मिथ्या वचनाच्या वेळीं. असो; जर असहिष्णु पुरुषानें हें तुझें वाक्य ऐकलें, तर तो एकदम शाप देण्याला तयार होईल.

**शिष्य**—शाप काय म्हणून ? भगवन् !

**सिद्धान्ती**—वस्तुतः सामाला उत्कृष्ट आणि कायमचा आधार असतांना, सामाला कायमचा आधार असतांनाही, तो न घेतां एखादा कालभंगुर आधार घेऊन तोच कायमचा आधार आहे असें आपल्या अयथार्थ ज्ञानानें कोणी म्हणेल व तेंच प्रतिष्ठित आहे, असें जो विपरीत ज्ञानी आपल्या म्हणण्यानें सिद्ध करील, तो एक प्रकारचा अपराधच होतो. अपराध्याला शासन करावें, हा न्याय आहे. म्हणून तो असहिष्णु सामवेत्ता अयथार्थ ज्ञानामुळें उत्पन्न होणारा अपराध करणाऱ्या पुरुषाला ‘ तुझें मस्तक खालीं पडो, ’ ‘ छिन्नविच्छिन्न होवो ’ असा शाप देईल; आणि या शापाप्रमाणें तुझें मस्तक खालीं पडेल !

शिष्य—सारांश, सामाचें परायण स्थान श्रुति द्वारां माहित होण्याचा संभव असतां जर कोणी अन्यथा ज्ञानी पुरुषानें कालभंगुर आधार देऊन 'तेंच प्रतिष्ठा आहे' असें म्हटलें, तर तो अपराधी होतो आणि त्याच वेळीं तेथें यथार्थ सामवेत्ता हजर असून या अपराधाबद्दल शाप देता झाला, तर अयथार्थ विधान करणाऱ्या पुरुषाचे मस्तक निःसंशय छिन्नविच्छिन्न होतें; असें शिलकाला सांगावयाचें आहे.

पूर्वपक्षी—हें जर खरें तर दाल्भ्याचें मस्तक कां खालीं पडलें नाहीं ?

सिद्धान्ती—"मी 'त्वन्मस्तकपात होवो !' असें म्हणत नाहीं. मी सामवेत्ता आहें तरी तुला शाप देत नाहीं" असें शिलक म्हणाला.

पूर्वपक्षी—म्हणाला असेल; पण शिरःपातासारखा जर दाल्भ्यानें अपराध केला होता, तर, कोणी तेथें शाप देणारा असो, वा नसो, अपराध्याचा मस्तकच्छेद झालाच पाहिजे होता. बरें; साम अप्रतिष्ठित आहे, असें म्हणण्यानें जर अपराधच होत नसेल, तर कोणीही शाप दिला, तरी निरपराधी पुरुषाचें मस्तक खालीं पडावयाचें नाहीं. पण असें नसून, म्हणजे अपराध नसून शिरच्छेद होत असेल, तर अकृताभ्यागमाचा दोष, (कर्म न करितां फलभोग प्राप्त होण्याचा दोष) प्राप्त होतो आणि अपराध करूनही शाप देणाऱ्याच्या अभावानें मस्तकपात झाला नाहीं, तर कृतनाशाचा दोष (कर्म करून त्याचें फल प्राप्त न होणें हा दोष) प्राप्त होतो. एवंच दोन्ही प्रकारें हें वाक्य दुष्ट होतें.

सिद्धान्ती—दुष्ट होत नाहीं. कारण, जें काय आपण शुभाशुभ कर्म केलें असेल, त्याची फलप्राप्ति निश्चयानें होते; पण ती देशाची, कालाची, आणि निमित्ताची अपेक्षा असून होते. फलप्राप्ति होण्याला देश, काल, निमित्त हीं अनुकूल नसतील, तर तें पापपुण्यात्मक फल प्रकट होत नाहीं. असा हा सामान्यतः ईश्वरी नियम आहे. शिरःपात होण्यासारखा अपराध व 'शिरःपात होवो' असा प्रत्यक्ष शाप देणारा सामवेत्ता, या दोन कारणांनीं शिरःपात होतो, असा नियम आहे. प्रस्तुत प्रकरणीं दाल्भ्याला यद्यपि शिरःपात उत्पन्न करणारें अज्ञान होतें; तथापि शाप देणारी इच्छा असलेला सामवेत्ता तेथें प्रत्यक्ष नव्हता. एका सहकारी कारणाचा अभाव होता, म्हणून शिरःपात झाला नाहीं. सर्व प्रधान-गौण कारणें समवेत (एकत्र) झाल्याशिवाय कार्योत्पत्ति होत नाहीं, हें विसरूं नका. तात्पर्य, श्रुतीनें जो शाप सांगितला आहे तो अर्थवंत आहेच. पण शिलकाला शाप देण्याची इच्छा नव्हती, म्हणून दाल्भ्याचा शिरःपात झाला नाहीं ॥ ६ ॥

---

## मंत्र सातवा.

**हन्ताहमेतद्भगवतो वेदानीति विद्धीति होवाचामुष्य लोकस्य का गतिरित्ययं लोक इति होवाचास्य लोकस्य का गतिरिति न प्रतिष्ठां लोकमतिनयेदिति होवाच प्रतिष्ठां वयं लोकꣳ सामाभिसꣳस्थापयामः प्रतिष्ठासꣳस्तावꣳ हि सामेति ॥ ७ ॥**

अन्वय व अर्थः—' **हंत, भगवतः अहं एतत् वेदानि**' इति (' हे भगवन् ! शिलक,! तुझ्यापासून हें अंतिम परायण जाणण्याची माझी इच्छा आहे;' असें दाल्भ्य म्हणाला) '**विद्धि, इति ह उवाच** ( 'जाणून घे' असें शिलक म्हणाला (' **अमुष्य लोकस्य का गतिः**' इति; ' **अयं लोकः** ' इति ह **उवाच** । ' **अस्य लोकस्य का गतिः** ' इति; ' **लोकं अति प्रतिष्ठां न नयेत्**' इति ह **उवाच** । " **वयं ' लोकं प्रतिष्ठां साम ' अभिसंस्थापयामः; हि साम प्रतिष्ठासंस्तावं** " इति ('त्या द्यु-लोकाची गति काय? ' ह्या दाल्भ्य-प्रश्नाला ' हा लोक' असें शिलकानें उत्तर दिलें. 'ह्या लोकाची गति काय ? ' असें विचारतां " ह्या लोकाचें अतिक्रमण करून सामाला दुसरी प्रतिष्ठा आहे अशी कल्पना करूं नये, असें शास्त्र आहे. म्हणून आम्हीं ' हा लोक म्हणजे सामाची प्रतिष्ठा' असें स्थापन करितों. कारण "साम हें प्रतिष्ठासंस्ताव आहे अशी श्रुति प्रमाण आहे." सामाची या लोकांतच प्रतिष्ठापना झाली आहे; अशी स्तुति श्रुति करित असते' असें शिलक म्हणाला ) ॥ ७ ॥

एवमुक्तो दाल्भ्य आह—'हन्ताहमेतद्भगवतो वेदानि यत्प्रतिष्ठं सामे' त्युक्तः प्रत्युवाच शालावत्यो 'विद्धीति' होवाच । 'अमुष्य लोकस्य का गतिरि' ति पृष्टो दाल्भ्येन शालावत्यो' ऽयं लोक' इति होवाच । 'अयं हि लोको यागदानहोमादिभिरमुं लोकं पुष्यतीति । " अतःप्रदानं देवा उपजीवन्ति " इति हि श्रुतयः । प्रत्यक्षं हि सर्वभूतानां धरणी प्रतिष्ठेति । अतः साम्नोऽप्ययं लोकः प्रतिष्ठैवेति

युक्तम्।' 'अस्य लोकस्य का गतिरित्यु' क्त आह शालावत्यः। 'न प्रतिष्ठामिमं लोकमतीत्य नयेत्साम कश्चित्। अतो वयं प्रतिष्ठा लोकं सामाभिसंस्थापयामः। यस्मात्प्रतिष्ठासंस्तावं हि प्रतिष्ठात्वेन संस्तुतं सामेत्यर्थः। "इयं वै रथंतरम्" इति च श्रुतिः' ॥ ७ ॥

सिद्धान्ती—शिलकाचें वचन ऐकून दाल्भ्य म्हणाला: 'भगवन्! आपल्यापासून सामाचें परायण (शेवटचें आश्रयस्थान) कोणतें आहे, हें जाणून घेण्याची माझी इच्छा आहे.' शिलक म्हणाला, 'खुशाल जाणून घे.' तेव्हां दाल्भ्यानें प्रश्न केला. 'त्या द्यु-लोकाची गति काय?' शालावत्य शिलक म्हणाला, "द्यु लोकाची गति हा आपला भूलोक होय. याग, दान, होम, श्राद्ध, इत्यादि कर्मांमुळेंच स्वर्गलोक पुष्ट होतो. 'अग्निद्वारा चरुपुरोडाशादि देवांस अर्पण केलें तरच देवांचें उपजीवन होतें' अशी श्रौतामध्यें प्रसिद्धि आहे. तसेंच आपल्यास प्रत्यक्ष अनुभव आहे कीं, आपली भूमाता सर्व भूतांचें आधारस्थान आहे. अशा या प्रत्यक्ष आणि श्रौत प्रमाणांवरून सर्वांमध्यें अंतर्भूत होणाऱ्या सामाचा ही आश्रय हाच भूलोक आहे, असें ठरतें." असो; 'ह्या लोकाची गति काय!' असें विचारल्यावर शालावत्य म्हणाला, 'ह्या लोकाचें अतिक्रमण करून सामाला दुसरें कांहीं आधारस्थान आहे, असें समजूं नये. शास्त्र असेंच म्हणत आहे, म्हणून आम्ही सुद्धां 'हा लोकच सामाची कायमची व शेवटची प्रतिष्ठा आहे' असें समजतों. शिवाय 'रथंतर नामक साम हीच पृथिवी आहे,' अशी श्रुतीनें स्तुति केली आहे. म्हणून हा लोकच सामाची प्रतिष्ठा आहे, याच प्रतिष्ठेनें सामाचें संस्तवन होतें; हें सत्य आहे. यावरून उद्गीथाची प्रतिष्ठा ही पृथिवी आहे. पृथिव्यात्मक उद्गीथ आहे, ही कल्पना ठीक जुळते;" असें शिलकानें उत्तर दिलें ॥ ७ ॥

---

## मंत्र आठवा.

**त॰ ह प्रवाहणो जैवलिरुवाचान्तवद्वै किल ते शालावत्य साम यस्त्वेतर्हि ब्रूयान्मूर्धा ते विपतिष्यतीति मूर्धा ते विपतेदिति हन्ताहमेतद्भगवतो वेदानीति विद्धीति होवाच ॥ ८ ॥**

**इति प्रथमध्यायस्याष्टमः खण्डः ॥ ८ ॥**

**अन्वय व अर्थः—प्रवाहणः जवलिः तं उवाच ह । "शालावत्य ! ते साम अंतवत् वैः यः तु एतर्हि ब्रूयात् ते मूर्धा विपतेत् इति "।** ( प्रवाहण जैवलि शिलकाला म्हणालाः "शालावत्या, तुझें साम सांत आहे. 'तुझा शिरच्छेद होईल ' असा शाप देणारा जर येथें व आतां एखादा सामवेत्ता प्रत्यक्ष असता आणि त्यानें शाप दिला असता, तर तुझें मस्तक च्छिन्न झालें असतें. " ) **' हंत भगवतः अहं एतत् वेदानि ' इति ' विद्धि ' इति उवाच ह** (' हे भगवान्, प्रवहण, तुझ्यापासून सामाचें परायण जाणून घेण्याचीं माझी इच्छा आहे. घेऊं काय ?' असें शिलकानें विचारल्यावर ' खुशाल जाणून घे. मी सांगतों' असें प्रवहण म्हणाला) ८

तमेवमुक्तवन्तं ह प्रवाहणो जैवलिरुवाचान्तवद्वै किल ते शालावत्य सामेत्यादि पूर्ववत् । तत शालावत्य आह—हन्ताहमेतद्भगवतो वेदानीति विद्धीति होवाचेतरोऽनुज्ञात आह ॥ ८ ॥

इति प्रथमाध्यायस्याष्टमः खण्डः ॥ ८ ॥

**सिद्धान्ती**—शिलकाचें हें बोलणें ऐकून प्रवाहण जैवलि म्हणालाः ' शालावत्या ! तुझें साम अंतवंत ( अप्रातिष्ठित ) आहे.

**शि०**—पुढील मंत्रभागाचा अर्थ सातव्या मंत्राप्रमाणेंच आहे.

**सिद्धान्ती**—नंतर शालावत्य म्हणालाः–' हे भगवन् प्रवाहण ! तुझ्यापासून अंतवंत नसणाऱ्या सामाची जाणीव करून घ्यावी, अशी माझी इच्छा आहे.' ' मग मला काय ठाऊक आहे, तें तुला सांगतों ' असें प्रवाहण म्हणाल्यावर शालावत्य शिलक म्हणाला—

**शि०**—प्रवाहणानें त्याला विचारण्याची परवानगी दिली, तेव्हां शिलकानें काय विचारिलें ?

**सिद्धान्ती**—नवव्या खंडांत त्याचें उत्तर येणार आहे ॥ ८ ॥

आठवा खंड समाप्त.

---

## नवमः खण्डः ।

### मंत्र पहिला.

**:य लोकस्य का गतिरित्याकाश इति होवाच ाणि ह वा इमानि भूतान्याकाशादेव समुत्प- न्त आकाशं प्रत्यस्तं यन्त्याकाशो ह्येवैभ्यो ायानाकाशः परायणम् ॥ १ ॥**

व **अर्थः—'अस्य लोकस्य का गतिः'** इति; **'आकाशः'** ाच ('ह्या लोकाची गति कोणती?' असें विचारलें, तेव्हां ाला 'आकाश आहे') **'सर्वाणि ह इमानि भूतानि आकाशात् द्यन्ते वै आकाशं प्रति अस्तं यन्ति'** (यच्चयावत् सर्व ापासून मात्र उत्पन्न होतात, आणि आकाशामध्येंच अस्तंगत **एभ्यः ज्यायान् आकाशः परायणम्'** ('या सर्व भूतांपेक्षां तऱ्हेनें मोठें आहे, म्हणून तें त्यांचें परायण आहे') ॥ १ ॥

लोकस्य का गतिरिति । आकाश इति होवाच प्रवाहणः । इति च पर आत्माऽऽकाशो वै नामेति श्रुतेः । तस्य हि भूतोत्पादकत्वम् । तस्मिन्नेव हि भूतप्रलयः । "तत्तेजोऽसृ- जः परस्यां देवतायामिति" हि वक्ष्यति । सर्वाणि ह वा ूतानि स्थावरजङ्गमान्याकाशादेव समुत्पद्यन्ते तेजोवन्ना- सामर्थ्यात् । आकाशं प्रत्यस्तं यन्ति, प्रलयकाले तेनैव ःमेण हि यस्मादाकाश एवेभ्यः सर्वेभ्यो भूतेभ्यो ज्याया- ःतः स सर्वेषां भूतानां परमयनं परायणं प्रतिष्ठा त्रिष्वपि यर्थः ॥ १ ॥

— 'ह्या भूलोकाची गति काय? त्यांचें अंतिम आश्रयस्थान शालावत्यानें विचारलें. तेव्हां 'आकाश हें त्याचें परायण आहे,' ं उत्तर दिलें.

आकाश म्हणजे आपल्यास जें भूताकाश दिसतें, तेंच पंचभौतिक- :१

सिद्धान्ती--नाहीं. येथें आकाश म्हणजे परमात्मा. त्याच्या इच्छामात्रें-करून सर्व भूतांची उत्पत्ति होते; आणि त्याच्या मध्येंच मात्र ह्या सर्वांचा लय होतो; म्हणून येथें आकाश याचा अर्थ परमात्मा असा आहे. भूताकाशाला हें सामर्थ्य नाहीं, 'पर आत्मा आकाश आहे' ही श्रुति आहे. आणि 'परमात्म्यानेंच तेज उत्पन्न केलें आणि हें तेज परमश्रेष्ठ जी देवता त्यामध्यें लीन होतें,' असें पुढें श्रुति सांगेल. अर्थात् परमात्मा सर्व भूतांचें परायण आहे. आकाशही परायण आहे. कारण, तेथूनच तेज, आप, अन्न, इत्यादि क्रमानें सर्व स्थावर-जगम अथवा चेतनाचेतन भूतें उत्पन्न होतात, असें श्रुति प्रत्यक्ष सांगते. 'आत्म्यापासून आकाश उत्पन्न झालें' अशीही श्रुति आहे. तसेंच, आकाशामध्येंच प्रलयकालीं सर्व भूतांचा लय होतो.

शिष्यः—हा लय कसा होतो ?

सिद्धान्तीः—अन्न आपल्या कारणांत म्हणजे जलांत लीन होतें. जल स्वकारणांत म्हणजे तेजांत लीन होतें आणि तेज स्वकारणांत, आकाशांत लीन होतें; असा हा विपरीत क्रम आहे. उत्पत्तिक्रमाच्या विरुद्धदिशेनें प्रलयक्रमाची दिशा असते. असो; याप्रमाणें आकाश म्हणजे परमात्मा. हें परायण आहे. कारण; उघड आहे कीं, आकाश सर्वभूतांपेक्षां श्रेष्ठ आहे. तेव्हां हें उघड झालें कीं, तिन्ही कालीं सर्व भूतांचें परायण आकाश आहे. आकाशच सर्वप्रतिष्ठापक आहे. परमात्माही सर्वांचें परायण आहे; म्हणून या मंत्रांत आकाश म्हणजे परमात्मा होय ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**स एष परोवरीयानुद्गीथः स एषोऽनन्तः परोवरीयो हास्य भवति परोवरीयसो ह लोकाञ्जयति य एतदेवं विद्वान्परोवरीयांसमुद्गीथमुपास्ते ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः—सः एषः परोवरीयान् उद्गीथः** (तो हा श्रेष्ठाचा; हीं श्रेष्ठ परमात्मा उद्गीथ आहे अशी भावना करावी) **सः एषः अनंतः परोवरीयः** (तो हा अनंत व श्रेष्ठाहून श्रेष्ठ आहे, असें समजून ज्ञानी उपासक श्रेष्ठ उद्गीथाची उपासना करितो) **अस्य परोवरीयः भवति ह; परोवरीयसः लोकान् जयति** (ज्ञानी उपासकाचें जीवन अति श्रेष्ठ होतें; आणि तो श्रेष्ठ आणि श्रेष्ठतर लोकांचा स्वामी होतो) **यः एतत्**

**परोवरीयांसं उद्गीथं उपास्ते** ( जो ज्ञानी उपासक अति श्रेष्ठ उद्गीथाची उपासना करितो, त्याला आतांच सांगितलेलें फल प्राप्त होतें ) ॥ २ ॥

यस्मात्परं परं वरीयो वरीयसोऽप्येष वरः परश्च वरीयांश्च परोवरीयानुद्गीथः परमात्मा संपन्न इत्यर्थः । अत एव स एषोऽनन्तोऽविद्यमानान्तस्तमेतं परोवरीयांसं परमात्मभूतमनन्तमेव विद्वान्परोवरीयांसमुद्गीथमुपास्ते । तस्यैतत्फलमाह—परोवरीयः परं परं वरीयो विशिष्टतरं जीवनं हास्य विदुषो भवति दृष्टं फलमदृष्टं च परोवरीयस उत्तरोत्तरविशिष्टतरानेव ब्रह्माकाशान्ताँल्लोकाञ्जयति य एतदेवं विद्वानुद्गीथमुपास्ते ॥ २ ॥

**सिद्धान्ती**—' पर ' म्हणजे अतिश्रेष्ठ; ' वरीयस् ' म्हणजे त्याच्याहूनही श्रेष्ठ. पर असून वरीयस असणारा तो परोवरीयान् ( म्हणजे श्रेष्ठांतील सर्वश्रेष्ठ ) होय. मागच्या मंत्रांत आकाश परमात्मा आहे, हें सांगितलें. आकाश हें उद्गीथाचें परायण आहे, असेंही तेथें प्रतिपादन केलें.

**शिष्य**—म्हणजे उद्गीथाचें अतिश्रेष्ठ स्वरूप आकाश आहे, असें झालें; व उद्गीथच आकाश आहे, अशी भावना करावी; असेंही झालें.

**सिद्धान्ती**—आणि आकाश परमात्मा आहे, म्हणून उद्गीथ परमात्मा झाला. तात्पर्य, परमात्मदृष्टीनें उद्गीथाची उपासना करावी, असें ठरलें. परमात्मा अनंत आहे, त्याचा अंत कोणासही कळत नाहीं. त्याला अंत नाहीं, तेव्हां सर्वश्रेष्ठ आणि अनंत जो परमात्मा तोच उद्गीथ आहे, असें समजून परमात्मदृष्टीनें ( अनंत व सर्वश्रेष्ठ उद्गीथ आहे, अशा दृष्टीनें ) उद्गीथाची उपासना करितो, त्याला फलप्राप्ति काय होते, तें सांगतातः त्या विद्वानाची जीवयात्रा श्रेष्ठ व श्रेष्ठतर होत जाते, हें तर दृष्ट फल आहे. उद्गीथाचें स्वरूप समजून घेऊन त्याची परमात्म–दृष्टीनें उपासना करणाऱ्या ज्ञानी उपासकाचें जीवन उत्तरोत्तर शुद्ध आणि संस्कृत होत जातें. या लोकींच हें फल दिसतें. तसेंच, उत्तरोत्तर शुद्ध आणि शुद्धतर होत जाणाऱ्या ब्रह्माकाशापर्यंतच्या सर्व लोकांवर, सर्व भुवनांवर, याचें स्वामित्व स्थापित होतें. हें अदृष्ट फल होय. असो; परमात्मदृष्टीनें उद्गीथाची उपासना करणाऱ्या ज्ञानी उपासकाला ही अशी दृष्टादृष्ट–फलांची प्राप्ति होते ॥ २ ॥

## मंत्र तिसरा.

**तꣳ हैतमतिधन्वा शौनक उदरशाण्डिल्यायो-क्त्वोवाच यावत्त एनं प्रजायामुद्गीथं वेदिष्यन्ते परोवरीयो हैभ्यस्तावदस्मिँल्लोके जीवनं भविष्यति॥३॥**

अन्वय व अर्थः—**अतिधन्वा शौनकः उदरशांडिल्याय तं एतं उक्त्वा उवाच** (शुनककुलांतील अतिधन्वा नामक ज्ञानी उद्गीथोपासक उदरशांडिल्याला उद्गीथाचें स्वरूप सांगून म्हणाला) **यावत् ते प्रजायां एनं उद्गीथं वेदिष्यंते, तावत् अस्मिन् लोके एभ्यः परोवरीयः जीवनं भविष्यति** (जोंपर्यंत तुझे कुलांतील पुत्रपौत्रादि वंशज हें उद्गीथ-स्वरूप समजून उपासना करतील, तोंपर्यंत ह्या लोकामध्येंच पण ह्या लोकाहून श्रेष्ठ आणि श्रेष्ठप्रकारचें अपूर्व जीवन त्यांस उपभोगावयास सांपडेल) ॥ ३ ॥

किं च तमेतमुद्गीथं विद्वानतिधन्वा नामतः शुनकस्यापत्यं शौनक उदरशाण्डिल्याय शिष्यायैतमुद्गीथदर्शनमुक्त्वोवाच । यावत्ते तव प्रजायां प्रजासंततावित्यर्थः । एनमुद्गीथं त्वत्संततिजा वेदिष्यन्ते ज्ञास्यन्ति तावन्तं कालं परोवरीयो हैभ्यः प्रसिद्धेभ्यो लौकिकजीवनेभ्य उत्तरोत्तरविशिष्टतरं जीवनं तेभ्यो भविष्यति ॥३॥

**सिद्धान्ती**—आणखी; त्या ह्या उद्गीथाचें ज्ञान शुनकपुत्र अतिधन्वा नांवाचा होता, त्याला होतें. त्यानें उदरशांडिल्य नामक आपल्या शिष्यास उद्गीथाचें स्वरूप समजून दिलें; आणि शेवटीं म्हणाला, तुझ्या कुलांतील पुत्रपौत्रादि संततीमध्यें जोंपर्यंत उद्गीथज्ञान असणारे व उद्गीथोपासना करणारे तुझे वंशज असतील, तोंपर्यंत प्रसिद्ध असणाऱ्या ह्या लौकिक संपत्तीपेक्षां उत्तरोत्तर विशेषप्रकारचें सुख देणारी अद्वितीय जीवयात्रा त्यांना ह्या लोकींही करण्यास सांपडेल. तात्पर्य, येथें असलेलीं जीं मोठमोठालीं सुखसाधनें आहेत, त्यांच्यापेक्षां श्रेष्ठ श्रेष्ठ साधनें उद्गीथोपासकांस प्राप्त होतील. असा हा अतिधन्व्याचा आशीर्वाद आहे ॥ ३ ॥

मंत्र चवथा.

**तथाऽमुष्मिँल्लोके लोक इति स य एतदेवं विद्वानुपास्ते परोवरीय एव हास्यास्मिँल्लोके जीवनं भवति तथाऽमुष्मिँल्लोके लोक इति लोके लोक इति ॥ ४ ॥**

**इति प्रथमाध्यायस्य नवमः खण्डः ॥ ९ ॥**

**अन्वय व अर्थः—' तथा अमुष्मिन् लोके लोकः इति** ( त्याचप्रमाणें त्या स्वर्गभुवनांतील अतिश्रेष्ठ भुवन त्यांस प्राप्त होईल ) **सः, यः एतत् एवं विद्वान् उपास्ते, अस्य अस्मिन् लोके परोवरीयः जीवनं भवति; तथा अमुष्मिन् लोके लोकः ' इति ' लोके लोकः ' इति** ( जो कोणी उद्गीथज्ञाता उद्गीथोपासना करितो, त्याची जीवन–यात्रा ह्या लोकामध्यें अत्यंत श्रेष्ठ होते, त्याचप्रमाणें स्वर्ग–लोकांतही अत्यंत श्रेष्ठ लोक त्याला मिळतो ) ॥ ४ ॥

तथाऽदृष्टेऽपि परलोकेऽमुष्मिन्परोवरीयाँल्लोको भविष्यतीत्युक्त्वाञ्छाण्डिल्यायातिधन्वा शौनकः । स्यादेतत्फलं पूर्वेषां महाभाग्यानां नैदंयुगीनानामित्याशङ्कानिवृत्तय आह — स यः कश्चिदेतदेवं विद्वानुद्गीथमेतर्ह्युपास्ते तस्याप्येवमेव परोवरीय एव हास्यास्मिँल्लोके जीवनं भवति तथाऽमुष्मिँल्लोके लोक इति लोके लोक इति ॥ ४ ॥

इति प्रथमाध्यायस्य नवमः खण्डः ॥ ९ ॥

**सिद्धान्ती**—मागच्या मंत्रांत अतिधन्व्यानें दृष्ट फल सांगितलें. येथें मंत्राच्या पहिल्या भागांत अदृष्ट फल सांगितलें आहे. ' अदृष्ट जो तो परलोक आहे, त्या लोकांतील अतिश्रेष्ठ भुवन उद्गीथोपासकाला प्राप्त होतें ' असें शांडिल्याला अतिधन्वा शौनक म्हणाला.

**पूर्वपक्षी**—पूर्वकालीन महाभाग्यवंत लोकांना तुम्ही सांगतां, त्या लौकिक व अलौकिक फलांची प्राप्ति झाली असेल. पण ह्या युगांत राहणाऱ्या लोकांना त्यांचें काय आहे ?

सिद्धान्ती—ही शंका निवारण करण्यासाठीं श्रुति नित्यसिद्धांत सांगते कीं, ह्या कालीं सुद्धां जर कोणीं उद्गीथाचें श्रुतिकथित स्वरूप समजून घेतलें आणि त्याची सांगोपांग उपासना यथाशास्त्र केली, तर त्यालाही आतांच सांगितल्या-प्रमाणें ह्या लोकीं अत्युत्कृष्ट प्रकारचें जविन आणि स्वर्गलोकीं अत्युत्कृष्ट भुवनाची प्राप्ति होईल. मंत्राच्या शेवटीं द्विरुक्ति आहे, ती खंडसमाप्तिप्रीत्यर्थ आणि उद्गीथोपासना–समाप्ति–प्रीत्यर्थ उल्लेखित केली आहे ॥ ४ ॥

नववा खंड संपला.

---

## खण्ड दहावा.

### मंत्र पहिला.

**मटचीहतेषु कुरुष्वाटिक्या सह जाययोषस्तिर्ह चाक्रायण इभ्यग्रामे प्रद्राणक उवास ॥ १ ॥**

अन्वय व अर्थः—मटचीहतेषु कुरुषु आटिक्या ज्यायया सह **चाक्रायणः उषस्तिः इभ्यग्रामे प्रद्राणकः उवास** ( मटचींनीं म्हणजे विद्युत्पातानें धान्यनाश झालेल्या कुरुदेशामध्यें आपल्या लहान बायकोसह उषस्ति नांवाचा अन्नार्थी चाक्रायण इभ्यग्रामांत अत्यंत दारिद्रिस्थितीनें राहत होता ) ॥ १ ॥

उद्गीथोपासनप्रसङ्गेन प्रस्तावप्रतिहारविषयमप्युपासनं कर्त (वक्त) व्यमितीदमारभ्यते । आख्यायिका तु सुखावबोधार्था । मटचीहतेषु मटच्योऽशनयस्ताभिर्हतेषु नाशितेषु कुरुषु कुरुसस्येष्वित्यर्थः । ततो दुर्भिक्षे जात आटिक्याऽनुपजातपयोधरादिस्त्रीव्यञ्जनया सह जाययोषस्तिर्ह नामतश्चक्रस्यापत्यं चाक्रायणः । इभो हस्ती तमर्हतीतीभ्य ईश्वरो हस्त्यारोहो वा तस्य ग्राम इभ्यग्रामस्तस्मिन्प्रद्राणकोऽन्नालाभात् । द्राकुत्सायां गतौ । कुत्सितां गतिं गतोऽन्त्यावस्थां प्राप्त इत्यर्थः । उवासोषितवान्कस्यचिद्गृहमाश्रित्य ॥ १ ॥

पूर्व०—येथपर्यंत उद्गीथाक्षराच्या उपासनेचे अनेक प्रकार तुम्हीं सांगितले व उपासनाप्रकरणही संपविलें. आतां कोणच्या प्रकरणाला आरंभ करणार?

सिद्धान्ती—अद्यापि उपासना-प्रकरण सर्वथा संपलें नाहीं. प्रस्ताव, प्रतिहार, हे उपासनांतर्गत विषय आहेत. यांचें कथन अजून व्हावयाचें आहे. त्यासाठीं ह्या प्रस्तावादि प्रकरणाला प्रारंभ केला आहे.

शिष्य—प्रस्ताव म्हणजे काय? प्रतिहार याचा अर्थ काय?

सिद्धान्ती—प्रस्तोत्यानें प्रथमतः सामस्तुतिपर मंत्र म्हणण्याचे असतात, त्याला प्रस्ताव म्हणतात. प्रतिहार म्हणजे सामस्तोत्रप्रतिहर्ता कांहीं विशेष अक्षरें (स्तोमाच्या शेवटच्या चरणांतील प्रारंभाचीं अक्षरें) गायनपूर्वक म्हणतो तो होय. असो; येथें विषय प्रत्यक्षत्वानें न सांगतां आख्यायिकारूपानें सांगितला आहे, त्याचा हेतु 'प्रस्ताव-प्रतिहारांचें' ज्ञान सौकर्यानें व्हावें, हा आहे. ऐकाः-मटची म्हणजे विद्युत्पात किंवा उल्कापात. एकदां कुरुदेशामध्यें पुष्कळसे विद्युत्पात होऊन तेथील धान्यादिकांची नासधूस झाली होती; तेथें सर्वथा दुर्भिक्ष झालें होतें. अन्न मिळण्याची अपेक्षा नाहीं, असें पाहून चक्राचा पुत्र उषस्ति चाक्रायण आपल्या वयानें अत्यंत लहान स्त्रीला घेऊन इभ्यग्रामांत प्रवेश करिता झाला.

शिष्य—मंत्रांत 'आटिक्या' हें पद आहे, त्याचा अर्थ 'वयानें लहान असणाऱ्या स्त्रीसह' असा अर्थ आपण सांगितला; पण मला त्या शब्दाचें गण-गोत्र समजलें नाहीं?

सिद्धान्ती—'अट' हिंडणें हा मूळचा धातु. 'फिरण्यास योग्य' असा आटिका या शब्दाचा यौगिक अर्थ होतो; तथापि आचार्यांनीं आटिका म्हणजे 'पयोधरादि स्त्रीचिन्हें उद्भूत न झालेली स्त्री' असा अर्थ केला आहे आणि तो केवळ प्रकरणांतील देशकालस्थिति लक्षांत ठेवून केला आहे.

पूर्व०—म्हणजे काय?

सिद्धान्ती—या स्त्रीसह स्वैर संचार करीत असतां केव्हांही तिच्या पतीला व्यभिचार-शंका आली नाहीं; यावरून असा अर्थ केला आहे.

शिष्य—इभ्यग्राम तें कोणतें?

सिद्धान्ती—इभ म्हणजे हस्ति. गजांतलक्ष्मी उपभोगण्यास जो योग्य असतो त्या श्रेष्ठ आणि भाग्यवान् पुरुषाला इभ्य म्हणावें. 'महात' असाही अर्थ होईल. त्याचें ग्राम तें इभ्यग्राम. कदाचित् 'हास्तिनापुर'ही असेल. असो; या इभ्य-ग्रामांत अन्नार्थी उषस्ति आपल्या स्त्रीसह अत्यंत दरिद्रावस्थेमध्यें राहिला होता. त्याला अन्नाची भ्रांत होती, हें असें सुचविण्यासाठीं 'प्रद्राणक' हें विशेषण

दिलें आहे. सारांश, प्राणयात्रा कशी करावी हेंही त्याला कळत नव्हतें. त्याची मति गुंग झाली होती. असो, तो अठरा विस्वे दरिद्री असा उषस्ति त्या ग्रामांत एका गृहस्थाच्या आश्रयानें वास्तव्य करून राहिला ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**स हेभ्यं कुल्माषान्खादन्तं बिभिक्षे; तꣳ होवाच। नेतोऽन्ये विद्यन्ते यच्च ये म इम उपनिहिता इति ॥२॥**

**अन्वय व अर्थः—सः कुल्माषान् खादंतं इभ्यं विभिक्षे** ( तो उषस्ति कुल्माष खाणाऱ्या इभ्यापाशीं भिक्षा मागता झाला ) **तं ह उवाच** ( इभ्य उषस्तीला म्हणाला ) **यच्च ये मे, उपनिहिताः इमे; इतः अन्ये न विद्यंते** ( मीं हे जे कुल्माष येथें ठेविले आहेत, त्यांपेक्षां दुसरे मजजवळ नाहींत. मजजवळ जे आहेत, ते हे उष्टे केलेले कुल्माष आहेत. यांशिवाय दुसरे नाहींत ) ॥ २ ॥

सोऽन्नार्थमटन्निभ्यं कुल्माषान्कुत्सितान्माषान्खादन्तं भक्षयन्तं यदृच्छयोपलभ्य बिभिक्षे याचितवान्। तमुषस्तिं होवाचेभ्यः। नेतोऽस्मान्मया भक्ष्यमाणादुच्छिष्टराशेः कुल्माषा अन्ये न विद्यन्ते। यच्च ये राशौ मे ममोपनिहिताः प्रक्षिप्ता इमे भाजने; किं करोमीत्युक्तः प्रत्युवाचोषस्तिः ॥ २ ॥

**सिद्धान्ती**—अन्नासाठीं भिक्षा मागत हिंडणारा उषस्ति एका इभ्याच्या ( हस्तिपकाच्या ? ) घरीं सहज गेला. तेव्हां तो घरधनी निषिद्ध माष (उडीद ?) खात होता. उषस्तीनें 'मला कांहीं तरी खाण्यास द्या' असें दीन वाणीनें अन्नदान मागितलें. तेव्हां तो म्हणाला:—'मी जे हे या राशींतील माष खात आहें, ते सर्व उच्छिष्ट आहेत. यांशिवाय मजजवळ कांहीं एक देण्यास नाहीं. हें जें मजजवळ भांडें दिसतें आहे, त्यांत असलेले माष सर्व उष्टे आहेत. माझा कांहीं उपाय नाहीं. हें ऐकून उषस्ति काय म्हणाला तें ऐका: ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**एतेषां मे देहीति होवाच तानस्मै प्रददौ हन्तानुपानमित्युच्छिष्टं वै मे पीतꣳ स्यादिति होवाच॥३॥**

**अन्वय व अर्थः**–'**एतेषां मे देहि**' **इति उवाच ह** ('यांतील कांहीं माष मला दे' असें उषस्ति म्हणाला) **तान् अस्मै प्रददौ** (इभ्यानें ते उच्छिष्ट माष त्याला दिले)—आणि म्हणाला–'**हंत अनुपानं**' **इति** (हें जवळच पाणी आहे, तेंही घे) '**उच्छिष्टं वै मे पीतं स्यात्**' **इति ह उवाच** (तेव्हां उषस्ति म्हणालाः–'हें मी पाणी प्यालों, तर उच्छिष्ट पाणी प्यालों असें होईल!)॥ ३॥

एतेषामेतानित्यर्थः। मे मह्यं देहीति होवाच। तान्स इभ्योऽस्मा उषस्तये प्रददौ प्रदत्तवान्। अनुपानीयं समीपस्थमुदकं हन्त गृहाणानुपानमित्युक्तः प्रत्युवाच। उच्छिष्टं वै मे ममेदमुदकं पीतं स्याद्यदि पास्यामीत्युक्तवन्तं प्रत्युवाचेतरः॥ ३॥

सिद्धान्ती—'ह्यांतून कांहीं उच्छिष्ट माष मला दे' असें उषस्ति म्हणाला. तेव्हां इभ्यानें त्या भिक्षुकाला तें उष्टें अन्न दिलें आणि जवळच पाण्याचें भांडें होतें, तें दाखवून इभ्य म्हणाला: 'अन्न खाल्ल्यानंतर पाणी पिण्याला तुला हवें, तें हें घे.' उषस्ति म्हणाला: 'मी हें पाणी प्यालों, तर उष्टें पाणी प्यालों, असें होईल!' हें उषस्तीचें बोलणें ऐकून इभ्य काय म्हणाला, तें पुढच्या मंत्रांत सांगितलें आहे॥ ४॥

---

## मंत्र चवथा.

**न स्विदेतेऽप्युच्छिष्टा इति; न वा अजीविष्यमिमानखादन्निति होवाच कामो म उदकपानमिति॥४॥**

**अन्वय व अर्थः**—'**न स्वित् एते अपि उच्छिष्टाः**' इति ('हे कुल्माष तूं खाल्लेस, ते उष्टे नव्हते काय?)' **इमान् अखादन् न अजीविष्यं वै इति ह उवाच** ('हे जर मीं खाल्ले नसते, तर मी जग-

लोंच नसतों' असें उषस्ति म्हणाला ) **उदकपानं मे कामः इति** (उदक-पान करणें ही माझ्या इच्छेची गोष्ट आहे, जगण्याची नव्हे ' असेंही पुढें बोलला ) ॥ ४ ॥

सारांश, जीवरक्षणासाठीं उपस्तीनें उच्छिष्ट माष खाल्ले, परंतु तो पाणी प्याला नाहीं. कां तर जीव जाण्याची भीति नाहीं, असें पाहून त्यानें उच्छिष्ट जलाचा स्वीकार केला नाहीं.

किं न स्विदेते कुल्माषा अप्युच्छिष्टा इत्युक्त आहोषस्तिर्न वा अजीविष्यं न जीविष्यामीमान्कुल्माषानखादन्नभक्षयन्निति होवाच । काम इच्छातो मे ममोदकपानं लभ्यत इत्यर्थः । अतश्चैतामवस्थां प्राप्तस्य विद्याधर्मयशोवतः स्वात्मपरोपकारसमर्थस्यैतदपि कर्म कुर्वतो नाऽऽगःस्पर्श इत्यभिप्रायः । तस्यापि जीवितं प्रत्युपाया-न्तरेऽजुगुप्सिते सति जुगुप्सितमेतत्कर्म दोषाय । ज्ञानावलेपेन कुर्वतो नरकपातः स्यादेवेत्यभिप्रायः । प्रद्राणकशब्दश्रवणात् ॥४॥

**सिद्धान्ती**—' तूं हे जे कुल्माष स्वीकृत केलेस, ते उच्छिष्ट नव्हते काय?' असें इभ्यानें विचारलें. तेव्हां उषस्ति म्हणालाः मीं जर हे कुल्माष खाल्ले नाहींत, किंवा खाल्ले नसते, तर माझा जीवच या शरीरांत राहणार नाहीं, किंवा राहिला नसता. मला आतां जगण्याची आशा आहे. पाणी पिणें ही माझ्या स्वाधीनची गोष्ट आहे. तें मला केव्हांही मिळेल. मी आतां पाणी प्यालों नाहीं, तर माझा जीवच जाईल. असें नाहीं. हें उपस्तीचें बोलणें ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. विद्या, धर्म, यश यांनीं संपन्न असणारा आणि आपल्यावर व इतरांवर परोपकार करण्यास समर्थ असणारा पुरुष जर एखाद्या प्रसंगीं उषस्तीसारखा पेचांत सांपडला, त्याच्या प्राणावर येऊन बेतलीच, तर उषस्तीनें कर्म केलें, तसेंच त्या विद्यादि-संपन्न आणि, स्वपरोपकार-समर्थ पुरुषानें केलें, तर त्याला कोणतेंही पाप लागत नाहीं. तथापि जीवितसंरक्षण करण्याचें दुसरे अनिंदित, अनिषिद्ध, उपाय असतील तर उच्छिष्ट उदकपानासारखें निंद्य किंवा निषिद्ध कर्म करणें दोषाला पात्र होतें. सारांश, 'मला आत्मज्ञान झालें आहे. कोणतेंही निंद्य कर्म करण्याला मला प्रत्यवाय नाहीं.' असा ज्ञानाचा अभि-मान झालेल्या एखाद्या अहंमन्य पंडितानें निंद्य कर्म केलें, तर त्याला नरक-पाताची शिक्षा होते.

**पूर्वपक्षी**—हा कोठून अर्थ काढतां तुम्हीं ?

**सिद्धान्ती**—पहिल्या मंत्रांत ' प्रद्राणक ' शब्द आहे. तो असेंच स्पष्ट सांगतो कीं, उषस्तीची अन्नान्न दशा झाली होती; तेव्हां प्राणावरचें संकट आलें

असतां व आपण जगलों तर कांहीं तरी सत्कार्य करूं, असा निश्चय असेल, तर जगून सत्कर्म करण्यासाठीं मात्र एखादें शास्त्रनिषिद्ध कर्म करण्यास प्रत्यवाय नाहीं. असा ह्या श्रुतीला सर्व लोकांस उपदेश करावयाचा आहे ॥ ४ ॥

---

## मंत्र पांचवा.

**स ह खादित्वाऽतिशेषाञ्जायाया आजहार साऽग्र एव सुभिक्षा बभूव तान्प्रतिगृह्य निदधौ ॥५॥**

**अन्वय व अर्थः—सः खादित्वा अतिशेषान् जायायै आजहार** ( उषस्तीनें तृप्ति होईपर्यंत माष खाल्ले आणि अवशिष्ट भाग आपल्या जायेस दिला ) **सा अग्रे एव सुभिक्षा बभूव** ( परंतु तिची क्षुधाशांति आधींच झालेली होती ) **तान् प्रतिगृह्य निदधौ** ( तिनें ते अवशिष्ट माष टाकून न देतां आपल्या जवळ ठेवून घेतले ) ॥ ५ ॥

तांश्च स खादित्वाऽतिशेषानतिशिष्टाञ्जायायै कारुण्यादाजहार । साऽऽटिक्यग्र एव कुल्माषप्राप्तेः सुभिक्षा शोभनभिक्षा लब्धान्नेत्येतद्बभूव संवृत्ता । तथाऽपि स्त्रीस्वाभाव्यादनवज्ञाय तान्कुल्माषान्पत्युर्हस्तात्प्रतिगृह्य निदधौ निक्षिप्तवती ॥ ५ ॥

सिद्धान्ती—पोटभर खाणें झाल्यानंतर उषस्तीनें बाकीचे राहिलेले माष आपल्या बायकोस खाण्याकरितां दिले. ती अद्यापि क्षुधातुर असेल, हें मनांत येऊन त्याचें करुणापूर्ण अंत:करण कळवळलें होतें. पण हे कुल्माष प्राप्त होण्यापूर्वीच त्या आटिकीला ( उषस्तीच्या बालजायेला ) सुभिक्ष झालें होतें. म्हणजे तिला पूर्वीच खाद्य मिळालेलें होतें. म्हणून ते खाण्याची तिला इच्छा नव्हती. तथापि, पतीच्या आज्ञेचा भंग करणें हें पत्नीला योग्य नव्हे, हें तिला ठाऊक होतें. म्हणून कुलस्त्रीचें व्रत तिनें स्वीकारिलें; आणि क्षुधा नव्हती तरी अवशिष्ट माष पतीच्या हातून घेऊन ते ती सुरक्षित ठेविती झाली ॥ ५ ॥

---

## मंत्र सहावा.

**स ह प्रातः संजिहान उवाच यद्बतान्नस्य लभेमहि, लभेमहि धनमात्राꣳ राजाऽसौ यक्ष्यते स मा सर्वैरार्त्विज्यैर्वृणीतेति ॥ ६ ॥**

**अन्वय व अर्थः—प्रातः संजिहानः स उवाच ह** ( प्रातःकाळीं शयनस्थान सोडल्यानंतर तो म्हणाला ) **यत् बत अन्नस्य लभेमहि धनमात्रां लभेमहि** ( जर मला थोडें अन्न खावयास मिळेल तर मला धनही मिळेल ) **असौ राजा यक्ष्यते, सः सर्वैः आर्त्विज्यैः मा वृणीत इति** ( तो राजा यज्ञ करीत आहे, आणि मी जगलों तर तो मला सर्व ऋत्विजत्वाचें आमंत्रण देईल ) ॥ ६ ॥

स तस्याः कर्म जानन्प्रातरुषःकाले संजिहानः शयनं निद्रां वा परित्यजन्नुवाच पत्न्याः शृण्वत्या यद्यदि बतेति खिद्यमानोऽन्नस्य स्तोकं लभेमहि तद्भुक्त्वाऽन्नं समर्थो गत्वा लभेमहि धनमात्रां धनस्याल्पम् । ततोऽस्माकं जीवनं भविष्यतीति । धनलाभे च कारणमाह—राजाऽसौ नातिदूरे स्थाने यक्ष्यते । यजमानत्वात्तस्यात्मनेपदम् । स च राजा मा मां पात्रमुपलभ्य सर्वैरार्त्विज्यैर्ऋत्विक्कर्मभिर्ऋत्विक्कर्मप्रयोजनायेत्यर्थो वृणीतेति ॥ ६ ॥

**सिद्धान्ती**—आपल्या जायेनें माप रक्षण केले आहेत, ह उषस्तीला ठाऊक होतें. असो, प्रातःकाळीं सर्व प्राथमिक कर्म आटपल्यावर—

**शिष्य**—म्हणजे शयनस्थान सोडल्यावर अथवा निद्रात्याग केल्यावर आणि मुखमार्जनादि कर्म आटपल्यावर !—

**सिद्धान्ती**—ठीक आहे. तो उषस्ति—स्नानादि आटपून, आपल्या जायेला ऐकूं जाईल असें दीन स्वरानें म्हणाला: 'अरेरे ! मला जर थोडेंसें अन्न आतां मिळेल, तर तें खाऊन माझ्या अंगांत तकवा येईल आणि थोडेंसें द्रव्य मिळण्याचाही संभव उत्पन्न होऊन आपल्या उभयतांचें प्राणरक्षण होईल.

**शिष्य**—द्रव्य मिळेल, असें त्याला कसें वाटलें ?

**सिद्धान्ती**—उषस्तीला ठाऊक होतें कीं, तेथून जवळच त्या देशाचा राजा एक मोठा यज्ञ करित आहे. उषस्ति हा यज्ञकर्मांत निपुण असून ज्ञानसंपन्न होता.

**शिष्य**—येथें मंत्रांत यज् धातूचा आत्मनेपदि प्रयोग केला आहे, त्याचें कारण त्या यज्ञाचें फल त्या राजासच मिळावयाचें होतें, हें वाटतें ?

**सिद्धान्ती**—होय. पुढें उषस्ति म्हणाला, 'माझ्यासारखा प्रसिद्ध सत्पात्र ब्राह्मण प्राप्त झाला असतां सर्व ऋत्विक–कर्मे करण्यासाठीं मला तो खास आमंत्रण देईल. तृतीयेचा अर्थ 'कर्मांनीं' असा न करितां 'कर्मांसाठीं' असा करावा.

शिष्य--ऋत्विजाला यज्ञकर्मासाठीं आमंत्रण देणें याला याज्ञिक भाषेंत ' वरण ' ( निवड करणें ) असें म्हणतात.

सिद्धान्ती—होय. तात्पर्य, उषस्तीला धन मिळण्याचा पुष्कळसा संभव होता ॥ ६ ॥

---

## मंत्र सातवा.

**तं जायोवाच हन्त पत इम एव कुल्माषा इति तान्खादित्वाऽमुं यज्ञं विततमेयाय ॥ ७ ॥**

**अन्वय व अर्थः**--' हंत पते ! इमे एव कुल्माषाः ' इति तं **जाया उवाच** ( अहो पतिराज ! हे सर्वच कुल्माष घ्या ' असें त्याला त्याची जाया म्हणाली ) **तान् खादित्वा अमुं विततं यज्ञं एयाय** ( ते कुल्माष खाऊन तो उषस्ति त्या विस्तीर्ण यज्ञमंडपांत गेला ) ॥ ७ ॥

एवमुक्तवन्तं जायोवाच–हन्त गृहाण हे पत इम एव ये मद्धस्ते विनिक्षिप्तास्त्वया कुल्माषा इति । तान्खादित्वामुं यज्ञं राज्ञो विततं विस्तारितमृत्विग्भिरेयाय ॥ ७ ॥

सिद्धान्ती—हें नवऱ्याचें भाषण ऐकून त्याची स्त्री म्हणाली: असें काय करतां ? हे काल तुम्हीं मजजवळ ठेवण्यास दिलेले कुल्माष आहेत, ते घ्या आणि खा.' ते कुल्माष खाऊन उषस्ति ब्राह्मण त्या राजाच्या विस्तीर्ण यज्ञमंडपांत जाता झाला.

शिष्य—विस्तीर्ण म्हणजे ?

सिद्धान्ती--ऋत्विजांनीं सर्व प्रकारची सामग्री आणून ठेवणें, मोठमोठालीं यज्ञकुंडें तयार करणें, इत्यादि हा वितत किंवा विस्तीर्ण या पदाचा अर्थ आहे॥७॥

---

## मंत्र आठवा.

**तत्रोद्गातॄनास्तावे स्तोष्यमाणानुपोपविवेश स ह प्रस्तोतारमुवाच ॥ ८ ॥**

**अन्वय व अर्थः--तत्र आस्तावे स्तोष्यमाणान् उप उद्गातॄन् उपविवेश** (तेथें जाऊन तो आस्तावाचे ठिकाणीं स्तोत्रें म्हणणाऱ्या उद्गात्यांच्या जवळ जाऊन बसला ) **सः प्रस्तोतारं उवाच ह** ( तो उषस्ति प्रस्तोत्याला म्हणाला ) ॥ ८ ॥

तत्र च गत्वोद्गातॄनुद्गातृपुरुषानागत्य स्तुवन्त्यस्मिन्नित्यास्तावस्तस्मिन्नास्तावे स्तोष्यमाणानुपोपविवेश समीप उपविष्टस्तेषामित्यर्थः । उपविश्य स ह प्रस्तोतरमुवाच ॥ ८ ॥

सिद्धान्ती—तेथें जाऊन तो उद्गात्यांच्या ( उद्गान करणाऱ्या ऋत्विजांच्या ) जवळ जाऊन बसला. ते उद्गाते या वेळीं आस्तावा[1] वर होते. ते स्तोत्रें म्हणून गायन करीत होते. बसल्यानंतर तो प्रस्तोत्याला* म्हणाला ॥ ८ ॥

---

## मंत्र नववा.

**प्रस्तोतर्या देवता प्रस्तावमन्वायत्ता तां चेदविद्वान्प्रस्तोष्यसि मूर्धा ते विपतिष्यतीति ॥ ९ ॥**

**अन्वय व अर्थः—प्रस्तोतः या देवता प्रस्तावं अन्वायत्ता, तां अविद्वान् प्रस्तोष्यसि चेत् ते मूर्धा पतिष्यति इति** ( हे प्रस्तोत्या, प्रस्तावभक्तीला अनुगत असलेल्या ज्या देवतेचें स्तोत्र तूं गात आहेस, त्या देवतेचें स्वरूप ठाऊक नसूनही तूं माझ्यासमक्ष स्तवन करशील, तर तुझा शिरःपात होईल ) ॥ ९ ॥

हे प्रस्तोतरित्यामन्त्र्याभिमुखीकरणाय । या देवता प्रस्तावं प्रस्तावभक्तिमनुगताऽन्वायत्ता तां चेद्देवतां प्रस्तावभक्तेरविद्वान्सन्प्रस्तोष्यसि विदुषो मम समीपे । तत्परोक्षेऽपि चेद्विपतेत्तस्य मूर्धा, कर्ममात्रविदामनधिकार एव कर्माणि स्यात् । तच्चानिष्टमविदुषामपि कर्मदर्शनात् । दक्षिणमार्गश्रुतेश्च । अनधिकारे चाविदुषामुत्तर एवैको मार्गः श्रूयेत । न च स्मार्तकर्मनिमित्त एव दक्षिणः पन्थाः ।

---

1 यज्ञांतील विशेष मंत्र म्हणण्याचें स्थान.

* उद्गाता. हे अनेक असतात. त्यांच्याकडे प्रस्तावस्तोत्रें म्हणण्याचें काम असतें.

यज्ञेन दानेनेत्यादिश्रुतेः। तथोक्तस्य मयेति च विशेषणाद्विद्वत्सम-क्षमेव कर्मण्यनधिकारो न सर्वत्राग्निहोत्रस्मार्तकर्माध्ययनादिषु च। अनुज्ञायास्तत्र तत्र दर्शनात्। कर्ममात्रविदामप्यधिकारः सिद्धः कर्मणीति। मूर्धा ते विपतिष्यतीति ॥ ९ ॥

**सिद्धान्ती**--आपल्याकडे पहावें व लक्ष द्यावें म्हणून उषस्तीनें प्रस्तोत्याला हांक मारिली आणि म्हणाला: हे *प्रस्तोत्या, प्रस्तावभक्तीचें अनुसरण करणाऱ्या देवतेचें तूं स्तवन करीत आहेस, देवतेची तूं स्तुति करीत आहेस, स्तुतीचे पूर्वमंत्र म्हणत आहेस, हें ठीक. पण त्यांतील प्रस्तावभक्ति म्हणजे काय हें ठाऊक (विदित) नसतांही तूं त्या देवतेची पूर्व-स्तुति करित असशील, प्रास्ताविक स्तुति करित असशील आणि ती **माझ्या देखत करीत असशील**, तर तुझा मस्तकपात होईल.

**पू०**—मस्तकपाताला विद्वानाच्या समीपतेशीं हा काय संबंध आहे ?

**सिद्धान्ती**—त्याच्या ( विद्वानाच्या) परोक्ष जर मस्तकपात व्हावयाचा असा दंड श्रुति करिती तर जे कर्ममात्रवेत्ते आहेत, कर्माशिवाय उपासना, उपासनाज्ञान आणि आत्मज्ञान यांचा ज्यांना लेशही नसतो, ते कर्माला अनधिकारी होतील.

**शिष्य**—उपासना प्रकारांचें व स्तोत्रप्रकारांचें ज्ञान नसेल तर सर्व कर्म विफल होतें कीं काय ?

**सिद्धान्ती**—नाहीं. कर्म विफल होतें, असें म्हणण्यानें श्रुतिवचनाला बाध येतो. कसा ? अविद्वानाला सुद्धां श्रुतीनें कर्म सांगितलें आहे. कशावरून ? तर श्रुति दक्षिणमार्गाचा ( पितृयाण-मार्गाचा ) उल्लेख वारंवार करीत असते. अज्ञानी कर्मकर्ता दक्षिणमार्गानें जातो, अशी श्रुति आहे. आणखी अविद्वानाला कर्माचा अधिकारच नसता, तर आपल्या श्रुतीनें एकच मार्ग ( देवयान मार्ग ) उपलब्ध केला असता. पण तिनें दुसरा मार्ग तर सांगितला आहे. तेव्हां अज्ञान्याला कर्माधिकार आहे हें ठरतें. शिवाय, हा दुसरा दक्षिणमार्ग केवळ स्मार्तकर्म-निमित्तच आहे असेंही नाहीं.

**पूर्वपक्षी**—कशावरून ?

**सिद्धान्ती**--'यज्ञानें, दानानें, सर्व भुवनें प्राप्त करून घेतां येतात' अशी श्रुति आहे. या श्रुतीचा तात्पर्यार्थ अज्ञानी वैदिककर्मनिष्ठांना दक्षिणमार्ग सांगितला हा आहे. या सर्व विवेचनावरून अविद्वानालाही श्रौतस्मार्त कर्मांचा अधिकार आहे, हें ठरतें. पण 'मी ह्याप्रमाणें बोललों असतां' (खंड ११ मंत्र ५, ६, ७ पहा.) या

---

* प्रस्ताव हें एक उद्गानाचें अंग आहे. प्रस्तावभक्ति म्हणजे प्रस्तावना करणाऱ्या मंत्राचा प्रकार. भक्ति म्हणजे भाग. प्रस्तावनामक भाग हा प्रस्तावभक्तीचा अर्थ.

विशिष्ट वाक्यांवरून विद्वानाच्या समक्ष मात्र अविद्वानाला कर्म करण्याचा अधिकार नसतो. अग्निहोत्र, स्मार्तकर्म, अध्ययन इत्यादि कर्म करण्याला अविद्वान् अधिकारी नाहीं, असें नाहीं. कारण त्या त्या कर्मांत कर्मकर्ता ज्ञात्या पुरुषाची अनुज्ञा घेतो, असा सर्वत्र संप्रदाय आहे. ज्ञात्यांची अनुज्ञा घेऊन कोणतेंही कर्म करण्यास प्रत्यवाय नाहीं. सारांश, ज्यांना कर्मज्ञान मात्र आहे, त्यांना सुद्धां कर्म करण्याचा अधिकार प्राप्त होतो, हें श्रुतिवचनांनीं, युक्तीनें आणि संप्रदायपरंपरेनें सिद्ध होतें. मात्र विद्वान् हजर असेल तर अज्ञानी ऋत्विजांना ज्ञात्याच्या अनुज्ञेशिवाय कर्म करण्याचा अधिकार नसतो; आणि त्यांनीं कर्म केलेंच तर व 'कर्मकर्त्यांचें मस्तक पतन होवो' असा ज्ञानी पुरुषानें शाप दिला, तर मात्र त्यांचा मस्तकपात होतो ॥ ९ ॥

---

## मंत्र दहावा व अकरावा.

**एवमेवोद्गातारमुवाचोद्गातर्या देवतोद्गीथमन्वायत्ता तां चेदविद्वानुद्गास्यसि मूर्धा ते विपतिष्यतीति ॥ १० ॥**

**एवमेव प्रतिहर्तारमुवाच प्रतिहर्तर्या देवता प्रतिहारमन्वायत्ता तां चेदविद्वान्प्रतिहरिष्यसि मूर्धा ते विपतिष्यतीति ते ह समारतास्तूष्णीमासांचक्रिरे ॥ ११ ॥**

**इति प्रथमाध्यायस्य दशमः खण्डः ॥ १० ॥**

अन्वय व अर्थः--एतं एव उद्गातारं उवाच 'उद्गातः, उद्गीथं अन्वायत्ता या देवता तां अविद्वान् उद्गास्यसि चेत् ते मूर्धा विपतिष्यति इति (या मंत्राचा अर्थ नवव्या मंत्राप्रमाणेंच आहे. मात्र प्रस्तोता, प्रस्ताव, आणि प्रस्तवन यांच्या स्थानीं अनुक्रमें उद्गाता, उद्गीथ आणि उद्गायन या पदांची योजना करावयाची) ॥ १० ॥

अन्वय व अर्थः--एवं एव प्रतिहर्तारं उवाच; प्रतिहर्तः, प्रतिहारं अन्वायत्ता या देवता तां अविद्वान् प्रतिहरिष्यसि चेत् ते मूर्धा

**विपातिष्यति** ( अर्थ तोच. प्रतिहर्ता, + प्रतिहार * आणि प्रतिहरण हीं पदें येथें उपयोजावयाचीं ) **ते समाहताः तूष्णीं आसांचक्रिरे** ( हें ऐकून ते सर्व ऋत्विज कर्मनिवृत्त झाले आणि स्तब्ध बसले ) ॥ ११ ॥

एवमेवोद्गातारं प्रतिहर्तारमुवाचेत्यादि समानमन्यत् । ते प्रस्तोत्रादयः कर्मभ्यः समाहृता उपहृताः सन्तो मूर्धपातभयात्तूष्णीमासांचक्रिरेऽन्यच्चाकुर्वन्तः । आर्थित्वात् ॥ १० ॥ ११ ॥

इति प्रथमाध्यायस्य दशमः खण्डः ॥ १० ॥

सिद्धान्ती—ज्याप्रमाणें प्रस्तोत्याशीं उषस्तीनें भाषण केलें, त्याप्रमाणेंच उद्गाता आणि प्रतिहर्ता ह्यांच्यांशींही त्यानें भाषण केलें. तें ऐकून प्रस्तोत्रादि सर्व स्वस्वकर्मापासून उपरत होत्साते स्तब्ध बसले. कारण प्रत्येकाला शिरःपाताचें भय होतेंच. सारांश कांहीं एक न करितां ते स्तब्ध बसले. ज्या देवतेचें आपल्याला ज्ञान नाहीं, त्या देवतेचें ज्ञान व्हावें अशा इच्छेनें किंवा हा अर्थ मनांत आणून कोणतेंही कर्म न करितां ते उषस्तीच्या मुखाकडे पाहत स्तब्ध बसले ॥ १० ॥ ११ ॥

दहावा खंड समाप्त.

---

## खंड अकरावा.

---

### मंत्र पहिला.

**अथ हैनं यजमान उवाच भगवन्तं वा अहं विविदिषाणीत्युषस्तिरस्मि चाक्रायण इति होवाच ॥१॥**

**अन्वय व अर्थः—अथ यजमानः एनं उवाच ह** ( नंतर त्याला यज्ञकर्ता यजमान म्हणाला ) **अहं भगवन्तं वै विविदिषाणि इति** ( भगवन् आपण कोण आहांत, हें समजून घ्यावें अशी माझी इच्छा आहे ) **चाक्रायणः उषस्तिः अस्मि इति ह उवाच** ( मी चाक्रायण कुलोत्पन्न उषस्ति आहें, असें उषस्तीनें उत्तर दिलें ) ॥ १ ॥

---

+ हाही एक उप उद्गाता आहे. * याचें लक्षण मागें दिलेंच आहे.

अथानन्तरं हैनमुषस्तिं यजमानो राजोवाच । भगवन्तं वै पूजावन्तमहं विविदिषाणि वेदितुमिच्छामीत्युक्त उषस्तिरस्मि चाक्रायणस्तवापि श्रोत्रपथमागतो यदीति होवाचोक्तवान् ॥ १ ॥

सिद्धान्ती—प्रस्तोता, उद्गाता इत्यादि सर्व स्तब्ध झाले आहेत, असें पाहून यज्ञकर्ता राजा, उषस्तीला नमस्कार करून म्हणाला, भगवन्! आपण वंदनीय आहां. आपलें नांव काय, हें समजण्याची मला इच्छा आहे. तेव्हां उषस्ति म्हणाला: मी चाक्रायण कुलांत उत्पन्न झालेला उषस्ति आहें. तुलाही माझें नांव ऐकून ठाऊक असेल कदाचित् ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**स होवाच भगवन्तं वा अहमेभिः सर्वैरार्त्विज्यैः पर्यैषिषं भगवतो वा अहमवित्त्याऽन्यानवृषि ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थ**—स ह उवाच (राजा म्हणाला) **एभिः सर्वैः आर्त्विज्यैः भगवंतं वै अहं पर्यैषिषं** (या सर्व ऋत्विक्कर्मांचें अनुष्ठान आपल्या हातूनच करवावें, या योजनासिद्धीसाठीं आपला मीं पुष्कळ शोध केला) **भगवतः अवित्त्या अहं अन्यान् अवृषि** (परंतु आपला लाभ मला झाला नाहीं, म्हणून मीं या इतर ऋत्विजांस आमंत्रण देऊन क्षण दिला) ॥ २ ॥

स ह यजमान उवाच सत्यमेवमहं भगवन्तं बहुगुणमश्रौषं सर्वैश्च ऋत्विक्कर्मभिराभिरार्त्विज्यैः पर्यैषिषं पर्येषणं कृतवानस्मि । अन्विष्य भगवतो वा अहमवित्त्याऽलाभेनान्यानिमानवृषि वृतवानस्मि ॥ २ ॥

सिद्धान्ती—तो यजमान नंतर म्हणाला: खरें आपण म्हणालांत; आपण बहुगुण-संपन्न आहांत, असें मीं पुष्कळ ऐकिलें होतें. तसेंच यज्ञांतील हीं जीं सर्व ऋत्विजांचीं कर्में आहेत, तीं आपणांसच सुपूर्त करावीं; या हेतूनें मीं आपला पुष्कळ शोध केला. परंतु शोध न लागल्यामुळें मी कृतार्थ झालों नाहीं. असो; आपली गांठ पडली नाहीं; म्हणून मीं या दुसऱ्या वैदिकांस ऋत्विजकर्मांचा क्षण दिला आहे ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**भगवाꣳस्त्वेव मे सर्वैरार्त्विज्यैरिति तथेत्यथ तर्ह्येत एव समतिसृष्टाः स्तुवतां यावत्त्वेभ्यो धनं दद्यास्तावन्मम दद्या इति तथेति ह यजमान उवाच ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थः—भगवान् तु एव मे सर्वैः आर्त्विज्यैः इति** ( अद्यापि आपण कृपाळु होऊन या यज्ञांतील सर्व ऋत्विक्–कर्मांचा क्षण घ्यावा असें राजा म्हणाला ) **तथा इति** ( उषस्ति म्हणालाः " बरें आहे ) **अथ तर्हि एते एव समतिसृष्टाः स्तुवतां** ( असें असेल, तर हे जे ऋत्विज येथें मिळाले आहेत, त्यांस मी आनंदानें यज्ञदेवांची स्तुति करण्यास अनुज्ञा देतों ) **यावत् तु एभ्यः धनं दद्याः तावत् मम दद्याः इति** ( पण यांस जें तूं धन देणार असशील, तितकेंच धन मला त्वां दिलें पाहिजे, " असें उषस्ति म्हणाला ) **तथा इति ह यजमानः उवाच** ( यजमान म्हणालाः तथास्तु ) ॥ ३ ॥

अद्यापि भगवांस्त्वेव मे मम सर्वैरार्त्विज्यैर्ऋत्विक्कर्मार्थमस्त्वित्युक्तस्तथेत्याहोषस्तिः। किंत्वथैवं तर्ह्येत एव त्वया पूर्वं वृता मया समतिसृष्टा मया सम्यक्प्रसन्नेनानुज्ञाताः सन्तः स्तुवताम्। त्वया त्वेतत्कार्यम्। यावत्त्वेभ्यः प्रस्तोत्रादिभ्यः सर्वेभ्यो धनं दद्याः प्रयच्छसि तावन्मम दद्या इत्युक्तस्तथेति ह यजमान उवाच ॥ ३ ॥

**सिद्धान्ती**—' यांच्याकडे मी सर्व याज्ञिक–कर्म सोंपविलें आहे; तथापि आज सुद्धां या यज्ञांतील सर्व ऋत्विक्-कर्में आपल्यास सोंपविण्याची माझी तयारी आहे. असें राजा म्हणाला कृपा करून क्षण स्वीकारावा, ' तेव्हां उषस्तीनें ' ठीक आहे ' असें उत्तर दिलें. तथापि तो प्रस्तोतादि ऋत्विजांस अनाकुलित करण्यासाठीं पुढें म्हणाला, माझ्यावर सर्वकर्मांचा भार तूं टाकीत असंशील, तर तूं या याज्ञिकांस आमंत्रण दिलें आहेस; त्यांसही प्रसन्न मनानें मी अनुज्ञापितों कीं, त्यांनीं यज्ञदेवांची स्तुति करावी.

**शिष्य**—अर्थात् उषस्तीची अनुज्ञा मिळाल्यानंतर स्वरूपाज्ञानी ऋत्विजांस शिरःपाताचें भय राहिलें नाहीं. व दक्षिणा मिळण्याची ही शंका उरली नाहीं,

सिद्धान्ती—पुढें यजमानाला उषस्ति म्हणाला, ' राजा, या ऋत्विजांस दक्षणा म्हणून जें तूं धन देशील, तितकेंच धन तूं मला दिलें पाहिजेस. ' राजा म्हणाला, ' ठीक आहे; ' ही गोष्ट ही मला संमत आहे ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा.

**अथ हैनं प्रस्तोतोपससाद प्रस्तोतर्या देवता प्रस्तावमन्वायत्ता तां चेदविद्वान्प्रस्तोष्यसि मूर्धा ते विपतिष्यतीति । मा भगवानवोचत्कतमा सा देवतेति ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थः—अथ प्रस्तोता एनं उपसासद ह** ( हें झाल्यानंतर प्रस्तोता उषस्तीची प्रार्थना करिता झाला ) **प्रस्तोतः, " प्रस्तावं अन्वायत्ता या देवता तां अविद्वान् प्रस्तोष्यासि चेत्, ते मूर्धा विपतिष्यति ' इति भगवान् मा अवोचत् "** ( आणि म्हणाला: ' प्रस्तोत्या, ज्या प्रस्तावसंबंधीं देवतेचें स्तवन तूं करीत आहेस, त्या देवतेचें स्वरूप न जाणतां तूं देवतास्तुति करीत असशील तर तुझा मस्तकपात होईल ' असें आपण भगवान् मला बोललां होतां) **"या प्रस्तावभक्तिं अन्वयत्ता" सा देवता कतमा** ( प्रस्तावभक्तीची जी अनुगामी देवता आहे, ती देवता कोणती, हें कृपा करून मला सांगा ) ॥ ४ ॥

अथ हैनमौषस्त्यं वचः श्रुत्वा प्रस्तोतोपससादोषस्तिं विनयेनोपजगाम । प्रस्तोतर्या देवतेत्यादि मा मां भगवानवोचत्पूर्वम् । कतमा सा देवता या प्रस्तावभक्तिमन्वायत्तेति ॥ ४ ॥

सिद्धान्ती—उषस्तीचें हें बोलणें ऐकल्यानंतर आनंदित झालेला प्रस्तोता शिष्यबुद्धीनें ( विनयानें ) उषस्तीसमीप गेला; आणि प्रार्थना करून त्याला म्हणाला,–" हे भगवन्, आतांच आपण ज्या देवतेसंबंधानें माझ्याशीं भाषण केलें व ' शिरःपातदंडाला योग्य असें ज्या देवतेचें अज्ञानानें उत्पन्न होणारें पातक देवतास्तुतीनें माझ्या हातून घडेल असें मला सांगितलें, ' ती देवता कोणती ? हें मला कृपा करून सांगावें. प्रस्तावभक्तीच्या स्तुतीनें प्रसन्न होऊन सर्व मंगल करणाऱ्या देवतेचें स्वरूप काय ? आणि नांव काय ? हें मला सांगावें. " ॥ ४ ॥

---

## मंत्र पांचवा.

**प्राण इति होवाच सर्वाणि ह वा इमानि भूतानि प्राणमेवाभिसंविशन्ति प्राणमभ्युज्जिहते सैषा देवता प्रस्तावमन्वायत्ता तां चेदविद्वान्प्रास्तोष्यो मूर्धा ते व्यपतिष्यत्तथोक्तस्य मयेति ॥ ५ ॥**

**अन्वय व अर्थः—'प्राणः इति' ह उवाच** ( ती प्राण नामक देवता आहे, असें उषस्ति म्हणाला ) **'सर्वाणि इमानि भूतानि वै प्राणं एव अभिसंविशंति, प्राणं अभ्युज्जिहते'** ( खरोखर हीं सर्व भूतें प्राणामध्येंच शेवटीं प्रवेश करितात आणि प्राणापासूनच प्रथम उत्पन्न होतात) **'सा एषा देवता प्रस्तावं अन्वायत्ता'** ( 'ती ही प्राण-देवता प्रस्तावाचें अनुसरण करिते; इचेंच आवाहन ज्ञानी याज्ञिक प्रस्तावद्वारा करित असतात' ) **'तां अविद्वान् प्रास्तोष्यः चेत्, मया तथा उक्तस्य ते मूर्धा व्यपतिष्यत् इति** ( 'तिचें स्वरूप ठाऊक नसतां तूं प्रस्तवन केलें असतेंस आणि 'अज्ञानी 'प्रस्तोत्याचें मस्तक पतन होवो' असें मी म्हटलें असतें, तर तुझें मस्तक खाली पडलें असतें." असें उषस्ति म्हणाला ) ॥ ५ ॥

पृष्टः प्राण इति होवाच। युक्तं प्रस्तावस्य प्राणो देवतेति। कथं, सर्वाणि स्थावरजङ्गमानि भूतानि प्राणमेवाभिसंविशन्ति प्रलय-काले, प्राणमभि लक्षयित्वा प्राणात्मनैवोज्जिहते प्राणादेवोद्गच्छन्ती-त्यर्थ उत्पत्तिकाले। अतः सैषा देवता प्रस्तावमन्वायत्ता तां चेद-विद्वांस्त्वं प्रास्तोष्यः प्रस्तवनं प्रस्तावभक्तिं कृतवानसि यदि मूर्धा शिरस्ते व्यपतिष्यद्विपतितमभविष्यत्तथोक्तस्य मया तत्काले मूर्धा ते विपतिष्यतीति। अतस्त्वया साधु कृतम्। मया निषिद्धः कर्मणो यदुपरममकार्षीरित्यभिप्रायः ॥ ५ ॥

सिद्धान्ती—प्रस्तोत्यानें असें विचारल्यावर 'ती देवता प्राण आहे' असें उषस्तीनें उत्तर दिलें. प्रस्तावाची देवता प्राण आहे, हें म्हणणें योग्यच आहे.

शिष्य—हें कसें ?

सिद्धान्ती--उषस्ति म्हणाला; ' हीं सर्व स्थावर-जंगम अथवा चराचर भूतें प्रलयकालीं प्राणामध्येंच लीन होतात. ह्या सर्वांचा लय विश्वाच्या प्रलयकालीं प्राणामध्यें होतो. आणि जेव्हां विश्वाचा उत्पत्तिकाल प्राप्त होतो, तेव्हां ही भूतें प्राणात्मस्वरूपद्वाराच (प्राणापासून) आविर्भूत, उत्पन्न होतात. तात्पर्य, सर्व भूतांच्या उत्पत्तीचें आणि प्रलयाचें स्थान प्राणदेवता आहे. सर्वोत्पत्तिस्थितिलय परमात्म्याच्या द्वारानें होतो, असा श्रुतीचा सिद्धांत आहे. म्हणून सर्व कारण परमात्मा हाच प्राण आहे. ही प्राणदेवता प्रस्तावद्वारा आमंत्रित होते. इचेंच आवाहन आपण करितों. पण इचें स्वरूप ठाऊक नसतां तूं प्रस्तावभक्तीची उपासना केली असतीस, प्रस्तवन केलें असतेंस, आणि ' अज्ञानी प्रस्तोत्यानें प्रस्तावदेवतेचें आवाहन केलें असतां त्या प्रस्तोत्याचा शिरःपात होवो' असा मीं ज्ञात्यानें शाप दिला असता, तर तुझें मस्तक च्छिन्न झालें असतें. असो; ' तूं हें निषिद्ध कर्म करूं नकोस ' असें मीं निषेधवाणीनें सांगितल्याबरोबर तूं प्रस्तवनाचें कर्म थांबविलेंस, हें तूं फार चांगलें केलें आहेस. तूं असें केलेंस म्हणूनच तुझा शिरःपात व्हावयाचा नाहीं. सारांश, याप्रमाणें तुझें मोठें संकट टळलें ॥ ५ ॥

---

## मंत्र सहावा.

**अथ हैनमुद्गातोपससादोद्गातर्या देवतोद्गीथमन्वायत्ता तां चेदविद्वानुद्गास्यसि मूर्धा ते विपतिष्यतीति मा भगवानवोचत्कतमा सा देवतेति ॥६॥**

**अन्वय व अर्थः**—अथ ह एनं उद्गाता उपससाद; " 'उद्गातः उद्गीथं अन्वायत्ता या देवता, तां अविद्वान् उद्गास्यसि चेत् ते मूर्धा विपतिष्यति' इति भगवान् मा अवोचत्; सा देवता कतमा ?" इति (अर्थ चौथ्या मंत्राप्रमाणें. प्रस्तोत्याच्या स्थानीं उद्गात्याची योजना करावयाची ) ॥ ६ ॥

तथोद्गाता पप्रच्छ कतमा सोद्गीथभक्तिमनुगताऽन्वायत्ता देवतेति ॥ ६ ॥

सिद्धान्ती—नंतर, प्रस्तोत्याप्रमाणें उद्गात्यानें उषस्तीजवळ येऊन विनयानें विज्ञापना केली आणि ' उद्गीथभक्तीनें आहूत होणारी देवता कोणती ? ' असें त्यानें विचारिलें ॥ ६ ॥

---

## मंत्र सातवा.

**आदित्य इति होवाच सर्वाणि ह वा इमानि भूतान्यादित्यमुच्चैः सन्तं गायन्ति सैषा देवतोद्गीथमन्वायत्ता ता चेदविद्वानुदगास्यो मूर्धा ते व्यपतिष्यत्तथोक्तस्य मयेति ॥ ७ ॥**

**अन्वय व अर्थ—'आदित्यः' इति ह उवाच** ( उद्गीथाची देवता आदित्य आहे ' असें उषस्ति म्हणाला ) " **इमानि सर्वाणि भूतानि वै आदित्यं उच्चैः संतं गायंति; सा एषा देवता उद्गीथं अन्वायत्ता; अविद्वान् उदगास्यः चेत्, तथा मया उक्तस्य ते मुर्धा व्यपतिष्यत्' इति** ( " ऊर्ध्वलोकीं असणाऱ्या आदित्याप्रीत्यर्थ हीं सर्व भूतें गायन करितात. म्हणून उद्गीथाचें अनुसरण करणारी ही आदित्य-देवता आहे. तिचें स्वरूप विदित नसतांना तूं उद्गान केलें असतेंस, आणि ' अज्ञानी उद्गात्याचें शिरःपतन होवो ' असा मीं शाप दिला असता, तर तुझें मस्तक छिन्न झालें असतें. " असें उषस्ति पुढें म्हणाला ) ॥ ७ ॥

पृष्ट आदित्य इति होवाच । सर्वाणि ह वा इमानि भूतान्यादित्यमुच्चैरूर्ध्वं सन्तं गायन्ति शब्दयन्ति स्तुवन्तीत्यभिप्रायः । उच्छब्दसामान्यात्प्रशब्दसामान्यादिव प्राणोऽतः सैषा देवतेत्यादि पूर्ववत् ॥ ७ ॥

सिद्धान्ती—असें उद्गात्यानें विचारल्यावर " ती देवता आदित्य आहे " हें उषस्तीनें सांगितलें आणि म्हणाला, "हीं सर्व भूतें अत्युच्च स्थानीं असणाऱ्या आदित्याचेंच गायन करितात, स्तुति करितात." उद्गान म्हणजे ऊर्ध्वस्थ देवतेचें स्तवन होय. येथें एक गोष्ट लक्षांत ठेवावयाची, ती ही:-प्रस्तावन आणि प्राण या उभय शद्बांत प्र अक्षराचा अवतार आहे. प्रस्तवन कर्मांत आणि प्रस्तवनाची अधिदेवता जो प्राण त्यांत प्र शब्द सामान्य आहे. त्याच प्रमाणें उद्गीथ शब्दांत आणि उच्च असणाऱ्या आदित्यांत उत् हा सामान्य शब्द आहे. म्हणून प्रस्तावाची देवता प्राण आणि उद्गानाची देवता आदित्य असा यांचा ( कर्म आणि देवता यांचा ) परस्पर संबंध आहे. प्राण म्हणजे परमात्मा; त्याच प्रमाणें आदित्य म्हणजे परमात्मा, असें समजावें. बाकीचा अर्थ पूर्ववत् आहे ॥ ७ ॥

---

### मंत्र आठवा.

**अथ हैनं प्रतिहर्तोपससाद प्रतिहर्तर्या देवता प्रतिहारमन्वायत्ता तां चेदविद्वान्प्रतिहरिष्यसि मूर्धा ते विपतिष्यतीति मा भगवानवोचत्कतमा सा देवतेति ॥ ८ ॥**

**अन्वय व अर्थः—अथ प्रतिहर्ता एनं उपससाद " 'प्रतिहर्तः, या देवता प्रतिहारं अन्वायत्ता, तां अविद्वान् प्रतिहरिष्यसि चेत्, ते मूर्धा विपतिष्यति' इति भगवान् मा अवोचत्; सा देवता कतमा " इति** ( तदनंतर प्रतिहर्त्यानें उद्गात्यासारखीच विनंति उषस्तीला केली. उद्गात्याच्या किंवा प्रस्तोत्याच्या स्थानीं प्रतिहर्त्याची योजना करावयाची ) ॥ ८ ॥

एवमेवाथ हैनं प्रतिहर्तोपससाद कतमा सा देवता प्रतिहारमन्वायत्तेति ॥ ८ ॥

सिद्धान्ती—प्रस्तोत्यानें व उद्गात्यानें उषस्तीजवळ जाऊन विज्ञापना केली, होती, तशीच प्रतिहर्त्यानेंही केली आणि 'प्रतिहाराची देवता कोणती ?' विचारलें ॥ ८ ॥

---

### मंत्र नववा.

**अन्नमिति होवाच सर्वाणि ह वा इमानि भूतान्यन्नमेव प्रतिहरमाणानि जीवन्ति सैषा देवता प्रतिहारमन्वायत्ता तां चेदविद्वान्प्रत्यहरिष्यो मूर्धा ते व्यपतिष्यत्तथोक्तस्य मयेति तथोक्तस्य मयेति ॥ ९ ॥**

**इति प्रथमाध्यायस्यैकादशः खण्डः ॥ ११ ॥**

**अन्वय व अर्थः—' अन्नं ' इति ह उवाच** ( ती देवता अन्न आहे, असें उषस्ति म्हणाला ) **" सर्वाणि वै इमानि भूतानि अन्नं एव प्रतिहरमाणानि जीवंति; सा एषा प्रतिहारं अन्वायत्ता देवता**

'तां अविद्वान् प्रतिहरिष्यः चेत्, तथा मया उक्तस्य ते मूर्धा व्यपतिष्यत्' इति 'तथा मया उक्तस्य' इति ( हीं सर्व भूतें अन्नाकडेच आकर्षित झाल्यामुळें अन्नाच्याच आधारानें राहिलीं असतां—यांनीं अन्नाला प्रवेश करूं दिला असतां—मात्र जिवंत राहतात. पुढील मंत्रभागाचा अर्थ पूर्वीप्रमाणेंच आहे. प्रस्तवन आणि उद्गान यांच्या स्थानीं प्रतिहरण शब्दाचा विनियोग करावयाचा ) ॥ ९ ॥

पृष्टोऽन्नमिति होवाच । सर्वाणि ह वा इमानि भूतान्यन्नमेवाऽऽत्मानं प्रति सर्वतः प्रतिहरमाणानि जीवन्ति । सैषा देवता प्रतिशब्दसामान्यत्प्रतिहारभक्तिमनुगता । समानमन्यत्तथोक्तस्य मयेति । प्रस्तावोद्गीथप्रतिहारभक्तीः प्राणादित्यान्नदृष्ट्योपासीतेति समुदायार्थः । प्राणाद्यापत्तिः कर्मसमृद्धिर्वा फलमिति ॥ ९ ॥

इति प्रथमाध्यायस्यैकादशः खण्डः ॥ ११ ॥

**सिद्धान्ती**—याप्रमाणें प्रतिहर्त्यानें विचारल्यावर उषस्ति म्हणाला: "अन्न हीं प्रतिहाराची देवता आहे; कारण, सर्व बाजूंनीं आपल्याकडे अन्नाचें प्रतिहरण झालें; या भूतांनीं अन्नसेवन केलें, तरच हीं सर्व भूतें जिवंत राहतात. म्हणून अन्नही प्रतिहाराची देवता आहे. प्रतिहरण (आकर्षण करणें, अन्न सेवन करणें) आणि प्रतिहार या शब्दामध्यें 'प्रति' हा सामान्य शब्द आहे. उभयतांमध्येंही 'प्रति' हा शब्द (उपसर्ग) आढळतो, म्हणून प्रतिहरण केलें जाणारें जें अन्न तें प्रतिहाराची देवता आहे." बाकीचें विवरण मागच्यासारखेंच आहे. तात्पर्य, प्रस्ताव, उद्गीथ आणि प्रतिहार ह्या भक्तींस अनुक्रमें प्राण, आदित्य आणि अन्न ह्या दृष्टींनीं उपास्य करावें. ह्या दृष्टींनीं त्यांची उपासना करावी, हा तात्पर्यार्थ आहे. अशी उपासना केली असतां प्राणादिकांची प्राप्ति होते किंवा कर्मसमृद्धि होते; हें फल होय. याप्रमाणें उषस्तीचा सर्व ऋत्विजांस उपदेश झाला. प्रस्तावन, उद्गान आणि प्रतिहरण, या सामाच्या तीन भक्ति म्हणजे भेद (अंगें) आहेत. प्राण, आदित्य आणि अन्न या त्यांच्या आत्मरूपी देवता आहेत. या देवतांचें स्वरूपज्ञान असून त्यांचें मंत्रपूर्वक आवाहन केलें, तर त्या त्या देवतांची प्राप्ति होते व कर्महीं यथासांग होतें; हें तात्पर्य आहे ॥ ९ ॥

अकरावा खंड समाप्त.

# खंड बारावा.

## मंत्र पहिला.

**अथातः शौव उद्गीथस्तद्ध बको दाल्भ्यो ग्लावो वा मैत्रेयः स्वाध्यायमुद्वव्राज ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—अथ, अतः शौवः उद्गीथः** ( आतां यानंतर, शौव नामक उद्गीथाचें वर्णन करावयाचें आहे ) **तत् ह बकः दाल्भ्यः ग्लावः वा मैत्रेयः, स्वाध्यायं उद्वाव्राज** ( त्यासंबंधानें एकदां दाल्भ्य बक, अथवा मैत्रेय ग्लाव स्वाध्यायासाठीं गांवाच्या बाहेर गेला) सारांश, शौव नामक उद्गीथाचें माहात्म्य प्रकट करण्यासाठीं ह्या प्रकरणाची योजना आहे. दाल्भ्य बक आणि मैत्रेय ग्लाव हीं दोन्हीं नावें एकाच पुरुषाचीं होतीं. तो पुरुष स्वाध्यायासाठीं एकांतस्थलीं गेला ॥ १ ॥

अतीते खण्डेऽन्नाप्राप्तिनिमित्ता कष्टावस्थोक्तोच्छिष्टोच्छिष्टपर्युषितभक्षणलक्षणा सा मा भूदित्यन्नलाभायाथानन्तरं शौवः श्वभिर्दृष्ट उद्गीथ उद्गानं सामातः प्रस्तूयते । तत्तत्र ह किल बको नामतो दल्भस्यापत्यं दाल्भ्यो ग्लावो वा नामतो मित्रायाश्चापत्यं मैत्रेयः । वाशब्दश्चार्थे । ह्यामुष्यायणो ह्यसौ । वस्तुविषये क्रियास्विव विकल्पानुपपत्तेः । द्विनामा द्विगोत्र इत्यादि हि स्मृतिः । दृश्यते चोभयतः पिण्डभाक्त्वम् । उद्गीथे बद्धचित्तत्वादृषावनादराद्वा वाशब्दः स्वाध्यायार्थः । स्वाध्यायं कर्तुं ग्रामाद्बहिरुद्वव्राजोद्गतवान्विविक्तदेशस्थोदकाभ्याशम् । उद्वव्राज प्रतिपालयांचकारेति चैकवचनाल्लिङ्गादेकोऽसावृषिः । श्वोद्गीथकालप्रतिपालनादृषेः स्वाध्यायकरणमन्नकामनयेति लक्ष्यत इत्याभिप्रायतः ॥ १ ॥

**सिद्धान्ती**—अन्नाची प्राप्ति झाली नाहीं, म्हणून उषस्तीला उच्छिष्ट आणि उच्छिष्ट पर्युषित ( उष्टें असून शिळें झालेलें ) अन्न भक्षण करण्यासारखी संकटावस्था प्राप्त झाली, असें मागील खंडांत सांगितलें. असा प्रसंग येऊं नये; तात्पर्य, पवित्र अन्नलाभ व्हावा; या हेतूनें ह्या प्रकरणांत शौव उद्गीथाचें प्रकरण आणि त्याचें स्तवन करावयाचें आहे.

**शिष्य**—शौव म्हणजे काय ?

**सिद्धान्ती**—श्वा म्हणजे कुत्रा, कुत्र्यांनीं पाहिलेला तो शौव; हा 'शौव' उद्गीथ ( उद्गान लक्षणात्मक साम ) होय. हें प्रकरण आतां सुरू करावयाचें आहे. सौकर्यासाठीं एक आख्यायिका सांगतात. एकदां दल्भाचा मुलगा 'बक दाल्भ्य' हा स्वाध्यायासाठीं गांव सोडून बाहेर गेला. दाल्भ्य बक याचेंच मैत्रेय ग्लाव असें दुसरें नांव होतें. मित्रेचा मुलगा म्हणून ग्लावाला मैत्रेय म्हणत असत. मंत्रांत 'वा' शब्द आहे त्याचा 'आणि' हा अर्थ आहे.

**शिष्य**—एका पुरुषाचींच दोन नांवें कशीं ?

**सिद्धान्ती**—हा पुरुष द्व्यामुष्यायण होता.

**शिष्य**—द्व्यामुष्यायण म्हणजे दोन गोत्रांचा ! ठीक.

**पूर्वपक्षी**—हा पुरुष एकच असेल तर दल्भ्याची स्त्री मित्रा होती, असें मानण्यास काय प्रत्यवाय आहे ?

**सिद्धान्ती**—पित्यापासून दाल्भ्य हें उपपद असतांना मातेपासून उत्पन्न होणारें (मैत्रेय) पद व्यर्थ होतें. म्हणून मित्रा ही दल्भाची स्त्री नव्हती हें ठरतें.

**पूर्वपक्षी**—दल्भाच्या दुसऱ्या तिसऱ्या स्त्रीपासून हा झाला नाहीं, हें दाखविण्याकरितां मैत्रेय पदाची योजना श्रुतीनें केली आहे.

**सिद्धान्ती**—असें म्हण्याला प्रत्यक्ष आधार नाहीं. इतिहासही तसा नाहीं.

**पूर्वपक्षी**—दल्भाचा पुत्र बक होता असें म्हणतां आणि मंत्रांतील 'वा' शब्दाचा 'आणि' अर्थ करितां. पुन:; त्यालाच बकाची स्त्री नसणाऱ्या मित्रेचा पुत्र असेंही म्हणतां ! हा आहे काय घोटाळा ? मला तर वाटतें, बक दाल्भ्य हा एक ऋषि आणि मैत्रेय ग्लाव हा दुसरा ऋषि, असे दोघेजण स्वाध्यायनिष्ठ झाले.

**सिद्धान्ती**—दोन ऋषींची कल्पना जुळत नाहीं. कारण शेवटीं ह्या मंत्रांत—व तिसऱ्या मंत्रांत—क्रियापदें आहेत, तीं एकवचनीं आहेत. बक आणि ग्लाव हीं दोन्हीं एका पुरुषाचींच नांवें होत. हा ऋषि द्व्यामुष्यायण होता.

**पूर्वपक्षी**—पण 'वा' चा 'अथवा' असा अर्थ केला तर ?

**सिद्धान्ती**—कसें जुळावें ? कर्मासंबंधानें विकल्प संभवतो. उदाहरणार्थ, 'सूर्य उगवला असतां आहुति द्यावी असें कोणी म्हणतात, कोणी 'सूर्य उगवला नाहीं, तोंच द्यावी' असें म्हणतात—दोन्ही ही पक्ष खरे असतात; म्हणून विकल्प योग्य होतो. पण एकच पुरुष आला असतां एकानें 'बक आला आहे म्हणावें' आणि दुसऱ्यानें तो 'बक नव्हे ग्लाव आहे' असें म्हणावें, असा विकल्प केव्हांही शक्य नसतो. तात्पर्य, हे दोन पुरुष नव्हते. एकाच पुरुषाचीं बक आणि ग्लाव अशीं दोन नांवें होतीं. धर्मशास्त्रांत व व्यवहारांत द्विगोत्री पुरुष असतात, हें

प्रसिद्ध आहे. धर्मशास्त्रांत म्हटलें आहे कीं, ज्या पुरुषापासून पुत्र उत्पन्न झाला आणि ज्यानें त्याचें धर्मतः ग्रहण केलें, त्या उभयतांचाही तो ऋक्थी ( वारस ) आणि पिंडदाता होतो.

पूर्वपक्षी--दाल्भ्याहून निराळा मैत्रेय होता, असें आम्हीं आग्रहानें म्हटलेंच तर ?

सिद्धान्ती—अहो ! उद्गीथाचे ठिकाणीं उद्गात्याचें चित्त एकनिष्ठ झालें होतें हें मुख्यतः सांगावयाचें आहे. ऋषी किती होते, हें श्रुतीला सांगावयाचें नाहीं. असो; तुम्ही असें समजालच, तर आम्ही तुमचाही अर्थ मान्य करूं. मात्र यामुळें बक, ग्लाव आणि मैत्रेय असे तीन ऋषि होऊं लागतील ! निदान दोन तरी होतील ! हें आचार्यांनीं भाष्यांत 'वा' शब्दाची योजना केली आहे, त्या-संबंधानें झालें. आतां मंत्रांत 'वा' हें जें पद आहे, तें केवळ स्वाध्यायासाठीं आहे. त्याचा विशेष असा अर्थ नाहीं. तात्पर्य स्वाध्याय हा प्रधान विषय आहे. ऋषि १,२, किंवा ३ हा गौण प्रश्न आहे. असो; स्वाध्याय करण्यासाठीं गांवाच्या बाहेर एका निवांत आणि पाणी जवळ असणाऱ्या जागीं तो उद्गाता गेला. आतांच आम्हीं सांगितलें कीं, 'बाहेर गेला' 'वाट पाहता झाला' इत्यादि एकवचनी प्रयोग एका मात्र ऋषीची स्थापना करितात. 'श्वोद्गीथानें (श्वारूपी उद्गीथानें) सांगितल्याप्रमाणें ऋषीनें त्याची वाट पाहिली ( मंत्र तिसरा ), यावरून त्या ऋषीचें स्वाध्यायकरण अन्न-कामना-सिद्ध्यर्थ होतें, असें अनुमान काढण्यास कांहीं एक प्रत्यवाय नाहीं ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**तस्मै श्वा श्वेतः प्रादुर्बभूव तमन्ये श्वान उपस-मेत्योचुरन्नं नो भगवानागायत्वशनायाम वा इति ॥२॥**

**अन्वय व अर्थः—तस्मै श्वेतः श्वा प्रादुर्बभूव** ( त्याला एक शुभ्र श्वा दिसला, त्याच्या समीप एक शुभ्र श्वा प्रकट झाला) **अन्ये श्वानः उपसमेत्य तं उचुः** ( इतर श्वान त्याच्या भोंवतीं जमून म्हणाले ) **भग-वान् नः अन्नं आगायतु, अशनायामः वै इति** ( हे भगवन्, शुभ्र श्वाना, 'आम्हांस अन्न मिळावें एतदर्थ गायन कर, आम्हीं अत्यंत बुभुक्षित आहों ' असें इतर श्वान म्हणाले ) ॥ २ ॥

स्वाध्यायेन तोषिता देवतार्षिर्वा श्वरूपं गृहीत्वा श्वा श्वेतः संस्तस्मा ऋषये तदनुग्रहार्थं प्रादुर्बभूव प्रादुश्चकार। तमन्ये शुक्लं श्वानं क्षुल्लकाः श्वान उपसमेत्योचुरुक्तवन्तोऽन्नं नोऽस्मभ्यं भगवानागायत्वागानेन निष्पादयत्वित्यर्थः। मुख्यप्राणं वागादयो वा प्राणमन्वन्नभुजः स्वाध्यायपरितोषिताः सन्तोऽनुगृह्णीयुरेनं स्वरूपमादायेति युक्तमेवं प्रतिपत्तुम्। अशनायाम वै बुभुक्षिताः स्मो वा इति॥ २॥

**सिद्धान्ती**–या ऋषींच्या स्वाध्यायानें कोणी देवता किंवा महर्षि संतुष्ट होऊन प्रसाददात्या देवतेनें पांढऱ्या कुत्र्याचें रूप घेतलें, त्या ऋषीवर अनुग्रह करण्यासाठींच हें अलौकिक स्वरूप प्रकट झालें. तो शुभ्र श्वान (कुत्रा) पाहून त्याच्या भोंवतीं दुसरे क्षुल्लक कुत्रे जमले आणि म्हणाले; ' आम्हांला अन्न मिळेल, असें गायन, भगवंता, तुम्हीं करावें. आमच्यासाठीं अन्न सिद्ध होईल, असें करावें.' आतां तात्पर्यतः पाहिलें असतां असें दिसतें कीं, वाणी आदि प्राण मुख्य प्राणाच्या तंत्रानें आपआपले विषय उपभोगितात. पण मुख्य प्राण व तदनुगामी वाणी आदि देवता ऋषीच्या स्वाध्यायानें परितुष्ट झाल्या आणि श्वानाचीं रूपें घेऊन त्यांच्यावर अनुग्रह करण्यासाठीं प्रकट झाल्या; असें समजणें योग्यच आहे. असें समजलें नाहीं, तर श्रुतीचें वाक्य अनिर्धारित राहतें व प्रकरणाशीं त्याचा अर्थ कांहींच जुळत नाहीं. असो; कुत्रे म्हणाले: ' आम्ही बुभुक्षित आहों ' ॥ २॥

---

## मंत्र तिसरा.

**तान्होवाचेहैव मा प्रातरुपसमीयातेति तद्ध बको दाल्भ्यो ग्लावो वा मैत्रेयः प्रतिपालयांचकार॥ ३॥**

**अन्वय अर्थः**––**तान् उवाच ह** (त्यांना तो शुभ्र श्वान म्हणाला) **इह एव प्रातः मा उपसमीयात इति** ( येथेंच तुम्ही उद्यां सकाळीं माझ्या सांनिध या ) **तत् ह बकः दाल्भ्यः ग्लावः वा मैत्रेयः प्रतिपालयांचकार** ( तेथेंच बक दाल्भ्य म्हणजे मैत्रेय ग्लाव वाट पाहता झाला ) ॥३॥

एवमुक्ते श्वा श्वेत उवाच तान्क्षुल्लकाञ्शुन इहैवास्मिन्नेव देशे मा मां प्रातः प्रातःकाल उपसमीयातेति। दैर्घ्यं छान्दसं समीयातेति

प्रमादपाठो वा । प्रातःकालकरणं तत्काल एव कर्तव्यार्थम् । अन्नदस्य वा सवितुरपराह्णेऽनाभिमुख्यात् । तत्त्रैव ह बको दाल्भ्यो ग्लावो वा मैत्रेय ऋषिः प्रतिपालयांचकार प्रतीक्षणं कृतवानित्यर्थः ३

सिद्धान्ती—क्षुल्लक कुत्र्यांचें तें भाषण ऐकून शुभ्र श्वान म्हणाला; ह्याच स्थानीं उद्यां सकाळीं येऊन माझ्या संनिध उभे रहा—

शि०—मंत्रांतील समीयात ' या पाठाचें दीर्घत्व आर्ष असेल ?

सिद्धान्ती—होय, किंवा तो लेखकप्रमाद आहे असें समजावें.

शि०—पण प्रातःकालच कां सांगितला ?

सिद्धान्ती—कारण, उद्गान करावयाचें असतें, तें प्रातःकालींच असतें. अन्नदाता असो वा देवसविता असो, अपराह्णकालीं ( दोन प्रहर उलटून गेल्यानंतर ) कोणत्याही देवता अभिमुख होत नाहींत. दोन प्रहरच्या आधींच अन्नदाता अन्न देण्याला सामान्यतः सिद्ध असतो; व सविता ही प्रार्थना करण्याला दोन प्रहरच्या आधींच योग्य असतो. देवसविता वृष्टिद्वारा अन्न समृद्धि करितो, आणि याप्रमाणें अन्नदाता होतो, हें सांगावयास नकोच. असो; दाल्भ्य बक नामक म्हणजे मैत्रेय ग्लाव नामक द्वामुष्यायण ऋषि प्रातःकालाची प्रतीक्षा करिता झाला ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा.

**ते ह यथैवेदं बहिष्पवमानेन स्तोष्यमाणाः सꣳरब्धाः सर्पन्तीत्येवमाससृपुस्ते ह समुपविश्य हिं चक्रुः ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थः—यथा एव इदं बहिष्पवमानेन स्तोष्यमाणाः संरब्धा सर्पंति इति एवं ते आससृपुः समुपविश्य ते हिं चक्रुः** (ज्याप्रमाणें बाहिष्पवमान नामक स्तोत्र गात असतां संरब्ध म्हणजे एकमेकां सन्निध उभे राहून घेर धरितात, त्याप्रमाणें ते कुत्रे तेथें येऊन घेर धरिते झाले. आणि नंतर खालीं बसून ' हिंकार ' करिते झाले ) ॥ ४ ॥

ते श्वानस्तत्रैवाऽऽगम्य ऋषेः समक्षं यथैवेह कर्मणि बहिष्पवमानेन स्तोत्रेण स्तोष्यमाणा उद्गातृपुरुषाः संरब्धाः संलग्ना अन्योन्यमेव मुखेनान्योन्यस्य पुच्छं गृहीत्वाऽऽससृपुराससृपवन्तः परिभ्र-

मणं कृतवन्त इत्यर्थः । त एवं संसृप्य समुपविश्योपविष्टाः सन्तो हिं चक्रुर्हिङ्कारं कृतवन्तः ॥ ४ ॥

सिद्धान्ती—ते कुत्रे दुसरे दिवशीं सकाळीं तेथें आले आणि ऋषीसमक्ष त्यांनीं एकप्रकारचा फेर धरिला—

शि०—म्हणजे ?

सिद्धान्ती—यज्ञकर्म चाललें असतां यजमानासह सर्व ऋत्विज बहिष्पवमान नामक तीन त्रिचांचें स्तोत्र यज्ञवेदीच्या बाहेर राहून म्हणत असतात. हें म्हणत असतां उद्गाते एकमेकांशीं सलग्न होऊन ( एकमेकांचे हात धरून ) गात असतात. त्याप्रमाणेंच एका कुत्र्यानें दुसऱ्याचें शेंपूट आपल्या तोंडांत धरावें, दुसऱ्यानें तिसऱ्याचें, आणि असा वर्तुळाकार घेर धरून फिरत रहावें; असा फेर त्या कुत्र्यांनीं धरिला आणि त्यांचें परिभ्रमण संपल्यानंतर ते खालीं बसले आणि ' हिं ' असा शब्द काढून ओरडते झाले.

शि०— दृष्टांतांत उद्गाते पुरुष इतकेंच म्हटलें आहे ?

सिद्धान्ती—उद्गात्यांमध्यें अध्वर्युप्रमुख यजमानापर्यंतची सर्व मंडळी घ्यावयाची ॥ ४ ॥

---

## मंत्र पांचवा.

**ओ३मदा३मों पिबा३मों३देवो वरुणः प्रजापतिः सविता२ऽन्नमिहा२ऽऽहरदन्नपते ३ऽन्नमिहा२ ऽऽहरा२ ऽऽहरो३मिति ॥ ५ ॥**

**इति प्रथमाध्यायस्य द्वादशः खण्डः ॥ १२ ॥**

**अन्वय व अर्थः—ॐ अदाम, ॐ पिबाम** ( ॐ आम्हीं अन्न भक्षण करितों; आम्हीं जलप्राशन करितों ) ॐ **देवः वरुणः प्रजापतिः सविता इह अन्नं आहरत्** ( ॐ; तेजस्वी जगताचा लय करणारा वरुण, पालन करणारा प्रजापति आणि उत्पन्न करणारा सविता आम्हांस अन्न आणून देवो ) **अन्नपते इह अन्नं आहर, आहर, ॐ इति** ( हे अन्नपते, येथें आम्हांला अन्न आणून दे, आम्हांस अन्न आणून दे, याप्रमाणें ते बोलते झाले. हाच हिंकार. शेवटीं त्यांनीं ॐकारोच्चार केला॥५॥

ओमदामों पिबामों देवो द्योतनात् । वरुणो वर्षणाज्जगत: । प्रजापति: पालनात्प्रजानाम् । सविता प्रसवितृत्वात्सर्वस्याऽऽदित्य उच्यते । एतैः पर्यायैः स एवंभूत आदित्योऽन्नमस्मभ्यमिहाऽऽहर-दाहरत्विति । त एवं हिं कृत्वा पुनरप्यूचुः-स त्वं हेऽन्नपते । स हि सर्वस्यान्नस्य प्रसवितृत्वात्पतिः । न हि तत्पाकेन विना प्रभूतमन्नमणुमात्रमपि जायते प्राणिनाम् । अतोऽन्नपतिः । हेऽन्न-पतेऽन्नमस्मभ्यमिहाऽऽहराऽऽहरेति । अभ्यास आदरार्थः । ॐमिति ॥ ५ ॥

इति प्रथमाध्यायस्य द्वादशः खण्डः ॥ १२ ॥

सिद्धान्ती--गाण्यासाठीं त्यांनीं ओंकाराचा तीन वेळ उच्चार केला. 'ओं, आम्हांस खाऊं द्या,' 'ओं, आम्हांस पीऊं द्या,' 'ओं' असा तीन वेळ ओंकाराचा उच्चार केला. तसेंच, 'तेजः पूर्ण असणारा आदित्य हा जगतावर वरुणरूपानें जलवृष्टि करितो, किंवा तमानें सर्वांस आच्छादित करितो व प्रजापतिरूपानें पालन करितो व सवितारूपानें सर्वांस जन्म देतो, सारांश, या भिन्न भिन्न स्वरूपांनीं प्रकट होणारा हा आदित्य आम्हांला येथें अन्न आणून देवो!' हें सर्व हिंकाराचें तात्पर्य आहे. हिंकारामध्यें इतका अर्थ गर्भित आहे. असा हिंकार करून ते पुनः म्हणाले; व पुढें हे अन्नपते! अशी त्यांनीं प्रार्थना केली. हिंकाररूपानें ही प्रार्थना आहे.

शि०—सवित्याला अन्नपति म्हटलें. कारण, सर्व अन्नाची उत्पत्ति किंवा प्रसव त्याच्याच द्वारानें होतो. त्याच्या उष्णतेनें संस्कृत झाल्याशिवाय कोणत्याही पदार्थाला जीवांच्या अन्नाची योग्यता येत नाहीं. म्हणून त्याला अन्नपति म्हणावयाचें ?

सिद्धान्ती—होय, ते म्हणाले, 'हे अन्नपते, आम्हाला येथें अन्न आणून दे, अन्न आणून दे' हें दोनदां मागणें ( अन्नाची याचना ) आदरार्थ आहे. शेवटीं ओंकाराचा उच्चार केला आहे, तो सवित्याच्या प्रार्थनेचा जो मंत्र त्याच्या समाप्त्यर्थ आहे. आणि 'इति' शब्दाची जी योजना श्रुतीनें केली आहे, ती भक्ति-विषक उपासना संपली, हें दाखविण्यासाठीं आहे.

शि०—भक्ति म्हणजे ?

सिद्धान्ती—मागेंच सांगितलें, भक्ति म्हणजे सामाचा एक भाग म्हणून! यालाच विधता असें म्हणतात. तात्पर्य भक्ति म्हणजे भाग, अंश होय ॥ ५ ॥

खंड बारावा समाप्त.

---

# खंड तेरावा

भक्तिविषयोपासनं सामावयवसंबद्धमित्यतः सामावयवान्तरस्तोभाक्षरविषयाण्युपासनान्तराणि संहतान्युपदिश्यन्तेऽनन्तरं सामावयवसंबंद्धत्वाविशेषात्—

सिद्धान्ती—आतांपर्यंत सामभक्तींच्या अनेक प्रकारांचें उपासन कसें करावें, तें सांगितलें. प्रस्तावप्रतिहारादि सर्व सामाचे अवयव आहेत, त्यांच्याशीं साम हें संबद्ध आहे.म्हणून यापुढेंही सामाचेच अवयवभूत होणारीं जीं इतर उपासनाप्रकरणें, स्तोभाक्षर नामक उपासना प्रकरणें आहेत, त्या सर्वांचा विचार या प्रकरणांत करावयाचा आहे. म्हणजे सामवेदामध्यें विशेषतः स्तोभ नांवाचें जें स्तुतिपर प्रकरण आहे, त्याचा विचार येथें करावयाचा आहे. स्तोभ अक्षरात्मक असतो. अक्षरात्मक सर्व स्तोभ एकदमच घ्यावयाचे आहेत. सामाच्या अवयवांशीं संबंध असणाऱ्या सामभक्तींच्या प्रकरणानंतर सामावयव असणारे स्तोभप्रकरण सहजच येतें—

---

## मंत्र पहिला.

**अयं वाव लोको हाउकारो वायुर्हाइकारश्चन्द्रमा अथकारः। आत्मेहकारोऽग्निरीकारः॥ १॥**

अन्वय व अर्थ—**अयं वाव लोकः हाउकारः** ( हा लोक म्हणजे भूलोक; हा हाउकार नामक स्तोभ आहे ) **वायुः हाइकारः, चंद्रमाः अथकारः, आत्मा इहकारः, अग्निः ईकारः** ( वायु हाइकार, चंद्रमा अथकार, आत्मा इहकार आणि अग्नि ईकार नांवाचे हे स्तोभ+ आहेत )॥ १॥

अयं वावायमेव लोको हाउकारः स्तोभो रथंतरे साम्नि प्रसिद्धः—इयं वै रथंतरमिति। अस्मात्संबन्धसामान्याद्धाउकारस्तोभोऽयं लोक इत्येवमुपासीत। वायुर्हाइकारः। वामदेव्ये सामनि हाइकारः प्रसिद्धः। वाय्वप्संबन्धश्च वामदेवस्य साम्नो योनिरिति। अस्मात्सामान्याद्धाइकारं वायुदृष्ट्योपासीत। चन्द्रमा अथकारः। चन्द्रदृष्ट्याऽथकारमुपासीत। अन्ने हीदं स्थितम्। अनात्मा चन्द्रः।

---

+ ऋगक्षरांचें गायन करितात. पण या अक्षरांशिवाय सर्वथा वाच्यशून्य ( अर्थशून्य ) अशीं कांहीं अक्षरें गायनशोभेकरितां येतात, त्यांस 'स्तोभ–स्तोभाक्षरें' म्हणावें. यांची उपासना कांहीं अपूर्व फल उत्पन्न करिते.

थकाराकारसामान्याच्च । आत्मेहकारः । इहेति स्तोभः प्रत्यक्षो ह्यात्मेति व्यपदिश्यते । इहेति च स्तोभः । तत्सामान्यात् । अग्नि-रीकारः । ईनिधनानि चाऽऽग्नेयानि सर्वाणि सामानीत्यतस्तत्सा-मान्यात् ॥ १ ॥

सिद्धान्ती--हा लोकच हाउकार आहे. हा लोक म्हणजे भूलोक होय.

पूर्वपक्षी—कशावरून ?

सिद्धान्ती--रथंतर या नांवाचे सामांत ही गोष्ट प्रसिद्ध आहे. ‘ ही (पृथिवी) खरोखर रथंतर आहे ’ असा मंत्रवर्ण आहे. याप्रमाणें हाउकार स्तोभ रथंतर सामांत असतो, असें श्रौतवाक्य आहे. पृथ्वीचा आणि हाउकाराचा संबंध रथंतर सामामध्यें सामान्य आहे. उभयतां रथंतर सामाशीं एकाच रीतीनें संबद्ध आहेत. म्हणून हाउकार स्तोभ हाच पृथिवीलोक आहे, असें समजून त्याची उपासना करावी. पृथिवीदृष्टीनें हाउकाराची उपासना करावी.

शिष्य—आतांच जो आपण रथंतर सामाचा उल्लेख केला, त्यावरून पृथ्वी रथंतर आहे; आणि प्रस्तुत असलेला स्तोभ रथंतर आहे; म्हणून त्या उभयतांचा संबंध नित्य आहे. अतएव पृथ्वीदृष्टीनें हाउकाराची उपासना करणें योग्य आहे असें झालें.

सिद्धान्ती—याचप्रमाणें वामदेव नामक सामामध्यें हाइकार स्तोभ प्रसिद्ध आहे. तसेंच वायूचा आणि स्त्रीरूप अपांचा ( जलाचा ) संबंध होतो, तेव्हां वामदेव्य साम निष्पन्न होतें; असें श्रुति म्हणते. म्हणून जल आणि वायु यांचा वामदेव्य सामाशीं एक प्रकारचाच नित्य संबंध येतो, यास्तव उपासकानें वायु हा हाइकार स्तोभ आहे, अशी दृष्टि ठेवावी. वायुदृष्टीनें हाइकाराची उपासना करावी; तसेंच अथकार या नांवाचा स्तोभ आहे, त्याची चंद्रमादृष्टीनें उपासना करावी. ‘ अन्नामध्यें हें सर्व आहे ’ अशी श्रुति आहे, (तृतीय खंड मं० ६ पहा). चंद्र हा अनात्मा म्हणजे अन्नरूप आहे. आतांच सांगितलेल्या सहाव्या खंडांतील मंत्रांत ‘ थ ’ या अक्षराची अन्नदृष्टीनें उपासना करावी, असें सांगितलें आहे. चंद्र अनात्मा ( अजीव ) म्हणजे अन्न म्हणजे थ आहे. तसेंच अन्नांतील ‘अ’ आणि अनात्म्यांतील ‘ अ ’ हे दोन्ही एकरूपच आहेत. म्हणून अकार आणि थकार रूप असणारा चंद्र आणि अथकारांतील अथ हीं दोन्ही एकरूप आहेत. एतदर्थ अथकार स्तोभाची चंद्रदृष्टीनें उपासना करावी. इहकार स्तोभाची आत्मदृष्टीनें उपासना करावी. कारण, ‘इह’ हा स्तोभ आहे आणि ‘ आत्मा कोठें आहे ? ’ असें विचारल्यास ‘ इह ( हा येथें )’ असें आपण दाखवितों. उभयतांमध्यें इह हा शब्द एकच असल्यामुळें आत्मदृष्टीनें इहकारस्तोभाची उपासना करावी, असें

श्रुति सांगते. अग्निदृष्टीनें ईकारस्तोभाची उपासना करावी. कारण, जीं सर्व अग्निसामें आहेत तीं 'ईनिधन आहेत.'

शिष्य—ईनिधन म्हणजे काय?

सिद्धान्ती—या सर्व सामांमध्यें ई हें अक्षर सर्वत्र निहित म्हणजे ठेवलेलें आहे, असें दिसतें; म्हणून त्यांस ईनिधन म्हणतात. अतएव अग्निदृष्टीनें ईकाराची उपासना विहित केली आहे ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**आदित्य ऊकारो निहव एकारो विश्वेदेवा औहोयिकारः प्रजापतिर्हिंकारः प्राणः स्वरोऽन्नं या वाग्विराट् ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थ—आदित्यः उकारः, निहवः एकारः, विश्वेदेवाः औहोयिकारः, प्रजापतिः हिंकारः, प्राणः स्वरः, अन्नं या, विराट् वाक्** (अर्थ स्पष्टच आहे. शिवाय भाष्यार्थांतच या मंत्राचा अर्थ जास्त विशद होणार ॥ २ ॥

आदित्य ऊकारः। उच्चैरूर्ध्वं सन्तमादित्यं गायन्त्यूकारश्चायं स्तोभः। आदित्यदैवत्ये साम्नि स्तोभ ऊ इत्यादित्य ऊकारः। निहव इत्याह्वानमेकारः स्तोभः। एहीति चाऽऽह्वयन्तीति तत्सामान्यात्। विश्वेदेवा औहोयिकारो वैश्वदेव्ये साम्नि स्तोभस्य दर्शनात्। प्रजापतिर्हिंकारः। आनिरुक्त्याद्धिंकारस्य चाव्यक्तत्वात्। प्राणः स्वरः। स्वर इति स्तोभः। प्राणस्य च स्वरहेतुत्वसामान्यात्। अन्नं या या इति स्तोभोऽन्नम्। अन्नेन हीदं यातीत्यतस्तत्सामान्यात्। वागिति स्तोभो विराडन्नं देवताविशेषो वा। वैराजे साम्नि स्तोभदर्शनात्॥२॥

सिद्धान्ती—आदित्य ऊकार आहे; कारण, उच्च म्हणजे ऊर्ध्वभागीं असणाऱ्या आदित्याचेंच गायन ऋत्विज् करितात. आणि ऊकार हा स्तोभ आहे. ज्या सामाचें आदित्य हें दैवत आहे त्या सामांत ऊ स्तोभ असतो. म्हणून ऊकारस्तोभाची आदित्यदृष्टीनें उपासना करावी. निहव याचा अर्थ आह्वान करणें, आवाहन करणें, बोलावणें; असा आहे. 'निहव' हें एका सामाचें नांव आहे. आपण कोणास बोलावावयाचें असतां 'एहि (या)' अशी हाक मारून बोलावतों. याप्रमाणें

'ए' हें अक्षर निहव आणि एकार या उभयतांत सामान्य आहे, तेव्हां निहवदृष्टीनें एकाराची उपासना करणें हें योग्यच आहे. वैश्वदेव्य नामक सामांत 'औहो-इकार' स्तोभ दृश्यमान होतो; म्हणून विश्वेदेवांच्या दृष्टीनें औहोयिकाराची उपासना करावी. प्रजापति हा हिंकार आहे. कारण, उभयतांही आनिरुक्त्य म्हणजे अव्यक्त आहेत. प्रजापतीचें स्वरूप सांगतां येत नाहीं. प्राण आणि स्वर हे उभयतांही स्वरहेतु असतात; प्राण असेल, तरच स्वर अथवा स्वरघटित वाणी उत्पन्न होणार. तात्पर्य प्राण हा कारण आहे, हें स्वरावरून समजतें, 'स्वरांत' स्वर आहेच. म्हणून प्राण हा स्वर होतो. अर्थात् श्रुति 'स्वरनामक' स्तोभाची प्राणदृष्टीनें उपासना करावयास सांगते. 'या' नामक स्तोभ अन्न आहे. अन्नानें हें सर्व 'याति' (चालू राहतें) म्हणून अन्न आणि या हीं एकरूप आहेत. अतएव 'या' स्तोभावर अन्नदृष्टि ठेवून 'या' स्तोभाची उपासना करावी. वाक नामक स्तोभ म्हणजे विराट् होय. वैराज नामक सामांत वाक्-स्तोभाचें दर्शन होतें. म्हणून वाक् या स्तोभाची विराट्दृष्टीनें उपासना करावी.

शिष्य—विराट् म्हणजे ?

शिष्यः—म्हणजे अन्न किंवा विराट् या नांवाची देवता. कोणताही अर्थ घेतला तरी तात्पर्य एकच आहे ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

### अनिरुक्तस्त्रयोदशः स्तोभः संचरो हुंकारः ॥ ३ ॥

**अन्वय व अर्थः**—त्रयोदशः संचरः स्तोभः हुंकारः अनिरुक्तः (तेरावा संचारी हुंकारस्तोभ अनिरुक्त म्हणजे अशब्द आहे. वाणीला त्याचें वर्णन करितां येत नाहीं) ॥ ३ ॥

अनिरुक्तोऽव्यक्तत्वादिदं चेदं चेति निर्वक्तुं न शक्यत इत्यतः संचरो विकल्प्यमानस्वरूप इत्यर्थः । कोऽसावित्याह—त्रयोदशः स्तोभो हुंकारः । अव्यक्तो ह्ययमतोऽनिरुक्तविशेष एवोपास्य इत्यभिप्रायः ॥ ३ ॥

सिद्धान्ती—अनिरुक्त म्हणजे अव्यक्त. 'हें आहे कीं, तें आहे' असें जेथें निर्वचन करितां येत नाहीं, स्वरूप सांगतांना वाणी जेथें स्तब्ध होते, त्याला अनिरुक्त असें म्हणावें.

शिष्य—मायेलाही आपण अनिर्वचनीय म्हणतों; 'ती सत् आहे' असें म्हणतां येत नाहीं. 'ती असत् आहे' असेंही म्हणतां येत नाहीं. तशांतलाच हा प्रकार ?

सिद्धान्ती—हें ध्यानांत ठेव कीं, हुंकार नामक जो स्तोभ आहे, त्याचें स्वरूप काय आहे, हें निश्चितपणानें सांगतां येत नाहीं. शाखाभेदानें त्याला अनेक स्वरूपें प्राप्त होतात. म्हणून याला 'संचार' (भ्रमण) करणारा, अनेक रूपें धारण करणारा, असें विशेषण उपयोजितात. तसेंच हा सर्व स्तोभांचें कारण आहे, असेंही म्हणण्यास प्रत्यवाय नाहीं. याला सर्व स्तोभांचीं स्वरूपें घेतां येतात, म्हणून याचें स्वरूप काय आहे तें सांगतां येत नाहीं. 'पाण्याचा रंग कसा' हें सांगतां येत नाहीं. ज्या पदार्थाशीं तें संगत होईल, त्याचा तें रंग घेतें. हा जसा पाण्याचा स्वभाव, तसाच 'हुं' काराचा स्वभाव आहे; म्हणून त्याला (हुंकाराला) अनिरुक्त हें नांव प्राप्त झालें आहे; तथापि हा सर्वकारण आहे म्हणून कारणदृष्टीनें हुंकाराची उपासना करावी. याचें निर्वचन करितां येत नाहीं, विशेष गुणधर्म कोणते हें निश्चयानें सांगतां येत नाहीं, म्हणून याला **अनिरुक्त–विशेष** असें म्हणावें.

शिष्य—म्हणजे स्वरूप सांगतां न येणें हा याचा विशेष धर्म आहे. म्हणून याला अनिरुक्त–विशेष म्हणावयाचें ?

सिद्धान्तीः—होय. येथें पाहिजे तें स्वरूप घेतां येणें हा हेतु आहे. असो; हुंकार हा तेरावा स्तोभ आहे.

| देवता. | स्तोभ. | सामान्य. |
|---|---|---|
| पृथिवी | हाउकार | रथंतर साम |
| वायु | हाइकार | वामदेव्य साम |
| चंद्रमा | अथकार | अ आणि थ हीं अक्षरें साम |
| आत्मा | इहकार | इह शब्द |
| अग्नि | ईकार | ई |
| आदित्य | ऊकार | उत् |
| निह्व | एकार | ए |
| विश्वेदेव | औहोयिकार | वैश्वदेव्य |
| प्रजापति | हिंकार | अव्यक्तत्व |
| प्राण | स्वर | स्वरहेतुत्व |
| अन्नं | या | यात्व |
| विराट | वाक् | वैराज साम |
| सर्वकारण | हुंकार | अनिरुक्तत्व |

असे हे तेरा स्तोभ आहेत. त्या त्या देवतांची दृष्टि ठेवून यांची उपासना करावयाची आहे ॥ ३ ॥

स्तोभाक्षरोपासनाफलमाह—

सिद्धान्ती—हीं वर जीं स्तोभाक्षरें सांगितलीं, त्यांच्या उपासनेचें फल श्रुति सांगत आहे—

---

## मंत्र चवथा.

**दुग्धेऽस्मै वाग्दोहं यो वाचो दोहोऽन्नवानन्नादो भवति य एतामेवꣳ साम्नामुपनिषदं वेदोपनिषदं वेद ॥ ४॥**

**इति प्रथमाध्यायस्य त्रयोदशः खण्डः ॥१३ ॥**

**इति छान्दोग्योपनिषद्ब्राह्मणे प्रथमोऽध्यायः समाप्तः ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—यः वाचः दोहः वाक् अस्मै दोहं दुग्धे** ( वाणी देवता ह्या साधकासाठीं वाणीचा दोह करितें ) **यः एवं एतां साम्नां उपनिषदं वेद, उपनिषदं वेद, अन्नवान् अन्नादः भवति** ( जो आतांच वर्णन केलेल्या सामावयव उपनिषदाचें ज्ञान करून घेतो, तो अन्नवान् आणि अन्नाद होतो ) ॥ ४ ॥

दुग्धेऽस्मै वाग्दोहमित्याद्युक्तार्थम् । य एतामेवं यथोक्तलक्षणां साम्नां सामावयवस्तोभाक्षरविषयामुपनिषदं दर्शनं वेद तस्यैतद्यथोक्तं फलमित्यर्थः । द्विरभ्यासोऽध्यायपरिसमाप्त्यर्थः । सामावयवविषयोपासनाविशेषपरिसमाप्त्यर्थो वेति ॥ ४ ॥

इति प्रथमाध्यायस्य त्रयोदशः खण्डः ॥ १३ ॥

सिद्धान्ती—वाणीदेवता वाणीचा या साधकांसाठीं दोह करिते इत्यादि अर्थ तिसऱ्या खंडाच्या सातव्या मंत्राच्या अर्थाप्रमाणेंच आहे. तात्पर्य, वाणीदेवता आपल्या स्वतःचें ( वाङ्मयाचें ) म्हणजे वेदादि सर्व ग्रंथांचें आपण स्वतः दोहन करून साधकाला या दोहाचें ( मीमांसेचें ) फल देते.

शिष्य—तक्र घुसळलें असतां जसें नवनीतात्मक फल उत्पन्न होतें, आणि ताक घुसळणाऱ्याला तें लोणी मिळतें, त्याप्रमाणें ऋग्वेदादि सर्व वाङ्मयाचा उपासनापूर्वक दोह केला म्हणजे साधकाला उत्कृष्ट प्रकारचें फल प्राप्त होतें; असें श्रुतीला सांगावयाचें आहे.

सिद्धान्ती—त्याच दृष्टीनें फल सांगण्यासाठीं श्रुति म्हणते कीं, आतांपर्यंत या प्रकरणांत सामांचे अवयव जे स्तोभ (हाउकार, हाइकार इत्यादि त्रयोदश अक्षरें) तो आहे विषय ज्या प्रकरणाचा तें उपनिषद् किंवा दर्शन ज्याला उत्कृष्ट समजलें, त्याला दोन्ही मंत्रांत सांगितलेलें (खं० ३ मं० ७ आणि खं० १३ मं० ४) फल मिळतें; म्हणजे तो विद्वान्, अन्नसंपन्न आणि अन्नभोक्ता होतो. अध्याय संपला किंवा सामावयव-विषयक विशेष उपासनाप्रकरणें संपलीं, हें दाखविण्यासाठीं 'उपनिषदं वेद' या शब्दांची द्विरुक्ति केली आहे ॥ ४ ॥

तेरावा खंड संपला.



# अध्याय दुसरा.

## खण्ड पहिला.

---

ओमित्येतदक्षरमित्यादिना सामावयवविषयमुपासनमनेकफलमुपदिष्टम् । अनन्तरं च स्तोभाक्षरविषयमुपासनमुक्तम् । सर्वथाऽपि सामैकदेशसंबद्धमेव तदिति । अथेदानीं समस्ते साम्नि समस्तसामविषयाण्युपासनानि वक्ष्यामीत्यारभते श्रुतिः । युक्तं ह्येकदेशोपासनानन्तरमेकदेशिविषयमुपासनमुच्यत इति ।

सिद्धान्ती—' ॐ हेंच अक्षर आहे ' या मंत्रानें पहिल्या अध्यायाला श्रुतीनें आरंभ केला आणि सामाचे जे अवयव असतात, तत्संबंधीं उपासना व त्या उपासनेचें प्रत्येकीं फल हेंही सांगितलें. नंतर लागलींच ' स्तोभाक्षरें ' हा विषय घेऊन त्यांचें उपासनही फलासह सांगितलें आणि अध्याय पूर्ण केला. पण हें सर्व व्याख्यान सामाचा एकदेश लक्षांत आणून मात्र केलें आहे. अवयवशः उपासना केली असतां काय फलप्राप्ति होते, हें सांगितलें आहे. अर्थात् समस्त सामाची, अवयवीची उपासना कशी फलप्रद होते, हें सांगावयाचें राहिलें.

शिष्य — येथपर्यंत प्रत्येक अवयवाच्या उपासनेचें प्रकरण झालें; पण या अध्यायांत अवयवींचे ( अंगींचे ) उपासनेचा विचार व्हावयाचा आहे.

सिद्धान्ती—हें मनांत आणूनच श्रुतीनें या अध्यायाला प्रारंभ केला आहे. योग्यच आहे कीं, एकदेशात्मक उपासना सांगितल्यानंतर एकदेशी जो अंगी त्या विषयाची म्हणजे अवयवीची उपासना श्रुतिनें सांगावी. एकदेशविषयाच्या प्रकरणानंतर एकदेशात्मक ( संघातात्मक ) अवयवीची उपासना सांगणें श्रुतीला प्राप्तच झालें. असो—

---

### मंत्र पहिला.

**ॐ । समस्तस्य खलु साम्न उपासनꣳ साधु यत्खलु साधु तत्सामेत्याचक्षते यदसाधु तदसामेति ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः**—खलु, समस्तस्य साम्नः उपासनं साधु ( समस्तसामाचें उपासन साधु म्हणजे चांगलें आहे, ह्या प्रकरणाचा

ऊहापोह करावयाचा ) **यत् खलु साधु तत् साम, यत् असाधु तत् असाम, इति आचक्षते** ( खरोखर जें **साधु** आहे, मंगल आहे, त्याला साम आणि जें **असाधु** अथवा अमंगल आहे, त्याला **असाम** म्हणतात)॥ १॥

समस्तस्य सर्वावयवविशिष्टस्य पाञ्चभाक्तिकस्य साप्तभक्तिकस्य चेत्यर्थः। खल्विति वाक्यालंकारार्थः। साम्न उपासनं साधु। समस्ते साम्नि साधुदृष्टिविधिपरत्वान्न पूर्वोपासननिन्दार्थत्वं साधुशब्दस्य। ननु पूर्वत्राविद्यमानं साधुत्वं समस्ते साम्न्यभिधीयते। न। साधु सामेत्युपास्त इत्युपसंहारात्। साधुशब्दः शोभनवाची। कथमवगम्यत इत्याह—यत्खलु लोके साधु शोभनमनवद्यं प्रसिद्धं तत्सामेत्याचक्षते कुशलाः। यदसाधु विपरीतं तदसामेति॥ १॥

**सिद्धान्ती**—समस्त सामाची उपासना आतां विहित करावयाची आहे. समस्त म्हणजे सर्व—अवयव—विशिष्ट अवयवी; समस्ताचे दोन प्रकार आहेत. एक पांचभाक्तिक (पांच अवयवांचें) आणि दुसरा सातभक्तिक (सात अवयवांचें) साम—

**शिष्य**—मंत्रांतील खलु शब्दाचा अर्थ काय ?

**सिद्धान्ती**—तो केवळ वाक्यालंकार आहे. खलु शब्दानें वाक्याला शोभा येते. त्या शब्दाचा अर्थ प्रस्तुत प्रकरणाला फारसा उपयोगी नाहीं. असो, समस्त सामाची उपासना साधु म्हणजे मंगलकारक आहे.

**पूर्व०**—ही समस्त सामाची उपासना **मंगलकारक** आहे, असें **विशेषत्वानें** बोलून श्रुति पूर्वीं ज्या अवयवोपासना सांगितल्या त्यांची निंदा मात्र करीत आहे, बरें का ! अर्थात् अवयवांची उपासना करणें इष्ट नाहीं व श्रुतिमान्य नाहीं.

**सिद्धान्ती**—असें नाहीं, 'समस्त अवयवीवर मंगल दृष्टि ठेवावी' असा उपसंहारांत उपदेश ( मंत्र ४ खं० २ ) केला आहे. तेव्हां पूर्वींच्या अवयवोपासनाची निंदा होते, असें कां वाटावें ?

**पूर्वपक्षी**—तथापि, अवयवांच्या उपासनाप्रसंगीं 'साधु' शब्द अविद्यमान होता. आणि समस्ताची उपासना 'मंगलकारक आहे' असें श्रुति सांगते. पहिली उपासना 'साधु' असती, तर श्रुतीनें तसें प्रत्यक्ष सांगितलें असतें; पण तसें सांगितलें नाहीं; म्हणून अनुमान निघतें कीं, श्रुतीला पहिल्या उपासनांची निंदा कर्तव्य आहे.

**सिद्धान्ती**—हें अनुमान सिद्ध होण्याला हेतु नाहीं. तेथेंही साधुत्व आहेच. तेथें विशेषणत्वानें 'साधु' शब्दाचा उपयोग केला नाहीं, इतकेंच !

शिवाय " 'साम साधु आहे' अशा दृष्टीनें उपासना करितो " इत्यादि याच खंडांतील चवथ्या मंत्रांत आलेलें मंत्रवाक्य स्पष्ट सांगतें कीं, सर्व सामें ' साधु ' आहेत. अर्थात् श्रुतीला पूर्वोपासनांची निंदा कर्तव्य नाहीं.

शिष्य—साधु म्हणजे सुमंगल, शोभावान्, शोभन, असा अर्थ आहे.

सिद्धान्ती—कारण व्यवहारांत ज्याला आपण साधु म्हणतों तें शोभन, अनिंद्य, शुद्ध अथवा मंगल असतें. आणि जें असाधु तें अशोभन, अमंगल अशुद्ध असतें, असें आपण म्हणतों. असो; समस्तसामाच्या उपासनेचें हें मंगलकारक प्रकरण आहे ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**तदुताप्याहुः साम्नैनमुपागादिति साधुनैनमुपागादित्येव तदाहुरसाम्नैनमुपागादित्यसाधुनैनमुपागादित्येव तदाहुः ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः—तत् उत् अपि आहुः** ( व्यावहारिक प्रसंगीं सामान्यतः असें म्हणतात ) " **'साम्ना एनं उपागात् इति' ' साधुना एनं उपागात् '** इति " **एव तत् आहुः** ( " ' त्याकडे सामानें गेला ' असा वाक्यप्रयोग केला असतां 'चांगल्या हेतूनें तो त्याकडे गेला ' असाच अर्थ होतो ") " **' एनं असाम्ना उपागात् इति ' ' असाधुना एनं उपागात् ' " इति एव तत् आहुः** ( आणि ' त्याकडे असामानें गेला ' असा प्रयोग केला म्हणजे ' तो दुष्ट हेतूनें गेला ' असाच वाक्यार्थ आपण समजतों ) तात्पर्य ' साधु ' शब्दाचा अर्थ **चांगला हेतु असणें** आणि ' असाधु ' यांचा **वाईट हेतु धारण करणें** होय, असा लौकिक संप्रदाय आहे ) ॥ २ ॥

तत्तत्रैव साध्वसाधुविवेककरण उताप्याहुः—साम्नैनं राजानं सामन्तं चोपागादुपगतवान् । कोऽसौ । यतोऽसाधुत्वप्राप्त्याशङ्का स इत्यभिप्रायः । शोभनाभिप्रायेण साधुनैनमुपागादित्येव तत्तत्राऽऽहुर्लौकिका बन्धनाद्यसाधुकार्यमपश्यन्तः । यत्र पुनर्विप-

यँयो बन्धनाद्यसाधु कार्यं पश्यन्ति तत्रासाम्नैनमुपागादित्यसाधुनै-नमुपागादित्येव तदाहुः ॥ २ ॥

सिद्धान्ती—साधु-शब्दार्थाचा व असाधु-शब्दार्थाचा विवेक करण्यासाठीं असेंही म्हणतात—

शिष्य—काय म्हणतात ?

सिद्धान्तीः—साधु कोणतें आणि असाधु कोणतें हें ठरविण्याची लौकिक पद्धति आहे. 'त्याकडे म्हणजे राजाकडे किंवा मांडलिकाकडे तो सामानें गेला'—

शिष्यः—तो कोण ?

सिद्धान्तीः—ज्याच्यापासून कांहीं तरी असाधुत्वाची प्राप्ति होण्याची शंका आहे, तो पुरुष ( हा कांहींतरी वाईट करील, अशी ज्याच्याबद्दल शंका असते, तो पुरुष ) राजाकडे किंवा राजपुरुषाकडे '**सामानें** गेला' असें म्हटलें म्हणजे 'तो पुरुष **चांगला** हेतु मनांत धरून गेला' असाच अर्थ व्यवहारांत लोक करितात. बंधन, कारागृहवास, इत्यादि अमंगल कार्य उत्पन्न झालें नाहीं, म्हणजे त्या शंकास्पद पुरुषाचें राजाकडे जाणें साधु म्हणजे चांगल्या हेतूचें होतें, असें आपण म्हणतों; पण तद्विपरीत कार्य घडून आलें, बंधन, बंदिखाना, इत्यादि निंद्य गोष्टी घडून आल्या, म्हणजे तो पुरुष राजाकडे **असामानें** गेला होता, अमंगल हेतु धारण करून गेला होता, असें आपण म्हणतों. सारांश, कार्य चांगलें झालें, म्हणजे कारण चांगलें होतें, असें आपण म्हणतों. यावरून '**साम** म्हणजे **साधु**' असा साम शब्दाचा अर्थ आहे. तेव्हां 'साम साधु आहे,' असें म्हणणें म्हणजे साम चांगलें फल उत्पन्न करितें, असा श्रुत्यर्थ होतो ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**अथोताप्याहुः साम नो बतेति यत्साधु भवति साधु बतेत्येव तदाहुरसाम नो बतेति यदसाधु भवत्यसाधु बतेत्येव तदाहुः ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थः—अथ उत अपि आहुः** ( आणखीही असाच एक लोकप्रवाद आहे ) **साम नः बत इति** ( हें खरोखर आमचें आम्हींच जाणून ध्यावयाचें आहे ) **यत् साधु भवति तत् 'साधु' बत इति एव आहुः** ( प्रत्यक्ष अनुभवानें जें साधु असतें त्यालाच लोक

साधु असें म्हणतात ) **असाम नः बत इति** ( हें असाम आहे, हें आमचें आम्हांसच समजतें ) **यत् असाधु भवति तत् असाधु बत इति एव आहुः** ( अनुभवानें जें '**असाधु**' असतें त्यालाच लोक '**असाधु** असें म्हणतात ) ॥ ३॥

अथोताप्याहुः स्वसंवेद्यं साम नोऽस्माकं बतेत्यनुकम्पयन्तः संवृत्तमित्याहुः । एतत्तैरुक्तं भवति यत्साधु भवति साधु बतेत्येव तदाहुः । विपर्यये जातेऽसाम नो बतेति । यदसाधु भवत्यसाधु बतेत्येव तदाहुः । तस्मात्सामसाधुशब्दयोरेकार्थत्वं सिद्धम् ॥ ३ ॥

**सिद्धान्ती**—कार्यावरून व साधु असाधु यांचा विवेक केल्यानंतर स्वानुभवानें साधु व असाधु कसें ठरतें, तें श्रुति सांगत आहे.

**शिष्य**—हा सर्व 'अथ' म्हणजे अनंतर या शब्दाचा अर्थ ?

**सिद्धान्ती**—बरोबर आहे. सामान्यतः व्यवहारांत साम साधु असतें, असें स्वतःच्याच जाणिवेनें प्रत्येकास समजत असतें; असें सर्व लोक म्हणजे आपण समजतों.

**शिष्य**—बत म्हणजे अनुकंपा ! अरेरे ! हा अर्थ ?

**सिद्धान्ती**—होय. किंवा बत म्हणजे 'अहो ! हा पहा, काय चमत्कार! सामान्यतः आपण सर्वजण म्हणतो कीं, जें साधु आहे, असें प्रत्यक्ष अनुभवानें ठरतें, त्यालाच आपण 'साधु' असें नांव देतों; आणि जें असाधु आहे, असें आपल्यास अनुभवशः वाटतें, त्याला 'असाधु' असें नांव देतों. तात्पर्य, साम म्हणजे साधु, असा अर्थ आपल्यांपैकीं प्रत्येकाच्या मनांत ठसलेला आहे. कार्यावरून आणि प्रत्येकाच्या जाणीवेवरून 'साम' म्हणजे साधु, आणि 'असाम' म्हणजे असाधु असें ठरलें. सारांश, साम हें साधु म्हणजे 'शोभनवाची' आहे ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा.

**स य एतदेवं विद्वान्साधु सामेत्युपास्तेऽभ्याशो ह यदेनꣳ साधवो धर्मा आ च गच्छेयुरुप च नमेयुः ॥ ४ ॥**

**इति द्वितीयाध्यायस्य प्रथमः खण्डः ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—यः एतत् एवं विद्वान् 'साम साधु' इति उपास्ते, अभ्याशः एनं साधवः धर्माः यद् आगच्छेयुः च उपनमेयुः च** ( जो हें सर्व जाणून 'साम साधु आहे' अशी उपासना करितो, त्याला लवकरच जे कांहीं साधुधर्म असतात, ते प्राप्त होतात व त्याला वंदन करितात ) सामाचें साधुत्व जाणणाऱ्या प्रत्येक सामोपासकाला ते साधुधर्म प्राप्त होतात आणि ते त्याचे दास होतात ॥ ४ ॥

अतः स यः कश्चित्साधु सामेति साधुगुणवत्सामेत्युपास्ते समस्तं साम साधुगुणवद्विद्वांस्तस्यैतत्फलमभ्याशो ह क्षिप्रं ह यदिति क्रियाविशेषणार्थमेनमुपासकं साधवः शोभना धर्माः श्रुतिस्मृत्यविरुद्धा आ च गच्छेयुरुप च नमेयुरुपनमेयुश्च भोग्यत्वेनोपतिष्ठेयुरित्यर्थः ॥ ४ ॥

इति द्वितीयाध्यायस्य प्रथमः खण्डः ॥ १ ॥

**सिद्धान्ती**—साम आणि साधु हे दोन्ही शब्द एकाच अर्थाचे वाचक आहेत. हें जाणून जो कोणी उपासक साधु गुणविशिष्ट समस्त सामाची उपासना करितो, ( 'तें समस्त साम साधु आहे' साम साधुगुणात्मक आहे, असें जाणून जो सामोपासना करितो ) त्याला उत्कृष्ट फलाची प्राप्ति होते. जे म्हणून श्रुतिस्मृत्यनुकूल शोभनधर्म आहेत, ते सर्व त्याच्याकडे आपण होऊन येतात. ते केवळ त्याच्या जवळ येतात; इतकेंच नव्हे, तर त्याला ते सर्वथा नम्र होतात.

**शिष्यः**—नम्र होतात, म्हणजे त्या सर्व मंगलकारक गोष्टींचा त्यानें उपभोग घ्यावा अशी त्या मंगल गोष्टींची इच्छा असते. तात्पर्य, त्याला उत्कृष्ट गोष्टींचा उपभोग प्राप्त होतो. अर्थात् या सर्व गोष्टी श्रुतीला आणि स्मृतीला प्रतिकूल नसल्या पाहिजेत ॥ ४ ॥

पहिला खंड संपला.

---

## खण्ड दुसरा.

### मंत्र पहिला.

**लोकेषु पञ्चविधꣳ सामोपासीत पृथिवी हिंकारः। अग्निः प्रस्तावोऽन्तरिक्षमुद्गीथ आदित्यः प्रतिहारो द्यौर्निधनमित्यूर्ध्वेषु ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—लोकेषु पञ्चविधं साम उपासीत** ( पृथिव्यादि लोकांमध्यें—भुवनांमध्यें-पांच प्रकारानें सामाची उपासना करावी ) **पृथिवी हिंकारः**, अग्निः **प्रस्तावः**, **अंतरिक्षं उद्गीथः**, **आदित्यः प्रतिहारः**, **द्यौः निधनं**, **इति ऊर्ध्वेषु** ( पृथिवी **हिंकार** आहे, अग्नि **प्रस्ताव** आहे, अंतरिक्ष **उद्गीथ** आहे. आदित्य **प्रतिहार** आहे; आणि द्यौ—द्युलोक—**निधन** आहे, अशी ऊर्ध्वस्थ—लोकदृष्टीनें सामाची उपासना करावी ) तात्पर्य पृथ्वी, अग्नि अंतरिक्ष, आदित्य आणि द्युलोक या पांच भुवनांच्या दृष्टीनें हिंकार, प्रस्ताव, उद्गीथ, प्रतिहार आणि निधन हीं पांच प्रतीकें घेऊन समस्त सामांची उपासना करावी. पृथ्वीपासून द्युलोकापर्यंतचे सर्व लोक उत्तरोत्तर श्रेष्ठ आहेत ॥ १ ॥

कानि पुनस्तानि साधुदृष्टिविशिष्टानि समस्तानि सामान्युपास्यानीति। इमानि तान्युच्यन्ते लोकेषु पञ्चविधमित्यादीनि। ननु लोकादिदृष्ट्या तान्युपास्यानि साधुदृष्ट्या चेति विरुद्धम्। न, साध्वर्थस्य लोकादिकार्येषु कारणस्यानुगतत्वात्। मृदादिवद्धटादिविकारेषु। साधुशब्दवाच्योऽर्थो धर्मो ब्रह्म वा सर्वथाऽपि लोकादिकार्येष्वनुगतम्। अतो यथा यत्र घटादिदृष्टिर्मृदादिदृष्ट्यनुगतैव सा, तथा साधुदृष्ट्यनुगतैव लोकादिदृष्टिः। धर्मादिकार्यत्वाल्लोकादीनाम्। यद्यपि कारणत्वमविशिष्टं ब्रह्मधर्मयोः, तथाऽपि धर्म एव साधुशब्दवाच्य इति युक्तं; साधुकारी साधुर्भवतीति धर्मविषये साधुशब्दप्रयोगात्। ननु लोकादिकार्येषु कारणस्यानु-

गतत्वादर्थप्राप्तैव तद्दृष्टिरिति साधु सामेत्युपास्त इति न वक्तव्यम्। न, शास्त्रगम्यत्वात्तद्दृष्टेः। सर्वत्र हि शास्त्रप्रापिता एव धर्मा उपास्या न विद्यमाना अप्यशास्त्रीयाः।

शिष्य:—साधुदृष्टीनें विशिष्ट असलेलीं समस्त सामें कोणतीं आहेत कीं ज्यांची उपासना श्रुतीला विहित करावयाची आहे? समस्त सामें साधु म्हणजे शोभिवंत आहेत, मंगलदायक आहेत, असें मागच्या प्रकरणांत श्रुतीनें सांगितलें. तीं समस्त सामें कोणतीं?

सिद्धान्ती:—त्यांचेंच स्पष्टीकरण या प्रकरणांत आणि विशेषत: पहिल्या दोन मंत्रांत श्रुति करीत आहे. हिंकारादि जीं सामें आहेत, त्यांची उपासना पृथिव्यादि लोकदृष्टीनें आणि साधुदृष्टीनें करावयाची, असें येथें श्रुति सांगणार आहे.

पूर्व०—एकच साम दोन दृष्टींनीं कसें उपास्य व्हावयाचें? एकाच पदार्थावर घटदृष्टि ठेवून पुन: पटदृष्टि कशी ठेवितां येईल? शालिग्रामावर विष्णुदृष्टि ठेवा, असा उपदेश करावयाची ही पद्धति! हें कसें जुळतें?

सिद्धान्ती—तुम्ही म्हणतां, तें एका दृष्टीनें ठीक आहे; परंतु 'साधु' शब्दाचा जो अर्थ आहे तोच पृथिव्यादि लोकादिकांचे जें कारण, तत्स्वरूप आहे. तेंच कारण तो साधुशब्दार्थ असल्यामुळें तो अर्थ पृथिव्यादि कार्यांमध्येंही अनुगत होतो. आणि याप्रमाणें कार्यांत 'साधुदृष्टि' आहे असें अनुमान करितां येतें.

शिष्य—मला नाहीं समजलें.

सिद्धान्ती—घट, शराव आदि जीं मृत्तिकेचीं कार्यें असतात, मृत्तिकाविकार असतात, त्यांच्यामध्यें मृत्तिका असते, हें प्रसिद्ध आहे. मृत्तिकेशिवाय घटादि असत नाहींत, हें कोणास सांगावयास नको. तसेंच साधु शब्दाचा वाच्यार्थ धर्म किंवा ब्रह्म आहे. धर्म व ब्रह्म उभयतांही सर्वथा पृथिव्यादि लोकांत—

शिष्य—म्हणजे कारणरूपी धर्म (किंवा ब्रह्म) सर्वदा आणि सर्वथा पृथिव्यादि कार्यांत दृग्गोचर होतो. निदान तो तेथें आहे असें निश्चित अनुमान करितां येतें.

सिद्धान्ती:—बरोबर. म्हणून एखाद्या पदार्थावर घटादि दृष्टि ठेविली म्हणजे मृत्तिकादि दृष्टि ठेविली असें होतें; त्याप्रमाणें समस्त सामांवर पृथिव्यादि दृष्टि ठेवून उपासना केली म्हणजे धर्मादिकांची दृष्टि ठेविली, असेंच विचारत: होतें.

शिष्य:—आणि साधु शब्दाचा अर्थ धर्म किंवा ब्रह्म असा आहे. तेव्हां 'सामावर पृथिव्यादिदृष्टि ठेवा' असें सांगितलें कीं, 'त्यांवर साधुदृष्टि ठेवा,' असेंच सांगितल्यासारखें होतें.

सिद्धान्ती:—बरोबरच आहे. पृथिव्यादि लोक हे धर्म किंवा ब्रह्म यांचीं कार्यें आहेत. आतां, लोकादिकांचें कारण धर्म आहे, तसेंच ब्रह्मही कारण आहे. तथापि धर्म हाच साधु शब्दानें वाच्य होतो.

पूर्वपक्षी:—कां बरें ?

सिद्धान्ती:—ब्रह्म हें परमानंदरूप आहे. ब्रह्माला ' साधु ' शब्द लक्षणेनें मात्र लागणार. धर्माला मात्र साधु ( मंगल ) हा शब्द सर्वथा योग्य आहे. म्हणून—

शिष्य:—शिवाय साधुकारी [ साधु (चांगलें) कर्म करणारा ] पुरुषाला किंवा कर्माला आपण ' साधु ' असें जें म्हणतों, तें धर्मविषयांतच म्हणतों. ब्रह्मविषयांत म्हणत नाहीं. कारण ब्रह्म निर्विकारी असतें.

सिद्धान्ती:—असो; अनुमान हें ठरलें कीं, पृथिव्यादिलोकदृष्टि आणि साधुदृष्टि यांत विरोध नाहीं. या दोन्ही एकच ?

पूर्व०—मग हें सांगायला श्रुतीची अपेक्षा कशाला ? कार्यामध्यें कारणाचें वास्तव्य नित्य असतें, हा सिद्धांत आहे. कारणदृष्टि कार्यांतही अनुमानितां येते. धर्म साधु आहे. धर्माचें कार्य पृथिव्यादि आहे. तेव्हां हिशेबानेंच पृथिव्यादि ' साधु ' होते. अर्थात् हें सांगण्याला श्रुतीचा उपदेश नको आहे. जी वस्तु लौकिक साधनांनीं स्पष्ट समजते, ती स्पष्ट करण्याला श्रुतीची आपल्याला काय जरूर आहे ? तात्पर्य, हा मंत्र व्यर्थ आहे.

सिद्धान्ती:—नाहीं. ही साधुदृष्टि तुमच्या अनुमानादिकांनीं ठरत नाहीं. त्याला अदृष्टाचें प्रतिपादन करणाऱ्या श्रुतीचीच अपेक्षा अवश्य असते. अलौकिक शास्त्रानें सांगितल्याशिवाय पृथिव्यादि लोक ' साधु ' आहेत व म्हणून उपास्य आहेत हें समजावयाचें नाहीं. पृथिव्यादि लोक धर्माचीं कार्यें आहेत व धर्म सर्वदा ' साधु ' असतो, हे विषय एक अलौकिक शास्त्रद्वारा श्रद्धावंत बुद्धिमानास मात्र समजतात. धर्म म्हटला कीं, त्याचें प्रणयन अलौकिक शास्त्रानेंच केलें पाहिजे. तसेंच अलौकिक शास्त्रानें किंवा श्रुतीनें जें अपूर्व सांगितलें आहे, तें संपादण्याला श्रुतिपूर्ण उपासना केली पाहिजे. श्रुतीनें न सांगितलेले परंतु विद्यमान असलेले धर्माची उपासना अपूर्व दृष्टीनें करण्यास कोणीही सांगत नाहीं व सांगूं नये.

लोकेषु पृथिव्यादिषु पञ्चविधं पञ्चभक्तिभेदेन पञ्चप्रकारं साधु समस्तं सामोपासीत । कथम् । पृथिवी हिंकारः । लोकेष्विति या सप्तमी तां प्रथमात्वेन विपरिणमय्य पृथिवीदृष्ट्या हिंकारे पृथिवी हिंकार इत्युपासीत । व्यत्यस्य वा सप्तमीश्रुतिं लोकविषयां हिंका-

रादिषु पृथिव्यादिदृष्टिं कृत्वोपासीत। तत्र पृथिवी हिंकारः। प्राथम्यसामान्यात्। अग्निः प्रस्तावः। अग्नौ हि कर्माणि प्रस्तूयन्ते। प्रस्तावश्च भक्तिः। अन्तरिक्षमुद्गीथः अन्तरिक्षं हि गगनम्। गकारविशिष्टश्चोद्गीथः। आदित्यः प्रतिहारः। प्रतिप्राण्यभिमुखत्वान्मां प्रति मां प्रतीति। द्यौर्निधनम्। दिवि निधीयन्ते हीतो गता इत्यूर्ध्वेषूर्ध्वगतेषु लोकदृष्ट्या सामोपासनम् ॥ १ ॥

**सिद्धान्ती**—असो; दृष्टिविरोध नाहीं हें ठरलें. आणि अलौकिक उपास्य वस्तु 'अपूर्व' उत्पन्न करणारी शास्त्रानेंच सांगितली पाहिजे, हेंही ठरलें. आतां प्रस्तुत मंत्राकडे वळूं. पृथिव्यादि जे लोक आहेत, त्यांच्या ठिकाणीं पांच प्रकारांनीं समस्त 'साधु' सामांची उपासना करावी, हा श्रुतीचा उपदेश आहे.

**शिष्य**—ती कशी ?

**सिद्धान्ती**—लोक पंचविध साम आहेत. त्यांपैकीं पृथिवी हा **हिंकार** आहे अशी भावना ठेवावी.

**पू०**—मंत्रांत 'लोकेषु' ही सप्तमी आहे. पृथिवी प्रथमांत आहे. तेव्हां तुम्ही 'लोक' शब्दाचा अर्थ सांगतां, हा कसा जुळावयाचा ?

**सिद्धान्ती**—मंत्रांत जी सप्तमी आहे, तिचा विपरिणाम करून त्या सप्तमीची प्रथमा करावयाची आहे. हा श्रुतीचा अभिप्राय पुढील पृथिवी–आदि शब्दांवरून स्पष्ट होतो. पृथ्वी–दृष्टीनें हिंकाराचे ठिकाणीं उपासना करावी. म्हणजे पृथ्वी **हा हिंकार** आहे, अशी भावना ठेवावी; हा श्रुतीचा अभिप्राय स्पष्ट होत आहे. म्हणजे पृथिव्यादि लोक पंचविध सामें आहेत, अशी भावना करावी; हें सिद्ध-तात्पर्य, सप्तमीची प्रथमा होते.

**शिष्यः**—किंवा हिंकारादिकांवर पृथिव्यादि दृष्टि ठेवावी; असा मंत्रांतील सप्तमीचा द्वितीयापर अर्थही करतां येतो कीं !

**सिद्धान्तीः**—तात्पर्य एकच आहे. असो; याप्रमाणें (१) पृथ्वी हिंकार आहे, अशी भावना ठेवावी. भुवनांचें नामसंकीर्तन आपण करूं लागलों म्हणजे पृथ्वीचा अवतार आपण प्रथमतः करितों आणि हिंकार हा पांच सामांपैकीं प्रथम आहे. तात्पर्य उभयतांमध्यें 'प्रथमत्व' हें सामान्य आहे. असो, (२) सर्व कर्में अग्नीचा प्रस्ताव करून प्रारंभिलीं जातात, म्हणून अग्नि हा **प्रस्ताव** आहे. प्रस्ताव हा समस्तसामाचा एक प्रकार आहे; आणि उभयतांमध्यें प्रस्तावत्व सामान्य आहे. (३) अंतरिक्ष म्हणजे गगन. उद्गीथांत 'गकार आहे. म्हणून अंतरिक्ष हें **उद्गीथ** आहे अशी भावना ठेवावी. उभयत्र 'ग' सामान्य आहे. (४) आदित्य हा **प्रतिहार** आहे अशी भावना ठेवावी.

शिष्यः—कारण, प्रत्येक जीव ' माझ्यासमोर सूर्य आहे, ' ' माझें प्रतिमुखच तो जणों आहे ' असें म्हणत असतो. प्रतिहारांत ' प्रति ' हा शब्द आहे. उभयत्र प्रति सामान्य आहे; म्हणून आदित्य हा **प्रतिहार** आहे अशी भावना करावी.

सिद्धान्तीः—आणि शेवटीं; द्युलोकाच्या दृष्टीनें **निधन** नामक समस्त-सामाची उपासना करावी. येथून गेलेले सर्व प्राणी द्युलोकांत राहतात, निधन पावतात. निधनत्व हें द्युलोकांत आणि निधनांत सामान्य आहे; म्हणून द्यु हें **निधन** आहे,असें समजावें. याप्रमाणें श्रेष्ठ व उत्तरोत्तर श्रेष्ठतर होणाऱ्या लोकदृष्टींनीं समस्त सामांची उपासना करावी.

शिष्यः—सारांश, पृथ्वी, अग्नि, अंतरिक्ष, आदित्य आणि द्युलोक हे अनुक्रमें हिंकार, प्रस्ताव, उद्गीथ, प्रतिहार आणि निधन आहेत, अशी भावना ठेवून समस्त सामांची उपासना करावयाची आहे.

सिद्धान्तीः- पण हे उत्तरोत्तर श्रेष्ठ होत जाणारे लोक आहेत, हें विसरूं नको. १

---

## मंत्र दुसरा.

**अथाऽऽवृत्तेषु द्यौर्हिंकार आदित्यः प्रस्तावोऽन्तरिक्षमुद्गीथोऽग्निः प्रतिहारः पृथिवी निधनम् ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः—अथ आवृत्तेषु** ( आतां आवृत्त लोकांच्या संबंधानें विचार करावयाचा ) **द्यौः हिंकारः; आदित्यः प्रस्तावः; अंतरिक्षं उद्गीथः; अग्निः प्रतिहारः; पृथिवी निधनं** ( द्यु लोक हिंकार; आदित्य प्रस्ताव; अंतरिक्ष उद्गीथ; अग्नि प्रतिहार; आणि पृथ्वी निधन अशा दृष्टि ठेवून समस्त सामाची उपासना करावयाची आहे ) ॥ २ ॥

अथाऽऽवृत्तेष्ववाङ्मुखेषु पञ्चविधमुच्यते सामोपासनम् । गत्यागतिविशिष्टा हि लोकाः । यथा ते तथादृष्टयैव सामोपासनं विधीयते यतोऽत आवृत्तेषु । द्यौर्हिंकारः प्राथम्यात् । आदित्यः प्रस्तावः । उदिते ह्यादित्ये प्रस्तूयन्ते कर्माणि प्राणिनाम् । अन्तरिक्षमुद्गीथः पूर्ववत् । अग्निः प्रतिहारः । प्राणिभिः प्रतिहरणादग्नेः । पृथिवी निधनम् । तत आगतानामिह निधनात् ॥ २ ॥

**सिद्धान्ती**—आतांपर्यंत उत्तरोत्तर उन्नत असलेल्या लोकदृष्टीनें हिंकारादि समस्त सामांची उपासना सांगितली, त्यानंतर, असा 'अथ' शब्दाचा अर्थ आहे. 'आवृत्त' म्हणजे अवाङ्मुख=खालीं बघणारा, परत फिरणारा. मागच्या मंत्रांत ऊर्ध्वगतीच्या क्रमानें पृथिव्यादि लोकांचा निर्देश केला. या मंत्रांत आवृत होणाऱ्या, परत फिरणाऱ्या, अवनत होणाऱ्या दृष्टीनें त्यांचाच निर्देश करावयाचा आहे. मागच्या मंत्रांत गतिविशिष्ट लोकांच्या दृष्टीनें गतिविशिष्ट हिंकारादि उपासना सांगितली. या मंत्रांत आवृत्तिविशिष्ट (आगतिविशिष्ट) लोकदृष्टीनें हिंकारादि उपासना विहित करावयाची आहे. श्रुतीनेंच ही उपासना सांगितली आहे, म्हणून येथें विरोध नाहीं. तेव्हां द्युलोक आणि हिंकार यांचा प्रथम निर्देश होतो—

**शिष्य**—परत फिरतांना प्रथम द्युलोकापासून आरंभ होतो. हिंकार हा प्रथम समस्तसाम आहे. म्हणून उभयतांमध्यें प्रथमत्व आहे.

**सिद्धान्ती**—अतएव द्युलोक, हिंकार आहे, अशी भावना करावी. ( २ ) जीवांची सर्व कर्में आदित्याचा उदय झाल्यावर प्रस्तुत ( प्रारंभित ) होतात. म्हणून आदित्य हा प्रस्ताव ( ३ ) अंतरिक्ष उद्गीथ कां, हें मागच्या मंत्रांत सांगितलेंच आहे, म्हणून अंतरिक्ष उद्गीथ. ( ४ ) अग्नीचें प्रतिहरण ( इकडून तिकडे नेणें ) मानवप्राणी करितात, प्रतिहरणत्व उभयत्र आहे, म्हणून अग्नि हा प्रतिहार; आणि ( ५ ) द्युलोकांतून आलेल्या सर्व प्राण्यांचें निधन येथें पृथ्वीवर होतें, म्हणून पृथ्वी निधन; अशा भावना ठेवून हिंकारादि सामांची द्यु—लोकादि दृष्टींनीं उपासना कर्तव्य आहे ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**कल्पन्ते हास्मै लोका ऊर्ध्वाश्चाऽऽवृत्ताश्च य एत-देवं विद्वाँल्लोकेषु पञ्चविधं सामोपास्ते ॥ ३ ॥**

**इति द्वितीयाध्यायस्य द्वितीयः खण्डः ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः**—**अस्मै ऊर्ध्वाः च आवृत्ताः च लोकाः कल्पन्ते** ( ऊर्ध्व आणि आवृत्त भुवनें त्या उपासकाला समर्थ करितात म्हणजे तीं स्वतः भोग्यत्वानें स्थित होतात )—कीं—**यः एवं विद्वान् लोकेषु एतत् पंचविधं साम उपास्ते** ( जो उपासक हें स्वरूप जाणतो आणि पृथिव्यादि लोकदृष्टीनें हिंकारादिकांवर साधु दृष्टि ठेवून उपासना करितो)॥३॥

उपासनफलं—कल्पन्ते समर्था भवन्ति हास्मै लोका ऊर्ध्वा-श्चाऽऽवृत्ताश्च गत्यागतिविशिष्टा भोग्यत्वेन व्यवतिष्ठन्त इत्यर्थः । य एतदेवं विद्वाँल्लोकेषु पञ्चविधं समस्तं साधु सामेत्युपास्त इति सर्वत्र योजना पञ्चविधे सप्तविधे च ॥ ३ ॥

इति द्वितीयाध्यायस्य द्वितीयः खण्डः ॥ २ ॥

सिद्धान्तीः—या मंत्रांत उपासनेचें फल सांगितलें आहे. गतिविशिष्ट ऊर्ध्व पृथिव्यादिलोकपंचक आणि आगतिविशिष्ट ( आवृत्त ) द्युलोकादिलोकपंचक या दृष्टींनीं हिंकारादि साधुसामांची पंचविध उपासना ज्ञानपूर्वक करितो, त्या उपास-काला हें लोकपंचक भोग्यत्वानें उपभोगावयास सांपडतें; म्हणजे सर्व लोकांचे व भुवनांचे उपभोग त्याला ज्ञानपूर्वक साधु सामाच्या पंचविध उपासनेनें घ्यावयास सांपडतात. जी व्यवस्था पंचविध सामाची, तीच सप्तविध सामांची आहे, हें समजून घ्यावें ॥ ३ ॥

दुसरा खंड संपला.

---

## खण्ड तिसरा.

---

### मंत्र पहिला व दुसरा.

**वृष्टौ पञ्चविधꣳ सामोपासीत; पुरोवातो हिंकारो, मेघो जायते स प्रस्तावो, वर्षति स उद्गीथो, विद्यो-तते स्तनयति स प्रतिहारः ॥ १ ॥**

**उद्गृह्णाति तन्निधनं; वर्षति हास्मै वर्षयति ह य एतदेवं विद्वान्वृष्टौ पञ्चविधꣳ सामोपास्ते ॥ २ ॥**

**इति द्वितीयाध्यायस्य तृतीयः खण्डः ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थः**—वृष्टौ पञ्चविधं साम उपासीत ( वृष्टीमध्यें पांच प्रकारांनीं सामांची उपासना करावी. वृष्टि हें पांच प्रकारचें समस्त-साम आहे, असें समजून सामोपासना करावी ) **पुरोवातः हिंकारः**

**मेघः जायते, सः प्रस्तावः; वर्षति सः उद्गीथः; विद्योतते स्तनयति, सः प्रतिहारः; उद्गृह्णाति, तत् निधनं; यः एवं विद्वान् वृष्टौ एतत् पंचविधं साम उपास्ते, अस्मै वर्षति वर्षयति ह** ( पुरोवात–पूवा वाहणारा वायु–हा **हिंकार,** उत्पन्न होतो जो मेघ तो **प्रस्ताव,** जो पर्जन्य पडतो तो **उद्गीथ,** विजा होतात व गडगडतें तो **प्रतिहार;** जें उद्ग्रहण होतें, तें **निधन;** अशा दृष्टींनीं उपासना करावी. असें स्वरूप समजून जो उपासक ह्या पंचविध सामांची उपासना करितो, त्याच्या इच्छेप्रमाणें पर्जन्यवृष्टि होते; अवर्षण असेल, तर तो स्वसामर्थ्यानें पर्जन्याला पडावयास लावितो ) ॥ १ ॥ २ ॥

वृष्टौ पञ्चविधं सामोपासीत । लोकस्थितेर्वृष्टिनिमित्तत्वादानन्तर्यम् । पुरोवातो हिंकारः । पुरोवाताद्युद्ग्रहणान्ता हि वृष्टिः । यथा साम हिंकारादिनिधनान्तम् । अतः पुरोवातो हिंकारः । प्राथम्यात् । मेघो जायते स प्रस्तावः । प्रावृषि मेघजनने वृष्टेः प्रस्ताव इति हि प्रसिद्धिः । वर्षति स उद्गीथः श्रैष्ठ्यात् । विद्योतते स्तनयति स प्रतिहारः । प्रतिहृतत्वात् ॥ १ ॥

उद्गृह्णाति तन्निधनम् । समाप्तिसामान्यात् । फलमुपासनस्य–वर्षति हास्मा इच्छातः । तथा वर्षयति हासत्यामपि वृष्टौ । य एतदित्यादि पूर्ववत् ॥ २ ॥

इति द्वितीयाध्यायस्य तृतीयः खण्डः ॥ ३ ॥

सिद्धान्तीः—वृष्टीमध्यें पंचविध सामाची उपासना करावी.

पूर्व०—मागच्या खंडांत पृथिव्यादि लोकांच्या दृष्टीनें समस्तसामाची उपासना सांगितल्यानंतर वृष्टिदृष्टीनें उपासना सांगण्याचा मतलब काय ?

सिद्धान्तीः—वृष्टि हें निमित्तकारण. पृथिव्यादि लोकांची जी स्थिति तिचें पर्जन्यवृष्टि हें निमित्त आहे. पृथिव्यादि लोक असतील; केव्हां ? पर्जन्यवृष्टि होईल तेव्हां. पृथिव्यादि लोकस्थिति हें कार्य आणि पर्जन्य हें कारण असा सृष्टिनियम आहे. म्हणून लोकोपासनेनंतर पर्जन्योपासना सांगितली. असो; वृष्टिदृष्टीनें पंचविध सामांची उपासना अशी आहे; पुरोवात हा हिंकार—

शिष्यः—पुरोवात म्हणजे पर्जन्यवृष्टीच्या आधीं सुटणारा व पूर्वेकडून येणारा वारा ?

सिद्धान्ती:—होय. 'पुरोवाता'पासून 'उद्ग्रहणा'पर्यंतच्या सर्व अवयवांचा समावेश वृष्टीमध्यें होतो आणि त्याचप्रमाणें हिंकारापासून निधनापर्यंतच्या सर्व भक्तींचा (भेदांचा) सामामध्यें समावेश होतो. सर्व अवयव एकत्र असावे, म्हणून दोन्ही मंत्रांचाही विचार आपण एकत्र करित आहोंत. वृष्टीच्या अवयवांत पुरोवात प्रथम आणि सामाच्या भक्तींत हिंकार प्रथम म्हणून पुरोवात हिंकार आहे, अशी भावना करावयाची; मेघाची उत्पत्ति झाल्यानंतर पर्जन्यकालीं वृष्टि होते, वृष्टीचा मेघ प्रस्ताव करितात, म्हणून मेघ प्रस्ताव होतो; अशी भावना आहे. पर्जन्यवृष्टि सर्व अवयवांत श्रेष्ठ व सामांत उद्गीथ श्रेष्ठ, म्हणून वर्षण हा उद्गीथ अशी भावना सांगितली. विजा होणें आणि गडगडणें हा प्रतिहार आहे, या दृष्टीनें प्रतिहाराची उपासना करावयाची आहे. कारण विजा आणि कडकडणें यांस प्रतिहृतत्व प्राप्त होतें; तीं उभयतां विप्रकीर्ण होतात, विरघळून जातात, नष्ट होतात. याप्रमाणें प्रतिहृतत्वाचें सामान्यत्व आहे म्हणून प्रतिहार्य विद्युत्प्रकाश व मेघ हे प्रतिहार होतात. त्याच्या दृष्टीनें प्रतिहारोपासना करावयाची आणि शेवटीं उद्ग्रहण (जलाचें सूर्यकिरणांनीं आकर्षण होते) वृष्टीचें निधन म्हणजे तिची समाप्ति होते आणि सामाची समाप्ति निधनानें होते. या समाप्तिसामान्यत्वानें उद्ग्रहण हें निधन होतें. म्हणजे उद्ग्रहण दृष्टीनें निधनाची उपासना विहित आहे. असो; पुरोवात हिंकार, मेघ प्रस्ताव, वर्षण उद्गीथ, विद्योतनादि प्रतिहार आणि उद्ग्रहण निधन, या वृष्टींतील अवयवांच्या दृष्टीनें सामांतील पंचविधभक्तींचें उपासन करावयाचें आहे. असें स्वरूप जाणून वृष्टिदृष्टीनें पंचविध सामाची उपासना करणाऱ्या पुरुषाच्या इच्छेप्रमाणें पर्जन्य पडतो. आणि यद्यपि अवर्षण असेल, पर्जन्यवृष्टीचा समय नसेल, तथापि त्यानें इच्छा केली, तर इतर ऋतूंतही पर्जन्यवृष्टि होते. हें या उपासनेचें फल आहे ॥ १ ॥ २ ॥

खंड तिसरा संपला.

---

## खंड चौथा.

### मंत्र पहिला.

**सर्वास्वप्सु पञ्चविधꣳ सामोपासीत; मेघो यत्संप्लवते स हिंकारो यद्वर्षति स प्रस्तावो याः प्राच्यः स्पन्दन्ते स उद्गीथो याः प्रतीच्यः स प्रतिहारः समुद्रो निधनम् ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—सर्वासु अप्सु पंचविधं साम उपासीत** ( सर्व जलांच्या ठिकाणीं दृष्टि ठेवून पंचविध सामाची उपासना करावी ) **यत् मेघः, संप्लवते, सः हिंकारः; यत् वर्षति सः प्रस्तावः; याः प्राच्यः स्पंदंते, सः उद्गीथः; याः प्रतीच्यः; सः प्रतिहारः; समुद्रः निधनं** ( मेघांचें संप्लवन तो हिंकार; जो मेघवर्षाव तो प्रस्ताव; ज्या पूर्वेकडे जाणाऱ्या नद्या, तो उद्गीथ; पश्चिमेकडे जाणाऱ्या नद्या, तो प्रतिहार; आणि समुद्र निधन आहे; अशी भावना ठेवून उपासना कर्तव्य आहे ) ॥ १ ॥

सर्वास्वप्सु पञ्चविधं सामोपासीत । वृष्टिपूर्वकत्वात्सर्वासामपामानन्तर्यम् । मेघो यत्संप्लवत एकीभावेनेतरेतरं घनीभवति मेघो यदोन्नतस्तदा संप्लवते मेघस्तदाऽपामारम्भः स हिंकारः । यद्वर्षति प्रस्तावः । आपः सर्वतो व्याप्तुं प्रस्तुताः । याः प्राच्यः स्पन्दन्ते स उद्गीथः । श्रैष्ठ्यात् । याः प्रतीच्यः स प्रतिहारः; प्रतिशब्दसामान्यात् । समुद्रो निधनम् । तन्निधनत्वादपाम् ॥ १ ॥

**सिद्धान्ती**—सर्व जलांचे ठिकाणीं दृष्टि ठेवून पंचविध सामाची उपासना करावी. वृष्टि पूर्वी झाली तरच जलांचा प्रादुर्भाव होतो, असें मनांत आणून वृष्ट्युपासनेनंतर जलोपासना सांगितली आहे. अनेक मेघ एकत्र होऊन घन ( घट्ट ) होतात आणि उन्नत होतात, तेव्हां **संप्लव** झाला आहे असें आपण म्हणतों. संप्लव प्रथम आणि वर्षाव नंतर, असा क्रम आहे. हिंकार **प्रथम** आहे म्हणून **मेघसंप्लव** हा **हिंकार**; जलांनीं सर्वत्र पसरण्याचा **प्रस्ताव** करणें हें वर्षणाच्या रूपानें होतें, म्हणून **वर्षण प्रस्ताव**; गंगा-यमुनादि श्रेष्ठ नद्या पूर्वेकडे वाहतात, हें त्यांचें **श्रेष्ठ गमन** हाच श्रेष्ठ उद्गीथ; आणि तापी, नर्मदादि प्रतीचीकडे ( पश्चिमेकडे ) वाहणाऱ्या नद्यांचें स्पंदन हा **प्रतिहार** होय.

**शि०**—प्राची श्रेष्ठ, उद्गीथ श्रेष्ठ म्हणून नद्यांचें **प्राचीगमन** हा **उद्गीथ** आणि प्रतीचीकडे नद्यांचें वाहणें यांत व **प्रतिहारांत प्रति**शब्द सामान्य आहे, म्हणून तें स्पंदन **प्रतिहार** असें समजून घ्यावयाचें ?

**सिद्धान्ती**—असो; शेवटीं समुद्र जलांचा निधि आहे. समुद्र हें जलांचें विश्रांतिस्थान असतें; म्हणून तो **निधन** होय. अशा दृष्टी ठेवून पंचविध सामाची उपासना इष्ट आहे ॥ १ ॥

---

### मंत्र दुसरा.

**न हाप्सु प्रैत्यप्सुमान्भवति य एतदेवं विद्वान्सर्वास्वप्सु पञ्चविधꣳ सामोपास्ते ॥ २ ॥**

**इति द्वितीयाध्यायस्य चतुर्थः खण्डः ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थः**—न ह अप्सु प्रैति; अप्सुमान् भवति (तो उपासक जलामध्यें निधन पावत नाहीं आणि त्याला वाटेल तेथें जलोत्पत्ति करितां येते, हें जलोपासनेचें फल आहे) मंत्रांतील '**यः एतत् एवं** इत्यादि पदांचा व वाक्याचा अर्थ मागें अनेक वेळ झालाच आहे ॥ २ ॥

न हाप्सु प्रैति। नेच्छति चेत्। अप्सुमानप्मान्भवति फलम् ॥२॥

इति द्वितीयाध्यायस्य चतुर्थः खण्डः ॥ ४ ॥

सिद्धान्ती—जलदृष्टीनें सामोपासना करणाऱ्या उपासकाला जलामध्यें केव्हांही मरण येत नाहीं. त्याची इच्छा नसेल, तर त्याला मारण्याचें जलाला सामर्थ्य नाहीं. तसेंच, उपासकानें 'जल हवें' अशी इच्छा केली कीं, त्याला वाटेल तेव्हां आणि वाटेल तेथें (मारवाडांतसुद्धां) वाटेल तितकें जल या उपासना-सामर्थ्यानें उत्पन्न करितां येतें. हें या उपासनेचें फल आहे ॥ २ ॥

खंड चौथा संपूर्ण.

---

## खंड पांचवा.

### मंत्र पहिला.

**ऋतुषु पञ्चविधꣳ सामोपासीत; वसन्तो हिंकारो ग्रीष्मः प्रस्तावो वर्षा उद्गीथः शरत्प्रतिहारो हेमन्तो निधनम् ॥ १ ॥**

**अन्वय अर्थः**—ऋतुषु पंचविधं साम उपासीत (ऋतूंमध्यें किंवा ऋतूंच्या अवयवदृष्टींनीं पंचविध सामाची उपासना करावी) **वसंतः हिंकारः; ग्रीष्मः प्रस्तावः; वर्षा उद्गीथः; शरत् प्रतिहारः; हेमंतः**

**निधनं** ( वसंत हिंकार; ग्रीष्म प्रस्ताव, वर्षा उद्गीथ; शरत् प्रतिहार आणि हेमंत निधन अशा दृष्टींनीं उपासना कर्तव्य आहे ) ॥ १ ॥

ऋतुषु पञ्चविधं सामोपासीत । ऋतुव्यवस्थाया यथोक्ताग्निमित्तत्वादानन्तर्यम् । वसन्तो हिंकारः । प्राथम्यात् । ग्रीष्मः प्रस्तावः । यवादिसंग्रहः प्रस्तूयते हि प्रावृडर्थम् । वर्षा उद्गीथः । प्राधान्यात् । शरत्प्रतिहारः । रोगिणां मृतानां च प्रतिहरणात् । हेमन्तो निधनम् । निवाते निधनात्प्राणिनाम् ॥ १ ॥

सिद्धान्ती—ऋतुव्यवस्थेचें जलवर्षाव हें निमित्त आहे म्हणून ऋतुदृष्टींची उपासना जलदृष्ट्युपासनेनंतर सांगितली आहे. ऋतुदृष्टीनें पंचविध सामाची उपासना करावी. ऋतूंमध्यें प्रथम म्हणून **वसंताच्या दृष्टीनें हिंकारोपासना**; पावसाळ्यासाठीं धान्यादिकांचा संग्रह ग्रीष्म ऋतूंत **प्रस्तुत** करितात; म्हणून **ग्रीष्मदृष्टीनें प्रस्तावोपासना**; वर्षाऋतु हा सर्व ऋतूंत **प्रधान** आहे म्हणून **वर्षादृष्टीनें उद्गीथोपासना**; रोगी व मृत यांचें **प्रतिहरण** शरदृतूंत होतें म्हणून **शरद्दृष्टीनें प्रतिहारोपासना** आणि प्राणी हेमंतामध्यें निवांतस्थानीं निधान करितात ( ठेवितात, विश्रांति घेतात ) म्हणून **हेमंतदृष्टीनें निधनोपासना**; असा या उपासनेच्या दृष्टींचा क्रम आहे.

शि०—निवांत म्हणजे सुरक्षित ?

सिद्धान्ती—होय. या उपासनेचें फल पुढच्या मंत्रांत सांगितलें आहे ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

### कल्पन्ते हास्मा ऋतव ऋतुमान्भवति य एतदेवं विद्वानृतुषु पञ्चविधꣳ सामोपास्ते ॥ २ ॥

### इति द्वितीयाध्यायस्य पञ्चमः खण्डः ॥ ५ ॥

**अन्वय व अर्थः**—**अस्मै ऋतवः कल्पंते; ऋतुमान् भवति** ( या उपासकाला सर्व ऋतू आपापले विषय समर्पित करितात आणि हा उपासक ऋतुमान् होतो ) पुढील मंत्रभागाचा अर्थ पूर्वीप्रमाणेंच आहे ॥ २ ॥

फलं—कल्पन्ते ह ऋतुव्यवस्थानुरूपं भोग्यत्वेनास्मा उपासकायर्तवः । ऋतुमानार्तवैर्भोगैश्च संपन्नो भवतीत्यर्थः ॥ २ ॥

इति द्वितीयाध्यायस्य पञ्चमः खण्डः ॥ ५ ॥

**सिद्धान्ती**— या ऋतुदृष्टीनें सामोपासनेचें फल असें आहे, पहा: ज्ञानी उपासकासाठीं सर्व ऋतू आपापल्या व्यवस्थेस अनुसरून योग्य स्वरूपें धारण करितात.

**पूर्वपक्षी**—मग यांत उपासकाला तें जास्ती फल काय? ग्रीष्म ऋतूंत कोणालाही ग्रीष्मऋतूंतील उपभोगच मिळतात. मग उपासना करून उपासकानें ज्यास्त तें काय मिळविलें?

**सिद्धान्ती**—तसें नव्हे. या उपासकाला सर्व ऋतूंतील उपभोग वाटेल त्या ऋतूंत उपभोगावयास सांपडतात. ग्रीष्मऋतूंत हेमंताचे किंवा हेमंत ऋतूंत ग्रीष्माचे उपभोग 'हवेसे' वाटले, तर एकनिष्ठ उपासकाला हे सर्व उपभोग मिळतात; तुम्हांआम्हां अनुपासकाला मिळत नाहींत! सारांश, तो उपासक सर्वभोगसंपन्न होतो ॥ २ ॥

पांचवा खंड समाप्त.

---

## खंड सहावा.

### मंत्र पहिला.

**पशुषु पञ्चविधꣳ सामोपासीताजा हिंकारोऽवयः प्रस्तावो गाव उद्गीथोऽश्वाः प्रतिहारः पुरुषो निधनम् ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थ—पशुषु पंचविधं साम उपासीत** ( पशुदृष्टीनें सामाची पंचविध उपासना करावी ) **अजाः हिंकारः; अवयः प्रस्तावः; गावः उद्गीथः; अश्वाः प्रतिहारः; पुरुषः निधनं** ( बोकड हिंकार; मेंढे प्रस्ताव; बैल किंवा गाई उद्गीथ; अश्व प्रतिहार; आणि पुरुष निधन या दृष्टींनीं उपासना करावयाची आहे ) ॥ १ ॥

पशुषु पञ्चविधं सामोपासीत । सम्यग्वृत्तेष्वृतुषु पशव्यः काल इत्यानन्तर्यम् अजा हिंकारः । प्राधान्यात्प्राथम्याद्वा । अजः पशूनां प्रथम इति श्रुतेः । अवयः प्रस्तावः । साहचर्यदर्शनादजावीनाम् । गाव उद्गीथः । श्रैष्ठ्यात् । अश्वाः प्रतिहारः । प्रतिहरणात्पुरुषाणाम् । पुरुषो निधनम् । पुरुषाश्रयत्वात्पशूनाम् ॥ १ ॥

सिद्धान्ती--ऋतूंची यथायोग्य व्यवस्था असली, म्हणजे पशूंची उत्पत्ति-स्थिति योग्य चालते; म्हणून ऋतुदृष्टीनंतर पशुदृष्टीनें सामोपासना सांगितली आहे.

शि०—येथें पशु-दृष्टीनें सामोपासना विहित केली आहे; ते पशु म्हणजे अजा (शेळ्या व बोकड) अवी (मेंढे व मेंढ्या) गोजाति (गायी व बैल) अश्व आणि पुरुष आहेत. या दृष्टींनीं अनुक्रमें हिंकार, प्रस्ताव, उद्गीथ, प्रतिहार आणि निधन ह्या पंचविध सामभक्तीची उपासना करावयाची हें मला समजलें; पण ह्या दृष्टी ठेवण्याला निमित्तें कोणतीं हें सांगावें ?

सिद्धान्ती—यज्ञामध्यें अजा किंवा अज हे प्रधान पशु असतात. तसेंच "पशू-मध्यें 'अज' प्रथम आहे" अशी श्रुति आहे. हीच श्रुति "मनुष्यांमध्यें 'ब्राह्मण' प्रथम (मुख्य) आहे" असें सांगते; तसेंच, अज हा पशूंत मुख्य आहे, असें सांगते.

शि०—शिवाय अज या शब्दाचा अवतार प्रथम आहे. हिंकारही प्रथमच्च साम अवयव आहे. हें उभयतांतील साम्य होय.

सिद्धान्ती—अज आणि अवि यांचें साहचर्य 'तेथून अज आणि अवि निर्माण झाले' या पुरुषसूक्तश्रुतीनें सांगितलें आहे. म्हणून अज हिंकार झाला, तेव्हां हिंकाराशीं साहचर्यानें असणारा प्रस्ताव याची उपासना 'अवि' ह्या दृष्टीनें केली पाहिजे. गोजाति सर्वश्रेष्ठ म्हणून तिच्या दृष्टीनें श्रेष्ठ उद्गीथाची उपासना करावयाची आहे. गोजाति हा उद्गीथ होय. अश्व हे प्रतिहार होत. कारण पुरुषांचें प्रतिहरण अश्व करितात. तसेंच शेवटीं ; सर्व पशूंना पुरुषाचा आश्रय घ्यावा लागतो; म्हणून ते पशु 'पुरुषनिधन' आहेत. ही पशुदृष्टीनें सामाची पंचविध उपासना झाली ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**भवन्ति हास्य पशवः पशुमान्भवति य एतदेवं विद्वान्पशुषु पञ्चविधꣳ सामोपास्ते ॥ २ ॥**

**इति द्वितीयाध्यायस्य षष्ठः खण्डः ॥ ६ ॥**

**अन्वय व अर्थः—अस्य पशवः भवंति, पशुमान् भवति** (या उपासकाला पुष्कळ पशू मिळतात. हा पशुमान् होतो. म्हणजे भोग आणि त्याग विहित करणारीं पशुफलें त्याला कर्मप्रेरणा करीत असतात बाकीचा अर्थ पूर्वीप्रमाणें आहे ॥ २ ॥

फलं—भवन्ति हास्य पशवः पशुमान्भवति । पशुफलैश्च भोगत्यागादिभिर्युज्यत इत्यर्थः ॥ २ ॥

इति द्वितीयाध्यायस्य षष्ठः खण्डः ॥ ६ ॥

सिद्धान्ती—हा ज्ञानी उपासक पशुस्वामी होतो आणि उपभोग केव्हां घ्यावयाचा, यज्ञयाग करून त्यागव्रत केव्हां करावयाचें इत्यादि पूर्ण ज्ञान त्याला असल्यामुळें तो सत्कर्माचें आचरण करणारा होतो, हें सांगणें नलगे ॥ २ ॥

सहावा खंड समाप्त.

---

## खंड सातवा.

---

### मंत्र पहिला.

**प्राणेषु पञ्चविधं परोवरीयः सामोपासीत प्राणो हिंकारो वाक्प्रस्तावश्चक्षुरुद्गीथः श्रोत्रं प्रतिहारो मनो निधनं परोवरीयाꣳसि वा एतानि ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थ--प्राणेषु पञ्चविधं परोवरीयः साम उपासीत** ( प्राणाचे ठिकाणीं म्हणजे प्राणदृष्टीनें परोवरीय सामाची उपासना करावी. परोवरीय म्हणजे उत्तरोत्तर श्रेष्ठ होत जाणारें ) **प्राणः हिंकारः; वाक् प्रस्तावः; चक्षुः उद्गीथः; श्रोत्रं प्रतिहारः; मनः निधनं; एतानि परोवरीयांसि वै** ( प्राण हिंकार, वाणी प्रस्ताव, चक्षु उद्गीथ, कर्ण प्रतिहार आणि मन निधन, अशा दृष्टीनें उपासना करावी. ह्या दृष्टी उत्तरोत्तर श्रेष्ठ होत गेल्या आहेत ) ॥ १ ॥

प्राणेषु पञ्चविधं परोवरीयः सामोपासीत । परंपरं वरीयस्त्वगुणवत्प्राणदृष्टिविशिष्टं सामोपासीतेत्यर्थः । प्राणो घ्राणं हिंकारः । उत्तरोत्तरवरीयसां प्राथम्यात् । वाक्प्रस्तावः । वाचा हि प्रस्तूयते सर्वम् । वाग्वरीयसी प्राणात् । अप्राप्तमप्युच्यते वाचा प्राप्तस्यैव तु गन्धस्य ग्राहकः प्राणः । चक्षुरुद्गीथः । वाचो बहुतरविषयं

प्रकाशयति चक्षुरतो वरीयो वाच उद्गीथः । श्रैष्ठयात् । श्रोत्रं प्रतिहारः । प्रतिहृतत्वात् । वरीयश्चक्षुषः सर्वतः श्रवणात् । मनो निधनम् । मनसि हि निधीयन्ते पुरुषस्य भोग्यत्वेन सर्वेन्द्रियाहृता विषयाः । वरीयस्त्वं च श्रोत्रान्मनसः । सर्वेन्द्रियविषयव्यापकत्वात् । अतीन्द्रियविषयोऽपि मनसो गोचर एवेति । यथोक्तहेतुभ्यः परोवरीयांसि प्राणादीनि वा एतानि ॥ १ ॥

**सिद्धान्ती**—परोवरीय म्हणजे उत्तरोत्तर श्रेष्ठ व श्रेष्ठतर होत जाण्याचा गुण, क्रमाक्रमानें श्रेष्ठ होत जाण्याचा गुण, ज्या प्राणदृष्टीमध्यें आहे, त्या प्राणांच्या दृष्टीनें विशिष्ट झालेलें जें साम तें परोवरीय साम होय.

**शि०**—पशूपासून दूध, दहीं, तूप इत्यादि मिळतात. हीं मिळालीं तरच प्राणत्राण होतें. तेव्हां पशुदृष्टीनंतर प्राणदृष्टि श्रुतीनें सांगितली; तें योग्यच केलें. हे प्राण अनेक आहेत व क्रमशः श्रेष्ठ, श्रेष्ठतर योग्यतेचे आहेत. त्यांच्या दृष्टी ठेवून सामोपासना करण्याला श्रुति सांगत आहे. प्राणांतही अनेक प्राणांचा ( वागादिकांचा ) अंतर्भाव होतो; म्हणून ' प्राणो हिंकारः ' असा आरंभ झाला. अर्थात् येथें प्राण म्हणजे घ्राण होय.

**सिद्धान्ती**—घ्राणप्राण हा उत्तरोत्तर श्रेष्ठ होत जाणाऱ्या प्राणांत पहिल्यांदा येतो, म्हणून हा घ्राणप्राण हिंकार आहे, अशी भावना करावयाची आहे. कारण दोन्हीमध्यें प्रथमत्व आहे. वाणी घ्राणप्राणाहून श्रेष्ठ आहे आणि तीच सर्वांचा प्रस्ताव ( प्रारंभ ) करिते म्हणून वाणी ( वाक् ) हा प्रस्ताव होय.

**शिष्य**—प्राणाहून वाणी श्रेष्ठ कशी ?

**सिद्धान्ती**—प्राप्त झालेल्या गंधाचें ग्रहण घ्राणप्राण करितो. पण जी अप्राप्य वस्तु आहे, लांबची वस्तु आहे, ती सुद्धां वाणीला सांगतां येते. म्हणून वाणीचें श्रेष्ठत्व. असो; वाणीचे बहुतेक सर्व विषय नेत्र प्रकाशित करितात. म्हणून वाणीपेक्षां श्रेष्ठ असणारा नेत्र ( चक्षु ) हा उद्गीथ. चक्षु आणि उद्गीथ हे दोन्ही श्रेष्ठ. म्हणून उभयतांत श्रेष्ठत्व सामान्य असतें. पुढें; सर्व बाजूंनीं ऐकणारें श्रवणेंद्रिय शब्दांचें प्रतिहरण करितें, म्हणून श्रोत्र प्रतिहार.

**शिष्य**—डोळ्यांस मागचें कांहीं दिसत नाहीं. पण कानाला सर्व बाजूंनीं ऐकतां येतें; म्हणून डोळ्यांपेक्षां कान श्रेष्ठ ?

**सिद्धान्ती**—ठीक आहे. शेवटीं सर्व इंद्रियांनीं ग्रहण केलेले विषय भोग्यत्वानें मनामध्यें निहित होतात ( ठेविले जातात ) म्हणून मन निधन आहे. मन सर्व इंद्रियविषयांचें व्यापक व चालक आहे. फार काय सांगावें ? अतींद्रिय विषयसुद्धां मनाला गोचर होतात. म्हणून मन हें श्रोत्रापेक्षां श्रेष्ठ आहे. याप्रमाणें घ्राण-

प्राण, वाणी, नेत्र इत्यादि परोपरीनें एकमेकांहून उत्तरोत्तर श्रेष्ठ होतात, असें श्रुतीचें सांगणें आहे. श्रेष्ठ कां हेंही भाष्यकारांनीं सिद्ध केलें आहे. तेव्हां पंचविध सामांची उपासना प्राण, वाणी इत्यादि श्रेष्ठ श्रेष्ठतर दृष्टीनें उत्तरोत्तर करावी. उपास्य श्रेष्ठ, श्रेष्ठतर, म्हणून सामासही परोवरीयस्त्व प्राप्त होतें ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**परोवरीयो हास्य भवति परोवरीयसो ह लोका-ञ्जयति य एतदेवं विद्वान्प्राणेषु पञ्चविधं परोवरीयः सामोपास्त इति तु पञ्चविधस्य ॥ २ ॥**

**इति द्वितीयाध्यायस्य सप्तमः खण्डः ॥ ७ ॥**

**अन्वय व अर्थः—अस्य परोवरीयः भवति ह; परोवरीयसः लोकान् जयति** ( परोवरीय सामाची ह्या दृष्टीनें उपासना करितो, त्याचें आयुष्य परोवरीय होतें. तसेंच तो परोवरीय लोकांचा, भुवनांचा, स्वामी होतो ) बाकीचा अन्वय अर्थ पूर्वींप्रमाणेंच आहे. **इति तु पंचविधस्य** ( याप्रमाणें पंचविध सामाचें उपासन सांगितलें ॥ २ ॥

एतद्दृष्ट्या विशिष्टं यः परोवरीयः सामोपास्ते परोवरीयो हास्य जीवनं भवतीत्युक्तार्थमिति तु पञ्चविधस्य साम्न उपासनमुक्तमिति सप्तविधे वक्ष्यमाणविषये बुद्धिसमाधानार्थम्। निरपेक्षो हि पञ्च-विधे वक्ष्यमाणे बुद्धिं समाधित्सति ॥ २ ॥

इति द्वितीयाध्यायस्य सप्तमः खण्डः ॥ ७ ॥

**सिद्धान्ती**—या मागच्या मंत्रांत सांगितलेल्या दृष्टींनीं विशिष्ट असणाऱ्या परोवरीय सामाची जो उपासना करितो, त्याचें जीवन परोपरीनें श्रेष्ठ होत जातें, इत्यादि अर्थ पूर्वीं येऊन गेला आहे. याप्रमाणें पंचविध सामाचें उपासनेसंबंधानें काय सांगावयाचें होतें तें सांगितलें.

**शि०**—'इति तु पंचविधस्य' असें प्रत्यक्ष श्रुतीनें कां सांगितलें ?

**सिद्धान्ती**—एकतर पंचविध सामोपासनेचा विषय संपला, हें सांगण्यासाठीं हा उपसंहार केला. शिवाय, पुढें सप्तविध सामाची उपासना सांगावयाची आहे,

तिकडे बुद्धिसमाधानार्थं म्हणजे बुद्धीची एकाग्रता करण्यासाठीं हीं पदें श्रुतीनें अवतारिलीं. 'पंचविधस्य' असें स्पष्ट पद सांगितलें नसतें, तर उपासक निरपेक्ष झाला असता. पुढें कर्तव्य नाहीं असें त्याला वाटलें असतें. तसें होऊ नये, व सप्तविधाकडे बुद्धि लागावी, एतदर्थ 'इति' प्रमुख शब्द आहेत ॥ २ ॥

सातवा खंड समाप्त.

---

## खंड आठवा.

---

### मंत्र पहिला.

**अथ सप्तविधस्य वाचि सप्तविधꣳ सामोपासीत यत्किंच वाचो हुमिति स हिंकारो यत्प्रेति स प्रस्तावो यदेति स आदिः ॥ १ ॥**

**यदुदिति स उद्गीथो यत्प्रतीति स प्रतिहारो यदुपेति स उपद्रवो यन्नीति तन्निधनम् ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः—अथ सप्तविधस्य** (यापुढें सप्तविध सामाची उपासना सांगावयाची आहे) **वाचि सप्तविधं साम उपासीत** (वाणीचे ठिकाणीं म्हणजे वाणीदृष्टिविशिष्ट पद्धतीनें सप्तविध उपासना करावी) **यत् किंच वाचः 'हुं' इति सः हिंकारः; यत् प्र इति सः प्रस्तावः; यत् आ इति सः आदिः;**

**यत् 'उत्' इति सः उद्गीथः; यत् प्रति इति सः प्रतिहारः यत् उप इति सः उपद्रवः; यत् नि इति तत् निधनम्** (सर्व शब्दांत 'हुं' असा जो विशेष आहे तो **हिंकार;** जो 'प्र' असा आहे तो **प्रस्ताव,** जो **'आ'** असा आहे तो **आदि,** जो 'उत्' असा आहे तो **उद्गीथ,** जो 'प्रति' असा आहे तो **प्रतिहार;** जो 'उप' असा आहे तो **उपद्रव** आणि जो 'नि' असा आहे तो **निधन** होय. असा विशेष असतो ॥ १ ॥ २ ॥

अथानन्तरं सप्तविधस्य समस्तस्य साम्न उपासनं साध्विदमारभ्यते। वाचीति सप्तमी पूर्ववत्। वाग्दृष्टिविशिष्टं सप्तविधं सामोपासीतेत्यर्थः। यत्किंच वाचः शब्दस्य हुमिति यो विशेषः स हिंकारो हकारसामान्यात्। यत्प्रेति शब्दरूपं स प्रस्तावः प्रसामान्यात्। यत्—आ, इति स आदिः। आकारसामान्यात्। आदिरित्योंकारः। सर्वादित्वात्॥ १॥

यदुदिति स उद्गीथः। उत्पूर्वत्वादुद्गीथस्य। यत्प्रतीति स प्रतिहारः। प्रतिसामान्यात्। यदुपेति स उपद्रव उपोपक्रमत्वादुपद्रवस्य। यन्नीति तन्निधनम्। निशब्दसामान्यात्॥ २॥

सिद्धान्ती—पंचविध सामाची उपासना सांगितल्यानंतर सप्तविध जें समस्त साम त्याचें उपासनही 'साधु' आहे म्हणून त्याला आरंभ करितों. ही सप्तविध सामोपासना वाग्दृष्टिविशिष्ट आहे.

शिष्य—म्हणजे वाणीची दृष्टि ठेवून ही उपासना करावयाची आहे. तृतीय खंडाच्या पहिल्या मंत्रांत लोकेषु या सप्तमीची प्रथमा करून जसा अर्थ केला तसाच येथें करावयाचा असेल. वाणी हेंच सप्तविधसाम असें पूर्वीच्या न्यायानें म्हणावयास पाहिजे. तात्पर्य, वाणीची दृष्टि ठेवून सप्तविध सामाची उपासना आपण सांगणार आहांत?

सिद्धान्ती—होय. जो कांहीं प्रत्येक शब्दामध्यें 'हुं' असा विशेष आहे, तो हिंकार होय. कारण, दोन्हीमध्यें 'ह' हें अक्षर सामान्य आहे. 'प्र' हें शब्दरूप प्रस्ताव होय. अशी भावना करावयाची; कारण दोन्हीमध्यें 'प्र' हें अक्षर सामान्य आहे. 'आ' कार सामान्य आहे म्हणून 'आ' हा आदि होतो. आदि म्हणजे सर्वांच्या आदिस्थानीं असणारा ओंकार होय!॥ १॥

उद्गीथ शब्दाचा 'उत्' नें आरंभ होतो. उद्गीथ शब्दांत 'उत्' आहे. भाषेंत 'उत्' शब्द येतो म्हणून उत् हा उद्गीथ आहे, अशी भावना. उभयतांमध्यें प्रति सामान्य आहे म्हणून प्रति हा प्रतिहार; 'उप' हा उपद्रव, कारण उपद्रव या शब्दाला 'उप' यानें प्रारंभ होतो! 'नि' शब्द सामान्य आहे म्हणून नि हें निधन होय. सारांश, 'हुं' 'प्र, आ, उत्, प्रति, उप,' आणि 'नि' हे वाणीचे सात प्रकार (उपसर्ग) हे हिंकार, प्रस्ताव, आदि, उद्गीथ प्रतिहार, उपद्रव आणि निधन हे समस्त सामाचे सात प्रकार आहेत, अशी भावना ठेवून सप्तविध उपासना करावी॥ २॥

---

### मंत्र तिसरा.

**दुग्धेऽस्मै वाग्दोहं यो वाचो दोहोऽन्नवानन्नादो भवति य एतदेवं विद्वान्वाचि सप्तविधꣳ सामो-पास्ते ॥ ३ ॥**

**इति द्वितीयाध्यायस्याष्टमः खण्डः ॥ ८ ॥**

अन्वय व अर्थः—यः एवं विद्वान् वाचि एतत् सप्तविधं साम उपास्ते, अस्मै यः वाचः दोहः वाक् दोहं दुग्धे; अन्नवान् अन्नादः भवति ( याचा अर्थ तिसऱ्या खंडांतील सातव्या मंत्राच्या उत्तर-भागाप्रमाणेंच आहे. तात्पर्य, तो ज्ञानी उपासक विद्वान्, संपन्न आणि भोक्ता होतो ॥ ३ ॥

दुग्धेऽस्मा इत्याद्युक्तार्थम् ॥ ३ ॥

इति द्वितीयाध्यायस्याष्टमः खण्डः ॥ ८ ॥

सिद्धान्ती—अर्थ पूर्वीं झाला ॥ ३ ॥

आठवा खंड समाप्त.

---

## खंड नववा.

---

### मंत्र पहिला.

**अथ खल्वमुमादित्यꣳ सप्तविधꣳ सामोपासीत सर्वदा समस्तेन साम मां प्रति मां प्रतीति सर्वेण समस्तेन साम ॥ १ ॥**

अन्वय व अर्थः—अथ खलु अमुं आदित्यं सप्तविधं साम उपासीत ( यानंतर तो आदित्य सप्तविध साम आहे अशी उपासना करावी ) 'मां प्रति' 'मां प्रति' इति सर्वेण समस्तेन साम, सर्वदा समस्तेन साम ( सर्वकालीं सम असणारा आदित्य 'माझ्याकडे बघत आहे' अशी प्रत्येकाच्या मनांत बुद्धि उत्पन्न करितो, सर्वांस सम असतो )

सारांश, सर्वांशीं सर्वकालीं सम असणारा आदित्य सप्तविध सप्तम साम आहे, अशी दृष्टि ठेवून सामाची उपासना करावी ॥ १ ॥

अवयवमात्रे साम्न्यादित्यदृष्टिः पञ्चविधेषूक्ता प्रथमे चाध्याये । अथेदानीं खल्वमुमादित्यं समस्ते साम्न्यवयवविभागशोऽध्यस्य सप्तविधं सामोपासीत । कथं पुनः सामत्वमादित्यस्येति । उच्यते । उद्गीथत्वे हेतुवदादादित्यस्य सामत्वे हेतुः । कोऽसौ, सर्वदा समो वृद्धिक्षयाभावात्तेन हेतुना सामाऽऽदित्यो मां प्रति मां प्रतीति तुल्यां बुद्धिमुत्पादयति । अतः सर्वेण समोऽतः साम समत्वादित्यर्थः । उद्गीथभक्तिसामान्यवचनादेव लोकादिषूक्तसामान्याद्धिंकारादित्वं गम्यत इति हिंकारादित्वे कारणं नोक्तम् । सामत्वे पुनः सवितुरनुक्तं कारणं न सुबोधमिति समत्वमुक्तम् ॥ १ ॥

सिद्धान्ती—आदित्य वाङ्मय आहे म्हणून वाग्दृष्टीनंतर श्रुति आदित्यदृष्टि सांगत आहे.

पूर्वपक्षी— पण श्रुतीनें पूर्वींच आदित्यदृष्टीनें विशिष्ट असणारी उद्गीथोपासना सांगितली आहे; आतां पुनः तिचा येथें अवतार कां ?

सिद्धान्ती—ऐका. पूर्वीं म्हणजे पंचविध सामाच्या प्रकरणांत आणि पहिल्या अध्यायांत आदित्यदृष्टि सांगितली, ती सामाचे अवयव-स्वरूपाची मात्र होती. आतां येथें समस्त सामांचें ठिकाणीं अवयवशः आदित्याचे अवयवांचा आरोप करून व आदित्याचे अवयवदृष्टीनें हिंकारादिकांचे ठिकाणीं भावना ठेवून सप्तविध सामाची उपासना सांगावयाची आहे. आदित्य हा सप्तविध साम आहे.

शिष्य—हें कसें ? आदित्याला सामत्व कसें प्राप्त होतें ?

सिद्धान्ती—'उंच असणाऱ्या आदित्याचें गायन करितात; आणि म्हणून तो उद्गीथ होतो.' हा जसा श्रुतीनें उद्गीथाच्या वेळीं हेतु दिला, तसाच आदित्य साम आहे, यालाही श्रुति हेतु देत आहे.

शिष्य—कोणता तो हेतु ?

सिद्धान्ती—'आदित्याला उदय नाहीं' 'अस्त नाहीं' असें श्रुति इतरत्र सांगते. तेव्हां सर्वकालीं सम असणारा म्हणजे चंद्राप्रमाणें वृद्धिक्षय न पावणारा आदित्य आहे, तो सम आहे; म्हणून आदित्य साम आहे. पुनः; प्रत्येकजण म्हणत असतो कीं, 'सूर्य माझ्यासमोर आहे, माझ्या सन्मुख आहे.' प्रत्येक जीवाचे ठिकाणीं तो आदित्य स्वसंबंधानें तुल्यबुद्धि उत्पन्न करितो. सर्वांस आदित्य समरूपानें दिसतो; म्हणून तो सम आहे आणि समत्वामुळें साम आहे.

**शिष्य**—सर्वांस सर्वकाळीं आदित्य समत्वानें दिसतो आणि सर्वकाळीं तो समरूप असतो; म्हणून तो सम अथवा साम आहे अशी श्रुतीची योजना!

**पूर्वपक्षी**—कांहीं तरी योग्य निमित्त असल्याशिवाय एका शब्दाचा दुसरा अर्थ होत नाहीं, असें समजून तुम्हीं सामाचे ठिकाणीं आदित्यत्वाचा हेतु कल्पिला; आणि आदित्य साम आहे, असें सम या शब्दाच्या आधारानें ठरविलें, हें जर खरें आहे, तर हिंकारादि सामभक्तींचे ठिकाणीं आदित्यावयवाच्या भेदाची स्थापना श्रुतीनें कां केली नाहीं? अर्थभेद होता, तरी आदित्य साम आहे, असें सांगितलें; त्याप्रमाणें आदित्याचे भेद हेच अनुक्रमें सामाचे भेद आहेत, असें निमित्तपूर्वक कां नाहीं सांगितलें?

**सिद्धान्ती**—आदित्याचें उद्गीथाशीं ऊर्ध्वत्वानें (उच्चत्वानें) तादात्म्य होतें, म्हणून उद्गीथावर आदित्याची संपन्नता होते, हें सर्व श्रुतीनें सांगितलें; आणि त्याचेंच अनुसरण करून आम्हींही 'पृथ्वी हिंकार आहे' कारण ती भुवनांमध्यें प्रथम व हिंकार सामावयवांमध्यें प्रथम आहे, अशीं प्राथम्यादि सामान्यें सांगितलीं. हीं सामान्यें श्रुतीनें कांहीं प्रत्यक्ष सांगितलीं नव्हतीं. पण आदित्याचे जे भेद आहेत, त्यांची स्थापना हिंकारादि सामभक्तीवर सहज करितां येईल आणि समजेल, असें समजून आदित्यभेदांमध्यें व सामभक्तीमध्यें सामान्याचीं निमित्तें कोणतीं आहेत, हें श्रुतीनें सांगितलें नाहीं. मात्र सामाचें सवित्याशी जें साम्य आहे, तें समजणें कठिण आहे; म्हणून आदित्य आणि साम या उभयतांमध्यें समत्व सामान्यत्वानें विद्यमान आहे, असें सांगून सम दिसणारा व सम असणारा आदित्य हा साम आहे असें ठरविलें ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**तस्मिन्निमानि सर्वाणि भूतान्यन्वायत्तानीति विद्यात्तस्य यत्पुरोदयात्स हिंकारस्तदस्य पशवोऽन्वायत्तास्तस्मात्ते हिंकुर्वन्ति हिंकारभाजिनो ह्येतस्य साम्नः ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः—तस्मिन् इमानि सर्वाणि भूतानि अन्वायत्तानि इति विद्यात्** (त्या आदित्याचे ठिकाणीं अवयवविभागानें हीं सर्व भूतें अनुगत होतात, आदित्याच्या आश्रयानें राहतात, असें जाणावें) **तस्य पुरोदयात् यत् सः हिंकारः** (आदित्याचा पुरोदय तो हिंकार

आहे ) **तत् अस्य पशवः अन्वायत्ताः** ( आदित्याच्या पुरोदयाचा पशु आश्रय घेतात ) **तस्मात् ते हिंकुर्वंति** ( म्हणून ते ' हिं ' असा शब्द करितात ) **हि एतस्य साम्नः हिंकारभाजिनः** ( म्हणून ते पशू या आदित्यरूपी सामाचे हिंकारभाजी होतात. पशू हिंकारत्वाला योग्य होतात; पशू हिंकार होतात ) पहाटेच्या वेळीं पशू हिंकार करितात, कारण आदित्यरूपी सामाचे हे पशू हिंकार नामक अवयवविशिष्ट असतात ॥ २ ॥

तस्मिन्नादित्येऽवयवविभागश इमानि वक्ष्यमाणानि सर्वाणि भूतान्यन्वायत्तान्यनुगतान्यादित्यमुपजीव्यत्वेनेति विद्यात् । कथं, तस्याऽऽदित्यस्य यत्पुरोदयाद्धर्मरूपं स हिंकारो भक्तिस्तत्रेदं सामान्यं यत्तस्य हिंकारभक्तिरूपं तदस्याऽऽदित्यस्य साम्नः पशवो गवादयोऽन्वायत्ता अनुगतास्तद्भक्तिरूपमुपजीवन्तीत्यर्थः । यस्मादेवं तस्मात्ते हिंकुर्वन्ति पशवः प्रागुदयात् । तस्माद्धिंकारभाजिनो ह्येतस्याऽऽदित्याख्यस्य साम्नस्तद्भक्तिभजनशीलत्वाद्धि त एवं वर्तन्ते ॥ २ ॥

**सिद्धान्ती**—आदित्याचे पुरोदय, उदय, इत्यादि जे अवयव आहेत, त्या सर्वांच्या ठिकाणीं या व पुढील मंत्रांत ज्या पशूंचा व प्राण्यांचा उल्लेख व्हावयाचा आहे, ते सर्व पशू अन्वायत्त असतात; असें जाणा—

**शिष्य**—म्हणजे अनुगत असतात. आदित्यांच्या आश्रयानें त्यांचें उपजीवन होतें, असें समजावयाचें. हें कसें ?

**सिद्धान्ती**—पुरोदयाच्या वेळीं, पहाटेच्या वेळीं आदित्याचें जें धर्मरूप असतें—

**पूर्वपक्षी**—धर्मरूप म्हणजे ?

**सिद्धान्ती**—ज्याच्या योगानें सुख होतें, तें हें धर्मरूप. हाच हिंकार-नामक सामावयव होय.

**पूर्वपक्षी**—कशावरून ? या धर्मरूपांत आणि हिंकारांत काय सामान्य आहे बरें ?

**सिद्धान्ती**—ज्या आदित्याचें पुरोदय हें हिंकारभक्तिरूप सांगितलें, तें ह्या आदित्य-नामक सामाचें पशूपजीवन आहे.

**शिष्य**—कांहीं समजलें नाहीं.

**सिद्धान्ती**—गवादि पशु आदित्याच्या एका अवयवाचा आश्रय घेऊन आपलें उपजीवन करितात, हें तुम्हांस ठाऊक आहे. हा आदित्याचा अवयव म्हणजे पुरोदय होय. आदित्य हा सप्तविध साम आहे, असें ठरलें आहे; म्हणून पुरोदय हिंकार आहे, असें आम्ही म्हणत आहोंत.

**पूर्वपक्षी**—तुम्ही म्हणतां पुष्कळ. पण पुरोदय हिंकार आहे, हें ठरावयाचें आहे अद्यापि !

**सिद्धान्ती**—उदयाच्या पूर्वी पशु हिंकार करितात ( हंबरडा फोडितात ) ही गोष्ट सर्वप्रसिद्ध आहे. ते हिंकार कां करितात, याचें उत्तर असें; ते पुरोदयाच्या आश्रयानें जगत असतात आणि पुरोदय तर प्रथम अवयव आहे. पुरोदय आदित्याचा प्रथम अवयव आहे. हिंकार सामाचा प्रथम अवयव आहे. दोन्हींमध्यें प्रथमत्व सामान्य आहे, हें तुम्हांस सांगावयास नकोच. तेव्हां पुरोदयाच्या आश्रयानें राहणारे पशु हिंकार करितात; म्हणून तो हिंकार आदित्यरूपी समस्तसामाचा एक अवयव ठरतो. या पशुकृत हिंकारावरून आदित्य नामक सामाचा पुरोदय हा हिंकार आहे म्हणून पशूंचा हिंकार हें त्याचें कार्य आहे, असें नाहीं का ठरत ? हें ठरलें, तेव्हां ह्या आदित्य नामक सामाचे हे सर्व पशु हिंकारभाजी आहेत, हिंकारशील आहेत, हिंकारनामक अवयवानें विशिष्ट झाले आहेत, आणि ते हिंकारशील आहेत, म्हणून त्यांचें उपजीवन होतें; असें हीं ठरतें. हेंच रहस्य श्रुतीला सांगावयाचें आहे.

**शिष्य**—या प्रकारें सर्व भूतें आदित्याच्या प्रत्येक अवयवाचा आश्रय घेतात, जगतात, आणि ते त्या त्या अवयवानें अलंकृत होतात; असें श्रुति सिद्ध करणार आहे ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**अथ यत्प्रथमोदिते स प्रस्तावस्तदस्य मनुष्या अन्वायत्तास्तस्मात्ते प्रस्तुतिकामाः प्रशंसाकामाः प्रस्तावभाजिनो ह्येतस्य साम्नः ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थ**—अथ प्रथमोदिते यत् सः अस्य प्रस्तावः; मनुष्याः तत् अन्वयत्ताः; तस्मात् ते प्रस्तुतिकामाः प्रशंसाकामाः हि एतस्य साम्नः प्रस्तावभाजिनः ( यानंतर म्हणजे प्रथम उदय झाला असतां जे आदित्याचे रूप असतें तो प्रस्ताव होय, असें सांगावयाचें

आहे; आदित्याच्या या स्वरूपाचा आश्रय घेऊन मनुष्यें राहतात; म्हणून ते प्रस्तुतिकाम आणि प्रशंसाकाम असतात. कारण, ह्या आदित्यरूपीं सामाचे ते प्रस्तावधर्मी असतात ) ॥ ३ ॥

अथ यत्प्रथमोदिते सवितृरूपं तदस्याऽऽदित्याख्यस्य साम्नः स प्रस्तावस्तदस्य मनुष्या अन्वायत्ताः पूर्ववत् । तस्मात्ते प्रस्तुतिं प्रशंसां कामयन्ते । यस्मात्प्रस्तावभाजिनो ह्येतस्य साम्नः ॥ ३ ॥

सिद्धान्ती:—यानंतर म्हणजे पुरोदयानंतर सूर्याचें जें स्वरूप प्रथमतः आपल्याला प्रातः काळीं दिसतें, तें आदित्यनामक सामाचा दुसरा अवयव म्हणजे प्रस्ताव होय. प्रातःकाळीं सूर्यस्तुति होते, म्हणून तो काळ प्रस्ताव होय. सर्व मनुष्यजाति सूर्याच्या या प्रस्तावस्वरूपाच्या आश्रयानें राहते.

पूर्व०—याला काय प्रमाण आहे ?

सिद्धान्ती:—मनुष्यजातींतील प्रत्येक व्यक्ति प्रस्तुतीची व प्रशंसेची इच्छा करीत असते. ह्या कार्यावरूनच स्तुतिकाम मनुष्य व आदित्यनामक सामाचें उदय झाल्यानंतरचें प्रथम स्वरूप हीं प्रस्ताव होत, असें ठरतें.

पूर्वपक्षी:—प्रशंसा आणि प्रस्ताव हे एकार्थी दोन शब्द कशाला ?

सिद्धान्ती:—समक्ष स्तुति होते ती प्रस्तुति आणि परोक्ष स्तुति आपण करितों ती प्रशंसा होय. प्रत्येक मनुष्य प्रत्यक्ष किंवा परोक्ष स्तुतीचा भुकेलेला असतो. असो. तात्पर्य हें कीं, सर्व मनुष्य आदित्यनामक सामाचे प्रस्ताव-धर्मी होतात, म्हणून ते प्रस्तुतिकाम व प्रशंसाकाम असतात, व प्रस्ताव होतात, हें तुम्हांस समजेलच ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा.

**अथ यत्संगववेलायाꣳ स आदिस्तदस्य वयाꣳस्यन्वायत्तानि तस्मात्तान्यन्तरिक्षेऽनारम्बणान्यादायाऽऽत्मानं परिपतन्त्यादिभाजीनि ह्येतस्य साम्नः ॥४॥**

अन्वय व अर्थ:—अथ संगववेलायां यत् सः आदिः ( संगवाच्या वेळीं जें सूर्यस्वरूप असतें, तो आदिनामक आदित्यरूपी सामाचा अवयव आहे. हें आतां ठरवावयाचें ) **वयांसि अस्य तत् अन्वायत्तानि; तस्मात् तानि अंतरिक्षे अनारंबणानि आत्मानं आदाय**

**परिपतंति; हि एतस्य साम्नः आदिभाजीनि** ( सर्व पक्षी आदित्याच्या या स्वरूपाचें, संगवकालीन स्वरूपाचें, आलंबन करितात; म्हणून अंतरिक्षामध्यें निराश्रित असलेले हे पक्षी आपल्याला, (स्वतःला) आत्म्याचा आश्रय घेऊन जातात किंवा आत्मविशिष्ट असतात. म्हणून हे सर्व पक्षी आदित्य—नामक सामाचें आदिरूप होतात ) ॥ ४ ॥

**अथ यत्संगववेलायां गवां रश्मीनां सगमनं संगमो यस्यां वेलायां गवां वा वत्सैः सा संगववेला तस्मिन्काले यत्सावित्रं रूपं स आदिर्भक्तिविशेष ओंकारस्तदस्य वयांसि पक्षिणोऽन्वायत्तानि। यत एवं तस्मात्तानि वयांस्यन्तरिक्षेऽनारम्बणान्यनालम्बनान्यात्मानमादायाऽऽत्मानमेवाऽऽलम्बनत्वेन गृहीत्वा परिपतन्ति गच्छन्त्यत आकारसामान्यादादिभक्तिभाजीनि ह्येतस्य साम्नः ॥ ४ ॥**

सिद्धान्ती—यानंतर संगवाच्या वेळीं आदित्याचें स्वरूप हाच आदि-नामक सामावयव आहे, हें सिद्ध करावयाचें.

शिष्य—संगववेला म्हणजे काय ?

**सिद्धान्ती**—गो याचा अर्थ रविकिरण किंवा गाई असा आहे. संगववेळ म्हणजे ज्यावेळीं आदित्याच्या सर्व रश्मींचें ( किरणांचें ) संगमन होतें, सर्व किरण एकत्र होतात, ती वेळ म्हणजे संध्याकाळची वेळ होय. याचवेळीं गाईची आणि त्यांच्या वासरांची गांठ पडत असते. यावेळीं आदित्याचें जें रूप असतें, तेंच आपला आदिनामक सामावयव होय. आदि म्हणजे ओंकार हें तुम्हांस मागेंच समजलें आहे. असो; या आदिनामक सूर्यस्वरूपाचा आश्रय घेऊन पक्षी राहतात. आपल्यास प्रत्यहीं असें दिसतें कीं, अंतरिक्ष—प्रदेशांत पक्ष्याला कोणत्याही प्रकारचा आश्रय नसतो. तेव्हां ते आपल्या आत्म्याचा म्हणजे आपल्या स्वतःचाच आश्रय घेऊन आपापल्या घरट्याकडे जातात. पक्षी आपला म्हणजे आपल्या आत्म्याचा आश्रय घेतात. असो; सामावयव जो आदि त्यांतही आ विद्यमान आहे. उभयत्र ( आत्म्यांत व आदींत ) ' आ ' हें सामान्य आहे. म्हणून आदित्य नामक सामाचे हे पक्षी आदि नामक सामावयवरूपानें अलंकृत होतात. सारांश, पक्ष्यांस आदिधर्मी असें म्हणण्यास हरकत नाहीं ॥ ४ ॥

## मंत्र पांचवा.

**अथ यत्संप्रति मध्यंदिने स उद्गीथस्तदस्य देवा अन्वायत्तास्तस्मात्ते सत्तमाः प्राजापत्यानामुद्गीथ-भाजिनो ह्येतस्य साम्नः ॥ ५ ॥**

**अन्वय व अर्थः**—अथ संप्रति मध्यंदिने यत् सः अस्य उद्गीथः ( आतां यापुढें संप्रति मध्याह्नदिनीं जें सूर्यस्वरूप असतें, तो उद्गीथ होय. हें प्रकरण ध्यावयाचें ) देवाः तत् अन्वायत्ताः; तस्मात् ते प्राजा-पत्यानां सत्तमाः; हि एतस्य साम्नः उद्गीथभाजिनः ( सूर्याचें हें स्वरूप देवांस आश्रयस्थान असतें. म्हणून प्रजापतीच्या अपत्यांपैकीं जे देव ते श्रेष्ठ झाले आहेत. कारण, हे आदित्यनामक सामाचे उद्गीथभाजी होत ) ॥ ५ ॥

अथ यत्संप्रति मध्यंदिन ऋजुमध्यंदिन इत्यर्थः । स उद्गीथभ-क्तिस्तदस्य देवा अन्वायत्ताः । द्योतनातिशयात्तत्काले । तस्मात्ते सत्तमा विशिष्टतमाः प्राजापत्यानां प्रजापत्यपत्यानामुद्गीथभाजिनो ह्येतस्य साम्नः ॥ ५ ॥

सिद्धान्तीं—यानंतर संप्रति म्हणजे शुद्ध आणि तेजस्वी असें माध्यान्हकाळीं सूर्यस्वरूप असतें, त्याचा विचार करावयाचा. अतितेजस्वी माध्यंदिनाचा जो सूर्य तो आदित्यरूपी समस्तसामाचा उद्गीथ नामक अवयव होय. तेजस्वी देव हे माध्याह्नकालीन सूर्याचा आश्रय घेतात, म्हणून ते प्रजापतीच्या पुत्रांमध्यें विशेष-त्वानें अत्यंत श्रेष्ठ झाले आहेत. ते माध्याह्नकालीन सूर्याचा आश्रय घेतात. माध्याह्नकालीन सूर्य श्रेष्ठ आहे, म्हणून तो आदित्यसामाचा श्रेष्ठ अवयव आहे; अशी भावना करावयाची आणि त्याचाच आश्रय घेणारे देव हे उद्गीथधर्मी होतात; असें समजावयाचें ॥ ५ ॥

---

## मंत्र सहावा.

**अथ यदूर्ध्वं मध्यंदिनात्प्रागपराह्णात्स प्रतिहार-स्तदस्य गर्भा अन्वायत्तास्तस्मात्ते प्रतिहृता नावप-द्यन्ते प्रतिहारभाजिनो ह्येतस्य साम्नः ॥ ६ ॥**

**अन्वय व अर्थः—अथ मध्यंदिनात् ऊर्ध्वं अपराह्णात् प्राक् यत्, सः अस्य प्रतिहारः** (उद्गीथानंतर प्रतिहाराची योजना करावयाची. हा प्रतिहार होय. म्हणजे माध्याह्नकाळ झाल्यानंतर आणि अपराह्णकालाच्या पूर्वीं जें सूर्यस्वरूप असतें तो आदित्यसामाचा प्रतिहार होय) **गर्भाः तत् अन्वायत्ताः; तस्मात् प्रतिहृताः, ते न अवपद्यंते; हि एतस्य साम्नः प्रतिहारभाजिनः** ( उदरांतील गर्भ या तृतीयप्रहरीं सूर्यस्वरूपाचा आश्रय करून राहतात म्हणून ते वर आकर्षिले जातात; आणि खालीं पडत नाहींत. कारण हा आदित्य नामक सामाचे ते गर्भ प्रतिहारभाजी असतात ) ॥ ६ ॥

अथ यदूर्ध्वं मध्यंदिनात्प्रागपराह्णाद्यद्रूपं सवितुः स प्रतिहारस्तदस्य गर्भा अन्वायत्ताः । अतस्ते सवितुः प्रतिहारभक्तिरूपेणोर्ध्वं प्रतिहृताः सन्तो नावपद्यन्ते नाधः पतन्ति तद्वारे सत्यपीत्यर्थः । यतः प्रतिहारभाजिनो ह्येतस्य साम्नो गर्भाः ॥ ६ ॥

सिद्धान्ती—उद्गीथानंतर प्रतिहाराचा विचार येतो. मध्यदिनानंतर व तिसरा प्रहर होण्याचे पूर्वीं जें सूर्यस्वरूप असतें, तो प्रतिहार होय. या स्वरूपाचा उदरस्थ गर्भ आश्रय घेतात. म्हणून म्हणजे आदित्यरूपी समस्तसामाचें जें गर्भप्रतिहरण करणारें प्रतिहार नामक अवयवरूप आहे, त्याच्या सामर्थ्यानें ते गर्भ वर म्हणजे जठराकडे आकर्षिले जातात; आणि अधःपाताचें द्वार मोकळें असतांही ते खालीं पडत नाहींत. ज्यापक्षीं हे गर्भ आदित्य नामक सामाचा अवयव, जो आतांच सांगितलेला प्रतिहार, त्याचा आश्रय घेऊन जगतात, त्यापक्षीं ते प्रतिहारधर्मी असतात ॥ ६ ॥

---

## मंत्र सातवा.

**अथ यदूर्ध्वमपराह्णात्प्रागस्तमयात्स उपद्रवस्तदस्याऽऽरण्या अन्वायत्तास्तस्मात्ते पुरुषं दृष्ट्वा कक्षꣳ श्वभ्रमित्युपद्रवन्त्युपद्रवभाजिनो ह्येतस्य साम्नः ॥७॥**

**अन्वय व अर्थः—अथ अपराह्णात् ऊर्ध्वं अस्तमयात् प्राक् यत् सः अस्य उपद्रवः** ( यानंतर अपराह्ण झाल्यावर व सूर्यास्त होण्यापूर्वीं जें सूर्यस्वरूप असतें, तें **उपद्रव** नामक सामावयव आहे; असें श्रुति सांगते

आहे ) आरण्याः तत् अन्वायत्ताः; तस्मात् पुरुषं दृष्ट्वा ते श्वभ्रं कक्षं उपद्रवंति; हि एतस्य साम्नः उपद्रवभाजिनः ( अरण्यांतील पशु या स्वरूपाचा आश्रय करितात; आणि म्हणूनच मनुष्य जातीला भिऊन ते निरुपद्रवी अरण्यगुहेमध्यें जाऊन राहतात. कारण ते आदित्य नामक सामाचे उपद्रवधर्मी असतात ) ॥ ७ ॥

अथ यदूर्ध्वमपराह्णात्प्रागस्तमयात्स उपद्रवस्तदस्याऽऽरण्याः पशवोऽन्वायत्ताः । तस्मात्ते पुरुषं दृष्ट्वा भीताः कक्षमरण्यं श्वभ्रं भयशून्यमित्युपद्रवन्त्युपगच्छन्ति दृष्ट्वोपद्रवणादुपद्रवभाजिनो ह्येतस्य साम्नः ॥ ७ ॥

सिद्धान्ती—यानंतर सामावयव जो उपद्रव त्याची योजना कोठें होते, तें बघावयाचें. तृतीय प्रहरानंतर आणि चतुर्थ प्रहरापूर्वी अस्ताचलाला जाणारें जें सूर्य स्वरूप असतें, त्याचा आश्रय अरण्यांतील पशु घेतात. ते मनुष्याला पाहून श्वभ्र म्हणजे गुहेसारख्या सुरक्षित आणि भयशून्य अशा कक्षांमध्यें, अरण्यामध्यें, जाऊन राहतात. कारण, आदित्यनामक सामाचा उपद्रव हा जो अवयवविशेष आहे, त्याचे आरण्यक पशु भोक्ते होतात, म्हणून ह्या वेळचें सूर्यस्वरूप उपद्रवरूपी होतें ॥ ७ ॥

---

## मंत्र आठवा.

**अथ यत्प्रथमास्तमिते तन्निधनं तदस्य पितरोऽन्वायत्तास्तस्मात्तान्निदधति निधनभाजिनो ह्येतस्य साम्नः एवं खल्वमुमादित्यꣳ सप्तविधꣳ सामोपास्ते॥८॥**

**इति प्रथमाध्यायस्य नवमः खण्डः ॥ ९ ॥**

**अन्वय व अर्थः—अथ प्रथमास्तमिते यत् तत् अस्य निधनं** ( यानंतर निधनविचार; सूर्य अस्ताला जातांना जें स्वरूप धारण करितो, तें निधननामक सामावयव होय; अशी भावना करावी ) **पितरः तत् अन्वायत्ताः; तस्मात् तान् निदधति; एतस्य हि साम्नः निधनभाजिनः** ( या अस्तंगामी सूर्यस्वरूपाचा आश्रय पितर करितात म्हणून

आपण त्यांची दर्भांचे ठिकाणीं स्थापना करितों. व ते पितर ह्या आदित्य-नामक सामाचे **निधन**भाक् होतात ) **एवं खलु अमुं आदित्यं सप्तविधं साम उपास्ते** ( याप्रमाणें आदित्याच्या अवयवदृष्टीनें सप्तविध सामाची उपासना उद्गीथोपासक करितो आणि त्याला फलप्राप्तिही तशीच होते ) ॥ ८ ॥

**अथ यत्प्रथमास्तमितेऽदर्शनं जिगमिषति सवितरि तन्निधनं तदस्य पितरोऽन्वायत्तास्तान्निदधति पितृपितामहप्रपितामहरूपेण दर्भेषु निक्षिपन्ति तांस्तदर्थं पिण्डान्वा स्थापयन्ति । निधनसंबन्धान्निधनभाजिनो ह्येतस्य साम्नः पितरः । एवमवयवशः सप्तधा विभक्तं खल्वमुमादित्यं सप्तविधं सामोपास्ते यस्तस्य तदापत्तिः फलमिति वाक्यशेषः ॥ ८ ॥**

**इति द्वितीयाध्यायस्य नवमः खण्डः ॥ ९ ॥**

**सिद्धान्ती**—यानंतर सामाचा शेवटचा अवयव जो निधन, त्याचा उपासना-विधि सांगावयाचा. अस्ताला जाऊं इच्छिणाऱ्या सूर्यांचें जें प्रथम अदर्शन होतें, सूर्य दिसेनासा होतो, त्या सूर्यस्वरूपाच्या दृष्टीनें सामावयव जो निधन त्याची उपासना करावी. आपले पितर या स्वरूपाचा आश्रय घेऊन राहतात आणि म्हणूनच आपण पिता, पितामह आणि प्रपितामह यांच्या रूपानें दर्भामध्यें त्यांची स्थापना करितों किंवा त्यांच्यासाठीं दर्भावर पिंडांची स्थापना करितों. संबंध निधनाचा आहे, स्थापनाचा आहे, म्हणून आदित्यनामक सामाचे हे पितर निधनभाक् होतात. याप्रमाणें आदित्याचे सात भाग करून, त्या त्या आदित्यावयवाच्या दृष्टीनें सप्तविध सामाची जो उपासना करितो, त्याला तें तें फल प्राप्त होतें; असें सांगण्याचें श्रुतिमनोगत आहे.

समस्त आदित्य समस्तसाम आहे, अशी भावना करावी. या भावनेला निमित्तें पशु, मनुष्य, पक्षी, देव, पितर इत्यादि आहेत. आदित्याच्या सप्तविध-स्वरूपांतील प्रत्येक रूपाचा आश्रय घेणारा कोणता तरी एक प्राणिवर्ग आहे. या निमित्तानें आदित्याचें कोणतें रूप कोणता सामावयव होतें, हें खालील कोष्टक सामग्र्यानें ह्या खंडांतील विषय दाखविण्याला उपयुक्त होईल, या दृष्टीनें तयार केलें आहे.

आदि=समस्त साम.

| आदित्याचा अवयव | अवयवभागी (निमित्तकारण) | सामान्य | सामाचा अवयव |
|---|---|---|---|
| पुरोदय कालीन सूर्य-स्वरूप | पशूंचा हिंकार | हिंकार करणें | हिंकार |
| प्रथमोदय कालीन सूर्यस्वरूप | मनुष्यांची प्रशंसा व कामता | प्रस्तुति-काम | प्रस्ताव |
| संगववेलामधील सूर्यस्वरूप | पक्ष्यांचें आत्मावलंबन | आत्मा; आश्र-यांतील 'आ' | आदि |
| संमतिमध्यंदिन कालीन सूर्यस्वरूप | देवांचें श्रेष्ठत्व | सत्तम (श्रेष्ठतम) | उद्गीथ |
| तृतीय प्रहराचें सूर्य-स्वरूप | गर्भाचें प्रतिहरण | प्रतिहरण | प्रतिहार |
| चतुर्थ प्रहराचें सूर्य-स्वरूप | आरण्यक पशूंचा निरुपद्रवी कक्षाश्रय | उपद्रवण | उपद्रव |
| अस्तकालीन सूर्यस्वरूप | पितरांची स्थापना | पिंडनिधन | निधन |

ह्या सूर्यावयवस्वरूपांच्या दृष्टीनीं सामावयवांची उपासना करणें श्रुतीला इष्ट आहे.

खंड नववा समाप्त.

---

# खण्ड दहावा.

मृत्युरादित्यः । अहोरात्रादिकालेन जगतः प्रमापयितृत्वात्त-स्यातितरणायेदं सामोपासनमुपदिश्यते—

**सिद्धान्ती**—आदित्य म्हणजे मृत्यु होय. कारण, अहोरात्रप्रभृति काल-विभागानें हा आदित्य जगाचें ( जगाच्या आयुष्याचें ) प्रमापन म्हणजे मोजमाप करित असतो. एक दिवस, एक प्रहर, एक घटका, फार काय सांगावें ? एक क्षण निघून गेला म्हणजे मृत्यु तितका तितका आपल्या जवळ येत असतो ! असो; या मृत्यूचें किंवा आदित्याचें अतितरण करण्यासाठीं, त्याचें अतिक्रमण करण्यासाठीं, हें पुढें येणारें सामोपासन श्रुतीनें सांगितलें आहे—

## मंत्र पहिला.

**अथ खल्वात्मसंमितमतिमृत्यु सप्तविधꣳ सामोपासीत हिंकार इति त्र्यक्षरं प्रस्ताव इति त्र्यक्षरं तत्समम् ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—अथ खलु आत्मसंमितं अतिमृत्यु सप्तविधं साम उपासीत** ( यापुढें आत्मसंमित आणि मृत्यूचा परिभव करणाऱ्या सप्तविध सामाची उपासना सांगावयाची) **हिंकारः इति त्र्यक्षरं** ('हिंकार' या शब्दांत तीन अक्षरें आहेत) **प्रस्तावः इति त्र्यक्षरं** ( प्रस्ताव हा तीन अक्षरी शब्द आहे ) **तत् समं** ( हे दोन्हीही त्र्यक्षरी असल्यामुळें सम म्हणजे एकसारखे आहेत ) ॥ १ ॥

अथ खल्वनन्तरम् । आदित्यमृत्युविषयसामोपासनस्याऽऽत्मसंमितं स्वावयवतुल्यतया मितं परमात्मतुल्यतया वा संमितमतिमृत्यु मृत्युजयहेतुत्वात् । यथा प्रथमेऽध्याय उद्गीथभक्तिनामाक्षराण्युद्गीथ इत्युपास्यत्वेनोक्तानि, तथेह साम्नः सप्तविधभक्तिनामाक्षराणि समाहृत्य त्रिभिस्त्रिभिः समतया सामत्वं परिकल्प्योपास्यत्वेनोच्यन्ते । तदुपासनेन मृत्युगोचराक्षरसंख्यासामान्येन तं मृत्युं प्राप्य तदतिरिक्ताक्षरेण तस्याऽऽदित्यस्य मृत्योरतिक्रमणायैव संक्रमणं कल्पयति । अतिमृत्यु सप्तविधं सामोपासीत मृत्युमतिरिक्ताक्षरसंख्ययेत्यतिमृत्यु साम । तस्य प्रथमभक्तिनामाक्षराणि हिंकार इत्येतत्र्यक्षरं भक्तिनाम प्रस्तव इति च भक्तेस्त्र्यक्षरमेव नाम तत्पूर्वेण समम् ॥ १ ॥

**सिद्धान्ती—**अथ खलु म्हणजे यापुढें आदित्य म्हणजे मृत्यु; तोच विषय आहे, ज्या सामोपासनेचा, त्याचें प्रकरण सुरू करावयाचें. आत्मसंमितां म्हणजे स्वतःच्या अवयवांची जी तुल्यता म्हणजे बरोबरी तिनें मित म्हणजे–ज्ञात होणारें.

शिष्यः—स्वतःच्या म्हणजे ?

**सिद्धान्ती—**म्हणजे सामाच्या. सामाचे हिंकार–प्रस्तावादि जे अवयव आहेत, त्यांच्या नांवाचीं अक्षरें तुल्य म्हणजे तीन तीन असतात; हें ज्ञान होणें म्हणजे आत्मसंमितता होय. किंवा याचा दुसराही अर्थ आहे. ज्याप्रमाणें आत्म्याचें,

परमात्म्याचें, संमति म्हणजे ज्ञान झालें असतां मृत्यूपासून जीव सुटतो, त्याप्रमाणें ह्या उपासनेचें ज्ञान झालें असतां व ज्ञानपूर्वक उपासना झाली असतां, उपासकाला मृत्यूचा परिभव करितां येतो. हेंही आत्मसंमितच होय. हें आत्मसंमितत्व मृत्यूचा पराभव करण्याचें सामर्थ्य देतें, म्हणून त्याला अतिमृत्यु असें म्हणावयाचें.

**शिष्य**-- ही उपासना तरी कसल्या प्रकारची असते ?

**सिद्धान्ती**—ऐका. पहिल्या अध्यायांत आपण उद्गीथ भक्तीचीं नामाक्षरें घेऊन त्यांतील प्रत्येक अक्षर उद्गीथ आहे, अशा दृष्टीनें उद्गीथाची उपासना सांगितली. तशीच येथेंही सामाचे जे सप्तविध प्रकार आहेत, त्यांच्या नांवांचीं अक्षरें एकत्र करून व तीन तीन अक्षरांच्या जोड्या लावून, तीं अक्षरत्रिकें सम असतात, म्हणून साम आहेत अशी कल्पना करावयाची आणि त्यांची उपासना करावयाची; असें श्रुतीला सांगावयाचें आहे. त्या नामाक्षरांस सामत्व आहे असें समजून तदुपासना केली असतां मृत्यूला गोचर असणारी जी अक्षरसंख्या ( एकवीस संख्या ) तीच आहे साऱ्या अक्षरांमध्यें विद्यमान; त्या विद्यमानत्वसामान्यानें मृत्यु म्हणजे आदित्य, त्याची प्राप्ति होते.

**शिष्य**—कांहीं समजलें नाहीं.

**सिद्धान्ती**:—पुढचे मंत्र समजून घेतलेस म्हणजे तुझें तुलाच सर्व समजेल. आतां इतकेंच सांगून ठेवतों कीं, मृत्यूची संख्या एकवीस आहे. ही कशी व कां, हें पुढें याच खंडाच्या पांचव्या मंत्रांत सांगूं. असो; सामाचे हिंकार, प्रस्ताव, इत्यादि जे सात भेद आहेत, त्यांच्या नांवांचीं अक्षरें बावीस होतात. तीन तीन अक्षरांचा एक गट बांधिला म्हणजे सात गट होऊन एक अक्षर शिल्लक राहतें. प्रत्येक गटांत तीन तीन अक्षरें आहेत म्हणून ते सर्व गट परस्पर बरोबर असतात. मृत्यूची संख्या एकवीस व सात गटांतील अक्षरांचीही संख्या एकवीस असते. तेव्हां मृत्यूस गोचर असणारी जी एकवीस संख्या, ती परस्परांशीं बरोबर असणाऱ्या गटरूपांत विद्यमान असते; म्हणून ती मृत्युसंख्या सर्व अक्षरांमध्यें सामान्य आहे. हें सामान्य तत्त्व लक्षांत ठेवून प्रत्येक अक्षर आदित्य आहे, अशा दृष्टीनें उपासना केली असतां मृत्यूची म्हणजे आदित्याची प्राप्ति होते. पण सप्तविध सामभेदांच्या नांवांचीं अक्षरें असतात बावीस. बावीस ही संख्या एकवीस या संख्येचें अतिक्रमण करिते म्हणजे बाविसावें राहिलेलें जें अक्षर त्याच्या साह्यानें आदित्याचें किंवा मृत्यूचें अतिक्रमण करण्याचें सामर्थ्य ही उपासना आपल्यास देते. सारांश, मृत्यूला अतिरिक्त असणाऱ्या अक्षरसंख्येनें अतिक्रांत करणारें जें सप्तविध साम, तें अतिमृत्यु आहे, अशी भावना करून सामोपासना करावी. आतां श्रुति सामाच्या सातही ( सर्व ) भक्ती घेऊन त्यांचीं अक्षरें तीन तीन कशीं आहेत, हें सांगत

आहे. पहिली भक्ति हिंकार; ही तीन अक्षरांची आहे. दुसरी भक्ति प्रस्ताव; येथेंही तीन अक्षरें आहेत. ह्मणून हीं तीन अक्षरें पूर्वींच्या तीन अक्षरांबरोबर आहेत. तीं सम ह्मणजे साम आहेत ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**आदिरिति द्व्यक्षरं प्रतिहार इति चतुक्षरं तत इहैकं तत्समम् ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थ—आदिः इति द्व्यक्षरं, प्रतिहारः इति चतुरक्षरं,** ( आदि ही तिसरी भक्ति दोन अक्षरात्मक आहे, प्रतिहार चार अक्षरांचें आहे ) **ततः इह एकं** ( या चार अक्षरांतून एक अक्षर काढून आदि अक्षरांत मिळवावें ) **तत् समं** ( म्हणजे तीं दोन्ही सम म्हणजे साम होतील ) ॥ २ ॥

आदिरिति द्व्यक्षरं सप्तविधस्य साम्नः संख्यापूरण ओंकार आदिरित्युच्यते । प्रतिहार इति चतुरक्षरम् । तत इहैकमक्षरमवच्छिद्याऽऽद्यक्षरयोः प्रक्षिप्यते । तेन तत्सममेव भवति ॥ २ ॥

सिद्धान्ती—आदि ही भक्ति सप्तविध सामाच्या सात संख्येची पूर्तता करणारा ॐकार हा अवयव आहे. ॐकार आदि आहे असें म्हणतात. असो. आदि हा द्व्यक्षरी शब्द आहे. प्रतिहार चार अक्षरांचा आहे. तेव्हां त्यांतील एक अक्षर काढून घेऊन आदीच्या दोन अक्षरांत मिळवावें, म्हणजे त्या दोन्हीही भक्ती परस्पर बरोबर म्हणजे सम होऊन साम होतात ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**उद्गीथ इति त्र्यक्षरमुपद्रव इति चतुरक्षरं त्रिभिस्त्रिभिः समं भवत्यक्षरमतिशिष्यते त्र्यक्षरं तत्समम् ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थः—उद्गीथः इति त्र्यक्षरं, उपद्रवः इति चतुरक्षरं** ( उद्गीथाचीं तीन अक्षरें आणि उपद्रवाचीं चार अक्षरें आहेत ) **त्रिभिः**

**त्रिभिः समं भवति** ( तीन तीन अक्षरें धरलीं असतां हे दोन्हीं बरोबर म्हणजे साम होतात ) **अक्षरं अतिशिष्यते** ( पण एक अक्षर शिल्लक राहतें ) **त्र्यक्षरं** ( तें एक अक्षर आहे, तरी 'अक्षर' शब्दांत तीन अक्षरें असतात म्हणून तेंही त्र्यक्षर होतें, सम होऊन साम होतें ) **तत् समं** ( आणि हीं तिन्हीं परस्पर बरोबर सम व साम असतात )॥३॥

उद्गीथ इति त्र्यक्षरमुपद्रव इति चतुरक्षरं त्रिभिस्त्रिभिः समं भवत्यक्षरमतिशिष्यतेऽतिरिच्यते। तेन वैषम्ये प्राप्ते साम्नः समत्वकरणायाऽऽह—तदेकमपि सदक्षरमिति त्र्यक्षरमेव भवति। अतस्तत्समम् ॥ ३ ॥

**सिद्धान्ती**—'उद्गीथ' यांत तीन अक्षरें आहेत आणि 'उपद्रवांत' चार आहेत. उभयतांतील तीन तीन अक्षरें घेतलीं म्हणजे ते शब्द उभयतां सम आणि साम होतात; पण एक अक्षर जास्त शिल्लक राहतें.

**शिष्य**—येथें तर वैषम्य प्राप्त झालें. साम हें समात्मक असतें.

**सिद्धान्ती**—यासाठीं श्रुति म्हणते. तें एक अक्षर आहे; तथापि त्याचें नांव 'अक्षर' आहे. आणि अक्षर हा शब्द तीन अक्षरांचा आहे. म्हणून तें एक अक्षरही त्र्यक्षर आहे अशी भावना ठेवून सम करावें आणि उपासना करावी. ह्याप्रमाणें येथें तीन गोष्टी सम म्हणजे साम झाल्या ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा.

**निधनमिति त्र्यक्षरं तत्सममेव भवति तानि ह वा एतानि द्वाविंशतिरक्षराणि ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थः**—**निधनं इति त्र्यक्षरं** ( निधन हें तीन अक्षरांचें आहे ) **तत् समं एव भवति** ( तें इतरांशीं बरोबर, सम व साम आहे ) **तानि एतानि द्वाविंशतिः अक्षराणि वै** ( तीं हीं बावीस अक्षरें आहेत ) ॥ ४ ॥

निधनमिति त्र्यक्षरं तत्सममेव भवति एवं त्र्यक्षरसमतया सामत्वं संपाद्य यथाप्राप्तान्येवाक्षराणि संख्यायन्ते—तानि ह वा एतानि सप्तभक्तिनामाक्षराणि द्वाविंशतिः ॥ ४ ॥

**सिद्धान्ती**--निधन हें तीन अक्षरांचें आहे म्हणून सम व साम आहे. याप्रमाणें तीन तीन अक्षरें असणें ही जी समता, त्या समतेनें या अक्षरांवर सामाची स्थापना करावी; आणि उपासनाही करावी.

**शिष्य**—भगवन् ! एकंदर अक्षरें झालीं चोवीस; म्हणजे एकविसापेक्षां तीन अक्षरें जास्त झालीं ?

**सिद्धान्ती**—असें कसें म्हणतोस ? तूंच सर्व अक्षरें मोजून पहा म्हणजे तीं बावीस आहेत, असें तुला दिसेल. तिसऱ्या मंत्रांत एक अक्षर जास्त झालें होतें, त्याला सामत्व देण्यासाठीं तें त्र्यक्षरी आहे, अशी कल्पना मात्र केली होती; असो; तेव्हां साम भक्तीचीं नामाक्षरें बावीसच होतात ॥ ४ ॥

---

## मंत्र पांचवा.

**एकविꣳशत्याऽऽदित्यमाप्नोत्येकविꣳशो वा इतोऽसावादित्यो द्वाविꣳशेन परमादित्याज्जयति तन्नाकं तद्विशोकम् ॥ ५ ॥**

**अन्वय व अर्थः**—**एकविंशत्या आदित्यं आप्नोति** ( एकवीस अक्षरांनीं आदित्यप्राप्ति होते ) **इतः असौ आदित्यः एकविंशः वै** ( ह्या लोकांपासून संख्यादृष्टीनें आदित्य हा एकविसावा आहे ) **द्वाविंशेन आदित्यात् परं जयति** ( बाविसाव्यानें आदित्याहून श्रेष्ठ जें आहे त्याची प्राप्ति होते ) **तत् नाकं, तत् विशोकं** ) त्याचें नांव ' नाक ' असून तें विशोक–शोकशून्य–आहे ) ॥ ५ ॥

तत्रैकविंशत्यक्षरसंख्ययाऽऽदित्यमाप्नोति मृत्युम् । यस्मादेकविंश इतोऽस्माल्लोकादसावादित्यः संख्यया । द्वादश मासाः पञ्चर्तवस्त्रय इमे लोका आसावादित्य एकविꣳश इति श्रुतेरतितिष्ठेन द्वाविंशेनाक्षरेण परं मृत्योरादित्याज्जयत्याप्नोतीत्यर्थः यच्च तदादित्यात्परं किं तत् । नाकं कमिति सुखं तस्य प्रतिषेधोऽकं तन्न भवतीति नाकं कमेवेत्यर्थः । मृत्युविषयत्वाद्दुःखस्य विशोकं च तद्विगतशोकं मानसदुःखरहितमित्यर्थः; तदाप्नोतीति ॥ ५ ॥

**सिद्धान्ती**—असो; मागें बावीस अक्षरांचा हिशेब सांगितला; त्यांतलि एकवीस अक्षरसंख्येनें आदित्याची म्हणजे मृत्यूची प्राप्ति किंवा दर्शन होतें.

**शिष्य**—एकवीस संख्या आणि मृत्यु यांचा काय संबंध आहे ?

**सिद्धान्ती**—संख्येच्या दृष्टीनें ह्या लोकांपासून आदित्य किंवा मृत्यु एकविसावा आहे. ' चैत्रादि बारा महिने, वसंतादि पांच ऋतु व भूर्भुवः स्वः हे तीन लोक, मिळून वीस आणि आदित्य एकवीस असा संबंध आहे. मास काय, ऋतु काय, हे तिन्ही लोक काय, हीं सर्व मृत्यूचीं निवासस्थानें आहेत. दिवस-रात्र या रूपानें आदित्य हा तर प्रत्यक्ष मृत्यु आहे. तेव्हां सामभक्तीच्या २२ अक्षरांपैकीं २१ अक्षरांनीं आदित्योपासना सिद्ध होऊन आदित्य मिळतो. असो; बाविसावें अक्षर जें शिल्लक राहिलें, त्याची उपासना केली असतां मृत्यूचें अथवा आदित्याहून श्रेष्ठ जें तत्त्व आहे, त्याचें दर्शन होतें म्हणजे त्याची प्राप्ति होते.

**शिष्य**:—मंत्रांत ' जय ' शब्द आहे जय म्हणजे पराभव करणें ?

**सिद्धान्ती**—ज्याचा आपण पराजय करतों, त्याची जयानें प्राप्तिही होते.

**शिष्य**—तें आदित्याहून श्रेष्ठ असणारें श्रेष्ठ तत्त्व तरी कोणतें ?

**सिद्धान्ती**—नाक होय. न + अक=नाक. क म्हणजे सुख त्याचा प्रतिषेध करितें तें अक म्हणजे दुःख. तें दुःख जेथें न म्हणजे होत नाहीं, स्वरूपतः सुख जेथें असतें तें नाक होय. आदित्य हा मृत्यूचें निवासस्थान असल्यामुळें जसा दुःखास्पद आहे, तशाच आतां सांगितलेल्या एकवीस गोष्टी दुःखास्पदच आहेत. या सर्वांहून पलीकडचा असा जो ब्रह्मलोक (परब्रह्माचें स्थान) तेथें दुःखाचें नांव नसतें; म्हणून त्याला ' नाक ' असें म्हणतात. तेथें शारीरिक दुःखच नसतें, असें नव्हे; तर मानसिक दुःखाची सुद्धां तेथें वार्ता नसते. म्हणून त्याला विशोक असें म्हणतात. शोक मानसिक असतो. तोही येथें नाहीं. तो ब्रह्मलोक विशोक असतो. असा हा दुःखशून्य व शोकशून्य ब्रह्मलोक या उपासकाला मिळतो ॥ ५ ॥

---

## मंत्र सहावा.

**आप्नोति हाऽऽदित्यस्य जयं परो हास्याऽऽदित्यजयाज्जयो भवति य एतदेवं विद्वानात्मसंमितमतिमृत्यु सप्तविध९ सामोपास्ते सामोपास्ते ॥ ६ ॥**

**इति द्वितीयाध्यायस्य दशमः खण्डः ॥ १० ॥**

**अन्वय व अर्थः**—आदित्यस्य जयं आप्नोति ह, ( हा आदित्यावर जय मिळवितो ) अस्य आदित्यजयात् परः जयः भवति

( आदित्यजयापेक्षांही श्रेष्ठ जय त्याला मिळतो )—कोणाला ?–यः एवं **विद्वान् एतत् आत्मसंमितं अतिमृत्यु सप्तविधं साम उपास्ते** ( जो ज्ञाता या प्रकारचें ज्ञान करून घेऊन ह्या आत्मसंमित आणि अतिमृत्यु अशा सप्तविध सामाचें उपासन करितो, त्याला ही फलप्राप्ति होते ) ॥६॥

उक्तस्यैव पिण्डितार्थमाह–एकविंशतिसंख्ययाऽऽदित्यस्य जयमाप्नोति । परो हास्यैवंविद आदित्यजयान्मृत्युगोचरात्परो जयो भवति द्वाविंशत्यक्षरसंख्ययेत्यर्थः । य एतदेवं विद्वानित्याद्युक्तार्थम् तस्यैतद्यथोक्तं फलमिति द्विरभ्यासः साप्तविध्यसमाप्त्यर्थः ॥ ६ ॥

इति द्वितीयाध्यायस्य दशमः खण्डः ॥ १० ॥

सिद्धान्ती—श्रुति तात्पर्यार्थ सांगते. पूर्वी सांगितलेल्या सर्व गोष्टींचा संग्रह करून श्रुति म्हणते:—एकवीस संख्येनें ज्ञानी सामोपासक आदित्याची प्राप्ति करून घेतो इतकेंच नव्हे, तर मृत्युगोचर असणारी जी आदित्यप्राप्ति तिच्यापेक्षांही श्रेष्ठ असणाऱ्या वस्तूचें संपादन, त्यानें होतें. बावीस या अक्षरसंख्येनें अलंकृत झालेल्या सामभक्तींची उपासना ज्ञानी उपासक करितो. बाकीचा अर्थ पूर्वी सांगितलाच आहे. ‘ सामोपास्ते ’ या पदांची द्विरुक्ति आहे; ती श्रुतीनें सांगितलेलें फल उपासकास प्राप्त होतें, हें निश्चित करण्यासाठीं आहे. याप्रमाणेंच सप्तविध सामाच्या उपासनेचें प्रकरण संपलें; हेंही द्विराभ्यासानें, दोनदां झालेल्या आवृत्तीनें, समजतें ॥ ६ ॥

खंड दहावा संपला.

---

## खंड अकरावा.

### मंत्र पाहिला.

**मनो हिंकारो वाक्प्रस्तावश्चक्षुरुद्गीथः श्रोत्रं प्रतिहारः प्राणो निधनमेतद्गायत्रं प्राणेषु प्रोतम् ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थ:—मनः हिंकारः; वाक् प्रस्तावः; चक्षुः उद्गीथः; श्रोत्रं प्रतिहारः; प्राणः निधनं** ( मन हिंकार; वाक् हा प्रस्ताव; चक्षु

हा उद्गीथ; श्रोत्र हा प्रतिहार आणि प्राण हें निधन आहे ) **प्राणेषु एतत् गायत्रं प्रोतं** ( प्राणामध्यें गायत्र नामक साम प्रोत म्हणजे प्रतिष्ठित झालें आहे ) ॥ १ ॥

विना नामग्रहणं पञ्चविधस्य सप्तविधस्य च साम्न उपासनमुक्तम् । अथेदानीं गायत्रादिनामग्रहणपूर्वकं विशिष्टफलानि सामोपासनान्तराण्युच्यन्ते । यथाक्रमं गायत्रादीनां कर्मणि प्रयोगस्तथैव मनो हिंकारो मनसः सर्वकरणवृत्तीनां प्राथम्यात् । तदानन्तर्याद्वाक्प्रस्तावश्चक्षुरुद्गीथः श्रैष्ठ्यात् । श्रोत्रं प्रतिहारः प्रतिहृतत्वात् । प्राणो निधनं यथोक्तानां प्राणे निधनात्स्वापकाले । एतद्गायत्रं साम प्राणेषु प्रोतम् । गायत्र्याः प्राणसंस्तुतत्वात् ॥ १ ॥

**सिद्धान्ती**—पंचविध आणि सप्तविध सामाचें स्वरूप व ध्यान आतांपर्यंत सांगितलें. तथापि सामाचीं नांवें कोणतीं तीं कांहीं सांगितलीं नाहींत. आतां येथपासून गायत्र, रथंतर, इत्यादि नामग्रहण भक्तिपूर्वक केलें असतां ज्या सामोपासना कांहीं विशिष्ट फलें देतात, त्या उपासना सांगण्यास श्रुति प्रारंभ करित आहे. कर्म करित असतां गायत्रादिकांचा प्रयोग ज्या क्रमानें विहित केला आहे, तोच क्रम घेऊन श्रुति विशिष्ट उपासना आणि त्यांचीं फलें सांगत आहे. सर्व इंद्रियांच्या प्रवृत्तींमध्यें मन पहिलें म्हणून मन हिंकार होय, अशी भावना करावयाची. त्यानंतर येणारी वाणी हा हिंकारानंतरचा प्रस्ताव; श्रेष्ठ असणारा चक्षु हा उद्गीत; शब्दाचें प्रतिहरण करणारा कर्ण प्रतिहार, आणि आतांच मनादि श्रोत्रापर्यंत ज्या इंद्रियवृत्ती सांगितल्या, त्या निद्रेंत जेथें निहित होतात, वास्तव्य करितात, तो प्राण निधन आहे; अशी भावना करावयाची. तात्पर्य, प्राणदृष्टीनें गायत्र सामाची उपासना करावयाची. मन, वाणी, आदि सर्व प्राणवृत्ती आहेत, हें सांगण्याचें कारण, नाहीं. कारण प्राणामध्येंच गायत्र प्रतिष्ठित असतें. ‘ कशावरून ? ’ असें म्हणाल तर, ‘ प्राण हीच गायत्री आहे; ’ अशी श्रुति आहे. गायत्रीचें प्राण हें नांव आहे म्हणून गायत्र सामाची उपासना विहित केली ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**स य एवमेतद्गायत्रं प्राणेषु प्रोतं वेद प्राणी भवति सर्वमायुरेति ज्योग्जीवति महान्प्रजया पशुभिर्भवति महान्कीर्त्या महामनाः स्यात्तद्व्रतम् ॥ २ ॥**

**इति द्वितीयाध्यायस्यैकादशः खण्डः ॥ ११ ॥**

**अन्वय व अर्थ—यः एतत् गायत्रं प्राणेषु प्रोतं वेद, सः प्राणी भवति; सर्वं आयुः एति; ज्योक् जीवति, प्रजया पशुभिः महान्, कीर्त्या महान् भवति** ( जो याप्रकारें 'प्राणामध्यें गायत्र प्रतिष्ठित झालें आहे' असें जाणतो, तो प्राणी होतो; शतायुषी होतो. त्याचें जीवन उज्ज्वल असतें. त्याला संतति, यश आणि कीर्ति सर्वथा वश होतात. तात्पर्य तो सर्व रीतीनें मोठा होतो ) **महामनाः स्यात, तत् व्रतं** ( मात्र उपासकानें क्षुद्रचित्त असूं नये; हें त्याचें व्रत आहे. हें व्रत उपासकानें पाळिलें पाहिजे ) ॥ २ ॥

स य एवमेतद्गायत्रं प्राणेषु प्रोतं वेद प्राणी भवति अविकलकरणो भवतीत्येतत् । सर्वमायुरेति । शतं वर्षाणि सर्वमायुः पुरुषस्येति श्रुतेः । ज्योगुज्ज्वलं जीवति । महान्भवति प्रजादिभिर्महांश्च कीर्त्या । गायत्रोपासकस्यैतद्व्रतं भवति यन्महामनास्त्वक्षुद्रचित्तः स्यादित्यर्थः ॥ २ ॥

इति द्वितीयाध्यायस्यैकादशः खण्डः ॥ ११ ॥

सिद्धान्तीः—जो हें गायत्रसाम प्राणामध्यें प्रगत झालें आहे, प्रतिष्ठित झालें आहे; असें जाणतो, तो प्राणी होतो; म्हणजे त्याचे सर्व अवयव आणि सर्व इंद्रियें स्वस्वकार्यपटु असतात. त्याचें एकही इंद्रिय पंगु नसतें. 'पुरुषाला शंभर वर्षे आयुष्य आहे' असें श्रुति म्हणते. शताला 'सर्व' म्हणतात. तें सर्व आयुष्य त्याला प्राप्त होतें. म्हणजे तो सर्वायु होतो. त्याचें जीवन उज्ज्वल म्हणजे तेजस्वी व स्वपरोपकारक्षम असतें. संतति, यश, कीर्ति, इत्यादिकांच्या योगें तो महान् होतो. पण गायत्राच्या उपासकाला एक व्रत सांगितलें आहे. तें व्रत म्हणजे तो महात्मा असावा; त्याचें चित्त संकुचित किंवा क्षुद्र असूं नये. असो; महामनस्क गायत्रोपासकाला आतांच सांगितलेलें फल प्राप्त होतें ॥ २ ॥

खंड अकरावा संपला.

---

## खंड बारावा.

### मंत्र पहिला.

**अभिमन्थति स हिंकारो धूमो जायते स प्रस्तावो ज्वलति स उद्गीथोऽङ्गारा भवन्ति स प्रतिहार उपशाम्यति तन्निधनꣳ सꣳशाम्यति तन्निधनमेतद्रथंतरमग्नौ प्रोतम् ॥ १ ॥**

अन्वय व अर्थः—**अभिमंथति सः हिंकारः; धूमः जायते सः प्रस्तावः; ज्वलति सः उद्गीथः; अंगाराः भवंति सः प्रतिहारः; उपशाम्यति तत् निधनं; संशाम्यति तत् निधनं** ( अग्नि उत्पन्न कारितांना जें अभिमंथन होतें तो हिंकार, प्रथम धूम उत्पन्न होतो तो प्रस्ताव, ज्वाला उत्पन्न होते तो उद्गीथ; अंगार उत्पन्न होतात तो प्रतिहार; उपशमन होतें आणि संशमन होतें तें निधन; अशी भावना ठेवून उपासना करावयाची ) **एतत् रथंतरं अग्नौ प्रोतं** ( हें रथंतर साम अग्नीमध्यें प्रतिष्ठित झालेलें आहे ) ॥ १ ॥

अभिमन्थति स हिंकारः प्राथम्यात् । अग्नेर्धूमो जायते स प्रस्ताव आनन्तर्यात् । ज्वलति स उद्गीथो हविः संबन्धाच्छ्रैष्ठ्यं ज्वलनस्य । अङ्गारा भवन्ति स प्रतिहारोऽङ्गाराणां प्रतिहृतत्वात् । उपशमः सावशेषत्वादग्नेः संशमो निःशेषोपशमः समाप्तिसामान्यान्निधनमेतद्रथंतरमग्नौ प्रोतम् । मन्थने ह्यग्नेर्गीयते ॥ १ ॥

**सिद्धान्ती**—अग्नि उत्पन्न कारितांना जें मंथन करावें लागतें, जें दोन अरणींद्वारां मंथन करावें लागतें, तें प्रथम असतें; म्हणून तें मंथन हिंकार; पेटणाऱ्या अग्नीपासून प्रथमतः धूर उत्पन्न होतो तो **प्रस्ताव**—

**शिष्य**—मंथनाच्या नंतर लागलाच धूर होतो.

**सिद्धान्ती**—हवीच्या संबंधानें ज्वलनाचें ( ज्वाला येणाऱ्या अग्नीच्या स्वरूपाचें ) श्रेष्ठत्व असतें. म्हणून तो **उद्गीथ**; अग्नीचें प्रतिहरण करणारे निखारे तो **प्रतिहरा**; अग्नि असून जो शांत झालासा दिसतो, तो **उपशम** आणि निःशेष उपशम झाला म्हणजे तो **संशम**. हे दोन्ही अग्नि समाप्त झाला, शांत झाला, असें

दाखवितात म्हणून उपशम आणि संशम हें निधन होय. अशा भावना ठेवून रथंतर सामाची उपासना करावी. हें साम अग्नीमध्यें प्रतिष्ठित झालेलें असतें कारण 'अग्निमंथन करण्याचे वेळीं रथंतर सामाचें गायन करितात, रथंतर साम म्हणत असतात' ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**स य एवमेतद्रथंतरमग्नौ प्रोतं वेद ब्रह्मवर्चस्यन्नादो भवति सर्वमायुरेति ज्योग्जीवति महान्प्रजया पशुभिर्भवति महान्कीर्त्या न प्रत्यङ्ङग्निमाचामेन्न निष्ठीवेत्तद्व्रतम् ॥ २ ॥**

**इति द्वितीयाध्यायस्य द्वादशः खण्डः ॥ १२ ॥**

अन्वय व अर्थः—यः एवं एतत् रथंतरं अग्नौ प्रोतं वेद सः ब्रह्मवर्चसी अन्नादः भवति इत्यादि (हें रथंतर साम अग्नीमध्यें प्रतिष्ठित झालें आहे, असें समजून जो या सामाची अग्निदृष्टीनें उपासना करितो तो ब्रह्म वर्चसी-तेजस्वी-आणि अन्नाद होतो. पुढील मंत्रभागाचा अन्वय-अर्थ मागें सांगितला आहे) शेवटीं व्रत सांगितलें आहे तें असें: प्रत्यक् अग्निं न आचामेत् न निष्ठीवेत; एतत् व्रतं (अग्नीकडे मुख करून आचमन करूं नये किंवा निष्ठीवन करूं नये-थुंकूं नये) ॥ २ ॥

स य इत्यादि पूर्ववत्। ब्रह्मवर्चसी वृत्तस्वाध्यायनिमित्तं तेजो ब्रह्मवर्चसम्। तेजस्तु केवलं त्विड्भावः। अन्नादो दीप्ताग्निः न प्रत्यङ्ङग्नेरभिमुखो नाऽऽचामेन्न भक्षयेत्किंचिन्न निष्ठीवेच्छ्लेष्मनिरसनं च न कुर्यात्तद्व्रतम् ॥ २ ॥

इति द्वितीयाध्यायस्य द्वितीयः खण्डः ॥ १२ ॥

**सिद्धान्ती:**—फलश्रुति सामान्यत: मागें सांगितलीच आहे. हा रथंतरोपासक पठित झालेल्या स्वाध्यायाच्या निमित्तानें ब्रह्मवर्चसी म्हणजे वेदाध्ययनानें तेजस्वी होतो. ब्रह्मवर्चसी म्हणजे वेदोभास्कर. तेज म्हणजे शुद्ध प्रकाश. अन्नाद म्हणजे प्रदीप्त आहे जठराग्नि ज्याचा, येणेंप्रमाणें रथंतरोपासक ब्रह्मवर्चसी आणि दीप्ताग्नि होतो. त्याला व्रत सांगितलें आहे; तें असें कीं, त्यानें अग्निसम्मुख कांहीं खाऊं पिऊं नये, किंवा श्लेष्म्याचें निरसन करूं नये, खाकेरा काढूं नये किंवा थुंकूं नये॥ २ ॥

बारावा खंड समाप्त.

---

## खंड तेरावा.

### मंत्र पहिला.

**उपमन्त्रयते स हिंकारो ज्ञपयते स प्रस्तावः स्त्रिया सह शेते स उद्गीथः प्रति स्त्रीं सह शेते स प्रतिहारः कालं गच्छति तन्निधनं पारं गच्छति तन्निधनमेतद्वामदेव्यं मिथुने प्रोतम् ॥ १ ॥**

अन्वय व अर्थः—उपमंत्रयते सः हिंकारः; ज्ञपयते सः प्रस्तावः; स्त्रिया सह शेते सः उद्गीथः; स्त्रीं सह प्रति शेते स प्रतिहारः; **पारं गच्छति, तत् निधनं** ( उपमंत्रण हिंकार, ज्ञपन प्रस्ताव, सहशयन, उद्गीथ, स्त्रीसह प्रतिशयन प्रतिहार, संभोगकाल आणि संभोगसमाप्तिकाल निधन आहे, अशा भावना असाव्या ) **मिथुने एतत् वामदेव्यं प्रोतं** ( मिथुनामध्यें हें वामदेव्य साम प्रतिष्ठित झालें आहे ) ॥ १ ॥

उपमन्त्रयते संकेतं करोति प्राथम्यात्स हिंकारः, ज्ञपयते तोषयति स प्रस्तावः । सहशयनमेकपर्यङ्कगमनं स उद्गीथः श्रैष्ठ्यात् । प्रति स्त्रीं शयनं स्त्रिया अभिमुखीभावः स प्रतिहारः । कालं गच्छति मैथुनेन पारं समाप्तिं गच्छति तन्निधनमेतद्वामदेव्यं मिथुने प्रोतम् । वाय्वम्बुमिथुनसंबन्धात् ॥ १ ॥

सिद्धान्ती—प्रथम संकेत होतो याला उपमंत्रण म्हणावें. हें पहिलें असतें, म्हणून तें **हिंकार.** ज्ञपन करणें (संतुष्ट करणें) हा **प्रस्ताव.** एका पर्यंकावर शयन करणें या प्रकरणांतील श्रेष्ठ वस्तु आहे, म्हणून तें **उद्गीथ.** स्त्रीसन्मुख होऊन शयन करणें ( स्त्रीच्या मुखाकडे प्रतिमुख होऊन शयन करणें ) हा **प्रतिहार,** संभोगकाल आणि संभोगसमाप्ति हें निधन होय. अशा भावना ठेवावयाच्या आहेत. हें वामदेव्य साम मिथुनामध्यें प्रतिष्ठित झालें आहे. वामदेव या शब्दाचाच अर्थ वायु आणि जल यांच्या समागमानें होणारे जें मिथुन तें वामदेव्य होय. ' वायु व जल यांच्या संबंधापासूनच वामदेव्य सामाची उत्पत्ति झाली आहे ' असें म्हणतात ॥ १ ॥

---

### मंत्र दुसरा.

**स य एवमेतद्वामदेव्यं मिथुने प्रोतं वेद मिथुनीभवति मिथुनान्मिथुनात्प्रजायते सर्वमायुरेति ज्योग्जीवति महान्प्रजया पशुभिर्भवति महान्कीर्त्या न कांचन परिहरेत्तद्व्रतम् ॥ २ ॥**

**इति द्वितीयाध्यायस्य त्रयोदशः खण्डः ॥ १३ ॥**

अन्वय व अर्थः—**यः एवं एतत् वामदेव्यं मिथुने प्रोतं वेद** ( वामदेव्यसाम मिथुनामध्यें प्रतिष्ठित झालें आहे, असें जाणून जो उपासना करितो ) **मिथुनीभवति, मिथुनात् मिथुनात् प्रजायते** ( तो केव्हांही विधुर होत नाहीं, त्याची धर्मपत्नी जिवंत असते आणि त्याचें मैथुन नित्य फलप्रद होतें ) बाकीचा अर्थ मागें झाला आहे. उपासकाला व्रत सांगितलें आहे तें हें—**कांचन न परिहरेत्; एतत् व्रतं** ( कोणत्याहीं स्त्रीचा त्यानें परित्याग करूं नये. हें होय ॥ २ ॥

स य इत्यादि पूर्ववत् । मिथुनीभवत्यविधुरो भवतीत्यर्थः । मिथुनान्मिथुनात्प्रजायत इत्यमोघरेतस्त्वमुच्यते । न कांचन कांचिदपि स्त्रियं स्वात्मतल्पप्राप्तां न परिहरेत्समागमार्थिनीम् । वामदेव्यसामोपासनाङ्गत्वेन विधानात् । एतस्मादन्यत्र प्रतिषेधस्मृतयः । वचनप्रामाण्याच्च धर्मावगतेर्न प्रतिषेधशास्त्रेणास्य विरोधः ॥ २ ॥

इति द्वितीयाध्यायस्य त्रयोदशः खण्डः ॥ १३ ॥

सिद्धान्ती—सामान्य अर्थ मागें झालाच आहे. हा उपासक अविधुर राहतो. वैधुर्य स्थिति त्याला केव्हांही प्राप्त होत नाहीं. तो अमोघरेता होतो. तात्पर्य त्याला संतति—संपत्ति विपुल असते. व्रताच्या संबंधानें आचार्य असें म्हणतात कीं, समागमाच्या इच्छेनें स्वशयनावर प्राप्त झालेल्या कोणत्याही स्त्रीचा उपासकानें आशाभंग करूं नये. वामदेव्य सामाच्या उपासनेचें अंग म्हणून हें व्रत सांगितलें आहे. 'परस्त्री मातेसमान असावी' हें व्रत वामदेव्य सामोपासकाला उपासना करित असतां मात्र लागू नाहीं. सामान्य स्मृतिप्रणीत नियमाला श्रुतीनें हा अपवाद सांगितला आहे. श्रुतिवचन नेहमीं प्रमाण आहे, कारण, धर्माची माता श्रुति आहे. तेव्हां श्रुतीनें सांगितलेल्या व्रताचा प्रतिबंध स्मृतिशास्त्रें करूं शकत नाहींत ॥ २ ॥

खंड तेरावा समाप्त.

---

## खंड चवदावा.

### मंत्र पहिला.

**उद्यन्हिंकार उदितः प्रस्तावो मध्यंदिन उद्गीथोऽपराह्णः प्रतिहारोऽस्तं यन्निधनमेतद्बृहदादित्ये प्रोतम् ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—उद्यन् हिंकारः; उदितः प्रस्तावः; मध्यंदिनः उद्गीथः; अपराह्णः प्रतिहारः; यत् अस्तं तत् निधनं** ( सूर्याचा उदय होणें हा हिंकार, उदित होणें प्रस्ताव, मध्यंदिन उद्गीथ, अपराह्ण सूर्य प्रतिहार आणि जो सूर्यास्त तें निधन, अशी भावना करावयाची ) **एतत् बृहत् आदित्ये प्रोतं** ( हें बृहत्साम आदित्यामध्यें प्रतिष्ठित झालें आहे ) **१**

उद्यन्सविता स हिंकारः प्राथम्याद्दर्शनस्य । उदितः प्रस्तावः प्रस्तवनहेतुत्वात्कर्मणाम् । मध्यंदिन उद्गीथः श्रैष्ठ्यात् । अपराह्णः प्रतिहारः पश्वादीनां गृहान्प्रति हरणात् । यदस्तं यंस्तन्निधनं रात्रौ गृहे निधानात्प्राणिनाम् । एतद्बृहदादित्ये प्रोतं बृहत आदित्यदै(दे) वत्यत्वात् ॥ १ ॥

सिद्धान्ती—उगवणारा सूर्य प्रथम दिसतो, तेव्हां तो हिंकार होतो, उदित झालेला सूर्य प्रस्ताव—

शिष्यः—कारण याचवेळीं कर्माला प्रारंभ होतो. कर्मप्रारंभाला उदित सूर्य हा हेतु आहे ?

सिद्धान्ती—होय. मध्यादिनगत सूर्य श्रेष्ठ असतो, म्हणून तो उद्गीथ, अपराह्णकाळीं पश्वादिकांचें गृहाप्रत प्रतिहरण होतें ( घरीं परत येतात ) म्हणून तत्कालीन सूर्य हा प्रतिहार आणि सूर्य अस्ताला गेला ( रात्र झाली ) म्हणजे सर्व प्राणी आपल्या घरीं निहित होतात, विश्रांतीसाठीं सज्ज होतात; म्हणून अस्त पावलेला सूर्य निधन होय, अशी भावना उपासकानें धरावयाची. बृहत्सामाचें आदित्य हें दैवत आहे, म्हणून बृहत्साम आदित्यामध्यें प्रतिष्ठित झालेलें असतें॥ १॥

### मंत्र दुसरा.

**स य एवमेतद्बृहदादित्ये प्रोतं वेद तेजस्व्यन्नादो भवति सर्वमायुरेति ज्योग्जीवति महान्प्रजया पशुभिर्भवति महान्कीर्त्या तपन्तं न निन्देत्तद्व्रतम् ॥ २ ॥**

**इति द्वितीयाध्यायस्य चतुर्दशः खण्डः ॥ १४ ॥**

**अन्वय व अर्थः—यः एवं एतत् बृहत् आदित्ये प्रोतं वेद, तेजस्वी अन्नादः भवति** ( बृहत्सामवेत्ता तेजस्वी होतो; आणि दीप्ताग्नि होतो ) बाकीचें स्पष्टीकरण पूर्ववत् आहे. या उपासकाला व्रत सांगितलें आहे तें—**तपंतं न निंदेत्; एतत् व्रतं** ( तपणारा जो सूर्य त्याची केव्हांही निंदा करूं नये. हें आहे ) ॥ २ ॥

स य इत्यादि पूर्ववत् । तपन्तं न निन्देत्तद्व्रतम् ॥ २ ॥

इति द्वितीयाध्यायस्य चतुर्दशः खण्डः ॥ १४ ॥

सिद्धान्ती—सर्व अर्थ पूर्ववत् आहे. या उपासकानें सूर्याची निंदा करूं नये, हें व्रत होय ॥ २ ॥

खंड चवदावा समाप्त.

---

## खंड पंधरावा.

### मंत्र पाहिला.

**अभ्राणि संप्लवन्ते स हिंकारो मेघो जायते स प्रस्तावो वर्षति स उद्गीथो विद्योतते स्तनयति स प्रतिहार उद्गृह्णाति तन्निधनमेतद्वैरूपं पर्जन्ये प्रोतम् ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—अभ्राणि संप्लवन्ते सः हिंकारः; मेघः जायते सः प्रस्तावः; वर्षति सः उद्गीथः; विद्योतते, स्तनयति, सः प्रतिहारः; उद्गृह्णाति तत निधनं** ( अभ्रें एकत्र होतात तो हिंकार होय;

बाकीचा अन्वय अर्थ खंड तीन, मंत्र एक प्रमाणें आहे ) **एतत् वैरूपं पर्जन्ये प्रोतं** (हें वैरूपसाम पर्जन्याचे ठिकाणीं प्रतिष्ठित झालें आहे )॥१॥

अभ्राण्यब्भरणान्मेघ उदकसेक्तृत्वात् । उक्तार्थमन्यत् । एतद्वैरूपं नाम साम पर्जन्ये प्रोतम् । अनेकरूपत्वात् । अभ्रादिभिः पर्जन्यस्य वैरूप्यम् ॥ १ ॥

सिद्धान्ती—अप म्हणजे जल; त्याचें **भरण करणारे** ते अभ्र होत. पाण्याचें **सिंचन करणारे** ते मेघ होत. हा अभ्र आणि मेघ यांमध्यें विशेष आहे. बाकीचा अर्थ मागें झाला आहे. वैरूप म्हणजे अनेकरूपता. अभ्रादियोगांनें पर्जन्याला अनेकरूपता प्राप्त होते, वैरूप्य होतें, म्हणून वैरूप्यसाम पर्जन्याचे ठिकाणीं प्रतिष्ठित होतें ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**स य एवमेतद्वैरूपं पर्जन्ये प्रोतं वेद विरूपाꣳश्च सुरूपाꣳश्च पशूनवरुन्धे सर्वमायुरेति ज्योग्जीवति महान्प्रजया पशुभिर्भवति महान्कीर्त्या वर्षन्तं न निन्देत्तद्व्रतम् ॥ २ ॥**

**इति द्वितीयाध्यायस्य पञ्चदशः खण्डः ॥१५॥**

**अन्वय व अर्थः—यः इत्यादि** ( अन्वयार्थ पूर्वींप्रमाणेंच आहे ) **विरूपान् च सुरूपान् च पशून् अवरुंधे** ( या उपासकाला विरूप आणि सुरूप पशू प्राप्त होतात ) बाकीची फलश्रुति पूर्वींप्रमाणें सांगून श्रुति व्रत सांगतेः—**वर्षंतं न निंदेत्** ( वर्षणाऱ्या पर्जन्याची निंदा करूं नये ) ॥ २ ॥

विरूपांश्च सुरूपांश्चाजाविप्रभृतीन्पशूनवरुन्धे प्राप्नोतीत्यर्थः । वर्षन्तं न निन्देत्तद्व्रतम् ॥ २ ॥

इति द्वितीयाध्यायस्य पञ्चदशः खण्डः ॥ १५ ॥

सिद्धान्ती—वैरूपसामाची उपासना करणाऱ्या ज्ञानी उपासकाला विरूप ( कुरूप किंवा ज्यांचा रंग अनेक प्रकारचा आहे असे ) आणि सुरूप, असे अजा, अवि इत्यादि पशू प्राप्त होतात. या उपासकानें केव्हांही वर्षणाऱ्या पर्जन्याची निंदा करूं नये ॥ २ ॥

पंधरा खंड समाप्त.

---

## खंड सोळावा.

### मंत्र पहिला.

**वसन्तो हिंकारो ग्रीष्मः प्रस्तावो वर्षा उद्गीथः शरत्प्रतिहारो हेमन्तो निधनमेतद्वैराजमृतुषु प्रोतम् ॥ १ ॥**

अन्वय व अर्थ—**वसंतः हिंकारः; ग्रीष्मः प्रस्तावः, वर्षाः (?) उद्गीथः; शरत् प्रतिहारः; हेमंतः निधनं** ( वसंत हिंकार, ग्रीष्म प्रस्ताव, वर्षाऋतु उद्गीथ, शरदृतु प्रतिहार आणि हेमंत निधन अशा दृष्टी ठेवून उपासना करावी ) **एतत् वैराजं ऋतुषु प्रोतं** ( हें वैराजसाम ऋतूंमध्यें प्रतिष्ठित झालेलें असतें ) ॥ १ ॥

वसन्तो हिंकारः प्राथम्यात् । ग्रीष्मः प्रस्ताव इत्यादि पूर्ववत् ॥ १ ॥

सिद्धान्ती—प्रथम आहे म्हणून वसंतदृष्टीनें हिंकारोपासना करावी. ग्रीष्म दृष्टीनें प्रस्तावाची; इत्यादि अर्थ स्पष्ट आहे. वैराजसाम ऋतूंमध्यें प्रतिष्ठित झालेलें असतें; कारण सर्व ऋतू आपापल्या धर्मांनीं विराजमान होतात ॥ १ ॥

---

### मंत्र दुसरा.

**स य एवमेतद्वैराजमृतुषु प्रोतं वेद विराजति प्रजया पशुभिर्ब्रह्मवर्चसेन सर्वमायुरेति ज्योग्जीवति महान्प्रजया पशुभिर्भवति महान्कीर्त्यर्तून्न निन्देत्तद्व्रतम् ॥ २ ॥**

**इति द्वितीयाध्यायस्य षोडशः खण्डः ॥ १६ ॥**

अन्वय व अर्थः—**यः एवं वैराजं ऋतुषु प्रोतं वेद स प्रजया** इत्यादि ( ऋतूंमध्यें वैराज प्रतिष्ठित झालें आहे, असें जो जाणतो, तो संतति-संपत्तीनें विराजमान म्हणजे शोभिवंत होतो ) बाकीचा अर्थ पूर्ववत् समजावा. **ऋतुन् न निंदेत्; एतत् व्रतं** ( उपासकानें ऋतूंची निंदा करूं नये; हें व्रत आहे. ) ॥ २ ॥

एतैद्वैराजमृतुषु प्रोतं वेद विराजति ऋतुत्रय्यथर्तव आर्तवैर्धर्मैर्वि-
राजन्त एवं प्रजादिभिर्विद्वानित्युक्तमन्यत् । ऋतून्न निन्देत्तद्व्रतम् ॥२॥

इति द्वितीयाध्यायस्य षोडशः खण्डः ॥ १६ ॥

सिद्धान्तीः—ज्ञाता उपासक ऋतूंमध्यें वैराज साम प्रतिष्ठित झालें, आहे असें जाणतो. अर्थात् त्याला फलप्राप्तिही मोठी होते. निरनिराळे ऋतु आपापल्या विशेषधर्मांनीं अलंकृत होतात, त्याप्रमाणें व त्यासाठीं हा विद्वान् संतति-प्रमुख सर्व सौख्यदायक पदार्थांनीं संपन्न आणि सुशोभित होतो. बाकीचें स्पष्टीकरण पूर्ववत् आहे. ऋतूंची निंदा न करणें हें व्रत उपासकानें पाळलें पाहिजे. अन्नापासून ऋतूंची उत्पत्ति होते. विराट् अन्नात्मा असतो अथवा अन्नामध्यें प्रतिष्ठित होतो. म्हणून-ही वैराजसाम अन्नामध्यें प्रतिष्ठित होतें. विराट्संबंधीं ते वैराज होय ॥ २ ॥

सोळावा खंड संपला.

---

## खण्ड सतरा.

### मंत्र पहिला.

**पृथिवी हिंकारोऽन्तरिक्षं प्रस्तावो द्यौरुद्गीथो दिशः प्रतिहारः समुद्रो निधनमेताः शक्वर्यो लोकेषु प्रोताः ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—पृथिवी हिंकारः; अंतरिक्षं प्रस्तावः; द्यौः उद्गीथः; दिशः प्रतिहारः; समुद्रः निधनं** ( पृथ्वी हिंकार, इत्यादि अन्वयार्थ स्पष्ट आहेत ) **एताः शक्वर्यः लोकेषु प्रोताः** ( या शक्वरी पृथिव्यादि लोकांमध्यें प्रतिष्ठित झाल्या आहेत ) ॥ १ ॥

पृथिवी हिंकार इत्यादि पूर्ववत् । शक्वर्य इति नित्यं बहुवचनं रेवत्य इव । लोकेषु प्रोताः ॥ १ ॥

सिद्धान्ती—मंत्राचा अर्थ स्पष्ट आहे. शक्वर्य सामें भूर्भुवादि लोकांमध्यें प्रतिष्ठित झालेलीं आहेत. शक्वर्य हें नित्य बहुवचनान्त असतें. साम एकच परंतु त्याचें नांव मात्र अनेकवचनी असतें. रेवतीसामाचें 'रेवत्यः' हें अनेक-वचनी नांव आहे, तसेंच शक्वरीचें 'शक्वर्यः' हें आहे.

शिष्य:—शक्वर्य आणि लोक यांचा संबंध कसा ?

सिद्धान्ती:—महानाम्नी नामक ऋचांमध्यें शक्वर्य गायिलें जातें. त्या ऋचांमध्यें 'जलें हीं महानाम्नी आहेत' असा जलाशीं संबंध स्मृतीमध्यें सांगितला आहे. 'हे सर्व लोक जलांमध्यें प्रतिष्ठित होतात' अशी श्रुति आहे. तेव्हां लोकांस प्रतिष्ठा देणारीं जलें महानाम्नी नामक ऋचा आहेत आणि त्यांतच शक्वर्य गायिलें जातें. म्हणून शक्वर्यामध्यें सर्व लोक प्रतिष्ठित होतात ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**स य एवमेताः शक्वर्यो लोकेषु प्रोता वेद लोकी भवति सर्वमायुरेति ज्योग्जीवति महान्प्रजया पशुभिर्भवति महान्कीर्त्या लोकान्न निन्देत्तद्व्रतम् ॥ २ ॥**

**इति द्वितीयाध्यायस्य सप्तदशः खण्डः ॥ १७ ॥**

**अन्वय व अर्थ:—यः एवं एताः शक्वर्यः लोकेषु प्रोताः वेद, लोकी भवति इत्यादि** ( शक्वरी भूर्भुवादि लोकांमध्यें प्रतिष्ठित होतात, हें जाणणारा उपासक लोकस्वामी होतो; इत्यादि फलश्रुतीचा अर्थ स्पष्ट समजण्यासारखा आहे. ) उपासकाचें व्रत:—**लोकान् न निंदेत** ( पृथिवीप्रमुख लोकांची केव्हांही निंदा करूं नये ) ॥ २ ॥

लोकी भवति लोकफलेन युज्यत इत्यर्थः । लोकान्न निन्देत्तद्व्रतम् ॥ २ ॥

इति द्वितीयाध्यायस्य सप्तदशः खण्डः ॥ १७ ॥

सिद्धान्ती:—लोकीभवति म्हणजे लोकरूपी फलाशीं त्याचा संयोग होतो. सारांश, पृथ्वीआदि लोकांतील सर्व उपभोग त्याला मिळतात. या उपासकानें पृथ्वी-आदि लोकांची निंदा करूं नये ॥ २ ॥

सतरावा खंड संपला.

---

## खंड अठरावा.

### मंत्र पहिला.

**अजा हिंकारोऽवयः प्रस्तावो गाव उद्गीथोऽश्वाः प्रतिहारः पुरुषो निधनमेता रेवत्यः पशुषु प्रोताः ॥१॥**

**अन्वय व अर्थः**—अजाः हिंकारः; अवयः प्रस्तावः इत्यादि (अन्वयार्थ स्पष्ट आहे ) पशुषु रेवत्यः प्रोताः ( पशूंमध्यें 'रेवती' प्रतिष्ठित झाल्या आहेत ) ॥ १ ॥

अजा हिंकार इत्यादि पूर्ववत् । पशुषु प्रोताः ॥ १ ॥

सिद्धान्ती—अर्थ स्पष्ट आहे. 'पशू रेवती होत' अशी श्रुति आहे म्हणून रेवती पशूंमध्यें प्रतिष्ठित झाल्या आहेत ॥ १ ॥

### मंत्र दुसरा.

**स य एवमेता रेवत्यः पशुषु प्रोता वेद पशुमान्भवति सर्वमायुरेति ज्योग्जीवति महान्प्रजया पशुभिर्भवति महान्कीर्त्या पशून्न निन्देत्तद्व्रतम् ॥ २ ॥**

**इति द्वितीयाध्यायस्याष्टादशः खण्डः ॥ १८ ॥**

**अन्वय व अर्थः**—यः एवं ( इत्यादि अन्वयार्थ साम आहेत ) **पशून् न निंदेत्** ( पशूंची निंदा करूं नये; हें व्रत आहे ) ॥ २ ॥

पशून्न निन्देत्तद्व्रतम् ॥ २ ॥

इति द्वितीयाध्यायस्याष्टादशः खण्डः ॥ १८ ॥

सिद्धान्ती—या उपासकाला पशुनिंदा वर्ज्य आहे ॥ २ ॥

अठरावा खंड समाप्त.

# खंड एकोणीसावा.

## मंत्र पहिला.

**लोम हिंकारस्त्वक्प्रस्तावो माꣳसमुद्गीथोऽस्थि प्रतिहारो मज्जा निधनमेतद्यज्ञायज्ञीयमङ्गेषु प्रोतम्॥१॥**

अन्वय व अर्थः—लोमः हिंकारः; त्वक् प्रस्तावः; मांसं उद्गीथः; अस्थि प्रतिहारः; मज्जा निधनं; एतत यज्ञायज्ञीयं अंगेषु प्रोतं ( लोम, त्वचा, मांस, अस्थि, मज्जा ह्या दृष्टींनीं हिंकार, प्रस्ताव, उद्गीथ, प्रतिहार आणि निधन यांची उपासना करावयाची ) लोम इत्यादि प्राण्यांचीं अंगें–धातु–असतात. या अंगांमध्यें यज्ञायज्ञीय साम प्रतिष्ठित झालें आहे ) ॥ १ ॥

लोम हिंकारो देहावयवानां प्राथम्यात्। त्वक्प्रस्ताव आनन्तर्यात्। मांसमुद्गीथः श्रैष्ठ्यात्। अस्थि प्रतिहारः प्रतिहृतत्वात्। मज्जा निधनमान्त्यात्। एतद्यज्ञायज्ञीयं नाम साम देहावयवेषु प्रोतम्॥१॥

सिद्धान्ती—लोम ( अंगावरील केश ) हे देहावयवामध्यें प्रथम म्हणून लोमदृष्टीनें हिंकारोपासना, नंतरच्या त्वग्दृष्टीनें प्रस्तावोपासना, श्रेष्ठ असणाऱ्या मांसदृष्टीनें उद्गीथोपासना, प्रतिहरण करणाऱ्या अस्थिदृष्टीनें प्रतिहारोपासना व सर्वांच्या शेवटीं असणारी जी मज्जा तिच्या दृष्टीनें निधनोपासना करावयाची. यज्ञायज्ञीय नामक साम हें देहाच्या लोमादि धातुघटित अवयवांत प्रतिष्ठित झालें असतें. ‘ रस हा यज्ञायज्ञीय आहे ’ ह्या श्रुतिप्रमाणानें अन्नरसविकार जे लोमादि त्यांच्यांमध्यें यज्ञायज्ञीय नामक साम प्रतिष्ठित झालें असतें. ‘ लोम हा हिंकार आहे ’ इत्यादि प्रकारची दृष्टि ठेवणें हें तात्पर्य आहे ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**स य एवमेतद्यज्ञायज्ञीयमङ्गेषु प्रोतं वेदाङ्गी भवति नाङ्गेन विहूर्छति सर्वमायुरेति ज्योग्जीवति महान्प्रजया पशुभिर्भवति महान्कीर्त्या संवत्सरं मज्ज्ञो नाश्नीयात्तद्व्रतं मज्ज्ञो नाश्नीयादिति वा ॥ २ ॥**

इति द्वितीयाध्यायस्यैकोनविंशः खण्डः ॥ १९ ॥

# खंड अठरावा.

## मंत्र पहिला.

**अजा हिंकारोऽवयः प्रस्तावो गाव उद्गीथोऽश्वाः प्रतिहारः पुरुषो निधनमेता रेवत्यः पशुषु प्रोताः ॥१॥**

**अन्वय व अर्थः**—अजाः हिंकारः; अवयः प्रस्तावः इत्यादि (अन्वयार्थ स्पष्ट आहे) पशुषु रेवत्यः प्रोताः (पशूंमध्यें 'रेवती' प्रतिष्ठित झाल्या आहेत) ॥ १ ॥

अजा हिंकार इत्यादि पूर्ववत्। पशुषु प्रोताः ॥ १ ॥

सिद्धान्ती—अर्थ स्पष्ट आहे. 'पशू रेवती होत' अशी श्रुति आहे म्हणून रेवती पशूंमध्यें प्रतिष्ठित झाल्या आहेत ॥ १ ॥

## मंत्र दुसरा.

**स य एवमेता रेवत्यः पशुषु प्रोता वेद पशुमान्भवति सर्वमायुरेति ज्योग्जीवति महान्प्रजया पशुभिर्भवति महान्कीर्त्या पशून्न निन्देत्तद्व्रतम् ॥ २ ॥**

**इति द्वितीयाध्यायस्याष्टादशः खण्डः ॥ १८ ॥**

**अन्वय व अर्थः**—यः एवं (इत्यादि अन्वयार्थ साम आहेत) पशून् न निंदेत् (पशूंची निंदा करूं नये; हें व्रत आहे) ॥ २ ॥

पशून्न निन्देत्तद्व्रतम् ॥ २ ॥

इति द्वितीयाध्यायस्याष्टादशः खण्डः ॥ १८ ॥

सिद्धान्ती—या उपासकाला पशुनिंदा वर्ज्य आहे ॥ २ ॥

अठरावा खंड समाप्त.

# खंड एकोणीसावा.

## मंत्र पाहिला.

**लोम हिंकारस्त्वक्प्रस्तावो मांसमुद्गीथोऽस्थि प्रतिहारो मज्जा निधनमेतद्यज्ञायज्ञीयमङ्गेषु प्रोतम् ॥ १ ॥**

अन्वय व अर्थः—लोमः हिंकारः; त्वक् प्रस्तावः; मांसं उद्गीथः; अस्थि प्रतिहारः; मज्जा निधनं; एतत यज्ञायज्ञीयं अंगेषु प्रोतं ( लोम, त्वचा, मांस, अस्थि, मज्जा ह्या दृष्टींनीं हिंकार, प्रस्ताव, उद्गीथ, प्रतिहार आणि निधन यांची उपासना करावयाची ) लोम इत्यादि प्राण्यांचीं अंगें—धातु—असतात. या अंगांमध्यें यज्ञायज्ञीय साम प्रतिष्ठित झालें आहे ) ॥ १ ॥

लोम हिंकारो देहावयवानां प्राथम्यात् । त्वक्प्रस्ताव आनन्तर्यात् । मांसमुद्गीथः श्रैष्ठ्यात् । अस्थि प्रतिहारः प्रतिहृतत्वात् । मज्जा निधनमान्त्यात् । एतद्यज्ञायज्ञीयं नाम साम देहावयवेषु प्रोतम् ॥ १ ॥

सिद्धान्ती—लोम ( अंगावरील केश ) हे देहावयवामध्यें प्रथम म्हणून लोमदृष्टीनें हिंकारोपासना, नंतरच्या त्वग्दृष्टीनें प्रस्तावोपासना, श्रेष्ठ असणाऱ्या मांसदृष्टीनें उद्गीथोपासना, प्रतिहरण करणाऱ्या अस्थिदृष्टीनें प्रतिहारोपासना व सर्वांच्या शेवटीं असणारी जी मज्जा तिच्या दृष्टीनें निधनोपासना करावयाची. यज्ञायज्ञीय नामक साम हें देहाच्या लोमादि धातुघटित अवयवांत प्रतिष्ठित झालें असतें. 'रस हा यज्ञायज्ञीय आहे' ह्या श्रुतिप्रमाणानें अन्नरसविकार जे लोमादि त्यांच्यांमध्यें यज्ञायज्ञीय नामक साम प्रतिष्ठित झालें असतें. 'लोम हा हिंकार आहे' इत्यादि प्रकारची दृष्टि ठेवणें हें तात्पर्य आहे ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**स य एवमेतद्यज्ञायज्ञीयमङ्गेषु प्रोतं वेदाङ्गी भवति नाङ्गेन विहूर्छति सर्वमायुरेति ज्योग्जीवति महान्प्रजया पशुभिर्भवति महान्कीर्त्या संवत्सरं मज्ज्ञो नाश्नीयात्तद्व्रतं मज्ज्ञो नाश्नीयादिति वा ॥ २ ॥**

**इति द्वितीयाध्यायस्यैकोनविंशः खण्डः ॥ १९ ॥**

**अन्वय व अर्थः—यः एवं एतत् यज्ञायज्ञीयं अंगेषु प्रोतं वेद, सः अंगीभवति, अंगेन न विहूर्च्छति इत्यादि** ( अंगांमध्यें यज्ञायज्ञीय नामक साम प्रतिष्ठित झालें आहे, असा पहिल्या मंत्रांतील उपदेश जो जाणतो तो अंगी होतो. तो सकलांग संपूर्ण होतो. म्हणजे त्याचें कोणतेंही अंग वेडें वांकडें नसतें; इत्यादि. पुढील अर्थ स्पष्ट आहे ) **मज्ज्ञः न अश्नीयात्** ( व्रतस्थानें मांसें खाऊं नयेत ) **मज्ज्ञः न अश्नीयात् इति वा** ( त्यानें केव्हांही मांसाशन करूं नये ) ॥ २ ॥

अङ्गीभवति समग्राङ्गो भवतीत्यर्थो नाङ्गेन हस्तपादादिना विहूर्छति न कुटिलीभवति पङ्गुः कुणी वेत्यर्थः । संवत्सरं संवत्सरमात्रं । मज्ज्ञो मांसानि नाश्नीयात् न भक्षयेत् । बहुवचनं मत्स्योपलक्षणार्थम् । मज्ज्ञो नाश्नीयात्सर्वदैव नाश्नीयादिति वा, तद्व्रतम् ॥ २ ॥

इति द्वितीयाध्यायस्यैकोनविंशः खण्डः ॥ १९ ॥

**सिद्धान्ती**—ज्ञात्या यज्ञायज्ञीय उपासकाचें शरीर सर्वावयवसंपूर्ण होतें. त्याचे हस्तपादादि अवयव कोणत्याही तऱ्हेनें विकल किंवा कुटिल नसतात. तात्पर्य, तो पंगु नसतो किंवा श्मश्रुविहीन नसतो. विहूर्च्छे म्हणजे कुटिल असणें, वांकडें असणें, विकलांग असणें. कुणी म्हणजे श्मश्रुविहीन असणें. असो; व्रत हें कीं, एक वर्षभरपर्यंत त्यानें मांसभक्षण करतां उपयोगी नाहीं. मज्ज्ञ हा अनेकवचनी शब्द आहे आणि अनेकवचनामुळें तो मत्स्यांचाही अंतर्भाव करितो. अथवा श्रुति असेंही म्हणते कीं, उपासकानें केव्हांही मत्स्यमांस भक्षण करूं नये. हें व्रत आहे ॥ २ ॥

खंड एकोणीसावा समाप्त.

---

## खंड विसावा.

---

### मंत्र पहिला.

**अग्निर्हिंकारो वायुः प्रस्ताव आदित्य उद्गीथो नक्षत्राणि प्रतिहारश्चन्द्रमा निधनमेतद्राजनं देवतासु प्रोतम् ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—अग्निः हिंकारः; वायुः प्रस्तावः; आदित्यः उद्गीथः; नक्षत्राणि प्रतिहारः; चंद्रमाः निधनं; एतत् राजनं देवतासु प्रोतं** ( अग्नि, वायु, आदित्य, नक्षत्रें आणि चंद्रमा ह्या देवतांच्या दृष्टीनें ( अग्निप्रमुख देव हिंकारादि आहेत, अशी भावना ठेवून ) अनुक्रमें हिंकार, प्रस्ताव, उद्गीथ, प्रतिहार, निधन या सामभक्तींची उपासना करावी. हें **राजनसाम** देवतांमध्यें प्रतिष्ठित झालें आहे ) ॥ १ ॥

अग्निर्हिंकारः प्रथमस्थानत्वात् । वायुः प्रस्ताव आनन्तर्यसामान्यात् । आदित्य उद्गीथः श्रैष्ठयात् । नक्षत्राणि प्रतिहारः प्रतिहृतत्वात् । चन्द्रमा निधनं कर्मिणां तन्निधानात् । एतद्राजनं देवतानां दीप्तिमत्त्वात् ॥ १ ॥

सिद्धान्ती—देवतांत प्रथम अग्नि म्हणून तो हिंकार, अनंतर्यानें सम असणारा वायु प्रस्ताव, श्रेष्ठ असणारा आदित्य उद्गीथ, प्रतिहरण करणारीं नक्षत्रें प्रतिहार आणि कर्मठ लोक मरणानंतर जेथें जाऊन राहतात, निहित होतात, तो चंद्रमा निधन; अशा भावना ठेवून उपासना करणें इष्ट आहे. देवता दीप्तिमंत असतात. राजन् हें दीप्तिसूचक आहे; म्हणून देवतांमध्यें राजन् साम प्रकट झालेलें असतें, अशी भावना ठेवणें इष्ट आहे ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**स य एवमेतद्राजनं देवतासु प्रोतं वेदैतासामेव देवतानाꣳ सलोकताꣳ सार्ष्टिताꣳ सायुज्यं गच्छति सर्वमायुरेति ज्योग्जीवति महान्प्रजया पशुभिर्भवति महान्कीर्त्या; ब्राह्मणान्न निन्देत्तद्व्रतम् ॥ २ ॥**

**इति द्वितीयाध्यायस्य विंशः खण्डः ॥ २० ॥**

**अन्वय व अर्थः—यः एवं एतत् राजनं देवतासु प्रोतं वेद, सः एतासां एव देवतानां सलोकतां सार्ष्टितां सायुज्यं गच्छति** ( राजन्य साम देवतांमध्यें प्रतिष्ठित झालें आहे, असें जाणणारा उपासक ह्या देवतांच्या सलोकता, सार्ष्टिता आणि सायुज्यता प्राप्त करून घेतो. बाकीचा अर्थ पूर्ववत्. या उपासकाचें व्रत ) **ब्राह्मणान् न निंदेत** ( ब्राह्मणांची निंदा करूं नये असें आहे ) ॥ २ ॥

विद्वत्फलम्—एतासामेवाग्न्यादीनां देवतानां सलोकतां समानलोकतां सार्ष्टितां समानर्द्धित्वं सायुज्यं सयुग्भावमेकदेहदेहित्वमित्येतत्। वाशब्दोऽत्र लुप्तो द्रष्टव्यः। सलोकतां वेत्यादि। भावनाविशेषतः फलविशेषोपपत्तेः। गच्छति प्राप्नोति। समुच्चयानुपपत्तेश्च। ब्राह्मणान्न निन्देत्तद्व्रतम्। एते वै देवाः प्रत्यक्षं यद्ब्राह्मणा इति श्रुतेर्ब्राह्मणनिन्दा देवतानिन्दैवेति ॥ २ ॥

इति द्वितीयाध्यायस्य विंशः खण्डः ॥ २० ॥

**सिद्धान्ती**—शत्या उपासकाला जें फल मिळतें, तें येथें सांगितलें आहे. अग्न्यादि ज्या देवता आहेत, त्यांच्या लोकांत वास्तव्य म्हणजे सलोकता, त्यांच्यासारखें ऐश्वर्य म्हणजे सार्ष्टिता आणि त्यांच्यांशीं तादात्म्यस्थिति, सायुज्यता, हीं फलें प्राप्त होतात.

**पूर्वपक्षी**—हीं एकदम फलें मिळतात, नाहीं काय?

**सिद्धान्ती**—नाहीं. सलोकता अथवा सार्ष्टिता अथवा सायुज्यता असें कोणतें तरी एक फल मिळतें. येथें वा म्हणजे अथवा हा शब्द लुप्त आहे, असें समजावें.

**पूर्वपक्षी**—एकदम हीं सर्व फलें मिळतात, असेंच कां समजूं नये? पुनः मंत्रांत वा शब्दही नाहीं!

**सिद्धान्ती**—शब्द असो वा नसो; तो आहे असेंच समजलें पाहिजे. नाहींतर एका लोकींच वास्तव्य आणि एकात्मता हीं दोन फलें एकदम मिळतात, असें असंबद्ध बोलणें बोलल्याचा श्रुतीवर दोष येतो. शिवाय, हीं फलें समान योग्यतेचींही नाहींत. 'भावना असते तसें फल मिळतें.' विशेष भावनेला विशेष फल मिळालें पाहिजे. तेव्हां वा शब्द आहे, अशी कल्पना करून अर्थ केला पाहिजे. असो; या उपासकानें ब्राह्मणांची निंदा केव्हांही करूं नये.

**पूर्वपक्षी**—देवता दृष्टीचें ध्यान श्रुति सांगते; आणि ब्राह्मणाची निंदा करूं नका म्हणते! हा काय असंबद्ध प्रलाप?

**सिद्धान्ती**—थांबा. 'जे ब्राह्मण आहेत ते प्रत्यक्ष देव होत' अशी श्रुति आहे, तेव्हां ब्राह्मणाची निंदा केली नाहीं म्हणजे देवांची ही निंदा केली नाहीं असें होतें. ब्रह्म जाणणारे किंवा सार्थ वेदाध्ययन करून स्वधर्माप्रमाणें ज्ञानपूर्वक आचरण करणारे व करविणारे ते ब्राह्मण होत, हें सांगण्याची आवश्यकता नाहीं ॥ २ ॥

वीसावा खंड समाप्त.

---

# खण्ड एकविसावा.

## मंत्र पहिला.

**त्रयी विद्या हिंकारस्त्रय इमे लोकाः स प्रस्तावो-ऽग्निर्वायुरादित्यः स उद्गीथो नक्षत्राणि वयाꣳसि मरीचयः स प्रतिहारः सर्पा गन्धर्वाः पितरस्तन्नि-धनमेतत्साम सर्वस्मिन्प्रोतम् ॥ १ ॥**

अन्वय व अर्थः—त्रयी विद्या हिंकारः; त्रयः इमे लोकाः सः प्रस्तावः; अग्निः, वायुः, आदित्यः, सः उद्गीथः; नक्षत्राणि, वयांसि, मरीचयः सः प्रतिहारः; सर्पाः, गंधर्वा, पितरः तत् निधनं ( ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद ही वेदत्रयी हा **हिंकार**; भूलोक, भुवर्लोक आणि स्वर्लोक ही लोकत्रयी **प्रस्ताव**; अग्नि, वायु, आदित्य ही देवतात्रयी **उद्गीथ**; नक्षत्रें, वयांसि-पक्षी-आणि किरण **प्रतिहार**; सर्प, गंधर्व आणि पितर हें **निधन**; अशा दृष्टी ठेवून उपासना कर्तव्य आहे ) **एतत् साम सर्वस्मिन् प्रोतं** ( हें साम त्रयीविद्यादि सर्वांमध्यें प्रतिष्ठित झालें आहे) १॥

त्रयी विद्या हिंकारः । अग्न्यादिसाम्न आनन्तर्यं त्रयीविद्याया अग्न्यादिकार्यत्वश्रुतेः । हिंकारः प्राथम्यात्सर्वकर्तव्यानाम् । त्रय इमे लोकास्तत्कार्यत्वादनन्तरा इति प्रस्तावः । अग्न्यादीनामुद्गीथत्वं श्रैष्ठ्यात् । नक्षत्रादीनां प्रतिहृतत्वात्प्रतिहारत्वम् । सर्पादीनां धकार-सामान्यान्निधनत्वम् । एतत्साम नामविशेषाभावात्सामसमुदायः सामशब्दः सर्वस्मिन्प्रोतम् । त्रयीविद्यादि हि सर्वम् । त्रयीविद्या-दिदृष्ट्या हिंकारादिसामभक्तय उपास्याः । अतीतेष्वपि सामो-पासनेषु येषु येषु प्रोतं यद्यत्साम तद्दृष्ट्या तदुपास्यमिति । कर्माङ्गानां(णां) दृष्टिविशेष ( षे? ) णाज्यस्येव संस्कार्यत्वात् ॥ १ ॥

**सिद्धान्ती**—अग्न्यादि सामानंतर त्रयीविद्यादृष्टीनें उपासना विहित करण्या-साठीं या सामाचा अवतार श्रुतीनें केला, हें ठीकच आहे. त्रयीविद्या हे अग्नि-

प्रमुख देवतांचें कार्य आहे. 'ऋग्वेद अग्नीचा, यजुर्वेद वायूचा, सामवेद आदित्याचा' अशी श्रुति प्रमाण आहे. सर्व कर्तव्यांची प्रथमता विद्यात्रयीनें व्यापिलेली असते, म्हणून त्रयीविद्या **हिंकारत्व** पावते. वेदत्रयीच्या साह्यानें जें कर्म होतें त्यानें भूर्भुवादि लोक प्राप्त होतात. म्हणून ते **प्रस्ताव** झाले, हें ठीकच. प्रस्ताव हिंकाराच्या नंतर येतो. आणि भूर्भुवादि लोक ही वैदिक कर्मानंतर येतात. अग्निप्रमुख देव श्रेष्ठ म्हणून **उद्गीथत्व** पावतात. नक्षत्रादिकांचें प्रतिहरण होतें म्हणून ते **प्रतिहार** आणि सर्पादिकांमध्यें 'ध कार' सामान्य आहे म्हणून ते **निधन** पदवीला प्राप्त होतात. पितरांस स्वधा प्रिय म्हणून ध अक्षराची महती; गंधर्वांत ध आहेच; आणि सर्प धूत्कारप्रिय म्हणून तेथें धत्व आहेच. तात्पर्य, सर्वत्र 'ध' सामान्यत्व आहे.

**शिष्य**—या या दृष्टींनीं हिंकारादि सामावयवांची उपासना कर्तव्य आहे" हें झालें; पण या सामाचें नांव नाहीं सांगितलें आपण ?

**सिद्धान्ती**—याला विशेष नांवच नाहीं. म्हणून येथें साम शब्दाचा अर्थ सामसमुदाय करावयाचा. हा सामसमुदाय विद्यात्रयी, लोकत्रयी, इत्यादि सर्व त्रयींमध्यें प्रतिष्ठित झाला आहे. त्रयीविद्यादि दृष्टीनें हिंकारादि सामभक्तींची उपासना करावयाची आहे, हें तर तुला समजलेंच आहे. तुझ्या म्हणण्याचा मी अनुवाद करून जास्त इतकेंच सांगतों कीं, आतांपर्यंत ज्या सामोपासना सांगितल्या, त्यांत जेथें जेथें विशेष साम प्रतिष्ठित झालें आहे, असें सांगितलें; तेथें तेथें त्या त्या दृष्टीनें सामोपासना करावयाची आहे. दर्शपूर्णमासादिकांमध्यें पत्नीनें आज्य ( घृत ) पाहिलें म्हणजे तें त्या दृष्टिविशेषानें संस्कृत होतें. त्याप्रमाणें सामाचे जे प्रभेद आहेत, त्यांस विद्यात्रयीप्रमुख दृष्टिविशेषांचा संस्कार झाला, म्हणजे त्या त्या उपासना त्या त्या दृष्टींनीं संस्कृत होतात. तात्पर्य दृष्टिसंस्कार अवश्य हवा ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**स य एवमेतत्साम सर्वस्मिन्प्रोतं वेद सर्वꣳ ह भवति** ॥ २ ॥

**अन्वय व अर्थः—यः एतत् साम एवं सर्वस्मिन् प्रोतं वेद, सः सर्वं भवति ह** ( सर्वांमध्यें साम प्रतिष्ठित झालें आहे असें जो जाणतो, तो सर्वसामवेत्ता सर्व होतो म्हणजे सर्वेश्वर होतो ) ॥ २ ॥

सर्वविषयसामविदः फलं—सर्वं ह भवति सर्वेश्वरो भवतीत्यर्थः। निरुपचरितसर्वभावे हि दिक्स्थेभ्यो बलिप्राप्त्यनुपपत्तिः ॥२॥

सिद्धान्ती—सर्वादिपय सामवेत्ता सर्व होतो. सर्व म्हणजे सर्वेश्वर होतो.

पूर्व०—तो सर्वात्मा होतो असें म्हणा कीं? तुमच्या अद्वैताला तें इष्टच आहे.

सिद्धान्ती—तो निरुपाधिक सर्वात्मभाव त्याला प्राप्त होतो, असें म्हटलें तर चौथ्या मंत्रांत सांगितलेली बलिप्राप्ति व्यर्थ ठरेल. अद्वैताचा भाग अद्यापि पुष्कळ पुढें आहे. आपण सध्यां उपासना प्रकरणांत आहोंत ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**तदेष श्लोको यानि पञ्चधा त्रीणि त्रीणि तेभ्यो न ज्यायः परमन्यदस्ति ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थः—तत् एषः श्लोकः** ( याच अर्थाचा एक श्लोक आहे ) **यानि पंचधा त्रीणि त्रीणि; तेभ्यः अन्यत् परं ज्यायः न अस्ति** ( पांच प्रकारचीं जीं त्रिकें पहिल्या मंत्रांत सांगितलीं, त्यांपेक्षां मोठी आणि श्रेष्ठ अशी दुसरी वस्तु नाहीं ) ॥ ३ ॥

तदेतस्मिन्नर्थ एष श्लोको मन्त्रोऽप्यस्ति। यानि पञ्चधा पञ्चप्रकारेण हिंकारादिविभागैः प्रोक्तानि त्रीणि त्रीणि त्रयीविद्यादीनि तेभ्यः पञ्चत्रिकेभ्यो ज्यायो महत्तरं परं च व्यतिरिक्तमन्यद्वस्त्वन्तरं नास्ति न विद्यत इत्यर्थः। तत्रैव हि सर्वस्यान्तर्भावः ॥ ३ ॥

सिद्धान्ती—याच अर्थाचा एक श्लोक म्हणजे मंत्र आहे. तो असा–पांच प्रकारचीं जीं त्रिकें सांगितलीं, त्यांपेक्षां—

शिष्यः—पहिल्या मंत्रांत सांगितलेलीं ऋग्वेदादि हीं पांच त्रिकें होत? तसेंच, हिंकार, प्रस्तावादि सामाच्या पांच भक्ती होत; होय ना?

सिद्धान्ती—होय. पहिल्या मंत्रांत पांच प्रकारचीं त्रिकें म्हणजे वेदत्रयी, लोकत्रयी देवत्रयी, इत्यादि सांगितलीं. त्यांच्यांपेक्षां ज्यायः म्हणजे जास्त मोठी आणि पर म्हणजे जास्त श्रेष्ठ अशी दुसरी वस्तुच नाहीं. कारण वेद, देव, लोक, इत्यादिकांमध्यें सर्वांचा अंतर्भाव होतो.

शिष्य--पर याचा अर्थ अन्यत् असा केला तर?

सिद्धान्ती—प्रत्यवाय नाहीं. मंत्रांतील पर आणि अन्यत् हे दोन शब्द एकार्थक आहेत; असें तुझ्या अर्थानें म्हणावें लागेल ॥ ३ ॥

---

**मंत्र चवथा.**

**यस्तद्वेद स वेद सर्वं सर्वा दिशो बलिमस्मै हरन्ति सर्वमस्मीत्युपासीत तद्व्रतं तद्व्रतम् ॥ ४ ॥**

**इति द्वितीयाध्यायस्यैकविंशः खण्डः ॥ २१ ॥**

**अन्वय व अर्थः—यः तत् वेद, सः सर्वं वेद** (ज्याला या सर्वात्मक सामाचें ज्ञान झालें तो सर्वज्ञ होतो) **अस्मै सर्वाः दिशः बलिं हरंति** (याच्यासाठीं सर्व दिशा बली—सर्व प्रकारचे भोग—आणून देतात) **सर्वं अस्मि इति उपासीत** ('मी सर्व आहें' अशी दृष्टि ठेवून सामोपासना करावी) **तत् व्रतं तत् व्रतं** (सामोपासकांचें हें व्रत आहे) ॥४॥

यस्तद्यथोक्तं सर्वात्मकं साम वेद स वेद सर्वं स सर्वज्ञो भवतीत्यर्थः। सर्वा दिशः सर्वदिक्स्था अस्मा एवंविदे बलिं भोगं हरन्ति प्रापयन्तीत्यर्थः। सर्वमस्मि भवामीत्येवमेतत्सामोपासीत तस्यैतदेव व्रतम्। द्विरुक्तिः सामोपासनसमाप्त्यर्था ॥ ४ ॥

इति द्वितीयाध्यायस्यैकविंशः खण्डः ॥ २१ ॥

सिद्धान्ती—आपण आतांपर्यंत जें व जसें सर्वात्मक सामाचें वर्णन केलें, तें व तसें स्वरूपतः ज्याला समजलें, तो सर्वज्ञ होतो. सर्व दिशा म्हणजे सर्व ठिकाणीं राहणारे प्राणी, देवता किंवा भूतें या ज्ञानी उपासकासाठीं आपआपल्या जवळ असणारे भोग आणून देतात. तो सर्व—स्वामी होतो आणि सर्वसंपन्न होतो. मात्र 'मी हें सर्व आहें' अशी दृष्टि ठेवून सर्वात्मक सामाचीं ज्ञानपूर्वक उपासना करणें हें व्रत उपासकानें अखंड चालविलें पाहिजे. म्हणजे तो सर्वज्ञ, सर्वस्वामी आणि सर्वसंपन्न होतो. मंत्रांत तद्व्रतं या पदांची द्विरुक्ति आहे, ती सामोपासना येथें संपली; हें सुचविते ॥ ४ ॥

खंड एकविसावा समाप्त.

---

# खंड बाविसावा.

## मंत्र पहिला.

**विनर्दि साम्नो वृणे पशव्यमित्यग्नेरुद्गीथोऽनिरुक्तः प्रजापतेर्निरुक्तः सोमस्य मृदु श्लक्ष्णं वायोः श्लक्ष्णं बलवदिन्द्रस्य क्रौञ्चं बृहस्पतेरपध्वान्तं वरुणस्य तान्सर्वानेवोपसेवेत वारुणं त्वेव वर्जयेत् ॥१॥**

अन्वय व अर्थः—'साम्नः पशव्यं विनर्दि वृणे' इति अग्नेः उद्गीथः ('सामसंबंधी पशुहितकारी गाणें मी प्रार्थनापूर्वक स्वीकारितों.' हें अग्नीचें उद्गीथ म्हणजे गाणें आहे) अनिरुक्तः प्रजापतेः (प्रजापतीचें—प्रजापत्यर्थ—अनिरुक्त गाणें गाऊन मी प्रार्थना करितों) सोमस्य निरुक्तः-मृदु (सोमाप्रीत्यर्थ स्पष्ट मृदु गाणें गाऊन त्याची प्रार्थना करितों) वायोः मृदु श्लक्ष्णं (वायूप्रीत्यर्थ श्लक्ष्ण गाणें गाऊन त्याची प्रार्थना करितों) इंद्रस्य श्लक्ष्णं बलवत् (इंद्राप्रीत्यर्थ श्लक्ष्ण, सुकुमार आणि तेजस्वी गाणें गातों) बृहस्पतेः क्रौंचं (क्रौंचपक्ष्यासारखा स्वर काढून बृहस्पतीला प्रसन्न करितों) वरुणस्य अपध्वान्तं (वरुणाला बेसुर गाणें गाऊन प्रसन्न करितों) तान् सर्वान् एव उपसेवेत (ह्या सर्व गायन-प्रकारांचा उपयोग करावा) वारुणं तु एव वर्जयेत् (मात्र वारुण-गायन वर्ज करावें. येथें निरनिळ्या देवतांस आवडणारे स्वर निर्देशिले आहेत) १

सामोपासनप्रसङ्गेन गानविशेषादिसंपदुद्गातुरुपदिश्यते । फलविशेषसंबन्धात् । विनर्दि विशिष्टो नर्दः स्वरविशेष ऋषभकूजितसमोऽस्यास्तीति विनर्दि गानमिति वाक्यशेषः । तच्च साम्नः संबन्धि, पशुभ्यो हितं पशव्यमग्नेरग्निदेवत्यं चोद्गीथ उद्गानम् । तदहमेवंविशिष्टं वृणे प्रार्थय इति कश्चिद्यजमान उद्गाता वा मन्यते । अनिरुक्तोऽमुकसम इत्यविशेषितः प्रजापतेः प्रजापतिदेवत्यः स गानविशेषः । आनिरुक्त्यात्प्रजापतेर्निरुक्तः स्पष्टः । सोमस्य सोम-

देवत्यः स उद्गीथ इत्यर्थः । मृदु श्लक्ष्णं च गानं वायोर्वायुदेवत्यं तत् । श्लक्ष्णं बलवच्च प्रयत्नत्वाधिक्योपेतं चेन्द्रस्यैन्द्रं तद्गानम् । क्रौंचं क्रौञ्चपक्षिनिनादसमं बृहस्पतेर्बार्हस्पत्यं तत् । अपध्वान्तं भिन्नकांस्यस्वरसमं वरुणस्यैतद्गानम् । तान्सर्वानेवोपसेवेत प्रयुञ्जीत वारुणं त्वेवैकं वर्जयेत् ॥ १ ॥

**सिद्धान्तीः**—सामोपासनेचा प्रसंग आहे. म्हणून गान, स्वर इत्यादि साधनसंपत्ति कशी असावी व श्रद्धेनें मिळवावी, याचा उद्गात्याला श्रुति उपदेश करीत आहे. कारण, गानविशेषाचें फल विशेष असतें. असो; विनर्दि म्हणजे विशिष्ट आहे नर्द म्हणजे ऋषभकूजितासारखा स्वरविशेष ज्याचा—

**शिष्य**—ऋषभ म्हणजे बलीवर्द ? त्याच्या हंबरण्यासारखा स्वरविशेष असतो, तो नर्द; तात्पर्य, विनर्दि म्हणजे गायनांतील 'ऋखब' स्वर ?

**सिद्धान्तीः**—ठीक. सामसंबंधी हा ऋषभ पश्यव्य म्हणजे पशुसंबंधी (पशुहितकारी) आहे, असें श्रुति म्हणते. याचें दैवत अग्नि हें आहे. अग्निदेवतेला प्रिय असणाऱ्या पशुहितकारी ऋषभविशिष्ट गाण्याची मी प्रार्थना करितों. 'अग्नीला प्रिय असणारें गाणें मला यावें' असें मी म्हणतों.

**शिष्यः**—मी म्हणजे ?

**सिद्धान्ती**—कोणी यजमान किंवा उद्गाता. तो म्हणतो कीं, अग्नीस प्रसन्न करणारें ऋषभविशिष्ट उद्गान मला मिळावें, अशी मी प्रार्थना करितों. तात्पर्य अग्निदेवतेचें उद्गीथ ऋषभांत म्हणावयाचें असतें. ऋषभाचा अभ्यास करून यजमानानें अग्न्युद्गीथ म्हणावें. पुढें; ज्या गाण्याची देवता प्रजापति आहे. त्या गाण्यांतील स्वर जेथें अविशिष्ट असतात, तें अनिरुक्त गाणें मला प्राप्त व्हावें, अशी मी प्रार्थना करितों.

**शिष्यः**—गाणें अनिरुक्त कां ?

**सिद्धान्तीः**—कारण, प्रजापतीचें स्वरूपच अविशिष्ट आहे. अमुक प्रकारचा तो आहे असें सांगतां येत नाहीं. त्याचप्रमाणें त्याला प्रिय असणारा स्वर कोणता हेंही सांगतां येत नाहीं. असो; निरुक्त म्हणजे स्पष्ट. या मृदु गाण्याची देवता सोम आहे. वायुदेवतेला प्रिय असणारें गाणें मृदु आणि सुकुमार असतें. इंद्राला प्रिय असणारें गाणें सुकुमार असून पुनः बलवान् म्हणजे अधिक प्रयत्न लागणारें असतें. क्रौंच पक्ष्याच्या निनादाप्रमाणें ज्याचा स्वर असतो, तें क्रौंच गायनच (हा स्वर) बृहस्पतीला प्रिय आहे. आणि काशाचे फुटक्या भांड्याला जो बेसुर स्वर असतो, तद्घटित अपध्वांत गाणें वरुणाला प्रिय आहे. असो; वारु-

णाचा स्वीकार न करितां बाकी सर्व स्वरांचें संपादन करून अग्नि, प्रजापति, सोम, इंद्र, बृहस्पति, या देवांस प्रसन्न करावें; म्हणजे विशेष फल प्राप्त होईल ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**अमृतत्वं देवेभ्य आगायानीत्यागायेत्स्वधां पितृभ्य आशां मनुष्येभ्यस्तृणोदकं पशुभ्यः स्वर्गं लोकं यजमानायान्नमात्मन आगायानीत्येतानि मनसा ध्यायन्नप्रमत्तः स्तुवीत ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः—देवेभ्यः अमृतत्वं आगायानि, इति आगायेत्** ( देवांस गायनाच्या योगें अमृतत्व प्राप्त करून देईन, असा निश्चय करून गायन करावें ) **पितृभ्यः स्वधाम्, मनुष्येभ्यः आशां, पशुभ्यः तृणोदकं, यजमानाय स्वर्गं लोकं, आत्मने अन्नं आगायानि** ( पितरांस स्वधा, मनुष्यांस आशा, पशूंस तृणोदक, यजमानाला स्वर्गलोक, स्वतःला अन्न, मी गाण्यानें प्राप्त करून देईन ) **मनसा एतानि ध्यायन् अप्रमत्तः स्तुवीत** ( याचें मनानें चिंतन करित होत्साता उपासकानें अप्रमत्त राहून स्तुति करावी ) ॥ २ ॥

अमृतत्वं देवेभ्य आगायानि साधयानि । स्वधां पितृभ्य आगायान्याशां मनुष्येभ्य आशां प्रार्थनां प्रार्थितमित्येतत् । तृणोदकं पशुभ्यः स्वर्गं लोकं यजमानायान्नमात्मने मह्यमागायानीत्येतानि मनसा चिन्तयन्ध्यायन्नप्रमत्तः स्वरोष्मव्यञ्जनादिभ्यः स्तुवीत ॥ २ ॥

**सिद्धान्ती**—"मी आपल्या गानसामर्थ्यानें देवांस अमृतत्व, पितरांस स्वधा, मनुष्याला इष्टप्राप्ति, पशूंस तृणोदक ( चारा, पाणी ), यजमानाला स्वर्गलोक व मी आपल्या स्वतःला अन्न, प्राप्त करून देईन" असें या सर्व अमृतत्वादिकांचें ध्यान करित किंवा चिंतन करित होत्साता उपासकानें ( उद्गात्यानें ) या सर्वांचें स्तवन करावें. स्वतः आपण अप्रमत्त राहिलें पाहिजे.

**शिष्य**—अप्रमत्त म्हणजे? कोणताही प्रमाद होऊं न देणारा तो अप्रमत्त?

**सिद्धान्ती**—होय. स्वर, ऊष्म, इत्यादि साधनांनीं यांची ध्यानपूर्वक प्रार्थना करावी. स्वर, ऊष्म हें काय आहे, हें आतांच समजेल ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**सर्वे स्वरा इन्द्रस्याऽऽत्मानः सर्व ऊष्माणः प्रजापतेरात्मानः सर्वे स्पर्शा मृत्योरात्मानस्तं यदि स्वरेषूपालभेतेन्द्रꣳ शरणं प्रपन्नोऽभूवं स त्वा प्रति वक्ष्यतीत्येनं ब्रूयात् ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थः—सर्वे स्वराः इंद्रस्य आत्मानः; सर्वे उष्माणः प्रजापतेः आत्मानः; सर्वे स्पर्शाः मृत्योः आत्मानः** ( सर्व स्वर इंद्राचे आत्मे म्हणजे देहावयव आहेत. सर्व ऊष्म ( शषादि ) व्यंजनें प्रजापतीचे आणि सर्व स्पर्श ( कखादि ) व्यंजनें मृत्यूचे देहावयव आहेत ) **यदि तं स्वरेषु उपालभेत 'इंद्र शरणं प्रपन्नः अभूवं, सः त्वा प्रति वक्ष्यति' इति एनं ब्रूयात्** ( 'स्वराचे ठिकाणीं तूं भ्रष्ट झाला आहेस, दुष्ट स्वराचा उपयोग केलास' असें जर कोणी ज्ञात्या व अप्रमत्त उपासकाला म्हटलें, तर 'मी इंद्राला शरण गेलों आहें, तो इंद्र ह्यासंबंधानें काय सांगावयाचें तें तुला सांगेल; असें उद्गान-गात्यानें निंदकांस सांगावें ) ॥ ३ ॥

सर्वे स्वरा अकारादय इन्द्रस्य बलकर्मणः प्राणस्याऽऽत्मानो देहावयवस्थानीयाः। सर्व ऊष्माणः शषसहादयः प्रजापतेर्विराजः कश्यपस्य वाऽऽत्मानः। सर्वे स्पर्शाः कादयो व्यञ्जनानि मृत्योरात्मानस्तमेवंविदमुद्गातारं यदि कश्चित्स्वरेषूपालभेत स्वरस्त्वया दुष्टः प्रयुक्त इत्येवमुपालब्ध इन्द्रं प्राणमीश्वरं शरणमाश्रयं प्रपन्नोऽभूवं स्वरान्प्रयुञ्जानोऽहं स इन्द्रो यत्तव वक्तव्यं त्वा त्वां प्रति वक्ष्यति स एव देव उत्तरं दास्यतीत्येनं ब्रूयात् ॥ ३ ॥

सिद्धान्ती—अकारादि ( अ, आ, इ, ई, इत्यादि ) सर्व स्वर, इंद्राचे देहावयवच जणूं कांहीं असतात. इंद्र हा बलकर्मा आहे. बलाचीं कामें उठविणें हें काम इंद्राचें किंवा प्राणाचें असतें; म्हणून अआदि स्वर प्राणाचे (इंद्राचें) अवयव होत. सर्व ऊष्म ( श, ष, स, ह ) प्रजापतीचे म्हणजे विराट्—रूपाचे किंवा कश्यपाचे अवयव असतात. कपासून मपर्यंतचीं सर्व व्यंजनें ( यांलाच स्पर्श म्हणतात )

हे मृत्यूचे अवयव असतात. उद्गात्याला हें सर्व ज्ञान अवश्य आहे. आतां 'तुझा स्वर दुष्ट आहे, दुष्ट स्वरांचा तूं प्रयोग केला आहेस' अशी जर कोणीं ज्ञात्या व अप्रमत्त उद्गात्याची अवास्तव निंदा केली, तर 'मीं इंद्राचा म्हणजे प्राणाचा अथवा सर्वसमर्थ ईश्वराचा आश्रय केला आहे. मी स्वरांचा प्रयोग केवळ इंद्र-प्रेरणेनें करीत आहें. तेव्हां स्वरासंबंधानें तुला काय उत्तर द्यावयाचें, तें तो इंद्र-देव तुला देईल; मला कांहीं उत्तर द्यावयाचें नाहीं.' असें ज्ञानी उद्गात्यानें उत्तर द्यावें ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा.

**अथ यद्येनमूष्मसूपालभेत प्रजापतिꣳ शरणं प्रपन्नोऽभूवं स त्वा प्रति पेक्ष्यतीत्येनं ब्रूयादथ यद्येनꣳ स्पर्शेषूपालभेत मृत्युꣳ शरणं प्रपन्नोऽभूवं स त्वा प्रति धक्ष्यतीत्येनं ब्रूयात् ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थः—अथ यदि एनं ऊष्मसु उपालभेत, 'प्रजापतिं शरणं प्रपन्नः अभूवं; सः त्वा प्रति पेक्ष्यति' इति एनं ब्रूयात्** ( पुनः जर कोणीं उष्मासंबंधानें मागच्यासारखीच निंदा केली तर 'मी प्रजापति–दास आहें, तो तुला पेक्षणाची शिक्षा देईल असें त्या निंदकाला उत्तर द्यावें ) **अथ** ( आणि ) **यदि एनं स्पर्शेषु उपालभेत 'मृत्युं शरणं प्रपन्नः अभूवं, सः त्वा प्रति धक्ष्यति' इति एनं ब्रूयात्** ( जर कोणीं व्यंजनासंबंधें तशीच तक्रार केली, तर 'मी मृत्यूचा दास आहें, तुझ्या या अवास्तव निंदेबद्दल दहनाची शिक्षा करावयाची ती तो मृत्यु तुला करील.' असें निंदकास उत्तर द्यावें ॥ ४ ॥

अथ यद्येनमूष्मसु तथैवोपालभेत प्रजापतिं शरणं प्रपन्नोऽभूवं स त्वा प्रति पेक्ष्यति संचूर्णयिष्यतीत्येनं ब्रूयात् । अथ यद्येनं स्पर्शेषूपालभेत मृत्युं शरणं प्रपन्नोऽभूवं स त्वा प्रति धक्ष्यति भस्मीकरिष्यतीत्येनं ब्रूयात् ॥ ४ ॥

**सिद्धान्ती**—सामान्य अभिप्राय तर स्पष्ट आहे शादि ऊष्मांचा ( श ष स ह यांचा ) बरोबर उच्चार करीत असतांही जर ज्ञात्या आणि दक्ष उद्गात्याची कोणीं अवास्तव

निंदा केली, तर ‘ मी प्रजापतीला शरण गेलेलों आहें, तो तुला या तुझ्या अयथार्थ निंदेसाठीं पेक्षणाची शिक्षा देईल, तुला ठेंचून आणि कुट्टन नाहींसा करील’ असें त्या निंदकाला उत्तर द्यावें आणि व्यंजनासंबंधें जर कोणीं अशीच अवास्तव निंदा केली तर ‘ माझा स्वामी मृत्यु आहे, त्याच्या प्रेरणेनुसार मी व्यंजनोच्चार करीत आहें. तुला काय उत्तर द्यावयाचें, तें मृत्यूकडे काम आहे; तुझ्या या अवास्तव निंदेबद्दल तुझें तो दहन करून टाकील, ’ असें प्रत्युत्तर करावें ॥ ४॥

---

## मंत्र पांचवा.

**सर्वे स्वरा घोषवन्तो बलवन्तो वक्तव्या इन्द्रे बलं ददानीति सर्व ऊष्माणोऽग्रस्ता अनिरस्ता विवृता वक्तव्याः प्रजापतेरात्मानं परिददानीति सर्वे स्पर्शा लेशेनानभिनिहिता वक्तव्या मृत्योरात्मानं परिहराणीति ॥ ५ ॥**

**इति द्वितीयाध्यायस्य द्वाविंशः खण्डः ॥२२॥**

**अन्वय व अर्थः—‘ इंद्र बलं ददानि ’ इति सर्वे स्वराः घोषवंतः बलवंतः वक्तव्याः**(‘ इंद्राचे ठिकाणीं मी बलाची स्थापना करीन ’ असें चिंतन करून सर्व स्वरांचा उच्चार घोषपूर्ण आणि बलपूर्ण करावा ) **‘ प्रजापतेःआत्मानं परिददानि ’ इति सर्वे ऊष्माणः अग्रस्ताः अनिरस्ताः विवृताः वक्तव्याः** ( ‘ प्रजापतीचा आत्मा मी त्याला देत आहें, असें ध्यान करून आपलें सर्व ऊष्म—श ष स ह - यांचा उच्चार अग्रस्त आणि विवृत असा करावा )-आणि-**मृत्योः आत्मानं अहं परिहराणि इति सर्वे स्पर्शाः लेशेन अनभिनिहिताः वक्तव्याः** ( मृत्यूचा आत्मा मृत्यूला परत देतों ’ असें ध्यान करित सर्व व्यंजनांचा उच्चार स्पष्ट आणि निरनिराळा करावा ) ॥ ५ ॥

यत इन्द्राद्यात्मानः स्वरादयोऽतः सर्वे स्वरा घोषवन्तो बलवन्तो वक्तव्याः। तथाऽहमिन्द्रे बलं ददानि बलमादधानीति। तथा सर्वे ऊष्माणोऽग्रस्ता अन्तरप्रवेशिता अनिरस्ता बहिरप्रक्षिप्ता

विवृता विवृतप्रयत्नोपेताः प्रजापतेरात्मानं परिददानि प्रयच्छानीति । सर्वे स्पर्शा लेशेन शनकैरनभिनिहिता अनभिनिक्षिप्ता वक्तव्या मृत्योरात्मानं बालानिव शनकैः परिहरद्भिर्मृत्योरात्मानं परिहराणीति ॥ ५ ॥

इति द्वितीयाध्यायस्य द्वाविंशः खण्डः ॥ २२ ॥

सिद्धान्ती—स्वरादि वस्तुतः इंद्रादिकांचे आत्मे, देहावयव आहेत. तेव्हां प्रथमतः स्वरांचा उच्चार करावयाचा तो घोषवान् पूर्ण (ज्याचा देह मोठा आहे असा भरल्या आवाजानें ) आणि बलवान् असावा. उच्चार करतांना असें ध्यान असावें कीं, माझ्या स्वरोच्चारानें मीं इंद्रालाच पुष्ट आणि बलिष्ठ करीत आहें. तसेंच, शषसहांचा उच्चार करितांना त्यांचा स्वामी जो प्रजापति त्याला प्रसन्न करावयाचें आहे. असें हें ध्यानांत ठेवून या अक्षरांचे उच्चार नाभीपासून निघून तेथेंच दडणार नाहींत व तीं अक्षरें बाहेर येऊन नाहींशीं झालीं, असें होऊं नये; आणि तो उच्चार मोकळ्या प्रयत्नानें झालेला असावा. तात्पर्य, तोंडांतल्या तोंडांत उच्चार होऊं नये, हा अग्रस्ताचा अर्थ. अक्षरें झरझर फेंकून दिलीं असा उच्चार तो निरस्त. त्याचा अभाव तो अनिरस्त आणि विवृत्त म्हणजे स्पष्ट होय. तसेंच व्यंजनांपैकीं कोणाचाही उच्चार इवलासासुद्धां अस्पष्ट झाला आहे, असें होऊं नये. आपण अतिशय जलद बोलावयाला लागलों म्हणजे एक वर्ण दुसऱ्यांत घुसतो व अस्पष्ट होतो, तसा प्रकार होऊं नये. प्रत्येक व्यंजनाचा उच्चार स्पष्ट आणि मोकळा व्हावा, हें मृत्यूला प्रिय आहे. जलांत पडलेलें बालक जसें आपण हळूहळू काढितों, त्याप्रमाणें मृत्यूचा आत्मा जीं व्यंजनें तीं म्यां जपून घेऊन संभाळून बाहेर काढलीं पाहिजेत, असें ध्यान ठेवून व्यंजनांचा प्रयोग करावा ॥ ५ ॥

बाविसावा खंड समाप्त.

---

## खण्ड तेविसावा.

### मंत्र पहिला.

**त्रयो धर्मस्कन्धा यज्ञोऽध्ययनं दानमिति प्रथमस्तप एव द्वितीयो ब्रह्मचार्याचार्यकुलवासी तृतीयोऽत्यन्तमात्मानमाचार्यकुलेऽवसादयन्सर्व एते पुण्यलोका भवन्ति ब्रह्मसꣳस्थोऽमृतत्वमेति ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—त्रयः धर्मस्कंधाः** ( धर्मस्कंध किंवा धर्मविभाग तीन आहेत ) **यज्ञः, अध्ययनं, दानं इति प्रथमः** ( यज्ञ, अध्ययन आणि दान, हा प्रथम म्हणजे एक स्कंध आहे. ) **तपः एव द्वितीयः** (तप हाच दुसरा स्कंध होय ) **अत्यन्तं आत्मानं आचार्यकुले अवसादयन् आचार्य-कुलवासी ब्रह्मचारी तृतीयः** ( आपल्या स्वतःला आचार्य-कुलामध्यें एकनिष्ठेनें ठेवून गुरूच्या आश्रमांत राहणारा ब्रह्मचारी हा तिसरा धर्मस्कंध आहे ) **एते सर्वे पुण्यलोका भवंति** ( हे सर्व पुण्यलोक आहेत ) **ब्रह्मसंस्थः अमृतत्वं एति** ( परंतु ब्रह्मामध्यें राहणारा अमृतत्व पावतो ) तात्पर्य, यज्ञाध्ययनादिकांचें अनुष्ठान करणारे गृहस्थ, तप करणारे तपस्वी आणि नैष्ठिक ब्रह्मचारी, हे तीन पुण्यलोक म्हणजे तीन धर्मस्कंध अथवा आश्रम आहेत. ब्रह्मसंस्थ पुरुष अमृतत्व प्राप्त करून घेतो ) ॥१॥

ओंकारस्योपासनविध्यर्थं त्रयो धर्मस्कन्धा इत्याद्यारभ्यते । नैवं मन्तव्यं सामावयवभूतस्यैवोद्गीथादिलक्षणस्योंकारस्योपासनात्फलं प्राप्यत इति । किं तर्हि यत्सर्वैरपि सामोपासनैः कर्मभिश्चाप्राप्यं तत्फलममृतत्वं केवलादोंकारोपासनात्प्राप्यत इति । तत्स्तुत्यर्थं सामप्रकरणे तदुपन्यासः । त्रयस्त्रिसंख्याका धर्मस्य स्कन्धा धर्मस्कन्धा धर्मप्रविभागा इत्यर्थः । के त इत्याह—यज्ञोऽग्निहोत्रादिः । अध्ययनं सनियमस्य ऋगादेरभ्यासः । दानं बहिर्वेदि यथाशक्तिद्रव्यसंविभागो भिक्षमाणेभ्यः । इत्येष प्रथमो धर्मस्कन्धः । गृहस्थसमवेतत्वात्तन्निर्वर्तकेन गृहस्थेन निर्दिश्यते प्रथम एक इत्यर्थो द्वितीयतृतीयश्रवणान्नाऽऽद्यार्थः । तप एव द्वितीयस्तप इति कृच्छ्रचान्द्रायणादि तद्वांस्तापसः परिव्राड्वा; न ब्रह्मसंस्थ आश्रमधर्ममात्रसंस्थो ब्रह्मसंस्थस्य त्वमृतत्वश्रवणात् । द्वितीयो धर्मस्कन्धः । ब्रह्मचार्याचार्यकुले वस्तुं शीलमस्येत्याचार्यकुलवासी । अत्यन्तं यावज्जीवमात्मानं नियमैराचार्यकुलेऽवसादयन्क्षपयन्देहं तृतीयो धर्मस्कन्धः । अत्यन्तमित्यादिविशेषणान्नैष्ठिक इति गम्यते । उपकुर्वाणस्य स्वाध्यायग्रहणार्थत्वान्न पुण्यलोकत्वं ब्रह्मचर्येण । सर्व एते त्रयोऽप्याश्रमिणो यथोक्तैर्धर्मैः

पुण्यलोका भवन्ति । पुण्यो लोको येषां; इमे पुण्यलोका आश्रमिणो भवन्ति । सोऽमृतत्वं पुण्यलोकविलक्षणममरणभावमात्यन्तिकमेति नाऽऽपेक्षिकं देवाद्यमृतत्ववत् । पुण्यलोकात्पृथगमृतत्वस्य विभागकरणात् ।

**सिद्धान्तीः**—या खंडांत ओंकाराची उपासना सांगण्यासाठीं 'तीन धर्मस्कंध आहेत.' ह्या मंत्राला सुरवात केली आहे. तात्पर्य स्वतंत्र ओंकारोपासनेचा विषय येथें अवतारावयाचा आहे.

**पूर्वपक्षीः**—मागें पुष्कळ वेळ उद्गीथलक्षणात्मक ओंकाराची उपासना फलांसह सांगितली आहे. आतां ही स्वतंत्र उपासना सांगणें म्हणजे कालाचा आणि बुद्धीचा अपव्यय करणें आहे. मागची उपासनाच उत्कृष्ट फल देणारी आहे.

**सिद्धान्ती**—असें नाहीं. असें समजूं नका कीं, सामाचा अवयव असणारा जो उद्गीथ तेंच आहे लक्षण ज्या ओंकाराचें त्याची मात्र उपासना केली, सामावयव असणाऱ्या उद्गीथलक्षणात्मक ओंकाराचीच उपासना केली म्हणजे फलप्राप्ति होते.

**पूर्व०**—मग समजावयाचें तरी काय ?

**सिद्धान्तीः**—असें समजा, कीं सर्व सामोपासनांनीं आणि कर्मांनीं जें अमृतत्त्व नामक फल मिळत नाहीं, तें फल केवळ म्हणजे स्वतंत्र ओंकाराच्या उपासनेनें मात्र मिळत असतें. त्याची ( स्वतंत्र ओंकाराच्या उपासनेची ) स्तुति करण्यासाठीं येथें ( या सामप्रकरणांत ) ओंकारोपासनेचा उपन्यास केला आहे.

**शिष्य**—तो कसा ?

**सिद्धान्ती**—धर्माचें तीन स्कंध म्हणजे तीन प्रविभाग आहेत. ते कोणते विचारशील, तर एकः-यज्ञ, अध्ययन आणि दान हा एक विभाग आहे. अग्निहोत्रादि कर्म म्हणजे यज्ञ होय. नियमांसह ऋग्वेदादिकांचा अभ्यास करणें याचें नांव अध्ययन आहे. स्वीकरण, विचार, जप, अध्यापन आणि आवृत्ति, असा पांच प्रकारचा अभ्यास असतो. नियमपूर्वक हा अभ्यास करावा.

**शिष्य**—नियम कोणते ?

**सिद्धान्ती**—'पूर्वेकडे तोंड करून अध्ययन करावें' इत्यादि प्रकारचे नियम ठरलेले आहेत. असो; वेदीच्या बाहेर राहून यथाशक्ति याचकब्राह्मणास जें द्रव्य देतात, तें दान होय.

**शिष्य**—वेदीच्या बाहेर कां ?

**सिद्धान्ती**—वेदीवर बसून जें दान करितात, तें यज्ञांगत्वानें होतें. म्हणून त्याचें निराळें फल मिळत नाहीं. याप्रमाणें पहिल्या स्कंधांत यज्ञ, अध्ययन आणि दान यांचा अंतर्भाव होतो. हीं तिन्ही कर्में गृहस्थांकडून मात्र केलीं जातात, गृहस्थांचें विद्यमानत्व यज्ञादिकांत, अध्ययनांत व दानांत अवश्य असतें, म्हणून हा धर्मस्कंध गृहस्थात्मा आहे, गृहस्थांकरितां मात्र सांगितलेला आहे, असें ठरतें. गृहस्थ म्हणजे गृह करून राहणारा. ब्रह्मचारी किंवा वानप्रस्थ नव्हे तो. हा एक धर्मस्कंध झाला—

**पूर्वपक्षी**—मंत्रांत प्रथम शब्द आहे. प्रथम याचा अर्थ पहिला, आदि, असा असतो.

**सिद्धान्ती**-आम्हीं आतांच सांगितले कीं, प्रथम याचा अर्थ पहिला असा नव्हे. द्वितीय, तृतीय हे शब्द पुढे मंत्रांत आहेत, म्हणून यज्ञादि हा एक धर्मस्कंध, तपादि दुसरा धर्मस्कंध, असेच अर्थ केले पाहिजेत. पहिला असा अर्थ करितां येत नाहीं. कारण, गृहस्थाचा आश्रम पहिला नाहीं. ब्रह्मचाऱ्याचा आश्रम पहिला आहे. यज्ञ, दानादिकाचें अनुष्ठान गृहस्थांकडूनच होतें, म्हणून प्रथम याचा अर्थ, ब्रह्मचर्याचा आश्रम दाखविणारा पहिला असा अर्थ न घेतां तीन स्कंधांतील एक असाच घेतला पाहिजे. असो; तप हा आणखी एक धर्मस्कंध आहे. कृच्छ्र, चांद्रायणादि तपश्चर्या करणारा तपस्वी किंवा वानप्रस्थ यांच्या आश्रमाचा तपानें उल्लेख होतो.

**शिष्य**—परिव्राजक असाही अर्थ घ्यावा काय ?

**सिद्धान्ती**—घ्यावा. मात्र तो परिव्राजक ब्रह्मसंस्थ नाहीं, असें समजावें. मूळ मंत्र जर पुनः वाचशील, तर आश्रमधर्मानें चालणाऱ्या शिष्टांचा मात्र येथें म्हणजे या तिन्ही स्कंधांत अंतर्भाव केला आहे, असें तुला दिसेल. शिवाय, मूळ मंत्र असेंही सांगतो, कीं जो ब्रह्मसंस्थ आहे, तो अमृतत्व पावतो. ब्रह्मसंस्थ हा अत्याश्रमी असतो.

**शिष्य**—ब्रह्मसंस्थ म्हणजे काय ?

**सिद्धान्ती**—याचा अर्थ तिसऱ्या स्कंधाचें स्पष्टीकरण झाल्यानंतर सांगतों. असो; तिसरा आश्रम ब्रह्मचाऱ्यांचा आहे. यावज्जीव आचार्यासंनिध श्रुति स्मृति-प्रणीत नियमानें राहून आपला देह झिजविणारा आणि आचार्यकुलांत ( गुरुगृहीं ) राहण्याचें व राहण्यासारखें शील असणारा, तो ब्रह्मचारी होय. 'अत्यंत' हें व दुसरीं विशेषणें ब्रह्मचाऱ्याचें नैष्ठिकत्व दाखवितात. तात्पर्य नैष्ठिक ब्रह्मचारीपणा ( नैष्ठिकब्रह्मचर्य ) हा तिसरा धर्मस्कंध आहे.

**शिष्य**—यांतच 'उपकुर्वाणाचा' अंतर्भाव व्हावा. ब्रह्मचर्य संपवून गृहस्थाश्रम स्वीकारावयाचा संकल्प करणारा जो स्नातक तो उपकुर्वाण होय.

**सिद्धान्तीः**—पण, याला पुण्यलोकत्व प्राप्त होत नाहीं. यानें केवळ स्वाध्यायाचें मात्र ग्रहण केलेलें असतें. केवळ स्वाध्यायानें पुण्यलोक मिळतो, असें नाहीं. याप्रमाण यज्ञ, अध्ययन आणि दान इत्यादि कर्मे शास्त्रोक्तपद्धतीनें करणारे ते गृहस्थ, चांद्रायणादि व्रतें करणारे **वानप्रस्थ** व **नैष्ठिक ब्रह्मचारी**, तात्पर्य या तिन्ही आश्रमांत राहणारे व आश्रमांतील कर्मे यथासांग करणारे शिष्ट **पुण्यलोक** होतात.

**शिष्यः**—पुण्यलोक म्हणजे ?

**सिद्धान्ती**—ज्यांचें वास्तव्य पुण्यात्मक आहे आणि ज्यांना पुढें सुखकारी स्वर्गादिकांमध्यें राहावयास सांपडतें, ते पुण्यलोक होत. तिन्ही आश्रमांतील **धर्माचरण करणारे लोक पुण्यलोकच होत.** आतां, यापुढें एकच आश्रम सांगावयाचा राहिला. पण या आश्रमावर श्रुतिस्मृत्यादिकांची सत्ता नाहीं बरें! केवळ सामान्य लोकांच्या समजुतीसाठीं यांस **चतुर्थाश्रमी** म्हटलें आहे. असो; चतुर्थाश्रमांमध्यें राहणारा परमहंस परिव्राजक सदा सर्वदा उत्कृष्ट–रीतीनें ब्रह्मामध्यें राहिलेला असतो. तो आत्मक्रीड आणि आत्माराम असतो. म्हणून त्याला ब्रह्मसंस्थ म्हणतात. अशा ब्रह्मसंस्थाला अमृतत्वाची प्राप्ति होते.

**शिष्य**—आतां समजलों ब्रह्मसंस्थ म्हणजे काय तें. भगवन्, अमृतत्व म्हणजे मरणाचा अभाव. तेंच अविनाशित्व. हें अमृतत्व पुण्यलोकविलक्षण आहे. कां तर हे अमृतत्व देवादिकांच्या अमरत्वाप्रमाणें सापेक्ष नसतें. देव अमर खरे; पण प्रलयकालीं ते मरतात! त्यांचा नाश होतो. पण या ब्रह्मसंस्थाच्या अमरत्वाचा नाश केव्हांही होत नाहीं. त्याचें अमृतत्व निरक्षेप आहे.

**पूर्वपक्षी**—कोठून काढतां तुम्ही इतका सगळा अर्थ ?

**सिद्धान्ती**—अहो! श्रुतीनेंच अमृतत्वाला पुण्यलोकांकडून वेगळें काढिलें आहेना! तिन्ही आश्रम पुण्यलोक आहेत, असें श्रुति सांगते आणि नंतर ब्रह्मसंस्थ म्हणजे परमहंस आत्यंतिक म्हणजे परमावधीचा अमरत्वभाक् होतो, असें म्हणते. यावरून हें अमरत्व पुण्यलोकविलक्षण आहे, निरपेक्ष आहे, असेंच ठरतें.

**यदि च पुण्यलोकातिशयमात्रममृतत्वमभविष्यत्ततः पुण्यलोकत्वाद्विभक्तं नावक्ष्यत् । विभक्तोपदेशाच्चाऽऽत्यन्तिकममृतत्वमिति गम्यते । अत्र चाऽऽश्रमधर्मफलोपन्यासः प्रणवसेवास्तुत्यर्थं न तत्फलविध्यर्थम् । स्तुतये च प्रणवसेवाया आश्रमधर्मफलविधये चेति हि भिद्येत वाक्यम् । तस्मात्स्मृतिसिद्धाश्रमफलानुवादेन प्रणवसेवाफलममृतत्वं ब्रुवन्प्रणवसेवां स्तौति । यथा पूर्णवर्मणः सेवा भक्तपरिधानमात्रफला राजवर्मणस्तु सेवा राज्यतुल्यफलेति**

तद्वत् । प्रणवश्च तत्सत्यं परं ब्रह्म । तत्प्रतीकत्वात् । एतद्ध्येवाक्षरं परमित्याद्याम्नायात्काठके युक्तं तत्सेवातोऽमृतत्वम् ।

**पूर्वपक्षी**—पुण्यलोकांहून तें अमृतत्व जास्त पुण्यकर आहे, असें म्हणावें असलें तर ?

**सिद्धान्ती**—तुमचें हें म्हणणें श्रुतीला मान्य असतें, तर तिनें पुण्यलोकत्वाचा एक विभाग आणि अमरत्वाचा दुसरा विभाग, असे दोन विभाग केलेच नसते. विभाग केले आहेत, त्यावरून ब्रह्मसंस्थाचें अमरत्व आत्यंतिक आहे, केवल आहे, अमर्याद आहे, असेंच म्हटलें पाहिजे. परब्रह्माचा साक्षात्कार होतां क्षणीं जें केवल अमृतत्व मिळतें, तें प्रणवाची उपासना ब्रह्मदृष्टीनें करणाऱ्या उपासकालाही मिळत नाहीं. या उपासकाला क्रममुक्तीच्या मार्गानें जावें लागतें. तेव्हां आश्रमांत राहून देहाभिमानानें कर्म करणाऱ्या गृहस्थाला किंवा ब्रह्मचाऱ्याला किंवा वानप्रस्थाला हें परमामृत मिळण्याची कथाच संपली. तात्पर्य आश्रमधर्म फलांत व ब्रह्मज्ञानजन्य अमृतत्वांत मुळींच साम्य नाहीं. यांत 'तरतमभावच' नाहीं. समजलांत ?

**शिष्य**—भगवन्, येथें ब्रह्मचर्यादि आश्रमांत यथासांग धर्मकर्में केलीं म्हणजे पुण्यशील जीवाला पुण्यलोक–प्राप्ति होते; हें सांगण्यासाठींच या मंत्राचा अवतार दिसतो.

**सिद्धान्ती**—नाहीं. श्रुतीला येथें फल सांगावयाचें नाहीं किंवा निंदाही करावयाची नाहीं. तर प्रणवसेवेची स्तुति करावयाची आहे. तूं म्हणतोस, तसा अर्थ असता तर (१) प्रणवाच्या स्तुतीकरितां आणि (२) आश्रमधर्मांचें फल स्मृतिपुराणोक्त शब्दांनीं सांगण्यासाठीं, असा अर्थभेद होऊन वाक्यभेद झाला असता. तसा वाक्यभेद तर नाहीं. म्हणून अर्थभेदही नाहीं. तात्पर्य, आश्रमधर्मफल सांगण्याकरितां हा उपन्यास आहे, असें समजूं नको. तर स्मृतीनें सिद्ध केलेल्या आश्रमांचे फलांचा अनुवाद मात्र करून प्रणवसेवेचें फल क्रममार्गानें अमृतत्वपदाला पोहोंचविणारें आहे, असें सांगतां सांगतां ती प्रणवसेवेची स्तुति करीत आहे, असें ठरतें, हें समजून घे. मुख्य विषय प्रणवसेवेची स्तुति हा आहे. आश्रमधर्मांची फलसिद्धि हा नव्हे. आश्रमधर्मानें मिळणारें फल प्रणवसेवेनें मिळणाऱ्या फलापेक्षां अत्यंत कमी योग्यतेचें आहे, असें सांगणें म्हणजेच प्रणवसेवेची स्तुति करणें होय. एखाद्या लढाऊ वीराची सेवा केली असतां, फार तर त्या वीराच्या अंगावरचें वस्त्रपात्र किंवा अन्नपाण्याची सोय प्राप्त करून देईल. पण एखाद्या राजाची सेवा केली असतां राज्यतुल्य फल मिळेल. त्याचप्रमाणें आश्रमसेवा केली, तर उत्तम फल मिळेल; पण प्रणवसेवा केली, तर ब्रह्मामध्यें असणारें सुखरूपत्वच क्रमशः प्राप्त होईल, हें श्रुतीला सांगावयाचें आहे. प्रणव हा परब्रह्माचें

प्रतीक आहे. ब्रह्म सत्यरूप आहे. तसेंच, ' हें ब्रह्म अक्षर आहे, ' ' हें ब्रह्म पर आहे ' इत्यादि काठक उपनिषदांतील श्रुति येथें प्रमाण आहे. या सत्यरूप परब्रह्माची किंवा परब्रह्मप्रतीक जो ओंकार त्याची परब्रह्मदृष्टीनें सेवा एकनिष्ठपणें केली असतां उपासकाला क्रमशः अमृतत्वप्राप्ति झालीच पाहिजे.

अत्राऽऽहुः केचिच्चतुर्णामाश्रमिणामविशेषेण स्वकर्मानुष्ठानात्पुण्यलोकतेहोक्ता ज्ञानवर्जितानां, सर्वे एते पुण्यलोका भवन्तीति । नात्र परिव्राडवशेषितः । परिव्राजकस्यापि ज्ञानं यमा नियमाश्च तप एवेति । 'तप एव द्वितीय' इत्यत्र तपःशब्देन परिव्राट्तापसौ गृहीतौ । अतस्तेषामेव चतुर्णां यो ब्रह्मसंस्थः प्रणवसेवकः सोऽमृतत्वमेतीति । चतुर्णामधिकृतत्वाविशेषात् । ब्रह्मसंस्थत्वेऽप्रतिषेधाच्च । स्वकर्मच्छिद्रे च ब्रह्मसंस्थतायां सामर्थ्योपपत्तेः । न च यववराहादिशब्दवद्ब्रह्मसंस्थशब्दः परिव्राजके रूढः । ब्रह्मणि संस्थितिनिमित्तमुपादाय प्रवृत्तत्वात् । न हि रूढिशब्दा निमित्तमुपाददते । सर्वेषां च ब्रह्मणि स्थितिरुपपद्यते । यत्र यत्र निमित्तमस्ति ब्रह्मणि संस्थितिस्तस्य तस्य निमित्तवतो वाचकं सन्तं ब्रह्मसंस्थशब्दं परिव्राडेकविषये संकोचे कारणाभावान्निरोद्धुमयुक्तम् ।

**पूर्वपक्षी**—या उपनिषदावर वार्तिकें लिहिणारे वृत्तिकार म्हणतात आणि मलाही तसेंच वाटतें कीं, चारी आश्रमांत राहणारे ज्ञानशून्य लोकही स्वकर्मांचें अनुष्ठान करीत असतील, तर त्या सर्वांस सामान्यत्वानें पुण्यलोक मिळाला पाहिजे. किंवा पुण्यलोक मिळावा. ' हे सर्वजण पुण्यलोक होतात ' असें श्रुति म्हणते, त्यावरून हेंच सिद्ध होतें. ज्ञानाचा येथें संबंधच नाहीं. कोणत्याही आश्रमांतील पुरुष ज्ञानी असो वा नसो, तो स्वकर्मांचें अनुष्ठान करीत असला म्हणजे त्याला पुण्यलोकप्राप्ति होते; म्हणून येथें परिव्राजकांस वेगळें काढण्याची आवश्यकता नाहीं. कोणताही पक्षपात न होतां सर्वजण पुण्यलोक होतात. परिव्राजकाचा जर उच्चारच श्रुति करीत नाहीं, तर त्याला वेगळें तरी कसें काढावयाचें !

**शिष्य**—परिव्राजकाचें वाचकपदच नाहीं. म्हणून तर आम्हीं त्यास वेगळा काढतों.

**पूर्वपक्षी**—वाचकपद नसेल, पण ज्ञान, यम, नियम, इत्यादि चतुर्थाश्रमांतील साधनें तर सांगितलीं आहेत ना ? त्यावरून परिव्राजकाचा अंतर्भाव तीन धर्मस्कंधांत होतो, असे ठरलें पाहिजे. शिवाय, द्वितीयस्कंधांत 'तपः' शब्दानें परिव्राट् आणि तापसी यांचें ग्रहण होतेंच.

**शिष्य**—हें सर्व नीट म्हणजे तुम्ही म्हणतां तसें झालें असतें. पण श्रुतीनें ' ब्रह्मसंस्थ अमरत्वप्राप्ति करून घेतो ' असें म्हटलें आहे. त्याचा योग्य विचार न करणें हा दोष तुमच्या स्पष्टीकरणामध्यें उत्पन्न होतो.

**पूर्वपक्षी**—म्हणूनच आम्हीं म्हणतों कीं या चारी आश्रमांत राहणाऱ्यांपैकीं ब्रह्मचारी, गृहस्थ, इत्यादि कोणीही ब्रह्मसंस्थ असतो, म्हणजे प्रणवाचा सेवक असतो, त्याला अमृतत्वप्राप्ति होते, असा श्रुत्यर्थ आहे. येथें भेदाभेद करण्याचें कारणच नाहीं. प्रणवसेवा करण्याचा सगळ्यांना अधिकार आहे. सर्वांना सामान्यत्वानें प्रणवोपदेश केला आहे. " ब्रह्मसंस्थ अमक्यानेंच व्हावें, प्रणवसेवा अमक्यानेंच करावी, तमक्यानें करूं नये," असा किंवा ' ब्रह्मसंस्थ हा आश्रम-धर्माला वश नाहीं.' असा प्रतिषेधही केलेला नाहीं.

**शिष्य**—परंतु तिन्ही आश्रमांला पुरून उरणारीं कर्में सांगितली आहेत. तीं करितां करितां सर्व वेळ निघून जातो व सर्व आश्रम कर्मव्यापृत होतात. प्रणवसेवेला या आश्रमांत अवसरच मिळत नाहीं व सामर्थ्यही राहात नाहीं. पण परिव्राजकाला मात्र आश्रमकर्माचें बंधन नसतें. म्हणून त्याला प्रणवसेवा सौकर्यानें करितां येते.

**पूर्वपक्षी**—स्वकर्म करूनही पुष्कळ वेळ मनुष्याला असतो. तेव्हां तुमचें म्हणणें आम्हांस मान्य होत नाहीं. तात्पर्य कोणच्याही आश्रमांत प्रणवसेवा करितां येण्यासारखी आहे.

**शिष्य**—'यव' 'वराह' इत्यादि रूढार्थी शब्दाप्रमाणें 'ब्रह्मसंस्थ' या शब्दाचा अर्थ परिव्राजक-अर्थानें रूढ आहे. तेव्हां ब्रह्मसंस्थाला दुसऱ्या कोणत्याही आश्रमांत घालतां येत नाहीं.

**पूर्वपक्षी**—असें नाहीं. परिव्राजक हा त्यांचा **रूढार्थ** नव्हे ' ब्रह्मामध्यें जो संस्थित झाला तो ब्रह्मसंस्थ होय.' ब्रह्मामध्यें संस्थिति असणें, हें **निमित्त** आहे. म्हणून शब्दाचा अर्थही या निमित्ताच्या अनुरोधानें होतो. रूढ शब्दांना निमित्ताची आवश्यकताच नसते. येथें निमित्त आहे म्हणून आपल्यास रूढार्थ घेतां येत नाहीं व ब्रह्मसंस्थाचा अर्थ परिव्राजकच असेंही ठरवितां येत नाहीं.

**शिष्य**—नैमित्तिक अर्थ कां होईना, पण तें निमित्तसुद्धां परिव्राजकामध्येंच दिसतें तेवढें ! आणि ब्रह्मसंस्थ म्हणजे परिव्राजक इतकाच अर्थ होतो.

**पूर्वपक्षी**—असें कां ? ब्रह्मामध्यें कोणालाही स्थिति प्राप्त करून घेतां येईल ?

**शिष्य**—पंकज या शब्दाचा अर्थ निमित्तजन्य आहे. (पंकामध्यें जन्म पावतें, ते पंकज होय) पंकज=कमल. म्हणून इंदीवर नामक कमलाला कांहीं पंकज शब्द आपण लावीत नाहीं, तामरसाला मात्र लावितों. त्याप्रमाणें यद्यपि ब्रह्मसंस्थशब्द निमित्तवर्ती आहे ( सहेतुक आहे ) तथापि तो परिव्राजकास मात्र लावितां येतो,

गृहस्थादिकांस लावितां येत नाहीं. कारण परिव्राजक मात्र ब्रह्मसंस्थ असतात आणि गृहस्थादि नसतात.

पूर्वपक्षी—हा कुठला तुमचा स्वकपोलकल्पित आकस्मिक नियम? आमचें तर म्हणणें आहे कीं, ब्रह्मामध्यें संस्थिति हें निमित्त जेथें जेथें विद्यमान असतें, त्या त्या निमित्तवंत पुरुषाला 'ब्रह्मसंस्थ' हा शब्द लावितां आला पाहिजे. एका परिव्राजकाच्याच ठिकाणीं या शब्दाचे वाच्यत्वाचा निरोध करण्याचें काहीं एक कारण नाहीं. तुमचा संकोच निष्कारण आहे.

**न च पारिव्राज्याश्रमधर्ममात्रेणामृतत्वम्। ज्ञानानर्थक्यप्रसङ्गात्। पारिव्राज्यधर्मयुक्तमेव ज्ञानममृतत्वसाधनमिति चेन्न। आश्रमधर्मत्वाविशेषात्। धर्मो वा ज्ञानविशिष्टोऽमृतत्वसाधनमित्येतदपि सर्वाश्रमधर्माणामविशिष्टम्। न च वचनमस्ति परिव्राजकस्यैव ब्रह्मसंस्थस्य मोक्षो नान्येषामिति। ज्ञानान्मोक्ष इति च सर्वोपनिषदां सिद्धान्तः। तस्माद्य एव ब्रह्मसंस्थः स्वाश्रमविहितकर्मवतां सोऽमृतत्वमेतीति।**

पूर्वपक्षी—बरें. 'परिव्राजकाच्या आश्रमाचे धर्ममात्र यथास्थित पाळले, म्हणजे अमृतत्व मिळतें' असें तुमच्या रूढार्थसाह्यानें तुम्ही म्हणाल, तर तेंही योग्य नाहीं. कारण मग ज्ञान व्यर्थ होईल. ज्ञानानें मात्र मोक्ष मिळतो.' हें वाक्य बाधित होईल.

दुसरा शिष्य—पारिव्राज्यधर्मांच्या मात्र अनुष्ठानासह ज्ञान असलें, सारांश ज्ञानकर्मांचा समुच्चय झाला, म्हणजे अमृतत्व मिळतें.

पूर्व०—असें कसें म्हणतां येईल? 'धर्मांचें अनुष्ठान म्हणजे पारिव्राज्यधर्मांचेंच काय तें अनुष्ठान' असें नाहीं. गृहस्थानेंही स्वधर्मानुष्ठान करून ज्ञान मिळविलें, तर त्यालासुद्धां तुमच्याच पद्धतीनें अमृतत्व मिळालें पाहिजे. धर्मविशिष्ट ज्ञान असो किंवा ज्ञानविशिष्ट धर्मानुष्ठान असो, कोणत्याहि आश्रमाला हें ज्ञान व ही प्रणवसेवा सामान्य आहे. परिव्राट्-धर्मांचाच हा विशेष आहे, असें नाहीं. हा युक्तिपक्ष. शिवाय असेंही कोठें श्रुति-वचन नाहीं कीं, 'परिव्राजक ब्रह्मसंस्थ असेल तर त्याला मात्र मोक्ष मिळेल. दुसऱ्या आश्रमांतील प्रणवसेवकाला मोक्ष मिळणार नाहीं.' उलट, 'ज्ञानानें मोक्ष मिळतो' हा सर्व वेदांतांचा सिद्धांत आहे. म्हणून आमचा तर निश्चय असा ठरतो कीं, आपल्या आश्रमांस विहित असणारी कर्में यथाशास्त्र करणारे तिन्ही आश्रमांतील शिष्टांपैकीं जो कोणी ज्ञानी प्रणवसेवा करितो, त्याला अमृतत्व प्राप्त होतें. याप्रमाणें परिव्राजकत्वाचा एक आश्रम आहे असें व प्रणवसेवेनें कोणालाही मोक्ष मिळतो असें ठरलें.

न। कर्मनिमित्तविद्याप्रत्यययोर्विरोधात्। कर्त्रादिकारकक्रियाफलभेदप्रत्ययवत्त्वं हि निमित्तमुपादायेदं कुर्विदं मा कार्षीरिति कर्मविधयः प्रवृत्ताः। तच्च निमित्तं न शास्त्रकृतम्। सर्वप्राणिषु दर्शनात्। सदेकमेवाद्वितीयमात्मैवेदं सर्वं ब्रह्मैवेदं सर्वमितिशास्त्रजन्यः प्रत्ययो विद्यारूपः स्वाभाविकं क्रियाकारकफलभेदप्रत्ययं कर्मविधिनिमित्तमनुपमृद्य न जायते। भेदाभेदप्रत्यययोर्विरोधात्। न हि तैमिरिकद्विचन्द्रादिभेदप्रत्ययमनुपमृद्य तिमिरापगमे चन्द्राद्येकत्वप्रत्यय उपजायते। विद्याविद्याप्रत्यययोर्विरोधात्। तत्रैवं सतियं भेदप्रत्ययमुपादाय कर्मविधयः प्रवृत्ताः स यस्योपमर्दितः सदेकमेवाद्वितीयं, तत् सत्यं, विकारभेदोऽनृतमि, त्येतद्वाक्यप्रमाणजनितेनैकत्वप्रत्ययेन स सर्वकर्मभ्यो निवृत्तो; निमित्तनिवृत्तेः। स च निवृत्तकर्मा ब्रह्मसंस्थ उच्यते, स च परिव्राडेवान्यस्यासंभवात्।

**सिद्धान्ती**—हें तुमचें म्हणणें श्रुतीला विरुद्ध आहे. 'कर्मनिमित्तप्रत्यय आणि विद्याप्रत्यय यांच्यामध्यें अत्यंत विरोध आहे.' या सिद्धांताचा उद्धोष श्रुतिप्रणीत अद्वैत-वेदान्त नित्य करीत आहे, हें विसरतां कसें! कितीवेळ ह्याच संबंधानें पुनः तेंच तेंच आम्हीं बोलावें? कर्ता, कर्म, करण इत्यादि कारणांमुळें क्रियेचें निमित्तकारण हातांशीं घेऊन 'हें कर, तें करूं नको' असे सांगण्यामध्यें सर्व कर्मशास्त्रें प्रवृत्त झालीं आहेत ना! बरें, हीं निमित्तें शास्त्रकृत आहेत, असें म्हणावें तर तेंही नाहीं. सर्व प्राण्यांमध्यें 'मला हें हवें' 'मला तें हवें' 'हें माझें आहे' 'तें माझें आहे,' 'हा मी' 'तो मी नव्हें' इत्यादि प्रकारची **वासना** आणि **अभिमान** हीं निमित्तें नित्य दृष्टीस पडतात. तात्पर्य, हीं निमित्तें स्वाभाविक आहेत; आणि स्वभावसिद्ध अज्ञानानें उत्पन्न झालीं आहेत. हें अज्ञान अथवा निमित्तजन्य ज्ञान (परतंत्री अनुभव) एकीकडे आणि 'सत् एकच असून अद्वितीय आहे.' 'हें सर्व आत्मस्वरूप आहे' 'हें सर्व ब्रह्म आहे' हा वेदांतशास्त्रजन्य स्वतंत्र व स्वयंभू प्रत्यय भलतीकडे! म्हणून यांच्यामध्यें तीव्र आणि दारुण विरोध आहे. शिवाय हा जो विद्यारूप प्रत्यय आहे, तो स्वाभाविक क्रियाकारकफलभेद प्रत्ययाचा—

**शिष्य**—विधिनिषेध सांगणारें कर्मशास्त्र हेंच निमित्त आहे ज्याचें, त्या क्रियाकारकफलभेद-प्रत्ययाचा विनाश केल्याशिवाय विद्या किंवा ज्ञान हीं उत्पन्न होत नाहींत.

**सिद्धान्ती**—तात्पर्य, विद्या आणि अविद्या, भेदप्रत्यय आणि अभेदप्रत्यय यांचा तीव्र विरोध आहे, हें तुम्हां आम्हांस आतां तरी समजलें पाहिजे. 'सर्व

एक आहे ' असे श्रुतिप्रणीत वेदांत म्हणतो. ' सर्वत्र भेद आहे ' असें व्यवहारांत व धर्मशास्त्रांत दिसतें. भेदज्ञान अज्ञानजन्य आहे, म्हणून भेददर्शी व्यवहार अज्ञानात्मक आहे. परमार्थ हा ज्ञानात्मक आहे, म्हणून तेथें भेद नाहीं. असें हें ज्ञान आणि अज्ञान यांच्यामध्यें अत्यंत वैलक्षण्य आहे.

**शिष्य**—उदाहरणार्थ; नेत्रदोष असतांना दोन चंद्र दिसतात. हें अयथार्थ दिसणें अथवा त्याचें कारण नेत्र-दोष हीं दोन्हीं नष्ट झाल्याशिवाय चंद्र एकच आहे, असा प्रत्यय यावयाचा नाहीं.

**सिद्धान्ती**—म्हणजे विद्येचा प्रत्यय आणि अविद्येचा प्रत्यय यांत भयंकर तीव्र विरोध आहे. असें आहे म्हणून विद्याकर्मांचा समुच्चय होणें अशक्य आहे. अर्थात् जो भेदप्रत्यय गृहीत करून धार्मिक कर्मविधी प्रवृत्त होतात, तो भेदभाव ज्याचा नाहींसा झाला, ' एकच सद्वस्तु आहे, ' ' तीच सत्यवस्तु आहे, ' विकारभेद मिथ्या आहेत ' इत्यादि महा-वाक्यांच्या प्रामाण्यानें एकत्वप्रत्ययाचा निश्चय ज्याचा झाला व ज्याला अनुभव तसा आला, तो सर्व भेदांपासून म्हणजे सर्व व्यावहारिक व धार्मिक कर्मांपासून निवृत्त होतो. आश्रमधर्मांतील विहित कर्मांच्या चक्रांतून त्याची सुटका होते. अर्थात् असल्या ब्रह्मसंस्थाला आश्रम नसतो.

**शिष्य**—कारण कर्मोत्पादक जो भेदप्रत्यय, कर्माला उत्पन्न करणारी जी भेदभावना, तीच ज्ञानानें नष्ट झाल्यावर कर्मप्रवृत्ति होणें शक्य नाहीं. ज्ञानानें कर्म संपलें कीं आश्रमही संपला आणि वासना व अभिमान नष्ट झाला कीं कर्म संपलें!

**सिद्धान्ती**—ठीक. असा जो कर्मनिवृत्त झालेला पुरुष, त्यालाच **'ब्रह्मसंस्था'** असें म्हणावयाचें. तो **' परिव्राजकच '** असला पाहिजे. इतरांला ( कर्मप्रवृत्तीच्या पुरुषांला ) ' ब्रह्मसंस्थ ' किंवा ' परिव्राजक ' असें म्हणतां येत नाहीं.

**पूर्वपक्षी**—कां बरें ?

**अन्यो ह्यनिवृत्तभेदप्रत्ययः सोऽन्यत्पश्यञ्शृण्वन्मन्वानो विजानन्निदं कृत्वेदं प्राप्नुयामिति हि मन्यते । तस्यैवं कुर्वतो न ब्रह्मसंस्थता । वाचारम्भणमात्रविकारानृताभिसंधिप्रत्ययत्वात् । न चासत्यमित्युपमर्दिते भेदप्रत्यये सत्यमिदमनेन कर्तव्यं मयेति प्रमाणप्रमेयबुद्धिरुपपद्यते । आकाश इव तलमलबुद्धिर्विवेकिनः । उपमर्दितेऽपि भेदप्रत्यये कर्मभ्यो न निवर्तते चेत्प्रागिव भेदप्रत्ययोपमर्दनादेकत्वप्रत्ययविधायकं वाक्यमप्रमाणीकृतं स्यात् । अभक्ष्यभक्षणादिप्रतिषेधवाक्यानां प्रामाण्यवद्युक्तमेकात्मवाक्यस्यापि प्रामाण्यम् । सर्वोपनिषदां तत्परत्वात् ।**

सिद्धान्ती—ज्यांचा भेदप्रत्यय नाहींसा झाला नाहीं, ते ब्रह्मसंस्थ पुरुष नव्हेत. त्यांस भेद दिसतो, भेद ऐकावयास येतो, त्यांचें चिंतन भेदात्मक असतें, त्यांची बुद्धि भेदमूलक असते. 'मी ब्राह्मण आहें,' 'मदितर ब्राह्मण नाहींत,' 'मी हें कार्य करीन,' 'मी तें फल मिळवीन' इत्यादि प्रकारच्या मनोवृत्तींचा–अज्ञानाचा–दास भेददर्शी पुरुष असतो. अशा परतंत्री पुरुषाला स्वतंत्र ब्रह्मसंस्थता कशी प्राप्त होणार ? जें केवळ नामरूपात्मक मात्र आहे, जें विकारी आहे, जें असत्य आहे, त्याच्याविषयीं अभिमान बाळगण्याचा किंवा तद्विषयक चिंतन करण्याचा, तें सत्य आहे असें म्हणण्याचा अभिनिवेश जो धारण करितो, याला अभेदात्मक ब्रह्मसंस्थता कशी प्राप्त होणार ?

पूर्वपक्षी—ब्रह्मवेत्ता जरी असला, तथापि पूर्वसंस्कारांमुळें 'द्वैत हेंच सत्य आहे' या अभिमानानें तोही कर्मप्रवृत्त होतोच. मग असल्या कार्यकारी ब्रह्मवेत्त्याला तरी 'ब्रह्मसंस्थ' हें नांव कसें मिळणार ?

सिद्धान्ती—असें होणें नाहीं. 'हें सर्व असत्य आहे' 'भेद तेथून अनृत आहे' अशा प्रकारचें ज्ञान झाल्यामुळें ज्याचा भेदप्रत्यय विनष्ट झाला, त्याच्या ठिकाणीं 'हें द्वैत सत्य आहे' 'मला अमुक कृत्य केलें पाहिजे' अशा प्रकारची प्रमाणबुद्धि किंवा प्रमेयबुद्धि उपपन्नच होत नाहीं. शहाणा पुरुष कधीं तरी 'आकाशाला तळ (बूड) आहे,' 'आकाश मलीन आहे' असें परमार्थतः म्हणेल काय ? हें दिसणारें द्वैत आभासरूप आहे, असें निश्चित ज्ञान झालें म्हणजे ही एकत्वबुद्धि केव्हांही कर्मप्रेरणा करण्याला समर्थ नसते. भेददर्शी बुद्धि संपली म्हणजे भेदजन्य कर्म संपतें. आतां भेदप्रत्ययाचें उपमर्दन झाल्यावर (तें विनष्ट झाल्यावरही) जर कर्मनिवृत्ति झाली नाहीं, तो 'ज्ञानी' पुरुष कर्मापासून निवृत्त झाला नाहीं, तर भेदप्रत्ययाचें उपमर्दन होण्यापूर्वी 'एकत्व प्रणीत करणारें महावाक्य जसें अप्रमाण वाटत होतें, तसेंच आतांही अप्रमाण आहे' असें म्हटलें पाहिजे कीं काय ? नाहीं, असें नाहीं.

शिष्य—नाहीं समजलें ?

सिद्धान्ती—'कलंजाचें भक्षण करूं नये'—

शिष्य—कलंज म्हणजे मांस किंवा तंबाकु ? दोन्ही अर्थ ठीक आहेत ना ?

सिद्धान्ती—होय. हें शास्त्र यद्यपि कलंजभक्षकाच्या पूर्व अनुभवांविरुद्ध असतें; तथापि तें तेव्हां व सर्वदा प्रमाणच असतें. अहो ! कलंजभक्षकाचा पूर्वानुभव रागादि दोषांनीं दूषित असतो, म्हणून निषेधकशास्त्र अप्रमाण ठरत नाहीं. त्याप्रमाणेंच येथेंही सर्व भेदप्रत्यय अविद्येपासून उत्पन्न झालेले असतात. अद्वैतशास्त्र भेदांचा निरोध करितें; म्हणून तें अज्ञानभंजकज्ञान व्यवहारकाळीं व मागाहून प्रमाण

मानावें लागतें. तेव्हां ज्ञानी पुरुषानें कर्म केलें, तरी वाक्य अप्रमाण ठरत नाहीं. त्या ज्ञानी पुरुषाचें करणें अविद्याजन्य आहे, असें मात्र ठरतें!

पूर्व०—तुम्ही काय वाटेल तें ठरवा. ज्ञानी पुरुषाच्या हातूनही कर्म होतें, असें आपण जर पाहतों, तर 'ज्ञानी पुरुषानें कर्म करणें असंभाव्य आहे' असें सांगणाऱ्या शास्त्राला प्रामाण्यच नाहीं.

सिद्धान्ती:—सर्व उपनिषदांचा उपक्रम, उपसंहार इत्यादि जर पहाल, तर ज्ञानी आणि साक्षात्कारी पुरुषानें विषयवासनाप्रेरित आणि स्वाभिमानजन्य कर्म करणें अशक्य आहे, असेंच तुम्हांस दिसेल. तात्पर्य, साक्षात्कारी व ज्ञानी पुरुष शास्त्राच्या भयानें किंवा स्वतःच्या उपभोगलालसेनें केव्हांही कर्म करणार नाहीं. ज्ञानी असून कर्मप्रेरक वासना व अभिमान यांच्याच तंत्रानें कर्म करणारा तो असेल, तर त्याला ज्ञानच झालें नाहीं, असें म्हटलें पाहिजे.
सारांश, कर्म वैदिक असो वा व्यावहारिक असो, पारतंत्र्यानें कर्मप्रवृत्त होणाऱ्या पुरुषाला ज्ञान झालेलें नसतें, असें म्हटलें पाहिजे.

**कर्मविधीनामप्रामाण्यप्रसङ्ग इति चेत् । न । अनुपमर्दितभेदप्रत्ययवत्पुरुषविषये प्रामाण्योपपत्तेः स्वप्नादिप्रत्यय इव प्राक्प्रबोधात् । विवेकिनामकरणात्कर्मविधिप्रामाण्योच्छेद इति चेन्न । काम्यविध्यनुच्छेददर्शनात् । न हि कामात्मता न प्रशस्तेत्येवंविज्ञानवद्भिः काम्यानि कर्माणि नानुष्ठीयन्त इति काम्यकर्मविधय उच्छिद्यन्तेऽनुष्ठीयन्त एव कामिभिरिति । तथा ब्रह्मसंस्थैर्ब्रह्मविद्भिर्नानुष्ठीयन्ते कर्माणीति न तद्विधय उच्छिद्यन्तेऽब्रह्मविद्भिरनुष्ठीयन्त एवेति ।**

पूर्वपक्षी—अहो! 'ज्ञानी पुरुष वेदविहितसुद्धां कर्म करणार नाहीं;' असें म्हणाल, तर कर्मविधायक शास्त्रें अप्रमाण ठरतील! तीं अप्रमाण आहेत असें तुम्हांस किंवा इतर कोणालाही म्हणतां यावयाचें नाहीं. म्हणून तुमचें अद्वैतशास्त्र परमार्थामध्यें सुद्धां प्रमाण नाहीं.

शिष्य:—असें कसें म्हणतां? ज्यांचा भेदप्रत्यय विनष्ट झाला नाहीं, ज्यांना एकत्वज्ञानविज्ञान झालें नाहीं, त्यांना मात्र कर्मशास्त्रें प्रमाण असतात व असलींही पाहिजेत; आपण अर्धवट झोपेंत असतां जीं स्वप्नें पडतात, 'तीं सर्व खोटीं' असें आपण स्वप्नस्थितींत असतांना केव्हांही म्हणत नाहीं. स्वप्नस्थ पुरुषाला त्याचीं स्वप्नें प्रमाणच वाटत असतात. जागा झाल्यावर मात्र 'स्वप्न खोटें' असा त्याचा निश्चय होतो. तसेंच, जावत्कालपर्यंत आपण अज्ञानाच्य साम्राज्यांत असतों, तोंपर्यंत हिताहित सांगणारीं व करविणारीं सर्व निःपक्षपाती कर्मशास्त्रें (धर्मशास्त्रें) प्रमाणच असतात. पण अज्ञानाचें उपमर्दन

झालें, म्हणजे ज्ञानविज्ञानी पुरुषाचा ‘ तीं सारीं भेदमूलक कर्मशास्त्रें अप्रमाण आहेत, ’ असा पूर्ण निश्चय झालाच पाहिजे. तीं त्याला अप्रमाण वाटतात, म्हणून सांसारिक पुरुषांसही तीं अप्रमाण वाटलीं पाहिजेत असें नाहीं. किंबहुना त्यांना तीं प्रमाणच वाटलीं पाहिजेत.

पूर्व०—अहो ! पण विवेकी पुरुषांनीं जर कर्म केलें नाहीं, तर ‘ यद्यदाचरति श्रेष्ठः ’ या न्यायानें संसारी पुरुषांससुद्धां कर्मशास्त्रांच्या प्रामाण्याविषयीं बळकट संशय उत्पन्न होईल आणि ते कर्मही करणार नाहींत ?

सिद्धान्तीः—नाहीं. काम्यकर्मांचे जे विधी आहेत, त्यांचा उच्छेद कोठें होतो ?

शिष्य—समजलें नाहीं.

सिद्धान्ती—नित्यकर्म करणाऱ्यांनीं काम्यकर्म केलें नाहीं, म्हणून ( कामात्मता प्रशस्त नाहीं, सकाम कर्म करणें ठीक नाहीं, असें ज्यांस वाटतें, त्यानें म्हणजे ज्ञान असलेल्या पुरुषांनीं काम्यकर्में केलीं नाहींत म्हणून ) काम्यकर्मांचे विधी उच्छिन्न झाले, असें होत नाहीं. सकाम लोक काम्यकर्में करीत असतातच. ज्यांचा प्रकृतिस्वभावच कर्म करण्याचा आहे, त्यांनीं कितीही जरी ज्ञानी पुरुष पाहिले किंवा त्यांचें आचरण पाहिलें, तरी ज्ञान झाल्याशिवाय ते स्वप्रकृतीचा उच्छेद करतील, कर्मविरक्त होतील, असें होणेंच नाहीं. तसेंच, ब्रह्मवेत्त्या ब्रह्मसंस्थांनीं कर्म केलें नाहीं; म्हणजे अब्रह्मवेत्त्यांच्या दृष्टीनें कर्मशास्त्र अप्रमाण ठरेल किंवा अब्रह्मवेत्ते कर्मविन्मुख होतील, असें व्हावयाचेंच नाहीं. अब्रह्मवेत्ते तीं तीं कर्में करीत राहतीलच. तसेंच कर्मशास्त्रही प्रमाण राहील. येथें शंका घेणें हेंच अविचाराचें चिह्न होईल !

**परिव्राजकानां भिक्षाचरणादिवदुत्पन्नैकत्वप्रत्ययानामपि गृहस्थादीनामग्निहोत्रादिकर्मानिवृत्तिरिति चेन्न । प्रामाण्यचिन्तायां पुरुषप्रवृत्तेरदृष्टान्तत्वात् । न हि नाभिचरेदिति प्रतिषिद्धमप्यभिचरणं कश्चित्कुर्वन्दृष्ट इति शत्रौ द्वेषरहितेनापि विवेकिनाऽभिचरणं क्रियते । न च कर्मविधिप्रवृत्तिनिमित्ते भेदप्रत्यये बाधितेऽग्निहोत्रादौ प्रवर्तकं निमित्तमस्ति, परिव्राजकस्येव भिक्षाचरणादौ बुभुक्षादि प्रवर्तकम् ।**

पूर्वपक्षी—असो; दुसरी शंका ही. ब्रह्मवेत्ते परिव्राजकही भिक्षाटनादि कर्म करितात. त्याप्रमाणेंच एकत्वाचा प्रत्यय म्हणजे अनुभवपूर्वक शास्त्रशुद्ध निश्चय ज्यांचा झाला, असे गृहस्थादिकांनीं शास्त्रप्रणीत अग्निहोत्रादि कर्में केलीं, म्हणूनही कांहीं बिघडूं नये. ब्रह्मवेत्त्यांना जर कर्म करावें लागतें, व तें करितात, तर ब्रह्मवेत्त्या गृहस्थांनीं तरी तें कां सोडावें ? ‘ ब्रह्मवेत्ते कर्म

करीत नाहींत ' असें म्हणतात आणि परमहंस भिक्षा मागतात ! हा एक विरोधच आहे. तसाच आमचा दुसराही विरोध पत्करा; तो हा कीं, गृहस्थ ब्रह्मवेत्ते होतात; पण ते शास्त्रीय कर्म सोडीत नाहींत.

सिद्धान्ती—आपण प्रमाणाचा विचार करित आहोंत ना ? ह्यावेळीं प्रत्ययाचा आभास पहातों हें मूळ आहे. ज्या प्रवृत्तीच्या आभासाचें, त्याचें उदाहरण घेऊन कसें चालेल ?

शिष्य—उदाहरणानें समजून दिलें, तर बरें पडेल ?

सिद्धान्ती—' न अभिचरेत् ( वाममार्गाचा आश्रय केव्हांही करूं नये ) ' असें शास्त्र आहे. 'कोणाचेंही अनाठायीं किंवा 'ठायीं' नुकसान करूं नये ' असा निषिद्ध आचरणाचा शास्त्रप्रतिषेध करितें. पण हें निषिद्ध आचरण करितांना एखादा पुरुष आपल्यास दिसला म्हणून, ज्याचा राग-द्वेष नाहींसा झाला, त्या विवेकी पुरुषानें सुद्धां शत्रूंशीं विरुद्ध निषिद्धाचरण करावें, हें कांहीं ठरत नाहीं. दुर्योधनानें धर्मराजाचा पुष्कळ छळ केला, कारण नसतांना केला, म्हणून धर्मानेंही निषिद्ध आचरण करावें किंवा भीम-द्रौपदींनीं धर्मास शास्त्रनिषिद्ध आचरण करण्याची गळ घालावी, असें होत नाहीं. असो; आपण शास्त्र खरें किंवा खोटें, याविषयीं विचार करितों आहों. कोणत्या शास्त्राला प्रमाण मानावयाचें हें आपण ठरवितों आहों. तें ठरवितांना अज्ञानी पुरुष रागद्वेषानें निषिद्धाचरण करीत आहे, म्हणून निषिद्धाचरणाचा निषेध करणारें शास्त्र खोटें आहे किंवा आपणही निषिद्धाचरण करावें, असें ठरत नाहीं. परिव्राजक भिक्षा मागतात, सहेतुक कर्म करितात, हें अद्वैतसिद्धांताच्या दृष्टीनें निषिद्ध आहे. तथापि ज्ञानी ह्मणविणारे संन्याशी भिक्षा मागतात म्हणून ( निषिद्धकर्म करितात म्हणून ) अद्वैत सिद्धांताचें ज्ञान झालेल्या गृहस्थानें अद्वैतानिषिद्ध ( अद्वैतानें निषिद्ध केलेलें) अग्निहोत्रादि सकाम कर्म करावें, सकाम कर्मापासून निवृत्त होऊं नये, असें ब्रह्मज्ञ पुरुषानें कसें ह्मणावें ? तात्पर्य, अद्वैतसिद्धांत अपौरुषेय (रागद्वेषशून्य) शास्त्रानें ठरविलेला आहे आणि त्याला अज्ञानमूलक पुरुषबुद्धि हरताळ लावूं शकत नाहीं. असो; तेव्हां खरें तात्पर्य कीं, पुरुषबुद्धीचे दृष्टांत या प्रमाणचिंतनांत व्यर्थ आहेत. समजलें ? तसेंच, कर्मशास्त्रानें सांगितलेलें कर्म करावयास लावणारा भेदप्रत्यय विनष्ट झाल्यानंतर व एकत्वज्ञानानें अग्निहोत्रादि भेदमूलक कर्मांचा बाध झाल्यानंतर, तें तें कर्म करावयास लावणाऱ्या मनोवृत्तीही नष्टच होतात. कोणताही ज्ञानी रागद्वेषमूलक कर्म करीतच नाहीं. कारण येथें कर्मप्रवृत्तीचा प्रेरक नाहींसा झालेला असतो. आतां परिव्राजक भिक्षा मागतो, तो क्षुधादिकृत प्रवृत्तीनें मागतो. अर्थात् त्याला खरें अद्वैतज्ञान झालें नाहीं, निदान त्याला त्या वेळीं अद्वैतज्ञानाचा विसर पडलेला असतो, इतकेंच सिद्ध होतें. एवंच पुरुषबुद्धीनें कर्म केलें किंवा तिच्या

प्रवृत्तीनें कर्म केलें नाहीं, म्हणजे किंवा म्हणून अपौरुषेय शास्त्रसिद्धांत खोटा ठरतो; असें नाहीं. तुमचें उदाहरण चुकलें आहे. एवंच, कर्म करणें अज्ञानमूलक व पापोत्पादक आहे.

इहाप्यकरणे प्रत्यवायमयं प्रवर्तकमिति चेत् । न । भेदप्रत्ययवतोऽधिकृतत्वात् । भेदप्रत्ययवाननुपमर्दितभेदबुद्धिर्विद्यया यः, स कर्मण्यधिकृत इत्यवोचाम । यो ह्यधिकृतः कर्मणि तस्य तदकरणे प्रत्यवायो न निवृत्ताधिकारस्य; गृहस्थस्येव ब्रह्मचारिणो विशेषधर्माननुष्ठाने । एवं तर्हि सर्वः स्वाश्रमस्थ उत्पन्नैकत्वप्रत्ययः परिव्राडिति चेत् । न । स्वस्वामित्वभेदबुद्ध्यनिवृत्तेः । कर्मार्थत्वाच्चेतराश्रमाणाम् । "अथ कर्म कुर्वीय" इति श्रुतेः । तस्मात्स्वस्वामित्वाभावाद्भिक्षुरेक एव परिव्राट् । न गृहस्थादिः ।

पूर्वपक्षी—असें कसें म्हणतां ? प्रत्यक्ष अपौरुषेय श्रुतीनें 'नित्यकर्म केलें नाहीं तर प्रत्यवाय उत्पन्न होतो' असें सांगितलें आहे; नव्हे ? प्रत्यवाय दुःखजनक आहे. तात्पर्य, प्रत्यवायाची भीति जीवाला असतेच. भीति हा प्रवर्तक जिवंत असतो, म्हणून जीव कर्म करितो. एवंच, जीवमात्रानें नित्य कर्म केलें पाहिजे, असें ठरवा.

सिद्धान्ती—नाहीं. ज्याचा भेदप्रत्यय जिवंत आहे. ज्याला द्वैत सत्य वाटत आहे, तो मात्र श्रुतिप्रणीत कर्म करण्याला अधिकारी असतो. म्हणजे अद्वैत ज्ञानानें ज्याची भेदबुद्धि नष्ट झाली नाहीं, जो भेदमूलक जो प्रत्यवाय त्याला भीत असतो, तो कर्माला अधिकारी आहे, असें आम्हीं अनेक वेळ सांगितलें आहे. सारांश, जो कर्म करण्याला अधिकारी आहे, त्यानें जर श्रुतिप्रणीत कर्म केलें नाहीं, तर झाला भीति असते. परंतु अद्वैतज्ञानानें ज्याचा कर्मसंबंधीं अधिकार नष्ट झाला, त्याला प्रत्यवायाची भीति नाहीं. तो गृहस्थ असो, नसो, अद्वैतज्ञान झालेलें असलें, म्हणजे श्रुतीनें सांगितलेलें विशेष आश्रमधर्म पाळण्याचें त्याला कारण नाहीं. अद्वैतज्ञानाचा निश्चय झाला म्हणजे श्रुतिप्रणीत कर्म अथवा इतर कोणतेंही कर्म, यांचा लोपच होतो. 'त्यानें असुक कर्म केलें पाहिजे.' असा हुकूम करण्याचें सामर्थ्य कोणालाही नसतें.

पूर्वपक्षी—असें झालें, तर ठीकच झालें. आपापल्या आश्रमांत राहून एकत्वप्रत्यय झाला, कीं तो ब्रह्मचारी असो, गृहस्थ असो, वा वानप्रस्थ असो; तो परिव्राजकच झाला म्हणावयाचा ! हा सर्व घोटाळा होणार. कारण, या आश्रमीयांनीं यज्ञोपवीतादि कर्मसाधनें टाकून दिलीं, तर आश्रमधर्म

सोडले असें होतें, व टाकून दिलीं नाहींत, तर परिव्राजकत्व प्राप्त होत नाहीं! उत्कृष्ट-प्रकारची अव्यवस्था आपण उत्पन्न केली म्हणावयाची!

**सिद्धान्ती**—कृपा करून व्यवस्थेनें बोलत चला. जोंपर्यंत 'हा मी' आणि 'हें माझें' अशी 'स्व' ची आणि स्वामित्वाची' भेदबुद्धि **जिवंत** आहे, तोंपर्यंत अद्वैतज्ञान झालें नाहीं, असें समजलें पाहिजे. '**हें माझें** जानवें,' '**हें मी** ठेवितों' अशी भेदबुद्धि जोंपर्यंत आहे, तोंपर्यंत अद्वैत-ज्ञानाचा उदय झालेला नाहीं, असेंच समजावयाचें. ज्याला अद्वैतज्ञान होतें, तो कोणत्याही आश्रमामध्यें राहत नाहीं. सर्व आश्रम कर्म करण्यासाठीं मात्र आहेत. ज्याला कर्म करावयाचें, तोच या आश्रमांत म्हणजे पहिल्या तीन आश्रमांत राहतो. 'आतां आपण कर्म करूं या' असेंच श्रुतिही म्हणते. तात्पर्य, ज्याचा स्वस्वामिभाव नाहींसा झाला, तो भिक्षु मात्र खरा परिव्राजक होय. गृहस्थादि आश्रमी पुरुष परिव्राजक नव्हेत.

**एकत्वप्रत्ययविधिजनितेन प्रत्ययेन विधिनिमित्तभेदप्रत्ययस्योपमर्दितत्वाद्यमनियमाद्यनुपपत्तिः परिव्राजकस्येति चेत् । न बुभुक्षादिनैकत्वप्रत्ययात्प्रच्यावितस्योपपत्तेर्निवृत्त्यर्थत्वात् । न च प्रतिषिद्धसेवाप्राप्तिः । एकत्वप्रत्ययोत्पत्तेः प्रागेव प्रतिषिद्धत्वात् । न हि रात्रौ कूपे कण्टके वा पतित उदितेऽपि सवितरि पतति तस्मिन्नेव । तस्मात्सिद्धं निवृत्तकर्मा भिक्षुक एव ब्रह्मसंस्थ इति ।**

**पूर्वपक्षी**—एकत्वप्रत्यय उत्पन्न करणारीं महावाक्यें उत्कृष्ट समजल्यानंतर, तात्पर्य, अद्वैतप्रत्यय टीक झाला म्हणजे, भेदप्रत्ययाच्या अधिष्ठानावर उत्पन्न झालेल्या धर्मशास्त्रांनीं विहित केलेला भेदप्रत्यय नाहींसा होतो. तेव्हां परिव्राजकानें 'यमनियमांचें अनुष्ठान करावें' अशा प्रकारचे नियम अनुपपन्न म्हणजे अयोग्य होतात. तात्पर्य, प्रव्राजकानें वाटेल तसें वागावें, असें होतें. नव्हे?

**सिद्धान्ती**—नाहीं. यमनियमादि नियम प्रव्राजकानें पाळलेच पाहिजेत, नव्हे तो पाळतोच!

**पूर्वपक्षी**—कां?

**सिद्धान्ती**—प्रथम तर, यमनियमादिकांचें पालन केलें, म्हणजे चित्तशुद्धि होते. आणि नंतर श्रवण-मननादिकांनीं, गुरूच्या अनुग्रहानें आणि परमेश्वरी कृपेनें शुद्धचित्ती मुमुक्षूला अद्वैतज्ञान होतें. तेव्हां परिव्राजकाला यमनियमादिकांचे संस्कार खिळूनच राहतात. त्याचें सहज आचरणही नियमबद्ध होत असतें. येथें मनःप्रवृत्तीचा संबंध राहत नाहीं. यथेष्टाचरण होणें येथें अशक्य आहे. दुसरें, पूर्वसंस्कारजनित क्षुधादिकांच्या योगानें भिक्षाटनादिकांचीं

प्रवृत्ति झाली असतां तो तो परिव्राजक किंवा जीवन्मुक्त एकत्वज्ञानापासून एक घटकाभर कां होईना, पण प्रच्युत झालेला असतो. ही प्रच्युति होऊं नये, म्हणून शास्त्रानें यमनियमादि सांगणें व मुमुक्षूनें मानणें योग्यच आहे. असें आहे, म्हणूनही त्याच्या हातून शास्त्रनिषिद्ध वर्तन होणें शक्य नाहीं. आणखी एकत्वप्रत्यय उत्पन्न होण्याच्या पूर्वींच म्हणजे मुमुक्षु स्थितींतच शास्त्रनिषिद्ध संसारसेवेपासून तो परावृत्त झालेलाही असतो. अहो अविद्वान्सुद्धां—

शिष्य—म्हणजे अद्वैतज्ञान न झालेला ?

सिद्धान्ती—ठीक. अद्वैतज्ञान न झालेला व्यवहारचतुर पुरुष सुद्धां जर यथेष्टाचरण करीत नाहीं, तर विषयविन्मुख झालेला रागद्वेषशून्य अद्वैती यथेष्ट वागेल, शास्त्रनिषिद्ध आचरण करील, असें वाटतें तरी कसें तुम्हाला ? अंधेऱ्या रात्रीं विहिरींत किंवा निवडुंगाच्या बेटांत प्राणी पडतो, म्हणून सूर्य उगवला असतांही तो खांचखळग्यांत पडलाच पाहिजे, असें कसें म्हणावें ? तात्पर्य, ज्ञान झालेला मनुष्य शास्त्रमान्य आणि राजमान्य मार्गानेंच सहज जातो. त्याचें आचरण म्हणजेच यमादि होत. समजलें ? सारांश, खरा ब्रह्मसंस्थ तो होय कीं ज्याचें सर्व कर्म निवृत्त झालें आहे. अर्थात् तो अपरिग्रही म्हणजे भिक्षुकच असला पाहिजे.

शिष्य—गृहस्थाला यज्ञयाग, शास्त्राभ्यास आणि दान हें करावें लागतें. या कर्मांपासून परिव्राजक निवृत्त होतो. तसेंच, परिव्राजकाला प्रत्यवायाची भीति नाहीं, म्हणून वानप्रस्थांस अवश्य असणाऱ्या चांद्रायणादि प्रायश्चित्तांची त्याला अपेक्षा नसते. तसेंच, सर्व शास्त्रांचें अध्ययन अद्वैतज्ञानानें पूर्ण झालें असल्यामुळें, ब्रह्मचर्याची व तन्नियामक कर्मांचीही अपेक्षा त्याला नसते. एवंच निवृत्तकर्मा भिक्षुक म्हणजेच ब्रह्मसंस्थ होय; असें ठरलें ?

यत्पुनरुक्तं सर्वेषां ज्ञानवर्जितानां पुण्यलोकतेति । सत्यमेतत् । यच्चोक्तं तपःशब्देन परिव्राडप्युक्त इति । एतदसत् । कस्मात् । परिव्राजकस्यैव ब्रह्मसंस्थतासंभवात् । स एव ह्यवशेषित इत्यवोचाम । एकत्वविज्ञानवतोऽग्निहोत्रादिवत्तपोनिवृत्तेश्च । भेदबुद्धिमत एव हि तपःकर्तव्यता स्यात् । एतेन कर्मच्छिद्रे ब्रह्मसंस्थतासामर्थ्यम् । अप्रतिषेधश्च प्रत्युक्तः । तथा ज्ञानवानेव निवृत्तकर्मा परिव्राडिति ज्ञानवैयर्थ्यं प्रत्युक्तम् ।

सिद्धान्ती—आतां, 'अद्वैत–ज्ञान–वर्जित' असणारे; पण तिन्ही आश्रमांतील शास्त्रप्रणीत कर्में त्या त्या आश्रमांत राहून करणारे सर्व शिष्ट पुण्य–लोक असतात' असें तुम्ही म्हणालांत, तें बरोबर आहे. तथापि तपस्व्यांमध्यें परिव्राजकांचा अंतर्भाव केलात, तें मात्र ठीक बोलला नाहींत.

पूर्वपक्षी—कां बरें ?

सिद्धान्ती—कारण, परिव्राजकाला मात्र ब्रह्मसंस्थता संभवनीय आहे. आणि म्हणूनच आम्हीं ह्मटलें होतें कीं, ब्रह्मसंस्थ पुरुष या तिन्ही आश्रमांपासून वेगळा असतो. एकत्वाचा साक्षात्कार झालेला पुरुष भेदनिमित्त अग्निहोत्राचा त्याग करितो, तसाच तपाचाही त्याग करितो. यावरून तुमच्या लक्षांत आलें असेल, कीं कर्मांमध्येंच अवकाश काढून ब्रह्मसंस्थतेचें सामर्थ्य प्राप्त करून घेणें, हें अशक्य आहे. तसेंच, तेथें चारी आश्रमांचा प्रतिषेध केला नाहीं, असें तुम्हीं म्हणालांत, त्याचेंही उत्तर आम्हीं दिलें. शेवटीं, 'परिव्राजकाला ज्ञानाची अपेक्षा नसते,' असें तुम्ही म्हणालांत; त्यालाही आम्हीं उत्तर दिलें, कीं ज्याला अद्वैतज्ञान झालें, तोच निवृत्तकर्मा होतो; तोच काय तो परिव्राजक होतो. तात्पर्य, ज्ञानाव्यतिरिक्त खरें परिव्राजकत्व येत नाहीं.

यत्पुनरुक्तं यववराहादिशब्दवत्परिव्राजके न रूढो ब्रह्मसंस्थशब्द इति तत्परिहृतम् । तस्यैव ब्रह्मसंस्थतासंभवान्नान्यस्येति । यत्पुनरुक्तं रूढशब्दा निमित्तं नोपाददत इति । तन्न । गृहस्थतक्षपरिव्राजकादिशब्ददर्शनात् । गृहस्थितिपारिव्राज्यतक्षणादिनिमित्तोपादाना अपि गृहस्थपरिव्राजकावाश्रमिविशेषे विशिष्टजातिमति च तक्षेति रूढा दृश्यन्ते शब्दाः । न यत्र यत्र तानि निमित्तानि तत्र तत्र वर्तन्ते । प्रसिद्ध्यभावात् । तथेहापि ब्रह्मसंस्थशब्दो निवृत्तसर्वकर्मतत्साधनपरिव्राडेकविषयेऽत्याश्रमिणि परमहंसाख्ये वृत्त इह भवितुमर्हति । मुख्यामृतत्वफलश्रवणात् । अतश्चेदमेवैकं 'न यज्ञोपवीतत्रिदण्डकमण्डल्वादिपरिग्रह' इति 'मुण्डोऽपरिग्रहोऽसङ्ग इति' च ।

पूर्वपक्षी—'ब्रह्मसंस्थ--शब्दाचा परिव्राजक हा रूढ अर्थ नव्हे, यव, वराह, इत्यादि शब्द जसे रूढ आहेत, तसा ब्रह्मसंस्थ नव्हे.' असें आम्हीं म्हणालों; त्याचें काय ?

सिद्धान्ती—परिव्राजकालाच ब्रह्मसंस्थ होतां येतें, इतराला नाहीं. असें आम्हीं सिद्ध केलेंना ? मग आतां कां हा प्रश्न ?

पूर्वपक्षी—तसें नव्हे. रूढ-शब्दाला निमित्त लागत नाहीं; आणि येथें तर निमित्त दिसतें. ह्मणजे ब्रह्माचे ठिकाणीं जो संस्थित झाला आहे, तोच ब्रह्मसंस्थ होय, असा निमित्तानें उत्पन्न झालेला व सहेतुक अर्थ असणारा हा शब्द आहे.

सिद्धान्ती—असाच कांहीं नियम नाहीं, 'गृहस्थ,' 'तक्षन्' 'परिव्राजक' इत्यादि शब्द ब्रह्मसंस्थासारखेच निमित्तवंत आहेत. 'गृहांत राहणारा तो गृहस्थ,

'संसारत्याग करणारे ते परिव्राजक,' 'सुतारकीचें काम करणारा तो तक्षन्' इत्यादि शब्द निमित्तवंत असूनही रूढ झालेले आहेत. म्हणजे गृहस्थ आणि परिव्राजक हे शब्द आश्रमविशेषांचे वाचक आहेत. आणि तक्षन् हा शब्द विशेष जातीचा वाचक आहे. हें तुम्हांसही विदित आहे. सारांश, निमित्तवंत असूनही कित्येक शब्द कांहीं विशेष अर्थाला मात्र रूढ होऊन जातात. या शब्दांच्या वाच्यार्थांत जेथें तेथें निमित्त असतेंच, असा नियम नाहीं. एखादा गृहस्थ गृहाबाहेर चार दिवस राहिला, म्हणजे तो गृहस्थ नव्हे; असें होत नाहीं. किंवा जेथें निमित्त असतें तेथेंच या शब्दाचा उपयोग होतो, असेंही नाहीं. ब्राह्मणानें सुतारकी केली, म्हणून तो सुतार जातीचा (त्वष्टा) होत नाहीं. निदान हा भाग सिद्ध होण्यासारखा तरी नाहीं. त्याचप्रमाणें ब्रह्मसंस्थ हा जो शब्द आहे, त्याचा अर्थ जरी 'ब्रह्ममध्यें स्थित असणारा' असा शब्दनिर्वचनानें होतो, तथापि त्याचा रूढार्थ असाच आहे कीं, 'ज्यानें सर्व कर्मांचा त्याग करून ब्रह्माचें मुख्य साधन जो चतुर्थाश्रम त्याचेच ठिकाणीं सारांश चतुर्थाश्रमाचे ठिकाणीं स्थित झाला आहे.' आश्रमाचे अतिक्रमण करणारी जी परमहंस नामक स्थिति तिचाच दर्शक ब्रह्मसंस्थ हा शब्द आहे.

**पूर्वपक्षी**—असेंच कां म्हणून ?

**सिद्धान्ती**—कारण 'ब्रह्मसंस्थाला मात्र मुख्य अमृतत्व मिळतें, निरपेक्ष अमृतत्व मिळतें' असें श्रुतीनें सांगितलें आहे. तेव्हां हेंच एक वेदोक्त पारिव्राज्य आहे. यज्ञोपवीत, त्रिदंड, कमंडलु इत्यादिकांचा नुसताच परिग्रह करितात, ते परिव्राजक नव्हेत.

**पूर्वपक्षी**—कां बरें ?

**सिद्धान्ती**—संन्यासप्रकरणांत 'मुंड, अपरिग्रह, असंग' इत्यादि शब्द आहेत. यावरून मुंडन केलेला, कोणत्याही प्रकारचा परिग्रह नसलेला व निःसंग ज्ञानी पुरुष ब्रह्मसंस्थ असतो; तोच परिव्राजक होय, असें ठरतें. रूढीचा प्रश्न येथें उत्पन्न होत नाहीं.

**श्रुतिरत्याश्रमिभ्यः 'परमं पवित्रमित्यादि' च श्वेताश्वतरीये । निस्तुतिर्निर्नमस्कार इत्यादिस्मृतिभ्यश्च । 'तस्मात्कर्म न कुर्वन्ति यतयः पारदर्शिनः । तस्मादलिङ्गो धर्मज्ञोऽव्यक्तलिङ्गः' इत्यादिस्मृतिभ्यश्च ।**

**सिद्धान्ती**—श्वेताश्वतरीय श्रुति अत्याश्रमींना ( ब्रह्मचर्यादि तिन्ही अश्रमांचा त्याग केला आहे अशा संन्याशांना ) 'परम पवित्र, चित्तशोधक, परम पुरुषार्थ साध्य करणारें सम्यक्ज्ञान सांगती झाली' असें म्हटलें आहे. अनेक स्मृती 'तो निःस्तुति, निर्नमस्कार असतो.' असें म्हणतात. संन्याशाला स्तुतीची अपेक्ष

नसते व नमस्काराचीही नसते, असें स्मृती म्हणतात. 'म्हणून पारदर्शी (प्रकृतीच्या पलीकडील परब्रह्म पाहणारे) यति कोणत्याही प्रकारचें बद्धक कर्म करीत नाहींत' तसेंच 'यति, अलिंग, (अमक्या धर्माचा मी आहें असें सांगणारें यज्ञोपवीतादि चिन्ह नसणारा) धर्मज्ञ (परमहंसधर्मांचे यथास्थित अनुष्ठान करणारा) आणि अव्यक्त लिंग (दंभानें कोणतेंही धार्मिक चिन्ह धारण न करणारा)' असा असतो' असेंही अनेक स्मृती सांगतात.

तात्पर्य यतीला आश्रम नाहीं, म्हणून आश्रमविहित कर्महीं नाहीं.

**यत्तु सांख्यैः कर्मत्यागोऽभ्युपगम्यते। क्रियाकारकफलभेदबुद्धेः सत्यत्वाभ्युपगमात् तन्मृषा। यच्च बौद्धैः शून्यताभ्युपगमादकर्तृत्वमभ्युपगम्यते। तदप्यसत्। तदभ्युपगन्तुः सत्त्वाभ्युपगमात्। यच्चाज्ञैरलसतयाऽकर्तृत्वाभ्युपगमः सोऽप्यसत्कारकबुद्धेरनिवर्तितत्वात्प्रमाणेन। तस्माद्वेदान्तप्रमाणजनितैकत्वप्रत्ययवत एव कर्मनिवृत्तिलक्षणं पारिव्राज्यं ब्रह्मसंस्थत्वं चेति सिद्धम्। एतेन गृहस्थस्यैकत्वविज्ञाने सति पारिव्राज्यमर्थसिद्धम्।**

**सिद्धान्ती**—आतां सांख्य दर्शनांतही कर्मत्याग सांगितला आहे, हें खरें; तथापि क्रिया, कारक, फळ इत्यादिकांसंबंधानें जी भेदबुद्धि असते, ती सत्य आहे असे सांख्यांचें म्हणणें आहे. म्हणून त्यांचें म्हणणें खोटें आहे. कारण भेदबुद्धि सत्य असणें परमार्थांत व खऱ्या नैष्कर्म्यांत शक्य नाहीं. बौद्धांनींही कर्मत्याग विहित केला आहे. 'सर्व शून्य आहे, म्हणून जीव शून्य आहे,' हें गृहीत करून 'जीव अकर्ता आहे' असें ते बौद्ध म्हणतात. तेंही खोटें आहे. कारण शून्यत्वाचा व अकर्तृत्वाचा ग्रहण करणारा **जो जीव तो सत्य आहे.** आणखी कांहीं अज्ञ आळशीपणानें 'आपल्याकडे कर्तृत्वाचा कांहीं भाग नाहीं' असें म्हणतात. पण तें म्हणणें असत्य आहे; कारण त्यांची मिथ्याकारकबुद्धि निवृत्त झालेली नसते. एवंच सांख्य, बौद्ध आणि आळशी अज्ञ कर्मत्याग करतात, तो ज्ञानानें करीत नाहीं; ते तो त्याग वस्तुज्ञानपूर्वक करीत नाहींत. समजलें? पण वेदांताच्या प्रामाण्यानें ज्याची एकत्वबुद्धि निश्चित झाली, तो मात्र खरोखर कर्मनिवृत्त होतो आणि ही त्याची कर्मनिवृत्ति हेंच पारिव्राज्य, हेंच त्याचें ब्रह्मसंस्थत्व होय, असें ठरतें. यावरून असेंही ठरतें कीं, कोणा गृहस्थाला जर खरोखर एकत्व-विज्ञान झालें, तर तो परिव्राजक होण्याला योग्य होतो आणि साक्षात् ज्ञान झालें म्हणजे तो परिव्राजक होतोच होतो.

**नन्वग्न्युत्सादनदोषभाक्स्यात्परिव्रजन्। "वीरहा वा एष देवानां योऽग्निमुद्वासयते" इति श्रुतेः। न। दैवोत्सादितत्वादु-**

त्सन्न एव हि स एकत्वदर्शने जाते । अपागादग्नेरग्नित्वमिति श्रुतेः ।
अतो न दोषभाग्गृहस्थः परिव्रजन्निति ॥ १ ॥

पूर्व०—महाराज, 'जो अग्नीचें उद्वासन करितो, अग्नींचा परित्याग करितो, तो देवसंबंधी वीरहत्या करणारा होतो,' अशी श्रुति आहे. तात्पर्य, अग्नीचें उच्छेदन करणारा परिव्राजक दोषी होतो. असा श्रुतीचा भाव आहे.

सिद्धान्ती—नाहीं. एकत्वदर्शन झालें, म्हणजे तो अग्नि आपल्या स्वतःच्या दैवानेंच स्वस्वरूप टाकून देतो. 'अग्नीचें अग्नित्व नाहींसें होऊन एकत्व ज्ञान झालें' अशी श्रुति प्रमाण आहे. म्हणून गृहस्थानें अग्नित्याग केला तरी तो दोषी होत नाहीं; अथवा एकत्वनिश्चय झाला, तो परिव्राजक झाला, कीं त्याचें गृहस्थत्व संपलें. मग त्याला प्रत्यवायाची भीति कसली ? तात्पर्य, एकत्वज्ञान्याला कर्म नाहीं ॥ १ ॥

यत्संस्थोऽमृतत्वमेति तन्निरूपणार्थमाह—

सिद्धान्ती—ज्या ब्रह्मवस्तूचा आश्रय केला असतां अमृतत्व प्राप्त होतें, त्या वस्तूचें स्वरूप सांगण्यासाठीं श्रुति काय म्हणत आहे, तें ऐका:—

---

## मंत्र दुसरा.

**प्रजापतिर्लोकानभ्यतपत्तेभ्योऽभितप्तेभ्यस्त्रयी विद्या संप्रास्रवत्तामभ्यतपत्तस्या अभितप्ताया एतान्यक्षराणि संप्रास्रवन्त भूर्भुवः स्वरिति॥२॥**

**अन्वय व अर्थः—प्रजापतिः लोकान् अभ्यतपत्** ( प्रजापतीनें लोकांचें अभ्यतपन म्हणजे ध्यान केलें, लोकपरीक्षणात्मक तप केलें ) **तेभ्यः अभितप्तेभ्यः त्रयी विद्या संप्रास्रवत्** ( त्या तपापासून विद्यात्रयी प्रतिभात होती झाली, प्रकट झाली ) **तां अभ्यतपत्** ( तिचें ही परीक्षणपूर्वक ध्यान केलें ) **तस्याः अभितप्तायाः भूः, भुवः, स्वः, इति एतानि अक्षराणि संप्रास्रवंत** ( त्या विद्यात्रयीच्या ध्यानपूर्वक तपश्चर्येनें भूः, भुवः, स्व, अशीं तीन अक्षरें आविर्भूत झालीं ) ॥ २ ॥

प्रजापतिर्विराट् कश्यपो वा लोकानुद्दिश्य तेषु सारजिघृक्षयाऽभ्यतपदभितापं कृतवान्ध्यानं तपः कृतवानित्यर्थः । तेभ्योऽभितप्तेभ्यः सारभूता त्रयी विद्या संप्रास्रवत्प्रजापतेर्मनसि प्रत्यभादि-

**त्यर्थः । तामभ्यतपत् । पूर्ववत् । तस्या अभितप्तायाा एतान्यक्षराणि संप्रास्रवन्त भूर्भुवः स्वरिति व्याहृतयः ॥ २ ॥**

**सिद्धान्ती**—प्रजापति म्हणजे विराट् किंवा कश्यपऋषि लोकांना उद्देशून—

**शिष्य**—कसला उद्देश भुवनांच्या संबंधें ?

**सिद्धान्ती**—त्या भुवनांमध्यें ( ब्रह्मांडांतील सर्व अनंतभुवनांमध्यें ) जें कांहीं सार आहे, तें ग्रहण करण्याच्या इच्छेनें प्रजापति तपन करिता झाला, ध्यानरूपी तपश्चर्या करिता झाला. या सर्व भुवनांमध्यें सारभूत वस्तु कोणती आहे, तिच्याविषयीं एकाग्र विचार प्रजापतीनें केला. पुष्कळ वेळ ध्यान केल्यानंतर प्रजापतीच्या अंत:करणामध्यें प्रथमत: सर्व भुवनांचें सार असणारी विद्यात्रयी लोंढ्यासारखी खळबळूं लागली; तात्पर्य विद्यात्रयी त्याच्या अंत:करणांत स्वयंभु आविर्भूत झाली. प्रजापतीनें या ऋग्वेदादि त्रयी–विद्यांचें सार काय आहे, हें परीक्षणपूर्वक पाहण्यासाठीं पुन: तपश्चर्या केली. तेव्हां भू:, भुव:, आणि स्व: ह्या तीन व्याहृती प्रकट झाल्या. सारांश, विद्यात्रयी साध्य झाली, तर सर्व भुवनांचें स्वरूप समजतें; आणि भूर्भुवादि व्याहृतींचें यथार्थ ज्ञान झालें, तर विद्यात्रयी हस्तगत होते ॥२॥

---

## मंत्र तिसरा.

**तान्यभ्यतपत्तेभ्योऽभितप्तेभ्य ॐकारः संप्रास्रवत्तद्यथा शङ्कुना सर्वाणि पर्णानि संतृण्णान्येवमोंकारेण सर्वा वाक्संतृण्णोंकार एवेदꣳ सर्वमोंकार एवेदꣳ सर्वम् ॥ ३ ॥**

**इति द्वितीयाध्यायस्य त्रयोविंशः खण्डः ॥ २३ ॥**

**अन्वय व अर्थः**—**तानि अभ्यतपत्; तेभ्यः अभितप्तेभ्यः ओंकारः संप्रास्रवत्** ( व्याहृतींचेही त्यानें एकाग्र परीक्षण केलें, तेव्हां या तपश्चर्येपासून ‘ ओंकार ’ प्रकट झाला ) **यथा शंकुना सर्वाणि पर्णानि संतृण्णानि, एवं ओंकारेण सर्वा वाक् संतृण्णा, ओंकारः एवं इदं सर्वं, ओंकारः एव इदं सर्वं** ( ज्याप्रमाणें पानाचा दांडा सर्व पर्णांस विद्ध करितो, व्यापून टाकितो, त्याप्रमाणें ओंकारानें सर्व वाणी व्यापून टाकलेली आहे; ओंकार हेंच हें सर्व आहे, हें सर्व ओंकार आहे ॥ १ ॥

तान्यक्षराण्यभ्यतपत्तेभ्योऽभितप्तेभ्य ॐकारः संप्रास्रवत्तद्ब्रह्म, कीदृशमित्याह—तद्यथा शङ्कुना पर्णनालेन सर्वाणि पर्णानि पत्रावयवजातानि संतृण्णानि निविद्धानि व्याप्तानीत्यर्थः । एवमोंकारेण ब्रह्मणा परमात्मनः प्रतीकभूतेन सर्वा वाक्शब्दजातं संतृण्णा । "अकारो वै सर्वा वाक्" इत्यादिश्रुतेः । परमात्मविकारश्च नामधेयमात्रमित्यत ओंकार एवेदꣳ सर्वमिति । द्विरभ्यास आदरार्थः । लोकादिनिष्पादनकथनमोंकारस्तुत्यर्थमिति ॥ ३ ॥

इति द्वितीयाध्यायस्य त्रयोविंशः खण्डः ॥ २३ ॥

**सिद्धान्ती**—या व्याहृतींचेंही त्यानें एकाग्र आणि एकनिष्ठ ध्यान केलें. तेव्हां ओंकार प्रकट झाला. तो ओंकार म्हणजेच ब्रह्म होय. ब्रह्म ही सर्वव्यापी वस्तु; म्हणून सर्वसार ओंकार हा ब्रह्मार्थाचा वाचक शब्द होतो. कारण; जसा प्रत्येक पानाचा शंकु म्हणजे पर्णनाल (पानांस आधारभूत असणारा मध्यदंड) पानाच्या सर्व अवयवांस निविद्ध करितो, व्याप्त करून टाकितो, त्याप्रमाणें ओंकाररूपी ब्रह्मानें—

**शिष्य**—मागें म्हटल्याप्रमाणें ओंकार हें ब्रह्माचें प्रतीक आहे ?

**सिद्धान्ती**—होय. ओंकारानें सर्व वाक् (शब्दजात, सर्व शब्द) संतृण्ण केले आहेत, व्यापून टाकले आहेत. 'सर्व वाणी अकार आहे' इत्यादि प्रसिद्ध श्रुती आहेत. 'अकार' हा ओंकाराचा एक अवयव आहे. अकार जर सर्व शब्दांचा व्यापक होतो, तर ओंकार सर्व–शब्द–व्यापक आहे, हें काय सांगावयास पाहिजे? असो; ज्याला ज्याला म्हणून नांव आहे, तें तें परमात्म्याचा विकार आहे. 'परमात्मव्यतिरिक्त कांहीं नाहीं.' 'हे सत्यकामा, ओंकार हेच पर आणि अपर ब्रह्म आहे' अशा श्रुती प्रमाण आहेत म्हणून ओंकार हाच हें सर्व आहे. हें सर्व ओंकारच होय. दोनदां आवृत्ति झाली आहे, ती आदरासाठीं आहे. येथें लोकांपासून सारतमभूत ओंकाराच्या निष्पत्तीची जी उत्पत्ति सांगितली, ती ओंकारस्तुतीसाठीं, ओंकाराच्या उपासनेसाठीं आहे. नेहमीचा नियमच असा आहे कीं, ज्याची आपण स्तुति करितों, त्या पदार्थाची उपासना करावयाची असते. शेवटचें तात्पर्य हें आहे, कीं ओंकारोपासना केली तर अमृतत्व फल मिळेल, हें शेवटच्या 'इति' शब्दानें सांगितलें. ब्रह्मजिज्ञासूंनें ॐकारसेवा करावी. ज्ञानविज्ञान झाल्यावर अमृतत्व मिळतें ॥ ३ ॥

खंड तेविसावा समाप्त.

## खण्ड चोविसावा.

सामोपासनप्रसङ्गेन कर्मगुणभूतत्वान्निवर्त्योंकारं परमात्मप्रतीकत्वादमृतत्वहेतुत्वेन महीकृत्य प्रकृतस्यैव यज्ञस्याङ्गभूतानि सामहोममन्त्रोत्थानान्युपदिदिक्षन्नाह—

सिद्धान्ती-पंचविध आणि सप्तविध साम यज्ञाचीं अंगें आहेत म्हणून त्यांचें उपासन करावें हें सांगितलें. पुढें सामांगभूत ॐकार आहे, यज्ञांग सामाचा ॐकार अवयव; म्हणूनही ओंकाराला कर्मत्वगुणत्व येतें. पण 'शुद्ध ओंकार हा परमात्म्याचें प्रतीक असल्यामुळें त्याची उपासना अमृतत्व देते' हें श्रुतीनें मनांत आणिलें आणि ब्रह्मप्रतीक म्हणून ॐची स्तुति केली. सामावयव उद्गीथोंकार निराळा, व शुद्ध ओंकार निराळा असें ठरलें. हा विषय मागच्या खंडांत झाला. आतां, प्रस्तुत जो यज्ञ, त्याच्या अंगभूत असणाऱ्या सामहोममंत्रादिकांचें उत्थान श्रुति करीत आहे—

---

### मंत्र पहिला.

**ब्रह्मवादिनो वदन्ति यद्वसूनां प्रातः सवनꣳ रुद्राणां माध्यंदिनꣳ सवनमादित्यानां च विश्वेषां च तृतीयसवनम् ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—ब्रह्मवादिनः वदंति** (ब्रह्मवादी लोक म्हणतात ) **यत् प्रातःसवनं, वसूनां; माध्यंदिनं सवनं, रुद्राणां; आदित्यानां च विश्वेषां देवानां च तृतीयसवनं,** ( प्रातः सवन वसूंचें, माध्याह्नकालीन सवन रुद्रांचें, तृतीयकालीन सवन आदित्याचें आणि विश्वेदेवांचें असतें ) ॥ १ ॥

ब्रह्मवादिनो वदन्ति यत्प्रातःसवनं प्रसिद्धं तद्वसूनाम् । तैश्च प्रातःसवनसंबद्धोऽयं लोको वशीकृतः सवनेशानैः । तथा रुद्रैर्माध्यंदिनसवनेशानैरन्तरिक्षलोकः । आदित्यैश्च विश्वैर्देवैश्च तृतीयसवनेशानैस्तृतीयो लोकः वशीकृत । इति यजमानस्य लोकोऽन्यः परिशिष्टो न विद्यते ॥ १ ॥

सिद्धान्ती—ब्रह्मवादी म्हणतात कीं, ' जें प्रातः सवन असतें, त्याचे स्वामी अष्टवसु असतात, ' हें प्रसिद्ध आहे.

शिष्य—सवन म्हणजे ?

सिद्धान्ती—सोमरस सिद्ध करून त्याची आहुति देणें, हें सवन होय. ' होमाच्या आधीं स्नान करणें ' असाही सवन शब्दाचा अर्थ आहे. असो; ह्या प्रात:सवनाचे स्वामी जे अष्टवसु ते हा लोक ( भूलोक ) वश करून घेतात. कारण, भूलोक हा प्रातः सवनाशीं संबद्ध असतो. म्हणून यजमानाला हा भूलोक मिळत नाहीं. त्याचप्रमाणें माध्यंदिन सवनाचे स्वामी एकादश रुद्र हें अंतरिक्ष–लोक वश करून घेतात आणि बारा आदित्य व विश्वेदेव हे तृतीय सवनाचे स्वामी असल्यामुळें द्युलोक वश करून घेतात. याप्रमाणें वसुरुद्रादित्यांनीं भूर्भुवःस्वर्लोकांचें स्वामित्व संपादन करून घेतल्यामुळें, यज्ञ करणाऱ्या यजमानाला कोणताही लोक अवशिष्ट राहत नाहीं. यथासांग यज्ञ केल्यानंतरही 'अमुक एका लोकाचें स्वामित्व मिळेल ' असा लोकच शिल्लक उरत नाहीं ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**क तर्हि यजमानस्य लोक इति स यस्तं न विद्यात्कथं कुर्यादथ विद्वान्कुर्यात् ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः—क तर्हि यजमानस्य लोकः इति** ( मग यजमानाला कोणता लोक प्राप्त व्हावयाचा ? ) **यः तं न विद्यात्, सः कथं कुर्यात् ? अथ विद्वान् कुर्यात्** ( लोकप्राप्तीचा उपाय ज्याला ठाऊक नाहीं, त्या अज्ञ पुरुषानें काय करावें ? विद्वानानें पुढें सांगितलें आहे, तसें करावें ) ॥ २ ॥

अतः क तर्हि यजमानस्य लोको यदर्थं यजते । न कश्चिल्लोकोऽस्तीत्यभिप्रायः । " लोकाय वै यजते यो यजते " इति श्रुतेः । लोकाभावे च स यो यजमानस्तं लोकस्वीकरणोपायं सामहोममन्त्रोत्थानलक्षणं न विद्यान्न विजानीयात्सोऽज्ञः कथं कुर्याद्यज्ञं, न कथंचन तस्य कर्तृत्वमुपपद्यत इत्यर्थः । सामादिविज्ञानस्तुतिपरत्वान्नाविदुषः कर्तृत्वं कर्ममात्रविदः प्रतिषिध्यते । स्तुतये च सामादिविज्ञानस्याविद्वत्कर्तृत्वप्रतिषेधाय चेति हि भिद्येत वाक्यम्

**आद्ये चौषस्त्ये काण्डेऽविदुषोऽपि कर्मास्तीति हेतुमवोचाम। अथै-तद्वक्ष्यमाणं सामाद्युपायं विद्वान्कुर्यात् ॥ २ ॥**

**सिद्धान्ती**—ज्यासाठीं यज्ञ सर्व लोक करितात, तो लोक यजमानाला—

**शिष्य**—तिन्ही लोकांची व्यवस्था मागच्या मंत्रांत सांगितली. तीवरून यज्ञानें प्राप्त होईल असा लोकच अवशिष्ट नाहीं, कीं जो यजमानाला मिळेल. तात्पर्य, देहपात झाल्यावर यजमानाला जाण्यासारखें ठिकाणच नाहींसें झालें !

**पूर्वपक्षी**—लोक असो वा नसो; श्रुतीनें सांगितलें आहे, म्हणून यजमान यज्ञ करतीलच. ते यज्ञ करण्याचें सोडून देतील, असा जो तुमच्या म्हणण्याचा भाव दिसतो, तो यथार्थ नाहीं.

**सिद्धान्ती**—'जो जो म्हणून यज्ञ करितो तो तो लोकप्राप्तीसाठीं करितो' अशी श्रुति आहे. लोक तर अवशिष्ट राहिला नाहीं. तेव्हां लोकप्राप्ति होईल, असा उपाय न जाणणारा यजमान—

**शिष्य**—लोक-प्राप्तीचा कांहीं उपाय आहे तर मग ?

**सिद्धान्ती**—साम होममंत्राचें उत्थान हेंच लक्षण आहे ज्या उपायाचें, तो उपाय लोकप्राप्ति करून देतो. आतां या उपायाचें ज्ञान ज्याला नाहीं, तो यज्ञ कशाला करील ? त्याचें कर्तृत्व उपपन्नच होत नाहीं.

**पूर्व०**—म्हणजे कर्ममात्र कसें करावें, इतकेंच ज्ञान ज्यांना आहे, त्यांनीं यज्ञ जरी केला, तरी तो निंद्य व निष्फळ आहे असें तुमचें म्हणणें ?

**सिद्धान्ती**—तुम्हीं चुकतां. सामादि विज्ञानाची स्तुति करण्यासाठीं हा प्रश्न उत्पन्न केला आहे. अज्ञ लोकांच्या यज्ञकर्माची निंदा येथें कर्तव्य नाहीं. तसें असतें, तर (१) सामादि विज्ञानाची स्तुति करावी आणि (२) अज्ञानी यज्ञकर्त्यांची निंदा करावी, असे भिन्न अर्थ होऊन वाक्यभेदच होणार आहे. पण असा श्रुतीचा अभिप्राय नाहीं. मागें औषस्त्यकांडांत अविद्वानानेंसुद्धां कर्म करणें योग्य आहे, असें श्रुतीनें सांगितलें आहे. मंत्रांत जें 'अथ' पद आहे तें स्पष्ट सुचवितें, कीं **विद्वानानें** पुढच्या मंत्रांत जो उपाय सांगितला आहे, तो समजून घ्यावा आणि त्याच्या साह्यानें लोकप्राप्ति करून घ्यावी. तो उपाय समजून घेतला नाहीं, तर यज्ञाच्या अकरणाची मात्र प्राप्ति विद्वानाला होईल ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**पुरा प्रातरनुवाकस्योपाकरणाज्जघनेन गार्हपत्यस्योदङ्मुख उपविश्य स वासव९ सामाभिगायति ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थः—प्रातरनुवाकस्य उपाकरणात् पुरा गार्हपत्यस्य जघनेन उदङ्मुखः उपविश्य सः वासवं साम अभिगायति** ( प्रातः-कालीन अनुवाकाला प्रारंभ करण्यापूर्वी गार्हपत्य अग्नीच्या पाठीमागें उत्तरे-कडे तोंड करून बसावें आणि ज्ञानी यजमानानें वासवसामाचें गायन करावें ) **हा पहिला उपाय होय ॥ ३ ॥**

किं तद्वेद्यमित्याह—पुरा पूर्वं प्रातरनुवाकस्य शस्त्रस्य प्रारम्भा-ज्जघनेन गार्हपत्यस्य पश्चादुदङ्मुखः सन्नुपविश्य स वासवं वसु-दैवत्यं सामाभिगायति ॥ ३ ॥

सिद्धान्ती—पहिला उपाय सांगतों, तो ऐका: प्रातरनुवाक नांवाचें जें शस्त्र आहे ( ऋग्मंत्र आहेत ) ते ह्मणूं लागण्याच्या आधीं 'गार्हपत्य' अग्निकुंडाच्या पाठीमागें जाऊन उदङ्मुख व्हावें; आणि वसुदेवतांसंबंधी जे साम आहेत, त्याचें गायन करावें.

शिष्य—प्रातरनुवाक ह्मणजे ?

सिद्धान्ती—जे ऋग्मंत्र गाइले जात नाहींत, त्यास शस्त्र ह्मणावें. हें शस्त्र प्रातःकाळीं ह्मणतात ह्मणून तो प्रातरनुवाक होय ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा.

**लो ३ कद्वारमपावा ३र्णू ३ ३ पश्येम त्वा वय९ रा ३ ३ ३ ३ ३ हु ३ म् आ ३३ ज्या ३ यो ३ आ ३२१११ इति ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थः—' लोकद्वारं अपावृणु, त्वा राज्याय वयं पश्येम ' इति** ( हे अग्ने ! लोकद्वार उघड; म्हणजे आम्हीं या लोकांचें स्वामित्व देणारें तुझें स्वरूप पाहूं ) हा वासव साम होय ॥ ४ ॥

लोकद्वारमस्य पृथिवीलोकस्य प्राप्तये द्वारमपावृणु हेऽग्ने तेन द्वारेण पश्येम त्वा त्वां राज्यायेति ॥ ४ ॥

सिद्धान्ती—'ह्या पृथिवी–लोकांचें जें द्वार आहे, तें हे अग्ने, तूं उघड; ह्मणजे तुझें स्वरूप स्पष्ट दिसेल. नंतर तुझ्या आज्ञेनें पृथिवी लोकाच्या स्वामित्वाची प्राप्ति आम्हांस होईल व तेथील भोग आम्हांस मिळतील.' असें गायन प्रातर-नुवाकाचे पूर्वी यजमानानें करावें ॥ ४ ॥

## मंत्र पांचवा.

**अथ जुहोति नमोऽग्नये पृथिवीक्षिते लोकक्षिते लोकं मे यजमानाय विन्दैष वै यजमानस्य लोक एताऽस्मि ॥ ५ ॥**

अन्वय व अर्थः—अथ जुहोति ( नंतर यजमान आहुति देतो ) **पृथिवीक्षिते अग्नये नमः** ( पृथ्वीवर वास्तव्य व राज्य करणाऱ्या अग्ने, तुला नमस्कार असो ) **लोकक्षिते मे यजमानाय लोकं विंद** ( पृथ्वीलोकप्रातीसाठीं यज्ञकर्त्या मला हा लोक मिळवून दे ) **एषः वै यजमानस्य लोकः, एता अस्मि** ( हा यजमानाचा लोक आहे. ह्या यजमानाच्या लोकाला मी येणार आहें. गायन केल्या नंतर 'नमो अग्नये' इत्यादि मंत्रपूर्वक यजमानानें आहुति द्यावी ) ॥ ५ ॥

अथानन्तरं जुहोत्यनेन मन्त्रेण नमोऽग्नये प्रह्वीभूतास्तुभ्यं वयं पृथिवीक्षिते पृथिवीनिवासाय लोकक्षिते पृथिवीलोकनिवासायेत्यर्थः । लोकं मे मह्यं यजमानाय विन्द लभस्व । एष वै मम यजमानस्य लोक एता गन्ताऽस्मि ॥ ५ ॥

सिद्धान्ती—नंतर यजमानानें आहुति द्यावी.

शिष्यः—आहुतीचा मंत्र ?

सिद्धान्ती—'हे पृथ्वीपते, अग्निदेवते, तुला मी शरण आलों आहों. पृथ्वीलोकाचा स्वामी तो पृथ्वीक्षित् होय. त्या लोकाच्या प्रातीसाठीं म्हणजे पृथ्वीलोकावर वास्तव्य करण्यासाठीं व स्वामी होण्यासाठीं मला यजमानाला हा पृथ्वी लोक प्रात करून दे. ह्या माझा म्हणजे यजमानाचा लोक आहे आणि येथेंच मला यावयाचें आहे ॥५॥

---

## मंत्र सहावा.

**अत्र यजमानः परस्तादायुषः स्वाहाऽपजहि परिघमित्युक्त्वोत्तिष्ठति तस्मै वसवः प्रातःसवनꣳ संप्रयच्छन्ति ॥ ६ ॥**

**अन्वय व अर्थः—अत्र यजमानः 'आयुषः परस्तात् स्वाहा** ( माझें आयुष्य संपल्यानंतर मी यजमान 'ह्या लोकामध्यें जाईन' असा मंत्र म्हणून यजमानानें आहुति द्यावी ) **परिघं अपजहि** ( परिघ म्हणजे अडसर काढून टाक ) **इत्युक्त्वा उत्तिष्ठति** ( असें म्हणून यजमान उठतो; यजमानानें उठावें ) **तस्मै वसवः प्रातःसवनं संप्रयच्छंति** ( यजमानाला अष्ट वसू हे प्रातःसवन-नामक लोक म्हणजे पृथ्वी-लोक प्राप्त करून देतात ) ॥ ६ ॥

अत्रास्मिँल्लोके यजमानोऽहमायुषः परस्तादूर्ध्वं मृतः सन्नित्यर्थः। स्वाहेति जुहोति । अपजह्यपनय परिघं लोकद्वारार्गलमित्येवं मन्त्रमुक्त्वोत्तिष्ठति । एवमेतैर्वसुभ्यः प्रातःसवनसंबंधो लोको निष्क्रीतः स्यात्ततस्ते प्रातःसवनं वसवो यजमानाय संप्रयच्छन्ति ॥ ६ ॥

**सिद्धान्ती—**'माझें म्हणजे यजमानाचें आयुष्य संपल्यानंतर मी ह्या म्हणजे पृथिवीलोकांत जाऊन राहीन.' हा मंत्र यजमानानें म्हणावा आणि 'स्वाहा' म्हणून आहुति द्यावी व 'ह्या लोकाच्या द्वाराला जो अर्गल ( अडसर ) आहे, तो काढून टाक' अशी प्रार्थना करावी आणि यजमानानें उठावें. इतका विधि झाला, वसुदेवतेप्रीत्यर्थ सामगायन आणि अग्नीला समंत्रक आहुति देऊन त्याची प्रार्थना केली म्हणजे प्रातःसवनाशी संबद्ध असलेला जो हा पृथ्वीलोक, तो विकत घेतल्यासारखें होतें; म्हणून ते वसू यजमानाला प्रातःसवनाचें फल देतात आणि यजमानाला हा लोक प्राप्त होतो ॥ ६ ॥

---

## मंत्र सातवा व आठवा.

**पुरा माध्यंदिनस्य सवनस्योपाकरणाज्जघनेनाऽऽग्नीध्रीयस्योदङ्मुख उपविश्य स रौद्र्ँ सामाभिगायति ॥ ७ ॥**

**लो३कद्वारमपावार्णू३३पश्येम त्वा वयं वैरा३३३ ३ ३हु३मू३३ज्या३यो३आ३२१११इति ॥ ८ ॥**

**अन्वय व अर्थः—माध्यंदिनस्य सवनस्य उपाकरणात् पुरा आग्नीध्रीयस्य जघनेन उदङ्मुखः उपविश्य सः रौद्रं साम अभिगायति** ( अर्थ तिसऱ्या मंत्रासारखा ) हें माध्यंदिन सवन आहे म्हणून आग्नीध्रीय म्हणजे दक्षिणाग्नीच्या पाठीमागें बसून रौद्र सामाचें अभिगान करावयाचें; इतकाच फरक आहे ॥ ७ ॥

**अन्वय व अर्थः—लोकद्वारं अपावृणु त्वा वैराज्याय वयं पश्येम** ( येथें वैराज्याची मागणी केली आहे. अर्थ चौथ्या मंत्रासारखा ) ॥ ८ ॥

तथाऽऽग्नीध्रीयस्य दक्षिणाग्नेर्जघनेनोदङ्मुख उपविश्य स रौद्रं सामाभिगायति यजमानो रुद्रदैवत्यं वैराज्याय ॥ ७ ॥ ८ ॥

सिद्धान्ती:—आतांच सांगितल्याप्रमाणें दक्षिणाग्नीच्या पाठीमागें उदङ्मुख होऊन यजमानानें बसावें आणि रौद्रसामाचें अभिगायन वैराज्यप्राप्तीसाठीं करावें. आठवा मंत्र हा रौद्रसाम होय. या सामाची देवता रुद्र आहे. हा मंत्र अंतरिक्ष-लोकाची प्राप्ति करून देणारा उपाय आहे ॥ ७ ॥ ८ ॥

---

## मंत्र नववा व दहावा.

**अथ जुहोति नमो वायवेऽन्तरिक्षक्षिते लोकक्षिते लोकं मे यजमानाय विन्दैष वै यजमानस्य लोक एताऽस्मि ॥ ९ ॥**

**अत्र यजमानः परस्तादायुषः स्वाहाऽपजहि परिघमित्युक्त्वोत्तिष्ठति तस्मै रुद्रा माध्यंदिनꣳ सवनꣳ संप्रयच्छन्ति ॥ १० ॥**

अन्वय व अर्थः—अथ जुहोति " अंतरिक्षक्षिते, लोकक्षिते, **वायवे नमः मे यजमानाय लोकं विंद एषः यजमानस्य लोकः एता अस्मि** " ( अर्थ पांचव्या मंत्राप्रमाणें आहे. मात्र रुद्रांजवळ मागणी अंतरिक्ष लोकाची आहे ) ॥ ९ ॥

**अन्वय व अर्थः**—अत्र आयुषः परस्तात् स्वाहा, "परिघं अपजहि" इत्युक्त्वा यजमानः उत्तिष्ठति, तस्मै रुद्राः माध्यंदिनं सवनं संप्रयच्छंति ( अर्थ साहाव्या मंत्राप्रमाणें. रुद्र यजमानाला अंतरिक्ष लोक प्राप्त करून देतात ) ॥ १० ॥

अन्तरिक्षक्षित इत्यादि समानम् ॥ ७ ॥ ९ ॥

सिद्धान्ती—येथील स्पष्टीकरण पांचव्या व साहाव्या मंत्राप्रमाणें आहे. अंतरिक्षक्षित् अंतरिक्षांत राहणारा व अंतरिक्षस्वामी वायु ॥ ९ ॥ १० ॥

---

## मंत्र अकरावा व बारावा व तेरावा.

**पुरा तृतीयसवनस्योपाकरणाज्जघनेनाऽऽहवनीयस्योदङ्मुख उपविश्य स आदित्यꣳस वैश्वदेवꣳ सामाभिगायति ॥ ११ ॥**

**लो३कद्वारमपावा३र्णू३३पश्येम त्वा वयꣳस्वारा३३३३३हु३म्आ३३ज्या३यो३आ३२१११इति ॥ १२ ॥**

**आदित्यमथ वैश्वदेवं लो३कद्वारमपावा३र्णू३३पश्येम त्वा वयꣳ साम्रा३३३३३हु३म्आ३३ज्या३यो३आ३२१११ इति ॥ १३ ॥**

**अन्वय व अर्थः**—तृतीयसवनस्य उपाकरणात् पुरा आहवनीयस्य जघनेन उदङ्मुखः उपविश्य सः आदित्यं सः वैश्वदेवं साम अभिगायति ( अर्थ तिसऱ्या मंत्राप्रमाणें ) ॥ ११ ॥

**अन्वय व अर्थः**—'लोकद्वारं अपावृणु त्वा स्वाराज्याय वयं' इति ॥ १२ ॥

**अन्वय व अर्थः**—आदित्यं अथ वैश्वदेवं 'लोकद्वारं अपावृणु; त्वा साम्राज्याय वयं साम्ना पश्येम' इति ॥ १३ ॥

**अन्वय व अर्थः**—( बारावा मंत्र आदित्य साम आहे व त्यांत स्वाराज्य ागितलें आहे. आणि तेरावा मंत्र वैश्वदेव साम आहे आणि त्यांत ाम्राज्य मागितलें आहे. अर्थ चौथ्या किंवा आठव्या मंत्राप्रमाणें ारावयाचा ॥ ११ ॥ १२ ॥ १३ ॥

तथाऽऽवहनीयस्योदङ्मुख उपविश्य स आदित्यदैवत्यमादित्यं वैश्वदेवं च सामाभिगायति क्रमेण स्वाराज्याय साम्राज्याय ॥ ११ ॥ १२ ॥ १३ ॥

**सिद्धान्ती**—त्याचप्रमाणें आहवनीयाच्या पाठीमागें जाऊन उदङ्मुख बसा- ायाचें आणि स्वाराज्यासाठीं आदित्यसाम व साम्राज्यासाठीं वैश्वदेव साम यांचें ाायन यजमानानें करावें. स्वाराज्य म्हणजे अंतरिक्षांत स्वातंत्र्य होय ॥ ११ ॥ १२ ॥ १३ ॥

---

## मंत्र चवदावा व पंधरावा.

**अथ जुहोति नम आदित्येभ्यश्च विश्वेभ्यश्च देवे- भ्यो दिविक्षिद्भ्यो लोकक्षिद्भ्यो लोकं मे यजमा- नाय विन्दत ॥ १४ ॥**

**एष वै यजमानस्य लोक एताऽस्म्यत्र यजमानः परस्तादायुषः स्वाहाऽपहत परिघमित्युक्त्वो- त्तिष्ठति ॥ १५ ॥**

**अन्वय व अर्थः**—अथ जुहोति ‘ दिविक्षिद्भ्यः आदित्येभ्यः विश्वेभ्यः च देवेभ्यः लोकक्षिद्भ्यः नमः, यजमानाय लोकं विंदत ।’ ‘ एषः यजमानस्य लोकः एता अस्मि ’ वै; अत्र “ आयुषः परस्तात् स्वाहा परिघं अपहत ” इति उक्त्वा यजमानः उत्तिष्ठति ( अर्थ पांचव्या आणि सहाव्या किंवा नवव्या आणि दहाव्या मंत्रांप्रमाणें आहे. आदित्य आणि विश्वेदेव यांस नमस्कारपूर्वक प्रार्थना आहे ) ॥ १४ ॥ १५ ॥

द्विविक्षिद्ध्य इत्येवमादि समानमन्यत्। विन्दतापहतेति बहुवचनमात्रं विशेषः। याजमानं त्वेतत्। एताऽस्म्यत्र यजमान इत्यादिलिङ्गात्॥ १४॥ १५॥

सिद्धान्ती--स्पष्टीकरण पूर्ववत् आहे. आदित्यादि अनेक आहेत, ह्मणून क्रियापदें अनेकवचनीं आहेत. हे सर्व मंत्र यजमानानें ह्मणावयाचे आहेत. कारण, मी यजमान जाणारा आहे, इत्यादि स्पष्ट चिन्ह आहे॥ १४॥ १५॥

---

## मंत्र सोळावा.

**तस्मा आदित्याश्च विश्वे च देवास्तृतीयसवनं संप्रयच्छन्त्येष ह वै यज्ञस्य मात्रां वेद य एवं वेद य एवं वेद॥ १६॥**

**इति द्वितीयाध्यायस्य चतुर्विंशः खण्डः॥ २४॥**

**अन्वय व अर्थ—आदित्याः च विश्वेदेवाः तस्मै तृतीयसवनं संप्रयच्छंति** ( अर्थ सहाव्या किंवा दहाव्या मंत्रभागाप्रमाणें आहे ) **यः एवं वेद; यः एवं वेद, एषः यज्ञस्य मात्रां वेद ह वै,** (याप्रमाणें सामाचें ज्ञान ज्याला होतें, तो यज्ञाची मात्रा म्हणजे याथात्म्य जाणतो )॥ १६॥

एष ह वै यजमान एवंवित् यथोक्तस्य। सामादेर्विद्वान्यज्ञस्य मात्रां यज्ञयाथात्म्यं वेद यथोक्तम्। य एवं वेद य एवं वेदेति द्विरुक्तिरध्यायपरिसमाप्त्यर्था॥ १६॥

इति द्वितीयाध्यायस्य चतुर्विंशः खण्डः॥ २४॥

सिद्धान्ती—आदित्य आणि विश्वेदेव यजमानाला तृतीयसवनानें प्राप्त होणाऱ्या स्वर्गलोकाची प्राप्ति करून देतात. याप्रमाणें सामाचें होमविधान सांगितलें, तें ज्याला पूर्णत्वानें कळलें, त्या यजमानाला यज्ञाचें पूर्वोक्त माहात्म्य समजतें आणि येथें सांगितल्याप्रमाणें अनुष्ठान केलें असतां भूलोक, भुवर्लोक आणि स्वर्लोक यांच्या प्राप्ती होतात. एवंच यज्ञविधान करणाऱ्यानें सामहोममंत्राचें उद्गान केलें असतां त्याला तीन्ही लोकांची प्राप्ति होते, असें ब्रह्मवादी ह्मणतात. हेच लोकप्राप्तीचे उपाय होत॥ १६॥

## खंड पहिला.

## अध्याय तिसरा.

असौ वा आदित्य इत्याद्यध्यायारम्भे संबन्धः । अतीतानन्तराध्यायान्त उक्तं यज्ञस्य मात्रां वेदेति यज्ञविषयाणि च सामहोममन्त्रोत्थानानि विशिष्टफलप्राप्तये यज्ञाङ्गभूतान्युपदिष्टानि । सर्वयज्ञानां च कार्यनिर्वृत्तिरूपः सविता महत्या श्रिया दीप्यते । स एष सर्वप्राणिकर्मफलभूतः प्रत्यक्षं सर्वैरुपजीव्यते । अतो यज्ञव्यपदेशानन्तरं तत्कार्यभूतसवितृविषयमुपासनं सर्वपुरुषार्थेभ्यः श्रेष्ठतमफलं विधास्यामीत्येवमारभते श्रुतिः—

**सिद्धान्ती**—कर्मांगांशीं संबद्ध असलेलें विज्ञानप्रकरण समाप्त झालें. आतां फल 'जो हा आदित्य' त्याची स्वतंत्र उपासना सांगावी, एतदर्थ या अध्याग आरंभ केला आहे.

**शिष्य**—म्हणजे मागच्या अध्यायाच्या शेवटीं 'यज्ञाचें माहात्म्य ज्याला जलें इ०' सांगून यज्ञविषयक साम होममंत्रांचीं लोकत्रयात्मक विशिष्टफल रीं यज्ञांगभूत उत्थानेंही उपदेशिलीं. आतां यापुढें यज्ञफल किंवा कर्मफल सूर्य त्याचा उपदेश करावयाचा आहे.

**सिद्धान्ती**—असो; मागें उपासना सांगितली, आतां उपासना–फल ावयाचें आहे. सर्व यज्ञांच्या कार्यापासून उत्पन्न होणारा फलरूपी सविता त तेजानें प्रकाशित असतो. तोच हा सर्व प्राण्यांच्या याज्ञिक कर्मांचें फल न, सर्व–प्रत्यक्ष आहे. सर्व प्राण्यांकडून त्याचें साक्षात् उपजीवन होतें; म्हणून च्या उपदेशानंतर यज्ञकार्यभूत जो सविता, तद्विषयक उपासना सांगणें, हें च आहे. आतांपर्यंत निवेदलेल्या सर्व पुरुषार्थांपेक्षां सवित्रोपासनेचें फल अत्यंत आहे. फार काय सांगावें ? क्रमानें मुक्तिच देणारें हें फल होतें; म्हणून ासनेचें प्रकरण श्रुतीनें आरंभिलें आहे—

---

### मंत्र पहिला.

**ॐ । असौ वा आदित्यो देवमधु तस्य द्यौरेव तिरश्चीनवꣳशोऽन्तरिक्षमपूपो मरीचयः पुत्राः ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—असौ वै आदित्यः देवमधु** ( हा आदित्य खरोखर देवांस आनंद देणारा मध आहे) **तस्य द्यौः एव तिरश्चीनवंशः, अंतरिक्षं अपूपः, मरीचयः पुत्राः** (द्यौ म्हणजे स्वर्ग हा त्याचा तिरश्चीन म्हणजे वांकडा असणारा वंश आहे. अंतरिक्ष हें अपूप होय. आणि मरीची म्हणजे सूर्यकिरण हे त्याचे पुत्र होत ॥ १ ॥

असौ वा आदित्यो देवमध्वित्यादि । देवानां मोदनान्मध्विव मध्वसावादित्यः । वस्वादीनां च मोदनहेतुत्वं वक्ष्यति सर्वयज्ञफलरूपत्वादादित्यस्य । कथं मधुत्वमित्याह—तस्य मधुनो द्यौरेव भ्रामरस्येव मधुनस्तिरश्चीनश्चासौ वंशश्चेति तिरश्चीनवंशः । तिर्यग्गतेव हि द्यौर्लक्ष्यते । अन्तरिक्षं च मध्वपूपो द्युवंशे लग्नः सँल्लम्बत इवातो मध्वपूपसामन्यादन्तरिक्षं मध्वपूपो मधुनः सवितुराश्रयत्वाच्च । मरीचयो रश्मयो रश्मिस्था आपो भौमाः सवित्राकृष्टाः । 'एता वा आपः स्वराजो यन्मरीचय' इति हि विज्ञायन्ते । ता अन्तरिक्षमध्वपूपस्थरश्म्यन्तर्गतत्वाद्भ्रमरबीजभूताः पुत्रा इव हिता लक्ष्यन्त इति पुत्रा इव पुत्रा मध्वपूपनाड्यन्तर्गता हि भ्रमरपुत्राः ॥ १ ॥

सिद्धान्ती—हा आदित्य देवमधु आहे. देवांना आनंद देणारा तो देवमधु होय. भ्रमरसंचित मधु म्हणजे मध. मध चाखला असतां जसा आपल्यास आनंद होतो, तसा आदित्यापासून वसुदेवांना आनंद होतो. म्हणून 'त्याला देवमधु' म्हटलें. पुढें हीच श्रुति सांगेल कीं, 'आदित्य हा सर्व यज्ञाचें फलरूप असतो' म्हणून तो फलभोक्त्या वसुप्रभृति देवतांस व विद्वान् उपासकांस आनंद देतो. तात्पर्य, देव—मधुदृष्टीनें आदित्याची उपासना करावी.

**पूर्व०**—पण आदित्याला मधाची उपमा कशी दिली?

**सिद्धान्ती**—द्यौ म्हणजे स्वर्ग हा आदित्याचा तिरश्चीन वंश आहे.

**शिष्य**—तिरश्चीन वंश म्हणजे ?

**सिद्धान्ती**—तिर्यक् म्हणजे वांकडा जाणारा तो तिरश्चीन. वंश म्हणजे मधाचें पोळें. भ्रमरानें संग्रहित केलेला मध पोळ्यांत असतो, त्याप्रमाणें स्वर्ग हा जणो ह्या आदित्यरूपी मधाचें पोळें आहे. अंतरिक्षांत राहणारे जे प्राणी आहेत; त्यांनीं वर डोळे करून स्वर्गाकडे पाहिलें, तर त्यांस हा वर्तुलाकृति स्वर्ग मधाच्या पोळ्यासारखा दिसेल, म्हणून आदित्यरूपी मधाचा संग्रह करणारा

स्वर्ग म्हणजे मधाचें पोळें होय. अंतरिक्षस्थ प्राण्यांस स्वर्ग पोळयासारखा दिसतो; तेव्हां त्यांत संग्रहित झालेला सूर्य हा मधु होतो. असो; अंतरिक्ष अपूप होय. अपूप म्हणजे मध काढून घेतल्यानंतर शिल्लक राहिलेला पोळयाचा भाग.

शिष्य—बरोबरच आहे. मधाच्या पोळ्याला चिकटलेला अपूप जसा लोंबत असतो, तसें हें अंतरिक्ष (स्वर्ग आणि पृथ्वी यांच्यांमधील प्रदेश) स्वर्गाला चिकटून राहून खालीं लोंबत असतें.

सिद्धान्ती—असो; अंतरिक्षही सूर्याला आश्रय देणाऱ्या स्वर्गाच्या खालीं लोंबत राहतें; म्हणून अंतरिक्षाला अपूप असें म्हणावयाचें. आतां, मरीची म्हणजे रश्मी अथवा सूर्य—किरणांत राहणारे पृथ्वीवरील जलबिंदु होत. यांना सूर्य नित्य आकर्षित असतो. 'हे रश्मी, किंवा हे जलबिंदु स्वयंप्रकाशी सूर्याचे किरणाप्रमाणेंच भासमान होत असतात' असें श्रुति म्हणते. हे जलबिंदू अंतरिक्षरूपी मध्वपूपांच्या नाड्यांत (मध नसणाऱ्या पोळयांच्या छिद्रांत) राहणाऱ्या किरणांच्या अंतर्गत असतात, म्हणून ते त्या सूर्यमधूचे पुत्र होत. आपण मधाचें पोळें पाहिलें, तर त्यांत भ्रमराचीं पुत्रभूत अंडीं, पोळयाच्या छिद्रांमध्यें नेहमीं पाहतों. हाच दृष्टान्त घेऊन श्रुति म्हणते कीं, भूमीपर्यंत येणारे सूर्यकिरण अथवा त्या किरणांतील जलबिंदु हे भ्रमराचे जणों कांहीं पुत्रच होत. हें अशा-करितां सांगितलें आहे कीं, या जलबिंदूचे ठिकाणीं भ्रमरबीजांची दृष्टि करून उपासना करावी. याप्रमाणें सूर्य हा मधु, स्वर्ग मधाचें पोळें, अंतरिक्ष मध-शून्य पोळें, आणि मरीचि म्हणजे भ्रमराचीं अंडीं, असें रूपक ठरलें. तेव्हां सूर्यावर मधूची, स्वर्गावर तिरश्चीनवंशाची, अंतरिक्षावर अपूपाची आणि किरण-गत जलबिंदूवर भ्रमरबीजाची, अशी दृष्टि ठेवावी ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**तस्य ये प्राञ्चो रश्मयस्ता एवास्य प्राच्यो मधु-नाड्यः। ऋच एव मधुकृत ऋग्वेद एव पुष्पं ता अमृता आपस्ता वा एता ऋचः ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः—तस्य ये प्राञ्चः रश्मयः, ताः एव अस्य प्राच्यः मधुनाड्यः** (त्या सूर्याचे पूर्वेकडे जाणारे जलसंपृक्त किरण ते ह्याच्या प्राच्य मधुनाड्या होत) **ऋचः एव मधुकृतः; ऋग्वेदः एव पुष्पं, ताः अमृताः आपः; ताः वै एताः ऋचः** (ऋचा हेच हा सूर्यरूपीमधु सिद्ध करणारे भ्रमर होत. ऋग्वेद हें पुष्प होय. आणि कर्मा-मध्यें घृतरूपी आहुति तें अमृत जल होय. ह्या ऋचा म्हणजे भ्रमर होत) ॥ २ ॥

तस्य सवितुर्मध्वाश्रयस्य मधुनो ये प्राञ्चः प्राच्यां दिशि गता रश्मयस्ता एवास्य प्राच्यः प्रागञ्चनान्मधुनो नाड्यो मधुनाड्य इव मध्वाधारच्छिद्राणीत्यर्थः । तत्र ऋच एव मधुकृतो लोहितरूपं सवित्राश्रयं मधु कुर्वन्तीति मधुकृतो भ्रमरा इव यतो रसानादाय मधु कुर्वन्ति । तत्पुष्पमिव पुष्पमृग्वेद एव । तत्र ऋग्ब्राह्मणसमुदायस्यर्ग्वेदाख्यत्वाच्छब्दमात्राच्च भोग्यरूपरसनिस्रावासंभवादृग्वेदशब्देनात्र ऋग्वेदविहितं कर्म । ततो हि कर्मफलभूतमधुरसनिस्रावसंभवात् । मधुकरैरिव पुष्पस्थानीयादृग्वेदविहितात्कर्मणोऽप आदाय ऋग्भिर्मधु निर्वर्त्यते । कास्ता आप इत्याह—ताः कर्मणि प्रयुक्ताः सोमाज्यपयोरूपा अग्नौ प्रक्षिप्तास्तत्पाकाभिनिर्वृत्ता अमृता अमृतार्थत्वादत्यन्तरसवत्य आपो भवन्ति । तद्रसानादाय ता वा एता ऋचः पुष्पेभ्यो रसमाददाना इव भ्रमरा ऋचः ॥ २ ॥

**सिद्धान्ती**—मधाला आश्रय देणाऱ्या त्या मधुरूपी सूर्याचे पूर्वेकडे जाणारे जे किरण असतात; तेच या सूर्याचे प्राच्य मधुनाडीरूप होत.

**शिष्य**—मधुनाडी म्हणजे काय ?

**सिद्धान्ती**—मधाला आश्रय देणारीं जीं छिद्रें, मध ज्यांत राहतों तीं छिद्रें म्हणजे ह्या मधुनाड्या होत. सूर्याचे पूर्वेकडे गेलेले किरण म्हणजे या मधुनाड्या. हे किरण सूर्योदय दिसण्याच्या आधींच पूर्वेकडे प्रसृत झालेले असतात; म्हणून यांना प्राच्य असें म्हटलें आहे. असो ; येथें ऋग्-मंत्र हे भ्रमर होत. हे ऋग्भ्रमर आदित्याला आश्रय देणाऱ्या मधाला लोहित ( रक्तरूप ) करितात, म्हणून या मन्त्रांना मधुकृत अथवा भ्रमर म्हणतात. ज्याप्रमाणें भ्रमर पुष्पांपासून रस आकर्षून घेऊन आपल्या पोळ्यांत त्याला मधाचें स्वरूप देतात, तांबडा मध करितात, त्याप्रमाणें हे मंत्र सवितृरूपी मधाला (सवित्याला आश्रय देणाऱ्या मधाला ) रक्त-वर्ण करितात.

**शिष्य**—येथें पुष्प कोणतें ?

**सिद्धान्ती**—ऋग्वेद हें पुष्प होय. ऋग्वेदांतील जीं ब्राह्मणें आहेत, त्यांच्या व ऋक्संहितेच्या समुदायाला ऋग्वेद असें म्हणतात. शिवाय श्रुतीनें ऋग्वेद हा शब्द उल्लेखिला आहे. म्हणून ऋग्वेद ( संहितेसह ब्राह्मणमंत्र ) हें पुष्प होय.

**पूर्वपक्षी**—पण ऋग्वेद हें पुष्प कसें ? ऋग्वेदापासून उपभोगाला योग्य असणारा रस निष्पन्न होत नाहीं. तेव्हां हें मधुरूपक व्यर्थ आहे.

**सिद्धान्ती**—तसें नाहीं. ऋग्वेद–शब्दानें येथें ऋग्वेदानें सांगितलेलें कर्म असा अर्थ अभिप्रेत आहे. कारण कर्मापासून उत्पन्न होणारें जें सुंदर फल त्यांतून मात्र मधुर रसस्राव होण्याचा संभव असतो. पुष्पांतूनही रस निघतो. म्हणून ऋग्वेद–विहित कर्माच्या अर्थावर लक्षणा करून ऋग्वेदाला पुष्प असें श्रुतीनें म्हटलें आहे. ज्याप्रमाणें मधुकर पुष्पांपासून मध गोळा करितात, त्याप्रमाणें ऋग्वेदविहित कर्मापासून जो रस उत्पन्न होतो, तो संपादन करून ऋग्मंत्र त्या रसाला मधु स्वरूप देतात.

**शिष्य**—याप्रमाणें ऋग्वेद ( ऋग्वेदविहित कर्म ) हें पुष्प, ऋग्मंत्र हे मधुकर, पूर्वेकडे जाणारे सूर्यकिरण या मधुनाड्या आणि सूर्य मधु असें हें रूपक ठीक जमलें. आतां मला इतकेंच समजून द्यावें कीं, ऋग्वेदरूपी पुष्पांत आप किंवा जल ( रस ) असतें, असें श्रुति म्हणते. तें जल किंवा आप कोणतें, कीं ज्याचा पुढें मधुनाड्यांत मध होतो ?

**सिद्धान्ती**—सोमरस, घृत किंवा दुग्ध इत्यादि–रूपांनीं अग्नीमध्यें जे रस आपण यज्ञ करीत असतां आहुत करितों, तें जल, रस, किंवा आप होय. ह्याचा परिपाक अग्नीमध्यें झाला म्हणजे त्याला अमृतस्वरूप प्राप्त होतें.

**शिष्य**—अमृतस्वरूप म्हणजे ?

**सिद्धान्ती**—तें आप अत्यंत रसवंत होतें. उत्कृष्ट फल देणारें तें होतें. या निष्काम यज्ञकर्मानें व निष्काम सूर्योपासनेनें जें विलक्षण ‘ अपूर्व ’ उत्पन्न होतें, तेंच परंपरेनें आपल्या मुक्तीचें अथवा मोक्षाचें किंवा अमृतत्वाचें कारण होतें. असो; हे सोम आज्य आदि परिपक्करस घेऊन हे ऋग्मंत्ररूपी भ्रमर या रसाला मधुस्वरूप देतात. तात्पर्य, सूर्याला प्रातःकाळीं जें रक्तस्वरूप प्राप्त होतें, तें ऋग्वेदमंत्राच्या साह्यानें यज्ञकर्मांतील सोमादि आहुतींनीं उत्पन्न होणाऱ्या परिपक्व अमृतरसामुळें प्राप्त होतें. हें रक्तरूप अमृत हा मध, ऋग्वेदकर्म हें पुष्प, ऋग्मंत्र हे भ्रमर, आणि सूर्याचे प्राच्य किरण या मधुनाड्या होत. या दृष्टीनें सूर्याची उपासना केली असतां ती उत्कृष्ट फल उत्पन्न करिते ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**एतमृग्वेदमभ्यतपꣳस्तस्याभितप्तस्य यशस्तेज इन्द्रियं वीर्यमन्नाद्यꣳ रसोऽजायत॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थः—एतं ऋग्वेदं अभ्यतपन्** ( ह्या ऋग्वेदाला ऋग्मंत्रांनीं अभितप्त केलें) **तस्य अभितप्तस्य यशः, तेजः, इंद्रियं, वीर्यं,**

**अन्नाद्यं, रसः अजायत** ( त्या अभितप्त झालेल्या ऋग्वेदोक्त कर्मापासून रस उत्पन्न झाला. तो रस म्हणजे कीर्ति, दीप्ति, इंद्रियपटुत्व, बल, आणि अन्नाद्य या फलांचा दाता झाला ) ॥ ३ ॥

एतमृग्वेदमृग्वेदविहितं कर्म पुष्पस्थानीयमभ्यतपन्नभितापं कृतवत्य इवैता ऋचः कर्मणि प्रयुक्ताः । ऋग्भिर्हि मन्त्रैः शस्त्राद्यङ्गभावमुपगतैः क्रियमाणं कर्म मधुनिर्वर्तकं रसं मुञ्चतीत्युपपद्यते पुष्पाणीव भ्रमरैराचूष्यमाणानि । तदेतदाह—तस्यर्ग्वेदस्याभितप्तस्य । कोऽसौ रसो य ऋङ्मधुकराभितापनिःसृत इत्युच्यते। यशो विश्रुतत्वं, तेजो देहगता दीप्तिः, इन्द्रियं सामर्थ्योपेतैरिन्द्रियैरवैकल्यं, वीर्यं सामर्थ्यं बलमित्यर्थः । अन्नाद्यमन्नं च तदाद्यं च येनोपयुज्यमानेनाहन्यहनि देवानां स्थितिः स्यात्तदन्नाद्यं, एष रसोऽजायत यागादिलक्षणात्कर्मणः ॥ ३ ॥

**सिद्धान्ती**—मागच्या मंत्रांत सांगितल्याप्रमाणें पुष्पस्थानीं असणाऱ्या या ऋग्वेदाला ( संहितासहित ब्राह्मणाला ) म्हणजे ऋग्वेदविहित कर्माला ऋचांनीं जणों कांहीं अभितप्त केलें, म्हणजे यज्ञकर्मामध्यें विनियुक्त झालेल्या ऋग्मंत्रांनीं ऋग्वेदोक्त कर्म संस्कृत केलें. *शस्त्रादिकांचीं अंगें ( अवयव ) असणाऱ्या ऋग्मंत्रांच्या साह्यानें होणारें कर्म मधुजनक रस उत्पन्न करितें, असें म्हणणें नीट आहे. भ्रमरांनीं चोखलेलीं पुष्पें स्वरस देतात, त्याप्रमाणें ऋचांच्या साह्यानें होणारें वेदोक्त कर्म मधु-निवर्तक रस उत्पन्न करितें.

**शिष्य**—हा रस परिपक्व झाला म्हणजे त्याचें काय होतें ? त्याचें स्वरूप काय असतें ?

**सिद्धान्ती**—ऋग्रूपी मधुकरांनीं संस्कृत केलेला तांबडा रस कीर्ति देणारा, शरीरयष्टि सतेज करणारा, आपलीं सर्व इंद्रियें स्वकर्मदक्ष करणारा, वीर्य म्हणजे सामर्थ्य किंवा बल देणारा, या स्वरूपाचा होतो. तसेंच ज्याचा उपभोग रोजच्या रोज घेतला, म्हणजे देवांचा योगक्षेम चालतो, तें अन्नाद्य उत्पन्न करणारा हा रस असतो. अन्न असून उपभोगास योग्य असणारें तें अन्नाद्य होय. तात्पर्य, यज्ञयागादि कर्मापासून उत्पन्न होणारा रस यश, तेजास्विता, इंद्रियसामर्थ्य, शरीरबल आणि अन्नाद्यता इत्यादि फलें देणारा होतो ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा.

**तद्व्यक्षरत्तदादित्यमभितोऽश्रयत्तद्वा एतद्यदेत-
दादित्यस्य रोहितꣳ रूपम् ॥ ४ ॥**

**इति तृतीयाध्यायस्य प्रथमः खण्डः ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः**—तत् व्यक्षरत् (तें यशादि रस विशिष्टप्रकारानें गमन करितें झालें) **तदा आदित्यं अभितः अश्रयत्** ( आणि त्यानें पाठीमागून जाऊन आदित्याचा पूर्वभाग व्यापून टाकिला ) **यत् एतत् आदित्यस्य रोहितं रूपं, तत् एतत् वै** ( प्रातःकालीन आदित्याचें जें हें रोहित म्हणजे रक्तरूप आहे, तें हें यशादि होय ) यज्ञ–कर्मफल आदित्यापर्यंत जाऊन आदित्याला रक्तरूप करितें ॥ ४ ॥

यशआद्यन्नाद्यपर्यन्तं तद्व्यक्षरद्विशेषेणाक्षरदगमत् । गत्वा च तदादित्यमभितः पार्श्वतः पूर्वभागं सवितुरश्रयदाश्रितवदित्यर्थः । अमुष्मिन्नादित्ये संचितं कर्मफलाख्यं मधु भोक्ष्यामह इत्येवं हि यशआदिलक्षणफलप्राप्तये कर्माणि क्रियन्ते मनुष्यैः केदारनिष्पादनमिव कर्षकैः । तत्प्रत्यक्षं प्रदर्श्यते श्रद्धाहेतोस्तद्वा एतत् । किं तद्यदेतदादित्यस्योद्यतो दृश्यते रोहितं रूपम् ॥ ४ ॥

इति तृतीयाध्यायस्य प्रथमः खण्डः ॥ १ ॥

**सिद्धान्ती**—मागच्या मंत्रांत यशापासून अन्नाद्यापर्यंतचे गुण उत्पन्न करणारा जो रस सांगितला, तो स्वविशेषसामर्थ्यानें आदित्यापर्यंत जातो आणि तेथें पाठीमागून जाऊन सूर्याचा जो पूर्वभाग असतो, त्याच्या आश्रयानें राहतो.

**पूर्वपक्षी**—या सर्वांचा प्रस्तुत प्रकरणाशीं काय संबंध आहे ?

**सिद्धान्ती**—सामान्यतः जीव जीं वेदोक्त कर्मे करितात, तीं फलप्राप्ति व्हावी, यासाठीं करितात. यज्ञयागादि कर्म हें रस उत्पन्न करितें; आणि यश, तेज, सामर्थ्य इत्यादिकांचा जनक हा रस होतो. तेव्हां ह्या आदित्यामध्यें संचित होणारा कर्मफल नांवाचा मधु आपण उपभोगूं; तात्पर्य, यशादि फलें आपल्यास प्राप्त होतील म्हणून मानवी जीव शास्त्रोक्त कर्मे करितात. शेतकरी लोक ज्याप्रमाणें फलाच्या आशेनें झाडास आळीं करितात, त्याप्रमाणेंच मनुष्यें यशआदि फलप्राप्त्यर्थ यज्ञादि कर्मे करितात.

पूर्वपक्षी—कशावरून ? तें हें रक्तरूपी सूर्यबिंब तर प्रत्यक्ष आहे.

सिद्धान्ती—अहो ! त्या ह्या प्रत्यक्ष दिसणाऱ्या उदयगामी सूर्याचें स्वरूप लाल असतें; पण तें लाल कां ? तर सामर्थ्य, तेज इत्यादिकांनीं तें लाल होतें. हें रक्तरूप म्हणजे आपलें कर्मफल आहे; अशी याज्ञिकांच्या अंत:करणांत कर्माविषयीं श्रद्धा उत्पन्न व्हावी म्हणून हें प्रत्यक्ष कर्मफल म्हणजे सूर्याचें रक्तस्वरूप होय, असें श्रुतीनें सांगितलें आहे ॥ ४ ॥

खंड पहिला समाप्त.

---

## खंड दुसरा.

### मंत्र पहिला.

**अथ येऽस्य दक्षिणा रश्मयस्ता एवास्य दक्षिणा मधुनाड्यो यजूंष्येव मधुकृतो यजुर्वेद एव पुष्पं ता अमृता आपः ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थ:—अथ अस्य ये दक्षिणाः रश्मयः, ताः एव अस्य दक्षिणाः मधुनाड्यः; यजूंषि एव मधुकृतः; यजुर्वेदः एव पुष्पं, ताः अमृताः आपः** ( आतां या सूर्याचे जे दक्षिणादिग्गामी किरण आहेत, तेच याच्या दक्षिणेकडील मधुनाड्या होत. यजु हे भ्रमर, यजुर्वेद हें पुष्प आणि सोमादि रस अमृत होत ) ॥ १ ॥

अथ येऽस्य दक्षिणा रश्मय इत्यादि समानम् । यजूंष्येव मधुकृतो यजुर्वेदविहिते कर्मणि प्रयुक्तानि । पुर्ववन्मधुकृत इव । यजुर्वेदविहितं कर्म पुष्पस्थानीयं पुष्पमित्युच्यते । ता एव सोमाद्या अमृता आपः ॥ १ ॥

सिद्धान्ती—या मंत्राचा अर्थ पहिल्या खंडांतील दुसऱ्या मंत्राप्रमाणें आहे. दक्षिणेकडे जाणाऱ्या किरणांचें वर्णन आहे. यजुर्वेदोक्त कर्मांत उपयुक्त असणारे यजू भ्रमर आहेत व यजुर्वेदोक्त कर्म हें पुष्प होय. त्यांत उत्पन्न होणारा रस अमृत होय ॥ १ ॥

---

## मन्त्र दुसरा.

**तानि वा एतानि यजूꣳष्येतं यजुर्वेदमभ्यतपꣳस्त-स्याभितप्तस्य यशस्तेज इन्द्रियं वीर्यमन्नाद्यꣳ रसोऽ-जायत ॥ २ ॥**

अन्वय व अर्थः—तानि वै एतानि यजूंषि एतं यजुर्वेदं अभ्य-तपन्; तस्य अभितप्तस्य यशः, तेजः, इंद्रियं, वीर्यं, अन्नाद्यं, रसः अजायत ( त्या ह्या यजूंनीं ह्या यजुर्वेदाचें अभ्य-तपन केलें. आणि अभितप्त झालेल्या यजुर्वेदापासून-यजुर्वेदोक्त कर्मापासून-उत्पन्न झालेला रस हा यश, तेज, इंद्रिय, वीर्य, अन्नाद्य, ह्यांमध्यें परिणत झाला ) ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**तद्व्यक्षरत्तदादित्यमभितोऽश्रयत्तद्वा एतद्यदेत-दादित्यस्य शुक्लꣳ रूपम् ॥ ३ ॥**

**इति तृतीयाध्यायस्य द्वितीयः खण्डः ॥ २ ॥**

अन्वय व अर्थः—तत् व्यक्षरत; तत् आदित्यं अभितः अश्र-यत्; यत् एतत् आदित्यस्य शुक्लं रूपं तत् एतत् वै ( अर्थ पहिल्या खंडांतील चौथ्या मंत्राप्रमाणें आहे. तेथें रोहित रूप होतें, येथें शुक्ल म्हणजे पांढरें स्वरूप आहे ) ॥ ३ ॥

तानि वा एतानि यजूंष्येतं यजुर्वेदमभ्यतपन्नित्येवमादि सर्वं समानम् । मध्येतदादित्यस्य दृश्यते शुक्लं रूपम् ॥ २ ॥ ३ ॥

इति तृतीयाध्यायस्य द्वितीयः खण्डः ॥ २ ॥

सिद्धान्तीः—याचें स्पष्टीकरण मागच्या खंडांतील तिसऱ्या आणि चौथ्या मंत्रांप्रमाणें आहे. यजूंचा आदित्यसंबंधी मधु शुक्ल प्रत्यक्ष दिसतो. मध्यान्हींचा सूर्य शुभ्र दिसतो, हें सांगावयास नकोच ॥ २ ॥ ३ ॥

खंड दुसरा समाप्त.

---

## खंड तिसरा.

### मंत्र पहिला.

अथ येऽस्य प्रत्यञ्चो रश्मयस्ता एवास्य प्रतीच्यो मधुनाड्यः सामान्येव मधुकृतः सामवेद एव पुष्पं ता अमृता आपः ॥ १ ॥

अन्वय व अर्थः—अथ अस्य ये प्रत्यञ्चः रश्मयः, ताः एव अस्य प्रतीच्यः मधुनाड्यः; सामानि एव मधुकृतः; सामवेदः एव पुष्पं; ताः आपः अमृताः (अर्थ मागच्या खंडांतील दुसऱ्या मंत्राप्रमाणें. येथें सामें मधुकर आणि सामवेद पुष्प असें रूपक आहे) ॥ १ ॥

### मंत्र दुसरा.

तानि वा एतानि सामान्येतँ सामवेदमभ्यतपँ स्तस्याभितप्तस्य यशस्तेज इन्द्रियं वीर्यमन्नाद्यँ रसोऽजायत ॥ २ ॥

अन्वय व अर्थः—तानि वै एतानि सामानि एतं सामवेदं अभ्यतपन्; तस्य अभितप्तस्य यशः, तेजः, इंद्रियं, वीर्यं, अन्नाद्यं, रसः अजायत (अर्थ पहिल्या खंडांतील तिसऱ्या मंत्राप्रमाणें. येथें सामांनीं सामवेदाला अभितप्त केलें आहे) ॥ २ ॥

### मंत्र तिसरा.

तद्व्यक्षरत्तदादित्यमभितोऽश्रयत्तद्वा एतद्यदेतदादित्यस्य कृष्णँ रूपम् ॥ ३ ॥

इति तृतीयाध्यायस्य तृतीयः खण्डः ॥ ३ ॥

**अन्वय व अर्थः—तत् व्यक्षरत्; तत् आदित्यं अभितः अश्रयत्; यत् आदित्यस्य कृष्णं रूपं तत् एतत् वै** (अर्थ पहिल्या खंडांतील चौथ्या मंत्राप्रमाणें आहे. येथें आदित्याचें स्वरूप कृष्ण म्हणजे काळें आहे) ॥३॥

अथ येऽस्य प्रत्यञ्चो रश्मय इत्यादि समानम् । तथा साम्नां मधु । एतदादित्यस्य कृष्णं रूपम् ॥ १ ॥ २ ॥ ३ ॥

इति तृतीयाध्यायस्य तृतीयः खण्डः ॥ ३ ॥

सिद्धान्ती—स्पष्टीकरण पूर्ववत्. प्रत्यञ्च म्हणजे पश्चिमेकडे जाणारे. येथें सामें मधुकर; सामवेद पुष्प; असें स्वरूप आहे. आदित्याचें रूप कृष्ण आहे. रात्रीचा सूर्य ( ! ) काळाच असणार ! ॥ १ ॥ २ ॥ ३ ॥

खंड तिसरा समाप्त.

---

## खंड चौथा.

---

### मंत्र पहिला.

**अथ येऽस्योदञ्चो रश्मयस्ता एवास्योदीच्यो मधुनाड्योऽथर्वाङ्गिरस एव मधुकृत इतिहासपुराणं पुष्पं ता अमृता आपः ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—अथ अस्य ये उदञ्चः रश्मयः, ताः एव अस्य उदीच्यः मधुनाड्यः; अथर्वाङ्गिरसः एव मधुकृतः; इतिहासपुराणं पुष्पं; ताः आपः अमृताः** ( अर्थ पहिल्या खंडांतील दुसऱ्या मंत्राप्रमाणें. उदञ्च म्हणजे उत्तरेकडे जाणारे. येथें अथर्वाङ्गिरस हे भ्रमर, इतिहास–पुराण हें पुष्प, असें रूपक आहे ) ॥ १ ॥

---

### मंत्र दुसरा.

**ते वा एतेऽथर्वाङ्गिरस एतदितिहासपुराणमभ्यतपꣳस्तस्याभितप्तस्य यशस्तेज इन्द्रियं वीर्यमन्नाद्यꣳरसोऽजायत ॥ २ ॥**

अन्वय व अर्थः—ते वै एते अथर्वाङ्गिरसः एतत् इतिहासपुराणं अभ्यतपन्; तस्य अभितप्तस्य यशः, तेजः, इंद्रियं, वीर्यं, अन्नाद्यं रसः अजायत ( अर्थ पूर्ववत्–खंड १ मंत्र ३ पहा.– अथर्वाङ्गिरसांनीं इतिहास–पुराणाचें अभ्यतपन केलें, हा काय तो भेद आहे ) ॥ २ ॥

---

### मंत्र तिसरा.

**तद्व्यक्षरत्तदादित्यमभितोऽश्रयत्तद्वा एतद्यदे-तदादित्यस्य परं कृष्णꣳरूपम् ॥ ३ ॥**

**इति तृतीयाध्यायस्य चतुर्थः खण्डः ॥ ४ ॥**

अन्वय व अर्थः—तत् व्यक्षरत्; तत् आदित्यं आभितः अश्रयत्; यत् एतत् आदित्यस्य परं कृष्णं रूपं तत् एतत् वै ( अर्थ पूर्ववत्; खं० १ मंत्र ४ पहा. येथें आदित्याचें रूप अत्यंत कृष्ण आहे) ॥ ३ ॥

अथ येऽस्योदञ्चो रश्मय इत्यादि समानम् । अथर्वाङ्गिरसोऽथर्वणाऽङ्गिरसा च दृष्टा मन्त्रा अथर्वाङ्गिरसः कर्माणि प्रयुक्ता मधुकृतः । इतिहासपुराणं पुष्पम् । तयोश्चेतिहासपुराणयोरश्वमेधे पारिप्लवासु रात्रिषु कर्माङ्गत्वेन विनियोगः सिद्धः मध्वेतदादित्यस्य परं कृष्णं रूपमतिशयेन कृष्णमित्यर्थः ॥ १ ॥ २ ॥ ३ ॥

इति तृतीयाध्यायस्य चतुर्थः खण्डः ॥ ४ ॥

सिद्धान्ती—या खंडांतील मंत्रांचें स्पष्टीकरण पूर्वीप्रमाणें आहे. अथर्व आणि अंगिरस हे ज्या मंत्रांचे द्रष्टे झाले, ते यज्ञकर्मामध्यें उपयोजित होणारे अथर्वांगिरस–दृष्ट मंत्र हे मधुकर, इतिहास–पुराण हें पुष्प, असें रूपक आहे. अश्वमेध नामक यज्ञामध्यें ज्यामितापरिहारार्थ ( बंधुबांधवांच्या संहारानें उत्पन्न होणाऱ्या पापाच्या परिहारार्थ ) कांहीं पारिप्लव म्हणजे कांहीं कथा रात्रीं सांगत असतात; म्हणून इतिहास–पुराणें अश्वमेधाचें एक कर्मांग होत हें इतिहासपुराणद्वय येथें पुष्प आहे. ह्या आदित्याचें रूप अत्यंत कृष्ण असतें ॥ १ ॥ २ ॥ ३ ॥

खंड चौथा समाप्त.

## खंड पांचवा.

### मंत्र पहिला.

**अथ येऽस्योर्ध्वा रश्मयस्ता एवास्योर्ध्वा मधुनाड्यो गुह्या एवाऽऽदेशा मधुकृतो ब्रह्मैव पुष्पं ता अमृता आपः ॥ १ ॥**

अन्वय व अर्थः—अथ अस्य ये ऊर्ध्वाः रश्मयः, ताः एव अस्य ऊर्ध्वाः मधुनाड्यः; गुह्याः आदेशाः एव मधुकृतः; ब्रह्म एव पुष्पं; ताः आपः अमृताः (अर्थ पूर्ववत्. येथें सूर्यकिरण ऊर्ध्वगामी आहेत. म्हणजे गुप्त आदेश–विधी–हे मधुकर आणि ब्रह्म (ओंकार) पुष्प. येथें आदित्याचें रूप मध्यभागीं दिसत असतें ॥ १ ॥

### मंत्र दुसरा.

**ते वा एते गुह्या आदेशा एतद्ब्रह्माभ्यतपꣳस्तस्याभितप्तस्य यशस्तेज इन्द्रियं वीर्यमन्नाद्यꣳरसोऽजायत ॥ २ ॥**

अन्वय व अर्थः—ते एते वै गुह्याः आदेशाः एतत् ब्रह्म अभ्यतपन्; तस्य अभितप्तस्य यशः; तेजः, इंद्रियं, वीर्यं, अन्नाद्यं, रसः अजायत (त्या रहस्ययुक्त आदेशांनीं ब्रह्माची (ओंकाराची) तपश्चर्या इत्यादि अर्थ पूर्वींप्रमाणें आहे) ॥ २ ॥

### मंत्र तिसरा.

**तद्व्यक्षरत्तदादित्यमभितोऽश्रयत्तद्वा एतद्यदेतदादित्यस्य मध्ये क्षोभत इव ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थः—तत् व्यक्षरत्; आदित्यं अभितः अश्रयत्; तत् वै एतत् यत् एतत् आदित्यस्य मध्ये क्षोभते इव** ( आदित्याच्यामध्यें हलत आहे असें दिसतें तें आदित्यरूप. बाकीचा अर्थ मागें झाला आहे ) ॥ ३ ॥

अथ येऽस्योर्ध्वा रश्मय इत्यादि पूर्ववत् । गुह्या गोप्या रहस्या एवाऽऽदेशा लोकद्वारीयादिविधय उपासनानि च कर्माङ्गविषयाणि मधुकृतो ब्रह्मैव शब्दाधिकारात्प्रणवाख्यं पुष्पम् । समानमन्यत् । मध्वेतदादित्यस्य मध्ये क्षोभत इव समाहितदृष्टेर्दृश्यते संचलतीव ॥ १ ॥ २ ॥ ३ ॥

**सिद्धान्ती**—स्पष्टीकरण सांगण्याचें कारण नाहीं. गुह्य म्हणजे गोप्य ( जपून ठेवण्यासारखीं ) जीं रहस्यें असतात, जे आदेश असतात—

**शिष्य**—आदेश म्हणजे ?

**सिद्धान्ती**—मागें ' हें लोकद्वार उघड, आम्ही तुझें स्वरूप ववतों ' इत्यादि प्रकारचे जे विधी श्रुतीनें सांगितले, तेच आदेश होत. तात्पर्य, हे विधी किंवा आदेश म्हणजे कर्मांगभूत उपासना होत. ह्या उपासना मधुकर, आणि ब्रह्म हें या रूपकांतील पुष्प आहे.

**शिष्य**—ब्रह्म म्हणजे परब्रह्म ?

**सिद्धान्ती**—नाहीं. ब्रह्माचा अर्थ प्रणव असा येथें आहे. कारण, ऋग्, यजु, साम, इत्यादि शब्द प्रकृत आहेत व यज्ञ-प्रकरण चाललें आहे. तसेंच रहस्याचें उद्घाटन होत आहे. म्हणून ब्रह्म म्हणजे प्रणव-हें पुष्प होय, असाच अर्थ केला पाहिजे. आदित्याबिंबाचा मध्यवर्ती भाग संचलित होणारा दिसतो, ( तें प्रत्यक्ष हलत आहे असें दिसतें— )

**पूर्वपक्षी**—आम्हांस तर कधीं दिसत नाहीं ?

**सिद्धान्ती**—ज्यांची शास्त्रार्थाचे ठिकाणीं समाहितचित्तता झाली आहे, शास्त्रार्थावर ज्यांची एकनिष्ठा आहे, त्या उपासकांना आदित्याबिंबाचा मध्यभाग हालतोसा दिसत असतो. मग तुम्हांसच कां नाहीं दिसत ? असो; तो संचलित होणारा भाग हें आदित्यरूप आहे ॥ १ ॥ २ ॥ ३ ॥

---

## मंत्र चौथा.

**ते वा एते रसानाꣳरसा वेदा हि रसास्तेषा-मेते रसास्तानि वा एतान्यमृतानाममृतानि वेदा ह्यमृतास्तेषामेतान्यमृतानि ॥ ४ ॥**

**इति तृतीयाध्यायस्य पञ्चमः खण्डः ॥ ५ ॥**

**अन्वय व अर्थः—ते वै एते रसानां रसाः; हि वेदाः रसाः, तेषां एते रसाः** ( ते हे सर्व रूपविशेष रसांचे रस होत. कारण वेद हे रस आहेत आणि त्या वेदांचे रस म्हणजे मागच्या अनेक खंडांत सांगितलेलीं रक्त, शुभ्र इत्यादि आदित्यरूपें होत ) **एतानि तानि वै अमृतानां अमृतानि; हि वेदाः अमृताः, तेषां एतानि अमृतानि** ( हीं रूपें अमृतांचींही अमृतरूपें आहेत. कारण, प्रत्यक्ष वेद हे अमृत आहेत. आणि त्यांचीं हीं अमृतरूपें आहेत ) ॥ ४ ॥

ते वा एते यथोक्ता रोहितादिरूपविशेषा रसानां रसाः। केषां रसानामित्याह—वेदा हि यस्माल्लोकनिष्यन्दत्वात्सारा इति रसास्तेषां रसानां कर्मभावमापन्नानामप्येते रोहितादिविशेषा रसा अत्यन्तसारभूता इत्यर्थः। तथाऽमृतानाममृतानि वेदा ह्यमृता नित्यत्वात्तेषामेतानि रोहितादीनि रूपाण्यमृतानि। रसानां रसा इत्यादि कर्मस्तुतिरेषा। यस्यैवंविशिष्टान्यमृतानि फलमिति ॥ ४ ॥

इति तृतीयाध्यायस्य पञ्चमः खण्डः ॥ ५ ॥

सिद्धान्ती—आतांपर्यंत रक्त, शुभ्र, कृष्ण, अत्यंत कृष्ण आणि क्षुब्ध, अशीं जीं पांच सूर्यरूपें सांगितलीं, तीं सूर्य नामक मधूचीं होत. तीं सर्वच्या सर्व रसांचे रस होत—

शिष्य—रसांचे रस म्हणजे ?

सिद्धान्ती—पृथ्वी आदि लोकांपासून उत्पन्न झालेले ( कर्मद्वारा सिद्ध झालेले ) पुरुषोत्तमोक्त जे वेद ते रसजनक अथवा प्रत्यक्ष रस होत. त्या रसांचे हे रक्तशुभ्रादि रस म्हणजे श्रेष्ठ प्रकारचें सार होय. वेदांचा कर्मामध्यें विनियोग होतो म्हणून त्यांस कर्मांगत्व प्राप्त होतें. वेद कर्मांगें होत, कर्मभाव प्राप्त

झालेल्या या वेदांचें फल जे रक्त-शुभ्रादि रूपविशेष, ते त्यांचे सारभूत पदार्थ होत. वेद अमृत आहेत हें प्रसिद्ध आहे. कारण, ते नित्य आहेत.

पूर्वपक्षी—वेद ईश्वरोक्त ( ईश्वरद्वारा उत्पन्न होतात ) असें म्हणतां आणि त्यांस पुनः नित्य म्हणतां हें काय ?

सिद्धान्ती—यद्यपि वेद कार्यरूप आहेत, तथापि त्यांच्या उत्पत्तीला कोणत्याही प्रकारचा प्रयत्न लागत नाहीं. जगाच्या उत्पत्तीच्या आगोदरच पुरुषप्रयत्नाशिवाय पुरुषमुखानें ते निर्माण होत असतात म्हणून ते नित्य होत. असो; या अमृत म्हणजे नित्य वेदांचें अमृत म्हणजे हे शुक्ल कृष्णादि पंचमधु होत. अर्थात् ही कर्मस्तुति आहे. ज्या कर्मापासून अशा प्रकारचीं अमृतरूपीं फळें निर्माण होतात, त्या महाभाग्यशाली कर्माची स्तुति येथें उपासनेसाठीं सांगितली आहे ॥ ४ ॥

खंड पांचवा समाप्त.

---

## खंड सहावा.

### मंत्र पहिला.

**तद्यत्प्रथमममृतं तद्वसव उपजीवन्त्यग्निना मुखेन न वै देवा अश्नन्ति न पिबन्त्येतदेवामृतं दृष्ट्वा तृप्यन्ति ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—तत् यत् प्रथमं अमृतं, तत् वसवः अग्निना मुखेन उपजीवंति** ( तेथें जें पहिलें अमृत आहे, तें अग्निप्रमुख अष्टवसूंचें अग्निद्वारा उपजीवन करितें ) **देवाः न वै अश्नंति, न पिबंति; तत् एव अमृतं दृष्ट्वा तृप्यंति** ( देव कांहीं खात नाहींत, कांहीं पीत नाहींत. तर अमृत पाहून मात्र त्यांचें समाधान होतें ) ॥ १ ॥

तत्तत्र यत्प्रथमममृतं रोहितरूपलक्षणं तद्वसवः प्रातःसवनेशाना उपजीवन्त्यग्निना मुखेनाग्निना प्रधानाः सन्त उपजीवन्तीत्यर्थः। अन्नाद्यं रसोऽजायतेतिवचनात्कवलग्राहमश्नन्तीति प्राप्तं यत्प्रतिषिध्यते—न वै देवा अश्नन्ति न पिबन्तीति । कथं तर्ह्युपजीवन्तीत्युच्यते—एतदेव हि यथोक्तममृतं रोहितं रूपं दृष्ट्वोपलभ्य सर्व-

करणैरनुभूय तृप्यन्ति। दृशः सर्वकरणद्वारोपलब्ध्यर्थत्वात् ।ननु रोहितं रूपं दृष्ट्वेत्युक्तं कथमन्येन्द्रियविषयत्वं रूपस्येति। न यश-आदीनां श्रोत्रादिगम्यत्वात्। श्रोत्रग्राह्यं यशः। तेजोरूपं चाक्षुषम्। इन्द्रियं विषयग्रहणकार्यानुमेयं करणसामर्थ्यम्। वीर्यं बलं देहगत उत्साहः प्राणवत्ता। अन्नाद्यं प्रत्यहमुपजीव्यमानं शरीरस्थितिकरं यद्भवति। रसो ह्येवमात्मकः सर्वः। यं दृष्ट्वा तृप्यन्ति सर्वे। देवा दृष्ट्वा तृप्यन्तीत्येतत्सर्वं स्वकरणैरनुभूय तृप्यन्तीत्यर्थः। आदित्यसं-श्रयाः सन्तो वैगन्ध्यादिदेहकरणदोषरहिताश्च ॥ १ ॥

**सिद्धान्ती**—वर जीं अमृताचीं निरनिराळीं रूपें सांगितलीं, त्यांतील रक्त-रंगी अमृत वसु नामक देवांचें उपजीवन करितें. ते अष्टवसू प्रात:सवनाचे स्वामी आहेत आणि यांचा अग्नि हा अधिपति आहे.

**पूर्व०**—अन्नाद्यरस उत्पन्न होतो असें तिसऱ्या व पुढील मंत्रांत तुम्हीं सांगितलेंत. तेव्हां सहजच सिद्ध होतें कीं, आपण जसें एकेक घास घेऊन अन्न खातों, त्याप्रमाणेंच हे अग्निप्रधान वसू अन्न खात असले पाहिजेत ?

**सिद्धान्ती**—नाहीं, श्रुति म्हणते कीं, हे देव कांहीं खात नाहींत, किंवा कांहीं पीतही नाहींत.

**पूर्वपक्षी**—तर मग उपजीवन ( परिपोषण ) या शब्दाचा अर्थ तरी काय ? अन्नाद्य रसानें ह्या देवांचें उपजीवन होतें, असें तर श्रुति म्हणत आहे ?

**सिद्धान्ती**—त्यापुढेंच श्रुति सांगते कीं, तिसऱ्या मंत्रांत जें रोहित म्हणजे रक्तस्वरूप सांगितलें, तें पाहून मात्र या देवांचें समाधान होतें. मंत्रांतील 'दृष्ट्वा' या पदाचा अर्थ 'सर्व इंद्रियांनीं अनुभव घेऊन' असा आहे. दृष्टि या शब्दाचा तात्पर्यार्थच सर्व इंद्रियें ह्या अमृताची उपलब्धि करून घेतात असा आहे.

**पूर्वपक्षी**—'रक्तस्वरूप पाहून' असे श्रुतीचे शब्द आहेत. रूप पाहणें हा नेत्राचा धर्म आहे. कर्ण, रसना, इत्यादि इंद्रियांचा रूप हा विषय नव्हे. रूप, रस, गंध इत्यादि विषय प्राप्त होतात, तेव्हां सर्व इंद्रियांचें समाधान होतें. रूप हा सर्व इंद्रियांचा विषयच नव्हे; मग तो तसा आहे, असें श्रुतीलासुद्धां कसें म्हणतां येईल ? तात्पर्य, दृष्टीचें मात्र समाधान होतें, असा श्रुतीचा अभिप्राय असावा.

**सिद्धान्ती**—नाहीं. कारण, पहिल्या खंडांतील तिसऱ्या व पुढील मंत्रांत यश, तेज, वीर्य, इत्यादिकांचा उल्लेख आहे. यश–आदि हें कर्णादि इंद्रि-यांचीच विषय आहे; यश हें तर कर्णग्राह्य आहे; तेजोरूप चक्षुर्ग्राह्य आहे. सारांश, मागील अनेक मंत्रांतील 'इंद्रिय' हा शब्द करण-सामर्थ्य म्हणजे

सर्व इंद्रिय–सामर्थ्यें सुचवितो. अर्थात् हें सामर्थ्य आपण जें विषय–ग्रहणाचें कार्य करितों, त्यानें अनुमित होतें. तात्पर्य, दृष्टि म्हणजे विषय–ग्रहणाला समर्थ असणारीं सर्व इंद्रियें होत.

**शिष्य**—तसेंच वीर्य म्हणजे बल अथवा शरीराचे ठिकाणीं प्रतीत होणारा उत्साह किंवा प्राण–वत्ता होय; आणि 'अन्नाद्य' म्हणजे शरीराची स्थिति ज्याच्या-योगानें ठीक राहून शरीराचें प्रतिदिवशीं उपजीवन होतें, तें होय. अर्थात् यश, तेज, इंद्रिय, बल, अन्नाद्य हीं सर्व रसरूप होतात.

**सिद्धान्ती**—आणि हा रस पाहून मात्र वसु–नामक देव सर्व तृप्त होतात. आतां तुम्हांस हें सांगावयास नकोच कीं, 'दृष्ट्वा' (पाहून) ' या पदाचा अर्थ 'आपल्या इंद्रियांनीं अनुभव घेऊन ' असा होतो.

**शिष्य**—तात्पर्य, हीं इंद्रियें स्वतंत्रतेनें तृप्त होतात, असें झालें. नव्हे ?

**सिद्धान्ती**—नाहीं. आदित्याच्या आश्रयानें मात्र या सर्व इंद्रियांचें तर्पण अथवा समाधान होतें. हा आदित्याचा आश्रय घेतला म्हणजे घ्राणादि देहगत इंद्रियांचें जे दुर्गंधिग्रहणादि दोष असतात, तें येथें उत्पन्न होत नाहींत. सर्व इंद्रियांस दैवी शुद्ध स्वरूप प्राप्त होतें. त्यामुळें त्यांस असंतुष्ट करणारा अनुभव येत नाहीं. आदित्याच्या आश्रयानें त्यांस शुद्धस्वरूप प्राप्त होतें ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**त एतदेव रूपमभिसंविशन्त्येतस्माद्रूपादुद्यन्ति ॥२॥**

**अन्वय व अर्थः**—ते एतत् एव रूपं अभिसंविशंति, एतस्मात् रूपात् उद्यंति (ते देव ह्याच रूपांत प्रविष्ट होऊन–लीन होऊन–उदासीन होतात आणि त्याच रूपानें प्रेरित झाल्यावर उद्योगवंत होतात) ॥ २ ॥

किं ते निरुद्यमा अमृतमुपजीवन्ति । कथं तर्हि, एतदेव रूपमभिलक्ष्याधुना भोगावसरो नास्माकमिति बुद्ध्वाऽभिसंविशन्त्युदासते । यदा वै तस्यामृतस्य भोगावसरो भवेत्तदैतस्मादमृतभोगनिमित्तमित्यर्थः । एतस्माद्रूपादुद्यन्त्युत्साहवन्तो भवन्तीत्यर्थः । न ह्यनुत्साहवतामननुतिष्ठतामलसानां भोगप्राप्तिर्लोके दृष्टा ॥ २ ॥

**पूर्व०**—म्हणजे हे वसुनामक देव कांहीं एक न करितां अमृताचा उपभोग घेतात, असें झालें ?

सिद्धान्ती—असें नाहीं. तर वर सांगितलेलें रूप पाहून जेव्हां ते असें समजतात कीं, सद्यःकालीं आपला भोगावसर नाहीं, तेव्हां हे देव उदासीन होतात, कांहीं एक न करितां स्वस्थ बसतात. पण जेव्हां ह्या अमृताचा उपभोग घेण्याची वेळ येते, तेव्हां उदासीनकालीं प्राप्त झालेली ध्यानस्थिति सोडून ते जागृत होतात आणि अमृताचा उपभोग घेण्यासाठीं उत्साहवंत होतात, तात्पर्य: उद्योग करावयास लागतात.

शिष्य—खरेंच आहे, ज्यांना उत्साह नाहीं, जे कोणताही उद्योग करीत नाहींत, तात्पर्य जे आळशी आहेत, त्यांना ह्या लोकांत सुद्धां कोणत्याही प्रकारची भोगप्राप्ति होत नाहीं. आपण तर हें नित्य पाहतों. अर्थात् स्वर्गांतही अशीच व्यवस्था असली पाहिजे. असो; ज्या ज्या वेळीं उपभोग हवा अशी इच्छा देवांस होते, तेव्हां त्यांनाही भोगप्राप्तीसाठीं उद्योग करावा लागतो, अमृत मिळविण्यासाठीं देवांस सुद्धां उद्योग केला पाहिजेच ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**स य एतदेवममृतं वेद वसूनामेवैको भूत्वाऽग्निनैव मुखेनैतदेवामृतं दृष्ट्वा तृप्यति स एतदेव रूपमभिसंविशत्येतस्माद्रूपादुदेति ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थः—यः एतत् एव अमृतं वेद** ( ज्याला ह्याच अमृताचें ज्ञान झालें ) **सः वसूनां एव एकः भूत्वा अग्निना एव मुखेन एतत् एव अमृतं दृष्ट्वा तृप्यति** ( तो ज्ञानी पुरुष अग्निप्रधान वसूदेवांपैकींच एक होऊन हेंच अमृतरूप पाहतो आणि सर्वथा तृप्त होतो ) **सः एतत् एव रूपं अभिसंविशति, एतस्मात् रूपात् उदेति** ( तो ह्याच रूपांत प्रविष्ट होऊन स्तब्ध राहतो आणि ह्याच रूपाच्या प्राप्तीसाठीं तो योग्यकालीं उद्युक्त होतो ) ॥ ३ ॥

स यः कश्चिदेतदेवं यथोदितमृङ्मधुकरतापरससंक्षरणमृग्वेदाविहितकर्मपुष्पात्तस्य चाऽऽदित्यसंश्रयणं रोहितरूपत्वं चामृतस्य प्राचीदिग्गतरश्मिनाडीसंस्थतां वसुदेवभोग्यतां तद्विदश्च वसुभिः सहैकतां गत्वाऽग्निना मुखेनोपजीवनं दर्शनमात्रेण तृप्तिं स्वभोगावसर उद्यमनं तत्कालापाये च संवेशनं वेद सोऽपि वसुवत्सर्वं तथैवानुभवति ॥ ३ ॥

सिद्धान्ती—श्रुतीनें मागें ह्या अमृताचें जें स्वरूप सांगितलें, ऋचा हेच मधुकर, त्यांचें अभितपन, रसस्वरूप, संरक्षण इत्यादिरूपी ऋग्वेदप्रणीत कर्मरूपी पुष्प सांगितलें, तसेंच आदित्याचा आश्रय रक्तरूपत्व आणि पूर्वेकडील सूर्याकिरण-रूपी नाडीसंस्थता ( नाडीमध्यें असणें ) आणि वसुनामक देवांनीं घेण्यास योग्य असा उपभोग सांगितला, सारांश, मागील मत्रांत ज्या ज्या गोष्टी सांगितल्या, त्या ज्याला ज्ञातविज्ञात झाल्या, तो पुरुष वसुनामक देवांशीं एकात्मक होतो; वसुरूप होतो; आणि अग्निद्वारानें या अमृताचें दर्शनमात्र घेऊन वसूं-सारखाच तृप्त होतो. उपभोगाची वेळ आली म्हणजे तत्प्राप्त्यर्थ तो उद्योग करितो; व भोगकाल संपला म्हणजे स्तब्ध होतो. असो; मागें सांगितलेलें सर्व ज्ञान ज्याला प्रत्यक्ष होतें, तो वसुरूप होतो आणि वसूसारखाच अनुभवही घेतो ॥ ३ ॥

---

### मंत्र चवथा.

**स यावदादित्यः पुरस्तादुदेता पश्चादस्तमेता वसूनामेव तावदाधिपत्यꣳ स्वाराज्यं पर्येता ॥ ४ ॥**

**इति तृतीयाध्यायस्य षष्ठः खण्डः ॥ ६ ॥**

**अन्वय व अर्थः—यावत् आदित्यः पुरस्तात् उदेता, पश्चात् अस्तमेता, तावत् सः वसूनां एव आधिपत्यं स्वाराज्यं पर्येता** ( जावत्कालपर्यंत सूर्य पूर्वेकडे उगवत आहे; आणि पश्चिमेकडे मावळत आहे, तावत्कालपर्यंत वसुनामक देवांचें आधिपत्य व स्वाराज्य हा ज्ञानी पुरुष प्राप्त करून घेतो ) ॥ ४ ॥

कियन्तं कालं विद्वांस्तदमृतमुपजीवतीत्युच्यते स विद्वान्यावदादित्यः पुरस्तात्प्राच्यां दिश्युदेता पश्चात्प्रतीच्यामस्तमेता तावद्वसूनां भोगकालस्तावन्तमेव कालं वसूनामाधिपत्यं स्वाराज्यं पर्येता परितो गन्ता भवतीत्यर्थः । न तथा चन्द्रमण्डलस्थः केवलकर्मी परतन्त्रो देवानामन्नभूतः । किं तर्ह्ययमाधिपत्यं स्वराड्भावं चाधिगच्छति ॥ ४ ॥

इति तृतीयाध्यायस्य षष्ठः खण्डः ॥ ४ ॥

शिष्य—भगवन्, वरील ज्ञानी पुरुषाला ह्या अमृताची प्राप्ति होते, असें श्रुतीनें सांगितलें; पण या अमृताचा उपभोग तो किती कालपर्यंत घेतो, हें सांगितलें नाहीं. असें कां ?

**सिद्धान्ती**—हीच गोष्ट ह्या मंत्रांत सांगितली आहे. ऐक.—जोंपर्यंत सूर्याचा उदय पूर्वेकडे आणि अस्त पश्चिमेकडे होत आहे; व होणार आहे, तोंपर्यंत मात्र वसूंना ह्या अमृताचा उपभोग घेतां येतो; आणि तितक्याच कालपर्यंत आपल्या ह्या ज्ञानी पुरुषाला वसूंचें आधिपत्य व त्यांचें स्वाराज्य स्वज्ञानानें प्राप्त करून घेतां येतें. 'पर्येतृ' म्हणजे 'जिंकणारा, प्राप्त करून घेणारा, असा अर्थ आहे.

**पूर्वपक्षी**—केवल कर्म मात्र करणारा पुरुष परतंत्र होऊन चंद्रमंडलांत राहतो आणि देवांचें अन्न ( भक्ष्य ) होतो; असा श्रुतिप्रणीत न्याय आहे. त्याप्रमाणेंच ह्या ज्ञानपूर्वक ध्यान करणाऱ्या पुरुषाची स्थिति असली पाहिजे ?

**सिद्धान्ती**—नाहीं नाहीं. त्याला वसुदेवांचें स्वामित्व प्राप्त होतें आणि तो स्वराट् होतो.

**शिष्य**—स्वराट् म्हणजे ?

**सिद्धान्ती**—स्वराट् म्हणजे 'स्वतंत्र, स्वयंप्रकाश'—तो कोणाचेंही भक्ष्य होत नाहीं; इतकेंच नव्हे, तर तो स्वतः अमृताचा उपभोक्ता होतो. तात्पर्य, चंद्रलोकांत जाणाऱ्या कर्मठ लोकांप्रमाणें तो देवांचें अन्न न होतां स्वतः देवपति व अमृतभोक्ता होतो ॥ ४ ॥

सहावा खंड समाप्त.

---

# खंड सातवा.

## मंत्र पहिला.

**अथ यद्द्वितीयममृतं तद्रुद्रा उपजीवन्तीन्द्रेण मुखेन न वै देवा अश्नन्ति न पिबन्त्येतदेवामृतं दृष्ट्वा तृप्यन्ति ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थ—अथ यत् द्वितीयं अमृतं, तत् इंद्रेण मुखेन रुद्राः उपजीवंति** ( आतां जें दुसरें यजुरूपी अमृत आहे त्याचा उपभोग इंद्र-प्रमुख रुद्र इंद्रद्वारानें घेत असतात ) **देवाः न वै अश्नंति, न पिबंति; एतत् एव अमृतं दृष्ट्वा तृप्यंति** ( याचा अर्थ साहाव्या खंडाच्या पहिल्या मंत्रातील उत्तरार्धांत आला आहे ) ॥ १ ॥

---

### मंत्र दुसरा.

**त एतदेव रूपमभिसंविशन्त्येतस्माद्रूपादुद्यन्ति॥२॥**

अन्वय व अर्थः—ते एतत् एव रूपं अभिसंविशंति, एतस्मात् रूपात् उद्यन्ति ( मागील खंडांतील दुसऱ्या मंत्राप्रमाणेंच याचा अर्थ आहे. ) ॥ २ ॥

---

### मंत्र तिसरा.

**स य एतदेवममृतं वेद रुद्राणामेवैको भूत्वेन्द्रेणैव मुखेनैतदेवामृतं दृष्ट्वा तृप्यति स एतदेव रूपमभिसंविशत्येतस्माद्रूपादुदेति ॥ ३ ॥**

अन्वय व अर्थः—यः एतत् एव अमृतं वेद, सः रुद्राणां एव एकः भूत्वा इंद्रेण एव मुखेन एतत् एव अमृतं दृष्ट्वा तृप्यति; सः एतत् एव रूपं अभिसंविशति, एतस्मात् रूपात् उदेति ( अर्थ पूर्वखंडांतील तिसऱ्या मंत्राप्रमाणें. अग्निमुखाचे ठिकाणीं इंद्रमुख आणि वसूंचे ठिकाणीं रुद्र यांची योजना करावयाची ) ॥ ३ ॥

अथ यद्द्वितीयममृतं तद्रुद्रा उपजीवन्तीत्यादि समानम्॥१॥२॥३॥

सिद्धान्ती—आतां दुसरें जें अमृत आहे त्याचा विचार करावयाचा—

शिष्य—अर्थात स्पष्टीकरण सहाव्या खंडांतील पहिल्या तीन मंत्रांप्रमाणेंच असलें पाहिजे. वसु नामक देवांचें स्थान एकादश-रुद्रांनीं घ्यावयाचें ?

सिद्धान्ती—बरोबर आहे. वसूंचा स्वामी अग्नि, तसा रुद्रांचा स्वामी इंद्र आहे, हें विसरूं नको ॥ १ ॥ २ ॥ ३ ॥

---

### मंत्र चवथा.

**स यावदादित्यः पुरस्तादुदेता पश्चादस्तमेता द्विस्तावद्दक्षिणत उदेतोत्तरतोऽस्तमेता रुद्राणामेव तावदाधिपत्यꣳस्वाराज्यं पर्येता ॥ ४ ॥**

**इति तृतीयाध्यायस्य सप्तमः खण्डः ॥ ७ ॥**

**अन्वय व अर्थः—यावत् आदित्यः पुरस्तात् उदेता, पश्चात् अस्तं एता; द्विः तावत् दक्षिणतः उदेता, उत्तरतः अस्तं एता, सः रुद्राणां एव तावत् आधिपत्यं स्वाराज्यं पर्येता** ( पूर्वेकडे उगवून पश्चिमेकडे अस्त होण्याला जो अवधि सूर्याला लागतो, त्याच्या दुप्पट अवधि त्याला दक्षिणेकडे उगवून उत्तरेकडे अस्त होण्याला लागत असतो. एवंच दुप्पटकालपर्यंत रुद्रांचें आधिपत्य म्हणजे साम्राज्य प्राप्त होतें. द्वितीय अमृताचें ज्ञानविज्ञान असणाऱ्या पुरुषाला हें स्वाराज्य प्राप्त होत असतें ) ॥ ४ ॥

स यावदादित्यः पुरस्तादुदेता पश्चादस्तमेता द्विस्तावत्ततो द्विगुणं कालं दक्षिणत उदेतोत्तरतोऽस्तमेता रुद्राणां तावद्भोगकालः ॥ ४ ॥

इति तृतीयाध्यायस्य सप्तमः खण्डः ॥ ७ ॥

**सिद्धान्ती**—पूर्व-पश्चिमगामी सूर्याला जितका भ्रमणकाल अवश्य आहे, त्याच्या दुप्पट दक्षिणोत्तर-गामी भ्रमणाला लागत असतो. ही रुद्रांची भोगकालाची मर्यादा आहे.

**शिष्य**—इतक्याच कालपर्यंत द्वितीय अमृताचा ज्ञानविज्ञानी पुरुष रुद्रांचे आधिपत्य संपादून स्वतंत्रतेनें अमृतोपभोग घेत असला पाहिजे. नव्हे ?

**सिद्धान्ती**—होय. ह्या अमृताचा उपभोग इतका वेळपर्यंत ज्ञानविज्ञानी पुरुषास इंद्रमुखानें घेतां येतो ॥ ४ ॥

सातवा खंड समाप्त.

---

## खंड आठवा.

### मंत्र पहिला.

**अथ यत्तृतीयममृतं तदादित्या उपजीवन्ति वरुणेन मुखेन न वै देवा अश्नन्ति न पिबन्त्येतदेवामृतं दृष्ट्वा तृप्यन्ति ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—अथ यत् तृतीयं अमृतं, तत् वरुणेन मुखेन आदित्या उपजीवंति; देवाः न वै अश्नंति, न पिबंति, एतत् एव**

अमृतं दृष्ट्वा तृप्यंति ( अर्थ बहुशः झालाच आहे. येथें वरुणप्रमुख द्वादश आदित्यांचें वर्णन आहे ) ॥ १ ॥

---

### मंत्र दुसरा.

**त एतदेव रूपमभिसंविशन्त्येतस्माद्रूपादुद्यन्ति॥२॥**

अन्वय व अर्थः—ते एतत् एव रूपं अभिसंविशंति, एतस्मात् रूपात् उद्यंति ( अर्थ मागीलप्रमाणें ) ॥ २ ॥

---

### मंत्र तिसरा.

**स य एतदेवममृतं वेदाऽऽदित्यानामेवैको भूत्वा वरुणेनैव मुखेनैतदेवामृतं दृष्ट्वा तृप्यति स एतदेव रूपमभिसंविशत्येतस्माद्रूपादुदेति ॥ ३ ॥**

अन्वय व अर्थः—यः एतत् एव अमृतं वेद, सः आदित्यानां एव एकः भूत्वा वरुणेन एव मुखेन एतत् एव अमृतं दृष्ट्वा तृप्यति; सः एतत् एव रूपं अभिसंविशति, एतस्मात् रूपात् उदेति ( अर्थ पूर्वीप्रमाणें. वरुणप्रमुख द्वादश आदित्यांपैकीं एक हा ज्ञानी पुरुष होतो, इत्यादि येथें सांगितलें आहे ) ॥ ३ ॥

---

### मंत्र चवथा.

**स यावदादित्यो दक्षिणत उदेतोत्तरतोऽस्तमेता द्विस्तावत्पश्चादुदेता पुरस्तादस्तमेताऽऽदित्यानामेव तावदाधिपत्यꣳस्वाराज्यं पर्येता ॥ ४ ॥**

**इति तृतीयाध्यायस्याष्टमः खण्डः ॥ ८ ॥**

अन्वय व अर्थः—यावत् आदित्यः दक्षिणतः उदेता, उत्तरतः अस्तं एता, द्विः तावत् पश्चात् उदेता पुरस्तात् अस्तं एता, आदि-

त्यानां एव तावत् आधिपत्यं स्वाराज्यं पर्येता ( अर्थ पूर्वीप्रमाणेंच आहे. पूर्व पश्चिम आणि दक्षिणोत्तर यांच्या स्थानी दक्षिणोत्तर आणि पश्चिमपूर्व यांची योजना करून अवधीची दुप्पट केली, म्हणजे झालें) ॥४॥

॥ १ ॥ २ ॥ ३ ॥ ४ ॥

इति तृतीयाध्यायस्याष्टमः खण्डः ॥ ८ ॥

खंड आठवा समाप्त.

---

## खण्ड नववा.

---

### मंत्र पहिला.

**अथ यच्चतुर्थममृतं तन्मरुत उपजीवन्ति सोमेन मुखेन न वै देवा अश्नन्ति न पिबन्त्येतदेवामृतं दृष्ट्वा तृप्यन्ति ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—अथ यत् चतुर्थं अमृतं, तत् मरुतः सोमेन मुखेन उपजीवंति** ( आतां जें चवथें अमृत आहे, तें सोमप्रधान मरुत् देवांचें सोमद्वारा उपजीवक होतें ) **देवाः वै न अश्नंति, न पिबंति, एतत् एव अमृतं दृष्ट्वा तृप्यंति** ( याचा अर्थ पूर्वी झाला आहे ) ॥ १ ॥

---

### मंत्र दुसरा.

**त एतदेव रूपमभिसंविशन्त्येतस्माद्रूपादुद्यन्ति ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः—ते एतत् एव रूपं अभिसंविशंति, एतस्मात् रूपात् उद्यंति** ( अर्थ पूर्वीप्रमाणें ) ॥ २ ॥

---

### मंत्र तिसरा.

**स य एतदेवममृतं वेद मरुतामेवैको भूत्वा सोमेनैव मुखेनैतदेवामृतं दृष्ट्वा तृप्यति स एतदेव रूपमभिसंविशत्येतस्माद्रूपादुदेति ॥ ३ ॥**

अन्वय व अर्थः—यः एतत् एव अमृतं वेद, सः मरुतां एव एकः भूत्वा सोमेन एव मुखेन एतत् एव अमृतं दृष्ट्वा तृप्यति ( या चौथ्या अमृताचें ज्ञानविज्ञान ज्याला होतें, तो मरुत्–देवांपैकींच एक होतो आणि सोमसाह्यानें हें अमृत पाहून संतुष्ट होतो ) स एतत् एव रूपं अभिसंविशति, एतस्मात् रूपात् उदेति ( अर्थ पूर्वी झाला आहे ) ॥ ३ ॥

---

**मंत्र चवथा.**

**स यावदादित्यः पश्चादुदेता पुरस्तादस्तमेता द्विस्तावदुत्तरत उदेता दक्षिणतोऽस्तमेता मरुतामेव तावदाधिपत्यꣳ स्वाराज्यं पर्येता ॥ ४ ॥**

**इति तृतीयाध्यायस्य नवमः खण्डः ॥ ९ ॥**

**अन्वय व अर्थः—यावत् आदित्यः पश्चात् उदेता, पुरस्तात् अस्तं एता, द्विः तावत् उत्तरतः उदेता दक्षिणतः अस्तं एताः सः मरुतां एव तावत् आधिपत्यं स्वाराज्यं पर्येता** ( अर्थ मागील खंडांतील तिसऱ्या मंत्राप्रमाणें. पश्चिम–पूर्वेच्या उदयास्ताचे ठिकाणीं उत्तर–दक्षिण हीं उदयास्ताचीं स्थानें व अवधीची दुप्पट हीं समजावयाचीं आहेत ) ॥ ४ ॥

॥१ ॥ २ ॥ ३ ॥ ४ ॥

इति तृतीयाध्यायस्य नवमः खण्डः ॥ ९ ॥

नववा खंड समाप्त.

---

## खण्ड दहावा.

---

**मंत्र पहिला.**

**अथ यत्पञ्चमममृतं तत्साध्या उपजीवन्ति ब्रह्मणा मुखेन न वै देवा अश्नन्ति न पिबन्त्येतदेवामृतं दृष्ट्वा तृप्यन्ति ॥१ ॥**

अन्वय व अर्थः—अथ यत् पञ्चमं अमृतं तत् ब्रह्मणा मुखेन साध्याः उपजीवंति (पांचवें अमृत ब्रह्मप्रधान साध्यांचें उपजीवन करितें) देवाः वै न अश्नंति न पिबन्ति, एतत् एव अमृतं दृष्ट्वा तृप्यन्ति ( अर्थ पूर्वी झाला आहे ) ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**त एतदेव रूपमभिसंविशन्त्येतस्माद्रूपादुद्यन्ति ॥ २ ॥**

अन्वय व अर्थः—ते एतत् एव रूपं अभिसंविशंति, एतस्मात् रूपात् उद्यंति ( अर्थ पूर्वीप्रमाणें ) ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**स य एतदेवममृतं वेद साध्यानामेवैको भूत्वा ब्रह्मणैव मुखेनैतदेवामृतं दृष्ट्वा तृप्यति स एतदेव रूपमभिसंविशत्येतस्माद्रूपादुदेति ॥ ३ ॥**

अन्वय व अर्थः—यः एतत् एव अमृतं वेद, सः साध्यानां एव एकः भूत्वा ब्रह्मणा एव मुखेन एतत् एव अमृतं दृष्ट्वा तृप्यंति (ह्या पंचम अमृताचें ज्ञान-विज्ञान झालेला पुरुष साध्यांपैकींच एक होऊन ब्रह्म-मुखानें हेंच अमृत पाहतो आणि तृप्त होतो ) सः एतत् एव रूपं अभिसंविशति, एतस्मात् रूपात् उदेति ( अर्थ पूर्वी झाला आहे) ॥२॥

---

## मंत्र चवथा.

**स यावदादित्य उत्तरत उदेता दक्षिणतोऽस्तमेता द्विस्तावदूर्ध्व उदेताऽर्वाङस्तमेता साध्यानामेव तावदाधिपत्यꣳ स्वाराज्यं पर्येता ॥ ४ ॥**

**इति तृतीयाध्यायस्य दशमः खण्डः ॥ १० ॥**

**अन्वय व अर्थः—यावत् आदित्यः उत्तरतः उदेता, दक्षिणतः अस्तं एता द्विः तावत् ऊर्ध्वः ? उदेता, अर्वाक् अस्तं एता, सः साध्यानां एव आधिपत्यं स्वाराज्यं पर्येता** (अर्थ पूर्वीप्रमाणेंच. उत्तर-दक्षिण हीं उदयास्ताचीं स्थानें नसून येथें तीं ऊर्ध्वाधःस्थानें आहेत) ॥४॥

तथा पश्चादुत्तरत ऊर्ध्वमुदेता विपर्ययेणास्तमेता। पूर्वस्मात्पूर्वस्माद्द्विगुणोत्तरोत्तरेण कालेनेत्यपौराणं दर्शनम् । सवितुश्चतुर्दिशमिन्द्रयमवरुणसोमपुरीषूदयास्तमयकालस्य तुल्यत्वं हि पौराणिकैरुक्तम् । मानसोत्तरस्य मूर्धनि मेरोः प्रदक्षिणावृत्तेस्तुल्यत्वादिति ।

**सिद्धान्ती—**याप्रमाणें उत्तरेपासून ऊर्ध्व दिशेला उदय पावणारा आणि विपर्ययानें म्हणजे दक्षिणेकडून अथवा खालून अस्त पावणारा असा ह्या सूर्याचा भ्रमण-मार्ग आहे. म्हणजे पूर्वपूर्व कालापासून पुढील पुढील सूर्यभ्रमणाचा काल नियमानें दुप्पट होत आहे. पूर्वेकडून पश्चिमेकडे जाण्याला सूर्याला जो काळ लागतो, त्याच्या दुप्पट काल दक्षिणेकडून उत्तरेकडे जाण्याला सूर्य घेतो. दक्षिणोत्तराच्या दुप्पट पश्चिम–पूर्वकाल, पश्चिम पूर्वकालाच्या दुप्पट उत्तर–दक्षिण-काल आणि उत्तर-दक्षिण-कालाच्या दुप्पट ऊर्ध्वाधःकाल सूर्य घेतो. असा हा सूर्याचा भ्रमणक्रम श्रुति सांगत आहे.

**शिष्य—**यावरून असें निष्पन्न होतें कीं, प्रथम अमृताचे चिंतकांस जो भोगावसर मिळतो, त्याचे दुप्पट द्वितीयामृतचिंतकांस, चौपट तृतीयामृतचिंतकांस, आठपट चतुर्थामृतचिंतकांस व सोळापट पंचमामृतचिंतकांस मिळतो.

**पूर्वपक्षी—**पण हें पुराणमताच्या विरुद्ध आहे. पूर्व, दक्षिण, पश्चिम आणि उत्तर या चतुर्दिशांचे स्वामी इंद्र. यम, वरुण आणि सोम. या प्रत्येकांच्या लोकांत होणाऱ्या सूर्योदयास्तमयाचा काल एकच आहे, त्यांत भेद नाहीं, असें पुराणें आपल्यास सांगतात. कारण उघडच आहे कीं, महागिरि जो मेरु त्याचा जणूं कांहीं प्राकार असणाऱ्या मानसोत्तराच्या शिरावर चक्र व त्याचा अक्ष ठेवून मेरू-भोंवतीं जी प्रदक्षिणावृत्ति सूर्य करितो, तिला सदासर्वदा सारखाच वेळ लागला पाहिजे. तात्पर्य, पुराणांचें म्हणणें बरोबर आहे. अर्थात्, भोगाचा अवसरही सर्वांचा सारखाच असला पाहिजे.

**अत्रोक्तः परिहार आचार्यैः । अमरावत्यादीनां पुरीणां द्विगुणोत्तरोत्तरेण कालेनोद्वासः स्यात् । उदयश्च नाम सवितुस्तन्निवासिनां प्राणिनां चक्षुर्गोचरापत्तिस्तदत्ययश्चास्तमनं; न परमार्थत उदयास्तमने स्तः । तन्निवासिनां च प्राणिनामभावे तान्प्रति तेनैव**

गच्छन्नपि नैवोदेता नास्तमेतेति चक्षुर्गोचरापत्तेस्तदत्ययस्य चाभावात्।

**सिद्धान्ती**—याचा परिहार द्रविडाचार्यांनीं केला आहे, तो असा:–अमरावती-प्रमुख पुरींमध्यें अनुक्रमें उत्तरोत्तर सूर्यवसतीचा काल दुप्पट वाढत गेला पाहिजे.

**शिष्य**—नाहीं समजलें.

**सिद्धान्ती**—म्हणजे असें:–'सूर्याचा उदय' या पदांचा खरा अर्थ असा आहे कीं, तेथें तेथें राहणाऱ्या प्राण्यांना सूर्याची नेत्रगोचरता होणें आणि सूर्यास्त म्हणजे तोच सूर्य नेत्रांस अगोचर होणें होय. प्राण्यांच्या नेत्रांना सूर्य प्रथम दिसला म्हणजे ते म्हणतात कीं, सूर्याचा उदय झाला आणि तो दिसेनासा झाला म्हणजे सूर्यास्त झाला. वास्तविक पाहिलें असतां सूर्याला उदयास्त नाहींत. तेव्हां त्या त्या पुरींत राहणाऱ्या प्राण्यांचा अभाव असला म्हणजे एकाच मार्गानें जाणारा सूर्य असला तरी तेथें तो कोणासही उगवत नाहीं किंवा अस्तही पावत नाहीं. पाहणाराच जर जीव नाहीं तर सूर्याचे उदयास्त दिसणार कोठून म्हणजे समजणार कोठून? जीव असेल तर मात्र उदयास्ताची कथा; ते नसतील तर सूर्याचे उदयास्त हे शब्द अर्थशून्य होतात.

**शिष्य**—म्हणजे अमरावती–आदिपुरींमध्यें उत्तरोत्तर उद्वासकाल दुपटीनें वाढत जातो. उद्वासकाल म्हणजे ती ती नगरी सोडून जाण्याचा काल. सारांश, येथें भोगकालाचें द्वैगुण्य आहे. सूर्य कमी–जास्ती चालतो, असें नव्हे; तर दैत्यांनीं उपसर्ग दिलेल्या अमरावतीप्रमुख पुरींत वसतीचा अभाव झाल्यास उत्तरोत्तर दुप्पट काल होत जातो. म्हणजे अमरावतींत जितका काल वसति नसते, त्याच्या दुप्पट काल यमपुरींत नसते. अशाच क्रमानें पुढील नगरींत उद्वासकाल वाढत जातो.

**सिद्धान्ती**—तात्पर्य, भोगकाल दुप्पटीनें वाढत जातो. सूर्याच्या गतीचा काल दुप्पट वाढत जातो असें नव्हे.

तथाऽमरावत्याः सकाशाद्द्विगुणं कालं संयमनी पुरी वसत्य-तस्तन्निवासिनः प्राणिनः प्रति दक्षिणत इवोदेत्युत्तरतोऽस्तमेतीत्यु-च्यतेऽस्मद्बुद्धिं चापेक्ष्य। तथोत्तरास्वपि पुरीषु योजना।

**सिद्धान्ती**—सारांश, अमरावतींतील लोकांच्या अपेक्षेनें संयमनीपुरी (यम-पुरी) मध्यें राहणाऱ्या प्राण्यांस सूर्याच्या उदयास्तमयाचें मान दुप्पट होतें, असें दिसतें. त्यांचा भोगकाल वाढतो असें नव्हे, तर दैत्यांच्या उपद्रवामुळें त्यांचा वास्तव्य–च्युतिकाल अधिक होतो. यमलोकांतील लोकांस असें वाटतें कीं, सूर्य दक्षिणेकडे उगवून उत्तरेकडे अस्ताला जातो. अर्थात् ह्या दक्षिण–उत्तर दिशा

आम्हीं ठरविलेल्या आहेत; यमपुरांतील लोकांनीं ठरविलेल्या नव्हेत. याचप्रमाणें पुढील दिशांचीही योजना समजून घ्यावयाची आहे.

सर्वेषां च मेरुरुत्तरतो भवति ॥ यदाऽमरावत्यां मध्याह्नगतः सविता तदा संयमन्यामुद्यन्दृश्यते तत्र मध्याह्नगतो वारुण्यामुद्यन्दृश्यते तथोत्तरस्यां, प्रदक्षिणावृत्तेस्तुल्यत्वात् ।

सिद्धान्ती—सर्वांच्याच उत्तरेला मेरुपर्वत आहे.

शिष्य—कारण, सूर्योदय पाहण्यासाठीं आपण सूर्यसन्मुख झालों, म्हणजे आपल्या डाव्या हाताकडे मेरुपर्वत होतो. डाव्या हाताकडील दिशा म्हणजे उत्तर दिशा !

सिद्धान्ती—तेव्हां ज्या वेळीं सूर्य अमरावतीमध्यें मध्यग झालेला दिसतो, तेव्हां यमपुरींत राहणाऱ्या लोकांना सूर्य उगवत आहे, असें दिसतें. यमपुरीचा मध्याह्नकाल तो वरुणपुरींतील लोकांचा प्रातःकाल आणि वरुणपुरीचा मध्यकाल तो वरुणनगरींत प्रातःकाल होतो. यावरून हें उघड होतें कीं, सूर्याच्या प्रदक्षिणेचा काल सर्वत्र सारखाच आहे, हें त्यांचें म्हणजे पुराणांचें म्हणणें बरोबरच आहे.

इलावृतवासिनां सर्वतः पर्वतप्राकारनिवारितादित्यरश्मीनां सवितोर्ध्व इवोदेताऽर्वागस्तमेता दृश्यते । पर्वतोर्ध्वच्छिद्रप्रवेशात्सवितृप्रकाशस्य ।

सिद्धान्ती—पण +इलावृत्तांत राहणारे जे लोक आहेत, त्यांच्या भोंवतीं सर्वत्र पर्वतप्राकार असल्यामुळें, त्यांच्यांकडे कोणत्याही दिशेनें सूर्यकिरण येऊं शकत नाहींत. म्हणून सूर्योदय ऊर्ध्वदिशेला होतो, असा लोकांचा समज असतो; आणि अधरदिशेला त्याचा अस्त होतो; असें ते समजतात. हें इलावृत्त मेरूच्या चारी दिशेस पसरलेलें आहे, आणि त्याच्या भोंवतीं मानसोत्तर व महामेरू हे उत्तुंगपर्वत आहेत. त्यामुळें पूर्वपश्चिमेकडून किंवा दक्षिणोत्तरेकडून येणारे सूर्याकिरण त्यांस दिसत नाहींत, हें तूं सांगितलेंसच. असो. दोन्ही पर्वतांच्या मध्यें जो कांहीं अवकाश आहे, तेथें मात्र या लोकांस सूर्यदर्शन होतें. म्हणून यांचा सूर्योदय ऊर्ध्वदिशेला आणि अस्त अधरदिशेला होतो.

---

+ मेरूच्या चारही दिशांस इलावृत्त आहे. इलावृत्त नामक वर्षांत राहणाऱ्या लोकांच्या दोन्ही बाजूंस मानसोत्तर व सुमेरु या उत्तुंग-पर्वतांचा वेढा पडला आहे

तथर्गाद्यमृतोपजीविनाममृतानां च द्विगुणोत्तरोत्तरवीर्यवत्त्वमनुमीयते भोगकालद्वैगुण्यलिङ्गेन । उद्यमनसंवेशनादि-वेलानां विदुषश्च समानम् ॥ १ ॥ २ ॥ ३ ॥ ४ ॥

इति तृतीयाध्यायस्य दशमः खण्डः ॥ १० ॥

सिद्धान्ती—याप्रमाणें ऋगादि अमृतांवर उपजीविका करणाऱ्या देवांचें व अमृतांचें वीर्य उत्तरोत्तर दुपटीनें वाढत आहे, असें अनुमान आपल्यास करितां येतें. भोगकाल दुपटीनें वाढत जातो, हें या अनुमानाचें लिंग म्हणजे चिन्ह आहे. आतां रुद्रादि देवांचे भोगाचे काल आणि लीनतेचे काल जसे दुपटीनें वाढत जातात, तसेच त्या त्या अमृताचें रूप जाणणाऱ्या ज्ञानी लोकांचेही भोगकाल आणि स्थितिकाल दुपटीनें वाढत जातात ॥ १ ॥ २ ॥ ३ ॥ ४ ॥

दहावा खंड समाप्त.

---

## खंड अकरावा.

### मंत्र पहिला.

**अथ तत ऊर्ध्व उदेत्य नैवोदेता नास्तमेतैकल एव मध्ये स्थाता तदेष श्लोकः ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—अथ ततः ऊर्ध्वः उदेत्य न एव उदेता, न अस्तं एता, एकलः एव मध्ये स्थाता** (त्यानंतर; सूर्य ऊर्ध्व म्हणजे सर्वांच्या वर विद्यमान असून इतका श्रेष्ठ होतो कीं उदय किंवा अस्त हे विकार त्या सूर्याला होत नाहींत. तो एकाकी आपल्या स्वयंप्रकाश स्वरूपामध्यें विराजमान होतो) **तत एषः श्लोकः** (त्यासंबंधानें पुढील श्लोक श्रुति सांगत आहे)॥ १ ॥

कृत्वैवमुदयास्तमनेन प्राणिनां स्वकर्मफलभोगनिमित्तमनुग्रहं तत्कर्मफलोपभोगक्षये तानि प्राणिजातान्यात्मनि संहृत्याथ ततस्तस्मादनन्तरं प्राण्यनुग्रहकालादूर्ध्वः सन्नात्मन्युदेत्योद्गम्य यान्प्रत्युदेति तेषां प्राणिनामभावत्स्वात्मस्थो नैवोदेता नास्तमेतैकलोऽद्वितीयोऽनवयवो मध्ये स्वात्मन्येव स्थाता । तत्र कश्चिद्विद्वान्वस्वादिसमानचरणो रोहिताद्यमृतभोगभागी यथोक्तक्रमेण स्वात्मानं

सवितारमात्मत्वेनोपेत्य समाहितः सन्नेनं मन्त्रं दृष्ट्वोत्थितोऽन्यस्मै पृष्टवते जगाद। यतस्त्वमागतो ब्रह्मलोकात्किं तत्राप्यहोरात्राभ्यां परिवर्तमानः सविता प्राणिनामायुः क्षपयति यथेहास्माकमित्येवं पृष्टः प्रत्याह। तत्तत्र यथापृष्टे यथोक्ते चार्थ एष श्लोको भवति तेनोक्तो योगिनेति श्रुतेर्वचनमिदम्॥ १॥

**सिद्धान्ती**—मागें सांगितल्याप्रमाणें उदयास्त पावून व त्या उदयास्तानेंच सर्व प्राण्यांवर आपापल्या कर्मांच्या फलभोगांची प्राप्ति करून देऊन अनुग्रह करावयाचा आणि प्राण्यांच्या कर्मांच्या फलांचा उपभोगक्षय झाल्यानंतर सर्व प्राणिवर्गास आपल्यामध्यें लीन करून घ्यावयाचें, असा सूर्याचा अखंड व्यवहार चाललेला आहे, हें येथपर्यंत सिद्ध झालें.

**शिष्य**—भगवन्, जोंपर्यंत जीवांस कर्मफलांचा उपभोग घ्यावयाचा असतो, तोंपर्यंत जन्मप्राप्ति होऊन ते आपल्या कर्मफलांचा उपभोग घेतात; आणि हा उपभोग ठीक व्हावा म्हणून सूर्यदेवता उदयास्त पावत असते. हा या देवतेचा जीवावर अनुग्रह आहे. पुढें फलभोगक्षय झाल्यानंतर ते सर्व प्राणी सूर्यरूपी ब्रह्मामध्यें लीन होतात. याप्रमाणें हा क्रम आणि या क्रमाला उन्नति देणारी मधुविद्या आपण सांगितली व उत्तरोत्तर श्रेष्ठ होत जाणारे पांच पर्याय आपण सांगितले, हें ठीक झालें. जीवानें मधुविद्या संपादन केली असतां, उत्तरोत्तर तो श्रेष्ठ स्थितीला प्राप्त होतो, हेंही मला समजलें. यानंतर पुढें काय होतें, तें समजून घेण्याची मला इच्छा आहे.

**सिद्धान्ती**—तोच प्रकार या मंत्रांत श्रुतीनें सांगितला आहे. प्राण्यावर अनुग्रह करण्याचा जो काल आहे तो संपल्यानंतर हा जगद्व्यवहार चालविणारी सूर्यदेवता स्वस्वरूपामध्यें उदित होणार. हा उदय व्यवहाराच्या म्हणजे जन्मस्थितिलयाच्या पलीकडचा आहे. ऊर्ध्व म्हणजे सर्वांच्या पलीकडे असून सर्वश्रेष्ठ असणें. असो; येथें प्राण्यांचा अभाव असतो.

**शिष्य**—म्हणजे उदयास्त पाहणारे प्राणी येथें नसतात ?

**सिद्धान्ती**–होय, नसतात. येथें श्रीसूर्य स्वरूपामध्यें मात्र असणार आहे. अर्थात् त्याला येथें उदय नसतो; किंवा अस्तही नसणार. तो एकच एक म्हणजे अद्वितीय असणार. अनवयव (अवयवशून्य, एकरस) असणार; आणि ‘मध्येस्थाता’ म्हणजे स्वस्वरूपामध्यें विराजमान होणारा असतो. ही स्थिति प्राप्त झाली असतां, कोणी मधुविद्या पारंगत विद्वान्—

**शिष्य**—म्हणजे वसू, रुद्र, आदित्यादि दैवी स्वरूपांतून संचार करणारा, उत्तरोत्तर श्रेष्ठ स्वरूप प्राप्त करून घेऊन रोहितादि (रक्त-श्वेतादि) रूपी अमृत सेवन करणारा जीव म्हणजे हा विद्वान् होय. होयना ?

सिद्धान्ती—ठीक आहे. मागें सांगितलेल्या क्रमानें श्रेष्ठ स्वरूप प्राप्त झालेला विद्वान् 'अनुग्राहक सूर्य हाच आपला आत्मा आहे;' असें ज्ञानविज्ञान प्राप्त करून घेऊन समाहित म्हणजे समाधिस्थ अथवा शांत होतो. सारांश, उत्कृष्ट प्रकारची शांति त्याला प्राप्त होते. पुढें त्याला हा मंत्र गोचर झाला असतां तो भानावर येतो. या भानस्थितींत त्याला दुसरा कोणी मुमुक्षु प्रश्न करितो. त्या पृच्छकाला उत्तर म्हणून पुढील शब्द हा विद्वान् उच्चारितो.

शिष्य—प्रश्न कोणता भगवन्?

सिद्धान्ती—पृच्छक विचारितो: 'ज्या अर्थी तूं ब्रह्मलोकापासून परत आला आहेस, त्या अर्थी उत्कृष्ट शांति देणाऱ्या ब्रह्मलोकांत काय स्थिति आहे, ती मला सांग. तेथेंही अहोरात्रद्वारानें पुनरावृत्ति करणारा किंवा नित्य भ्रमण करणारा सूर्य ब्रह्मलोकांतील प्राण्यांच्या आयुष्याचा क्षय करीत असतो काय?' हा प्रश्न आहे.

शिष्य– जसा येथें आपल्या आयुष्याचा क्षय अहोरात्रद्वारा सूर्य करीत असतो, त्याप्रमाणेंच ब्रह्मलोकांतही आयुष्याचा क्षय होतो कीं काय? असा पृच्छकाचा प्रश्न आहे?

सिद्धान्ती—होय. त्याला क्रममुक्तिद्वारानें ब्रह्मलोकापर्यंत गेलेला विद्वान् उत्तर देतो—

शिष्य –आपली समाधिस्थिति क्षणभर एकीकडे ठेवून देहभानावर आलेला विद्वान् काय म्हणतो बरें?

सिद्धान्ती—तो म्हणतो,–'तूं जो प्रश्न विचारला आहेस, त्याचें उत्तर देण्यासाठीं श्रुतीनेंच स्वत: पुढील श्लोक उद्गारिला आहे.' विद्वान् योग्याच्या मुखांतून पुढील श्लोक उद्धृत झाला आहे, असें श्रुति स्वतःच या श्लोकांत सांगत आहे. 'तदेष श्लोकः' हे शब्द श्रुतीचे आहेत ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**न वै तत्र न निम्लोच नोदियाय कदाचन।**
**देवास्तेनाहꣳ सत्येन मा विराधिषि ब्रह्मणेति॥ २॥**

**अन्वय व अर्थः—तत्र न वै ( तेथें हें कांहीं नाहीं ) कदाचन न *निम्लोच, न उदियाय ( तेथें केव्हांही अस्त नव्हता किंवा केव्हांही**

---

* 'निमुम्लोच' असें पद हवें. मंत्रांतील प्रयोग आर्ष आहे.

उदय नव्हता ) **देवाः** (हे सर्वसाक्षी देव हो) **तेन अहं सत्येन ब्रह्मणा मा विराधिषि** (त्या सत्यस्वरूपी ब्रह्माशीं माझा केव्हांही विरोध न होवो) सारांश, तेथें उदयास्त मुळींच नाहीं, असें सांगून योगी विद्वान् शपथ-पूर्वक म्हणतो कीं, मी हें जें ब्रह्मलोकांतील वृत्त तुला सांगत आहें, तें त्रिवार सत्य आहे ॥ २ ॥

**न वै तत्र यतोऽहं ब्रह्मलोकादागतस्तस्मिन्न वै तत्रैतदस्ति यत्पृच्छसि । न हि तत्र निम्लोचास्तमगमत्सविता न चोदियायोद्गतः कुतश्चित्कदाचन कस्मिंश्चिदपि काल इति । उदयास्तमयवर्जितो ब्रह्मलोक इत्यनुपपन्नमित्युक्तः शपथमिव प्रतिपेदे । हे देवाः साक्षिणो यूयं शृणुत यथा मयोक्तं सत्यं वचस्तेन सत्येनाहं ब्रह्मणा ब्रह्मस्वरूपेण मा विराधिषि मा विरुध्येयम ( या ) प्राप्तिर्ब्रह्मणो मम मा भूदित्यर्थः ॥ २ ॥**

**सिद्धान्ती**--ज्या ब्रह्मलोकांतून मी परत आलों आहें, देहभानावर आलों आहें, त्या ब्रह्मलोकांत तूं जें काय विचारतो आहेस, तें तेथें कांहीं नाहीं. तेथें सूर्याला निम्लोच म्हणजे अस्त नाहीं किंवा उदयही नाहीं. सूर्याला उदयास्त आहेत, सूर्य कधीं अस्ताला गेला आहे किंवा उदय पावला आहे, असें केव्हांही मीं ब्रह्मलोकांत पाहिलें नाहीं. ब्रह्मलोकांतील आत्मस्वरूपी सूर्याला उदयास्त असणें केव्हांही शक्य नाहीं.

**पूर्वपक्षी**—असें कसें होईल ? ब्रह्मलोक झाला म्हणून काय झालें ? तेथेंही सूर्याला उदयास्त असलेच पाहिजेत.

**सिद्धान्ती** --असलीच शंका पृच्छक घेईल, असें मनांत आणून ब्रह्मवेत्ता योगी जणों काय शपथ घेऊन म्हणतो:—'हे सर्वज्ञ देवहो ! तुम्हीच साक्षी आहांत. मी जें काय तत्त्व सांगत आहे तें सत्य आहे कीं नाहीं तें तुम्हींच पहा. सत्य-स्वरूपीं जें ब्रह्म आहे त्याचा विरोध होणार नाहीं, अशा प्रकारचें मी बोललेलें वाक्य सत्य आहे कीं नाहीं हें तुम्हींच पहा. तात्पर्य, मी बोललों, हें सत्य नसेल तर माझा ब्रह्माशीं विरोध होवो. पण मीं सत्य सांगितलें आहे. म्हणून माझा ब्रह्माशीं केव्हांही विरोध होणें नाहीं व मला ब्रह्माची अप्राप्ति कधींही व्हाव-याची नाहीं.' असें देवास साक्षी ठेवून ब्रह्मयोग्यानें उत्तर दिलें ॥ २ ॥

सत्यं तेनोक्तमित्याह श्रुतिः—

सिद्धान्ती—हा ब्रह्मयोगी बोलला तें सत्य आहे, हें सांगण्यासाठीं श्रुति पुढील मंत्र अवतारित आहे—

## मंत्र तिसरा.

**न ह वा अस्मा उदेति न निम्लोचति सकृद्दिवा हैवास्मै भवति य एतामेवं ब्रह्मोपनिषदं वेद ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थ—कस्मै न ह वै उदेति, न निम्लोचति, सकृत्-दिवा ह एव अस्मै भवति** ( ब्रह्मवेत्त्या योग्याला केव्हांहीं उदय नसतो किंवा अस्त नसतो, त्याला सदैव दिवसच असतो ) **यः एतां ब्रह्मोपनिषदं एवं वेद** ( जो यथोक्त ब्रह्मोपनिषत् ज्ञानविज्ञान करून वेतो, तोही उदयास्तशून्य ब्रह्मरूप होतो ) ॥ ३ ॥

न ह वा अस्मै। यथोक्तब्रह्मविदे नोदेति न निम्लोचति नास्तमेति किं तु ब्रह्मविदेऽस्मै सकृद्दिवा हैव सदैवाहर्भवति स्वयंज्योतिष्ट्वात् एतां यथोक्तां ब्रह्मोपनिषदं वेदगुह्यं वेद। एवं तन्त्रेण वंशादित्रयं ग्रत्यमृतसंबन्धं च यच्चान्यदवोचामैवं जानातीत्यर्थः। विद्वानुदयास्त-मयकालापरिच्छेद्यं नित्यमजं ब्रह्म भवतीत्यर्थः ॥ ३ ॥

सिद्धान्ती—ब्रह्मवेत्त्याचें जें स्वरूप वर्णन केलें आहे, तें म्हणजे त्याचें ज्ञान-विज्ञान प्राप्त झालेल्या ब्रह्मवेत्त्याला केव्हांही सूर्य उगवतो किंवा मावळतो, असें नसतें. उदयास्ताच्या पलीकडे असणाऱ्या ब्रह्मलोकांत सदैव दिवसच असतो. कारण, ब्रह्मवेत्ता स्वयंप्रकाशच असतो; आणि सर्वप्रकाशक सूर्य हाही त्याचा आत्मा झालेला असतो. असो; वेदाचें अत्यंत गुह्य प्रकरण जें ब्रह्मोपनिषद् त्याचें यथोक्त ज्ञान ज्याला यथार्थ झालें—

शिष्य—मागें तिरश्चीन वंश, मधु—अपूप, मधुनाडी अशा वंशादि त्रयाचें, तसेंच उत्तरोत्तर श्रेष्ठ होणाऱ्या अमृतस्वरूपांचें ज्याला ज्ञान झालें, वसुआदि देवांचा व अमृताचा संबंध ज्यास समजला आणि आणखी जें काय उद्यम, संवे-शन इत्यादि सांगितलें ( खंड ६ मंत्र २ पहा ) तें सर्व ज्याला समजलें, तो विद्वान् उदयास्तरूपी कालाच्या पलीकडे जातो. होय ना ?

सिद्धान्ती—होय; आणि कालस्थलातीत जें नित्य आणि अज ब्रह्म त्या स्वरूपाची प्राप्ति करून घेतो. तात्पर्य, ब्रह्म होतो ॥ ३ ॥

## मंत्र चवथा.

**तद्धैतद्ब्रह्मा प्रजापतय उवाच प्रजापतिर्मनवे मनुः प्रजाभ्यस्तद्धैतदुद्दालकायाऽऽरुणये ज्येष्ठाय पुत्राय पिता ब्रह्म प्रोवाच ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थ—एतत् तत् ब्रह्मा प्रजापतये उवाच ह; प्रजापतिः मनवे; मनुः प्रजाभ्यः** ( हें तें देवगुह्य उपनिषद् ब्रह्मदेवानें प्रजापतीला, प्रजापतीनें मनूला आणि मनूनें इक्ष्वाकुप्रमुख पुत्रांस सांगितलें ) **एतत् तत् उद्दालकाय आरुणये जेष्ठाय पुत्राय पिता ब्रह्म प्रोवाच** ( हें तें ब्रह्म-उपनिषद् ज्येष्ठ पुत्र जो उद्दालक आरुणि त्याला तत्पित्यानें सांगितलें ) ॥ ४ ॥

तद्धैतन्मधुज्ञानं ब्रह्मा हिरण्यगर्भो विराजे प्रजापतय उवाच । सोऽपिमनवे । मनुरिक्ष्वाकाद्याभ्यः प्रजाभ्यः प्रोवाचेति विद्यां स्तौति ब्रह्मादिविशिष्टक्रमागतेति । किं च तद्धैतन्मधुज्ञानमुद्दालकायाऽऽरुणये पिता ब्रह्मविज्ञानं ज्येष्ठाय पुत्राय प्रोवाच ॥ ४ ॥

**सिद्धान्ती—**तें हें मधुज्ञान ( मधुविद्या, ब्रह्मोपदेश करणारी मधुविद्या ) ब्रह्मदेवानें ( हिरण्यगर्भानें ) विराट्रूपी प्रजापतीला प्रथम सांगितलें. पुढें विराटानें मनूला आणि मनूनें इक्ष्वाकु-प्रमुख पुत्रांस ही विद्या सांगितली. अर्थात् हा परंपरागत विशिष्ट क्रम सांगून श्रुतानें ब्रह्मविद्येची स्तुति केली आहे. तसेंच हें मधुज्ञान आरुणि अथवा उद्दालक याला त्याच्या पित्यानें सांगितलें. आरुणि हा औपवेशी आरुणाचा मुलगा होता. आरुणानें आपल्या ज्येष्ठ पुत्राला म्हणजे आरुणीला हें ब्रह्मविज्ञान सांगितलें ॥ ४ ॥

---

## मंत्र पांचवा.

**इदं वाव तज्ज्येष्ठाय पुत्राय पिता ब्रह्म प्रब्रूयात्प्रणाय्याय वाऽन्तेवासिने ॥ ५ ॥**

**अन्वय व अर्थः—पिता इदं वाव तत् ब्रह्म ज्येष्ठाय पुत्राय वा अंतेवासिने प्रणाय्याय प्रब्रूयात्** ( पित्यानें हें तें मधुविद्यात्मक ब्रह्मविज्ञान ज्येष्ठ पुत्राला किंवा गुरूनें शरण आलेल्या अधिकारी प्रियकर शुद्ध शिष्याला सांगावें ) ॥ ५ ॥

इदं वाव तद्यथोक्तमन्योऽपि ज्येष्ठाय पुत्राय सर्वप्रियार्हाय ब्रह्म प्रब्रूयात्। प्रणाय्याय वा योग्यायान्तेवासिने शिष्याय ॥ ५ ॥

सिद्धान्ती—आतांपर्यंत सांगितलेलें हें ब्रह्मविज्ञान कोणींही विद्वान् पित्यानें आपल्या ज्येष्ठ पुत्राला सांगावें.

शिष्य—ज्येष्ठ पुत्रालाच कां म्हणून ?

सिद्धान्ती – हा परंपरागत संप्रदाय आहे. शिवाय, सामान्यतः ज्येष्ठ पुत्रच पित्याचें सर्वप्रेमस्थान असतो. किंवा शास्त्रोक्त विधीनें शरण आलेल्या कोणाही योग्य म्हणजे अधिकारी शिष्याला ब्रह्मज्ञानविज्ञानी गुरूनें सांगावें ॥ ५ ॥

---

**मंत्र सहावा.**

**नान्यस्मै कस्मैचन यद्यप्यस्मा इमामद्भिः परिगृहीतां धनस्य पूर्णां दद्यादेतदेव ततो भूय इत्येतदेव ततो भूय इति ॥ ६ ॥**

**इति तृतीयाध्यायस्यैकादशः खण्डः ॥ ११ ॥**

**अन्वय व अर्थः—अन्यस्मै कस्मैचन न** ( दुसऱ्या कोणालाही हा ज्ञानोपदेश करूं नये ) **यद्यपि अस्मै परिगृहीतां धनस्य पूर्णां इमाम् दद्यात्** ( जरी कोणी ब्रह्मवेत्त्याला समुद्रपरिवेष्टित व धनधान्यसमृद्ध पृथिवी दिली; तथापि त्या इतराला हें ज्ञान सांगूं नये ) **ततः एतत् एव भूयः इति; ततः एतत् एव भूयः इति** ( कारण, ब्रह्मज्ञानविज्ञान हें त्याच्या पेक्षांही श्रेष्ठ आहे; त्याच्यापेक्षांही श्रेष्ठ आहे ) ॥ ६ ॥

नान्यस्मै कस्मैचन प्रब्रूयात्तीर्थद्वयमनुज्ञातमनेकेषां प्राप्तानां तीर्थानामाचार्यादीनाम्। कस्मात्पुनस्तीर्थसंकोचनं विद्यायाः कृतमित्याह—यद्यप्यस्मा आचार्यायेमां कश्चित्पृथिवीमद्भिः परिगृहीतां समुद्रपरिवेष्टितां समस्तामपि दद्यादस्या विद्याया निष्क्रयार्थमाचार्याय धनस्य पूर्णां संपन्नां भोगोपकरणैर्नासावस्य निष्क्रयो यस्मात्ततोऽपि दानादेतदेव यन्मधुविद्यादानं भूयो बहुतफलमित्यर्थः। द्विरभ्यास आदरार्थः ॥ ६ ॥

इति तृतीयाध्यायस्यैकादशः खण्डः ॥ ११ ॥

सिद्धान्ती—ज्येष्ठ पुत्राला पिता किंवा योग्य शिष्याला आचार्य हेच काय ते दोघेजण ब्रह्मज्ञान—विज्ञानाचा उपदेश देण्याला योग्य अधिकारी आहेत. यद्यपि अनेक ब्रह्मज्ञ ( आचार्य, श्रोत्रिय किंवा मेधावी ) ब्रह्मोपदेशासाठीं उपलब्ध झाले तथापि त्यांपैकीं पूर्वोक्त द्वयांनीं मात्र उपदेश करावा; दुसऱ्या कोणींही करूं नये.

शिष्य--असा तीर्थसंकोच श्रुतीनें कां केला बरें ? अनेक पुत्रशिष्यांपैकीं ज्येष्ठ पुत्र आणि योग्य शिष्य यांसच पूर्वोक्त तीर्थद्वयानें ब्रह्मोपदेश करावा; असा संकोची नियम करण्याचें कारण काय असावें बरें ?

सिद्धान्ती—या विद्येची योग्यता तशीच मोठी आहे. काय सांगावें ! समुद्रानें चारी बाजूंनीं वेढा घातलेली ही बहुरत्ना वसुंधरा ' गुरुदक्षिणा ' म्हणून देऊन कोणी ब्रह्मविद्येचा क्रय करण्यास सिद्ध झाला, सर्व सुवर्णरत्नादि भोग-साधनांनीं पूर्ण असलेली ही पृथ्वी जरी मोबदला आचार्याला दिली, तथापि या ब्रह्मविद्येची किंमत भरून येत नाहीं. पृथ्वीच्या मोलाहूनही ब्रह्मविद्येचें मोल अधिक आहे. तसेंच, मधुविद्येचें दान केलें असतां सर्व विद्यांच्या मोलाहूनही अधिक मोल म्हणजे मुक्तीसारखें फल दान घेणाऱ्यास मिळावयाचें असतें. अर्थात् ही बहुमोल विद्या ज्याला द्यावयाची, तो आपला अत्यंत प्रियकर पुत्र तरी पाहिजे किंवा आपला योग्य अधिकारी शिष्य तरी पाहिजे. व ज्यानें द्यावयाची तो खरा हितकारी ब्रह्मज्ञ पाहिजे. दोनदां ब्रह्मविद्येच्या मोलाची आवृत्ति केली आहे, ती खंड परिसमाप्तीसाठीं व आदरासाठीं आहे ॥ ६ ॥

अकरावा खंड समाप्त.

---

# खंड बारावा.

यत एवमतिशयफलैषा ब्रह्मविद्याऽतः सा प्रकारान्तरेणापि वक्तव्येति गायत्री वा इत्याद्यारभ्यते । गायत्रीद्वारेण चोच्यते । ब्रह्मणः सर्वविशेषरहितस्य नेति नेतीत्यादिविशेषप्रतिषेधगम्यस्य दुर्बोधत्वात् । सत्स्वनेकेषु छन्दःसु गायत्र्या एव ब्रह्मज्ञानद्वारतयोपादानं प्राधान्यात् । सोमाहरणादितरच्छन्दोक्षराहरणेनेतरच्छन्दोव्याप्त्या च सर्वसवनव्यापकत्वाच्च यज्ञे प्राधान्यं गायत्र्याः । गायत्रीसारत्वाच्च ब्राह्मणस्य मातरमिव हित्वा गुरुतरां गायत्रीं ततोऽन्यद्गुरुतरं न प्रतिपद्यते यथोक्तं ब्रह्मापीति । तस्यामत्यन्तगौरवस्य प्रसिद्धत्वात् । अतो गायत्रीमुखेनै ( णै ) व ब्रह्मोच्यते ।

**सिद्धान्ती**—असें आहे म्हणून, ब्रह्मविद्येचें फल निरतिशय आहे म्हणून, त्या विद्येला प्रकाशित करणारें प्रवचन आणखी एका प्रकारानें व्हावें, अशी श्रुतीची इच्छा असणें साहजिक आहे. त्या इच्छेच्या पूर्तीसाठीं म्हणून ह्या नव्या प्रकरणाला आरंभ झाला आहे.

**शिष्य**—भगवन्, सूर्यद्वारानें ब्रह्मविद्या-संपादनाचा एक मार्ग श्रुतीनें सांगितला. आतां, कोणत्या देवतेच्या द्वारानें जाण्यास श्रुति सांगणार आहे?

**सिद्धान्ती**—गायत्रीचा उपदेश करून आतां ब्रह्मविद्या समजून घ्यावयाची आहे.

**पूर्वपक्षी**—तुम्हास जर ब्रह्मविद्याच सांगावयाची आहे, तर ब्रह्माचा उपदेश करा. गायत्रीच्या उपदेशाचें काय प्रयोजन आहे? शिवाय, हें ब्रह्मोपदेशाचें शेपूट लांबणार तरी किती?

**सिद्धान्ती**—बाबा, ब्रह्मस्वरूप अखिल विशेष-शून्य आहे. 'तें हें नव्हे,' 'तें तें नव्हे' इत्यादि विशेष प्रतिषेधांच्या द्वारानेंच तें समजून घ्यावयाचें असतें; सर्व विशेषशून्य स्वरूपाचें ज्ञान अनंत विशेषप्रतिषेधांनींही होणें प्रायः अशक्य आहे. तथापि दयाघन श्रुति केव्हां सूर्यद्वारानें, केव्हां गायत्रीद्वारानें, केव्हां प्रणवद्वारानें ब्रह्मोपदेश करीत असते. हेतु हा कीं, कोणत्या तरी रीतीनें जीवांस ब्रह्मोपदेश व्हावा; आणि त्याच्या साह्यानें तरी त्यांनीं मुक्त व्हावें. ब्रह्मज्ञान दुष्कर म्हणून श्रुतीनें हा प्रपंच केला आहे. गायत्रीमुखानें ब्रह्मोपदेश करणें हा ब्रह्मज्ञानाचाच मार्ग आहे.

**पूर्वपक्षी**—बरें; वेदामध्यें अनेक छंद आहेत. ते सर्व सोडून देऊन, गायत्री-छंदाचाच स्वीकार श्रुतीनें कां केला आहे?

**सिद्धान्ती**—कारण, गायत्री हा छंद ब्रह्मज्ञानाचें एक द्वार आहे. हा छंद सर्व छंदांत प्रधान आहे.

**शिष्य**—कां बरें?

**सिद्धान्ती**—कारण, यज्ञसिद्धीसाठीं सोमाचें आनयन* करण्याला गायत्री-छंद हा एकटाच काय तो समर्थ झाला. यज्ञामध्यें सोमाचें अत्यंत प्राधान्य असतें. पुनः गायत्री छंदाशिवाय सोमाचें आहवनही करितां येत नाहीं. म्हणून गायत्री छंदाला प्राधान्य आलें. तसेंच इतर छंदांतील अक्षरांचें आहरणही गायत्री छंद करितो.

---

* एकदां सोमाचें आहरण करावें, अशी देवांस इच्छा झाली. त्यांनीं तें काम गायत्री, त्रिष्टुभ् आणि जगती यांकडे सोपविलें. पण जगति आणि त्रिष्टुभ हे छंद अर्ध्या मार्गांतूनच परत आले. गायत्री छंद मात्र सोमस्थानापर्यंत गेला, तेथील रक्षकांचा पराभव करितां झाला, आणि देवांस सोम आणून देता झाला. अशी कथा ऐतरेय ब्राह्मणामध्यें सांगितली आहे. म्हणून ही गायत्री छंदाला प्राधान्य आहे.

शिष्य—म्हणजे कसें ?

सिद्धान्ती—उष्णिग्, अनुष्टुभ् प्रभृति इतर छंदांच्या चरणांचीं सात, आठ, नऊ इत्यादि अक्षरें असतात. पण गायत्री छंदाच्या प्रत्येक चरणांत सहा अक्षरें असतात. कोणतीही मोठी संख्या घेतली, तरी तिचें अस्तित्व लहान संख्येवाचून होणें शक्य नाहीं. आठही संख्या होण्याला सहाचें अस्तित्व अवश्य असतें. तात्पर्य, इतर सर्व वैदिक छंदांमध्यें गायत्रीची व्यापकता आहे. म्हणून सर्वव्यापक गायत्री प्रधानता पावते. किंवा असेंही सांगतात कीं, जेव्हां त्रिष्टुभ् आणि जगती हे छंद सोमाहरण करण्याकरितां गेले व आपल्या आंवाक्या बाहेरचें काम आहे, असें पाहून परत फिरले, तेव्हां जगती छंदाचीं तीन अक्षरें गळून पडलीं व त्रिष्टुभाचें एक अक्षर गळून पडलें. अर्थात् अठ्ठेचाळीस अक्षराची जगती पंचेचाळीस अक्षरांची झाली आणि चव्वेचाळीस अक्षराचा त्रिष्टुभ् त्रेचाळीस अक्षरांचा झाला. सोम घेऊन परत येत असतां गायत्रीनें तीं अक्षरें परत आणिलीं आणि दोन्ही छंदांस पूर्णत्व देऊन त्यांस व्यापून राहती झाली. म्हणून गायत्रीला प्रधान छंद म्हणतात. पुनः; प्रातःसवन, माध्यंदिनसवन आणि तृतीय सवन ह्या तिन्ही सवनांत गायत्रीचें व्यापकत्व असतें. कारण प्रातःसवनांत विद्यमान असणारी गायत्री ही माध्यंदिन सवनाच्या त्रिष्टुभांत आणि तृतीयसवनाच्या जगतींत विद्यमान असते. शिवाय, ब्राह्मण्याचें ( ब्रह्मस्वरूपाचें ) गायत्री हें सारसर्वस्व आहे. मातेप्रमाणें पालन करणारी गुरुतर गायत्री सोडून अन्य छंदाचा यथोक्त ब्रह्म केव्हांहीं आश्रय करीत नाहीं. तसेंच, तिच्याठिकाणीं अत्यंत गौरव आहे, सर्व लोक तिला पूज्य मानतात, हें तर सर्व विश्रुत आहे. अशीं कारणें आहेत, म्हणून गायत्रीमुखानें उपदेश करण्याचा संकल्प श्रुतीनें केला आहे.

---

## मंत्र पहिला.

**गायत्री वा इदꣳ सर्वं भूतं यदिदं किंच वाग्वै गायत्री वाग्वा इदꣳ सर्वं भूतं गायति च त्रायते च ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—इदं सर्वं भूतं, यत् इदं किंच, गायत्री वै** ( येथें हें जें सर्व स्थावर जंगम आहे, जें कांहीं यत्किंचित् येथें आहे, तें सर्व गायत्रीच आहे ) **वाक् वै गायत्री** ( वाणी हीही गायत्री आहे ) **इदं सर्वं भूतं वाक् वै** ( जे कांहीं येथें आहे, तें सर्व वाणी होय )

**गायति च त्रायते च** (गायत्री गाणारी व संरक्षण करणारी आहे म्हणून गायत्री ( गै+त्रा ) ही गायत्री आहे ) ॥ १ ॥

गायत्री वा इत्यवधारणार्थो वैशब्दः। इदं सर्वं भूतं प्राणिजातं यत्किंच स्थावरं जङ्गमं वा तत्सर्वं गायत्र्येव। तस्याश्छन्दोमात्रायाः सर्वभूतत्वमनुपपन्नमिति गायत्रीकारणं वाचं शब्दरूपामापादयति गायत्री वाग्वै गायत्रीति। वाग्वा इदं सर्वं भूतम्। यस्माद्वाक्शब्द-रूपा सती सर्वं भूतं गायति शब्दयत्यसौ गौरसावश्व इति च त्रायते च रक्षत्यमुष्मान्मा भैषीः किं ते भयमुत्थितमित्यादिना सर्वतो भयान्निवर्त्यमानो वाचा त्रातः स्यात्। यद्वाग्भूतं गायति च गायते च गायत्र्येव तद्गायति च त्रायते च वाचोऽनन्यत्वाद्गायत्र्याः गानात्त्राणाच्च गायत्र्या गायत्रीत्वम् ॥ १ ॥

सिद्धान्ती—मंत्रांतील वै शब्द अवधारणात्मक आहे ( निश्चयात्मक आहे ). येथें हें जें सर्व प्राणिजात आहे, जे कांहीं स्थावर जंगम अथवा चराचर आहे, तें सर्व गायत्रीच होय.

पूर्वपक्षी—गायत्री हा छंद आहे ना? मग याला सर्वभूतत्व कसें प्राप्त होणार?

सिद्धान्ती—श्रुति म्हणत आहे तें उपपन्नच आहे. गायत्रीचें कारण असणारी जी वाणी ती शब्दरूप आहे. म्हणून गायत्री शब्दरूप होते. अर्थात् श्रुति ‘ वाक् वै गायत्री ’ असें उपदेशून गायत्रीला वाग्रूप देत आहे. श्रुति हें रूप गायत्रीला प्राप्त करून देण्याला समर्थच आहे. पुनः वाणी हें सर्व चराचर आहे, हें तुम्हांस ही समजलें पाहिजे. कारण वाणीनें शब्दरूप धारण केलें, शब्दरूपानें ती प्रकट झाली, म्हणजे ती सर्व भूतांचें गान करिते, म्हणजे त्यांस नाम देते. ‘हा बैल, हा घोडा’ अशीं निरनिराळ्या पदार्थांस निरनिराळीं नांवें देणारीं वाणी शब्दरूप आहे. हें प्रसिद्ध आहे. आपल्यास झालेलें भूतांचें ज्ञान नामाशिवाय स्पष्ट करितां येत नाहीं, वाचक नाम नसतें तर वाच्य भूतांचें अस्तित्व इतरांस समजून देतां आलें नसतें, निदान कोणालाही सूक्ष्म विचार तरी करितां आला नसता. तसेंच ‘ अमक्यापासून भिण्याचें तुला कारण नाहीं’ ‘तुला कसलें भय उत्पन्न झालें आहे फुकट ! ’ इत्यादि शब्दात्मक वाक्यें उच्चारून आपण भीतिग्रस्त मनुष्याची भीति नष्ट करितों आणि त्याचें रक्षण करितों. भूतसंबंधी गायन ( वर्णन ) व भूतांचें रक्षण वाणी करिते, म्हणून तिला गायत्री असें म्हणावयाचें.

शिष्य---वाणी होऊन गायन करणें आणि त्राण करणें हीं कामें गायत्रीचींच आहेत. कारण, वाणीहून गायत्रीचें स्वरूप अन्य नाहीं. वाणीरूपच ती आहे. म्हणून गायत्री ही वाणी आणि वाणी ही गायत्री होय. वाणी सर्व चराचरव्यापी आहे म्हणून गायत्री ही सर्वव्यापक होते, व सर्व आहे, हें मला समजलें.

सिद्धान्ती--शिवाय, वाणीप्रमाणेंच स्वरूपतः गायन करणारा आणि तारण करणारा हाच छंद आहे म्हणून या छंदाला गायत्री म्हणतात. व हें 'गा' आणि 'त्रा' या शब्दांवरूनही सिद्ध होतें. गायत्री सर्वात्मक आहे; म्हणूनच सर्वात्मक ब्रह्मदृष्टीनें तिची उपासना करावी अशी श्रुतीची योजना आहे ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**या वै सा गायत्रीयं वाव सा येयं पृथिव्यस्याꣳ हीदꣳ सर्वं भूतं प्रतिष्ठितमेतामेव नातिशीयते ॥२॥**

**अन्वय व अर्थः—या वै सा गायत्री** ( या लक्षणाची जी ती गायत्री होय ) **या इयं पृथिवी, सा इयं वाव** ( जी ही पृथ्वी आहे, ती हीच गायत्री होय ) **हि अस्यां इदं सर्वं भूतं प्रतिष्ठितं, एतां एव न अतिशीयते** ( कारण, या पृथ्वीवर हीं सर्व भूतें प्रतिष्ठित झालीं आहेत. पृथ्वीचें अतिक्रमण कोणासही करितां येत नाहीं ) ॥ २ ॥

या वै सैवंलक्षणा सर्वभूतरूपा गायत्री, इयं वाव सा येयं पृथिवी । कथं पुनरियं पृथिवी गायत्रीति, उच्यते—सर्वभूतसंबन्धात् । कथं सर्वभूतसंबन्धः, अस्यां पृथिव्यां हि यस्मात्सर्वं स्थावरं जङ्गमं च भूतं प्रतिष्ठितमेतामेव पृथिवीं नातिशीयते नातिवर्तत इत्येतत् । यथा गानत्राणाभ्यां भूतसंबन्धो गायत्र्या एवं भूतप्रतिष्ठानाद्भूतसंबद्धा पृथिव्यतो गायत्री पृथिवी ॥ २ ॥

सिद्धान्ती—मागच्या मंत्रांत जिचें लक्षण सांगितलें आहे, तीच ही सर्व-भूतरूप गायत्री आहे. आतां, श्रुति ह्या मंत्रांत असें सांगते कीं, जी ही पृथ्वी आहे तीही गायत्रीच होय.

शिष्य—हें कसें ? ही पृथ्वी गायत्री कशी होणार ?

सिद्धान्ती—कारण, सर्व भूतांचा संबंध उभयतांशीं सारखाच आहे. गायत्री सर्वभूतात्मक आहे, हें आपण पाहिलें. आतां, पृथ्वीचा आणि भूतांचा काय

संबंध आहे तो पहा. या पृथ्वीच्या पाठीवरच सर्व स्थावर-जंगमभूतांची प्रतिष्ठापना झाली आहे. या पृथ्वीचें अतिक्रमण कोणत्याही भूताला केव्हांही करितां येत नाहीं. याप्रमाणें गानत्राणामुळें गायत्रीचा संबंध भूतांशीं येतो; आणि भूतप्रतिष्ठापक पृथिवी आहे, म्हणून तिचा संबंध भूतांशीं येतो. भूत-संबंध उभयतांमध्यें आहे व भूतद्वारानें गायत्रीचा आणि पृथ्वीचा सहभावसंबंध होतो. म्हणून पृथ्वीला गायत्रीपणा प्राप्त होतो ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**या वै सा पृथिवीयं वाव सा यदिदमस्मिन्पुरुषे शरीरमस्मिन्हीमे प्राणाः प्रतिष्ठिता एतदेव नाति-शीयन्ते ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थः—या वै सा पृथिवी, अस्मिन् पुरुषे यत् इदं शरीरं, इयं वाव सा** ( एवं लक्षणात्मक पृथ्वी आहे. तसेंच, ह्या पुरुषामध्यें जें शरीर आहे, तीच ही पृथ्वी होय ) **हि अस्मिन् इमे प्राणाः प्रतिष्ठिताः, एतत् एव न अतिशीयंते** ( कारण, या शरीरामध्यें हे प्राण प्रतिष्ठित झाले आहेत आणि शरीराला सोडून ते कधींही दुसरीकडे राहूं शकत नाहींत. शरीराचें अतिक्रमण त्यांस करितां येत नाहीं म्हणून शरीर हीच पृथ्वी होय ) ॥ ३ ॥

या वै सा पृथिवी गायत्रीयं वाव सेदमेव । तत्किं, यदिदमस्मिन्पुरुषे कार्यकारणसंघाते जीवति शरीरं पार्थिवत्वाच्छरीरस्य । कथं शरीरस्य गायत्रीत्वमिति । उच्यते—अस्मिन्हीमे प्राणा भूतशब्दवाच्याः प्रतिष्ठिताः । अतः पृथिवीवद्भूतशब्दवाच्यप्राण-प्रतिष्ठानाच्छरीरं गायत्री । एतदेव यस्माच्छरीरं नातिशीयन्ते प्राणाः ॥ ३ ॥

सिद्धान्ती—भूतप्रतिष्ठापकत्वादि लक्षणें असणारी जी पृथिवी ती खरोखर गायत्री होय, हें ठरलें. आतां ही गायत्री पुरुषाचें शरीर आहे, असें या मंत्रांत श्रुतीला सांगावयाचें आहे.

शिष्य—हें कसें ?

सिद्धान्ती—ह्या जिवंत असणाऱ्या पुरुषाला जें कार्यकारणात्मक शरीर प्राप्त झालें आहे, जो हा देहसंघात त्याला मिळाला आहे, तो तर पार्थिव म्हणजे पृथ्वीघटित आहे.

पूर्वपक्षी--तें ठीक. पण शरीराला गायत्रीत्व कसें येणार ?

सिद्धान्ती—ऐका: या शरीरांतच 'भूत' शब्दानें वाच्य असणारे प्राण प्रतिष्ठित होतात. म्हणून भूतप्रतिष्ठा असणाऱ्या पृथ्वी ( गायत्री ) प्रमाणें भूतशब्दानें वाच्य असणारे प्राण जेथें प्रतिष्ठित होतात तें शरीर पृथ्वीरूप म्हणजे गायत्रीरूप असते. तसेंच, शरीराला सोडून प्राण इतरत्र राहूं शकत नाहींत. ते शरीराचें अतिक्रमण करूं शकत नाहींत. असें हें जें प्राणप्रतिष्ठापक असणारें शरीर, तें भूतप्रतिष्ठापक पृथ्वीप्रमाणेंच गायत्रीरूप आहे, असें ठरतें ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा.

**यद्वै तत्पुरुषे शरीरमिदं वाव तद्यदिदमस्मिन्नन्तः-पुरुषे हृदयमस्मिन्हीमे प्राणाः प्रतिष्ठिता एतदेव नातिशीयन्ते ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थः—यत् वै, तत् पुरुषे शरीरं; इदं तत् वाव** ( वर सांगितलेलें पुरुषप्राप्त शरीर एवंलक्षणी आहे. गायत्रीरूपच हेंही—हृदय—आहे ) **अस्मिन् अंतःपुरुषे यत् इदं हृदयं, हि अस्मिन् इमे प्राणाः प्रतिष्ठिताः, एतत् एव न अतिशीयंते** ( ह्या पुरुषाच्या अंतर्यामीं जें हृदय असतें तेंही गायत्री होय. कारण, हे प्राण ह्या हृदयामध्यें प्रतिष्ठित असतात; आणि हृदयाचें अतिक्रमण केव्हांही करूं शकत नाहींत ) ॥ ४ ॥

यद्वै तत्पुरुषे शरीरं गायत्रीदं वाव तत् । यदिदमस्मिन्नन्तर्मध्ये पुरुषे हृदयं पुण्डरीकाख्यमेतद्गायत्री । कथमित्याह—अस्मिन्हीमे प्राणाः प्रतिष्ठिता अतः शरीरवद्गायत्री हृदयम् । एतदेव च नातिशीयन्ते प्राणाः । "प्राणो ह पिता । प्राणो माता ।" [ इति ] "अहिंसन्सर्वभूतानि" इति च श्रुतेर्भूतशब्दवाच्याः प्राणाः ॥४॥

सिद्धान्ती—या पुरुषाचें शरीर गायत्रीरूप आहे असें आपण मागच्या मंत्रांत ठरविलें. 'हें ही ती गायत्रीच आहे.' हें म्हणजे ह्या पुरुषाच्या शरीराच्या अंतर्भागांत जें पुंडरीकाख्य हृदय आहे, तेंही गायत्रीच होय, असें श्रुतीला या मंत्रांत सांगावयाचें आहे.

शिष्य—हें कसें ?

सिद्धान्ती—हे सर्व प्राण या हृदयांत प्रतिष्ठित झाले आहेत. म्हणून शरीराप्रमाणेंच ( शरीर गायत्री आहे त्या प्रमाणेंच ) हृदय ही गायत्री आहे. उभयतांही प्राणप्रतिष्ठापक आहेत. म्हणून शरीर गायत्री, तसेंच हृदय ही गायत्री. पुनः, हें प्राण हृदयाचें अतिक्रमण केव्हांही करूं शकत नाहींत. 'प्राण हा पिता आहे, प्राण माता आहे' अशी व 'कोणत्याही भूताची हिंसा ( प्राणघात ) न करितां' अशा श्रुति प्रमाण आहेत. यांवरूनच भूत हा शब्द प्राणवाचक आहे; असें ठरतें. प्राण हृदयांत राहतात (भूतें हृदयांत राहतात) व हृदयवाचक भूतें गायत्री आहेत; म्हणून हृदयही गायत्री आहे ॥ ४ ॥

---

## मंत्र पांचवा.

**सैषा चतुष्पदा षड्विधा गायत्री तदेतदृचाऽभ्यनूक्तम् ॥ ५ ॥**

**अन्वय व अर्थः—स एषा चतुष्पदा षड्विधा गायत्री** ( ती ही चार पायांची आणि सहा प्रकारची गायत्री आहे ) **एतत् तत् ऋचा अभ्यनूक्तं** ( हें तें सर्व पुढील ऋग्वेद मंत्रानें प्रकाशित केलें आहे ) ॥५॥

सैषा चतुष्पदा षडक्षरपदा छन्दोरूपा सती भवति गायत्री षड्विधा वाग्भूतपृथिवी शरीरहृदयप्राणरूपा सती षड्विधा भवति। वाक्प्राणयोरन्यार्थनिर्दिष्टयोरपि गायत्रीप्रकारत्वम्। अन्यथा षड्विधसंख्यापूरणानुपपत्तेः। तदेतस्मिन्नर्थ एतद्गायत्र्याख्यं ब्रह्म गायत्र्यनुगतं गायत्रीमुखेनो ( णो ) क्तमृचाऽपि मन्त्रेणाभ्यनूक्तं प्रकाशितम् ॥ ५ ॥

सिद्धान्ती—ती ही चार चरण असणारी व प्रत्येक चरणांत सहा अक्षरें असणारी छंदोरूप गायत्री सहा प्रकारची आहे. ध्यानासाठीं हा स्वरूप–निर्देश.

शिष्य—हे सहा प्रकार म्हणजे या खंडांत सांगितलेले वाणी, भूतें, पृथिवी, शरीर, हृदय, प्राण, अशी हीं रूपें ( प्रकार ) होत.

पूर्वपक्षी—परंतु वाणी आणि प्राण यांचे अर्थ निराळे आहेत. वाणी भूतांची वाचक आहे आणि प्राण 'भूत' शब्दानें वाच्य होतात, असें तुम्हीं सांगितलेंत ?

**सिद्धान्ती**—खरें आहे. तथापि ते गायत्रीचेच प्रकार आहेत. कारण तेथें वाच्यवाचकसंबंध आहे. शिवाय, वाक् आणि प्राण यांचा अंतर्भाव केला नाहीं, तर श्रुतीनें गायत्रीचे प्रकार सहा सांगितले आहेत, ती सहा संख्या पूर्ण होणार नाहीं.

**शिष्य**—वाणी व प्राण गायत्रीरूप नसते, तर श्रुतीनें गायत्रीचे सहा प्रकार आहेत, असें म्हटलेंच नसतें.

**सिद्धान्ती**—असो; या सहा प्रकारांनीं हें गायत्री नामक ब्रह्म अवच्छिन्न झालें आहे, अशी भावना ठेवून, गायत्रीद्वारा ब्रह्मचिंतन करावें. पुढील ऋग्वेदांतर्गत मंत्रही गायत्रीद्वारानेंच गायत्रीनामक ब्रह्मस्वरूप प्रकाशित आहे, हा चमत्कार आपण पाहूं या ॥ ५ ॥

---

## मंत्र सहावा.

**तावानस्य महिमा ततो ज्यायाꣳश्च पूरुषः ।**
**पादोऽस्य सर्वा भूतानि त्रिपादस्यामृतं दिवीति ॥६॥**

**अन्वय व अर्थः—तावान् अस्य महिमा** ( ह्या गायत्रीनामक ब्रह्माचा महिमा वर सांगितल्याप्रमाणें आहे ) **ततः च पुरुषः ज्यायान्** ( या महिम्याहूनही पुरुषाचा महिमा मोठा आहे ) **सर्वाः भूतानि अस्य पादः** ( सर्व चराचर भूतें या पुरुषाचा एक चरण—एक चतुर्थांश भाग—होत ) **अस्य अमृतं त्रिपात् दिवि** ( ह्या पुरुषाचे अमृतरूपी तीन चरण द्युलोकांत म्हणजे आत्मलोकांत असतात ) **इति** ( असा ऋग्वेदी मंत्र आहे ) ॥ ६ ॥

तावानस्य गायत्र्याख्यस्य ब्रह्मणः समस्तस्य महिमा विभूतिविस्तारः । यावांश्चतुष्पाच्छड्विधश्च ब्रह्मणो विकारः पादो गायत्रीति व्याख्यातः । अतस्तस्माद्विकारलक्षणाद्गायत्र्याख्याद्वाचारम्भणमात्रात्ततो ज्यायान्महत्तरश्च परमार्थसत्यरूपोऽविकारः पूरुषः पुरुषः सर्वपूरणात्पुरि शयनाच्च । तस्यास्य पादः सर्वा सर्वाणि भूतानि तेजोबन्नादीनि सस्थावरजङ्गमानि । त्रिपात्त्रयः पादा अस्य सोऽयं

त्रिपात् । त्रिपादमृतं पुरुषाख्यं समस्तस्य गायत्र्यात्मनो दिवि द्योतनवति स्वात्मन्यवस्थितमित्यर्थ इति ॥ ६ ॥

सिद्धान्ती—गायत्रीनामक समस्त ( पादविभागविशिष्ट ) ब्रह्माचा महिमा म्हणजे विभूति अथवा विस्तार किती आहे, असें म्हणाल तर तो सांगतों ऐका.––चतुष्पाद असून, षड्विध असणारी गायत्री सर्व भूतात्मक आहे. हें समजलें ? पण गायत्री ही ब्रह्माचा विकार आहे, एक चरण मात्र आहे; असें सांगितलें आहे. म्हणून विकार हेंच लक्षण जिचें आहे, त्या गायत्रीचें नाम धारण करणारे ब्रह्मापेक्षां परमार्थतः सत्यरूप असणारा, निर्विकार असणारा व सर्वांस पूर्णत्व देणारा ( अथवा सर्वांच्या अंतर्यामी वास्तव्य करणारा ) पुरुष जास्त विस्तीर्ण आहे, असें ठरतें. शिवाय गायत्री नामक ब्रह्म नामरूपात्मक असावयाचें. नामरूपात्मक वस्तू असत् असतात. तेव्हां विकारवत आणि परमार्थतः असत्य असणाऱ्या गायत्री नामक ब्रह्मापेक्षां गायत्रीची उपाधि वागविणाऱ्या ब्रह्मापेक्षां ) निर्विकारी आणि सत्यरूप पुरुष ( परमात्मा ) फारच मोठा असला पाहिजे. फार काय सांगावें ? हीं सर्व भूतें—

शिष्य—म्हणजे तेज, जल, अन्न इत्यादि पंचभूतांसह सर्व स्थावरजंगम भूतें ब्रह्माचा एक पाद म्हणजे चरण अथवा एक चतुर्थांश भाग आहेत, असें श्रुतीला सांगावयाचें आहे ?

सिद्धान्ती—होय. असो; तीन चरण ज्याला आहेत तो त्रिपाद होय. तीन चरण असणारें अमृत ( निर्विकारी आणि सत्य ब्रह्मस्वरूप ) स्वयंप्रकाशी स्वात्मरूपामध्यें विराजमान होत असतें. सर्वप्रपंचात्मक गायत्रीनामक ब्रह्माचाही आत्मा असणारें हें अमृतरूपी ब्रह्म आहे.

शिष्य—तात्पर्य, हा सर्व प्रपंच म्हणजे गायत्र्यात्मक ब्रह्म आहे. जीवानें अशी भावना ठेवून गायत्रीद्वारानें ब्रह्मचिंतन करावें आणि या परिच्छिन्न ब्रह्मापेक्षां परमार्थस्वरूपी परब्रह्म अतिशय मोठें आहे, असें ध्यानांत ठेवावें, हें श्रुतीचें तात्पर्य मला दिसतें?

सिद्धान्ती—ठीक आहे. या ब्रह्माचेंही गायत्रीद्वारानेंच अनुचिंतन करावें ॥ ६ ॥

---

## मंत्र सातवा.

**यद्वै तद्ब्रह्मेतीदं वाव तद्योऽयं बहिर्धा पुरुषादाकाशो यो वै स बहिर्धा पुरुषादाकाशः ॥ ७ ॥**

**अन्वय व अर्थः—यत् वै, तत् ब्रह्म इति; इदं वाव तत्** (गायत्री-मुखानें चिंतन करावयास योग्य जें ब्रह्म 'तें हें आहे.' त्रिपाद अमृत ब्रह्म तें हेंही सर्व आहे. तसेंच, ) **यः अयं बहिर्धा पुरुषात् आकाशः सः वै पुरुषात् बहिर्धा आकाशः** ( जें ह्या पुरुषाच्या बाहेर असणारें आकाश आहे, ते हें पुरुषबाह्य आकाश आहे ) ॥ ७ ॥

यद्वै तत्त्रिपादमृतं गायत्रीमुखेनो ( णो ) क्तं ब्रह्मेतीदं वाव तदिदमेव । तद्योऽयं प्रसिद्धो बहिर्धा बहिः पुरुषादाकाशो भौतिको यो वै स बहिर्धा पुरुषादाकाश उक्तः ॥ ७ ॥

**सिद्धान्ती**—'वरील मंत्रांत ज्या लक्षणांचें वर्णन केलें तीं लक्षणें असणारें ब्रह्म होय. 'ब्रह्म तें हें' असें गायत्रीद्वारानें ज्या त्रिपाद आणि अमृत-रूपी ब्रह्माचें वर्णन केलें तेंच ब्रह्म हें आहे. हें म्हणजे पुरुषाच्या बाहेर असणारें जें हें सर्वप्रसिद्ध भौतिक आकाश आहे; तेंच हें पुरुषबाह्य आकाश ब्रह्म आहे ॥ ७ ॥

---

## मंत्र आठवा.

**अयं वाव स योऽयमन्तः पुरुष आकाशो यो वै सोऽन्तः पुरुष आकाशः ॥ ८ ॥**

**अन्वय व अर्थः—यः अयं सः वाव** ( जो हा आहे तोच हा आत्मा आहे ) **यः अयं अंतः पुरुषे आकाशः सः वै अंतः पुरुषे आकाशः** ( जो हा पुरुष शरीराच्या अंतर्भागीं आकाशरूपी भाग असतो तोही अंतःपुरुषी आकाश ब्रह्म आहे ) ॥ ८ ॥

अयं वाव स योऽयमन्तः पुरुषे शरीर आकाशो यो वै सोऽन्तः पुरुष आकाशः ॥ ८ ॥

**सिद्धान्ती**—जो तो आहे तोच हा होय. पुरुषशरीराच्या अंतर्भागीं असणारें आकाश असतें, तेंच हें अंतःशरीरी आकाश आहे ॥ ८ ॥

## मंत्र नववा.

**अयं वाव स योऽयमन्तर्हृदय आकाशस्तदेतत्पूर्णमप्रवर्ति पूर्णामप्रवर्तिनीँ श्रियं लभते य एवं वेद ॥ ९ ॥**

**इति तृतीयाध्यायस्य द्वादशः खण्डः ॥ १२ ॥**

**अन्वय व अर्थः—अयं वाव सः** ( तोच हा आहे ) **यः अयं अंतर्हृदये आकाशः, तत् एतत् पूर्णं अप्रवर्ति** ( हृदयाच्या अंतर्यामीं जें आकाश असतें, तें हें दहराकाश पूर्ण आणि अप्रवर्ति म्हणजे सर्वथा निवृत्त असतें ) **यः एवं वेद** ( ज्याला हें ब्रह्मरूप समजलें ) **पूर्णां अप्रवर्तिनीं श्रियं लभते** ( त्याला पूर्ण आणि अभंग श्री, सर्वप्रकारची संपत्ति, प्राप्त होते ) ॥ ९ ॥

अयं वाव स योऽयमन्तर्हृदये हृदयपुण्डरीक आकाशः। कथमेकस्य सत आकाशस्य त्रिधा भेद इति। उच्यते—बाह्येन्द्रियविषये जागरितस्थाने नभासि दुःखबाहुल्यं दृश्यते। ततोऽन्तःशरीरे स्वप्नस्थानभूते मन्दतरं दुःखं भवति स्वप्नान्पश्यतः। हृदयस्थे पुनर्नभसि न कंचन कामं कामयते न कंचन स्वप्नं पश्यति। अतः सर्वदुःखनिवृत्तिरूपमाकाशं सुषुप्तं स्थानम्। अतो युक्तमेकस्यापि त्रिधा भेदान्वाख्यानम्। बहिर्धा पुरुषादारभ्याऽऽकाशस्य हृदये संकोचकरणं चेतःसमाधानस्थानस्तुतये। यथा "त्रयाणामपि लोकानां कुरुक्षेत्रं विशिष्यते। अर्धतस्तु कुरुक्षेत्रमर्धतस्तु पृथूदकम्" इति तद्वत्। तदेतद्धार्दाकाशाख्यं ब्रह्म पूर्णं सर्वगतं न हृदयमात्रपरिच्छिन्नमिति मन्तव्यम्। यद्यपि हृदयाकाशे चेतः समाधीयतेऽप्रवर्ति तदनुच्छित्तिधर्मकम्। यथाऽन्यानि भूतानि परिच्छिन्नान्युच्छित्तिधर्मकाणि न तथा हार्दं नभः। पूर्णामप्रवर्तिनीमनुच्छेदात्मिकां श्रियं विभूतिं गुणफलं लभते दृष्टं य एवं यथोक्तं पूर्णाप्रवर्तिगुणं ब्रह्म वेद जानातीहैव जीवंस्तद्भावं प्रतिपद्यत इत्यर्थः ॥ ९ ॥

इति तृतीयाध्यायस्य द्वादशः खण्डः ॥ १२ ॥

**सिद्धान्ती**—हृदयकमलाच्या अंतर्यामीं जें आकाश असतें, तेंही परमार्थतः ब्रह्मस्वरूप आहे.

**पूर्वपक्षी**—आकाश एकच असतांना श्रुति त्याचे तीन निरनिराळे विभाग कसे करिते ? शरीरबाह्य आकाश, अंतःशरीरांत असणारें आकाश आणि हृदयपुंडरीकांत असणारें आकाश, असे एकरूपी आकाशाचे तीन निरनिराळे भाग श्रुतीला तरी कसे करितां येतात ?

**सिद्धान्ती**—हें विभाजन यथार्थ आहे. पहाः, (१) बाह्येंद्रियांचा (कर्णनेत्रादि इंद्रियांचा) विषय असणारें म्हणजे जीवाच्या जागृतींत मात्र गोचर होणारें आकाश दुःखप्रचुर आहे. या आकाशांत अत्यंत दुःख आहे, असें स्पष्ट दिसतें. नंतर ( २ ) स्वप्नाला अधिष्ठान असणारें अंतःशरीरांतील आकाश, मनोबुद्धींतील आकाश, स्वप्नस्थ पुरुषाला, स्वप्न पाहणाऱ्याला, दुःखाचें व असमाधानाचें कारण होतें; पण तें दुःख मंद असतें. ( ३ ) स्वप्नें पाहणारा साक्षी हृदयस्थ आकाशामध्यें जाऊन राहिला, गाढ निद्रेंत प्रविष्ट झाला, म्हणजे तो कोणतीही वासना धरीत नाहीं. तो कोणतेंही स्वप्न पाहत नाहीं. तात्पर्य, सुषुप्तीला स्थान देणारें हृदयाकाश सर्व दुःखांची निवृत्ति करणारें असतें. याप्रमाणें दुःखबाहुल्य, मंददुःख आणि दुःखनिवृत्ति उत्पन्न करणारीं तीन आकाशांचीं अनुक्रमें बाह्याकाश, अंतराकाश आणि दहराकाश हीं तीन वेगळीं स्वरूपें आहेत; अर्थात् श्रुतीचें म्हणणें सर्वथा योग्यच आहे. आकाश एकच खरें; परंतु पुरुषाच्या निरनिराळ्या तीन परिस्थितींला अनुरूप अशीं आकाशाचीं तीन निरनिराळीं रूपें होतात. आतां, शरीराबाहेर असणाऱ्या महाआकाशाला आरंभ करून येत येत हृदयांतील आकाशापर्यंत येऊन जो आकाशाचा संकोच केला आहे, तो केवळ अंतःकरणाचें समाधान करणारें जें हृदयस्थान आहे; त्याची स्तुति करण्याकरितां आहे. हृदयाकाशांत जीव असला म्हणजे तो पूर्ण समाधानामध्यें असतो, हा अनुभव आहे. चेतःसमाधान ही इष्ट वस्तु आहे. तेव्हां समाधान देणाऱ्या स्थानाची, हृदयाकाशाची स्तुति करणें योग्यच आहे. म्हटलें आहे, "तिन्ही लोकांमध्यें एका कुरुक्षेत्राचें माहात्म्य विशेष आहे, तें कुरुक्षेत्र म्हणजे अर्धें क्षेत्र आणि अर्धें प्रचुर उदक होय. उभय दलांमुळें ( पांकळ्यांमुळें ) पुष्पास शोभा अपूर्वच येते." त्रैलोक्याच्या माहात्म्यापेक्षां कुरुक्षेत्राचें माहात्म्य विशेष, त्याप्रमाणें महाकाशापेक्षां दहराकाशाचें माहात्म्य विशेष आहे.

**पूर्वपक्षी**—एवंच तात्पर्य हें कीं हृदयामध्यें कोंडलेलें आकाश अथवा दहराकाश नामक ब्रह्म अपूर्ण आहे. असें झालें ?

**सिद्धान्ती**—नाहीं, नाहीं. तें पूर्ण आहे, सर्वव्यापी आहे. तें हृदयांत आहे, म्हणून हृदयाच्या आकारमानाएवढें आहे, असें मात्र मानितां नये. शालिग्रामांत असणारा विष्णु शालिग्रामांतच कोंडून राहिला जात नाहीं, तो

स्वरूपत: सर्वव्यापी असतो. तसेंच निरुपाधिक ब्रह्म पूर्ण आणि सर्वव्यापी असतें. असो; आपलें चित्त हृदयाकाशांत समाधान पावतें हें खरें; तथापि चेत:समाधान तेथें होतें, म्हणून ब्रह्म तेथें मात्र असतें किंवा तें कर्मप्रवर्तक आहे, असें नाहीं. तें अप्रवर्ति आहे. त्याला कर्मप्रवृत्त करणारें कारण असणें शक्य नाहीं किंवा तें कोणत्याही काळीं कर्मप्रवृत्त होणें शक्य नाहीं. कारण, ब्रह्माचा धर्मच अनुच्छिति अथवा अविनाशीपणा हा आहे. इतर परिच्छिन्न भूतें जशीं विनाश-धर्मक असतात, तसें दहराकाश विनाशधर्मक नसतें. तात्पर्य, त्याचा विनाश होत नाहीं. असो; जो कोणी आतां सांगितलेले सर्वपूर्ण आणि सर्वनिवृत्त ब्रह्माचें यथार्थ स्वरूप या लोकीं जिवंतपणीं जाणतो, त्याला सर्वपूर्ण व अविनाशी अशी सर्व प्रकारची संपत्ति मिळते. हें दृष्ट फल आहे. जिवंत असतांनाच तो ब्रह्मस्वरूप होतो, जीवन्मुक्त होतो, पूर्ण होतो आणि ज्ञानद्वारा अविनाशी होतो. हें अदृष्टफल. असो, हा देह पतित झाल्यानतर तो ब्रह्मस्वरूप होतो, हें आतां सांगण्याचें कारणच नाहीं ॥ ९ ॥

बारावा खंड समाप्त.

---

# खंड तेरावा.

## मंत्र पहिला.

**तस्य ह वा एतस्य हृदयस्य पञ्च देवसुषयः स योऽस्य प्राङ्सुषिः स प्राणस्तच्चक्षुः स आदित्यस्त-देतत्तेजोऽन्नाद्यमित्युपासीत तेजस्व्यन्नादो भवति य एवं वेद ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—एतस्य तस्य ह वै हृदयस्य पंच देवसुषयः** ( ह्या त्या हृदयाला पांच दैवी द्वारें आहेत ) **अस्य यः प्राङ्सुषिः, सः प्राणः** (ह्या हृदयाचें जें पूर्वेकडील द्वार आहे, त्याचा पालक प्राण आहे ) **तच्चक्षुः सः आदित्यः** ( प्राणाशीं संबद्ध चक्षु आहे. आणि तोच प्राण आदित्य आहे ) **तत् एतत् तेजः, अन्नाद्यं इति उपासीत** ( तें हें प्राणरूपी ब्रह्म तेज व अन्नाद्य आहे अशी भावना ठेवून उपासना करावी ) **यः एवं**

**वेद, तेजस्वी अन्नादः भवति** ( हें ज्ञान ज्याला होतें, तो तेजस्वी आणि अन्नाद होतो, अन्नभोक्ता होतो ) ॥ १ ॥

तस्य ह वा इत्यादिना गायत्र्याख्यस्य ब्रह्मण उपासनाङ्गत्वेन द्वारपालादिगुणाधानार्थमारभ्यते । यथा लोके द्वारपाला उपासनेन वशीकृता राजप्राप्त्यर्था भवन्ति तथेहापीति । तस्येति प्रकृतस्य हृदयस्येत्यर्थः । एतस्यानन्तरनिर्दिष्टस्य पञ्च पञ्चसंख्याका देवानां सुषयो देवसुषयः स्वर्गलोकप्राप्तिद्वारच्छिद्राणि देवैः प्राणादित्यादिभीरक्ष्यमाणानीत्यतो देवसुषयस्तस्य स्वर्गलोकभवनस्य हृदयस्यास्य यः प्राङ्सुषिः पूर्वाभिमुखस्य प्राग्गतं यच्छिद्रं द्वारं स प्राणस्तत्स्थस्तेन द्वारेण यः संचरति वायुविशेषः स प्रागनितीति प्राणः । तेनैव संबद्धमव्यतिरिक्तं तच्चक्षुस्तथैव स आदित्यः "आदित्यो ह वै बाह्यप्राणः" इति श्रुतेश्चक्षूरूपप्रतिष्ठाक्रमेण हृदि स्थितः "कस्मिन्प्रतिष्ठित इति चक्षुषि" इत्यादि हि वाजसनयके । प्राणवायुदेवतैव ह्येका चक्षुरादित्यश्च सहाऽऽश्रयेण । वक्ष्यति च—प्राणाय स्वाहेति हुतं हविः सर्वमेतत्तर्पयतीति । तदेतत्प्राणाख्यं स्वर्गलोकद्वारपालत्वाद्ब्रह्म । स्वर्गलोकं प्रतिपित्सुस्तेजश्चैतच्चक्षुरादित्यस्वरूपेणान्नाद्यत्वाच्च सवितुस्तेजोऽन्नाद्यमित्याभ्यां गुणाभ्यामुपासीत । ततस्तेजस्व्यन्नादश्चाऽऽमयावित्वरहितो भवति य एवं वेद तस्यैतद्गुणफलम् । उपासनेन वशीकृतो द्वारपः स्वर्गलोकप्राप्तिहेतुर्भवतीति मुख्यं च फलम् ॥ १ ॥

सिद्धान्ती—ह्या प्रकरणांत गायत्री नामक ब्रह्माची उपासना सिद्ध करण्यासाठीं हृदयांचीं अंगोपांगें सांगितलीं आहेत. त्यांपैकीं ब्रह्मद्वारपालादिकांचे गुण सांगून त्यांची उपासना विहित करण्यासाठीं पहिल्या मंत्राला आरंभ केला आहे.

पूर्वपक्षी—द्वारपालांची उपासना किमर्थ ? पण प्रथम ब्रह्मभवनाची उपासना सिद्ध करा आणि मग द्वारपालोपासना सांगा.

सिद्धान्ती—व्यवहारांत आपण पाहतों कीं राजाचे द्वारपालांची प्रथम उपासना केली असतां ते वश होतात आणि राजप्राप्तीला ( राजाची भेट होण्याला ) उपकारक होतात. त्याप्रमाणेंच गायत्री नामक ब्रह्माची उपासना कर्तव्य असेल, तर द्वारपालांचे गुण समजून घेऊन त्यांस उपासनेनें वश केलें पाहिजे. ब्रह्मोपासना

तुम्हां आम्हां सर्वांस अभीष्टच आहे. असो; प्रकृत विषयास ( प्रकृत असणारें हृदयाला, ब्रह्मभवनाला ) पांच दैवी द्वारें आहेत.

**शिष्य**—तीं कोणतीं ?

**सिद्धान्ती**—श्रुति त्यांचा निर्देश इतक्यांतच करील. हीं द्वारें म्हणजे स्वर्ग-लोकामध्यें प्रवेश करून देणाऱ्या वेशी होत. या द्वारांवर प्राण, आदित्यप्रमुख द्वारपाल प्रवेश करविणें न करविणें याचे अधिकारी आहेत.

**शिष्य**—द्वारांवरील अधिकारी प्राणादि देव आहेत म्हणून 'हृदयगडाच्या' दरवाज्यांना ' देवसुषी ' असें म्हटलें ?

**सिद्धान्ती**—होय. स्वर्गलोक प्राप्त करून देणाऱ्या—

**पूर्वपक्षी**—इतकी खटपट करून चंद्रादिकांस आश्रय देणारा स्वर्गच का मिळविणार ?

**सिद्धान्ती**—येथें स्वर्ग म्हणजे परमात्मा असें समजून घ्या. हृदय आणि त्यांत असणारें आकाश ह्यामध्यें परमात्मा राहतो. अथवा सर्वव्यापी परमात्मा हृदयामध्यें लवकर ओळखतां येतो. अतएव परमात्म्याची उपासना करण्याला हृदयभवन हें उत्कृष्ट स्थान आहे. असो; ह्या हृदयाचा पूर्वाभिमुख जो दरवाजा आहे तेथील द्वारपाल प्राणवायु आहे.

**शिष्य**—म्हणजे प्राणवायूला हृदयाच्या या द्वारानें संचार करितां आणि करवितां येतो, या द्वारांत त्याची सत्ता चालते. प्राक् म्हणजे पूर्वदिशा. तिकडे ज्याची अन्=गति असते, तो ( प्राक्×अन् ) प्राण, हें निर्वचन आहे. असो; प्राणवायु येथें द्वारपाल आहे हें मला समजलें.

**सिद्धान्ती**—या प्राणवायूशीं संबद्ध असलेला चक्षु तो मंत्रांतील ' तत्-चक्षु ' होय.

**शिष्य**—संबद्ध असलेला म्हणजे ?

**सिद्धान्ती**—प्राणाशिवाय स्वतंत्रतेनें वास्तव्य करण्यास किंवा स्व–व्यापार करण्यास असमर्थ असणारा हा आपला नेत्र आहे.

**पूर्वपक्षी**—हें कशावरून ?

**सिद्धान्ती**—तुम्हांला हें ठाऊकच आहे कीं, चक्षूची अनुग्राहक देवता ( अधिष्ठात्री ) आदित्य आहे. म्हणून आदित्याचें वास्तव्य नेत्रांत असतें. आणि चक्षु हा रूपाचा ग्राहक आहे म्हणून तो रूपामध्यें प्रतिष्ठित असतो. त्याला रूपदर्शन होतें, तें आदित्याच्या अनुग्रहानें आणि स्वतःच्या रूपग्राहकतेनें होतें.

पण ही दर्शनपूर्वक ग्राहकता प्राणाव्यतिरिक्त होत नाहीं, म्हणून प्राणाचा आणि चक्षूचा नित्य संबंध आहे. अथवा प्राण हाच चक्षुरूप आहे. आदित्याचा आणि प्राणाचा संबंधही असाच समजून घेतां येतो. ' आदित्य हा बाह्य प्राण आहे ' ही श्रुति येथें प्रमाण आहे. तेव्हां चक्षूमध्यें आणि चक्षुद्वारानें रूपामध्यें प्रतिष्ठित होणारा आदित्य हृदयामध्यें वास्तव्य करितो, असें झालें.

**शिष्य**—कारण, पदार्थाचें प्रतिबिंबित रूप हृदयांत वास्तव्य करितें. रूपांत आदित्य असतो म्हणून आदित्याचें वास्तव्य हृदयांत म्हणजे नेत्रांत स्थापित होतें. तात्पर्य, आदित्य हा नेत्राप्रमाणें पूर्वेकडील द्वारपाल होतो !

**सिद्धान्ती**—बृहदारण्यकामध्यें " ' तो आदित्य कोठें प्रतिष्ठित झाला आहे ? ' याला उत्तर ' तो नेत्रांमध्यें प्रतिष्ठित आहे ' " असें दिलें आहे. एवंच ही प्राणवायु देवता (१) चक्षु आहे आणि (२) आदित्यही आहे. अशी भावना ठेवून ' प्राण हाच चक्षु आणि आदित्य आहे ' असें ध्यान करावें, हें सांगण्याचा श्रुतीचा आशय आहे. चक्षूचें आश्रयस्थान रूप आणि आदित्याचें आश्रयस्थान हृदय यांच्यांसह नेत्रादित्यांचें ध्यान करावें. ' हा प्राण सर्वव्यापी आहे ' असा हा उपदेश आहे.

**पूर्व०**—याला आधार ?

**सिद्धान्ती**—' प्राणाय स्वाहा ' असें म्हणून दिलेला हवि ' ह्या सर्वांची तृप्ति करितो ' असें वाक्य पुढें येणार आहे. असो; स्वर्गलोकाचा पूर्वेकडील द्वारपाल हा प्राण नामक ब्रह्म आहे; असें प्राणाच्या सर्वव्यापीपणामुळें सिद्ध होतें. अर्थात् ज्याला स्वर्गलोकाची म्हणजे ब्रह्मलोकाची प्राप्ति करून घ्यावयाची आहे, त्यानें ह्या प्राणाख्य ब्रह्माची चक्षु आणि आदित्य यांच्या तेजस्वी स्वरूपानें व अन्नाद्यस्वरूपानें उपासना करावी. आदित्य व नेत्र तेजोरूप आहेतच. तेव्हां तेज हा एक गुण व—

**शिष्य**—सवितृतेज अन्नाद्यही आहे.

**सिद्धान्ती**—कारण सविता पर्जन्यवृष्टीचा कारक आहे वृष्टीनें अन्न उत्पन्न होतें. म्हणून सवितृतेज अन्नाद्य होतें. याप्रमाणें तेज व अन्नाद्यत्व हे प्राणनामक ब्रह्माचे गुण आहेत, अशी भावना ठेवून उपासना करावयाची आहे. ही उपासना ज्ञानपूर्वक केली असतां उपासक तेजस्वी आणि निरामय ( रोगशून्य ) होतो. पूर्वेकडील द्वारपालाची म्हणजे प्राणाची ही उपासना ब्रह्मलोकाला पोहचविण्याला हेतु होते, हें मुख्य फल आहे. उपासनेनें वश झालेलें प्राणादित्यद्वय उपासकाला ब्रह्मलोकांतील प्रवेश सुकर करितें ॥ १ ॥

## मंत्र दुसरा.

**अथ योऽस्य दक्षिणः सुषिः स व्यानस्तच्छ्रोत्रँ स चन्द्रमास्तदेतच्छ्रीश्च यशश्चेत्युपासीत श्रीमान्यशस्वी भवति य एवं वेद ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः—अथ यः अस्य दक्षिणः सुषिः, सः व्यानः, तत्‌-श्रोत्रं; सः चंद्रमाः; तत्‌ एतत्‌ 'श्रीः च यशः च' इति उपासीत** (या हृदयाच्या दक्षिणद्वारावर व्यान हा द्वारपाल आहे. व्यान हाच कर्ण आणि चंद्रमा; हा व्यान 'श्री आणि यश आहे' अशी उपासना करावी) **यः एवं वेद श्रीमान्‌ यशस्वी भवति** (ज्या उपासकाला हें समजतें, तो श्रीमान आणि यशस्वी होतो ॥ २ ॥

अथ योऽस्य दक्षिणः सुषिस्तत्स्थो वायुविशेषः सः वीर्यवत्कर्म कुर्वन्विगृह्य वा प्राणापानौ नाना वाऽनितीति व्यानस्तत्संबद्धमेव च तच्छ्रोत्रमिन्द्रियं तथा स चन्द्रमाः । श्रोत्रेण सृष्टा दिशश्च चन्द्रमाश्चेति श्रुतेः । सहाश्रयौ पूर्ववत्तदेतच्छ्रीश्च विभूतिः श्रोत्रचन्द्रमसोर्ज्ञानान्नहेतुत्वमतस्ताभ्यां श्रीत्वम्‌ । ज्ञानान्नवतश्च यशः ख्यातिर्भवतीति यशोहेतुत्वाद्यशस्त्वमतस्ताभ्यां गुणाभ्यामुपासीतेत्यादि समानम्‌ ॥ २ ॥

**सिद्धान्ती**—आतांच पहिला जो मंत्र सांगितला, त्याच्याच प्रमाणें या पुढील पांच मंत्रांचें स्पष्टीकरण आहे. हृदयाच्या दक्षिणद्वारावर वीर्यशाली कर्म करणारा व्यानवायु हा द्वारपाल आहे.

**शिष्य**—मागें एकदां श्रुतीनें ठरविलें आहे कीं, प्राणापानांचा विरोध करून व्यानवायु स्वव्यापार करितो. पण सांख्य म्हणतात कीं, शरीराच्या अनेक मर्मस्थानांत व्यापार करणारा व्यानवायु मात्र आहे. कोणताही पक्ष घेतला तरी व्यानवायु (वि+अन्‌) हा वीर्यशाली कर्म करणारा आहे.

**सिद्धान्ती**—हाच कर्णाशीं नित्य संबद्ध आहे. याच्याशिवाय कर्णाला स्वव्यापार करितां येत नाहीं. 'विराटानें आपल्या कर्णांपासून दिशा आणि चंद्रमा हीं उत्पन्न केली' अशी श्रुति आहे. असो, आपापल्या आश्रयस्थानांसह कर्ण आणि चंद्र हे व्यानरूप होतात.

शिष्य—नेत्र-आदित्यांची मागच्या मंत्रांत व्यवस्था सांगितली त्याप्रमाणें ?

सिद्धान्ती—होय. यांच्या विभूती श्री आणि यश आहेत. कर्ण हा ज्ञानाचा हेतु आहे आणि चंद्र अन्नाचा हेतु आहे; म्हणून ज्ञान आणि अन्न ह्या त्यांच्या विभूती. ज्ञान व अन्न श्रीत्व संपादून देतात. तसेंच ज्ञानी आणि अन्नवान् कीर्तिवंत होतो. अतएव श्री आणि यश हे गुण कर्णचंद्रात्मक व्यान नामक ब्रह्मामध्यें आहेत, असें समजून दक्षिण दिशेचा द्वारपाल जो व्यान ( व्यानाख्य ब्रह्म ) त्याची उपासना करावी. ही उपासना संपत्ति आणि यश हीं फलें देते. असें मागच्या प्रमाणेंच समजून घ्यावें ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**अथ योऽस्य प्रत्यङ्सुषिः सोऽपानः सा वाक्सोऽग्निस्तदेतद्ब्रह्मवर्चसमन्नाद्यमित्युपासीत ब्रह्मवर्चस्यन्नादो भवति य एवं वेद ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थः—अथ अस्य यः प्रत्यङ्सुषिः, सः अपानः; सा वाक्; सः अग्निः; तत् एतत् ‘ ब्रह्मवर्चसं, अन्नाद्यं ’ इति उपासीत; यः एवं वेद ब्रह्मवर्चसी, अन्नादः भवति** ( हृदयाच्या पश्चिम द्वारावर जो द्वारपाल आहे, तो अपानवायु होय. हीच वाणी आणि हाच अग्नि; म्हणून हा अपान ब्रह्मवर्चस आणि अन्नाद्य या गुणांनीं संपन्न आहे अशी उपासना करावी. ज्ञानी उपासक ब्रह्मवर्चसी आणि अन्नाद होतो ॥ ३ ॥

अथ योऽस्य प्रत्यङ्सुषिः पश्चिमस्तत्स्थो वायुविशेषः स मूत्रपुरीषाद्यपनयन्नधोऽनितीत्यपानः सा तथा वाक् । तत्संबन्धात्तथाऽग्निस्तदेतद्ब्रह्मवर्चसं, वृत्तस्वाध्यायनिमित्तं तेजो ब्रह्मवर्चसम् । अग्निसंबन्धाद्वृत्तस्वाध्यायस्य । अन्नग्रसनहेतुत्वादपानस्यान्नाद्यत्वम् । समानमन्यत् ॥ ३ ॥

सिद्धान्ती—पश्चिम द्वारावर अपान वायु आहे. मलमूत्रादि अनिष्ट वस्तूंस खालीं ढकलणारा ( अप + अन् ) हा अपानवायु आहे. हा अपानवायु वाणी आणि अग्नि आहे. हें कसें तें या खंडांतील पहिल्या मंत्रांत प्राण, चक्षु व आदित्य यांचे संबंध सांगितले आहेत त्यावरून स्पष्ट करून घ्यावें. वाणी

अपान आहे व वाणीचा अधिष्ठाता अग्नि आहे. असो; ब्रह्मवर्चस् आणि अन्नाद्य हे गुण व्यानाचे आहेत असें समजून व्यानोपासना करावी. बाकीचा अर्थ पहिल्या मंत्राप्रमाणें आहे.

शिष्य—ब्रह्मवर्चस म्हणजे काय ?

सिद्धान्ती—आपण अधीत केलेला जो वेद (स्वाध्याय), त्याच्या योगानें जें तेज प्राप्त होतें, त्याला ब्रह्मवर्चस म्हणावें. या तेजाला वाणीचा स्वामी जो अग्नि तो अत्यंत उपकारक होतो. अग्नीचा आणि अपानाचा नित्य संबंध आहेच. म्हणून ब्रह्मवर्चस हा अपानाचा गुण होतो. तसेंच अन्नग्रहण करण्यालाही अपान अनुग्राहक आहे. म्हणून तो अन्नाद्य होतो. अपानाचे ब्रह्मवर्चसत्व व अन्नाद्यत्व हे गुण लक्षांत ठेवून अपान नामक ब्रह्माची उपासना करावी ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा.

**अथ योऽस्योदङ्सुषिः स समानस्तन्मनः स पर्जन्यस्तदेतत्कीर्तिश्च व्युष्टिश्चेत्युपासीत कीर्तिमान्व्युष्टिमान्भवति य एवं वेद ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थः—अथ अस्य यः उदङ्सुषिः, सः समानः; तत् मनः; सः पर्जन्यः; तत् एतत् 'कीर्तिः च व्युष्टिः च' इति उपासीत; यः एवं वेद कीर्तिमान् व्युष्टिमान् भवति** (नंतर, ह्या हृदयाच्या उत्तरद्वारावर असणारा समानवायु हाच मन आणि पर्जन्य आहे. कीर्ति आणि व्युष्टि–लावण्य–हे त्याचे धर्म आहेत, असें समजून समानवायूची उपासना करावी. हें ज्ञान असणारा उपासक कीर्तिमान् आणि लावण्ययुक्त होतो ) ॥ ४ ॥

अथ योऽस्योदङ् सुषिरुदग्गतः सुषिस्तत्स्थो वायुविशेषः सोऽशितपीते समं नयतीति समानः । तत्संबद्धं मनोऽन्तःकरणं स पर्जन्यो वृष्ट्यात्मको देवः पर्जन्यनिमित्ताश्चाऽऽप इति । "मनसा सृष्टा आपश्च वरुणश्च" इति श्रुतेः । तदेत्कीर्तिश्च । मनसा ज्ञानस्य कीर्तिहेतुत्वात् । आत्मपरोक्षं विश्रुतत्वं कीर्तिः। यशः स्वकरणसंवेद्यं विश्रुतत्वं । व्युष्टिः कान्तिर्देहगतं लावण्यम् । ततश्च कीर्तिसंभवात्कीर्तिश्चेति । समानमन्यत् ॥ ४ ॥

सिद्धान्ती—हृदयभवनाच्या उत्तरद्वारावर राहणारा समानवायु—

शिष्य—अन्नपानादिकांस समत्व देणारा ( सम+अन् ) तो समान वायु होय.

सिद्धान्ती—मन म्हणजे अंतःकरण; याच्याशीं हा नित्य संबद्ध आहे. हा समानच पर्जन्य आहे म्हणजे वृष्ट्यात्मक देव आहे. आप् ( जल ) पर्जन्य निमित्तक असतात, हें सांगावयास नकोच. ‘ विराटानें मनाच्या द्वारानें आप आणि वरुण हीं निर्माण केलीं ’ अशी श्रुति आहे. मन समान आहे; म्हणून समान हा पर्जन्य होतो. आतां मन हें ज्ञानाचें अधिष्ठान. समान मन आहे. म्हणून समान म्हणजे ज्ञान होय. ज्ञानानें कीर्ति प्राप्त होते. म्हणून समान हा वायु कीर्तिगुणात्मक आहे. आत्मपरोक्ष जी प्रसिद्धि त्याला कीर्ति म्हणावें. पण स्वतःच्या इंद्रियांनीं ज्ञात होणारी प्रसिद्धि तें यश होय. व्युष्टि म्हणजे देहाचें लावण्य होय. हें लावण्य असणारा पुरुष कीर्तिवंत होतो. हे गुण (कीर्ति आणि लावण्य) ध्यानांत ठेवून उपासना केली असतां, उपासक कीर्तिलावण्यांनीं संपन्न होतो; इत्यादि विवेचन मागें झालेंच आहे. इतर गुणांचें विवेचन तद्वत्च हें होय ॥ ४ ॥

---

## मंत्र पांचवा.

**अथ योऽस्योर्ध्वः सुषिः स उदानः स वायुः स आकाशस्तदेतदोजश्च महश्चेत्युपासीतौजस्वी महस्वान्भवति य एवं वेद ॥ ५ ॥**

**अन्वय व अर्थः—अथ यः अस्य ऊर्ध्वः सुषिः सः उदानः; सः वायुः, सः आकाशः; तत् एतत् ‘ ओजः च महः च ’ इति उपासीत; यः एवं वेद ओजस्वी महस्वान् भवति** ( हृदयाच्या ऊर्ध्वद्वारावर उदानवायु द्वारपाल आहे. तो वायु आणि आकाश आहे. ओज आणि महत्त्व हे त्याचे गुण आहेत. हें सर्व समजून उदानोपासना केली असतां, उपासक ओजस्वी आणि महनीय होतो ) ॥ ५ ॥

अथ योऽस्योर्ध्वः सुषिः स उदान आपादतलादारभ्योर्ध्वमुत्क्रमणादुत्कर्षार्थं च कर्म कुर्वन्ननितीत्युदानः स वायुस्तदाधारश्चाऽऽकाशस्तदेतद्वाय्वाकाशयोरोजोहेतुत्वादोजो बलं महत्वाच्च मह इति । समानमन्यत् ॥ ५ ॥

सिद्धान्ती—हृदयाच्या ऊर्ध्वद्वारावर उदानवायूची स्थापना आहे. पायाच्या तळव्यापासून वरवर जाणारा आणि उत्कर्षार्थ श्रेष्ठ श्रेष्ठ कर्म करणारा हा उदान वायु आहे. वायुदेवता ती हीच. याच्याशींच आकाशाचा नित्य संबंध आहे.

शिष्य—आकाश आधार आणि वायु हा त्यांत राहणारा आधेय असा यांचा संबंध आहे ? आकाशाव्यतिरिक्त वायूचें अस्तित्वच नसतें ?

सिद्धान्ती—होय. वायु आणि आकाश यांचे ओज आणि महत्त्व हे गुण आहेत. ओज म्हणजे शरीरबल होय. बाकीचा उपासनपर अर्थ मागच्या प्रमाणें आहे ॥ ५ ॥

---

## मंत्र सहावा.

**ते वा एते पञ्च ब्रह्मपुरुषाः स्वर्गस्य लोकस्य द्वारपाः स य एतानेवं पञ्च ब्रह्मपुरुषान्स्वर्गस्य लोकस्य द्वारपान्वेदास्य कुले वीरो जायते प्रतिपद्यते स्वर्गं लोकं य एतानेवं पञ्च ब्रह्मपुरुषान्स्वर्गस्य लोकस्य द्वारपान्वेद ॥ ६ ॥**

**अन्वय व अर्थः—ते वै एते पञ्च ब्रह्मपुरुषाः स्वर्गस्य लोकस्य द्वारपाः** (ते हे पांच ब्रह्मपुरुष स्वर्गलोकाचे द्वारपाल आहेत) **यः एवं एतान् पंच ब्रह्मपुरुषान् स्वर्गस्य लोकस्य द्वारपान् वेद, अस्य कुले वीरः जायते; यः एतान् एवं पञ्च ब्रह्मपुरुषान् स्वर्गस्य लोकस्य द्वारपान् वेद स्वर्गं लोकं सः प्रतिपद्यते** (ब्रह्मलोकाचे हे पांच ब्रह्मपुरुष द्वारपाल आहेत, असें ज्ञान ज्याला होतें, त्याच्या कुलांत वीर उत्पन्न होतो. तसेंच हे विशिष्टगुणयुक्त पांच ब्रह्मपुरुष ब्रह्मलोकाचे द्वारपाळ आहेत असें समजून जो उपासना करितो तो सद्गुण संपादून स्वर्गलोकाला —ब्रह्मलोकाला—जातो ) ॥ ६ ॥

ते वा एते यथोक्ताः पञ्चसुषिसंबन्धात्पञ्च ब्रह्मणो हार्दस्य पुरुषा राजपुरुषा इव द्वारस्थाः स्वर्गस्य हार्दस्य द्वारपा द्वारपालाः। एतैर्हि चक्षुःश्रोत्रवाङ्मनःप्राणैर्बहिर्मुखप्रवृत्तैर्ब्रह्मणो हार्दस्य प्राप्ति-

द्वाराणि निरुद्धानि । प्रत्यक्षं ह्येतदजितकरणतया बाह्यविषया-सङ्गानृतप्ररूढत्वान्न हार्दे ब्रह्मणि मनस्तिष्ठति । तस्मात्सत्य-मुक्तमेते पञ्च ब्रह्मपुरुषाः स्वर्गस्य लोकस्य द्वारपा इति । अतः स य एतानेवं यथोक्तगुणविशिष्टान्स्वर्गस्य लोकस्य द्वारपान्वे-दोपास्त उपासनया वशी करोति स राजद्वारपालानिवोपासनेन वशीकृत्य तैरनिवारितः प्रतिपद्यते स्वर्गं लोकं राजानमिव हार्दं ब्रह्म । किंचास्य विदुषः कुले वीरः पुत्रो जायते वीरपुरुष-सवनात् । तस्य चर्णापाकरणे ब्रह्मोपासनप्रवृत्तिहेतुत्वम् । ततश्च स्वर्गलोकप्रतिपत्तये पारम्पर्येण भवतीति स्वर्गलोकप्रतिपत्तिरे-वैकं फलम् ॥ ६ ॥

**सिद्धान्ती**—याप्रमाणें हृदय–भुवनाच्या पांच दरवाज्यांवर येथपर्यंत वर्णिलेले आदित्यचंद्राद्यात्मक प्राणव्यानादि ब्रह्मपुरुष असतात. राजद्वारावर जसे राज-पुरुष द्वारपाल असतात, त्याप्रमाणें हृदयरूपी स्वर्गाच्या म्हणजे दहराकाशानें अवच्छिन्न असलेल्या ब्रह्मलोकाच्या द्वारांवरील हे पांच द्वारपाल आहेत. यांना नेत्र, कर्ण, वाणी, मन आणि प्राण अशीं बहिर्मुख असणारीं हृदयाचीं पंचद्वारें निरुद्ध करण्याचें सामर्थ्य आहे.

**शिष्य**—प्राण-आदित्य, व्यान–चंद्र, अपान–अग्नि, समान–पर्जन्य आणि उदान–आकाश या पांच द्वारपालांनीं चक्षुरादि पंचद्वारें निरोधलीं आहेत.

**पूर्वपक्षी**—हें सांगून करावयाचें काय ?

**सिद्धान्ती**—चक्षुरादि इंद्रियें अजित असतील, म्हणजे या देवतांच्या उपासनेनें नियंत्रित झालेलीं नसतील, तर हीं पांची इंद्रियें बाह्य विषयाशीं आसक्त होतात आणि अनृत किंवा असत्य जे विषय व असत्य व्यवहार यांनीं सदैव पुष्ट होत जातात. ह्यामुळें आपलें मन हृदयाचे ठिकाणीं म्हणजे हृदयांत असणाऱ्या आत्मस्वरूपाचे ठिकाणीं निश्चलत्वानें राहत नाहीं हा अनुभव नित्याचा आहे, नव्हे बरें ? अर्थात् श्रुतीचें यथार्थ सांगणें आहे कीं, या इंद्रियांस विवेकादिकांच्या साह्यानें वश करून घेऊन त्यांच्या साह्यानें निरोध करणारे सर्व द्वारपाल स्वस्वव्यापार करतील तर जीव विषयासक्त न होतां ब्रह्मपदीं आपलें मन स्थिर करण्यास समर्थ होईल. ब्रह्मभुवनाचे हे खरे द्वारप होत. अशा द्वारपालांनीं आपापले व्यापार करावे, इंद्रिय-निग्रह करावा, असें जोरानें वाटत असेल, तर मागच्या पांच मंत्रांत द्वारपालांचे जे विशिष्ट गुण सांगितलें आहेत, ते समजून घेऊन त्यांची एकनिष्ठतेनें उपासना करावी. राजद्वारीं असणाऱ्या द्वारपालांची प्रसन्नता संपादन

केली असतां जसा आपला प्रवेश राजमंदिरांत सहज होतो, आपल्यास कोणी आडवीत नाहीं, त्या प्रमाणें या हृदयस्थ पंच द्वारपालांचा उपासनापूर्वक अनुग्रह जो ज्ञानी उपासक संपादितो, त्याला हृदयस्थ ब्रह्माकडे जाणें अत्यंत सुकर होतें. शिवाय त्याच्या कुलांत वीर पुरुष निर्माण होतात.

शि०—कारण, तो आदित्य, चंद्र इत्यादि वीरपुरुषांची एकनिष्ठ सेवा करितो ?

सिद्धान्ती—होय. कारण पितृऋणादि तो तिन्ही ऋणांपासून मुक्त झाला असल्यामुळें ब्रह्मोपासनेकडे त्याची प्रवृत्ति सहज होते. पुत्रप्राप्ति, ज्ञान-संपादन यज्ञ-याग, इत्यादि गोष्टी जीवास ऋणमुक्त करितात व स्वर्गलोकप्राप्तीला परंपरेनें उपकारक होतात, हें खरें हृद्गत होय. पण इतका विस्तार न करितां श्रुति ज्ञानी उपासकाला ब्रह्म-प्राप्ति होतें, हें मुख्य फल मात्र सांगून ठेवीत आहे ॥ ६ ॥

---

## मंत्र सातवा.

**अथ यदतः परो दिवो ज्योतिर्दीप्यते विश्वतः पृष्ठेषु सर्वतः पृष्ठेष्वनुत्तमेषु लोकेष्विदं वाव तद्यदिदमस्मिन्नन्तःपुरुषे ज्योतिस्तस्यैषा दृष्टिर्यत्रैतदस्मिञ्छरीरे सꣳस्पर्शेनोष्णिमानं विजानाति तस्यैषा श्रुतिर्यत्रैतत्कर्णावपिगृह्य निनदमिव नदथुरिवाग्नेरिव ज्वलत उपशृणोति तदेतद्दृष्टं च श्रुतं चेत्युपासीत चक्षुष्यः श्रुतो भवति य एवं वेद य एवं वेद ॥ ७ ॥**

**इति तृतीयाध्यायस्य त्रयोदशः खण्डः ॥ १३ ॥**

**अन्वय व अर्थः—अथ यत् अतः दिवः परः ज्योतिः दीप्यते** (यानंतर पुढचा विषय असा. ह्याच्यापेक्षांही पलीकडे जी दिव्यज्योति प्रकाशमान आहे) **विश्वतः पृष्ठेषु, सर्वतः पृष्ठेषु, अनुत्तमेषु उत्तमेषु लोकेषु** (जी सर्वांपेक्षांही श्रेष्ठ असणारी व उत्तम लोकांमध्यें विराजमान असणारी ज्योति आहे) **यत् इदं अस्मिन् अंतःपुरुषे ज्योतिः, तत् इदं वाव** (व ह्या अंतःपुरुषामध्यें जी ज्योति आहे, ती खरोखर हीच होय) **यत्र तत्**

**अस्मिन् शरीरे संस्पर्शेन उष्णिमानं विजानाति तस्य एषा दृष्टिः** ( ह्या शरीरांत उष्णिमा आहे असें ज्या वेळीं स्पर्शानें कळतें त्या वेळीं हिचेंच त्या दृष्टीला ज्ञान होतें–ज्योति दिसते– ) **यत्र एतत् कर्णौ अपिगृह्य निनदं इव, नदथुः इव, ज्वलतः अग्नेः इव, उपशृणोति तस्य एषा श्रुतिः** ( आपलें दोन्ही कान झांकले असतांही रथघोषाप्रमाणें किंवा ऋषभाच्या कूजिताप्रमाणें किंवा ज्वालायुक्त अग्नीप्रमाणें नाद ऐकावयास येतो, तो ह्या ज्योती–तेजाचीच ही श्रुति म्हणजे श्रवण आहे ) **तत् एतत् दृष्टं च श्रुतं च इति उपासीत** ( तें हें सर्व आपण पाहिलें व ऐकिलें अशी भावना ठेवून उपासना करावी ) **यः एवं वेद, यः एवं वेद, चक्षुष्यः श्रुतः भवति** ( ज्याला हें समजतें, ज्या उपासकाला हें ज्ञानविज्ञान होतें, तो दर्शनीय आणि कीर्तिमंत होतो ) जीवशरीरांत जी उष्णता प्रत्यक्ष दिसते व कान बंद करूनही जो आवाज ऐकावयास येतो, ती उष्णता व तो आवाज ही परमात्म्याच्या अस्तित्वाचीं प्रत्यक्ष चिन्हें आहेत, इत्यादि अनुमानें सांगून परमात्म्याचें अस्तित्व सिद्ध करावें हा श्रुतीचा या मंत्रांतील अभिप्रय आहे ॥ ७ ॥

अथ यदसौ विद्वान्स्वर्गं लोकं वीरपुरुषसेवनात्प्रतिपद्यते । यच्चोक्तं त्रिपादस्यामृतं दिवीति तदिदं लिङ्गेन चक्षुःश्रोत्रेन्द्रियगोचरमापादयितव्यम् , यथाऽग्न्यादि धूमादिलिङ्गेन । तथा ह्येवमेवेदमिति यथोक्तेऽर्थे दृढा प्रतीतिः स्यात् । अनन्यत्वेन च निश्चय इति । अत आह–यदतोऽमुष्माद्दिवो द्युलोकत्परः परमिति लिङ्गव्यत्ययेन ज्योतिर्दीप्यते । स्वयंप्रभं सदाप्रकाशत्वाद्दीप्यत इव दीप्यत इत्युच्यते । अग्न्यादिवज्ज्वलनलक्षणाया दीप्तेरसंभवात् ।

सिद्धान्ती—हा विद्वान् उपासक आदित्यादि वीर पुरुषांची सेवा करून ज्या स्वर्गलोकाची ( ब्रह्मस्वरूपाची ) प्राप्ति करून घेतो, असें सांगितलें आणि त्रिपादस्वरूपी ज्या ब्रह्माचें अमृतत्व स्वर्गांत आहे, म्हणून सांगितलें, तें ब्रह्म कोणत्यातरी चिन्हानें नेत्र–कर्णेंद्रियांना गोचर झालें पाहिजे, असा प्रसंग प्राप्त झाला आहे. हा प्रसंग सिद्ध झाला, तरच मनाचा निश्चय होईल. खरेंच आहे; धूमादि चिन्ह इंद्रियगोचर झालें, तरच अग्न्यादिकांचें अनुमान आपल्यास निश्च-

यानें करितां येतें. त्याप्रमाणें 'अशा प्रकारचें हें ब्रह्मस्वरूप आहे' असें इंद्रियगोचर असणाऱ्या प्रत्यक्ष लिंगांच्या साह्यानें अनुमापिल्याशिवाय मनाचा निश्चय होणें अशक्य आहे. ब्रह्मस्थापना करणारें लिंग प्रत्यक्ष दिसेल, तर जो अर्थ श्रुति सांगत आहे, तो मनाला पटेल. मग त्याविषयीं संशय राहण्याचें कारण नाहीं. अर्थात् श्रुति सांगत आहे, तीच ती वस्तु आहे, दुसरी नाहीं, असा दृढनिश्चय होईल. हें सर्व मनांत आणून श्रुतीनें या सातव्या मंत्राचा अवतार केला आहे. ती ज्योति म्हणजे त्या द्युलोकाहून पलीकडे असणाऱ्या द्युलोकाच्या तेजापेक्षां जास्त तेजानें प्रकाशणारी ही ब्रह्मज्योति होय. ही स्वयंप्रकाश आहे. इचा प्रकाश नित्य असतो.

शिष्य—भगवन्, मंत्रांत 'परः' असा पुल्लिंगी शब्द आहे, तो ज्योतीचें विशेषण आहे, नव्हे? अर्थात् हा आर्षप्रयोग आहे. असो; आचार्यांनी आपल्या भाष्यांत 'दीप्यते इव' असें म्हटलें आहे त्याचा अर्थ काय?

सिद्धान्ती—येथें अग्न्यादिप्रमाणें ज्वलनयुक्त प्रत्यक्ष तेजाचा असंभव आहे. तेव्हां ही केवळ तेजप्रभा आहे, ज्वलनव्यापार नाहीं, हें दाखविण्यासाठीं इव शब्दाचा उपयोग केला आहे. तात्पर्य, द्युलोकापेक्षां श्रेष्ठ तेजानें विराजणारी ही ज्योति आहे.

विश्वतः पृष्ठेष्वित्येतस्य व्याख्यानं सर्वतः पृष्ठेष्विति। संसारादुपरीत्यर्थः। संसार एव हि सर्वः। असंसारिण एकत्वान्निर्भेदत्वाच्च। अनुत्तमेषु तत्पुरुषसमासाशङ्कानिवृत्तय आहोत्तमेषु लोकेष्विति सत्यलोकादिषु हिरण्यगर्भादिकार्यस्थपरस्येश्वरस्याऽऽसन्नत्वादुच्यत उत्तमेषु लोकेष्विति। इदं वावेदमेव तद्यदिदमस्मिन्पुरुषेऽन्तर्मध्ये। ज्योतिश्चक्षुः श्रोत्रग्राह्येण लिङ्गेनोष्णिम्ना शब्देन चावगम्यते। यत्त्वचा स्पर्शरूपेण गृह्यते तच्चक्षुषैव। दृढप्रतीतिकरत्वात्त्वचः। अविनाभूतत्वाच्च रूपस्पर्शयोः।

सिद्धान्ती—ही ज्योति सर्वांचें अतिक्रमण करणारी आहे. मंत्रांतील विश्व या शब्दांचें व्याख्यान श्रुतीनें स्वतःच 'सर्व' शब्दानें केलें आहे.

पूर्व०—'सर्व' या शब्दांत ब्रह्मज्योतीचाही अंतर्भाव होतो?

सिद्धान्ती—अशक्य आहे. संसाराचा मात्र सर्व शब्दांत अंतर्भाव होतो. कारण संसारांत अनेक अथवा अनंत वस्तु असतात. म्हणून संसाराला 'सर्व' हें विशेषण शोभतें. असंसारी आत्म्याला सर्व हें विशेषण शोभत नाहीं. कारण, तो असंसारी अद्वितीय, एकरस आणि भेदशून्य आहे. असो; ह्या ज्योतीचें वास्तव्य उत्तम लोकामध्यें असतें.

पूर्व०—तसेंच अनुत्तम लोकांतही असतें. उत्तम नव्हे तो अनुत्तम.

सिद्धान्ती—अशी शंका येईल, म्हणून श्रुतीनें 'उत्तम' या विशेषणात्मक शब्दाची योजना केली आहे. अनुत्तम हा बहुव्रीहि समास असून तो उत्तम या विशेषणाचा पर्यायशब्द आहे. ज्यापेक्षां दुसरी वस्तु उत्तम नाहीं ती वस्तु अनुत्तम, असा समास सोडविला पाहिजे. असो; उत्तम लोक म्हणजे सत्य लोकादि लोक. येथेंच हिरण्यगर्भादि—रूपानें परब्रह्म विराजमान होत असतें. हिरण्यगर्भ हें कार्यब्रह्म आहे.

पूर्वपक्षी—ब्रह्माचें वास्तव्य दुसरीकडे नसतें तर मग ?

सिद्धान्ती—असें कसें म्हणतां ? ब्रह्म सर्वत्र असतें. मात्र सत्यलोकादिकांत हिरण्यगर्भादि—रूपानें तें अत्यंत स्पष्टतेनें व अत्यंत सान्निध असल्यामुळें, नित्य अभिव्यक्त होत असतें इतकेंच. असो; हीच ती ज्योति किंवा हेंच तें ब्रह्म कीं जें ह्या पुरुषाच्या मध्यें तेजोरूपानें असतें; आणि हें तेज किंवा ही ज्योति नेत्रकर्णेंद्रियांस गोचर असणाऱ्या चिन्हांनीं म्हणजे उष्णतेनें व शब्दानें अनुमापितां येते.

पूर्वपक्षी—उष्णता तर दिसत नाहीं केव्हांही ?

सिद्धान्ती—स्पर्शेंद्रिय जागृत ठेवणारी त्वचा स्पर्शानें उष्णता जाणते; नव्हे ! त्वचेनें जाणलें, तेंच नेत्रानें जाणलेंसें होतें. कारण रूपवान् वस्तु स्पर्शयोग्य असते आणि वायुव्यतिरिक्त स्पर्शवान् वस्तु रूपवती असते. स्पर्श आणि रूप यांचें साहचर्य आहे. तेव्हां त्वचेनें उष्णता जाणली, तर ती नेत्रानेंच जाणली असें म्हणण्यास हरकत नाहीं. त्वचेनें उष्णतेचा प्रत्यय दृढ होतो, हें खरें; पण त्वचा आणि नेत्र यांचें साहचर्य असल्यामुळें नेत्रांस उष्णता कळते, असें श्रुति म्हणते. ही उष्णता ब्रह्मज्योतीचें एक चिन्ह आहे.

कथं पुनस्तस्य ज्योतिषो लिङ्गं त्वग्दृष्टिगोचरत्वमापद्यत इति, आह—यत्र यस्मिन्काले । एतदिति क्रियाविशेषणम् । अस्मिञ्शरीरे हस्तेनाऽऽलभ्य संस्पर्शेनोष्णिमानं रूपसहभाविनमुष्णस्पर्शभावं विजानाति । स ह्युष्णिमा नामरूपव्याकरणाय देहमनुप्रविष्टस्य चैतन्यात्मज्योतिषो लिङ्गमव्यभिचारात् । न हि जीवन्तमात्मानमुष्णिमा व्यभिचरति उष्ण एव जीविष्यञ्शीतो मरिष्यन्निति हि विज्ञायते । मरणकाले च तेजः परस्यां देवतायामिति परेणाविभागत्वोपगमात् । अतोऽसाधारणं लिङ्गमौष्ण्यमग्नेरिव धूमः । अतस्तस्य परस्यैषा दृष्टिः साक्षादिव दर्शनं दर्शनोपाय इत्यर्थः ।

पूर्व०—पण प्रथम हें सांगा, कीं त्या ज्योतीचें चिन्ह जी उष्णता ती त्वचारूपी दृष्टीला गोचर होते तरी कशी ?

सिद्धान्ती—ऐका काय श्रुति म्हणतें तें. "यत्र" म्हणजे ज्याकाळीं. ह्या शरीराला हातानें स्पर्श केला असतां रूपासह नित्य असणारा उष्ण स्पर्श जेव्हां भासमान होतो, त्या कालीं तो उष्णिमा चैतन्यात्मक ज्योतीचें (म्हणजे परब्रह्माचें) अस्तित्व-चिन्ह किंवा लिंग असतो, असें समजलें पाहिजे. तुम्हांस हें ठाऊकच असलें पाहिजे, कीं, नामरूपांचें व्याकरण करण्यासाठीं परमात्मा देहामध्यें प्रविष्ट झाला आहे. त्याचा हा उष्णिमा होय. चैतन्य (परमात्मा) असणें आणि उष्णता नसणें, असें केव्हांही होत नाहीं. 'जिवंत राहण्याचा संभव असणाऱ्या रोग्याचाही देह उष्ण असतो व मुमुर्षूचा देह थंड होत जातो; आणि यावरून 'रोगी जगणार कीं मरणार हें कळत असतें.' जीवाचें चिन्ह उष्णता हें आहे, तर तत्स्वरूपी व तन्नियामक परमात्म्याचेंही तेंच असलें पाहिजे. कारण, जीव आणि परमात्मा एकरूपच आहेत.

शिष्य—तसेंच 'मरणकालीं चैतन्यरूपीं तेज परमात्मरूपी देवतेमध्यें प्रवेश करून लीन होतें' ही श्रुति जीवाचें आणि परमात्म्याचें ऐक्य दाखवीत आहे.

सिद्धान्ती—असो; धूम हें अग्नीचें असाधारण चिन्ह आहे. तसेंच उष्णता हें चैतन्याचें असाधारण चिन्ह होय. म्हणून त्या परब्रह्मस्वरूपाचें उष्णतालिंगानें अनुमापिलेलें अस्तित्व हें प्रत्यक्ष दर्शनाप्रमाणेंच निश्चयकारी असतें. आपल्या जठरामध्यें उष्णता असते, तीही परमात्म्याचें वास्तव्य जठरांत आहे असें सुचविते. प्रतिमेचें व विष्णूचें तादाम्य आपण मानितों, त्याप्रमाणें जठरस्थ उष्णता व परमात्मतेज हीं एकच होत, असें समजावें. हाच दर्शनोपाय.

तथा तस्य ज्योतिष एषा श्रुतिः श्रवणं श्रवणोपायोऽप्युच्यमानः। यत्र यदा पुरुषो ज्योतिषो लिङ्गं शुश्रूषति श्रोतुमिच्छति तदैतत्कर्णावपिगृह्यैतच्छब्दः क्रियाविशेषणम्। अपिगृह्यापिधायेत्यर्थोऽङ्गुलिभ्यां प्रोर्णुत्य निनदमिव रथस्येव घोषो निनदस्थमिव शृणोति नदथुरिव ऋषभकूजितमिव शब्दो यथा चाग्नेर्बहिर्ज्वलत एवं शब्दमन्तःशरीर उपशृणोति तदेतज्ज्योतिर्दृष्टश्रुतलिङ्गत्वाद्दृष्टं च श्रुतं चेत्युपासीत। तथोपासनाच्चक्षुष्यो दर्शनीयः श्रुतो विश्रुतश्च। यत्स्पर्शगुणोपासननिमित्तं फलं तद्रूपे संपादयति चक्षुष्य इति। रूपस्पर्शयोः सहभावित्वात्। इष्टत्वाच्च दर्शनीयतायाः। एवं च विद्यायाः फलमुपपपन्नं स्यान्न तु मृदुत्वादिस्पर्शवत्त्वे। य एवं यथोक्तौ गुणौ वेद। स्वर्गलोकप्रतिपत्तिस्तक्तमदृष्टं फलम्। द्विरभ्यास आदरार्थः॥ ७॥

इति तृतीयाध्यायस्य त्रयोदशः खण्डः॥ १३॥

**सिद्धान्ती** याच न्यायानें त्या ज्योतीचें (आत्म्याचें) श्रवण होणें हाही उपाय श्रुतीनें मनोनिश्चयासाठीं सांगितला आहे. ज्यावेळीं उपासक पुरुषाला ज्योतीचें दुसरें लिंग जो शब्द तो ऐकावा, अशी इच्छा असते, तेव्हां त्यानें आपले दोन्ही कान हाताच्या अंगुलीनें स्तब्ध करावे. घट्ट कान झांकून घेतले असतां त्याला रथाच्या घोषाप्रमाणें किंवा ऋषभाच्या म्हणजे वृषभाच्या शब्दाप्रमाणें किंवा विस्तव पेटला असतां जो एक शब्द ऐकूं येतो, त्या शब्दाप्रमाणें आपल्या शरीरांतून एक घन नाद बाहेर निघत आहे, असें या उपासकाला--कळेल. तात्पर्य, ह्या एक-निष्ठेनें तंद्री लागलेल्या उपासकाला हा नाद प्रत्यक्ष करितां येईल. असो: नेत्र-प्रत्यक्ष व कर्णप्रत्यक्ष इंद्रियांनीं अनुमापितां येणारी ही ज्योति आपण पाहिली व ऐकिली, अशी भावना ठेऊन उपासकानें अखंड ध्यान केलें पाहिजे. या उपासनेचें फल काय तर तो उपासक सर्वांगसुंदर आणि प्रसिद्धकीर्ति होतो.

**पूर्व०**—स्पर्शगुणाची उपासना करून रूपात्मक फल कसें मिळणार ?

**सिद्धान्ती**—आतांच सांगितलेंना कीं, रूप आणि स्पर्श यांचें सहभावित्व ( साहचार्य ) आहे म्हणून ? अर्थात् स्पर्शगुणाच्या उपासनेनें दर्शनीयत्व, सौंदर्य, हें प्राप्त होतें. सौंदर्य हें सर्वांस हवेंच असतें. असो; याप्रमाणें या उपासनेचें फल म्हणजे सौंदर्य प्राप्त झालें तर ती उपासना योग्यफलदा झाली, असें होईल. केवळ स्पर्शाच्या उपासनेनें संपादणारें महत्त्व प्राप्त झालें तरी योग्य फलप्राप्ति होणार नाहीं आणि श्रुतीच्या बोलाला बाध येईल, म्हणून रूपसौंदर्यचिन्हाचा सदुपयोग आहे. असो, ज्याला हें दोन गुणांचें ज्ञान झालें, त्याला ब्रह्मज्ञान होतें, हें अदृष्ट फल आहे. स्वर्गलोकांची प्राप्ति विद्वान् उपासकाला होतें, हें अदृष्ट-फल आम्हीं मागेंच सांगितलें आहे. सौंदर्य आणि कीर्ति हीं दृष्ट फलें व ब्रह्म-लोक प्राप्ति हें अदृष्ट फल होय. श्रुतीनें दोनदा ' यः एवं वेद ' या पदांचा उच्चार केला तो केवळ आदरप्रीत्यर्थ आहे ॥ ७ ॥

तेरावा खंड समाप्त.

---

## खंड चौदावा.

पुनस्तस्यैव त्रिपादमृतस्य ब्रह्मणोऽनन्तगुणवतोऽनन्तशक्तेरनेक-भेदोपास्यस्य विशिष्टगुणशक्तिमत्त्वेनोपासनं विधित्सन्नाह—

**सिद्धान्ती**—ब्रह्माचे गुण अनंत आहेत; त्याची शक्ति अनंत आहे. अनेक प्रकारांनीं त्याची उपासना करतां येण्यासारखी आहे. तथापि कांहीं एक विशिष्ट

गुण आणि विशिष्ट शक्ति घेऊन गेल्या खंडांत उल्लेखिलेल्या त्रिपाद ब्रह्माची उपासना करावी, हें पुनः सांगण्यासाठीं श्रुतीनें या प्रकरणाला प्रारम केला आहे. गेल्या खंडांत ब्रह्मोपासना प्रतीकद्वारानें सांगितली. आतां, शुद्ध सगुणब्रह्माची उपासना सांगावयाची आहे. ऐका:--

---

## मंत्र पहिला.

**सर्वं खल्विदं ब्रह्म तज्जलानिति शान्त उपासीत। अथ खलु क्रतुमयः पुरुषो यथाक्रतुरस्मिँल्लोके पुरुषो भवति तथेतः प्रेत्य भवति स क्रतुं कुर्वीत ॥ १ ॥**

अन्वय व अर्थः—**सर्वं खलु इदं ब्रह्म** ( हें सर्व ब्रह्म आहे ) **तत् जलानिति शांतः उपासीत** ( शांतचित्त पुरुषानें ब्रह्म हें सर्वजनक, सर्वसंहारक आणि सर्वसंरक्षक आहे, अशी श्रद्धा ठेवून त्याची उपासना करावी ) **अथ खलु पुरुषः क्रतुमयः** ( खरोखर पाहिलें असतां, प्रत्येक जीव निश्चयात्मा आहे ) **अस्मिन् लोके पुरुषः यथाक्रतुः भवति, तथा इतः प्रेत्य भवति** ( ह्या मर्त्यलोकांत पुरुषाचा जसा विचार–निश्चय किंवा कर्म–निश्चय असेल, तसें फल हा लोक सोडून गेल्यानंतर त्याला प्राप्त होतें ) **सः क्रतुं कुर्वीत** ( प्रत्येक पुरुषानें पुरुषार्थ–निश्चय करावा ) ॥१॥

सर्वं समस्तं खल्विति वाक्यालंकारार्थो निपातः। इदं जगन्नामरूपविकृतं प्रत्यक्षादिविषयं ब्रह्म कारणं वृद्धतमत्वाद्ब्रह्म। कथं सर्वस्य ब्रह्मत्वमित्यत आह—तज्जलानिति। तस्माद्ब्रह्मणो जातं तेजोबन्नादिक्रमेण सर्वम्। अतस्तज्जम्। तथा तेनैव जननक्रमेण प्रतिलोमतया तस्मिन्नेव ब्रह्मणि लीयते तदात्मतया श्लिष्यत इति तल्लम्। तथा तस्मिन्नेव स्थितिकालेऽनिति प्राणिति चेष्टत इति। एवं ब्रह्मात्मतया त्रिषु कालेष्वविशिष्टं तद्व्यतिरेकेणाग्रहणात्। अतस्तदेवेदं जगत्। यथा चेदं तदेवैकमद्वितीयं तथा षष्ठे विस्तरेण वक्ष्यामः। यस्माच्च सर्वमिदं ब्रह्म, अतः शान्तो रागद्वेषादिदोषरहितः संयतः सन्यत्तत्सर्वं ब्रह्म तद्वक्ष्यमाणैर्गुणैरुपासीत।

सिद्धान्ती—मंत्रांतील खलु हा शब्द वाक्यालंकारासाठीं उपयोजिलेला आहे. असो; हें सर्व ब्रह्मरूप आहे—

शिष्य—म्हणजे ?

सिद्धान्ती—हें नामरूपांनीं विकृत झालेलें आणि इंद्रियांस प्रत्यक्षविषय होणारें दृश्य जगत् ब्रह्मस्वरूप आहे. ब्रह्म हें त्याचें कारण आहे.

शिष्य—' जें अत्यंत विस्तीर्ण असतें व ज्याची वृद्धि निरतिशय आहे, तें ब्रह्म होय ' असें आपण मागें अनेक वेळ सांगितलें आहे. पण मला हें समजत नाहीं कीं, निरुपाधिक असणारें ब्रह्म सोपाधिक जें हें जगत् तद्रूप कसें आहे ?

सिद्धान्ती—येथें निरुपाधिक ब्रह्माचा विचार सध्यां कर्तव्य नाहीं. सगुण-ब्रह्माचा विचार कर्तव्य आहे. ऐका: हें जें सर्व दृश्य जगत् आपल्यांस दिसत आहे, तें तेज, जल, अन्न इत्यादि उत्क्रांतिक्रमानें ( विसृष्टीच्या क्रमानें ) ब्रह्मापासून झालेलें आहे. म्हणून या जगताला तज्ज ( त्याच्या पासून उत्पन्न झालेलें ) असें म्हणतात. त्याच प्रमाणें वर जो तेजोजलादि क्रम सांगितला आहे त्याचा विपर्यय करून हें सर्व जगत् ब्रह्मामध्यें लीन होतें. अन्नाचा लय जलामध्यें, जलाचा तेजामध्यें असा हा प्रातिलोमी लयक्रम आहे. सर्वांचा लय करणाऱ्या ब्रह्मांत लीन होणाऱ्या जगताला ( आत्मस्वरूपामध्यें सर्वांचा अंतर्भाव करणाऱ्या ब्रह्मांत लय पावून तत्स्वरूप होणाऱ्या जगताला ) तल्ल ( त्यामध्यें लय पावलेलें ) असें म्हणतात. त्याच प्रमाणें स्थितिकालीं या ब्रह्मामध्यें सर्व जगत् आपलें जीवनादि व्यापार, आपल्या चेष्टा, करीत असतें, म्हणून त्याला तदन ( त्यांत प्राणव्यापार करणारें ) असें म्हणतात.

शिष्य—याप्रमाणें तिन्हीं कालीं हें जगत् ब्रह्मात्मक असतें, असें झालें.

सिद्धान्ती—तात्पर्य, ब्रह्माहून या ब्रह्माभिन्न जगताला कोणत्याही कालीं निराळें काढतां येत नाहीं; किंवा सर्वसत्ताक ब्रह्माचें अस्तित्व कबूल केल्याशिवाय जगताचें सत्ताग्रहणही करितां येत नाहीं. ब्रह्म असेल तर जगत् आहे, ब्रह्म नसेल तर नाहीं, असा हा अन्वय-व्यतिरेकाचा भाग आहे. म्हणून हें जगत् ब्रह्मस्वरूपच आहे. आतां ब्रह्म ' एकच एक आणि अद्वितीय कसें आहे ' त्याचा विस्तार श्रुतीनें व आचार्यांनीं या उपनिषदाच्या सहाव्या अध्यायांत केला आहे. तेथें आपण ब्रह्मस्वरूप पाहून घेऊं. सध्यां आपल्यास इतकेंच न्यायतः कबूल करावयाचें आहे, कीं हें जगत् ब्रह्मस्वरूप आहे. म्हणून रागद्वेषादि दोषांनीं लिप्त न झालेल्या पुरुषानें आत्मसंयमन करून हें दृश्यरूपास आलेलें जगत् ब्रह्मरूप आहे, असें समजून ब्रह्मदृष्टीनें त्याची उपासना करावी. ब्रह्माचे कोणते गुण लक्षांत ठेऊन उपासना करावयाची त्यांचा निर्देश दुसऱ्या मंत्रापासून श्रुति करणार आहे.

**शिष्य**—सारांश, या दृश्य जगताचें उपादान आणि निमित्त कारण अविकारी ब्रह्म आहे, व ब्रह्मव्यतिरिक्त जगत् नाहीं; म्हणून 'ब्रह्मच सर्व आहे' असें निश्चित करून त्याची उपासना करावयाची आहे, इतकें ठरलें. ही उपासना कशी करावयाची ?

**सिद्धान्ती**—ऐक:—

कथमुपासीत । क्रतुं कुर्वीत क्रतुर्निश्चयोऽध्यवसाय एवमेव नान्यथेत्यविचलः प्रत्ययस्तं क्रतुं कुर्वीतोपासीतेत्यनेन व्यवहितेन संबन्धः । किं पुनः क्रतुकरणेन कर्तव्यं प्रयोजनम् । कथं वा क्रतुः कर्तव्यः । क्रतुकरणं चाभिप्रेतार्थसिद्धिसाधनं कथमित्यस्यार्थस्य प्रतिपादनार्थमथेत्यादिग्रन्थः । अथ खल्विति हेत्वर्थः । यस्मात्क्रतुमयः क्रतुप्रायोऽध्यवसायात्मकः पुरुषो जीवः यथाक्रतुर्यादृशः क्रतुरस्य सोऽयं यथाक्रतुर्यथाध्यवसायो यादृङ्निश्चयोऽस्मिँल्लोके जीवन्निह पुरुषो भवति तथेतोऽस्माद्देहात्प्रेत्य मृत्वा भवति क्रत्वनुरूपफलात्मको भवतीत्यर्थः । एवं ह्येतच्छास्त्रतो दृष्टम् । " यं यं वाऽपि स्मरन्भावं त्यजत्यन्ते कलेवरम् " इत्यादि । यत एवं व्यवस्था शास्त्रदृष्टाऽतः स एवं जानन्क्रतुं कुर्वीत यादृशं क्रतुं वक्ष्यामस्तम् । यत एवं शास्त्रप्रामाण्यादुपपद्यते क्रत्वनुरूपं फलमतः स कर्तव्यः क्रतुः ॥ १ ॥

**सिद्धान्ती**—उपासना कशी करावयाची तें आपण पाहूं. या मंत्राच्या शेवटीं असें सांगितलें आहे, कीं जीवानें निश्चय करावा, विचारपूर्वक निश्चय करावा.

**शिष्य**—निश्चय म्हणजे ?

**सिद्धान्ती**—अमुक एक वस्तु अमक्याच प्रकारची आहे, इतर प्रकारची नाहीं, असा अभंगप्रत्यय येणें आणि प्रत्ययानंतर मनाची निःसंशय खात्री होणें, याचें नांव निश्चय किंवा अध्यवसाय किंवा क्रतु होय. प्रत्येक जीवानें निश्चय ( विचार ) श्रद्धापूर्वक ठरवून त्या निश्चयाची म्हणजे पुरुषार्थाची अखंड उपासना करावी.

**पूर्व०**—हा पुरुषार्थ अथवा निश्चय ठरविण्याचें प्रयोजन काय ? पुरुषार्थ ठरवावयाचा कसा ? आपण निश्चय केला, तर तो इष्टसिद्धीचें साधन होईलच. याला प्रमाण काय ?

सिद्धान्ती—या प्रश्नांचा उलगडा व्हावा म्हणून 'अथ खलु क्रतुमयः' इत्यादि ग्रंथाची योजना आहे. 'अथ खलु' हे शब्द हेत्वर्थक ( हेतुप्रतिपादक ) आहेत. म्हणजे ज्यापक्षीं प्रत्येक जीव क्रतुमय अध्यवसायात्मक असतो ( ज्यापक्षीं प्रत्येक जीव स्वभावतः पुरुषार्थी असतो ) त्यापक्षीं प्रत्येक पुरुषानें या स्वभावतः प्राप्त झालेल्या पुरुषार्थाचा विचारपूर्वक निश्चय ठरवावा. कारण, जसा क्रतु असेल, ( जसा अध्यवसाय असेल ), तात्पर्य ज्याप्रकारचा निश्चय असेल, येथील संसारयात्रेंत ज्याप्रकारचा श्रद्धापूर्वक कार्यकारी निश्चय असेल, त्या अध्यवसायाप्रमाणें किंवा कर्मकारी श्रद्धायुक्त निश्चयाप्रमाणें हा लोक सोडून गेलेल्या जीवास स्वरूपप्राप्ति होते. जसें कायिक, वाचिक आणि मानसिक कर्म, तसें फल मिळावें हें न्याय्य आहे आणि मिळतें असा अनुभवही आहे. शास्त्रही असेंच म्हणत आहे. 'अंतकालीं ज्या भावनेचें दृढ स्मरण असतें, ती भावना ह्या किंवा इतर लोकीं मूर्तस्वरूपानें प्राप्त होते.' असें श्रीमद्भगवान् आपल्या सर्वप्रसिद्ध गीतेंत म्हणतात. शास्त्राचीही ज्याअर्थी अशी व्यवस्था आहे, त्याअर्थी प्रत्येक जीवानें ह्या विश्वनियमाचें ज्ञान करून घ्यावें आणि श्रुति पुढें सांगणार आहे, त्या स्वरूपाचा क्रतु किंवा निश्चय किंवा अध्यवसाय करावा.

शिष्य—'जसा क्रतु असेल, तसें फल मिळतें.' असें जर युक्तीनें, अनुभवानें आणि श्रुतीनें ठरत आहे, तर योग्यप्रकारचा निश्चय प्रत्येक जीवानें करावा हा आपला उपदेश सर्वथा योग्य आहे ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**मनोमयः प्राणशरीरो भारूपः सत्यसंकल्प आकाशात्मा सर्वकर्मा सर्वकामः सर्वगन्धः सर्वरसः सर्वमिदमभ्यात्तोऽवाक्यनादरः ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः—मनोमयः, प्राणशरीरः, भारूपः, सत्यसंकल्पः, आकाशात्मा, सर्वकर्मा, सर्वकामः, सर्वगंधः, सर्वरसः, सर्वं इदं अभ्यात्तः, अवाकी, अनादरः**—( हा क्रतु म्हणजे आपला जो पुरुषार्थ त्याचें स्वरूप येथें सांगितलें आहे.- हा मनोमय, प्राण आहे ज्याचें शरीर असा, तेजोरूप, सत्यसंकल्प, आकाशाप्रमाणें आत्मा आहे ज्याचा असा, सर्व कर्म करणारा, साधुकाम, सर्वगंध, सर्वरस, सर्वजग-

द्व्यापी, सर्वेंद्रियागोचर, आणि निर्भ्रम किंवा निर्भ्रांत, असें याचें स्वरूप आहे ) क्रतूचे म्हणजे पुरुषार्थाचे ( परमात्म्याचे ) कांहीं स्वाभाविक गुणधर्म येथें सांगितलें आहेत ॥ २ ॥

कथम् । मनोमयो मनःप्रायः । मनुतेऽनेनेति मनस्तत्स्ववृत्त्या विषयेषु प्रवृत्तं भवति तेन मनसा तन्मयः। तथा प्रवृत्त इव तत्प्रायो निवृत्त इव च । अत एव प्राणशरीरः प्राणो लिङ्गात्मा विज्ञानक्रियाशक्तिद्वयसंमूर्छितः । " यो वै प्राणः सा प्रज्ञा या वै प्रज्ञा स प्राणः " इति श्रुतेः । स शरीरं यस्य स प्राणशरीरः । " मनोमयः प्राणशरीरनेता " इति च श्रुत्यन्तरात् । भारूपः । भा दीप्तिश्चैतन्यलक्षणं रूपं यस्य स भारूपः ।

**सिद्धान्ती**—क्रतूनिश्चयाचें स्वरूप पहा: हा मनोमय आहे. ज्याच्या साह्यानें आपण विचार करितो तें मन होय. त्या मनोवृत्तीनें विषयाचें ठिकाणीं आपण प्रवृत्त तरी होतों किंवा निवृत्त होतों. या विषयप्रवर्तक व तन्निवर्तक मनानें पूर्ण असणें म्हणजे मनोमय असणें होय.

**शिष्य**—नाहीं समजलें ?

**सिद्धान्ती**--जीवाची विषयाकडे प्रवृत्ति–निवृत्ति होते, जीव विषयप्रवण आणि विषयपराङ्मुख होतो, त्याचें कारण मन आहे. जीव स्वरूपतः प्रवृत्तनिवृत्त होत नाहीं. मनानेंच हा सर्व कारभार होतो. म्हणून संसारी जीवाला अथवा सगुण परमात्म्याला मनोमय म्हणावयाचें. अर्थात् जीवांचा क्रतुही मनोमय असतो. आणि म्हणूनच तो प्राणशरीर आहे. प्राण म्हणजे लिंगदेहाचा आत्मा. ह्या प्राणामध्यें, ज्ञानशक्ति आणि क्रियाशक्ति एकत्र झालेल्या असतात. ' जो प्राण ती प्रज्ञा आणि जी प्रज्ञा तो प्राण ' अशी श्रुति प्रमाण आहे. तात्पर्य, विज्ञानशक्ति आणि क्रियाशक्ति हें प्राणाचें स्वरूप आहे. हा प्राण ज्याचें शरीर असतों, तो प्राणशरीर होय. ' हा प्राणमय आहे. प्राणशरीराचा नायक आहे ' अशी श्रुति प्रमाण आहे. हा क्रतु ( सगुण परमात्मा, ईश्वर ) तेजोरूप आहे. चैतन्यात्मकता हें याच्या तेजाचें स्वरूप आहे. तात्पर्य, मनोवृत्तींनीं मात्र प्रकट होणारा, प्राण हेंच ज्याचें सूक्ष्म शरीर आहे, जो या सूक्ष्म शरीराचा नायक आहे, आणि चैतन्यात्मकता हें ज्याचें स्वरूप आहे, असा हा क्रतु म्हणजे ईश्वर अथवा ' पुरुषार्थनिश्चय ' असतो. स्वरूपतः ज्ञानरूप, पण मनोवृत्तींनीं प्रवृत्तनिवृत्त होणारा व लिंगदेहांत वास्तव्य करणारा क्रतु आहे. मनोमयत्व आणि प्राणशरीरत्व हीं सगुणब्रह्मप्रमाणेंच जीवाचींही लक्षणें आहेत. असो; या पुढचीं विशेषणें पहा:—

सत्यसंकल्पः । सत्या अवितथाः संकल्पा यस्य सोऽयं सत्यसंकल्पः । न यथा संसारिण इवानैकान्तिकफलः संकल्प ईश्वरस्येत्यर्थः । अनृतेन मिथ्याफलत्वहेतुना प्रत्यूढत्वात्संकल्पस्य मिथ्याफलत्वम् । वक्ष्यत्यनृतेन हि प्रत्यूढा इति । आकाशात्मा । आकाश इवाऽऽत्मा स्वरूपं यस्य स आकाशात्मा । सर्वगतत्वं सूक्ष्मत्वं रूपादिहीनत्वं चाऽऽकाशतुल्यतेश्वरस्य । सर्वकर्मा । सर्वं विश्वं तेनेश्वरेण क्रियत इति जगत्सर्वं कर्मास्य स सर्वकर्मा । " स हि सर्वस्य कर्ता " इति श्रुतेः । सर्वकामः । सर्वे कामा दोषरहिता अस्येति सर्वकामः । " धर्माविरुद्धो भूतेषु कामोऽस्मि " इतिस्मृतेः । ननु कामोऽस्मीति वचनादिह बहुव्रीहिर्न संभवति सर्वकाम इति । न, कामस्य कर्तव्यत्वाच्छब्दादिवत्पाराथ्र्यप्रसङ्गाच्च देवस्य । तस्माद्यथेह सर्वकाम इति बहुव्रीहिस्तथा कामोऽस्मीतिस्मृत्यर्थो वाच्यः ।

**सिद्धान्ती**—तो सत्यसंकल्प आहे. ज्याचे संकल्प सत्यरूप, ऐकांतिक असतात, अयथार्थ नसतात, तो सत्यसंकल्प होय. संसारी जीवाचे संकल्प वितथ म्हणजे अयथार्थ अथवा अनैकांतिक असतात, तसे ईश्वराचे नसतात.

**पूर्व०**—जीवाचे संकल्प तरी अयथार्थ कां ?

**सिद्धान्ती**—कारण, अनृत म्हणजे मिथ्या फलाची वासना जीव धरतात, म्हणून त्यांचे संकल्प असत्यप्रणीत असतात व त्यांच्या संकल्पांना मिथ्याफलत्व प्राप्त होतें. हीच श्रुति पुढें सांगेल कीं ' जीवाचे संकल्प अनृतानें प्रतिबद्ध झालेले असतात.' यथार्थ ज्ञान नसल्यामुळें जीव प्रत्येकक्षणीं निरनिराळे ( अर्थात् बहुधा चुकलेले ) संकल्पांचें ध्यान करीत असतो. ईश्वर सर्वज्ञ असतो म्हणून त्याचे संकल्प सत्य असतात. असो; याचें स्वरूप आकाशाप्रमाणें असतें, म्हणून याला आकाशात्मा असें म्हटलें आहे.

**शिष्य**—म्हणजे आकाशाचे सर्व गुण येथें दृग्गोचर होतात ?

**सिद्धान्ती**—होय. आकाश सर्वगामी, अत्यंत सूक्ष्म आणि रूपरसगंधांनीं विरहित असतें. तसेंच ईश्वर सर्वगामी ( सर्वव्यापी ), सूक्ष्माहून सूक्ष्म आणि रूपरसादि गुणांनीं वियुक्त असतो. पुनः; हें सर्व विश्व निर्माण करणारा ईश्वर आहे. सृष्टिस्थितिलय इत्यादि सर्व जगदावस्था त्याच्या कर्तृत्वानें सिद्ध होतात; म्हणून त्याला सर्वकर्मा असें म्हटलें. ' तो सर्वकर्ता आहे ' अशी श्रुतिही आहे.

तसेंच तो सर्व शुद्ध वासनांचा धारणकर्ता आहे. म्हणून त्याला सर्वकाम हें विशेषण शोभतें.

पूर्व०—'सर्ववासनांत' अशुद्ध वासनांचाही समावेश होतो. मग तुम्ही 'सर्वकाम' या पदाचा 'सर्व शुद्ध वासना धारण करणारा' असा अर्थ कां करितां ?

सिद्धान्ती—'मी धर्माला अविरुद्ध असणारा काम आहें' असें भगवद्गीतेंत परमेश्वर म्हणतात. म्हणून श्रुतीचाही अर्थ तसाच केला पाहिजे.

पूर्व०—पण 'मी काम आहें' असें स्मृतिवाक्य आहे, म्हणून येथें बहुव्रीहि समास होत नाहीं.

सिद्धान्ती—तसें नाहीं. कर्मधारय समास केला, तर परमेश्वर आणि काम यांचें सामानाधिकरण्य होईल. 'कामच मी' असा अर्थ होईल. पण तसा अर्थ करणें इष्ट नाहीं. कारण, शब्दाप्रमाणेंच काम हें चैतन्यानें करण्याचें कार्य आहे (म्हणजे काम सादि आहे). परब्रह्म अनादि आहे. शिवाय काम आणि ब्रह्म एकरूप झाल्यास ब्रह्माचें स्वातंत्र्य नाहींसें होईल. काम हा कार्य म्हणजे परकृत अथवा परतंत्र आहे. पण ब्रह्म स्वतंत्र आहे. म्हणून गीतोक्त स्मृतिवाक्यांतील 'काम' हा शब्दहीं 'काम आहे ज्याचा तो काम,' असा बहुव्रीहिसमासी हवा. तेव्हां या मंत्रांत जसा बहुव्रीहि समास आहे, तसाच व त्याच दृष्टीनें 'कामोस्मि' याचा अर्थ बहुव्रीहिपद्धतीनें केला पाहिजे. असो; परमेश्वर सर्वकाम आहे, व त्याचें सर्वकामत्व निर्दुष्ट आहे, हें स्पष्ट आहे.

सर्वगन्धः। सर्वे गन्धाः सुखकरा अस्य सोऽयं सर्वगन्धः। "पुण्यो गन्धः पृथिव्याम्" इति स्मृतेः। तथा रसा अपि विज्ञेयाः। अपुण्यगन्धरसग्रहणस्य पाप्मसंबन्धनिमित्तत्वश्रवणात्। "तस्मात्तेनोभयं जिघ्रति सुरभि च दुर्गन्धि च। पाप्मना ह्येष विद्धः" इति श्रुतेः। न च पाप्मसंसर्ग ईश्वरस्य। अविद्यादिदोषस्यानुपपत्तेः।

सिद्धान्ती—तो 'सर्वगंध' आहे म्हणजे त्याला सर्व सुखकर गंध उपभोगितां येतात. 'पृथ्वीमधील पुण्यगंध (सुगंध) तो आहे,' अशी स्मृति (गीतावाक्य) आहे. त्याच्या स्वरूपांत दुर्गंधीला ठाव ठिकाणा मिळत नाहीं. याचप्रमाणें रसाचीही व्यवस्था समजावी. कारण, दुर्गंध आणि दुष्टरस याचें ग्रहण होतें, तें पापाशीं संबंध असतो, म्हणून होतें; असें श्रुतीचें सांगणें आहे. 'म्हणून घ्राणेंद्रियानें हा जीव सुगंध आणि दुर्गंध यांचा उपभोग घेण्यास समर्थ होतो. कारण, तो पापानें विद्ध झालेला आहे' असें ह्याच उपनिषदांतील श्रुतिवाक्य आहे ( अध्याय १ खंड १ मंत्र २ पहा ). ईश्वराच्या ठिकाणीं पापाचा लेशही नसतो. हें सर्वश्रुत आहे.

शिष्य--कारण उघड आहे कीं, ईश्वराचे ठिकाणीं अविद्यादि दोष असणें शक्य नाहीं.

सर्वमिदं जगदभ्यातोऽभिव्याप्तः । अततेर्व्याप्त्यर्थस्य कर्तरि निष्ठा । तथाऽवाक्युच्यतेऽनयेति वाग्वागेव वाकः । यद्वा वचेर्घ-ञन्तस्य करणे वाकः । स यस्य विद्यते स वाकी न वाक्यवाकी । वाक्प्रतिषेधश्चात्रोपलक्षणार्थः । गन्धरसादिश्रवणादीश्वरस्य प्राप्तानि घ्राणादीनि करणानि गन्धादिग्रहणाय । अतो वाक्प्रतिषेधेन प्रति-षिध्यन्ते तानि । "अपाणिपादो जवनो ग्रहीता पश्यत्यचक्षुः स शृणोत्यकर्णः" इत्यादिमन्त्रवर्णात् । अनादरोऽसंभ्रमः । अप्राप्त-प्राप्तौ हि संभ्रमः स्यादनाप्तकामस्य । न त्वाप्तकामत्वान्नित्यतृप्तस्ये-श्वरस्य संभ्रमोऽस्ति क्वचित् ॥ २ ॥

सिद्धान्ती--ईश्वरानें हें सर्व जगत् अभिव्याप्त केलें आहे.

शिष्य--अभ्यात्त हा मंत्रांतील शब्द आहे. अत् = व्यापणें. येथें अभ्यात्त हा कर्तरि आहे, कर्मणि नव्हे. म्हणून अभ्यात्त याचा अर्थ जगद्व्यापक असा झाला ?

सिद्धान्ती--होय. तसेंच तो अवाकी आहे. जिच्या साधनानें आपण उच्चार करितों, ती वाक् म्हणजे वाणी होय. वाणी तीच वाक.

शिष्य--किंवा वच्-धातूपासूनही वाक-शब्द साधतां येईल !

सिद्धान्ती--ठीक आहे. ज्याला वाक आहे, तो वाकी; वाकी नव्हे तो अवाकी. म्हणजे वाणीच्या योगानें ज्याचें स्वरूप वर्णन करितां येत नाहीं, किंवा वाणीची ज्याला उपाधि नाहीं तो अवाकी होय. वाणीचा प्रतिषेध श्रुतीनें केला आहे, तें उपलक्षण आहे. वाणीच्या साह्यानें सर्व इंद्रियांचा प्रतिषेध होतो. अर्थात् याचा अर्थ ईश्वराला गंध, रस आदि गुण व घ्राणरसनादि इंद्रियें नाहींत, असें सांगावयाचें आहे.

पूर्व०--पण ईश्वर सर्वगंध, सर्व-रस इत्यादि गुणान्वित आहे, असें याच मंत्रांत सांगितलें आहे ना ! गंध, रस इत्यादि विषय ग्रहण करण्याला घ्राण, जिव्हादि इंद्रियें अवश्य असलीं पाहिजेत. आणि तुम्ही तर आतां म्हणतां, कीं त्याला कोणतेंही इंद्रिय नाहीं ! हा काय प्रकार आहे ?

सिद्धान्ती--ऐका--'हस्त, चरण अविद्यमान असतांही तो सर्वग्राहक आणि अत्यंत चपल आहे, नेत्र नसतांना तो पाहतो, कर्ण नसतांना ऐकतो' इत्यादि श्रुती स्पष्ट सांगतात, कीं सर्वात्मक व सर्वव्यापी ईश्वराला कोणत्याही

प्रकारची उपाधि नाहीं. म्हणून अवाकी या पदानें ईश्वर ‘ इंद्रियोपाधी ’ नाहीं असें सिद्ध होतें. असो; तो अनादर म्हणजे असंभ्रम आहे. कधीं न मिळालेली वस्तु प्राप्त झाली असतां अनाप्तकामी जीवाला ( ज्याच्या वासना तृप्त झाल्या नाहींत अशा जीवाला ) संभ्रम प्राप्त होतो. परमेश्वर आप्तकाम आहे, म्हणून तो नित्यतृप्त असतो. अर्थात् ईश्वराचे ठिकाणीं संभ्रम उत्पन्न होण्याचा ( मनामध्यें चलबिचल होण्याचा ) संभव नसतो. म्हणून त्याला अनादर असें म्हटलें. याप्रमाणें जीव आणि ईश्वर स्वरूपतः मनोमय, प्राणशरीर आणि तेजोरूप आहेत. पण परमेश्वर सत्यसंकल्प, सर्वगामी, अतिसूक्ष्म, गुणशून्य, सर्वकर्ता, सर्वपुरुषार्थसाधक, सर्वगंध, सर्वरस, सर्वव्यापी, ज्ञानकर्मेंद्रियशून्य आणि स्वस्वरूपामध्यें नित्य राहणारा असा आहे. हें परमेश्वराचें तसेंच, आत्म्याचें स्वरूप आहे ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**एष म आत्माऽन्तर्हृदयेऽणीयान्व्रीहेर्वा यवाद्वा सर्षपाद्वा श्यामाकाद्वा श्यामाकतण्डुलाद्वैष म आत्माऽन्तर्हृदये ज्यायान्पृथिव्या ज्यायानन्तरिक्षाज्ज्यायान्दिवो ज्यायानेभ्यो लोकेभ्यः ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थः—अंतर्हृदये एषः मे आत्मा अणीयान्** ( ह अंतर्हृदयांत असणारा माझा आत्मा अत्यंत अणु आहे ) **व्रीहेः वा, यवात् वा, सर्षपात् वा, श्यामाकात् वा, श्यामाकतंडुलात् वा** ( व्रीहि म्हणजे तांदूळ, यव, सर्षप म्हणजे मोहरी, श्यामाक—एक प्रकारचें देवभात आहे असें म्हणतात,—अथवा श्यामाकतंडुल, यांच्यापेक्षांही माझा आत्मा लहान आहे ) **अंतर्हृदये एषः मे आत्मा पृथिव्याः ज्यायान्, अंतरिक्षात् ज्यायान्, दिवः ज्यायान्, एभ्यः लोकेभ्यः ज्यायान्,** ( पृथ्वीपेक्षां मोठा, अंतरिक्षापेक्षां मोठा, स्वर्लोकापेक्षां मोठा, ह्या सर्व भुवनांपेक्षां मोठा माझा आत्मा हृदयाकाशामध्यें आहे ) सारांश, आत्मा अणूपेक्षां अणु आणि महतापेक्षां महान्—मोठ्यापेक्षां मोठा—असा आहे ॥ ३ ॥

एष यथोक्तगुणो मे ममाऽऽत्माऽन्तर्हृदये हृदयपुण्डरीकस्यान्तर्मध्येऽणीयानणुतरो व्रीहेर्वा यवाद्वेत्याद्यत्यन्तसूक्ष्मत्वप्रदर्शनार्थम् ।

श्यामाकाद्वा श्यामाकतण्डुलाद्वेति परिच्छिन्नपरिमाणादणीयानित्युक्तेऽणुपरिमाणत्वं प्राप्तमाशङ्क्यातस्तत्प्रतिषेधायाऽऽरभते—एष म आत्माऽन्तर्हृदये ज्यायान्पृथिव्या इत्यादिना । ज्यायःपरिमाणाच्च ज्यायस्त्वं दर्शयन्ननन्तपरिमाणत्वं दर्शयति—मनोमय इत्यादिना ज्यायानेभ्यो लोकेभ्य इत्यन्तेन ॥ ३ ॥

सिद्धान्ती—मागें जे परमात्मगुण सांगितले, तेच माझ्या आत्म्याचे म्हणजे प्रत्यगात्म्याचे गुण आहेत. माझ्या हृदयकमलाच्या अंतर्भागीं असणारा 'माझा आत्मा' व्रीहि, यव, सर्षप इत्यादिकांहून लहान आहे, असें श्रुति सांगते, आणि मला अनुभवही तसा येतो.

पूर्वपक्षी—श्यामाक किंवा श्यामाकतंडुल यांच्यापेक्षांही लहान असणाऱ्या आत्म्याचें परिमाण ( मोजमाप ) परिच्छिन्न झालें. म्हणजे तो अत्यंत सूक्ष्म आहे, असें ठरलें. सारांश, आत्म्याच्या लांबीरूंदीला मोजमाप आहे, असें दोन तीन मोजमापांनीं ठरलें. मात्र तो लहान आहे, अत्यंत सूक्ष्म—परिमाणाचा आहे, इतकेंच ?

सिद्धान्ती—ही सहज प्राप्त होणारी शंका निरस्त करण्यासाठीं श्रुति ह्मणते; हा माझा ( जीवाचा ) हृदय पुंडरीकांतील प्रत्यगात्मा पृथ्वी-आदि मोठमोठ्या वस्तूंहून, फार काय सांगावें ? त्रैलोक्याहूनही अतीशय मोठा आहे.

पूर्वपक्षी—एकच वस्तु लघूत्तम आणि महत्तम कशी असूं शकेल ?

सिद्धान्ती— तो आत्मा अनंत आहे, हें मनोमय इत्यादि मागच्या मंत्रांत सांगितलेल्या गुणांपासून तों ह्या मंत्रांत त्रैलोक्याहून मोठा असणारा, इत्यादि गुणांपर्यंतच्या सर्व गुणांनीं सिद्ध होत नाहीं काय ? सिद्ध होतेंच होतें. वस्तु अनंत असली ह्मणजे ती सर्वलघु आणि सर्वमहत् आहे, असेंच ह्मटलें पाहिजे. अनंतामध्यें सर्वविरोधांचा परिहार होतो ॥ ३ ॥

---

### मंत्र चवथा.

**सर्वकर्मा सर्वकामः सर्वगन्धः सर्वरसः सर्वमिदमभ्यात्तोऽवाक्यनादर एष म आत्माऽन्तर्हृदय एतद्ब्रह्मैतमितः प्रेत्याभिसंभवितास्मीति यस्य स्यादद्धा न विचिकित्साऽस्तीति ह स्माऽऽह शाण्डिल्यः शाण्डिल्यः ॥ ४ ॥**

**इति तृतीयाध्यायस्य चतुर्दशः खण्ड ॥ १४ ॥**

अन्वय व अर्थ:—सर्वकर्मा, सर्वकामः, सर्वगंधः, सर्वरसः, सर्वं इदं, अभ्यात्तः, अवाकी, अनादरः, एषः मे आत्मा अंतर्हृदये ( हा माझ्या हृदयकमळांत असणारा आत्मा सर्वकर्ता, सर्वकाम, सर्वगंध, सर्वरस, सर्वव्यापि, सर्वेंद्रियशून्य आणि शांत असा आहे ) एतत् ब्रह्म ( हेंच ब्रह्म होय ) इतः प्रेत्य एतं अभिसंभवितास्मि ( हा लोक सोडून गेल्यानंतर मी ह्या ब्रह्मस्वरूपाला म्हणजे स्वस्वरूपाला प्राप्त होईन ) इति ( अशी ) यस्य श्रद्धा स्यात् (ज्याची पूर्ण श्रद्धा असते) तस्मै न विचिकित्सा अस्ति ( त्याला कोणत्याही प्रकारची शंका असत नाहीं ) इति शांडिल्यः शांडिल्यः आह स्म ( याप्रमाणें शांडिल्यऋषि म्हणाला) ॥४॥

यथोक्तगुणलक्षण ईश्वरो ध्येयो न तु तद्गुणविशिष्ट एव । यथा राजपुरुषमानय चित्रगुं वेत्युक्ते न विशेषणस्याप्यानयने व्याप्रियते तद्वदिहापि प्राप्तमतस्तन्निवृत्त्यर्थं सर्वकर्मेत्यादि पुनर्वचनम् । तस्मान्मनोमयत्वादिगुणविशिष्ट एवेश्वरो ध्येयः । अत एव षष्ठसप्तमयोरिव तत्त्वमस्यात्मैवेदं सर्वमिति नेह स्वाराज्येऽभिषिञ्चत्येष म आत्मैतद्ब्रह्मैतमितः प्रेत्याभिसंभवितास्मीति लिङ्गान्न त्वात्मशब्देन प्रत्यगात्मैवोच्यते । ममेति षष्ठ्याः संबन्धार्थप्रत्यायकत्वादेतमभिसंभवितास्मीति च कर्मकर्तृत्वनिर्देशात् ।

पूर्व०—आतांपर्यंत, पण गुणलक्षणांनीं ज्या ईश्वराचें स्वरूप वर्णन केलें, तो ईश्वर मात्र ध्येय आणि उपास्य आहे. गुणांनीं विशिष्ट ईश्वर ध्येय किंवा उपास्य नव्हे, असें मला वाटतें. राजपुरुषाला किंवा चित्रगूला घेऊन ये—

शिष्य —थांबा ! राजपुरुष म्हणजे राजाच्या सेवेंत असणारा पुरुष होय, हें सहज समजतें. पण तुमचा दुसरा ‘ चित्रगु ’ हा शब्द समजत नाहीं.

पूर्व०—चित्रविचित्र आहेत ज्याच्या गायी, तो चित्रगु. असो; ‘राजपुरुषाला घेऊन या’ असें म्हटलें म्हणजे राजासह किंवा राजकर्मासह आपण त्याला आणीत नाहीं; अथवा चित्रगूला बोलवा असें सांगितलें असतां विचित्र गायींसह आपण चित्रगूला आणीत नाहीं. केवळ त्या त्या पुरुषांसच आपण आणतों. ह्याप्रमाणें गुणयुक्त ईश्वराचें ध्यान करीत असतां गुणांचें ध्यान करणें अवश्य नाहीं, केवळ ईश्वराचें ध्यान करणें हेंच योग्य आहे, असें ठरतें. नव्हे ?

सिद्धान्ती—अशी शंका निवारण व्हावी, म्हणून श्रुतीनें ‘ सर्वकर्मा, सर्वकाम इत्यादि ’ विशेषणांची पुनरुक्ति करून मनोमयत्वादि गुणविशिष्ट ईश्वराचें

ध्यान करावें, गुणांसह ध्यान करावें, सगुण परमेश्वराचें ध्यान करावें, असें विहित केलें आहे. म्हणून साहव्या आणि सातव्या अध्यायामध्यें सांगितल्याप्रमाणें:—

शिष्य—तेथें काय सांगितलें आहे ?

सिद्धान्ती—' तत्त्वमसि ' ( तें तूं आहेस ), ' आत्मैवेदं सर्वं ' ( आत्मा हें सर्व आहे ) ' असें सांगितलें आहे. हें परमार्थ तत्त्व सांगण्याचें प्रयोजन येथें नाहीं, तर ' स्वाराज्यामध्यें होणारें अभिषिंचन,' येथें नाहीं, हें एक लिंग व 'हा माझा आत्मा ब्रह्म आहे, तिकडेच हा लोक सोडून मी जाईन आणि ब्रह्म होईन ' हें दुसरें लिंग. यांवरून अद्वैत परब्रह्माचा येथें बोध करण्याचें श्रुतीचें प्रयोजन नाहीं. श्रुतीचें मनोगत तसें असतें तर ' मी तेथें जाईन ' अशा अर्थाचे शब्दच तिनें उपयोजिलें नसतें.

पूर्वपक्षी—पण आत्मा या शब्दाचा श्रुतीनें उपयोग केला आहे तो ?

सिद्धान्ती—त्या शब्दाचा प्रत्यगात्मा हाच केवळ अर्थ श्रुतीला अभिप्रेत नाहीं. कारण, मम ( माझे ) हा षष्ठीचा संबंधार्थी प्रत्यय आणि ' हें ब्रह्म मीं पुढें होणार आहें ' या वाक्यानें होणारा कर्मकर्तृत्वाचा निर्देश, हे स्पष्ट सुचवितात, कीं आत्मा या शब्दाचा अर्थ प्रत्यगात्मा हाच नसून दुसरा कांहीं विशेष अर्थ येथें गर्भित आहे. सारांश, सगुण परमेश्वराच्या उपासनेचा हा प्रकरणभाग आहे.

ननु षष्ठेऽप्यथ संपत्स्य इति सत्संपत्तेः कालान्तरितत्वं दर्शयति । न आरब्धसंस्कारशेषस्थित्यर्थपरत्वात् । न कालान्तरितार्थता । अन्यथा तत्त्वमसीत्येतस्यार्थस्य बाधप्रसङ्गात् । यद्यप्यात्मशब्दस्य प्रत्यगर्थत्वं सर्वं खल्विदं ब्रह्मेति च प्रकृतमेष म आत्माऽन्तर्हृदय एतद्ब्रह्मेत्युच्यते, तथाऽप्यन्तर्धानमीषदपरित्यज्यैवैतमात्मानमितोऽस्माच्छरीरात्प्रेत्याभिसंभवितास्मीत्युक्तम् ।

पूर्वपक्षी—सहाव्या अध्यायांतही ' अथ संपत्स्ये ( मी पुढें हें स्वरूपधारण करीन )' असेंच म्हटलें आहे. 'स्वतःचें स्वरूप धारण करणार आहें,' हा प्रयोग भविष्यार्थी आहे. याचा 'आतां मी सत् नाहीं, पुढें सत् होईन ' असा अर्थ होतो. हा अर्थ जीवब्रह्मामध्यें भेद आहे, असें दाखवितो. सारांश, सहाव्या अध्यायामध्यें ही भेददृष्टि आहे, असें ठरते.

सिद्धान्ती—नाहीं, तुमचें म्हणणें यथार्थ नाहीं. ज्या कर्मानें सुखादि संस्काराला प्रारंभ झाला, त्या कर्माचा शेष आहे तोंपर्यंत भेद राहणार, पुढें भेद नाहीं, असा तुम्हीं उद्धृत केलेल्या वाक्याचा तात्पर्यार्थ आहे. परंतु तेथें कालभेदाची गति असत नाहीं. कालभेद असता, तर ' तें तूं आहेस ' या महावाक्याच्या सर्वकालीन अर्थाला बाध आला असता. तात्पर्य, सहाव्या

अध्यायांतील प्रकरण अभेदात्मक आहे. असो; यद्यपि आत्मशब्दाचा अर्थ 'प्रत्यगात्मा' असा आहे आणि सहाव्या अध्यायांत 'हें सर्व ब्रह्म आहे' या प्रकरणांत प्रत्यगात्मपर अर्थ मात्र स्थित होणार. तसेंच यद्यपि 'हा माझा दहराकाशांतील आत्मा ब्रह्मरूप आहे' असें येथेंही म्हटलें आहे. तथापि त्याचें अंतर्हितत्त्व यत्किंचित्‌हीं परित्यक्त न करितां 'ह्या शरीरापासून मुक्त झाल्यानंतर ह्या आत्म्याप्रत मीं जाऊन पोहोंचेन, मी हा आत्मा होईन' असें म्हटलें आहे, यावरून येथील श्रुतीचा अर्थ सगुण परमात्म्याच्या उपासनापर असला पाहिजे. सगुण उपासनेचें हें प्रकरण आहे. तात्पर्य, सहाव्या अध्यायांत यद्यपि ब्रह्मात्मैक्य-सिद्धांत सांगितला आहे. येथेंही यद्यपि आत्मा—शब्दाचा प्रत्यगात्मा असाच अर्थ आहे व 'हें सर्व ब्रह्म आहे' असाच प्रतिपाद्य विषय आहे, हें यद्यपि 'हा माझा दहराकाशांतील आत्मा परब्रह्म आहे' या वाक्यानें ठरतें, तथापि प्रकरणश्रुतीपेक्षां लिंगात्मकश्रुतींचें प्राबल्य विशेष असतें; (१) म्हणून माझें दहराकाशस्थत्व न सोडतां, (२) व 'मी येथून गेल्यावर परलोकीं परब्रह्म होईन' इत्यादि लिंगश्रुती सगुणब्रह्माची आराधना मुमुक्षूनें करावी, असें स्पष्ट सुचवितात. हें उपासना—प्रकटन आहे, हें विसरूं नये.

यथाक्रतुरूपस्याऽत्मनः प्रतिपत्ताऽस्मीति यस्यैवंविदः स्याद्धवेद्धा सत्यमेवं स्यामहं प्रेत्यैवं न स्यामिति न च विचिकित्साऽस्तीत्येतस्मिन्नर्थे क्रतुफलसंबन्धे स तथैवेश्वरभावं प्रतिपद्यते विद्वानित्येतदाह स्मोक्तवान्किल शाण्डिल्यो नामर्षिः। द्विरभ्यास आदरार्थः ॥ ४ ॥

इति तृतीयाध्यायस्य चतुर्दशः खण्डः ॥ १४ ॥

सिद्धान्ती—'जसा माझा क्रतु, (अध्यवसाय, निश्चय, अंतिम ध्येय) असेल तशा आत्मस्वरूपाप्रत मी जाईन' असें ज्याला यथार्थ ज्ञानविज्ञान झालें, त्याला कोणत्याही प्रकारचा संशय राहत नाहीं. 'मी प्रेतरूप झाल्यावर त्या स्वरूपाकडे जाईन खास, हें खरें; किंवा जाणार नाहीं हें खरें' असा संशय नसल्यामुळें त्याला विचिकित्सा किंवा मीमांसा करण्याचें कारण पडत नाहीं. क्रतु आणि फल यांच्यामध्यें जो नित्य संबंध आहे, त्याच्या सत्यत्वाविषयीं ज्ञानविज्ञानी पुरुष निःशंक असतो. अर्थात् त्याला त्याच्या श्रद्धानिश्चयानुसार ईश्वरस्थिति प्राप्त होते. असो; हा सर्व निर्णायक सिद्धांत शांडिल्य नामक ऋषीनें सांगितला आहे. शांडिल्य ऋषीचें दोनदां नांव आलें आहे, तें क्रतुफलसंबंधविषयाविषयीं आदर सुचविण्यासाठीं आहे. 'जसा क्रतु तसें फल' हा न्याय

नित्यसिद्ध आहे, हें दाखविण्यासाठीं शांडिल्य ऋषीच्या नांवाचा दोनदां उच्चार केला आहे ॥ ४ ॥

चौदावा खंड समाप्त.

## खंड पंधरावा.

अस्य कुले वीरो जायत इत्युक्तम् । न वीरजन्ममात्रं पितुस्त्राणाय । "तस्मात्पुत्रमनुशिष्टं लोक्यमाहुः" इति श्रुत्यन्तरात् । अतस्तद्दीर्घायुष्ट्वं कथं स्यादित्येवमर्थं कोशविज्ञानारम्भः । अभ्यार्हितविज्ञानव्यासङ्गादनन्तरमेव नोक्तं तदिदानीमेवाऽऽरभ्यते—

**सिद्धान्ती**—'त्याच्या कुलामध्यें वीर उत्पन्न होतो' इत्यादि भाग मागेंच सांगितला आहे. ( पहा अ० ३ खं० १३ मं० ६ ). पण वीराचा जन्म होण्यानें मात्र पित्याचें संरक्षण होत नाहीं.

**पूर्वपक्षी**—कशावरून ?

**सिद्धान्ती**—"ब्रह्मद्रष्टे ब्राह्मण म्हणतात कीं, वेदाध्ययन झालेला पुत्र पित्याचें लोकहित करितो; म्हणजे पित्याला जे लोक प्राप्त होणें इष्ट आहे, ते लोक त्याला मिळतील, असे सत्पुत्राचें अध्ययनशील आणि धर्मपर वर्तन असतें. ( पहा बृ० अ० १ ब्रा० ५ मं० १७ )" ही श्रुति, पुत्राला दीर्घ आयुष्य असलें पाहिजे, असें स्पष्ट सुचविते. तात्पर्य, वीरपुत्र होण्यानें मात्र पितृहित होत नाहीं. पुत्राच्या अध्ययनानें आणि सत्कर्मानें पितृहित होतें. अध्ययन व सदाचरण साधण्याला दीर्घ आयुष्य अवश्य आहे. तेव्हां पुत्राला दीर्घायुष्य कसें प्राप्त होईल, हें समजून देण्यासाठीं श्रुतीनें ह्या पंधराव्या खंडाचा अवतार केला आहे. या खंडांत कोशविज्ञान सांगितलें आहे.

**पूर्वपक्षी**—पुत्रजन्माची गोष्ट सांगितली, तेव्हांच हें कोशविज्ञान कां सांगितलें नाहीं ?

**सिद्धान्ती**—ज्योतिश्चिन्हानें अनुमित होणाऱ्या गायत्रि-परिच्छिन्न ब्रह्मोपासनेचें मनोमयत्वादि गुणविशिष्ट ब्रह्मोपासना हें अंतरंग आहे. अर्थात् अंतरंग सांगितल्याव्यतिरिक्त कोशविज्ञान सांगणें युक्त नव्हे. एतदर्थ तेथें कोशविज्ञान सांगितलें नाहीं. अंतरंगाच्या विज्ञानाचा व्यासंग (दृढ अभ्यास) मागच्या खंडांत सांगितला; आणि नंतर आतां या पंधराव्या खंडांत सत्पुत्राला दीर्घायुष्य देणाऱ्या कोशविज्ञानाचें प्रकरण सांगितलें आहे. ऐका:—

## मंत्र पहिला.

**अन्तरिक्षोदरः कोशो भूमिबुध्नो न जीर्यति दिशो ह्यस्य स्त्रक्तयो द्यौरस्योत्तरं बिलꣳ स एष कोशो वसुधानस्तस्मिन्विश्वमिदꣳश्रितम् ॥ १ ॥**

अन्वय व अर्थः—**अंतरिक्षोदरः कोशः** ( अंतरिक्ष आहे उदर ज्याचें असा हा कोश आहे ) **भूमिबुध्नः** ( याचा तळ–बुड–भूमि आहे ) **न जीर्यति** ( याचा विनाश केव्हांही होत नाहीं ) **अस्य हि दिशः स्रक्तयः** ( या कोशाचे सर्व कोण–कोपरे–दिशा होत ) **अस्य द्यौः उत्तरं बिलं** ( याचें वरील मुख ( बीळ ) द्युलोक होय ) **सः एषः कोशः वसुधानः** ( हा कोश संपत्तिपूर्ण असतो ) **तस्मिन् इदं विश्वं श्रितं** ( त्यामध्यें हें सर्व विश्व राहिलें आहे ) येथें कोशाचें वर्णन आहे ॥ १ ॥

अन्तरिक्षमुदरमन्तःसुषिरं यस्य सोऽयमन्तरिक्षोदरः कोशः कोश इवानेकधर्मसादृश्यात्कोशः। स च भूमिबुध्नो भूमिर्बुध्नो मूलं यस्य स भूमिबुध्नो। न जीर्यति न विनश्यति त्रैलोक्यात्मकत्वात्। सहस्रयुगकालावस्थायी हि सः। दिशो ह्यस्य सर्वाः स्रक्तयः कोणाः। द्यौरस्य कोशस्योत्तरमूर्ध्वं बिलं। स एष यथोक्तगुणः कोशो वसुधानो वसु धीयतेऽस्मिन्प्राणिनां कर्मफलाख्यमतो वसुधानः। तस्मिन्नन्तार्विश्वं समस्तं प्राणिकर्मफलं सह तत्साधनैरिदं यद्गृह्यते प्रत्यक्षादिप्रमाणैः श्रितमाश्रितं स्थितमित्यर्थः ॥ १ ॥

**सिद्धान्ती**—अंतरिक्ष आहे उदर ( आंतील छिद्र ) ज्याचें, तो अंतरिक्षोदर होय. हा सर्व भुवर्लोक ह्या कोशाचें उदर आहे.

**शिष्य**—याला कोश असें कां नांव दिलें !

**सिद्धान्ती**—कारण, कोशाचे अनेक धर्म त्याचेठिकाणीं आहेत. तो कोशासारखा आहे ( तरवारीचें म्यान हा जसा तरवारीचा कोश, तसा हा कोश आहे ) असो; पहा; भूमि म्हणजे पृथिवी हें याचें मूळ ( बूड ) आहे. याचा नाश केव्हांही होत नाहीं; कारण हा कोश म्हणजे त्रैलोक्याचा आत्मा आहे व हा कोश हजारो युगांच्या अंतापर्यंत राहणारा आहे. दशदिशा त्याचे निरनिराळे कोण, म्हणजे कोपरे आहेत. ह्या कोशाचे वरील तोंड द्युलोक हें होय. याप्रमाणें

बुध्न म्हणजे बुड ( मूळ ) असणारा, कोपरे असणारा, वरचें तोंड असणारा आणि पुष्कळ दिवस टिकणारा पदार्थ म्हणजे कोशच ! असें नव्हे तर काय ?

**शिष्य**—तथापि कोश म्हणजे काय हें मला समजलें नाहीं.

**सिद्धान्ती**—कोश म्हणजे सुवर्ण, रत्नें इत्यादि ठेवण्याची मंजूषा म्हणजे पेटी. असो; या पेटींत म्हणजे मंजूषेंत अनेकप्रकारची संपत्ति ठेवलेली असते.

**शिष्य**—ही संपत्ति कोणती ?

**सिद्धान्ती**—प्राणी या कर्मलोकांत जें काय कर्म करितात, त्याच्यापासून उत्पन्न होणारें फल या पेटींत सांठविलेलें असते. हेंच वसु म्हणजे धन होय. या कोशांत हें आतांच सांगितलेलें सर्व विश्व म्हणजे सर्व प्राणिकर्मफल साधनांसह सांठविलेलें असतें.

**शिष्य**—हें म्हणजे आपल्यास दृश्य असणारें ?

**सिद्धान्ती**—दृश्यच काय ? पण अनुमानानें किंवा शब्दादि–प्रमाणानें सिद्ध होणारें सर्व कर्मफल अदृष्टरूपानें येथें संचित झालेलें असतें. असो; त्रैलोक्याचा आत्मा असणारा तो या मंत्रांत सांगितलेला कोश होय. तेव्हां त्रैलोक्यात्मा हा कोश, भूमि ही ह्या कोशाचा खालचा तळ, दिशा त्याचे कोण, द्युलोक या कोशाचे ऊर्ध्व बिल आणि कर्मफल ही संपत्ति, अशी दृष्टि ठेऊन ध्यान करावयाचें आहे. हा कोश अविनाशी आहे, असें म्हटलें तें केवळ व्यवहाराच्या दृष्टीनें होय. कोशाचें ध्यान करावयास सांगितलें आहे, यावरूनच त्याला परब्रह्माचें नित्य अविनाशित्व नाहीं, हें समजतें. असो; या पद्धतीनें पुत्रास दीर्घायुष्य मिळण्यासाठीं या कोशाचें ध्यान करावयाचें आहे ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**तस्य प्राची दिग्जुहूर्नाम सहमाना नाम दक्षिणा राज्ञी नाम प्रतीची सुभूता नामोदीची तासां वायुर्वत्सः स य एतदेवं वायुं दिशां वत्सं वेद न पुत्ररोदꣳ रोदिति सोऽहमेतमेवं वायुं दिशां वत्सं वेद मा पुत्ररोदꣳ रुदम् ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः—तस्य प्राची दिक् जुहूः नाम** ( या कोशाची पूर्व दिशा ही ‘जुहूः’ म्हणजे जिह्वा नांवाचा कोण आहे ) **दक्षिणा सह-**

**माना नाम, प्रतीची राज्ञी नाम, उदीची सुभूता नाम** ( दक्षिण दिशा ' सहमाना ' या नांवाची, पश्चिम दिशा ' राज्ञी ' नांवाची, उत्तर दिशा सुभूता नामाची असते ) **तासां वायुः वत्सः** ( या दिशांचा वायु हा वत्स म्हणजे पुत्र आहे ) **यः एवं एतं वायुं दिशां वत्सं वेद, सः पुत्ररोदं न रोदति** ( ज्याला आतां सांगितल्याप्रमाणें हा वायु दिशांचा पुत्र आहे असें समजतें, त्याला पुत्रनिमित्त रोदन करण्याचें कारण पडत नाहीं ) **अहं एवं एतं वायुं दिशां वत्सं वेद, सः अहं पुत्ररोदं मा रुदं** ( मलाही दिशांचा पुत्र हा वायु आहे असें समजलें आहे, म्हणून पुत्रनिमित्त रडण्याचें मला कारण नाहीं ) ॥ २ ॥

तस्यास्य प्राची दिक्प्राग्गतो भागो जुहूर्नाम । जुह्वत्यस्यां दिशि कर्मिणः प्राङ्मुखाः सन्त इति जुहूर्नाम । सहनामा नाम सहन्तेऽस्यां पापकर्मफलानि यमपुर्यां प्राणिन इति सहमाना नाम दक्षिणा दिक् । तथा राज्ञी नाम प्रतीची पश्चिमा दिग्राज्ञी राज्ञा वरुणेनाधिष्ठिता संध्यारागयोगाद्वा । सुभूता नाम भूतिमद्भिरीश्वरकुबेरादिभिरधिष्ठितत्वात्सुभूता नामोदीची । तासां दिशां वायुर्वत्सो दिग्जत्वाद्वायोः । पुरोवात इत्यादिदर्शनात् । स यः कश्चित्पुत्रदीर्घजीविताथ्र्येवं यथोक्तगुणं वायुं दिशां वत्समभृतं वेद स न पुत्ररोदं पुत्रनिमित्तं रोदनं न रोदिति, पुत्रो न म्रियत इत्यर्थः । यत एवं विशिष्टं कोशदिग्वत्सविषयं विज्ञानमतः सोऽहं पुत्रजीविताथ्र्येवमेव वायुं दिशां वत्सं वेद जाने । अतो मा पुत्ररोदं [ रुदं ] मा रुदं पुत्रमरणनिमित्तम् । पुत्ररोदो मम मा भूदित्यर्थः ॥ २ ॥

**सिद्धान्ती**—या मंत्रांत दिशांचें आंतर विभाग नामांसह सांगितले आहेत. ऐका: या कोशाच्या पूर्वदिशेकडील भागाचे नांव जुहू हें आहे. कर्म करणारे लोक प्राङ्मुख होऊन ( पूर्वेकडे तोंड करून ) आहुति देतात, हवन करितात, म्हणून या दिशेचें जुहु हें नांव आहे.

**शिष्य**—'हु' हवन करणें हा जुहूचा मूळ शब्द आहे. म्हणून पूर्वेला जुहू असें नांव मिळालें. याच प्रमाणें दक्षिणदिशेस असणाऱ्या यमपुरीमध्यें सर्व प्राण्यांस आपापली पापकर्मफलें भोगावीं लागतात, म्हणून दक्षिण दिशेला ' सहमाना ' हें

नांव मिळालें असावें. तसेंच वरुणराजाचें स्वामित्व पश्चिम दिशेचें आहे म्हणून त्याच्या राणीला म्हणजे पश्चिमेला राज्ञी हें नांव मिळालें असावें ?

सिद्धान्ती—ठीक आहे. शिवाय संध्याकाळच्या वेळीं ही दिशा सौभाग्यवती स्त्रियाप्रमाणें रक्त रंग धारण करिते; म्हणूनही पश्चिमेला राज्ञी हें योग्य उपपद मिळालें आहे. आतां उत्तरदिशेकडे कुबेरादि संपन्नदेवांचें स्वराज्य आहे, म्हणून या दिशेला सुभूता ( सुसंपन्न ) असें नांव श्रुतीनें दिलें आहे. असो; या जुहु, सहमाना, राज्ञी आणि सुभूता या चारी दिशांचा वायु हा पुत्र आहे. दिशांपासूनच याची उत्पत्ति आहे, म्हणून हा दिक्पुत्र होय.

पूर्वपक्षी—कशावरून ?

सिद्धान्ती—आपण व्यवहारांत पुरोवात (पूर्वेचा वायु) इत्यादि शब्द उपयोजितों, हें तुम्हांसही ठाऊक असावें. याप्रमाणें सर्व दिशांचा पुत्र जो वायु तो अमृत आहे, असें ज्या पुरुषाला—

शिष्य—कोणता हा पुरुष ?

सिद्धान्ती—आपल्याला दीर्घायुषि पुत्र असावा, अशी इच्छा धारण करणारा पुरुष जर दिक्पुत्र जो अमृत वायु याची ज्ञानपूर्वक उपासना करील, तर मात्र त्याला पुत्रनिमित्त शोक करण्याचें कारण पडणार नाहीं !

शिष्य—अर्थात् ह्या वायूपासकाचें उपासनाफल जिवंत आहे, तोंपर्यंत त्याचा पुत्र मरणार नाहीं, असें होतें.

सिद्धान्ती—असो; "मागच्या मंत्रांत सांगितलेल्या कोशाचे पूर्व-पश्चिमेकडील भागांपासून अमृतवायु निर्माण होतो, असें ज्ञान मला झालें आहे—

शिष्य—मला म्हणजे अमरवायूची उपासना करणाऱ्या व पुत्राला दीर्घ आयुष्य असावें, अशी इच्छा धारण करणाऱ्या उपासक जीवाला ?

सिद्धान्ती—ठीक आहे. एवं गुणवायूची ज्ञानपूर्वक उपासना करणाऱ्या मला पुत्रशोकानें रडत बसण्याचा प्रसंग न येवो अशी मी त्या अमृतरूपी वायूची उपासना करून मागणें मागतों." अर्थात् हें उपासकाचें म्हणणें आहे ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**अरिष्टं कोशं प्रपद्येऽमुनाऽमुनाऽमुना प्राणं प्रपद्येऽमुनाऽमुनाऽमुना भूः प्रपद्येऽमुनाऽमुनाऽमुना भुवः प्रपद्येऽमुनाऽमुनाऽमुना स्वः प्रपद्येऽमुनाऽमुनाऽमुना ॥३॥**

**अन्वय व अर्थः—अमुना, अमुना, अमुना अरिष्टं कोशं प्रपद्ये** ( त्या, त्या, त्या पुत्रासाठीं मी अविनाशी कोशाला शरण जातों ) **अमुना, अमुना, अमुना, प्राणं प्रपद्ये; अमुना, अमुना, अमुना भूः प्रपद्ये; अमुना, अमुना, अमुना भुवः प्रपद्ये; अमुना, अमुना, अमुना स्वः प्रपद्ये** ( त्या, त्या, त्या पुत्रासाठीं प्राणाला, भूलोकाला, भूवर्लोकाला व स्वर्लोकाला शरण जातों ) ॥ ३ ॥

अरिष्टमविनाशिनं कोशं यथोक्तं प्रपद्ये प्रपन्नोऽस्मि पुत्रायुषे । अमुनाऽमुनाऽमुनेति त्रिर्नाम गृह्णाति पुत्रस्य । तथा प्राणं प्रपद्येऽमुनाऽमुनाऽमुना भूः प्रपद्येऽमुनाऽमुनाऽमुना भुवः प्रपद्येऽमुनाऽमुनाऽमुना स्वः प्रपद्येऽमुनाऽमुनाऽमुना, सर्वत्र प्रपद्ये इति त्रिर्नाम गृह्णाति पुनः पुनः ॥ ३ ॥

**सिद्धान्ती**—मागच्या मंत्रांत प्रधान उपसना सांगितली. दिक्पुत्र जो वायु त्याची उपासना तेथें सांगितली. ह्या मंत्रांत तदंग जप सांगितला आहे, तो असा–त्या माझ्या पुत्राला दीर्घायुष्य प्राप्त व्हावें, म्हणून मी अविनाशी कोशाला म्हणजे कोशाचा आकार धारण करणाऱ्या त्रैलोक्याच्या आत्म्याला शरण जातों.

**शिष्य**—‘ अमुना ’ या पदाची तीनदां आवृत्ति कां केली आहे ?

**सिद्धान्ती**—एक तर उत्कट इच्छा असते, म्हणून पिता अनेक वेळ पुत्राचें नाम ग्रहण करितों. पुत्राला दीर्घायुष्य असावें, असें फार जोरानें वाटत असलें, म्हणजे अनेक वेळ नामग्रहण होईल, यांत शंका नाहीं. तसेंच कुल, पितृनाम आणि पुत्रनाम आपण व्यवहारांत उपयोजितों. अमक्या कुलांत जन्मलेला, अमक्याचा पुत्र अमुक, इतका विस्तार सांगितला, म्हणजे निश्चियत्वानें विवक्षित पुरुषाची ओळख पटते. तसेंच स्थूल, सूक्ष्म आणि कारण हे तीन देह आहेत म्हणूनही श्रुतीनें तीनदां उच्चार केला आहे. असो, या प्रमाणें तीनतीनदां उच्चार करून पिता प्राणाला व भूर्भुवादि तिन्ही लोकांला शरण जाण्याचा मंत्र जपत असतो. किंवा इतक्यावेळां पुत्रास दीर्घायुष्य चिंतिणाऱ्या पित्यानें जप करावा, अशी श्रुतीची आज्ञा आहे.

**शिष्य**—उपाय दाखविणें, उपाय प्राप्त झाला आहे, हें दाखविणें व निमित्त सांगणें याही तीन कारणांसाठीं पित्यानें पुत्र–नामाचा उच्चार त्रिवार करावा, असाही श्रुतीचा अभिप्राय असेल ?

**सिद्धान्ती**—ठीक आहे ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा.

**स यदवोचं प्राणं प्रपद्य इति प्राणो वा इदꣳ सर्वं भूतं यदिदं किंच तमेव तत्प्रापत्सि ॥ ४ ॥**

अन्वय व अर्थः—**सः ' प्राणं प्रपद्ये ' इति यत् अवोचं** (प्राणाला शरण जातों, असें जें मी म्हणतों, त्याचें रहस्य पहा ) **यत् इदं सर्वं भूतं, इदं किंच, प्राणः वै** ( जें येथें स्थावर जंगम दृश्य आहे, जें सर्व कांहीं आहे, तें प्राणच होय ) **तं एव तत् प्रापत्सि** ( ' त्या सर्वांचा मी प्राणशरण झाल्यामुळें मला अधिगम होईल, तें सर्व मला मिळेल ' असा मी प्राणाला शरण जातों या पदाचा अर्थ आहे ॥ ४ ॥

स यदवोचं प्राणं प्रपद्य इति व्याख्यानार्थमुपन्यासः प्राणो वा इदꣳ सर्वं भूतं यदिदं जगत् यथा वाऽरा नाभावाति वक्ष्यति । अतस्तमेव सर्वं तत्तेन प्राणप्रतिपादनेन प्रापत्सि प्रपन्नोऽभूवम् ॥४॥

सिद्धान्ती—' येथील ' सः ' म्हणजे वक्ता, मंत्रजप करणारा. त्याचें हें बोलणें आहे. मी प्राणाला शरण जातों ' असा पुत्राला दीर्घायुष्य चिंतिणारा ज्ञानी उपासक जप करितो. त्याचा अभिप्राय काय आहे तो पहा: हें सर्व भूतमय जगत् प्राणरूप आहे. ' नाभीमध्यें म्हणजे चाकाच्या तुंब्यामध्यें जशा अरा असतात, त्याप्रमाणें हें सर्व जगत् प्राणामध्यें समर्पित झालेलें आहे.' ( अ० ७ खं० १५ मं० १ पहा ) ही श्रुति प्रमाण आहे. म्हणून प्राणाच्या प्रतिपादनानें म्हणजे उपासनेनें मला हें सर्व जगत् प्राप्त होईल, प्राणाप्रमाणेंच मी व माझा पुत्र सर्वात्मे होऊं, हें या जपमंत्राचें तात्पर्य आहे ) ॥ ४ ॥

---

## मंत्र पांचवा.

**अथ यदवोचं भूः प्रपद्य इति पृथिवीं प्रपद्येऽन्तरिक्षं प्रपद्ये दिवं प्रपद्य इत्येव तदवोचम् ॥ ५ ॥**

अन्वय व अर्थः—**अथ ' भूः प्रपद्ये ' इति यत् अवोचं; ' पृथिवीं प्रपद्ये,' ' अंतरिक्षं प्रपद्ये,' ' दिवं प्रपद्ये ' इति एव तत् अवोचं** ( भूलोकाला शरण जातों, असें मीं म्हटलें, त्याचा **अर्थ मी**

पृथ्वीला शरण जातों, अंतरिक्षाला शरण जातों, आणि स्वर्गाला शरण जातों, असा आहे ) ॥ ५ ॥

तथा भूः प्रपद्य इति त्रीँल्लोकान्भूरादीन्प्रपद्य इति तदवोचम् ॥ ५ ॥

सिद्धान्ती—'पृथ्वीला शरण जातों' इत्यादि उपासक म्हणतो, त्याचा अर्थ भूर्भुवादि तिन्ही लोकांस शरण जातो असा आहे ॥ ५ ॥

---

## मंत्र सहावा.

**अथ यदवोचं भुवः प्रपद्य इत्यग्निं प्रपद्ये वायुं प्रपद्य आदित्यं प्रपद्य इत्येव तदवोचम् ॥ ६ ॥**

**अन्वय व अर्थः**—अथ 'भुवः प्रपद्ये' इति यत् अवोचं, तत् 'अग्निं प्रपद्ये, 'वायुं प्रपद्ये,' आदित्यं प्रपद्ये' इति एव अवोचं ( भुवर्लोकाला शरण जातों, असें मीं म्हटलें, त्याचा अर्थ अग्नि, वायु आणि आदित्य ह्या भूर्भुवादि लोकांच्या **स्वामींस** शरण जातों असा आहे ) ॥ ६ ॥

अथ यदवोचं भुवः प्रपद्य इत्यग्न्यादीन्प्रपद्य इति तदवोचम् ॥ ६ ॥

सिद्धान्ती—' भुवर्लोकाला शरण जातों ' या माझ्या म्हणण्याचा अर्थ मी अग्निप्रमुख देवांस शरण जातों, असा आहे ॥ ६ ॥

---

## मंत्र सातवा.

**अथ यदवोचꣳ स्वः प्रपद्य इत्यृग्वेदं प्रपद्ये यजुर्वेदं प्रपद्ये सामवेदं प्रपद्य इत्येव तदवोचं तदवोचम् ॥ ७ ॥**

**इति तृतीयाध्यायस्य पञ्चदशः खण्डः ॥ १५ ॥**

**अन्वय व अर्थः**—अथ 'स्वः प्रपद्ये' इति यत् अवोचं, तत् 'ऋग्वेदं प्रपद्ये' 'यजुर्वेदं प्रपद्ये' 'सामवेदं प्रपद्ये' इति एव तत् **अवोचं** ( आतां 'स्वर्गलोकाला शरण जातों ' असें मीं म्हटलें, त्याचा अर्थ ऋग्वेदाला शरण जातों, यजुर्वेदाला शरण जातों व सामवेदाला

शरण जातों, असा आहे. भूर्भुवादि तिन्ही लोकांचे ऋग्वेदादि तिन्ही वेद मंत्रप्रतिष्ठापक आहेत ) ॥ ७ ॥

अथ यदवोचं स्वः प्रपद्य इत्यृग्वेदादीन्प्रपद्य इत्येव तदवोचमिति । उपरिष्टान्मन्त्राञ्जपेत्ततः पूर्वोक्तमजरं कोशं सदिग्वत्सं यथावद्ध्यात्वा । द्विर्वचनमादरार्थम् ॥ ७ ॥

इति तृतीयाध्यायस्य पञ्चदशः खण्डः ॥ १५ ॥

सिद्धान्ती—आतां 'स्वर्गाला शरण जातों' असा मीं जो जप केला, त्याचा अर्थ भी ऋग्वेदादि तिन्ही वेदांस शरण जातों, असा आहे. असो; याप्रमाणें वर सांगितलेल्या मंत्रांचा जप उपासकानें करावा; अर्थात् मागें जी कोशोपासना सांगितली, ती साध्य झाल्यानंतर या खंडांत सांगितलेल्या मंत्राचा जप करावयाचा आहे, आणि आतांच सांगितलेला अमृत कोश आणि दिशापुत्र अमरवायु यांचें यथार्थ ध्यान करून मग या मंत्राचा जप करावयाचा आहे. मंत्रांतील द्विरावृत्ति आदरार्थ आहे, हें तुम्हांस समजलेंच आहे ॥ ७ ॥

पंधरावा खंड संपला.

---

## खण्ड सोळावा.

पुत्रायुष उपासनमुक्तं जपश्च । अथेदानीमात्मनो दीर्घजीवनायेदमुपासनं जपं च विदधदाह । जीवन्हि स्वयं पुत्रादिफलेन युज्यते नान्यथा । इत्यत आत्मानं यज्ञं संपादयति—

**सिद्धान्ती**—पुत्र दीर्घायुषी असावा, यासाठीं पित्यानें जी उपासना करावयाची, ती मागच्या खंडांत जपासह सांगितली. आतां या खंडांत आपल्या स्वतःला दीर्घ आयुष्य देणारी उपासना व जप हीं सांगावयाचीं आहेत. कारण उघड आहे कीं पुरुष ( पिता ) जिवंत राहिला, तर मात्र पुत्रादि फलें पहावयाला मिळतात, अन्यथा नाहीं, म्हणून आत्मस्वरूपी यज्ञ कसा संपादन करावा तें प्रथम सांगतात—

## मंत्र पहिला.

**पुरुषो वाव यज्ञस्तस्य यानि चतुर्विं॰शतिवर्षाणि तत्प्रातःसवनं चतुर्विं॰शत्यक्षरा गायत्री गायत्रं प्रातःसवनं तदस्य वसवोऽन्वायत्ताः प्राणा वाव वसव एते हीद॰ सर्वं वासयन्ति ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—पुरुषः वाव यज्ञः** ( पुरुष, हा खरोखर यज्ञस्वरूपी आहे ) **यानि चतुर्विंशतिवर्षाणि, तत् तस्य प्रातःसवनं** ( पुरुषाची जीं पहिलीं चोवीस वर्षें आहेत, तीं पुरुषयज्ञाचें प्रातःसवन होय ) **चतुर्विंशत्यक्षरा गायत्री; गायत्रं प्रातःसवनं** ( गायत्री चोवीस-अक्षरांची आहे, तिचा गायत्री हा छंद आहे आणि प्रातःकालीं जो यज्ञ करावयाचा असतो, त्याला प्रातःसवन म्हणतात आणि तें सवन चोवीस-अक्षरी गायत्रीछंदानेंच होतें ) **तत् अस्य वसवः अन्वायत्ताः** ( त्या ह्या पुरुषयज्ञाच्या प्रातःसवनकालीं अष्टवसु अनुगत होतात, प्राप्त होतात. ) **प्राणाः वाव वसवः** ( कारण प्राण हेच वसु आहेत ) **हि एते इदं सर्वं वासयंति** ( कारण हे प्राण या सर्वाला स्थिति देतात ) सारांश, पुरुष हा यज्ञ, पहिली चोवीस वर्षें हें प्रातःसवन, प्राण हे वसु, याप्रमाणें पुरुषयज्ञाची सामग्री सिद्ध होते ॥ १ ॥

पुरुषः पुरुषो जीवनविशिष्टः कार्यकरणसंघातो यथाप्रसिद्ध एव । वावशब्दोऽवधारणार्थः । पुरुष एव यज्ञ इत्यर्थः ।

**सिद्धान्ती**—पुरुष हाच एक यज्ञ आहे.

**पूर्वपक्षी**—सामान्यतः पुरुष यज्ञकर्ता असतो. तेव्हां श्रुतीनें यज्ञकर्त्याला यज्ञरूप काय म्हणून द्यावें बरें ?

**सिद्धान्ती**—पुरुष म्हणजे जीवनविशिष्ट कार्यकारण-संघात आहे. इंद्रियें, अवयव, मन, बुद्धि, प्राण, इत्यादि साधनांनीं सिद्ध होणारा जो कार्यकारण-संघात, त्यामध्यें आत्मप्रवेश झाला म्हणजे जीवत्व प्राप्त होतें, हें प्रसिद्ध आहे.

तथा हि सामान्यैः संपादयति यज्ञत्वम् । कथम् । तस्य पुरुषस्य यानि चतुर्विंशतिवर्षाण्यायुषस्तत्प्रातःसवनं पुरुषाख्यस्य

यज्ञस्य । केन सामान्येनेत्याह–चतुर्विंशत्यक्षरा गायत्री छन्दो गायत्रं गायत्रीछन्दस्कं हि विधियज्ञस्य प्रातःसवनम् । अतः प्रातःसवनसंपन्नेन चतुर्विंशतिवर्षायुषा युक्तः पुरुषः । अतो विधियज्ञसादृश्याद्यज्ञः । तथोत्तरयोरप्यायुषोः सवनद्वयसंपत्तिस्त्रिष्टुब्जगत्यक्षरसंख्यासामान्यतो वाच्या ।

पूर्वपक्षी—तें असेल पण पुरुष हा यज्ञ कसा ? तें आधीं सांगा ?

**सिद्धान्ती**—ठीक आहे. पुरुष आणि यज्ञ या उभयतांमध्यें सामान्यत्वानें असणाऱ्या अनेक गोष्टी आहेत. पहाः पुरुषाच्या आयुष्याचीं जीं पहिलीं चोवीस वर्षें असतात, तीं पुरुषयज्ञाचें प्रातःसवनरूप होतात—

**पूर्वपक्षी**—हें श्रुति म्हणते, म्हणूनच कीं काय ?

**सिद्धान्ती**—हेंच केवळ कारण नव्हे. श्रुतिप्रणीत यज्ञसमारंभामध्यें प्रातःकालीं शास्त्रोक्त–मार्गानें दोहन करून सोमरस काढतात; आणि तो अग्निप्रमुख देवांस अर्पण करितातः ह्याला ‘ प्रातःसवन ’ असें म्हणतात. हें सवन गायत्रीछंदानें होतें. गायत्री चोवीस अक्षरांची असते. म्हणून पुरुषाचीं पहिलीं चोवीस वर्षें प्रातःसवनरूप होतात, अशी भावना ठेवणें इष्ट आहे. अर्थात् पहिल्या चोवीस वर्षांनीं युक्त असलेला पुरुष चोवीसअक्षरी गायत्रीच्या साह्यानें होणाऱ्या प्रातःसवनाच्या रूपाचा होतो. हें असें विहित केलेल्या यज्ञांतील प्रातःसवनाचें सादृश्य पुरुषाच्या पहिल्या चोवीस वर्षांशीं आहे, म्हणून हीं पहिलीं चोवीस वर्षें म्हणजे ज्योतिष्टोमादि यज्ञांतील प्रातःसवन होत. अर्थात् प्रातःसवन–सादृश्यानें पुरुषही तत्स्वरूप होतो. तसेंच, चोवीस वर्षांनंतरचें जें त्याचें आयुष्य तेंही माध्याह्नसवन आणि सायंसवन–स्वरूपाचें होतें.

पूर्वपक्षी—हें कशावरून ?

**सिद्धान्ती**—कारण, माध्याह्न–सवनाला अवश्य असणारीं स्तोत्रें चव्वेचाळीस अक्षरांचीं असतात व त्यांचा छंद त्रिष्टुभ् असतो. तसेंच सायंसवनाला अवश्य असणारीं स्तोत्रें जगती–वृत्तांत असून त्यांची अक्षरसंख्या अठ्ठेचाळीस असते. पुरुषाच्या आयुष्याचा मध्यभाग व अंत्यभाग चव्वेचाळीस आणि अठ्ठेचाळीस वर्षांचें, असें कल्पिलेलें आहे. हें अक्षरांचें आणि वर्षांचें साम्य आहे; म्हणून पुरुषाच्या आयुष्याचे तीन भाग यज्ञांतील तिन्ही भागांशीं सदृश होतात. विहित असलेल्या प्रातःसवनादि यज्ञांगांशीं जर पुरुषाच्या आयुष्यांतील भागांचें असें सादृश्य आहे, तर पुरुषही यज्ञस्वरूपी आहे, असें म्हणावयास नको काय ? याप्रमाणें पहिल्या चोविस वर्षांवर उपासकानें प्रातःसवन–दृष्टी ठेवावी आणि दुसऱ्या

चव्वेचाळीस वर्षांवर व तिसऱ्या अठ्ठेचाळीस वर्षांवर बाकीच्या सवनद्वयांची दृष्टि अनुक्रमें ठेवावी. एतावता २४+४४+४८=११६ वर्षें पुरुषाचें पूर्णायुष्य असतें व तो त्रिसवनालंकृत यज्ञस्वरूप होतो, असें झालें.

**किंच तदस्य पुरुषयज्ञस्य प्रातःसवनं विधियज्ञस्येव वसवो देवा अन्वायत्ता अनुगताः। सवनदेवतात्वेन स्वामिन इत्यर्थः। पुरुषयज्ञेऽपि विधियज्ञ इवाग्न्यादयो वसवो देवाः प्राप्ता इत्यतो विशिनष्टि—प्राणा वाव वसवो वागादयो वायवश्च। ते हि यस्मादिदं पुरुषादिप्राणिजातमेते वासयन्ति। प्राणेषु हि देहे वसत्सु सर्वमिदं वसति नान्यथा। इत्यतो वसनाद्वासनाच्च वसवः॥ १॥**

**सिद्धान्ती**—आणखी साम्य पहा: ज्योतिष्टोमादि श्रुतिप्रणीत यज्ञांच्या प्रातःसवननामक विहित केलेल्या यज्ञांगांमध्यें वसु-नामक देवही या उपासकाच्या पुरुषयज्ञांगणांत चतुर्विंशति (२४) वर्षात्मक प्रातःसवननामक देव प्राप्त होतात. हे वसु प्रातःसवनाचे स्वामी आहेत. म्हणून जेथें प्रातःसवन असेल, तेथें हे अग्निप्रमुख अष्टवसू प्राप्त होतात.

**पूर्वपक्षी**—पण यांचा पुरुषयज्ञाशीं काय संबंध ?

**सिद्धान्ती**—विधि-यज्ञांत अग्निप्रमुख देव विद्यमान असतात. तसेंच, पुरुष-यज्ञांतही वसु स्वरूपाचे देव विद्यमान असतात, हें स्पष्टत: सांगण्यासाठीं श्रुति सांगते, कीं प्राण हेच खरोखर या यज्ञांतील वसू आहेत. प्राण म्हणजे वाणी-आदि इंद्रियें आणि प्राणापानादि वायू. हीं वाणी-प्रमुख इंद्रियें आणि प्राणापानादि वायू अर्थातच पुरुषयज्ञांत नित्य **विद्यमान** असतात. हे जर नसतील, तर मनुष्यादि प्राणिजात जिवंतच राहणार नाहीं; आणि हे असतील तरच जीवांची विद्यमानता शक्य असते. देहामध्यें प्राण असतील तरच सर्व प्राणी जिवंत राहतात, अन्यथा मरण पावतात; हें कोणाला विदित नाहीं ? तात्पर्य, प्राण हेच वायू होत. एवंच विधियज्ञांतील वसूप्रमाणें वाणी-प्रमुख इंद्रियें व पंचप्राण पुरुषयज्ञांत विद्यमान असतात आणि इतरांस विद्यमानता देतात ( वास्तव्य करितात आणि इतरांस वसूं देतात ) म्हणून यांस प्रभुत्व प्राप्त होतें, अशी भावना करावी. तात्पर्य, चोवीस या संख्येचें गायत्र्यक्षरांशीं साम्य आणि वास्तव्य करूं देणाऱ्या प्राणांशीं वसूंचें साम्य आहे, म्हणून ( हीं दोन सामान्यें आहेत म्हणून ) पुरुषाचे-ठिकाणीं यज्ञाची भावना करावी॥ १॥

## मंत्र दुसरा

**तं चेदेतस्मिन्वयसि किंचिदुपतपेत्स ब्रूयात्प्राणा वसव इदं मे प्रातःसवनं माध्यंदिनꣳ सवनमनुसंतनुतेति माऽहं प्राणानां वसूनां मध्ये यज्ञो विलोप्सीयेत्युद्धैव तत एत्यगदो ह भवति ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः—एतस्मिन् वयसि किंचित् तं उपतपेत्** ( या पहिल्या चोवीस वर्षांत म्हणजे हें प्रातःसवन करीत असतां जर या यज्ञसंपादकाला कांहीं मारक रोगाची पीडा झाली ) **सः ब्रूयात्** ( त्यानें म्हणावें, जप करावा ) **"प्राणाः वसवः मे इदं प्रातःसवनं माध्यंदिनं सवनं अनुसंतनुत, 'इति'; प्राणानां वसुनां मध्ये अहं यज्ञः मा विलोप्सीय इति'** ( हे प्राण हो ! हे वसुरूपी देव हो ! हें माझें प्रातःसवन आहे. हें माध्यंदिन सवनामध्यें अविच्छिन्न जाऊन मिळेल, असें करा आणि आपण माझा प्राणरूपी वसु विद्यमान असतां सकळ पुरुषयज्ञरूपी जो मी तो विच्छिन्न होऊं नये, असे करा' ) **तत् उत् एति ह एव अगदः ह भवति** ( असा मंत्रजप केल्यानंतर तो उपासक पीडातीत होतो आणि निरोगी होतो ) ॥ २ ॥

तं चेद्यज्ञसंपादिनमेतस्मिन्प्रातःसवनसंपन्ने वयसि किंचिद्व्याध्यादि मरणशङ्काकारणमुपतपेद्दुःखमुत्पादयेत्स तदा यज्ञसंपादी पुरुष आत्मानं यज्ञं मन्यमानो ब्रूयाज्जपेदित्यर्थ इमं मन्त्रं:—हे प्राणा वसव इदं मे प्रातःसवनं मम यज्ञस्य वर्तते तन्माध्यंदिनं सवनमनुसंतनुतेति माध्यंदिनेन सवनेनाऽऽयुषा सहितमेकीभूतं संततं कुरुतेत्यर्थः । माऽहं यज्ञो युष्माकं प्राणानां वसूनां प्रातःसवनेशानां मध्ये विलोप्सीय विलुप्येय विच्छिद्येयेत्यर्थः । इतिशब्दो मन्त्रपरिसमाप्त्यर्थः । स तेन जपेन ध्यानेन च ततस्तस्मादुपतापादुदेत्युद्गच्छति । उद्गम्य विमुक्तः सन्नगदो ह्यनुपतापो भवत्येव ॥ २ ॥

सिद्धान्ती—या पहिल्या चोवीस वर्षांला श्रद्धालु उपासकानें प्रातःसवनाचें स्वरूप दिलेलें असतें. तेव्हां पहिल्या चोवीस वर्षांत त्याला जर कांहीं आधि-व्याधींचा उपद्रव झाला, मरणाची शंका उत्पन्न करणारें कांहीं दुःखद कारण प्राप्त झालें; तर त्या यज्ञसंपादकानें—

शिष्य—आपणच यज्ञरूपी आहोंत, अशी याची समजूत असते. नव्हे ?

सिद्धान्ती—होय. या यज्ञरूपी पुरुषानें हा श्रुतीनें सांगितलेला मंत्र जपावा.

शिष्य—कोणता मंत्र तो ?

सिद्धान्ती हा पुढेंच सांगितला आहे. ऐका:—हे वसुरूपी प्राणहो ! माझ्या जीवन-यज्ञाचें हें प्रातः सवन चाललेलें आहे. कृपा करा आणि हें प्रात सवन माध्यंदिनसवनाशीं एकरूप होईल, माध्यंदिनसवनाला जाऊन मिळेल; उभयतांचा संगम होईल, असें करा.

शिष्य—म्हणजे पहिल्या चोवीस वर्षांत जर कांहीं घात करणारी रोगराई यज्ञोपासकास झाली, तर त्यानें हा मंत्र जपून मागणें मागावें कीं, माध्यंदिनसवनानें अंगीकृत केलेल्या चव्वेचाळीस वर्षांच्या प्रारंभापर्यंत तरी माझें आयुष्य अविच्छिन्न राहावें !

सिद्धान्ती—आणि अशीही प्रार्थना करावी कीं, हे वसुरूपी प्राणहो ! तुम्ही प्रातःसवनाचे स्वामी आहां. तेव्हां तुमच्या स्वामित्वामध्यें होत असणाऱ्या या यज्ञाच्या प्रातःसवनाला खंड पडणार नाहीं, हा यज्ञ लुप्त होणार नाहीं; किंवा याचा उच्छेद होणार नाहीं, असें करा ! सारांश, मला जिवंत ठेवा अथवा माझ्या मरणामुळें यज्ञविच्छेद होणार नाहीं, असें करा. माझ्या हातून प्रातःसवन पूर्ण होईल असें करा !

शिष्य—येथें जपण्याचा मंत्र समाप्त झाला, असें 'इति' या पदावरून समजतें ?

सिद्धान्ती—होय. भक्तिज्ञानपूर्वक केलेला हा जप सिद्ध झाल्यानंतर तो रोगी उपासक रोगाच्या पलीकडे जातो, रोगमुक्त होतो. आणि त्याला पुढें त्या रोगाचा किंवा पीडेचा उपद्रव होत नाहीं ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**अथ यानि चतुश्चत्वारिꣳशद्वर्षाणि तन्माध्यंदिनꣳ सवनं चतुश्चत्वारिꣳशदक्षरा त्रिष्टुप्त्रैष्टुभं माध्यंदिनꣳ सवनं तदस्य रुद्रा अन्वायत्ताः प्राणा वाव रुद्रा एते हीदꣳ सर्वꣳ रोदयन्ति ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थः—अथ यानि चतुश्चत्वारिंशत् वर्षाणि, तत् माध्यंदिनं सवनं; चतुश्चत्वारिंशदक्षरा त्रिष्टुभ्; माध्यंदिनं सवनं त्रैष्टुभं; तत् अस्य रुद्राः अन्वायत्ताः, एते प्राणाः रुद्राः वाव; हि इदं सर्वं रोदयंति** ( आतां पुढील जीं चव्वेचाळीस वर्षें आहेत, तीं माध्यंदिन—मध्यान्हकालीं करण्याचें—सवन होतात, अशी भावना ठेवावी. कारण, माध्यंदिन—सवनाला अवश्य असणारीं त्रिष्टुभ्—छंदाचीं स्तोत्रें चव्वेचाळीस अक्षरांचीं असतात. या माध्यंदिन सवनकालीं रुद्र प्राप्त किंवा अनुगत होतात. पुरुषाचे प्राण हेच रुद्र होत. कारण रुद्राप्रमाणेंच हे प्राण क्रूर आहेत ) ॥ ३ ॥

अथ यानि चतुश्चत्वारिंशद्वर्षाणीत्यादि समानम् । रुदन्ति रोदयन्तीति प्राणा रुद्राः । क्रूरा हि ते मध्यमे वयस्यतो रुद्राः ॥३॥

**सिद्धान्ती**—जीं हीं चव्वेचाळीस वर्षें इत्यादि मंत्रभागाचा अर्थ मागच्या मंत्राच्या स्पष्टीकरणावरून सहज समजेल. असो; रडतात आणि रडवितात म्हणून प्राणांस रुद्र ही संज्ञा आहे. मध्यम वयांत ( २४ ते ६८ वर्षांत ) वागींद्रियादि निष्ठुर असतात, म्हणून त्यांस रुद्र ही संज्ञा दिली आहे ॥ ३ ॥

---

### मंत्र चवथा.

**तं चेदेतस्मिन्वयसि किंचिदुपतपेत्स ब्रूयात्प्राणा रुद्रा इदं मे माध्यंदिनꣳ सवनं तृतीयसवनमनुसंतनुतेति माऽहं प्राणानाꣳ रुद्राणां मध्ये यज्ञो विलोप्सीयेत्युद्धैव तत एत्यगदो ह भवति ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थः—एतस्मिन् वयसि किंचित् तं उपतपेत् चेत्, स ब्रूयात्ः—प्राणाः रुद्राः! मे इदं माध्यंदिनं सवनं तृतीयसवनं अनुसंतनुत इति; प्राणानां रुद्राणां मध्ये अहं यज्ञः मा विलोप्सीय इति; तत् उत् एति ह एव, अगदः भवति ह** ( अर्थ दुसऱ्या मंत्रांत सांगितला आहे तोच आहे. प्रातःसवनाबद्दल माध्यंदिनसवनाचा अंगीकार व वसूंच्या स्थानीं रुद्रांची योजना करावयाची, इतकाच तो भेद आहे ) ॥४॥

**सिद्धान्ती**—स्पष्टीकरण पूर्वीच्या दुसऱ्या मंत्राप्रमाणें आहे.

---

## मंत्र पांचवा.

**अथ यान्यष्टाचत्वारिंशद्वर्षाणि तत्तृतीयसवनमष्टाचत्वारिंशदक्षरा जगती जागतं तृतीयसवनं तदस्याऽऽदित्या अन्वायत्ताः प्राणा वावाऽऽदित्या एते हीदं सर्वमाददते ॥ ५ ॥**

अन्वय व अर्थः—अथ यानि अष्टाचत्वारिंशत् वर्षाणि, तत् तृतीयसवनं; जगति अष्टाचत्वारिंशदक्षरा; तृतीयसवनं जागतं; तत् अस्य आदित्याः अन्वायत्ताः; प्राणाः वाव आदित्याः; हि एते सर्वं इदं आददते (अर्थ मागच्याप्रमाणें. जीं अठ्ठेचाळीस वर्षें तेंच तृतीय सवन होय; जगतीछंद ४८ अक्षरांचा; तृतीयसवनांत आदित्य हे स्वामी आणि प्राण हे आदित्य होत. कारण आदित्याप्रमाणेंच हे प्राण सर्वांचें आकर्षण करितात) ॥ ५ ॥

---

## मंत्र सहावा.

**तं चेदेतस्मिन्वयसि किंचिदुपतपेत्स ब्रूयात्प्राणा आदित्या इदं मे तृतीयसवनमायुरनुसंतनुतेति माऽहं प्राणानामादित्यानां मध्ये यज्ञो विलोप्सीयेत्युद्धैव तत एत्यगदो हैव भवति ॥ ६ ॥**

अन्वय व अर्थः—एतस्मिन् वयसि तं किंचित् उपतपेत् चेत्, सः ब्रूयात् प्राणाः आदित्याः! मे इदं तृतीयसवनं आयुः अनुसंतनुत इति; मा अहं यज्ञः प्राणानां आदित्यानां मध्ये विलोप्सीय इति; ततः उत् एति ह एव, अगदः ह एव भवति (याचाही अर्थ पूर्वीं झालाच आहे. तृतीय सवनाचा अंगीकार व रुद्रांचे स्थानीं आदित्यांची योजना करावयाची आहे) ॥ ६ ॥

तथाऽऽदित्याः प्राणाः । ते हीदं शब्दादिजातमाददतेऽत आदित्यास्तृतीयसवनमायुः षोडशोत्तरवर्षशतं समापयतानुसंतनुत यज्ञं समापयतेत्यर्थः । समानमन्यत् ॥ ५ ॥ ६ ॥

सिद्धान्ती—आदित्य हे प्राणरूप आहेत किंवा प्राण आदित्यरूप आहेत. कारण हे प्राण शब्दादि सर्व वस्तु आकर्षित करितात. म्हणून प्राणांस सर्वाकर्षक आदित्य असें म्हटलें. तृतीय सवनांतील आयुष्य उपभोगिलें, म्हणजे ११६ वर्षे पूर्ण होतात. तेव्हां प्रार्थना अशी आहे कीं 'मला ११६ वर्षेपर्यंत जगूं द्या आणि हा पुरुषयज्ञ समाप्त करूं द्या. तेथपर्यंत माझें आयुष्य अविच्छिन्न असूं द्या. बाकीचा अर्थ पूर्वीप्रमाणें आहे ॥ ५ ॥ ६ ॥

निश्चिता हि विद्या फलायेत्येतद्दर्शयन्नुदाहरति--

विद्या निश्चित झाली म्हणजे वर सांगितलेली फलोत्पत्ति होते, हें दाखविण्या-साठीं श्रुति पुढील उदाहरण सांगत आहे—

---

### मंत्र सातवा.

**एतद्ध स्म वै तद्विद्वानाह महिदास ऐतरेयः स किं म एतदुपतपसि योऽहमनेन न प्रेष्यामीति स ह षोडशं वर्षशतमजीवत्प्र ह षोडशं वर्षशतं जीवति य एवं वेद ॥ ॥ ७ ॥**

**इति तृतीयाध्यायस्य षोडशः खण्डः ॥ १६ ॥**

**अन्वय व अर्थः— एतत् तत् विद्वान् ऐतरेयः ह महिदासः आह स्म वै** ( हें सर्व जाणणारा ऐतरेय महिदास म्हणाला, असें संप्रदायज्ञ सांगतात )-तो म्हणाला कीं-' **सः—त्वं—मे एतत् किं उपतपसि** (तो तूं मला असा काय म्हणून त्रास देतोस ? ) **यः अहं अनेन न प्रेष्यामि, इति** ( मी तुझ्यासारख्यानें मारला जाणार नाहीं )' **सः ह षोडशं वर्ष-शतं अजीवत्** ( तो महीदास एकशेंसोळावर्षे जगला ) **यः एवं वेद, षोडशं वर्षशतं प्रजीवति ह** ( हें ज्ञानविज्ञान असणारा उपासक पुरुष एकशेंसोळावर्षेपर्यंत जगतो ) ॥ ७ ॥

एतद्यज्ञदर्शनं ह स्म वै किल तद्विद्वानाह महिदासो नामतः । इतराया अपत्यमैतरेयः । किं कस्मान्मे ममैतदुपतपनमुपतपसि स त्वं हे रोग योऽहं यज्ञोऽनेन त्वत्कृतेनोपतापेन न प्रेष्यामि न मरिष्याम्यतो वृथा तव श्रम इत्यर्थः । इत्येवमाह स्मेति पूर्वेण

संबन्धः । स एवंनिश्चयः सन्षोडशं वर्षशतमजीवत् । अन्योऽप्येवं निश्चयः षोडशं वर्षशतं प्रजीवति य एवं यथोक्तं यज्ञसंपादनं वेद जानाति स इत्यर्थः ॥ ७ ॥

इति तृतीयाध्यायस्य षोडशः खण्डः ॥ १६ ॥

**सिद्धान्ती**—हें जें वर सांगितलेलें यज्ञदर्शन आहे, तें पूर्णतः जाणारा महिदास नांवाचा उपासक म्हणाला--

**शिष्य**—हा महिदास म्हणजे ऐतरेय उपनिषदांत उल्लेखिलेला इतरेचा पुत्र होय ना? यांचेंच नांव ऐतरेय महिदास ?

**सिद्धान्ती**—होय. तो म्हणाला,–' हे रोगा ! तूं मला अशाप्रकारानें कां पीडा देतोस ? मी यज्ञस्वरूपी आहें. ह्या तुझ्या पीडेनें मीं पंचत्व पावणार नाहीं; म्हणून तुझे श्रम व्यर्थ आहेत.' हें महिदासाच्या म्हणण्याचें तात्पर्य आहे.

**शिष्य**—मंत्रांतील इति शब्दाचा ' आह स्म ' या क्रियापदाकडे संबंध आहे. ' याप्रामाणें महिदास म्हणला ' असा त्याचा अर्थ आहे.

**सिद्धान्ती**--यज्ञद्रष्टया महिदासाची पूर्ण श्रद्धा असल्यामुळें त्याला फल असें मिळालें कीं, तो शंभर अधिक सोळा इतकीं वर्षें जगला; आणि श्रुतीचें असें सांगणें आहे, कीं जो जो कोणी ज्ञानी उपासक श्रद्धा पुरःसर महिदासासारखी उपासना निश्चयानें करितो व या खंडांत सांगितल्याप्रमाणें यज्ञांतील तिन्ही सवनांचें संपादन करितो, तो तोही एकशें सोळा वर्षें जगतो. त्याला रोगादिकाची कोणतीही उपाधि असत नाहीं. उपाधिनिवृत्तीचा अर्थ ' प्र ' या उपसर्गानें सिद्ध होतो. प्रजीवन म्हणजे रोगादिजन्य तापांची उपाधि नसून सुदृढ प्रकृति असणें होय ॥ ७ ॥

सोळावा खंड समाप्त.

---

## खंड सतरावा.

### मंत्र पहिला.

**स यदशिशिषति यत्पिपासति यन्न रमते ता अस्य दीक्षाः ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः**—**सः यत् अशिशिषति, यत् पिपासति यत् न रमते, अस्य ताः दीक्षाः** ( तो जी काय खाण्याची इच्छा करितो,

आणि पिण्याची इच्छा करितो व त्याला जें कांहीं असुख होतें, तें सर्व त्याच्या दीक्षा होत ) दीक्षा घेतलेल्या पुरुषाला जसे कांहीं तापदायक नियम पाळावे लागतात, तसेच या पुरुषालाही कांहीं शारीरिक तापांपासून दुःख होतें तें समाधानानें भोगणें हीच दीक्षा होय ॥ १ ॥

**स यदशिशिषतीत्यादियज्ञसामान्यानिर्देशः पुरुषस्य पूर्वेणैव संबध्यते । यदशिशिषत्याशितुमिच्छति । तथा पिपासति पातुमिच्छति । यन्न रमत इष्टाद्यप्राप्तिनिमित्तं यदैवंजातीयकं दुःखमनुभवति ता अस्य दीक्षाः । दुःखसामान्याद्विधियज्ञस्येव ॥ १ ॥**

**सिद्धान्ती**—या खंडाचा पूर्वीच्या म्हणजे सोळाव्या खंडाशीं संबंध असून तेथें यज्ञाचें जें स्वरूप केलें आहे, त्याचाच विस्तार या खंडांत केला आहे. त्या खंडांत हीं तीन सवनें संपादणारा पुरुष हा यज्ञ आहे, अशी कल्पना केली आहे; ती तुम्ही विसरलां नसालच. हीच कल्पना याही खंडांत सुदृढ करावयाची आहे. अर्थात् यज्ञांत आणि पुरुषांत ज्या कांहीं आणखी सामान्य गोष्टी आहेत, त्यांचा निर्देश येथें करावयाचा आहे, असो: हा ज्ञानी उपासक खावयाचीं इच्छा करितो, पिण्याची इच्छा करितो; अर्थात् त्याला जी तापद क्षुधा–तृष्णा लागते आणि इष्ट वस्तूंची प्राप्ति झाली नाहीं म्हणून जें कांहीं दुःख होतें, तें सर्व या उपासकाच्या दीक्षा होत. यज्ञांत कांहीं व्रतें पाळावीं लागतात. हीं व्रतें तापदायक असतात. इष्टप्राप्तीची इच्छा आणि अनिष्टाची प्राप्ति हींही दुःखदायकच असतात. व्रतें दुःखदायक आणि तृष्णा–क्षुधा दुःखदायक. उभयत्र संताप सामान्य आहे. म्हणून क्षुधादिकांस दीक्षा असें म्हटलें. कारण उघड आहे. व्रतांचे नियम पाळण्यासाठीं कांहीं विशेष तापद व्रतें करावीं लागतात; आणि क्षुधा–तृषादिकांच्या व अनिष्ट–प्राप्तीच्या आगमनानें बराच ताप सहन करावा लागतो. हा तापसहनाचा प्रयत्न म्हणजे दीक्षा होय ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**अथ यदश्नाति यत्पिबति यद्रमते तदुपसदैरेति ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः**—अथ यत् अश्नाति, यत् पिबति, यत् रमते, तत् उपसदैः एति ( वरील दुःखनिवारणासाठीं तो जें खातो, जें पितो, जें रमतो, ते सर्व उपसदांची योग्यता पावतें ) ॥ २ ॥

अथ यदश्नाति यत्पिबति यद्रमते रतिं चानुभवतीष्टादिसंयोगात्तदुपसदैः समानतामेति। उपसदां च पयोव्रतत्वानिमित्तं सुखमस्ति। अल्पभोजनीयानि चाहान्यासन्नानीति प्रश्वासोऽतोऽशनादीनामुपसदां च सामान्यम्॥ २॥

सिद्धान्ती——क्षुधानिवारणासाठीं तो जें खातो, तृष्णाशमनासाठीं तो जें पितो, आणि इष्टविषय प्राप्त झाल्यामुळें तो जें रममाण होतो, तें सर्व त्याचें खानपान आणि रमण उपसदांची योग्यता पावतें. ज्योतिष्टोमांतील उपसदांमध्यें पयोव्रत धारण करावें लागतें. पयोव्रत ( पयोभक्षण ) सुखकर आहे. उपसदांमध्यें अल्पभोजनादिकाचे दिवस प्राप्त झाले असतां जसें एकप्रकारचें स्वास्थ्य उत्पन्न होतें, तशीच योग्य आहार, विहार आणि पान प्राप्त झालीं असतां सुखप्राप्ति आणि दुःखनिवृत्ति होते. उपसदांतही सुखप्राप्ती आणि दुःखनिवृत्ति असते. म्हणून उपासकाचे आहारविहारही उपसद होतात॥ २॥

---

## मंत्र तिसरा.

**अथ यद्धसति यज्जक्षति यन्मैथुनं चरति स्तुतशस्त्रैरेव तदेति॥ ३॥**

**अन्वय व अर्थः—अथ यत् हसति, यत् जक्षति यत् मैथुनं चरति, तत् स्तुतशस्त्रैः एव एति** ( तो जें हंसतो, जो विनोद करितो, जें मैथुन करितो, तें सर्व स्तुतशस्त्रांशीं समान आहे ) हास्यविनोद हींच स्तुतशस्त्रें होत॥ ३॥

अथ यद्धसति यज्जक्षति भक्षयति यन्मैथुनं चरति स्तुतशस्त्रैरेव तत्समानतामेति। शब्दवत्त्वसामान्यात्॥ ३॥

सिद्धान्ती—त्याचें हंसणें, त्याचें खाणें, त्याचें मैथुन हें स्तुतशस्त्रांशीं समान आहे.

शिष्य——स्तुतशस्त्रें म्हणजे यज्ञामध्यें जीं स्तुतिपर स्तोत्रें म्हणत असतात, तीं होत. स्तोमांत गायन असतें. स्तोत्रांत नसतें.

सिद्धान्ती——ठीक आहे. हास्य-विनोदादि व स्तुतिस्तोत्रें यांमध्यें शब्द-सामान्यता आहे. हंसणें हाही शब्द आणि स्तुतशस्त्रें हेही शब्दच; म्हणून हास्य, विनोद, मैथुन हीं या प्रस्तुत यज्ञांतील स्तुतशस्त्रें होत॥ ३॥

---

## मंत्र चवथा.

**अथ यत्तपो दानमार्जवमहिंसा सत्यवचनमिति ता अस्य दक्षिणाः ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थः—अथ यत् तपः, दानं, आर्जवं, अहिंसा, सत्यवचनं इति, ताः अस्य दक्षिणाः** ( त्याचें तप, दान, ऋजुता—सरळपणा—, अहिंसा, सत्यवचन, हीं सर्व यज्ञांत विद्यमान असणाऱ्या दक्षिणा होत ) ॥ ४ ॥

अथ यत्तपो दानमार्जवमहिंसा सत्यवचनमिति ता अस्य दक्षिणाः । धर्मपुष्टिकरत्वसामान्यात् ॥ ४ ॥

सिद्धान्ती—तप, दान, ऋजुता, अहिंसा, सत्यभाषण हीं सर्व सत्यधर्माची पुष्टि करणारीं आहेत. यज्ञांतील दक्षिणा ही धर्मपुष्टि करिते. म्हणून त्याच्या तपादिकाला दक्षिणास्वरूप प्राप्त होतें.

याप्रमाणें यज्ञांतील दीक्षा, उपसद, स्तुतशस्त्रें आणि दक्षिणा हीं सर्व पुरुषयज्ञांत दृश्य होतात. म्हणून पुरुष हा यज्ञ आहे, असें ठरतें. सारांश, उपासकानें आपली क्षुधा—तृष्णादि ही दीक्षा आहे, खानपानादि उपसद आहे, हास्य—मैथुनादि स्तुतशस्त्रें आहेत, आणि तपादि दक्षिणा होत, अशी दृष्टि ठेऊन उपासना केली असतां त्याचें सर्व चरित्र किंवा त्याची आयुष्ययात्रा यज्ञस्वरूप होते. तात्पर्य, यज्ञांत व श्रद्धानिष्ठ उपासकाच्या जीवितांत इतकें साम्य आहे कीं, जीविताला यज्ञपदवी प्राप्त होते ॥ ४ ॥

---

## मंत्र पांचवा.

**तस्मादाहुः सोष्यत्यसोष्टेति पुनरुत्पादनमेवास्य तन्मरणमेवावभृथः ॥ ५ ॥**

**अन्वय व अर्थः—तस्मात् सोष्यति, असोष्ट, इति पुनरुत्पादनं एव अस्य आहुः; तन्मरणं एव अवभृथः—आहुः—** ( असें आहे म्हणून 'तो जन्माला येणार आहे,' 'तो जन्मला' असें जें म्हणतात, तीच त्याची पुनरुत्पत्ति होय; त्याचें मरण म्हणजे अवभृथस्नान होय ) ॥ ५ ॥

यस्माच्च यज्ञः पुरुषस्तस्मात्तं जनयिष्यति माता यदा तदाऽऽहुरन्ये सोष्यतीति तस्य मातरं यदा च प्रसूता भवति तदाऽसोष्ट

पूर्णिकेति विधियज्ञ इव सोष्यति सोमं यज्ञदत्त इति, अतः देवदत्तोऽसोष्ट सोमं यज्ञदत्त इति, अतः शब्दसामान्याद्वा पुरुषो यज्ञः। पुनरुत्पादनमेवास्य तत्पुरुषाख्ययज्ञस्य तत्सोष्यत्यसोष्टेति शब्दसंबन्धित्वं विधियज्ञस्येव। किंवा तन्मरणमेवास्य पुरुषयज्ञस्यावभृथः समाप्तिसामान्यात् ॥ ५ ॥

**सिद्धान्ती**--ज्यापक्षीं पुरुष हा यज्ञ आहे, असें मागील मंत्रांवरून ठरलें, त्यापक्षीं लोक असें म्हणतात कीं, 'त्याची माता त्याला जन्म देणार आहे' आणि 'त्याचा जन्म झाला' म्हणजे 'त्याच्या मातेनें त्याला जन्म दिला--'

**शिष्य**--याचा संबंध मला कळत नाहीं.

**सिद्धान्ती**--ऐक; आपण ज्योतिष्टोमादि यज्ञ करूं लागलों म्हणजे म्हणतों कीं, 'देवदत्त सोमरस पिळून काढण्याला आतां आरंभ करील--

**शिष्य**--अरण्यांतून सोमवल्ली आणून ती कांडावी लागते; आणि सोमरस गाळून घ्यावा लागतो. या सर्व कर्माला **सवन** असें म्हणतात.

**सिद्धान्ती**--होय, 'देवदत्त **सोमसवन** करणार आहे, यज्ञदत्तानें **सोमसवन** केलें' असें यज्ञामध्यें आपण म्हणतों. त्याचप्रमाणें पुत्राचा जन्म व्हावयाचा असला म्हणजे त्याची माता **प्रसूत** होणार आहे व ती पूर्णगर्भ होऊन **प्रसूत** झाली म्हणजे ती **प्रसवली** असें म्हणतों. यज्ञांतील **सोमसवन** आणि मातेची **प्रसूति** हीं एकाच गोत्राचीं असतात; म्हणजे सवन आणि प्रसूति हे दोन्ही शब्द एकाच धातूपासूनच निर्माण झाले आहेत. म्हणूनही पुरुषाला यज्ञ म्हटलें. सोमसवन हा शब्द 'सू' धातूपासून उत्पन्न होतो, आणि प्रसूति हाही 'सू'पासून होतो. अतएव जें सवन तीच प्रसूति होय. म्हणून पुरुषाला यज्ञ म्हणावयाचें. असो; पुनः पुरुष नामक जो हा यज्ञ आहे, त्याचें गर्भांत असणें आणि जन्म होणें हें त्याचें उत्पादनच होय. विधियज्ञामध्यें जसे 'सोष्यति, असोष्ट' इत्यादि शब्द येतात, तसेच पुरुषजन्मासंबंधानेंही येतात. तेव्हां पुरुषाचा जन्म हेंच यज्ञांतील सोमसवन आहे; आणि यज्ञांमध्यें यज्ञसमाप्ति झाल्यानंतर जसें अवभृथ स्नान करावें लागतें, तसेंच पुरुषाची जीवयात्रा संपल्यानंतर प्रेताला स्नान घालतात, तें (किंवा प्रत्यक्ष मरण) पुरुषयज्ञाचें अवभृथ स्नान होय. याप्रमाणें पुरुष हा सांगोपांग यज्ञ आहे. या यज्ञांत तिन्हीं सवनांचा अंतर्भाव असून दीक्षा, उपसद, स्तुतशस्त्रें, दक्षिणा, सवन आणि अवभृथ स्नान, हे सर्व प्रकार दृश्य होतात. म्हणून पुरुषाला यज्ञ म्हणावयाचें आणि यज्ञस्वरूपानें आयुष्ययात्रेचा संपादक जो विद्वान् पुरुष त्यानें उपासना करावयाची, असा श्रुतीचा उपदेशपूर्ण नियम आहे ॥ ५ ॥

**मंत्र सहावा.**

**तद्धैतद्घोर आङ्गिरसः कृष्णाय देवकीपुत्रायो-क्त्वोवाचापिपास एव स बभूव सोऽन्तवेलायामे-तत्त्रयं प्रतिपद्येताक्षितमस्यच्युतमसि प्राणस-ंशितमसीति तत्रैते द्वे ऋचौ भवतः ॥ ६ ॥**

**अन्वय व अर्थः—तत् ह एतत् आङ्गिरसः घोरः देवकीपुत्राय कृष्णाय उक्त्वा उवाच** ( आंगिरसगोत्रांत उत्पन्न झालेल्या घोर नामक ऋषींनी देवकीपुत्र जो कृष्ण त्याला या प्रकरणांत सांगितलेला यज्ञदर्श-नात्मक उपदेश केला, आणि म्हणाला ) **एतत् त्रयं अंतवेलायां प्रति-पद्येत ' अक्षितं असि, ' ' अच्युतं असि, ' ' प्राणसंशितं असि '** ( मरणकालीं या तीन मंत्रांचा जप करावा, ' अक्षत आहेस ' ' अच्युत आहेस ' ' प्राणसंशित आहेस ' सूक्ष्म आहेस. ' या तीन याजुषमंत्राचा जप करावा ) **सः अपिपासः एव बभूव** ( तो अतृष्ण झाला ) **तत्र एते द्वे ऋचौ भवतः** ( याला समर्थक अशा ह्या दोन ऋचा आहेत ) ॥ ६ ॥

तद्धैतद्यज्ञदर्शनं घोरो नामत आङ्गिरसो गोत्रतः कृष्णाय देवकीपुत्राय शिष्यायोक्त्वोवाच तदेतत्त्रयमित्यादिव्यवहितेन संबन्धः । सचैतद्दर्शनं श्रुत्वाऽपिपास एवान्याभ्यो विद्याभ्यो बभूव । इत्थं च विशिष्टेयं विद्या यत्कृष्णस्य देवकीपुत्रस्यान्यां विद्यां प्रति तृड्विच्छेदकरीति पुरुषयज्ञविद्यां स्तौति । घोर आङ्गिरसः कृष्णायोक्त्वेमां विद्यां किमुवाचेति तदाह—स एवं यथोक्तयज्ञविदन्तवेलायां मरणकाल एतन्मन्त्रत्रयं प्रतिपद्येत जपे-दित्यर्थः । किं तदक्षितमक्षीणमक्षतं वाऽसीत्येकं यजुः । साम-र्थ्यादादित्यस्थं प्राणं चैकीकृत्याऽऽह । तथा तमेवाऽऽहाच्युतं स्वरूपादप्रच्युतमसीति द्वितीयं यजुः । प्राणसंशितं सम्यक्तनू-कृतं च सूक्ष्मं तत्त्वमसीति तृतीयं यजुः । तत्रैतस्मिन्नर्थे विद्या-स्तुतिपरे द्वे ऋचौ मन्त्रौ भवतो न जपार्थे । त्रयं प्रतिपद्येतेति त्रित्वसंख्याबाधनात् । पञ्चसंख्या हि तदा स्यात् ॥ ६ ॥

**सिद्धान्ती**—आंगिरसकुलांत जन्म पावलेला **घोर** नांवाचा एक ऋषि होता. त्यानें ह्या व मागच्या प्रकरणांत सांगितलेल्या यज्ञदर्शनाचा उपदेश केला.

**शिष्य**—यज्ञदर्शन म्हणजे पुरुष हा यज्ञ आहे, अशी निश्चित बुद्धि असणें ?

**सिद्धान्ती**—होय. हा उपदेश **घोर**-ऋषीनें **देवकीपुत्र** जो **कृष्ण** त्याला केला आणि जप करण्यासाठीं त्याला तीन मंत्र सांगितले. ते मंत्र कोणते हें आतां इतक्यांतच सांगतों. हा यज्ञदर्शनाचा उपदेश ऐकून कृष्णाला अन्य विद्यांचें ठिकाणीं अतृष्णा उत्पन्न झाली.

**शिष्य**—म्हणजे ?

**सिद्धान्ती**—या यज्ञदर्शन-नामक विद्येचें माहात्म्य इतकें विलक्षण आहे कीं, इतर मोक्षप्रतिपादक जीं अनेक शास्त्रें आहेत, तीं शास्त्रें जाणून घेण्याविषयींची कृष्णाची जिज्ञासा सर्वथा लुप्त झाली. हें यज्ञदर्शनाचें ज्ञान झाल्यावर दुसरें कांहीं समजून घ्यावें, असें त्याला वाटेनासें झालें. तो कृतार्थ झाला. अर्थात् ही पुरुषयज्ञविद्येची रोचकस्तुति आहे. असो; कृष्णाला ही विद्या सांगून घोर म्हणाला,-'कृष्णा, तुला पुरुषयज्ञविद्या सांगितली आहे. ही समजून घेऊन अखंड उपासना कर आणि अंतकाल प्राप्त झाला म्हणजे मी सांगतों, त्या ह्या तीन मंत्रांचा जप कर. 'तूं अक्षित म्हणजे अक्षत अथवा अखंड आहेस' 'तूं अच्युत, स्वपदापासून भ्रष्ट न होणारा आहेस' आणि 'प्राण-संशित आहेस.'

**शिष्य**—प्राणसंशित म्हणजे ?

**सिद्धान्ती**—संशित म्हणजे उत्कृष्ट रीतीनें सूक्ष्म झालेला. हा प्राण होय. प्राणसंशित म्हणजे सूक्ष्मतत्त्व. हा तिसरा मंत्र. हे तीनही मंत्र यजुर्वेदांतील आहेत.

**शिष्य**—कोणाचें हें स्वरूपवर्णन केलें आहे ?

**सिद्धान्ती**—पुरुषयज्ञामध्यें प्राणदेवता मुख्य आहे. तिचें आधिदैविक स्वरूप आदित्य आहे. तेव्हां आदित्यांतील चैतन्य आणि प्राणचैतन्य एकरूप करून त्या चैतन्यांची या तीन यजूंनीं प्रार्थना करावयाची आहे. आदित्याच्या प्रीत्यर्थ मात्र या तीन मंत्रांचा जप करावयाचा आहे. अविच्छिन्नत्व, अच्युतत्व आणि सूक्ष्मत्व प्रतिपादणारे तिन्ही आदित्यस्मारक याजुषमंत्र निश्रेयसाचे उपकारक आहेत. यज्ञदर्शनाचा आणि ह्या तीन जप्य-मंत्रांचा उपदेश घोरानें कृष्णाला केला.

**शिष्य**—मंत्रांत दोन, ऋचा आहेत म्हणून सांगितलें, त्यांचें तात्पर्य काय ?

**सिद्धान्ती**—त्या ऋचा विद्येची स्तुति करितात.

**पूर्व०**—या ऋचांचाही जप करावा काय ?

सिद्धान्ती--नाहीं. तीन याजुषमंत्राचा जप करावा, असें घोराच सांगणें आहे. या दोन ऋचांचा जप करावा, असें घोराच्या मनांत असतें, तर त्यानें तीन या संख्येचा उच्चार न करितां पांच मंत्रांचा जप करा असें म्हटलें असतें. 'तीन मंत्र जपा' असें म्हटलें आहे, म्हणून हे ऋग्वेदांतील मंत्रविद्येची स्तुति करणारे आहेत, असें निश्चित होतें ॥ ६ ॥

---

## मंत्र सातवा.

**आदित्प्रत्नस्य रेतसः । उद्वयं तमसस्परि ज्योतिः पश्यन्त उत्तरꣳ स्वः पश्यन्त उत्तरं देवं देवत्रा सूर्यमगन्म ज्योतिरुत्तममिति ज्योतिरुत्तममिति ॥७॥**

**इति तृतीयाध्यायस्य सप्तदशः खण्डः ॥ १७ ॥**

**अन्वय व अर्थः**[1]—**आत्, इत्; प्रत्नस्य रेतसः-ज्योतिः वासरं आपश्यंति, यत् दिवि परः इध्यते** ( चिरंतन चिंतन करण्याची ज्योति नित्य पूर्णत्वानें ब्रह्मवेत्ते पाहतात. ही ज्योति स्वर्गामध्यें अथवा परब्रह्मामध्यें प्रकाशत असते) नंतर दुसरा मंत्र आहे त्याचा अन्वयार्थः **तमसस्परि उत्तरं स्वः ज्योतिः पश्यंतः वयं उदगन्म** ( तमाच्या पलीकडे असणारी ज्योति पाहतां पाहतां आम्ही उन्नत झालों ) **देवत्रा उत्तरं देवं सूर्यं पश्यन्तः उदगन्म** ( देवांमध्यें जो उत्कृष्ट असणारा देव-सूर्य-त्याला पाहत पाहत आम्ही उन्नत झालों ) **उत्तमं ज्योतिः इति, उत्तमं ज्योतिः इति** ( ही ज्योति उत्तम आहे; ही उत्तमोत्तम ज्योति आहे ) ॥ ७ ॥

---

१ येथें जो अन्वय दिला आहे, तो ऋग्वेदांतील उद्धृत केलेल्या संपूर्ण ऋचेचा आहे. येथें सातव्या मंत्रांत केवळ त्या ऋग्वेदी मंत्राचें प्रतीक मात्र घेतलेले आहे, सर्व मंत्र घेतलेला नाहीं. तथापि श्रीमद् भाष्यकारांनीं सर्व ऋग्वेदी मंत्राचा अर्थ केला आहे; व प्रतीकाचा अर्थ स्पष्ट कळावा म्हणून सर्व मंत्राचा अन्वय व अर्थ येथें दिला आहे. उद्धृत केलेला मंत्र 'आदित्प्रत्नस्य रेतसो ज्योतिः पश्यंति वासरं । परो यदिध्यते दिवि' असा आहे,

आदिदित्यत्राऽऽकारस्यानुबन्धस्तकारोऽनर्थक इच्छब्दश्च । प्रत्नस्य चिरंतनस्य पुराणस्येत्यर्थः । रेतसः कारणस्य बीजभूतस्य जगतः सदाख्यस्य ज्योतिः प्रकाशं पश्यन्ति । आशब्द उत्सृष्टानुबन्धः पश्यन्तीत्यनेन संबध्यते । किं तज्ज्योतिः पश्यन्ति । वासरमहरहरिव तत्सर्वतो व्याप्तं ब्रह्मणो ज्योतिः । निवृत्तचक्षुषो ब्रह्मविदो ब्रह्मचर्यादिनिवृत्तिसाधनैः शुद्धान्तःकरणा आ समन्ततो ज्योतिः पश्यन्तीत्यर्थः । परः परमिति लिङ्गव्यत्ययेन, ज्योतिष्परत्वात् । यदिध्यते दीप्यते दिवि द्योतनवति परस्मिन्ब्रह्मणि वर्तमानम् । येन ज्योतिषेद्धः सविता तपति चन्द्रमा भाति विद्युद्विद्योतते ग्रहतारागणा विभासन्ते ।

**सिद्धान्ती**—मंत्रांमध्यें आत् व इत् असे जे दोन शब्द आहेत, त्यांतील आत् शब्दाच्या तकाराला आणि इत् शब्दाला कांहीं एक अर्थ नाहीं. आ हा उपसर्ग पश्यंति या क्रियापदाचा आहे. असो; प्रत्नस्य म्हणजे चिरंतन असणाऱ्या ( सनातन ) रेताची म्हणजे कारणाची जी ज्योति—

**शिष्य**—म्हणजे काय ?

**सिद्धान्ती**—सत् नांवाचें जें जगत्कारण आहे त्याची—

**शिष्य**—अनादि जगताचें कारण सत् ( अनाद्यनंत ) म्हणजे ब्रह्म आहे, हें प्रसिद्ध आहे.

**सिद्धान्ती**—तेव्हां अनादि जगताचें सद्रूपी कारण जें ब्रह्म त्याचा प्रकाश आपश्यंति म्हणजे पूर्णत्वानें पाहतात. प्रतिदिवशीं सूर्यप्रकाश दृग्गोचर होतो, तद्वत् सर्वव्यापी जें ब्रह्म त्याचा प्रकाश ब्रह्मवेत्त्यांस पूर्णत्वानें दिसतो.

**पूर्वपक्षी**—आम्हांस कां हा दिसत नाहीं ?

**सिद्धान्ती**—अहो ! ब्रह्मचर्यादि विषयनिवर्तक साधनांनीं ज्यांनीं आपलें अंतःकरण शुद्ध केलें आहे, त्या ब्रह्मवेत्त्यांनीं आपले नेत्र झाकिले असतां म्हणजे आपली सर्व ज्ञानकर्मेंद्रियें विषयविनिवृत्त केलीं असतां त्याना मात्र या सर्वव्यापी ब्रह्माचा तेजस्वी प्रकाश गोचर होतो. सर्वप्रकाशक परब्रह्मामध्यें वास्तव्य करणारा हा प्रकाश अत्यंत देदीप्यमान असतो व तो आतांच सांगितल्याप्रमाणें विषयविन्मुख ज्ञानी योग्यांस प्राप्त होतो.

**शिष्य**—अत्यंत हा ऋग्वेद मंत्रांतील परः या पुल्लिंगी पदाचा अर्थ आहे.

**सिद्धान्ती**—नाहीं. परः याचा संबंध जोतीकडे आहे. म्हणून त्याचें ' परं ' असे रूप केलें पाहिजे. याच प्रकाशानें संपन्न झाल्यामुळें सूर्य तपतो, चंद्र प्रका-

शतो, विद्युत् चमकते आणि ग्रहतारागण लकलकित दिसतात. तात्पर्य, अशी ही स्वयंप्रकाश आणि सर्वप्रकाशक, जगत्कारण आणि सनातन ब्रह्मज्योति विषयनिवृत्त व अहिंसादि संपन्न ब्रह्मवेत्त्यांना मात्र समाधीमध्यें गोचर होते.

किंचान्यो मन्त्रदृगाह यथोक्तं ज्योतिः पश्यन् । उद्वयं तमसोऽज्ञानलक्षणात्परि परस्तादिति शेषः । तमसो वाऽपनेतृ यज्ज्योतिरुत्तरमादित्यस्थं परिपश्यन्तो वयमुदगन्मेति व्यवहितेन संबन्धः । तज्ज्योतिः स्वः स्वमात्मीयमस्मद्धृदि स्थितम् । आदित्यस्थं च तदेकं ज्योतिः । यदुत्तरमुत्कृष्टतरमूर्ध्वतरं वाऽपरं ज्योतिरपेक्ष्य पश्यन्त उदगन्म वयम् । कमुदगन्मेत्याह । देवं द्योतनवन्तं देवत्रा देवेषु सर्वेषु सूर्यं रसानां रश्मीनां प्राणानां च जगत ईरणात्सूर्यस्तमुदगन्म गतवन्तो ज्योतिरुत्तमं सर्वज्योतिर्भ्य उत्कृष्टतममहो प्राप्ता वयमित्यर्थः । इदं तज्ज्योतिर्यदृग्भ्यां स्तुतं यद्यजुस्त्रयेण प्रकाशितम् । द्विरभ्यासो यज्ञकल्पनापरिसमाप्त्यर्थः ॥ ७ ॥

इति तृतीयाध्यायस्य सप्तदशः खण्डः ॥ १७ ॥

**सिद्धान्ती**—दुसरा मंत्रद्रष्टा काय म्हणतो तें पहाः वर आतांच सांगितलेली ज्योति पाहणारा ब्रह्मवेत्ता म्हणतो: ‘अज्ञान आहे ज्याचें लक्षण, अशा अंधकाराच्या पलीकडे असणारा अथवा अंधकाराचा नाश करणारा जो प्रकाश आम्हीं पाहतों—

**शिष्य**—या मंत्रांतील ज्योतीचें ‘ उत्तर ’ हें विशेषण आहे; नव्हे ?

**सिद्धान्ती**—होय. उत्तर म्हणजे आदित्याचे ठिकाणीं असणारा. अज्ञानांधकाराच्या पलीकडे असून त्याच अंधकारांचा नाश करणारा आदित्यवासी प्रकाश आम्हीं पूर्णतः पाहतों आणि उन्नत होतों. हा प्रकाश स्वः म्हणजे आमचा म्हणजे आमच्याही हृदयांत राहणारा आहे. आदित्यांत राहणारा आणि आमच्या हृदयांत राहणारा प्रकाश एकच आहे. हा उत्कृष्ट किंवा सर्वश्रेष्ठ प्रकाश इतर सर्व प्रकाशांपेक्षां श्रेष्ठ आहे. पहा कीं, सर्व देवांमध्यें श्रेष्ठ प्रकाशानें अलंकृत झालेला जो सूर्य—

**शिष्य**—सूर्याला हें नांव कसें मिळालें ?

**सिद्धान्ती**—सर्व रसांचें, किरणांचें आणि पापांचें ईरण करणारा ( म्हणजे चालन करणारा व शोधून त्यांस जीव देणारा ) हा देव आहे म्हणून याला सूर्य असें म्हणतात. असो; सर्व देवांमध्यें श्रेष्ठ प्रकाशानें विशिष्ट असणाऱ्या सूर्यापेक्षांही जास्त श्रेष्ठ प्रकाशाची प्राप्ति आम्हांस झाली आहे. काय आश्चर्य आहे!

पद्यः ' असें हा मंत्रद्रष्टा म्हणतो. आपण पुरुषयज्ञ प्रकरण समजून घेतलें. त्यांत आलेले जे याजुष मंत्र त्यांनीं ब्रह्माचें प्रकाशन केलें होतें, तें तुम्हांस आठवत असेल. यजूंनीं जिला प्रकाशित केलें व जिची स्तुति ह्या ऋग्वेदी मंत्रांतील दोन ऋचांनीं गायिली, ती ज्योति म्हणजे ब्रह्मवेत्त्यांस ब्रह्मसाक्षात्कारामध्यें गोचर झालेली उत्तमोत्तम ज्योति होय. दोनदां ' जोतिरुत्तमम् ' हीं पदें आलीं आहेत, तीं यज्ञकल्पना परिसमाप्त झाली, हें दाखविण्यासाठीं आहे ॥ ७ ॥

सतरावा खंड समाप्त.

---

# खंड अठरावा.

## मंत्र पहिला.

**मनो ब्रह्मेत्युपासीतेत्यध्यात्ममथाधिदैवतमाकाशोब्रह्मेत्युभयमादिष्टं भवत्यध्यात्मं चाधिदैवतं च ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—' मनः ब्रह्म '** इति उपासीत ( मन हें ब्रह्म आहे, अशी उपासना करावी ) **इति अध्यात्मं** ( हा अध्यात्मदृष्टीनें विचार झाला ) **अथ अधिदैवतं** (आतां देवतादृष्टीनें विचार करावयाचा) **आकाशः ब्रह्म** ( आकाश हें ब्रह्म आहे ) **इति** ( याप्रमाणें ) **अध्यात्मं च अधिदैवतं च उभयं आदिष्टं भवति** ( अध्यात्म आणि अधिदैवत असा उभय पद्धतीनें उपदेश केला आहे ) ॥ १ ॥

मनोमय ईश्वर उक्त आकाशात्मेति च ब्रह्मणो गुणैकदेशत्वेन । अथेदानीं मनआकाशयोः समस्तब्रह्मदृष्टिविधानार्थम् आरम्भो मनो ब्रह्मेत्यादि । मनो मनुतेऽनेनेत्यन्तःकरणं तद्ब्रह्म परमित्युपासीतेति एतदात्मविषयं दर्शनमध्यात्मम् । अथाधिदैवतं देवताविषयमिदं वक्ष्यामः । आकाशो ब्रह्मेत्युपासीत । एवमुभयमध्यात्ममधिदैवतं चोभयं ब्रह्मदृष्टिविषयमादिष्टमुपदिष्टं भवति । आकाशमनसोः सूक्ष्मत्वात् । मनसोपलभ्यत्वाच्च ब्रह्मणो योग्यं मनो ब्रह्मदृष्टेः । आकाशश्च सर्वगतत्वात्सूक्ष्मत्वादुपाधिहीनत्वाच्च ॥ १ ॥

सिद्धान्ती—मागें चौदाव्या खंडांत ' ईश्वर मनोमय आहे ' आणि ' तोच आकाशात्मा आहे ' असें ईश्वराचें वर्णन केलें. अर्थात् हें वर्णन एकदेशी होतें. ब्रह्माचे सर्व गुण तेथें संकलित झाले नव्हते. असो; आतां मन आणि आकाश या उभयतांवर समस्त ब्रह्मदृष्टि ठेवावी, हें सांगण्यासाठीं व ही दृष्टि एकदेशी नसावी, हें सांगण्यासाठीं ह्या तिसऱ्या अध्यायाच्या शेवटच्या खंडाला ' मनोब्रह्म ' असा आरंभ केला आहे.

शिष्य—ज्याच्या साह्यानें आपण विचार करितों, तें मन म्हणजे अंतःकरण होय.

सिद्धान्ती—हें मन परब्रह्म आहे, अशी उपासना करावी. मनावर ब्रह्मदृष्टि ठेवून त्याची उपासना करावी. हा आत्मविषयक उपदेश अध्यात्मपर आहे.—

शिष्य—कारण, व्यावहारिक भाषेंत आत्म्यामध्यें मनाचा अंतर्भाव होतो. म्हणून ब्रह्मदृष्टि ठेवून मनाची उपासना करावी, मन हें ब्रह्म आहे, असें उपासकानें समजावें, असा हा अध्यात्मपर उपदेश झाला. आतां देवताविषयक जो अधिदैवत उपदेश तो कसा ?

सिद्धान्ती—ऐका: ' आकाश हें ब्रह्म आहे ' अशी उपासना करावी. याप्रमाणें अध्यात्म आणि अधिदैवत असा उपदेश श्रुतीनें केला. ' अध्यात्म-मनावर आणि दैवी आकाशावर ब्रह्मदृष्टि ठेवून उपासना करा ' अशी श्रुतीची आज्ञा आहे.

पूर्व०—आकाश आणि मन यांचा संबंध तरी काय ?

सिद्धान्ती—आकाश आणि मन हीं दोन्हीं अत्यंत सूक्ष्म भूतें आहेत.

पूर्वपक्षी—पण मनावर ब्रह्मदृष्टि ठेवावी तरी कशी, आणि हें श्रुतीनें सांगितलें तरी कसें ?

सिद्धान्ती—ब्रह्माची जर कोठें उपलब्धि होत असेल, तर ती मनामध्येंच होते. ब्रह्म जर कोणाला उपलब्ध होत असेल, तर तें मनालाच होय. म्हणून ब्रह्मदृष्टीला मन हें स्थान अत्यंत योग्य आहे.

पूर्वपक्षी—पण आकाशांत तर ब्रह्म उपलब्ध होत नाहीं ?

सिद्धान्ती—आकाश सर्वगामी आहे, सूक्ष्म आहे, उपाधि-विरहित आहे. ब्रह्महि सर्वगामी, अत्यंत अणु, आणि निरुपाधिक आहे. म्हणून आकाशावर ब्रह्मदृष्टि ठेवण्यास श्रुतीनें सांगितलें. कारण तेंही स्थान ब्रह्मदृष्टीला योग्य आहे ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**तदेतच्चतुष्पाद्ब्रह्म वाक्पादः प्राणः पादश्चक्षुः पादः श्रोत्रं पाद इत्यध्यात्ममथाधिदैवतमग्निः पादो वायुः पाद आदित्यः पादो दिशः पाद इत्युभयमेवाऽऽदिष्टं भवत्यध्यात्मं चैवाधिदैवतं च ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः—तत् एतत् ब्रह्म चतुष्पात्** ( तें हें ब्रह्म चतुष्पाद आहे ) **वाक् पादः; प्राणः पादः; चक्षुः पादः; श्रोत्रं पादः** ( वाणी, प्राण, चक्षु, आणि श्रोत्र हे ब्रह्माचे चरण आहेत ) **इति अध्यात्मं** ( हें अध्यात्मवर्णन झालें ) **अथ अधिदैवतं** ( आतां अधिदैवी चार चरण पहा ) **अग्निः पादः; वायु पादः; आदित्यः पादः; दिशः पादः** (अग्नि, वायु, आदित्य आणि दिशा हे ब्रह्माचे निरनिराळे चार चरण होत) **इति** ( याप्रमाणें ) **अध्यात्मं च अधिदैवतं च उभयं आदिष्टं** ( अध्यात्म आणि अधिदैवत या उभयतांचें वर्णन झालें ) ॥ २ ॥

तदेतन्मनआख्यं चतुष्पाद्ब्रह्म, चत्वारः पादा अस्येति । कथं चतुष्पात्त्वं मनसो ब्रह्मण इत्याह—वाक्प्राणश्चक्षुः श्रोत्रमित्येते पादा इत्यध्यात्मम् । अथाधिदैवतमाकाशस्य ब्रह्मणोऽग्निर्वायुरादित्यो दिश इत्येते । एवमुभयमेव चतुष्पाद्ब्रह्माऽऽदिष्टं भवत्यध्यात्मं चैवाधिदैवतं च ॥ २ ॥

**सिद्धान्ती**—तें हें 'मन' नामक ब्रह्म चतुष्पाद आहे. त्याला चार पाय आहेत.

**शिष्य—**मनोरूपी ब्रह्माला चार पाय कसे ?

**सिद्धान्ती—**वाणी, प्राण, ( घ्राण ) चक्षु व श्रोत्र हें त्याचे चार अध्यात्मिक चरण आहेत; आणि 'आकाश' नामक अधिदैवत ब्रह्माचे अग्नि, वायु, आदित्य आणि दिशा हे चार चरण आहेत. याप्रमाणें अध्यात्मदृष्टीनें व अधिदैवतदृष्टीनें ब्रह्म चतुष्पाद आहे, असें श्रुतीनें आज्ञापिलें आहे ॥ २ ॥

## मंत्र तिसरा.

**वागेव ब्रह्मणश्चतुर्थः पादः सोऽग्निना ज्योतिषा भाति च तपति च भाति च तपति च कीर्त्या यशसा ब्रह्मवर्चसेन य एवं वेद ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थः—वाक् एव ब्रह्मणः चतुर्थः पादः** (वाणी हाच मनोब्रह्माचा चौथा पाय आहे) **सः अग्निना ज्योतिषा भाति च तपति च** (तो अधिदैवी अग्निप्रकाशानें प्रकाशतो आणि दाह कारितो) **यः एवं वेद,-सः-कीर्त्या, यशसा, ब्रह्मवर्चसेन भाति च तपति च** (ज्याला हें ज्ञान होतें, तो कीर्ति, यश आणि विद्वत्तेज यांनीं प्रकाशतो आणि तेजस्वी असतो) ॥ ३ ॥

तत्र वागेव मनसो ब्रह्मणश्चतुर्थः पाद इतरपादत्रयापेक्षया । वाचा हि पादेनेव गवादि वक्तव्यविषयं प्रति तिष्ठति । अतो मनसः पाद इव वाक् । तथा प्राणो घ्राणः पादः । तेनापि गन्धविषयं प्रति चक्रामति । तथा चक्षुः पादः श्रोत्रं पाद इत्येवमध्यात्मं चतुष्पात्त्वं मनसो ब्रह्मणः । अथाधिदैवतमग्निवाय्वादित्यदिश आकाशस्य ब्रह्मण उदर इव गोः पादा विलग्ना उपलभ्यन्ते । तेन तस्याऽऽकाशस्याग्न्यादयः पादा उच्यन्ते । एवमुभयमध्यात्मं चैवाधिदैवतं चतुष्पादादिष्टं भवति । तत्र वागेव मनसो ब्रह्मणश्चतुर्थः पादः सोऽग्निनाऽधिदैवतेन ज्योतिषा भाति च दीप्यते तपति च संतापं चौष्ण्यं करोति । अथवा तैलघृताद्याग्नेयाशनेनेद्धा वाग्भाति च तपति च वदनायोत्साहवती स्यादित्यर्थः । विद्वत्फलं भाति च तपति च कीर्त्या यशसा ब्रह्मवर्चसेन य एवं यथोक्तं वेद ॥ ३ ॥

**सिद्धान्ती**—मनोरूपी ब्रह्माचा वाणी हा चौथा पाय आहे.

**शिष्य**—इतर तीन चरणाच्या दृष्टीनें हा चौथा इतकेंच. पण मला हें समजत नाहीं, कीं वाणीला चरणत्व कसें प्राप्त झालें ?

**सिद्धान्ती**—पायांनीं आपण गवादि प्राण्यांकडे जाऊन पावतों, त्याप्रमाणें जो आपला बोलावयाचा गवादि विषय असेल तो आपल्या मनांत आल्याबरोबर

आपल्या वाणीच्या साह्यानें त्या विषयापर्यंत जाऊन मन तेथेंच स्थित होतें. म्हणून वाणी हा मनाचा जणूं कांहीं चरणच आहे. याचप्रमाणें प्राण म्हणजे गंधेंद्रिय. हा मनाचा एक पाय आहे. घ्राणेंद्रियानेंच आपलें मन गंधविषयाकडे जातें. याप्रमाणें नेत्र आणि कर्ण हेही मनाचे चरण होतात. असें हें मनोनामक ब्रह्माचें अध्यात्मी चतुष्पादत्व आहे.

शिष्य—अधिदैवताची ही अशीच व्यवस्था लागेल. म्हणजे अग्नि, वायु, आदित्य आणि दिशा हें आकाशनामक ब्रह्माचे चार चरण होतील.

सिद्धान्ती—होतातच. गायीचे पाय जसे तिच्या पोटामध्यें विलग्न झालेले दिसतात, त्याप्रमाणें आकाशाच्या उदराला अग्नि, वायु–आदि पाद लग्न झालेले आहेत, असें श्रुति म्हणते. अर्थात् अग्निप्रमुख चारही देव आकाशाचे चरण होतात. याप्रमाणें अध्यात्म व अधिदैवीदृष्टीनें या प्रस्तुत ब्रह्माचें चतुष्पादत्व श्रुतीनें सिद्ध केलें आहे; व उपदेशिलें आहे. आतांच इतक्यांत सांगितलें, कीं वाणी हाच मनाचा चौथा पाय आहे. तो अग्नीच्या प्रकाशानें (म्हणजे आकाशाचा एक चरण जो अग्नि त्याच्या प्रकाशानें) सारांश, अधिदैवी प्रकाशानें प्रकाशित होऊन प्रकाशतो आणि संताप देतो अथवा ऊष्णता उत्पन्न करितो.

शिष्य—तात्पर्य वाणीला तेजस्वीपणा येतो किंवा तिच्यामध्यें ऊष्णता उत्पन्न करणारें ओज असतें, तें सर्व अग्नीच्या उपकाराचें फल होय.

सिद्धान्ती—किंवा तेल, तूप इत्यादि उत्तेजक द्रव्यांच्या भक्षणानें पुष्ट झालेली वाणी प्रकाशित होते आणि ताप देणारीही होते. उत्तेजक द्रव्यांनीं पुष्ट झालेल्या रसनेला संभाषण करण्याच्या कामीं उत्साह उत्पन्न होतो, असें ही समजावें. हें सर्व ज्याला समजतें, तो कीर्तीनें, यशानें आणि विद्वत्तेजानें प्रकाशमान होतो; आणि त्याचें महत्त्व सर्वत्र प्रतिष्ठापित होतें.

शिष्य—कीर्ति आणि यश यांत भेद काय ?

सिद्धान्ती—कीर्तीचा अनुभव प्रत्यक्ष येतो, यश परोक्ष असतें, हें ध्यानांत ठेव. वाणीचा अधिष्ठाता अग्नि, घ्राणाचा वायु, चक्षूचा आदित्य आणि श्रोत्राची अधिष्ठात्री दिशा अशी व्यवस्था आहे व अध्यात्म व आधिदैविक यांची अशी सांगड होतें ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा.

**प्राण एव ब्रह्मणश्चतुर्थः पादः स वायुना ज्योतिषा भाति च तपति च भाति च तपति च कीर्त्या यशसा ब्रह्मवर्चसेन य एवं वेद ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थः**—प्राणः एव ब्रह्मणः चतुर्थः पादः; वायुना ज्योतिषा सः भाति च तपति च; यः एवं वेद,—सः—कीर्त्या यशसा, ब्रह्मवर्चसेन भाति च तपति च (अर्थ तिसऱ्या मंत्रांत स्पष्ट झाला आहे. वाणीच्या स्थानीं प्राण—घ्राण—आणि अग्नीच्या स्थानीं वायु यांची योजना करावयाची) ॥ ४ ॥

---

### मंत्र पांचवा.

**चक्षुरेव ब्रह्मणश्चतुर्थः पादः स आदित्येन ज्योतिषा भाति च तपति च भाति च तपति च कीर्त्या यशसा ब्रह्मवर्चसेन य एवं वेद ॥ ५ ॥**

**अन्वय व अर्थः**—चक्षुः एव ब्रह्मणः चतुर्थः पादः आदित्येन ज्योतिषा सः भाति च तपति च; य एवं वेद,—सः—कीर्त्या यशसा, ब्रह्मवर्चसेन भाति च तपति च (येथें चक्षु आणि आदित्य यांचें वर्णन आहे) ॥ ५ ॥

---

### मंत्र सहावा.

**श्रोत्रमेव ब्रह्मणश्चतुर्थः पादः स दिग्भिर्ज्योतिषा भाति च तपति च भाति च तपति च कीर्त्या यशसा ब्रह्मवर्चसेन य एवं वेद य एवं वेद ॥ ६ ॥**

**इति तृतीयाध्यायस्याष्टादशः खण्डः ॥ १८ ॥**

**अन्वय व अर्थः**—श्रोत्रं एव ब्रह्मणः चतुर्थः पादः; सः दिग्भिः ज्योतिषा भाति च तपति च; यः एवं वेद,—सः—कीर्त्या, यशसा, ब्रह्मवर्चसेन भाति च तपति च; यः एवं वेद यः एवं वेद (येथें श्रोत्र आणि दिशा यांचें वर्णन आहे) ॥ ६ ॥

तथा प्राण एव ब्रह्मणश्चतुर्थः पादः । स वायुना गन्धाय भाति च तपति च । तथा चक्षुरादित्येन रूपग्रहणाय श्रोत्रं दिग्भिः शब्दग्रहणाय । विद्याफलं समानं सर्वत्र ब्रह्मसंपत्तिरदृष्टं फलं । य एवं वेद । द्विरुक्तिर्दर्शनसमाप्त्यर्था ॥ ४ ॥ ५ ॥ ६ ॥

इति तृतीयाध्यायस्याष्टादशः खण्डः ॥ १८ ॥

सिद्धान्ती—त्याचप्रमाणें प्राण (म्हणजे घ्राण) हा ब्रह्माचा चौथा पाय आहे. याचा उपकारक वायु आहे. त्याच्या साह्यानें घ्राणेंद्रियाला गंधग्रहण करितां येतें. त्याचप्रमाणें आदित्याचें चक्षूला रूपग्रहणसंबंधीं साह्य होतें. श्रोत्राला शब्दग्रहण दिक्साहाय्यानें करितां येतें. असो; विद्याफल सर्वत्र सारखेंच आहे. तें फल दृष्ट आणि अदृष्ट असें दोन प्रकारचें असतें. कीर्त्यादि दृष्टफल आहे; आणि ब्रह्मस्थिति प्राप्त होणें हें अदृष्ट फल आहे. मन आणि आकाश यांचा परस्पर उपकार्योपकारक संबंध कसा आहे, हें तुम्हांस समजलेंच आहे. आणि याप्रमाणें अध्यात्म आणि अधिदैवी दृष्टीनें सर्वगुणसंपन्न ब्रह्माचा म्हणजे समस्त ब्रह्माचा उपदेश श्रुतीनें उपासनेसाठीं केला आहे; ह्याचें ज्ञान करून घेऊन उपासना केली, म्हणजे दृष्ट व अदृष्ट हीं दोन्हीं फलें उपासकाला प्राप्त होतात ॥ ४ ॥ ५ ॥ ६ ॥

अठरावा खंड समाप्त.

---

## खंड एकोणिसावा.

---

आदित्यो ब्रह्मणः पाद उक्त इति तस्मिन्सकलब्रह्मदृष्ट्यर्थमिदमारभ्यते—

सिद्धान्ती—आदित्य हा ब्रह्माचा चरण आहे, असें मागें सांगितलें. म्हणून आतां त्या आदित्यावर समस्त ब्रह्मदृष्टि ठेवण्याचा उपदेश करावा, एतदर्थ ह्या प्रकरणाचा अवतार आहे. ऐका:—

---

### मंत्र पहिला.

**आदित्यो ब्रह्मेत्यादेशस्तस्योपव्याख्यानमसदेवेदमग्र आसीत् । तत्सदासीत्तत्समभवत्तदाण्डं निरवर्तत तत्संवत्सरस्य मात्रामशयत तन्निरभिद्यत ते आण्डकपाले रजतं च सुवर्णं चाभवताम् ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः**—'**आदित्यः ब्रह्म**' **इति आदेशः** ('आदित्य ब्रह्म आहे' असा उपदेश आहे) **तस्य उपव्याख्यानं** (त्याचें विस्तृत वर्णन आतां करितों) **असत् एव अग्रे इदं आसीत्** (प्रथमतः हें सर्व असत् स्वरूपाचें, अव्याकृत स्वरूपाचें, होतें) **तत् सत् आसीत्** (नंतर तें सत्‌रूप झालें, व्याकृत स्वरूपाचें झालें) **तत् समभवत्** (नंतर तें स्थूल स्वरूप झालें) **तत् आण्डं निरवर्तत** (त्यापासून एक अंडें निर्माण झालें) **तत् संवत्सरस्य मात्रां अशयत्** (तें अंडें एक संवत्सरपर्यंत स्तब्ध राहिलें) **तत् निरभिद्यत** (नंतर तें अंडें फुटलें) **ते आण्ड-कपाले रजतं च सुवर्णं च अभवतां** (त्या फुटलेल्या अंड्याचीं दोन कपालें म्हणजे शकलें झालीं. त्यांतील एक रजत म्हणजे रुप्यासारखें पांढरें आणि एक सुवर्ण म्हणजे सोन्यासारखें पिंवळें, अशीं तीं दोन शकलें झालीं) आदित्यब्रह्माच्या उपव्याख्यानासाठीं येथें सृष्टिक्रम सांगितला आहे. आदित्यब्रह्माचा विचार तिसऱ्या व चौथ्या मंत्रांत होईल ॥ १ ॥

आदित्यो ब्रह्मेत्यादेश उपदेशस्तस्योपव्याख्यानं क्रियते स्तुत्यर्थम्। असदव्याकृतनामरूपमिदं जगदशेषमग्रे प्रागवस्थायामुत्पत्तेरासीन्न त्वसदेव। कथमसतः सज्जायेतेत्यसत्कार्यत्वस्य प्रतिषेधात्। नन्विहासदेवेति विधानाद्विकल्पः स्यात्। न, क्रियास्विव वस्तुनि विकल्पानुपपत्तेः। कथं तर्हीदमसदेवेति। नन्ववोचामाव्याकृतनामरूपत्वादसदिवासदिति। नन्वेवशब्दोऽवधारणार्थः। सत्यमेवं, न तु सत्त्वाभावमवधारयति। किं तर्हि नामरूपव्याकृतविषये सच्छब्दप्रयोगो दृष्टः। तच्च नामरूपव्याकरणमादित्यायत्तं प्रायशो जगतः। तदभावे ह्यन्धं तम इदं न प्रज्ञायेत किंच नेत्यतस्तत्स्तुतिपरे वाक्ये सदपीदं प्रागुत्पत्तेर्जगदसदेवेत्यादित्यं स्तौति ब्रह्मदृष्ट्यर्हत्वाय। आदित्यनिमित्तो हि लोके सदिति व्यवहारः। यथाऽसदेवेदं राज्ञः कुलं सर्वगुणसंपन्ने पूर्णवर्माणि राजन्यसतीति तद्वत्। न च सत्त्वमसत्त्वं वेह जगतः प्रतिपिपादयिषितमादित्यो ब्रह्मेत्यादेशपरत्वात्। उपसंहरिष्यत्यन्त आदित्यं ब्रह्मेत्युपास्त इति।

**सिद्धान्ती**—' आदित्य ब्रह्म होय ' असा सनातन उपदेश आहे. त्याचें या खंडांत उपव्याख्यान म्हणजे विस्तृत वर्णन करावयाचें आहे. अर्थात् हें प्रकरण स्तुतिपर आहे. ऐका: प्रथमतः ( म्हणजे सृष्टिकालाच्या पूर्वी ) हें सर्व-जगत्-असत् होतें.

**शिष्य**—असत् म्हणजे अभावस्वरूपी ?

**सिद्धान्ती**— नाहीं. असत् म्हणजे ज्याचें नामरूप व्याकृत झालें नाहीं असें. तें हें सर्व अव्याकृतनामरूप होतें. कारण उघड आहे. जर पूर्वी अभाव ( अथवा कांहीं नाहीं असेंच ) असता, तर त्या अभावापासून आपल्यास दिसतें आहे, तें सद्रूपी जगत् कसें निर्माण झालें असतें ? शून्यापासून उत्पत्ति होणें शक्यच नाहीं, असें सांगणारी श्रुति प्रमाण आहे. ' असतापासून सताची उत्पत्ति कशी व्हावी ? असा प्रश्न करून असत्कारणापासून सत् हें कार्य उत्पन्न होणें शक्य नाहीं, असा श्रुतीनें प्रत्यक्ष असत्कार्यत्वाचा ( असतापासून सत् झालें याचा ) निषेधच केला आहे.

**पूर्वपक्षी**—परंतु मंत्रामध्यें 'असत् एव' (अभावमात्र) ' असतें झालें, असें सांगितलें आहे. या ' एव ' शब्दा वरून अभावच पूर्वी होता, असें सांगण्याचा श्रुतीचा अभिप्राय दिसतो. आतां अभावापासून भाव उत्पन्न होणें शक्य नाहीं, असें जें तुमचें म्हणणें आहे, तेंही कबूल केलें समजा; तर निदान इतकें तरी या दोन श्रुतींवरून सिद्ध होईल, कीं या सृष्टीच्या पूर्वी अभाव असेल किंवा नामरूपशून्य म्हणजे अव्याकृत जगत् असेल. तात्पर्य; येथें विकल्प उत्पन्न झाला. कांहीं नसेल तरी, किंवा कांहीं असेल तर तें इंद्रियांस अगोचर तरी असेल. दोहोंपैकीं कोणतें होतें तें तुम्हीं स्पष्ट करा.

**सिद्धान्ती**-येथें विकल्प असणें शक्य नाहीं. क्रियांमध्यें विकल्प असतो, कारण त्या कर्तृतंत्र असतात, तेथें कर्त्याची इच्छा प्रबल असते. पण वस्तूमध्यें विकल्प नसतो, कारण, तेथें इच्छेचें कार्य नसतें. ' तुम्हीं सूर्योदय होण्यापूर्वी हवन करा ' किंवा ' सूर्योदय झाल्यावर हवन करा ' असा कर्मामध्यें विकल्प होऊं शकतो. परंतु सूर्याच्या स्वरूपासंबंधानें विकल्प असूं शकत नाहीं. कारण वस्तूचें स्वरूप नित्य सिद्ध असतें. तात्पर्य, येथें विकल्प असणें शक्य नाहीं.

**पूर्वपक्षी**—मग मंत्रांत ' एव ( असत् मात्र ) पूर्वी होतें, असें श्रुति म्हणते, तें कां ?

**सिद्धान्ती**—आम्हीं सांगितलें ना ? कीं असत् म्हणजे नामरूपांनां व्याकृत न झालेलें; नामरूपें नसल्यामुळें मनोबुद्धीला अगोचर असणारें; ज्याला नामरूप नाहीं, तें असतच असल्यासारखें असतें.

**पूर्वपक्षी**—पण 'एव' शब्दाचा अर्थ अवधारणपर आहे. तो इतर सर्वांचा निषेध करून अभावत्व प्रकट करितो.

**सिद्धान्ती**—खरें आहे. पण हा एव शब्द सताचा, अस्तित्वाचा, अभाव निषेधीत नाहीं; सत् नव्हतें, असें हा शब्द सांगत नाहीं.

**पूर्वपक्षी**—मग त्याचा अर्थ तरी काय ?

**सिद्धान्ती**—नामरूपांनीं ज्या वस्तू व्याकृत होतात, त्यांनाही 'सत्' असें आपण व्यवहारांत म्हणतों. हें जगद्विषयक नामरूपाचें व्याकरण प्रायः आदित्याच्या सामर्थ्यानें होत असतें. आदित्याचाच अभाव असेल, तर हें सर्व अंधकारमय होईल, कोणालाच कांहीं एक जाणतां येणार नाहीं. तेव्हां व आदित्याची स्तुति करण्यासाठीं हा मंत्र या प्रकरणांत अवतीर्ण झाला आहे. म्हणून त्याचा अर्थ श्रुतिमनोगताप्रमाणें केला पाहिजे.

**शिष्य**—कोणतें मनोगत तें ?

**सिद्धान्ती**—हें जगत् उत्पत्तीपूर्वींही सत्स्वरूपी होतें, तरी आदित्याची उत्पत्ति झाली नव्हती, तोंपर्यंत तें असद्रूपीच होतें. अर्थात् असें सांगण्यानें आदित्याचें उपकारत्व प्रकट होतें, त्याचें माहात्म्य कळतें, त्याची स्तुति होते.

**शिष्य**—काय म्हणून त्याची स्तुति ही ?

**सिद्धान्ती**—कारण आदित्य हा ब्रह्मदृष्टीला योग्य आहे. त्याच्यावर ब्रह्मदृष्टि ठेविली असतां जीवाचें इष्ट कार्य साधेल, असें श्रुतीस सांगावयाचें आहे.

**शिष्य**—त्याला तरी ही योग्यता कशी येते ?

**सिद्धान्ती**—कारण आतां सांगितलेंच, कीं व्यवहारामध्यें सत् असें आपण म्हणतों, तें आदित्याच्या साह्यानें म्हणतों. उदाहरणार्थ 'सर्वगुणसंपन्न पूर्णवर्मा राजा नसेल तर हें सर्व राजकुल असद्रूपच होतें, (मुळींच नव्हतें)' असें आपण नेहमीं म्हणतों. त्याप्रमाणेंच हाही भाग समजून घ्यावयाचा आहे. प्रकाश असेल तर मात्र व्यवहारांत जगताला सद्रूपत्व मिळतें, अन्यथा नाहीं. शिवाय, जगत् सद्रूप आहे किंवा असद्रूप आहे या प्रश्नाची मीमांसा प्रस्तुतकालीं श्रुति करूं इच्छित नाहीं. या प्रकरणाला आरंभ झाला आहे, तो 'आदित्य ब्रह्म आहे' अशा उपदेशानें झाला आहे. उपसंहारही " 'आदित्य ब्रह्म आहे' असें समजून आदित्याची उपासना करितो " असा आहे. या उपक्रम-उपसंहारावरून आदित्याचेठायीं ब्रह्मदृष्टि करून उपासना करावी, असें प्रतिपादणारें हें प्रकरण आहे, असें सिद्ध होतें. उपासनेचें हें प्रकरण आहे, तत्त्वविचाराचें नाहीं. म्हणून जगत् सत् आहे किंवा असत् आहे, या प्रश्नाची मीमांसा न करितां आदित्य असला म्हणजे हें जगत् सद्रूप दिसतें, तो नसला म्हणजे तें असत् दिसतें;

म्हणून 'आदित्य ब्रह्म आहे' असा कार्यकारणसंबंध लक्षांत ठेऊन आदित्याची ब्रह्मदृष्टीनें उपासना करावयाची आहे.

**तत्सदासीत्तदसच्छब्दवाच्यं प्रागुत्पत्तेः स्तिमितमनिस्पन्दमस-दिव सत्कार्याभिमुखमीषदुपजातप्रवृत्ति सदासीत्ततो लब्धपरि-स्पन्दं तत्समभवदल्पतरनामरूपव्याकरणेनाङ्कुरीभूतमिव बीजम्। ततोऽपि क्रमेण स्थूलीभवत्तदद्भ्य आण्डं समवर्तत संवृत्तम्। आण्ड-मिति दैर्घ्यं छान्दसम्। तदण्डं संवत्सरस्य कालस्य प्रसिद्धस्य मात्रां परिमाणमभिन्नस्वरूपमेवाशयत स्थितं बभूव। तत्ततः संव-त्सरपरिमाणात्कालादूर्ध्वं निरभिद्यत निर्भिन्नं वयसामिवाण्डम्। तस्य निर्भिन्नस्याण्डस्य कपाले द्वे रजतं च सुवर्णं चाभवतां संवृत्ते ॥ १ ॥**

**सिद्धान्ती**—याप्रमाणें सृष्टीच्या उत्पत्तीपूर्वी हें सर्व अव्याकृत जगत 'असत्' सारखें होतें; म्हणजे तें स्तब्ध होतें, आंत बाहेर हालचाल नसणारें होते. तात्पर्य बुद्धीला अगोचर असणारें असें होतें. नंतर पुढें तें 'असत्' शब्दानें वाच्य असणारेंच सत्कार्याभिमुख झालें, थोडीशी प्रवृत्ति करण्यास लागलें, कांहींसें प्रकट झालें; व म्हणन त्याला सत् हें नांव प्राप्त झालें. नंतर पुढें त्याच्यामध्यें परिस्पंद (अंतर्बाह्य चलनवलन) उत्पन्न होऊन तें थोडेसें नामगोचर झालें. जमीनींत पेरलेल्या बीजाला अंकुर फुटतो, तें जमीनीमध्यें असलेलें बीज अंकुररूपानें नामरूपाला गोचर होतें, त्याप्रमाणें सूक्ष्माकाराचें हें जगत् नामरूपानें थोडेंसें व्याकृत झालें. पुढें (क्रमाक्रमानें पंचभूतांच्या उत्पत्तीनंतर) झालेल्या पंचीकरणानें त्याला स्थूळ स्वरूप प्राप्त होऊन त्यापासून एक स्थूल अंडें निर्माण झालें. येथें पंचीकरणाची प्रक्रिया (पंचभूतांचा परस्परांमध्यें होणारा प्रवेश) सिद्ध झाली.

**शिष्य**—मंत्रांत 'आण्ड' आहे तें अंडशब्दाचें आर्षरूप होय?

**सिद्धान्ती**—ठीक आहे. नंतर कालाचा प्रसिद्ध परिणामभाग जो संवत्सर त्या संवत्सरभर हें सर्व ह्या आपल्या अंडस्वरूपांत स्थित होतें झालें. यावेळींही त्याचें स्वरूप अभिन्नच होतें, म्हणजे पूर्ण व्याकरण झालें नव्हतें. पुढें योग्य काल गेल्यानंतर हें अंडें फुटून त्याचीं दोन शकलें झालीं.

**शिष्य**—पक्ष्यांचीं अंडीं फुटतात त्याप्रमाणें?

**सिद्धान्ती**—ठीक. या कपालांपैकीं (शकलांपैकीं) एक शकल रजत् (रुप्यासारखें, रुप्याच्या स्वरूपाचें) व दुसरें शकल सुवर्णरूप असतें झालें ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**तद्यद्रजतꣳ सेयं पृथिवी यत्सुवर्णꣳ सा द्यौर्यज्ज-
रायु ते पर्वता यदुल्बꣳ समेघो नीहारो या धमन-
यस्ता नद्यो यद्वास्तेयमुदकꣳ स समुद्रः ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः—यत् रजतं तत् सा इयं पृथिवी** ( जें रजत् कपाल होतें, तीं ही पृथ्वी होय ) **यत् सुवर्णं सा द्यौः** ( सुवर्णकपाल तो द्युलोक होय ) **यत् जरायु, ते पर्वताः; यत् उल्बं, सः समेघः नीहारः; या धमनयः ताः नद्यः; यत् वास्तेयं उदकं सः समुद्रः** ( जरायु–गर्भाचें स्थूल आच्छादन–हे पर्वत, उल्ब–गर्भवेष्टन–ते मेघांसह दहिंवर, ज्या शरीराच्या धमन्या किंवा शिरा त्या नद्या आणि तेथें असणारें जें उदक तो समुद्र अशी योजना होती ) ॥ २ ॥

तत्तयोः कपालयोर्यद्रजतं कपालमासीत्सेयं पृथिवी पृथिव्युपलक्षितमधोऽण्डकपालमित्यर्थः । यत्सुवर्णं कपालं सा द्यौर्द्युलोकोपलक्षितमूर्ध्वं कपालमित्यर्थः । यज्जरायु गर्भपरिवेष्टनं स्थूलमण्डस्य द्विशकलीभावकाल आसीत्ते पर्वता बभूवुः । यदुल्बं गर्भपरिवेष्टनं तत्सह मेधैः समेघो नीहारोऽवश्यायो बभूवेत्यर्थः । या गर्भस्य जातस्य देहे धमनयः शिरास्ता नद्यो बभूवुः । यत्तस्य वस्तौ भवं वास्तेयमुदकं स समुद्रः ॥ २ ॥

**सिद्धान्ती**—या दोन कपालांमध्यें ( शकलांमध्यें ) जें रजत् कपाल होतें, त्याची ही पृथ्वी झाली. तात्पर्य अंडाच्या खालचा भाग होता तोच पृथ्वी होय. पृथ्वी हें उपलक्षण आहे. पृथ्वी आणि तिच्यासारखे इतर लोक म्हणजे अंडाचा खालचा भाग होय. सुवर्णकपाल हा द्युलोक झाला. येथें अंडाच्या सर्व ऊर्ध्व-भागाला द्युलोक म्हटलें आहे. ह्यांत सर्व अभौतिक भुवनांचा अंतर्भाव होतो. गर्भाच्या भोंवतीं जी जरायु म्हणजे स्थूल वेष्टण असतें, त्याचे पर्वत झाले.

**शिष्य**—ब्रह्मांड फुटून त्याचे दोन भाग झाले, त्या वेळीं त्याच्या भोंवतीं जें स्थूल वेष्टण होतें, तें जरायु ? मानवाच्या गर्भाभोंवतीं ही जरायु असतेच. जरायु हे पर्वत होत.

सिद्धान्ती – होय. असो; उल्ब म्हणजे सूक्ष्म वेष्टण. हें गर्भाभोंवतीं असतें. तेच मेघ आणि दहिंवर होत.

शिष्य—गर्भवेष्टणाचा स्थूल भाग पर्वतरूप झाला आणि सूक्ष्मभाग मेघ आणि आकाशांतून पडणारे दहिंवर या रूपानें प्रकट झाला.

सिद्धान्ती—उत्पन्न झालेल्या गर्भाच्या ( विराटाच्या ) देहामध्यें ज्या धमन्या किंवा शिरा होत्या त्या नद्या आणि त्या गर्भातच जें उदक होतें तो समुद्र, अशी ही अंडांतील भागांपासून स्थूल पृथ्वी–सृष्टि आणि द्युलोकसृष्टि उत्पन्न झाली. द्युलोक–सृष्टि सुवर्णमय आहे, हें चंद्र, सूर्य, तारे, इत्यादींवरून स्पष्ट होतें ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**अथ यत्तद्जायत सोऽसावादित्यस्तं जायमानं घोषा उलूलवोऽनूदतिष्ठन्त्सर्वाणि च भूतानि सर्वे च कामास्तस्मात्तस्योदयं प्रति प्रत्यायनं प्रति घोषा उलूलवोऽनूत्तिष्ठन्ति सर्वाणि च भूतानि सर्वे च कामाः ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थः—अथ यत् तत अजायत सः असौ आदित्यः** ( नंतर त्या अंडामध्यें जें गर्भरूप उत्पन्न झालें तो आदित्य होय ) **तं जायमानं उलूलवः घोषाः उदतिष्ठन्** ( तो सूर्य उत्पन्न होत असतां, तारस्वरात्मक शब्द ऐकूं येऊं लागले ) **सर्वाणि च भूतानि सर्वे च कामाः** (सर्व भूतें आणि सर्व वासना यांचाही उदय झाला) **तस्मात् तस्य उदयं प्रति, प्रत्यायनं प्रति, उलूलवः घोषाः, सर्वाणि च भूतानि सर्वे च कामाः अनुतिष्ठंति** ( म्हणून सूर्याचा उदय होत असतां, अस्त होत असतां किंवा पुनः पुनः उदय होत असतां, एकच घनगाजें दुमदुमतो, सर्वभूतें आणि सर्वकाम जागृत होतात ) हें आदित्याचें वर्णन आहे ॥३॥

अथ यत्तदजायत गर्भरूपं तस्मिन्नण्डे सोऽसावादित्यस्तमादित्यं जायमानं घोषाः शब्दा उलूलव उरूरवो विस्तीर्णरवा उदतिष्ठन्नुत्थितवन्त ईश्वरस्येवेह प्रथमपुत्रजन्मनि सर्वाणि च स्थावरज-

ङ्मानि भूतानि सर्वे च तेषां भूतानां कामाः काम्यन्त इति विषयाः स्त्रीवस्त्रान्नादयः । यस्मादादित्यजन्मनिमित्ता भूतकामोत्पत्तिस्तस्माद्यत्वेऽपि तस्याऽऽदित्यस्योदयं प्रति प्रत्यायनं प्रत्यस्तगमनं च प्रत्यथवा पुनः पुनः प्रत्यागमनं प्रत्यायनं तत्प्रति तन्निमित्तीकृत्येत्यर्थः । सर्वाणि च भूताणि सर्वे च कामा घोषा उल्लूलवश्चानूत्तिष्ठन्ति । प्रसिद्धं ह्येतदुदयादौ सवितुः ॥ ३ ॥

**सिद्धान्ती**—त्या अंड्यामध्यें जें गर्भरूप उत्पन्न झालें तोच आदित्य होय. तो आदित्य उत्पन्न झाला तेव्हां उत्सवकालीं जसें आपण मोठमोठ्यांदा ईश्वराच्या उत्सव-मूर्तीची स्तुति करितो किंवा राजाच्या पहिल्या पुत्राचा जन्म झाला असतां, मोठ्या आनंदाचे उद्गार काढितो, तसा महारव सूर्योत्पत्तीच्या वेळीं उत्पन्न झाला. सूर्योदय प्रथम झाला त्यावेळेच्या परिस्थितीप्रमाणेंच नाद झाला. आतांही जेव्हां जेव्हां नित्य उदय होतो, तेव्हां तेव्हां सर्व चराचर सृष्टि आणि जीवांच्या वासना उत्पन्न होतात व स्वकार्यामध्यें त्या व्यापृत झाल्या म्हणजेही एकप्रकारचा स्पष्ट आणि अस्पष्ट नाद उत्पन्न होत असतो. सूर्योदय झाल्यावर चराचर सृष्टि जागी होते; आणि जीवांच्या वासना स्त्रिया, वस्त्रें, अन्न इत्यादिविषयक वासनाही जागृत होतात.

**शिष्य**—आणि ज्यापक्षीं आदित्याचा जन्म झाला तेव्हां मात्र जीवांच्या इच्छांचा आविर्भाव प्रथम झाला, त्यापक्षीं अद्यापिही सूर्य उदयाचलावर आला किंवा अस्ताचलाकडे जाऊं लागला म्हणजे सर्वभूतें, सर्वकाम आणि सर्वप्रकारचे शब्द यांना एकप्रकारचें उत्तेजन येत असतें. ही गोष्ट सर्वांच्या पाहण्यांत नित्य आहे.

**सिद्धान्ती**—प्रत्यायन म्हणजे पुनः पुनः आगमन असाही अर्थ आहे. असो; आदित्यनिमित्त उत्सव होतो व जीव उत्तेजित होतात; म्हणूनच आदित्य हें सर्वकारण आहे, असें श्रुति म्हणते. ब्रह्मदृष्टीनें आदित्योपासना करावी असें श्रुतीला सांगावयाचें आहे, तें याचसाठीं होय ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा.

**स य एतमेवं विद्वानादित्यं ब्रह्मेत्युपास्तेऽभ्याशो ह यदेनꣳ साधवो घोषा आ च गच्छेयुरुप च निम्रेडेरन्निम्रेडेरन् ॥ ४ ॥**

**इति तृतीयाध्यायस्यैकोनविंशः खण्डः ॥ १९ ॥**

**इति छान्दोग्योपनिषद्ब्राह्मणे तृतीयोऽध्यायः ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थः—यः एतं आदित्यं ब्रह्म इति एवं विद्वान् उपास्ते** ( या वर्णिलेल्या आदित्याची ब्रह्मदृष्टीनें जो ज्ञानी उत्तम उपासना करितो ) **अभ्याशः एनं साधवः घोषाः यत् आगच्छेयुः च उप-निम्रेडेरन् च निम्रेडेरन्** ( त्याचें अभिनंदन करणारे प्रियघोष त्याला ऐकूं येतील आणि उत्तम प्रकारचें सुख देतील ) सारांश, कर्ण—मधुर सत्यस्तुतीनें त्याला उत्तम सुख होईल ॥ ४ ॥

स यः कश्चिदेतमेवं यथोक्तमहिमानं विद्वान्सन्नादित्यं ब्रह्मेत्युपास्ते स तद्भावं प्रतिपद्यत इत्यर्थः । किंच दृष्टं फलमभ्याशः क्षिप्रं तद्विदो यदिति क्रियाविशेषणमेनमेवंविधं साधवः शोभना घोषाः । साधुत्वं घोषादीनां यदुपभोगे पापानुबन्धाभावः । आ च गच्छेयुश्चोप च निम्रेडेरन्नुपनिम्रेडेरंश्च न केवलमागमनमात्रं घोषाणामुपसुखयेयुश्चोपसुखं च कुर्युरित्यर्थः । द्विरभ्यासोऽध्यायपरिसमाप्त्यर्थ आदरार्थश्च ॥ ४ ॥

इति तृतीयाध्यायस्यैकोनविंशः खण्डः ॥ १९ ॥

इति तृतीयाध्यायः समाप्तः ॥ ३ ॥

सिद्धान्ती—ज्याचें माहात्म्य आपण आतांपर्यंत वर्णन केलें, तो आदित्य ब्रह्म आहे, अशी श्रद्धा ठेऊन जो कोणी विद्वान् आदित्याची एकनिष्ठ उपासना करितो, तो आदित्यस्वरूपाला जाऊन पोहचतो, तो आदित्य होतो; हें अदृष्ट फल आहे. दृष्ट फल असें आहे, कीं लौकरच त्या विद्वानाच्या कानीं उत्तमप्रकारचे पवित्र शब्द ऐकूं येतात. तात्पर्य, या शब्दादिकांच्या साह्यानें तो जे जे उपभोग घेतो, ते सर्व पापशून्य असतात. तेथें पापाचा इवलासा सुद्धां संपर्क नसतो. हे सर्व उपभोग या विद्वान् पुरुषाकडे चालून येतात, इतकेंच नव्हे, तर ते त्याला उत्कृष्टप्रकारचें सुखही देतात. तात्पर्य, आदित्य ब्रह्म आहे, असें ज्ञान होऊन आदित्योपासना सिद्ध झाली म्हणजे उपासकाला आदित्यस्वरूप प्राप्त होतें आणि येथेंही त्याला लौकरच आणि कांहीं कष्ट केल्याशिवाय सर्व प्रकारचे पुण्यापभोग गोचर होऊन ते त्याला सुखकारक होतात. दोनदां आवृत्ति आहे, ती अध्यायसमाप्तीप्रीत्यर्थ व आदरार्थ आहे ॥ ४ ॥

एकोणिसावा खंड समाप्त.

तिसरा अध्याय समाप्त.

---

## अध्याय चौथा.

## खंड पहिला.

वायुप्राणयोर्ब्रह्मणः पाददृष्ट्यध्यासः पुरस्ताद्वर्णितः । अथेदानीं तयोः साक्षाद्ब्रह्मत्वेनोपास्यत्वायोत्तरमारभ्यते । सुखावबोधार्थाऽऽख्यायिका विद्यादानग्रहणविधिप्रदर्शनार्था च । श्रद्धान्नदानानुद्धतत्वादीनां च विद्याप्राप्तिसाधनत्वं प्रदर्श्यत आख्यायिकया.—

सिद्धान्ती—मागच्या अध्यायांत वायु आणि प्राण ब्रह्माचे चरण होत, असा अध्यास करून, अशी दृष्टी ठेऊन, वायु आणि प्राण यांची उपासना करावी, असें सांगितलें. अर्थात् तेथें वायु आणि प्राण हे ब्रह्माचे ( सूत्रात्म्याचे ) चरण आहेत, अशी कल्पना सांगितली. आतां या अध्यायांत प्रथमतः वायु व प्राण या उभयतांची प्रत्यक्ष ब्रह्मदृष्टीनें ( सूत्रात्मदृष्टीनें ) उपासना करण्याचा उपदेश करावयाचा आहे. प्रथम या प्रकरणाला आरंभ केला आहे, तो एक आख्यायिका सांगून केला आहे. एखादी गोष्ट सांगितली म्हणजे ती लवकर समजते. शिवाय, विद्येचें दान कसें करावें, विद्याग्रहण करण्याचा विधि काय, हें दाखविण्यामध्यें ही या गोष्टीचा उपयोग होतो. दृढ श्रद्धा, अन्नदान आणि विनय, इत्यादि गोष्टी विद्याप्राप्तीचीं साधनें आहेत, हेंही या गोष्टीच्या साह्यानें सहजासहजीं समजणार आहे. ऐकाः—

---

### मंत्र पहिला.

**ॐ । जानश्रुतिर्ह पौत्रायणः श्रद्धादेयो बहुदायी बहुपाक्य आस स ह सर्वत आवसथान्मापयांचक्रे सर्वत एव मेऽत्स्यन्तीति ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—पौत्रायणः जानश्रुतिः श्रद्धादेयः, बहुदायी बहुपाक्यः आस ह** ( जनश्रुतीचा पणतु–पुत्राचा पौत्र–जानश्रुति. हा राजा श्रद्धेनें दान करणारा, अत्यंत उदार आणि अन्नवस्त्र देऊन अनेक लोकांचें संरक्षण करणारा असे ) **सर्वतः आवसथान् सः मापयांचक्रे**

ह (चारी दिशांस जेथें जेथें वसति होती, तेथें तेथें या राजानें अन्न-छत्रें घातलीं होतीं ) **सर्वतः एव मे अत्स्यंति इति** ( सर्वत्र मीं दिलेलें अन्न अन्नार्थी लोकांस मिळावें, हा राजाचा हेतु असे. आणि म्हणून त्यानें ठिकठिकाणीं अन्नछत्रें घातलीं होतीं ) ॥ १ ॥

जानश्रुतिर्जनश्रुतस्यापत्यम् । ह ऐतिह्यार्थः । पुत्रस्य पौत्रः पौत्रायणः स एव श्रद्धादेयः श्रद्धापुरःसरमेव ब्राह्मणादिभ्यो देयमस्येति श्रद्धादेयः । बहुदायी प्रभूतं दातुं शीलमस्येति बहुदायी । बहुपाक्यो बहु पक्तव्यमहन्यहनि गृहे यस्यासौ बहुपाक्यः । भोजनार्थिभ्यो बह्वस्य गृहेऽन्नं पच्यत इत्यर्थः । एवंगुणसंपन्नोऽसौ जानश्रुतिः पौत्रायणो विशिष्टे देशे काले च कस्मिंश्चिदास बभूव । स ह सर्वासु दिक्षु ग्रामेषु नगरेषु चाऽऽवसथानेत्य वसन्ति येष्विति आवसथास्तान्मापयांचक्रे कारितवानित्यर्थः । सर्वत एव मे ममान्नं तेष्वावसथेषु वसन्तोऽत्स्यन्ति भोक्ष्यन्त इत्येवमभिप्रायः॥१॥

सिद्धान्ती—मंत्रांतील 'ह' हें पद इतिहाससूचक आहे. जनश्रुतीच्या पुत्राचा नातु जानश्रुति होय. हा एक राजा पूर्वीं होता. तो जें काय दान द्यावयाचें तें श्रद्धापुरःसर ब्राह्मणादिकांस देत असे. तो बहुदायी म्हणजे पुष्कळ द्रव्य देणारा असे.

शिष्य—बहुदायी म्हणजे विपुल धन देणें हा ज्याचा स्वभाव आहे असा, अत्यंत उदार.

सिद्धान्ती—तसेंच, त्याच्या घरीं रोजच्यारोज पुष्कळ अन्न सिद्ध होत असे. जितके कोणी भोजनार्थी अतिथी येतील त्यांस राजमंदिरांत यथेच्छ भोजन मिळत असें. असे त्या राजाचे अनेक सद्गुण दृष्टीस पडत असत.

शिष्य—मंत्रामध्यें असणारी ' आस ह ' हीं पदें स्पष्ट सांगतात कीं, हा जानश्रुति राजा एका विशिष्ट देशामध्यें विशिष्ट कालीं खरोखर असता झाला. तात्पर्य श्रुतीची गोष्ट मनःकल्पित नव्हे.

सिद्धान्ती—बरोबर सांगितलेंस. त्या राष्ट्राच्या चारी ( किंवा आठी ) दिशांस जीं ग्रामें किंवा नगरें असत, तेथें येऊन हजारो अन्नार्थी लोक वसतीस राहत असत. त्यांच्यासाठीं या राजानें त्या त्या ग्रामांत व नगरांत अन्नछत्रें घातलीं होतीं. राहण्याची सोयही तेथें असे. राजाचा हेतु हा असे कीं, या भोजनवसतिगृहांत आलेल्या ब्राह्मणादि अतिथींचें भोजनपानादि व्यवहार सुव्यवस्थित व्हावे ॥ १ ॥

## मंत्र दुसरा.

**अथ ह हꣳसा निशायामतिपेतुस्तद्धैवꣳ हꣳसो हꣳसमभ्युवाद हो होऽयि भल्लाक्ष भल्लाक्ष जानश्रुतेः पौत्रायणस्य समं दिवा ज्योतिराततं तन्मा प्रसाङ्क्षीस्तत्त्वा मा प्रधाक्षीरिति ॥ २ ॥**

अन्वय व अर्थः—अथ निशायां हंसाः अतिपेतुः ह ( नंतर एके संध्याकाळीं कांहीं हंस राजाच्या मंदिराजवळ येते झाले ) **तत् हंसः हंसं एवं अभ्युवाद** ( त्या वेळी त्या हंसांपैकीं एकजण दुसऱ्यास म्हणाला ) **हो, हो, अयि भल्लाक्ष, भल्लाक्ष, पौत्रायणस्य जानश्रुतेः ज्योतिः दिवा समं अततं** ( अरे भल्लाक्षा, अरे भल्लाक्षा,! जनश्रुतीच्या पणतूचें दानतेज स्वर्गसभेप्रमाणें देदीप्यमान असून द्युलोकापर्यंत जाऊन भिडलें आहे) **तत् त्वा मा प्रसाङ्क्षीः, तत् त्वा मा प्रधाक्षीः इति** ( जें या राजाचें तपस्तेज आहे, त्याचा स्पर्श तुला न होवो ! आणि त्यानें तुझें दहन न होवो ! ) **इति** ( इतकें बोलून बोलणारा हंस स्तब्ध झाला ) ॥ २ ॥

तत्रैवं सति राजनि तस्मिन्घर्मकाले हर्म्यतलस्थेऽथ ह हंसा निशायां रात्रावतिपेतुः । ऋषयो देवता वा राज्ञोऽन्नदानगुणैस्तोषिताः सन्तो हंसरूपा भूत्वा राज्ञो दर्शनगोचरेऽतिपेतुः पतितवन्तः । तत्तस्मिन्काले तेषां पततां हंसानामेकः पृष्ठतः पतन्नग्रतः पतन्तं हंसमभ्युवादाभ्युक्तवान्हो होऽयीति भो भो इति संबोध्य भल्लाक्ष भल्लाक्षेत्यादरं दर्शयन्यथा पश्य पश्याऽऽश्चर्यमिति तद्वत् । भल्लाक्षेति मन्ददृष्टित्वं सूचयन्नाह । अथवा सम्यग्ब्रह्मदर्शनाभिमानवत्त्वात्तस्यासकृदुपालब्धस्तेन पीड्यमानोऽमार्षितया तत्सूचयति भल्लाक्षेति । जानश्रुतेः पौत्रायणस्य समं तुल्यं दिवा द्युलोकेन ज्योतिः प्रभास्वरमन्नदानादिजनितप्रभावजमाततं व्याप्तं द्युलोकस्पृगित्यर्थः । दिवाऽह्ना वा समं ज्योतिरित्येतत् । तन्मा प्रसाङ्क्षीः सञ्जनं सक्तिं तेन ज्योतिषा संबन्धं मा कार्षीरित्यर्थः ।

तत्प्रसञ्जनेन तज्ज्योतिस्त्वा त्वां मा प्रधाक्षीर्मा दाहीत्वित्यर्थः पुरुषव्यत्ययेन मा प्रधाक्षीदिति ॥ २ ॥

**सिद्धान्ती**—याप्रमाणें हा राजा सद्धर्मानें राज्य करीत होता. एके दिवशीं उष्णकालाचे संध्याकाळीं तो राजा आपल्या मंदिराच्या गच्चीवर बसला होता. तेव्हां तेथें कांहीं हंस अकस्मात् येते झाले.

**शिष्य**—हे हंस कोण ?

**सिद्धान्ती**—राजाच्या अन्नदातृत्वादिगुणांमुळें संतुष्ट झालेले कोणी देव अथवा ऋषी हंसांचीं स्वरूपें धारण करून राजास पाहण्यासाठीं अथवा त्याला आपलें दर्शन देण्यासाठीं तेथें आले होते. असो; त्या हंससंघांतील एक पाठीमागें राहिलेला हंस लवकर लवकर पुढें जाणाऱ्या हंसाला हांक मारून म्हणाला ! भो भो ! भल्लाक्ष ! भल्लाक्ष !

**शिष्य**—दोनदोनदां कशाला हांक मारिली त्यानें ?

**सिद्धान्ती**—आदर दाखविण्यासाठीं. आगत्यानें हांक मारावयाची असली म्हणजे आपण दोनदां हांक मारतों; शिवाय, आपल्या मित्रानें एखादी वस्तु अवश्य पाहावी, असें आपल्यास वाटत असेल, तर आपण त्याला 'पहा पहा' असें द्विरुक्तीनें सांगतों.

**शिष्य**—भल्लाक्ष या नांवाचा अर्थ चांगला आहे. वस्तुतः भद्राक्ष असें सुंदर नेत्राच्या पुरुषास म्हणतात. त्याचेंच भल्लाक्ष हें रूप होतें.

**सिद्धान्ती**—येथें तसाच केवळ अर्थ नाहीं. पुरोगामी हंसाची दृष्टि मंद होती, हें येथें पृष्ठगामी हंसाला सुचवावयाचें आहे. मंदत्व कां, हें तुझें तुलाच इतक्यांत कळेल. अथवा 'तुला यथार्थ ब्रह्मदर्शनाचा अभिमान झाला आहे' अशी पुरोगामी हंसानें पृष्ठगामी हंसाची पुष्कळ निंदा केली होती. त्या निंदेनें त्रस्त होऊन संतप्त झालेला पृष्ठगामी हंस भल्लाक्ष या नांवानें सुचवितो कीं, तुझेंही ज्ञान अत्यंत मंद आहे.

**पूर्व०**—नुसत्या नांवावर एवढें व्याख्यान कशाला ? त्यानें पुरोगामी हंसाला काय म्हटलें, तें सांगा ?

**सिद्धान्ती**—त्याचें म्हणणें हेतूसह सांगितलें म्हणजे व्याख्यानाचें स्वारस्य तुम्हांस कळेल. असो, पृष्ठगामी हंस म्हणालाः हा राजा जनश्रुतीचा पणतु आहे. अन्नदानादिकांच्या पुण्यशीलसामर्थ्यानें या जानश्रुतीचें प्रखर तेज स्वर्लोकाच्या तेजाशीं खुशाल तोलितां येईल. ह्या तेजानें भूलोक आणि भुवर्लोक व्यापून स्वर्लोकालाही स्पर्श केला आहे.

**सिद्धान्ती**—दिवा म्हणजे दिवसाप्रमाणें; दिवसा सूर्य प्रकाश जसा असतो तसें ?

**सिद्धान्ती**—ठीक आहे; असो पृष्ठगामी हंस म्हणतोः हें तेज हे भल्लाक्षा, तुला स्पर्श न करो. तुझा याचा संबंध न येवो ! कारण याच्या तेजाशीं तुझा स्पर्श झाला, तर तूं जळून जाशील. हे भल्लाक्षा ! तुझें दहन होऊं नये; म्हणून मी तुला सुचवून ठेवतों कीं, तूं फार पुढें जाऊं नकोस. तात्पर्य, जानश्रुतीचें तेज इतकें प्रखर होतें, तरी पुरोगामी हंसाला तें दिसलें नाहीं, हें अगोदर सुचविण्यासाठीं पृष्ठगामी हंसानें पुरोगामीला 'भल्लाक्ष' या निंदाव्यंजक नांवानें संबोधिलें आहे.

**शिष्य**—' प्रधाक्षीः ' हे द्वितीयपुरुषीं एकवचनीं रूप आहे. परंतु त्याचा तत् हा कर्ता आहे, म्हणून ' प्रधाक्षीत् ' असें रूप श्रुतीस अभिमत होतें, असें समजलें पाहिजे ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**तमु ह परः प्रत्युवाच कम्वर एनमेतत्सन्तँ सयुग्वानमिव रैक्कमात्थेति यो नु कथँ सयुग्वा रैक्क इति ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थः—परः तं प्रत्युवाच उ ह** (त्याला दुसरा म्हणता झाला) **अरे ! कं उ एनं एतत् संतं सयुग्वानं रैक्वं इव आत्थ इति** ( अरे ! हा राजा निकृष्ट असतां नित्य शकटासह असणाऱ्या रैक्वाप्रमाणे याची तूं काय स्तुती केलीस ?) **यः ' नु सयुग्वा रैक्वः ' कथं नु ?** (पृष्ठगामीनें विचारिलें; जो तूं ' सयुग्वा रैक्व ' म्हणून म्हणालास, तो कोण होता व तो 'सयुग्वा' कसा ? ) ॥ ३ ॥

तमेवमुक्तवन्तं पर इतरोऽग्रगामी प्रत्युवाचारे निकृष्टोऽयं राजा वराकस्तं कमु एनं सन्तं केन माहात्म्येन युक्तं सन्तमिति कुत्सयत्येनमेवं सबहुमानमेतद्वचनमात्थ रैक्कमिव, सयुग्वानं सह युग्वना गन्त्र्या वर्तत इति सयुग्वा रैक्कः । तमिवाऽऽत्थैनम् । अननुरूपमस्मिन्नयुक्तमीदृशं वक्तुं रैक्क इवेत्यभिप्रायः । इतरश्चाऽऽह । यो नु कथं त्वयोच्यते सयुग्वा रैक्क इत्युक्तवन्तं भल्लाक्ष आह शृणु यथा स रैक्कः ॥ ३ ॥

**सिद्धान्ती**—हें भाषण ऐकून अग्रगामी प्रत्युत्तर देता झाला: "अरे! हा राजा तर अत्यंत नीच योग्यतेचा आहे. हा वराक म्हणजे अति अल्प भागधेयाचा पुरुष आहे. याच्या जवळ अशी कोणती मोठी गोष्ट आहे, कीं जिच्यामुळें याचा एवढा बहुमानपुरःसर तूं उल्लेख केलास? तूं म्हणालास, तशी रैक्वाची योग्यता होती, हें खरें. सारांश या निंद्य राजाची एवढी स्तुति करणारा तूं तरी मोटा विद्वानच दिसतोस!

**शिष्य**—मंत्रांतील 'सयुग्वानं' या विशेषणाचा अर्थ काय?

**सिद्धान्ती**—युज जोडणें, हें तुला ठाऊकच आहे. युग (जूं) वाहतो तो युग्य म्हणजे बैल किंवा घोडा. जिला बैल किंवा घोडा जोडतात ती युग्वा म्हणजे शकटी (छकडा). ती शकटी ज्याच्या जवळ नेहमीं असते, तो सयुग्वा. रैक्वाजवळ नेहमीं लहान गाडी असे. लहान गाडीच्या सांवलीमध्यें रैक्व नित्य राहत असे. असो; पुरोगामी म्हणतो: त्या रैक्वाच्या माहात्म्याप्रमाणें याचें तूं वर्णन करतोस, हें काय? खरोखर पाहतां तुझें वर्णन अयोग्य अथवा अनाठायीं आहे. हें ऐकून पृष्ठगामी हंस म्हणाला 'भल्लाक्षा! तूं ज्या सयुग्वा रैक्वाचा उल्लेख केलास तो कोण होता बरें? 'सयुग्वा' हें त्याला नांव कां? तें ऐकून भल्लाक्ष म्हणाला, तो कोण होता, तें मी सांगतों ऐक.

तात्पर्य, केवळ धर्मनिष्ठ असणारा मात्र हा बिचारा राजा तुझ्या अयथार्थ स्तुतीला योग्य नाहीं. ज्ञानी रैक्वाची ही असली स्तुति योग्य आहे. असो; ह्या रैक्वाचें वर्णन पुढील दोन तीन मंत्रांत आलें आहे ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा.

**यथा कृतायविजितायाधरेयाः संयन्त्येवमेनꣳसर्वं तदभिसमैति यत्किंच प्रजाः साधु कुर्वन्ति यस्तद्वेद यत्स वेद स मयैतदुक्त इति ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थः—यथा कृतायविजिताय अधरेयाः संयंति** (ज्याप्रमाणें सर्वांवर विजय मिळविणाऱ्या चोहीच्या फांशाकडे खालचे दानाचे फासे जातात) **एवं यत् किंच साधु कुर्वंति प्रजाः, तत् एनं सर्वं अभिसमैति** (त्याप्रमाणें त्या रैक्वाकडे सर्व प्रजा जें काय साधु

कर्म करितात तें जातें ) फाशाच्या चार ह्या दानामध्यें एक, दोन, तीन हीं दानें गर्भित होतात, त्याप्रमाणें रैक्वाच्या सर्व सत्कृत्यांमध्यें आणि ज्ञानामध्यें सर्वलोकांचें सत्कर्म आणि यथार्थ ज्ञान अंतर्भूत होतें ) यत् सः वेद, तत् यः वेद ( रैक्वाला जें ज्ञान होतें तें ज्याला ज्ञात होतें—तो—सर्वज्ञ होतो ) सः मया एतत् उक्तः ( रैक्वाचें ज्ञान असें मीं सांगित-त्याप्रमाणें होतें ) सारांश रैक्वाला जें सर्वज्ञत्व होतें, तें सर्वज्ञत्व ज्याला प्राप्त होतें, त्याच्याही ज्ञानामध्यें सर्व लोकांचें ज्ञान अंतर्भूत होतें ) ॥ ४ ॥

यथा लोके कृतायः कृतो नामायो द्यूतसमये प्रसिद्धश्चतुरङ्कः स यदा जयति द्यूते प्रवृत्तानां तस्मै विजिताय तदर्थमितरे त्रिद्व्येकाङ्का अधरेयास्त्रेताद्वापरकलिनामानः संयन्ति संगच्छन्तेऽन्तर्भवन्ति । चतुरङ्के कृताये त्रिद्व्येकाङ्कानां विद्यमानत्वात्तदन्तर्भवन्तीत्यर्थः । यथाऽयं दृष्टान्त एवमेनं रैक्वं कृतायस्थानीयं त्रेताद्यायस्थानीयं सर्वं तदभिसमैत्यन्तर्भवति रैक्वे । किं तद्यत्किंच लोके सर्वाः प्रजाः साधु शोभनं धर्मजातं कुर्वन्ति तत्सर्वं रैक्वस्य धर्मेऽन्तर्भवति । तस्य च फले सर्वप्राणिधर्मफलमन्तर्भवतीत्यर्थः । तथाऽन्योऽपि कश्चिद्यस्तद्वेद्यं वेद । किं तद्यद्वेद्यं स रैक्वो वेद । तद्वेद्यमन्योऽपि यो वेद तमपि सर्वप्राणिधर्मजातं तत्फलं च रैक्वमिवाभिसमैतीत्यनुवर्तते । स एवंभूतो मया विद्वानेतदुक्त एवमुक्तो रैक्ववत्स एव कृतायस्थानीयो भवतीत्यभिप्रायः ॥ ४ ॥

सिद्धान्ती—व्यवहारामध्यें आपण फांसे खेळत असतांना कांहीं एक नियम करून ठेवीत असतों. त्या नियमांमध्यें एक नियम असा आहे कीं खेळण्यांतील फांशावर जीं दानें असतात, त्यांतील चार या दानाला कृत असें म्हणावें. 'अय' म्हणजे दान, डावांतील दान. द्यूत खेळण्यामध्यें चार हें दान पडून डाव जिंकला म्हणजे त्याच्या करितां इतर दानें हीं—

शिष्य—इतर दानें म्हणजे ?

सिद्धान्ती—फांशाच्या चार ही बाजूंवर एक, दोन, तीन अशीं निरनिराळीं चिन्हें असतात. हीं सर्व खालच्या प्रतीचीं दानें होत. तीन या दानाला त्रेता, दोन याला द्वापर आणि एक याला कलि अशीं अनुक्रमें नांवें आहेत. हीं त्रेता, द्वापर आणि कलि नांवांचीं दानें कृताला म्हणजे वर सांगितलेल्या चार या दानाला

उपकारक म्हणजे अंगभूत होतात. अथवा या तिन्ही दानांचा अंतर्भाव चार या दानामध्यें होतो.

शिष्य—उघडच आहे. चारामध्यें एक, दोन, तीन या आंकड्यांचा समावेश होतो. चारामध्यें तीन आहेत, तसेच दोन आणि एकही आहेतच; तेव्हां चार या दानांत बाकीच्यांचा अंतर्भाव व्हावा.

सिद्धान्ती—तात्पर्य, द्यूत खेळणारांमध्यें कृतनामक दान पडून ज्यानें डाव जिंकला तो विजित. तो अधरेयांचा—

शिष्य—अधरेय म्हणजे ? विजित म्हणजे ज्याचा जय झाला आहे तो, हें समजलें. पण अधरेय म्हणजे ?

सिद्धान्ती—अधरेय म्हणजे खालच्या प्रतीचा, कमी प्रतीचा. एक, दोन, तीन, अशी दानें ज्यांस पडली आहेत, असे लोक. असो, तात्पर्य एक, दोन, तीन हीं दानें ज्यांस पडली आहेत ते अधरेय. हीं पडलेलीं दानें जयशील कृतनामक दानामध्यें अंतर्भूत होतात.

पूर्व०—आपला प्रस्तुतविषय काय आहे, आणि तुम्हीं फांशाच्या खेळाची मीमांसा काय चालविली आहे ?

सिद्धान्ती—हा दृष्टांत आहे. ज्याप्रमाणें कमी प्रतीची त्रेतादि, सर्व दानें श्रेष्ठ म्हणजे कृतनामक दानामध्यें मात्र जाऊन मिसळतात, त्याप्रमाणें ह्या रैक्वामध्यें सर्व श्रेष्ठ पुरुषांचा अंतर्भाव होतो.

पूर्व०—सर्व तें काय ?

सिद्धान्ती—व्यवहारांत सर्व लोक जीं काय साधुकर्मे किंवा पुण्यकर्मे करितात, तीं सर्वच्या सर्व रैक्वाच्या धर्मामध्यें जाऊन मिसळतात. तात्पर्य, रैक्वाच्या धर्मज्ञानांत इतर सर्व धर्मांचें ज्ञान अंतर्भूत होतें. चार पडले म्हणजे एक, दोन किंवा तीन पडल्याचें श्रेय येतें, समुद्राचें गोड जल सर्व नदी, तळीं यांचें कार्य करितें, त्याप्रमाणें रैक्वाचें ज्ञान, इतर सर्व ज्ञानांचीं कृत्यें करितें, इतर सर्व ज्ञानें त्यांत अंतर्भूत होतात. रैक्वाला जें ज्ञान प्राप्त झालें होतें, ते ज्ञान आणि तो जें धर्माचरण करित असे, तो धर्म ( सदाचार ) यांची प्राप्ति करून घेतली म्हणजे इतर सर्वांच्या ज्ञानाचें व धर्मांचें ज्ञान प्राप्त झालें, असें होतें. अर्थात् रैक्वाला जें फल प्राप्त झालें त्या फलांत सर्व जीवांच्या धर्मफलांचा समावेश होतो. याचप्रमाणें रैक्वाला जें ज्ञान प्राप्त झालें होते, त्यामध्यें सर्व ज्ञानांचा समावेश होतो. असो; तें ज्ञान तद्धर्मासह जो दुसरा कोणी तपस्वी आपलेसें करून घेतो, त्याच्याही ज्ञानामध्यें आणि धर्मामध्यें सर्व जीवांकडून संपादिलेलें ज्ञान आणि अनुष्ठित केलेला धर्म या सर्वांचा समावेश होतो. तात्पर्य, तो रैक्वतुल्य होतो. पुरोगामी हंस पृष्ठगामीला म्हणतो: अशा

अतीव श्रेष्ठ योग्यतेचा रैक्व योगी होता. आणि म्हणून मी त्याचा प्रथम उल्लेख केला. असो; रैक्वज्ञान असणारा पुरुष रैक्वाप्रमाणेंच कृतायस्थानीय होतो.

सिद्धान्ती—कृतायस्थानीय म्हणजे कृत नामक दान जसें सर्वश्रेष्ठ आहे, तसा तो पुरुष श्रेष्ठ होतो. त्याचें ज्ञान श्रेष्ठतम आणि त्याचा धर्मही श्रेष्ठतम होतो. अर्थात् जानश्रुतीच्या कल्याणासाठीं रैक्वाचें हें सर्व वर्णन हंसानें केलें आहे ॥ ४ ॥

---

## मंत्र पांचवा.

**तदु ह जानश्रुतिः पौत्रायण उपशुश्राव स ह संजिहान एव क्षत्तारमुवाचाङ्गारे ह सयुग्वानमिव रैक्वमात्थेति यो नु कथꣳ सयुग्वा रैक्व इति ॥ ५ ॥**

अन्वय व अर्थः—जानश्रुतिः पौत्रायणः तत् उ उपशुश्राव ह ( जानश्रुति पौत्रायणानें हें सर्व श्रवण केलें ) सः संजिहानः एव क्षत्तारं उवाच ( निजून उठतां क्षणीं तो क्षत्त्याला म्हणाला, आपल्या शस्त्रधारी द्वारपाळाला म्हणाला ) अंग, अरे, सयुग्वानं रैक्वं इव आत्थ इति (सयुग्वा रैक्वाप्रमाणें ज्ञान असावें, असें त्यानें—हंसानें—सांगितलें ) यः सयुग्वा रैक्वः–सः–कथं नु ( सयुग्वा रैक्व असें ज्याचें नांव आहे तो कसा आहे बरें? तो सयुग्वा कसा ? ) ॥ ५ ॥

---

## मंत्र सहावा.

**यथा कृतायविजितायाधरेयाः संयन्त्येवमेनꣳ सर्वं तदभिसमैति यत्किंच प्रजाः साधु कुर्वन्ति यस्तद्वेद यत्स वेद स मयैतदुक्त इति ॥ ६ ॥**

अन्वय व अर्थः—चौथ्या मंत्राचें संपूर्ण अवतरण येथें आहे; म्हणून तेथीलच अन्वय व अर्थ येथें आहे, असें समजावें. पुरोगामी हंसानें जें रैक्ववर्णन केलें त्याची आवृत्ति जानश्रुतिराजानें केली आहे ॥ ६ ॥

तदु ह तदेतदीदृशं हंसवाक्यमात्मनः कुत्सारूपमन्यस्य विदुषो रैक्वादेः प्रशंसारूपमुपशुश्राव श्रुतवान्हर्म्यतलस्थो राजा जानश्रुतिः पौत्रायणः। तच्च हंसवाक्यं स्मरन्नेव पौनःपुन्येन रात्रिशेषमतिवाहयामास। ततः स बन्दिभी राजा स्तुतियुक्ताभिर्वाग्भिः प्रतिबोध्यमान उवाच क्षत्तारं संजिहान एव शयनं निद्रां वा परित्यजन्नेव हेऽङ्ग वत्सारे ह सयुग्वानमिव रैक्वमात्थ किं माम्। स एव स्तुत्यर्हो नाहमित्यभिप्रायः। अथवा सयुग्वानं रैक्वमात्थ गत्वा मम तद्दिदृक्षा, तदेवशब्दोऽवधारणार्थोऽनर्थको वा वाच्यः। स च क्षत्ता प्रत्युवाच रैक्वानयनकामो राज्ञोऽभिप्रायज्ञो यो नु कथं सयुग्वा रैक्व इति, राज्ञैवं चोक्त आनेतुं तच्चिह्नं ज्ञातुमिच्छन्यो नु कथं सयुग्वा रैक्व इत्यवोचत्। स च भल्लाक्षवचनमेवावोचत्॥ ५॥ ६॥

सिद्धान्ती—दोन पासून चार या मंत्रांत जो हंससंवाद झाला, तो राजानें ऐकला. या संवादांत आपली कुत्सा म्हणजे निंदा होती. हंसभाषणांत रैक्व उपमान झाला, श्रेष्ठ झाला. तात्पर्य, रैक्वादि ज्ञानी पुरुषाची प्रशंसा होती. जानश्रुतीनें हा सर्व संवाद हर्म्यतलावर बसून ऐकिला, होता, हें तुम्ही विसरलां नसालच. हंसाच्या त्या बोलण्याचें राजाला वारंवार स्मरण झालें, म्हणून त्याला झोंप आली नाहीं. ती रात्र त्यानें कशी तरी कंठिली. कारण त्याचें मन उद्विग्न झालेलें होतें. प्रातःकालीं स्तुतिपाठक ( बंदिजन ) येऊन स्तुति करूं लागले, तेव्हां किंचित् निद्रित झालेला तो राजा जागा झाला. त्याबरोबर निद्रागार सोडून बाहेर येऊन क्षत्त्याला म्हणजे शस्त्रधारी द्वारपालाला रात्रीचें वर्तमान सांगून राजा म्हणाला: अरे! हे पहा, नित्य शकटासहवर्तमान असणाऱ्या रैक्वाबरोबर माझी काल रात्रीं तुलना झाली. मीं रैक्वाप्रमाणें ज्ञानसंपादन करावें व धर्म आचरावा असें तो हंस म्हणाला. सारांश, रैक्व हा मात्र स्तुतीला योग्य आहे, मी योग्य नाहीं, असें सांगण्याचा त्या हंसाचा अभिप्राय होता.

शिष्य—अथवा राजाचे असेंही म्हणणें असेल कीं, “ रैक्वाला पाहण्याची मला अत्यंत इच्छा आहे, तेव्हां तो रैक्व कोठें राहतो, तें पाहून ‘ मी त्याच्या दर्शनाला येऊं कां ? ’ असें त्याला विचार!” असा अर्थ केला म्हणजे मंत्रांतील ‘ इव ’ शब्दाचा अर्थ ‘प्रमाणें’ असा नसून ‘ मात्र ’ असा असावा, असें होतें.

सिद्धान्ती—किंवा ‘ इव ’ शब्दाला अर्थच नाहीं, असें ही समजावें. असो; राजाचा अभिप्राय जाणून घेऊन रैक्वाला आणण्याविषयीं उत्सुक झालेला क्षत्ता

( द्वारपाळ, बंदिगण किंवा राजसंरक्षक ) म्हणालाः ' तो सयुग्वा रैक्व कोणत्या स्वरूपाचा आहे ? ' तेव्हां त्याचें स्वरूप जाणूं इच्छिणाऱ्या व त्यास आणूं इच्छिणाऱ्या क्षत्त्याला रैक्वाची ओळख पटून त्याला त्यानें घेऊन यावें, अशी इच्छा करणारा राजा भल्लाक्षानें रैक्वस्वरूप वर्णिलें होतें, त्याचीच पुनः आवृत्ति करिता झाला ॥ ५ ॥ ६ ॥

---

## मंत्र सातवा.

**स ह क्षत्ताऽन्विष्य नाविदमिति प्रत्येयाय तꣳ होवाच यत्रारे ब्राह्मणस्यान्वेषणा तदेनमर्च्छेति ॥ ७ ॥**

**अन्वय व अर्थः—सः क्षत्ता अन्विष्य ' न अविदं ' इति प्रत्येयाय ह** ( पुष्कळ शोध करून क्षत्त्यानें पाहिलें, पण व्यर्थ. तो परत आला आणि म्हणाला, मला रैक्व सांपडला नाहीं,) **तं ह उवाच** ( त्याला राजा म्हणाला ) **अरे यत्र ब्राह्मणस्य अन्वेषणा, तत् एनं अर्च्छ इति** ( जेथें ब्रह्मवेत्ते राहतात, त्या एकांत स्थलीं जाऊन रैक्वाचा शोध कर; जा ) ॥ ७ ॥

तस्य स्मरन्स ह क्षत्ता नगरं ग्रामं वा गत्वाऽन्विष्य रैक्वं नाविदं न व्यज्ञासिषमिति प्रत्येयाय प्रत्यागतवान् । तं होवाच क्षत्तारमरे यत्र ब्राह्मणस्य ब्रह्मविद एकान्तेऽरण्ये नदीपुलिनादौ विविक्ते देशेऽन्वेषणाऽनुमार्गणं भवति तत्तत्रैनं रैक्वमर्च्छ ऋच्छ गच्छ तत्र मार्गणं कुर्वित्यर्थः ॥ ७ ॥

सिद्धान्ती—राजाचें म्हणणें ध्यानांत ठेऊन त्या क्षत्त्यानें नगरें व ग्रामें धुंडाळलीं; परंतु त्याला कोठेंही रैक्वाचें स्वरूप असणारा पुरुष सांपडला नाहीं. अर्थात् तो विन्मुख परत आला. राजा त्याला म्हणाला, अरे ! अरण्यामध्यें किंवा नदीतटावर ( पुळणीवर ) असणारे निर्जन प्रदेशांत ब्रह्मवेत्त्यांचा शोध करणें योग्य आहे. ब्रह्मवेत्ते निर्मनुष्य प्रदेशांत राहतात. तेव्हां अशाठिकाणीं जा, तेथें तुला रैक्व महात्मा सांपडेल. तूं सर्व निर्जन प्रदेश शोधून पहा. जा. असा निराश होऊं नको ॥ ७ ॥

---

## मंत्र आठवा.

**सोऽधस्ताच्छकटस्य पामानं कषमाणमुपोपविवेश तꣳ हाभ्युवाद त्वं नु भगवः सयुग्वा रैक्क इत्यहꣳ ह्यरा३ इति ह प्रतिजज्ञे स ह क्षत्ताऽविदमिति प्रत्येयाय ॥ ८ ॥**

**इति चतुर्थाध्यायस्य प्रथमः खण्डः ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—सः शकटस्य अधस्तात् पामानं कषमाणं उप उपविवेश** ( शेवटीं शकटाच्या आश्रयानें असणाऱ्या रैक्काची आणि त्याची गांठ पडली. तो अंगावर असलेले फोड खाजवीत बसला होता. त्याच्या जवळ विनयानें जाऊन क्षत्ता त्याच्या जवळ बसला ) **तं अभ्युवाद ह** ( त्याला नमन करून म्हणाला ) **त्वं नु भगवः सयुग्वा रैक्वः इति** ( हे भगवन्, आपणच सयुग्वा रैक्क आहांत ना ? ) **'अरे अहं हि' इति प्रतिजज्ञे** ('अरे ! हो हो ! मींच रैक्व आहे' असें तो रैक्व अनादरी निस्पृहतेनें म्हणाला; हें अनादरत्व क्षत्त्यानें जाणलें ) **'सः क्षत्ता अविदं ह' इति प्रत्येयाय** ( आपल्याला रैक्व सांपडला, असें समजून तो क्षत्ता राजाकडे परत आला ) ॥ ८ ॥

इत्युक्तः क्षताऽन्विष्य तं विजने देशेऽधस्ताच्छकटस्य गन्त्र्याः पामानं खर्जुं कषमाणं कण्डूयमानं दृष्ट्वाऽयं नूनं सयुग्वा रैक्क इत्युप समीप उपविवेश विनयेनोपाविष्टवान्। तं च रैकं हाभ्युवादोक्तवान्। त्वमसि हे भगवो भगवन्सयुग्वा रैक्क इति। एवं पृष्टोऽहमस्मि ह्यरा ३ अर इति हानादर एव प्रतिजज्ञेऽभ्युपगतवान्। स तं विज्ञायाविदं विज्ञातवानस्मीति प्रत्येयाय प्रत्यागत इत्यर्थः ॥ ८ ॥

इति चतुर्थाध्यायस्य प्रथमः खण्डः ॥ १ ॥

सिद्धान्ती—याप्रमाणें राजाचें भाषण ऐकून त्या राजसेवकानें मनुष्याची वसति नाहीं अशी अरण्यें धुंडाळलीं. तेव्हां एकांत स्थलीं एका गाडीच्या खालीं

बसलेला व अंगावर खरजेचे फोड झाले होते ते खाजवीत असलेला पुरुष त्यानें पाहिला. खरोखरच हाच सयुग्वा रैक्क असावा, असा आपल्या मनाशीं निश्चय करून तो त्याच्या जवळ भक्तिभावानें गेला आणि नमस्कार करून खालीं बसला. नंतर हात जोडून तो क्षत्ता रैक्वाला म्हणाला: 'भगवन्! ज्या महापुरुषाला सयुग्वा रैक्क असें म्हणतात तें आपणच ना?' हा प्रश्न ऐकून 'अरे! हो हो मींच तो रैक्क; काय करावयाचें आहे, तुझी ओळख करून घेऊन मला!' असें रैक्वानें आदरशून्यतेनें उत्तर दिलें. हा अनादर क्षत्त्याच्याही लक्षांत आला.

शिष्य—हा अनादराचा भाग मला समजला नाहीं?

सिद्धान्ती—क्षत्त्यानें रैक्काच्या अनादराचा असा अर्थ केला कीं, रैक्काला धनधान्यादिकांनीं प्राप्त होणारा गृहस्थाश्रम हवा आहे. पण माझ्या हातून धन मिळणें शक्य नाहीं, हें असें रैक्कानें अनुमान केलें आणि म्हणून तो माझ्याशीं उद्धटपणानें वागला असावा. हें सर्व क्षत्त्यानें जाणिलें. असो; रैक्वाची व आपली गांठ खास पडली, असें निश्चयानें जाणून क्षत्ता राजाकडे परत गेला आणि त्याला सर्व वृत्तांत सांगता झाला ॥ ८ ॥

पहिला खंड समाप्त.

---

## खंड दुसरा.

### मंत्र पहिला.

**तदु ह जानश्रुतिः पौत्रायणः षट्शतानि गवां निष्कमश्वतरीरथं तदादाय प्रतिचक्रमे तं हाभ्युवाद ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—तत् उ जानश्रुतिः पौत्रायणः गवां षट्शतानि, निष्कं, अश्वतरीरथं, तत् अदाय प्रतिचक्रमे ह; तं अभ्युवाद** ह (नंतर जानश्रुतीनें सहाशें गायी, एक कंठांत घालण्याचा हार, अश्वतरीनें युक्त असा रथ आणि पुष्कळशी संपत्ती घेतली आणि रैक्वाकडे तो राजा जाता झाला. तेथें जाऊन त्यानें रैक्वाला नमस्कार केला आणि राजा भक्तिपूर्वक म्हणाला) ॥ १ ॥

तत्तत्र ऋषेर्गार्हस्थ्यं प्रत्याभिप्रायं बुद्ध्वा धनार्थितां च ह, एव जानश्रुतिः पौत्रायणः षट्शतानि गवां निष्कं कण्ठहारमश्वतरीरथमश्वतरीभ्यां युक्तं रथं तदादाय धनं गृहीत्वा प्रतिचक्रमे रैक्कं गतवान्। तं च गत्वाऽभ्युक्तवान् ॥ १ ॥

सिद्धान्ती—रैक्व ऋषीला गृहस्थाश्रम स्वीकारावयाचा आहे व एतदर्थच त्याला धनेच्छा आहे, असें क्षत्त्याच्या सांगण्यावरून राजास समजलें. तेव्हां सहाशें गायी, कंठहार, अश्वतरींनीं युक्त असलेला रथ–

शिष्य—अश्वतरी म्हणजे?

सिद्धान्ती—अश्वतरी हा स्त्रीलिंगी शब्द आहे. अश्वतर म्हणजे खेचर. असो; पुष्कळसें धनही घेऊन रैक्क ऋषी होता तेथें राजा गेला; आणि त्याला नमस्कार करून म्हणाला. राजाची प्रार्थना पुढील मंत्रांत आली आहे ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**रैक्केमानि षट्शतानि गवामयं निष्कोऽयमश्वतरीरथो नु म एतां भगवो देवताꣳ शाधि यां देवतामुपास्स इति ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थ—रैक्व! इमानि गवां षट्शतानि, अयं निष्कः अयं अश्वतरी रथः** ( हे रैक्व ऋषे! ह्या सहाशें गायी, हा कंठहार, हा अश्वतरी रथ–मी आपल्यास समर्पण करितों ) **भगवः, यां देवतां उपास्से, एतां देतवां मे अनुशाधि नु** ( भगवन् , ज्या देवतेची आपण उपासना करितां, त्या देवतेच्या स्वरूपाचा उपदेश आपण दयाळूपणानें मला करावा. करालना? ) **इति** ( ही राजाची प्रार्थना होती ) ॥ २ ॥

हे रैक्क गवां षट् शतानीमानि तुभ्यं मयाऽऽनीतान्ययं निष्कोऽश्वतरीरथश्चायमेतद्धनमादत्स्व भगवोऽनुशाधि च मे मामेतां यां च देवतां त्वमुपास्से तद्देवतोपदेशेन मामनुशाधीत्यर्थः ॥ २ ॥

सिद्धान्ती—राजा म्हणाला, हे भगवन् रैक्‍क ! या सहाशें गायी आपल्यास समर्पण करण्याठीं मीं आणिल्या आहेत. तसेंच हा निष्क ( कंठहार ), हा अश्वतरीरथ आणि हें धन हें सर्व कृपा करून स्वीकृत करा. महाराज ! ज्या देवतेची आपण उपासना केली आहे व करीत अहां, त्या देवतेचा उपदेश कृपा करून मला करावा, अशी माझी सविनय प्रार्थना आहे ॥ २ ॥

## मंत्र तिसरा.

**तमु ह परः प्रत्युवाचाह हारेत्वा शूद्र तवैव सह गोभिरस्त्विति तदु ह पुनरेव जानश्रुतिः पौत्रायणः सहस्रं गवां निष्कमश्वतरीरथं दुहितरं तदादाय प्रतिचक्रमे ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थः—परः तं उ ह प्रत्युवाच** ( त्याला परानें म्हणजे रैक्वानें उत्तर दिलें ) **अह शूद्र ! हारेत्वा तवैव गोभिः सह अस्तु, इति** ( हे शूद्रा, हारानें युक्त असलेली ही गाडी आणि ह्या गायी तुझ्या तुलाच असूं देत; हें रैक्वाचें उत्तर होतें ) **तत् उ ह जानुश्रुतिः पौत्रायणः पुनः एव गवां सहस्रं, निष्कं, अश्वतरीरथं, दुहितरं तत् आदाय प्रतिचक्रमे** ( तें पाहून जानश्रुतीनें आणखी हजार गायी, निष्क, अश्वतरी रथ, आपली कन्या आणि पुष्कळ धन आपल्या बरोबर घेतलें आणि रैक्वाकडे गेला ) ॥ ३ ॥

तमेवमुक्तवन्तं राजानं प्रत्युवाच परो रैक्कः । अहेत्ययं निपातो विनिग्रहार्थीयोऽन्यत्रेह त्वनर्थकः । एवशब्दस्य पृथक्प्रयोगात् । हारेत्वा हारेण युक्तेत्वा गन्त्री सेयं हारेत्वा गोभिः सह तवैवास्तु तवैव तिष्ठतु न ममापर्याप्तेन कर्मार्थमनेन प्रयोजनमित्यभिप्रायो हे शूद्रेति । ननु राजाऽसौ क्षत्तृसंबन्धात्स ह क्षत्तारमुवाचेत्युक्तम् । विद्याग्रहणाय च ब्राह्मणसमीपोपगमाच्छूद्रस्य चानधिकारात्कथमिदमननुरूपं रैक्केणोच्यते हे शूद्रेति । तत्राऽऽहुराचार्याः—हंसवचनश्रवणाच्छुगेनमाविवेश । तेनासौ शुचा श्रुत्वा रैक्कस्य महिमानं वा द्रवतीति ऋषिरात्मनः परोक्षज्ञतां दर्शयञ्शूद्रेत्याहेति ।

**शूद्रवद्वा धनेनैवैनं विद्याग्रहणायोपजगाम न च शुश्रूषया । न तु जात्यैव शूद्र इति । अपरे पुनराहुरल्पं धनमाहृतमिति रुषैवैनमुक्तवाञ्छूद्रेति । लिङ्गं च बह्वाहरण उपादानं धनस्येति । तदु हर्षेर्मतं ज्ञात्वा पुनरेव जानश्रुतिः पौत्रायणो गवां सहस्रमधिकं जायां चर्षेरभिमतां दुहितरमात्मनस्तदादाय प्रतिचक्रमे क्रान्तवान् ॥ ३ ॥**

**सिद्धान्ती**—राजाचें तें भाषण ऐकून पर म्हणजे तो रैक्व त्या राजाला प्रत्युत्तर देता झाला. मंत्रांतील अह हा निपात येथें अर्थशून्य आहे.

**पूर्व०**--अह याचा अर्थ विनिग्रह करणें, अवधारण करणें असा असतो ना? एव शब्दाप्रमाणें या अहशब्दाचा अर्थ असतो ना?

**सिद्धान्ती**—तसा असतो, हें खरें. परंतु मंत्रांतच 'एव' शब्द पृथक् आहे. तेव्हां येथें अह शब्दाचा अर्थ करण्याचें मुळींच कारण नाहीं. रैक्व म्हणाला: हा तुझा हार, ही तुझी गाडी, ह्या तुझ्या सहाशें गायी तुझ्या तुलाच लखलाभ असोत.

**शिष्य**--हारानें युक्त असणारी इत्वा म्हणजे गाडी हा हारेत्वा या शब्दाचा अर्थ आहे?

**सिद्धान्ती**—होय. इत्वा म्हणजे जाणारी गाडी. असो; रैक्व म्हणतो: मला त्यांची बिलकुल इच्छा नाहीं. याचा मला कांहीं एक उपयोग नाहीं. मी अपर्याप्त आहे. मला जें कर्म करावयाचें आहे, त्याची सिद्धि एवढ्याशा संपत्तीनेंच व्हावयाची नाहीं. म्हणून हें शूद्रा, हें सर्व धन घेऊन तूं परत जा.

**पूर्वपक्षी**—रैक्व तरी चमत्कारिकच होता म्हणावयाचा! मागें (मंत्र ५ पहा) क्षत्तृ शब्द आला आहे. त्यावरून क्षत्रियसेवक असणारा पुरुष क्षत्रियपति, म्हणजे राजाच असला पाहिजे. जानश्रुति हा क्षत्रियकुलोत्पन्न राजा असला पाहिजे. शिवाय, तो **विद्येचें ग्रहण करण्यासाठीं,** वेदवेदांततत्त्वें शिकण्यासाठीं ब्राह्मणाला **शरण गेला आहे.** शूद्राला वेदविद्येचा उपदेश घेण्याचा व हा उपदेश घेण्यासाठीं ब्राह्मणगुरूला शरण जाण्याचा अधिकारच नाहीं. या सर्व गोष्टी प्रत्यक्ष असतांनाही रैक्वानें राजाला 'शूद्र!' म्हणून संबोधावें, हें सर्वथा अयोग्य आहे. तेव्हां रैक्वाचें भाषण (शूद्र हें संबोधन) अनाठायीं आहे, असें दिसतें. हंसानें या बिचाऱ्याची फुकट स्तुति केली. रैक्व कांहीं सर्वज्ञ नव्हे.

**सिद्धान्ती**—पण अगोदर पूर्वाचार्य 'शूद्र' शब्दाची व्यवस्था कशी लावतात तें पहा. हंसाचें वचन ऐकून राजाला **शोक** प्राप्त झाला होता. तसेंच रैक्वाचा महिमा ऐकून त्याचें **मन द्रवलें होतें,** विकारयुक्त झालें **होतें.** शूद्र या शब्दांत 'शु'=

शुचा म्हणजे शोकानें (किंवा रैक्वाचा महिमा ऐकून) व 'द्र'=द्रवति=विकृत होतो, असे दोन शब्द आहेत, तेव्हां रैक्वानें शोकाविकल राजास 'शूद्र' म्हटलें. तो शूद्र शु व द्रु–शोकानें द्रवणारा किंवा दुसऱ्याचें माहात्म्य ऐकून द्रवणारा, विकृत होणारा तो शूद्र होय, असा रैक्वऋषीचा अभिप्राय आहे. अर्थात् रैक्व ऋषि परोक्ष-ज्ञानी होता. आणि हें आपलें सर्वज्ञत्व दाखविण्यासाठीं रैक्व ऋषींनीं 'शूद्र' या अशिष्ट नांवानें राजास संबोधिलें आहे. कारण उघड आहे, कीं शूद्र लोक **धन मात्र** घेऊन जातात, **शुश्रूषा** करण्याची त्यांची इच्छा नसते. याप्रमाणेंच हा राजा धन मात्र घेऊन आला आहे, सेवा करण्याची याची इच्छा नाहीं. म्हणून हा शूद्र आहे, जातीनें शूद्र नव्हे, गुणकर्मानें शूद्र आहे, असा रैक्वाभिप्राय आहे. तात्पर्य, धन देऊन उपदेश घेऊं इच्छिणारा पुरुष किंवा संकटसमयीं विकृत होणारा पुरुष शूद्र असतो, असें रैक्वमुखानें श्रुति सांगत आहे.

**शिष्य**—मंत्रांतील पुढचा उत्तरार्ध पाहिला असतां शूद्र शब्दाचें आणखी एका तऱ्हेनें निर्वचन करितां येईल.

**पूर्वपक्षी**—तें कसें ?

**शिष्य**—राजानें अति अल्प धन आणलें होतें. हें पाहून ऋषीला राग आला आणि त्या रागाच्या भरांत ऋषीनें राजाला 'शूद्र' या नांवानें हांक मारिली.

**पूर्वपक्षी**—असें कशावरून ?

**शिष्य**—कारण, पुढें राजानें आणलेलें पुष्कळ धन ऋषीनें स्वीकृत केलें आहे ! हें द्रव्यग्रहणचिह्न स्पष्ट सांगतें कीं ऋषीला अधिक धन हवें होतें. असेंच ना ?

**सिद्धान्ती**—कांहीं आचार्य तूं म्हणतोस असेंच स्पष्टीकरण करितात. कांहीं-ही असो, राजाला ऋषीचें मत समजलें आणि ( जानश्रुतीनें ) आणखी हजार गायी, शिवाय अधिक धन आपल्या बरोबर घेतलें; आणि पुनः ऋषीकडे गमन केलें. तसेंच ऋषीची **सेवा** करण्यासाठीं आपली सुंदर कन्या ऋषीला द्यावी, असा संकल्प करून राजा आपल्या कन्येला घेऊन आला. तात्पर्य, **अधिक धन** आणि **सेवा करणारी कन्या** या उभयतांचेंही समर्पण करून विद्येचा उपदेश घेण्यासाठीं राजा सिद्ध झाला ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा व पांचवा.

**तᳪं हाभ्युवाद रैकेदᳪं सहस्रं गवामयं निष्कोऽयमश्वतरीरथ इयं जायाऽयं ग्रामो यस्मिन्नास्सेऽन्वेव मा भगवः शाधीति ॥ ४ ॥**

**तस्या ह मुखमुपोद्गृह्णन्नुवाचाऽऽजहारेमाः शूद्रानेनैव मुखेनाऽऽलापयिष्यथा इति ते हैते रैक्वपर्णा नाम महावृषेषु यत्रास्मा उवास तस्मै होवाच ॥ ५ ॥**

**इति चतुर्थाध्यायस्य द्वितीयः खण्डः ॥ २ ॥**

अन्वय व अर्थः—तं ह अभ्युवाद ( राजा विनयानें म्हणाला ) **रैक्व, इदं गवां सहस्रं, अयं निष्कः, अयं अश्वतरीरथः, इयं जाया, यस्मिन् आस्से अयं ग्रामः** ( भगवन् रैक्व, ह्या आणखी हजार गायी, हा कंठहार, हा अश्वतरीरथ, ही भार्यात्वाकारितां आणलेली माझी कन्या, तसेंच जेथें आपण राहतां तो हा ग्राम, मी आपल्यास समर्पण करितों ) **भगवः मा अनुशाधि इति** ( हे भगवन् मला विद्येचा उपदेश करावा, अशी ही राजप्रार्थना आहे ) ॥ ४ ॥

अन्वय व अर्थः—**तस्याः मुखं उपोद्गृह्णन् उवाच ह** ( तिचें, या दानपद्धतीचें, मुख जाणून रैक्व म्हणाला ) **शूद्र, इमाः आजहार, अनेन एव मुखेन आलापयिष्यथाः; इति** (हे शूद्रा, हें जें सर्व तूं घेऊन आला आहेस, त्या द्वारानेंच मी तुला उपदेश करावा ही तुझी इच्छा आहे. हें तो ऋषि म्हणाला ) **यत्र ह अस्मै उवास ते एते महावृषेषु रैक्वपर्णाः नाम** ( जेथें रैक्व ऋषी राहत होता, ते महावृषांत असणारे ग्राम रैक्वपर्णनांवानें प्रसिद्ध झाले ) **तस्मै ह उवाच** ( नंतर रैक्वानें राजाला इष्टदेवतेची उपासनाविद्या सांगितली ) ॥ ५ ॥

रैकेदं गवां सहस्रमयं निष्कोऽयमश्वतरीरथ इयं जायार्थं मम दुहिताऽनीताऽयं च ग्रामो यस्मिन्नास्से तिष्ठसि स च त्वदर्थे मया

द्रांचा अस्त होतो, तेव्हां ते प्रत्येकीं वायूमध्येंच प्रवेश करून वायुस्वरूप होतात ) ॥ १ ॥

वायुर्वाव संवर्गो वायुर्बाह्यो वावेत्यवधारणार्थः संवर्गः संवर्जनात्संग्रहणात्संग्रसनाद्वा संवर्गः वक्ष्यमाणा अग्न्याद्या देवता आत्मभावमापादयतीत्यतः संवर्गः । संवर्जनाख्यो गुणो ध्येयो वायुवत् । कृतायान्तर्भावदृष्टान्तात् । कथं संवर्गत्वं वायोरित्याह । यदा यस्मिन्काले वा अग्निरुद्वायत्युद्वासनं प्राप्नोत्युपशाम्यति तदाऽसावग्निर्वायुमेवाप्येति वायुस्वाभाव्यमपिगच्छति । तथा यदा सूर्योऽस्तमेति वायुमेवाप्येति । यदा चन्द्रोऽस्तमेति । ननु कथं सूर्याचन्द्रमसोः स्वरूपावस्थितयोर्वायावपिगमनम् । नैष दोषः । अस्तमनेऽदर्शनप्राप्तेर्वायुनिमित्तत्वात् । वायुना ह्यस्तं नीयते सूर्यः । चलनस्य वायुकार्यत्वात् । अथवा प्रलये सूर्याचन्द्रमसोः स्वरूपभ्रंशे तेजोरूपयोर्वायावेवापिगमनं स्यात् ॥ १ ॥

**सिद्धान्ती**—खरोखर पाहिलें असतां वायु म्हणजे बाह्य वायु. हाच सर्वांचें संवर्जन करणारा, सर्वसंग्रह करणारा, सर्वांचें ग्रसन करणारा आहे. पुढें ज्या अग्नि–आदि देवता सांगितल्या आहेत, त्या सर्वांस वायु आपलें स्वरूप देतो, वायुस्वरूप करितो. म्हणून वायु हा संवर्ग असें म्हटलें आहे. रैक्वाच्या सांगण्याचा उद्देश हा आहे कीं, वायूचा मात्र संवर्जननामक जो गुण आहे, त्याचें उपासकानें ध्यान करावें. वायूचें ध्यान करावयाचें, त्या प्रमाणेंच वायूचें मुख्य लक्षण जें संवजन ( संग्रहकरण ) त्याचें ध्यान करावें.

**सिद्धान्ती**—मागें 'कृताय' नामक दान जसें त्रेताद्वापारादि दानांचा (डावांचा ) संग्रह करितें असें सांगितलें, त्याप्रमाणेंच वायु सर्वांचा संग्रह करितो.

**पूर्वपक्षी**—हा केवळ दृष्टांत आहे. दृष्टांतानें वायूचें संवर्गत्व सिद्ध व्हावयाचें नाहीं. तो सर्व–संग्राहक आहे, असें आमच्या अनुभवास आणून द्या.

**सिद्धान्ती**—ठीक आहे. जेव्हां अग्नीचा हळु हळूं उपशम होतो, तेव्हां तो अग्निवायूचें मात्र स्वरूप धारण करितो, हें तुम्ही आम्हीं नित्य पाहतों. तसेंच सूर्यचंद्र जेव्हां जेव्हां अस्ताला जातात, तेव्हां तेव्हां ते वायूमध्येंच प्रवेश करून वायुरूपच होतात.

**पूर्वपक्षी**—अग्नीचा अनुभव आम्हांस कबूल आहे. पण स्वस्वरूपामध्यें नित्य राहणारे दृश्य सूर्यचंद्र वायूमध्यें प्रविष्ट होऊन वायुस्वरूपी होतात, हें आम्ही

कसें कबूल करावें ? प्रलयकालपर्यंत स्वाधिकारावर स्वरूपानें स्वस्थानीं राहणाऱ्या सूर्यचंद्रांना प्रतिदिवशीं वायुस्वरूप प्राप्त होतें, हें आम्हांस संमत नाहीं.

**सिद्धान्ती**—स्वरूपधारण हा कांहीं आमच्या युक्तीला आड येणारा दोष नव्हे. सूर्यचंद्रादि जरी स्वस्वरूपांत राहत असले तरी ते वायुरूप होण्याचा संभव आहे; सूर्यचंद्र अस्ताला जातात, अदृष्ट होतात, याला निमित्त वायुच आहे, नव्हे काय ?

**पूर्वपक्षी**—हें कसें ?

**सिद्धान्ती**—वायूमुळेंच सूर्याला अस्तास जावें लागतें. कारण सूर्याच्या सर्व **चलनाचा** (हालचालीचा) **कारक** वायु आहे. वायुव्यतिरिक्त आकर्पणादि कोणतें-ही चलनवलन होणें शक्य नाहीं. म्हणून अस्ताला जाणें ही सूर्यक्रिया वायूच्या चालकत्वानें मात्र सिद्ध होते, असें म्हणणें प्राप्त आहे.

**शिष्य**—सूर्य म्हणजे सूर्यचंद्र ?

**सिद्धान्ती**—होय. सूर्य हें चंद्राचें उपलक्षण आहे.

**पूर्व०**—एवंच, सूर्यादिकांनीं वायुरूप होणें हें गौण आहे. वायु त्यांच्या **चलनाचा कारक** आहे. प्रत्यक्ष ते वायुस्वरूप होत नाहींत, असें तुमच्याच म्हण-ण्यावरून ठरलें.

**सिद्धान्ती**—असें कसें ? प्रलयकालीं नित्य तेजोरूपी असणारे सूर्यचंद्र जेव्हां स्वरूपभ्रष्ट होतात, तेव्हां वायूमध्येंच त्यांचा प्रवेश होऊन ते वायुरूप होतात, हें समजणें फारसें कठिण नाहीं. 'तेजाचा लय वायूंत होतो.' कार्याचा लय कारणांत होतो; तेज हें वायूचें कार्य आहे. असें श्रुतीचें सांगणें आहे. तात्पर्य, अग्नि, सूर्य व चंद्र यांचा संग्राहक वायु आहे ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा

**यदाऽऽप उच्छुष्यन्ति वायुमेवापियन्ति वायुर्ह्येवैतान्सर्वान्संवृङ्क्त इत्यधिदैवतम् ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः—यदा आपः उच्छुष्यंति, वायुं एव अपियंति** ( जेव्हां जलाचें शोषण होतें, तेव्हां तें जल वायुरूपच होतें ) **एतान् सर्वान् हि वायुः एव संवृंक्ते** ( या सर्वांचा वायु हाच संग्रह करितो, त्यांचें ग्रसन करितो. ह्या चारी वस्तूंचा उपसंहार करून त्यांस स्वस्वरूप

देतो. ) इति अधिदैवतं ( याप्रमाणें अधिदैवत उपदेश रैक्वानें जान-श्रुतीला केला ) ॥ २ ॥

तथा यदाऽऽप उच्छुष्यन्त्युच्छोषमाप्नुवन्ति तदा वायुमेवापियन्ति । वायुर्हि यस्मादेवैतानग्न्याद्यादान्महीबलान्संवृङ्क्ते । अतो वायुः संवर्गगुण उपास्य इत्यर्थः । इत्यधिदैवतं देवतासु संवर्गदर्शनमुक्तम् ॥ २ ॥

सिद्धान्ती—जेव्हां जलाचा शोष होतो, तेव्हां तें जल वायूमध्यें प्रवेश करून तत्स्वरूप होतें. कारण या सर्व अग्निप्रमुख बलिष्ठ देवतांचें संवर्जन करणारा, सर्वांचा संग्रह करणारा वायु आहे. म्हणून संवर्गगुणानें ( संग्राहकत्वानें ) विशिष्ट करणारा जो बाह्य वायु त्याची आपण उपासना करावी. याप्रमाणें देवतादृष्टीनें संवर्ग होतो, त्याचें वर्णन रैक्वानें केलें. देवतावर्णन आहे, म्हणून या उपदेशाला 'अधिदैवत' हें नांव आहे ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**अथाध्यात्मं प्राणो वाव संवर्गः स यदा स्वपिति प्राणमेव वागप्येति प्राणं चक्षुः प्राणꣳ श्रोत्रं प्राणं मनः प्राणो ह्येवैतान्सर्वान्संवृङ्क्त इति ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थः**—अथ अध्यात्मं ( आतां आध्यात्मदृष्टीनें वर्णन करितों ) **प्राणः वाव संवर्गः; सः यदा स्वपिति, वाक् प्राणं एव अप्येति, चक्षुः प्राणं, श्रोत्रं प्राणं, मनः प्राणं; हि एतान् सर्वान् प्राणः संवृक्ते इति** ( प्राण हाच संवर्ग आहे. जेव्हां जीव निजतो, निद्रावश होतो, तेव्हां वाणी प्राणामध्येंच लीन होते; त्याचप्रमाणें नेत्र, कर्ण, मन हींही प्राणामध्येंच लीन होतात. कारण प्राण हाच या सर्वांचा संग्राहक किंवा संहारक व संवर्जक आहे ) ॥ ३ ॥

अथानन्तरमध्यात्ममात्मनि संवर्गदर्शनमिदमुच्यते । प्राणो मुख्यो वाव संवर्गः । स पुरुषो यदा यस्मिन्काले स्वपिति प्राणमेव वागप्येति वायुमिवाग्निः प्राणं चक्षुः प्राणं श्रोत्रं प्राणं मनः प्राणो हि यस्मादेवैतान्वागादीसर्वान्संवृङ्क्त इति ॥ ३ ॥

सिद्धान्ती—यानंतर अध्यात्मपद्धतीनें उपदेश करावयाचा. जीवाच्या शरीरासह इंद्रियावयवांविषयीं जें बोलणें असतें, त्याला 'अध्यात्म' असें म्हणतात. असो; या मंत्रांत अध्यात्मदृष्टीनें संवर्गविचार सांगितला आहे. मुख्य प्राण हा संवर्ग आहे. जेव्हां पुरुष ( जीव ) निद्रावश होतो, तेव्हां वाणी, चक्षु, श्रोत्र व मन हीं सर्व वायूमध्यें प्रवेश करून तत्स्वरूप होतात.

शिष्य—अग्निप्रमुखदेवता वायुस्वरूपांत लीन होतात, तशीं वाणीप्रमुख ज्ञानकर्मेंद्रियें प्राणस्वरूपीं लीन होतात. असाच उपदेश प्रश्नोपनिषदांत आहे.

सिद्धान्ती—अरे ! या सर्वांचा संग्रह करून त्यांस स्वस्वरूप देण्याला एक प्राण मात्र समर्थ आहे. येथेंही प्राणाच्या संग्राहक गुणाचें ध्यान इष्ट आहे. हा अध्यात्म उपदेश रैक्वानें केला ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा.

**तौ वा एतौ द्वौ संवर्गौ वायुरेव देवेषु प्राणः प्राणेषु ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थः—तौ एतौ द्वौ संवर्गौ वै** ( असे ते हे दोन संवर्ग आहेत ) **देवेषु वायुः एव, प्राणेषु प्राणः एव** ( देवांमध्यें वायु मात्र संग्राहक आणि वाणीप्रमुख प्राणांमध्यें प्राण मात्र संग्राहक, असे हे दोन संवर्ग आहेत. देवांमध्यें जसा वायु मुख्य तसा प्राणांमध्यें मुख्यप्राण मुख्य आहे ) ॥ ४ ॥

तौ वा एतौ द्वौ संवर्गौ संवर्जनगुणौ वायुरेव देवेषु संवर्गः प्राणः प्राणेषु वागादिषु मुख्यः ॥ ४ ॥

सिद्धान्ती— देवदेवानें वायु ह्यालाच संवर्जनगुणानें विशिष्ट केला आहे. नेत्रादिप्राणांमध्यें मुख्यप्राण हा संवर्ग आहे. असे हे ते दोन संग्राहकगुणविशिष्ट वायु आणि मुख्यप्राण आहेत. याप्रमाणें अध्यात्म आणि अधिदैवी संवर्गांचा विचार झाला व ठरलें कीं, देवांमध्यें वायु मुख्य आणि प्राणांमध्यें प्राण मुख्य होत ॥ ४ ॥

---

## मंत्र पांचवा.

**अथ ह शौनकं च कापेयमभिप्रतारिणं च काक्षसेनिं परिविष्यमाणौ ब्रह्मचारी बिभिक्षे तस्मा उ ह न ददतुः ॥ ५ ॥**

**अन्वय व अर्थः—अथ कापेयं शौनकं च काक्षसेनिं अभिप्रतारिणं च परिविष्यमाणौ ब्रह्मचारी बिभिक्षे ह** (एकदां कपिगोत्रोत्पन्न शौनक आणि कक्षसेनाचा पुत्र अभिप्रतारी या दोघा अन्नसेवनास बसलेल्या पुरुषांजवळ एका ब्रह्मचाऱ्यानें भिक्षा मागितली) **तस्मै उ न ददतुः ह** (परंतु त्या उभयांनीं त्या ब्रह्मचाऱ्याला कांहीं दिलें नाहीं) ॥ ५ ॥

अथैतयोः स्तुत्यर्थमियमाख्यायिकाऽऽरभ्यते । हेत्यैतिह्यार्थः । शौनकं च शुनकस्यापत्यं शौनकं कापेयं कपिगोत्रमभिप्रतारिणं च नामतः कक्षसेनस्यापत्यं काक्षसेनिं भोजनायोपविष्टौ परिविष्यमाणौ सूपकारैर्ब्रह्मचारी ब्रह्मविच्छौण्डो बिभिक्षे भिक्षितवान् । ब्रह्मचारिणो ब्रह्मविन्मानितां बुद्ध्वा तं जिज्ञासमानौ तस्मा उ भिक्षां न ददतुर्न दत्तवन्तौ ह किमयं वक्ष्यतीति ॥ ५ ॥

**सिद्धान्ती**—मागच्या खंडप्रकरणांत जे दोन संवर्ग सांगितले, त्यांच्या स्तुतीप्रीत्यर्थ अथवा स्पष्टीकरणाप्रीत्यर्थ ही पुढील आख्यायिका सांगण्याला ऋषीनें आरंभ केला आहे. ही गोष्ट खरी आहे, हें मंत्रांतील 'ह' हा शब्द सांगतो. कपिगोत्रामध्यें उत्पन्न झालेल्या शुनकाचा पुत्र शौनक आणि कक्षसेनाचा मुलगा अभिप्रतारी नामक काक्षसेनी, या नांवाचे दोन पुरुष एकदां भोजनास बसले होते व सूपकार म्हणजे आचारी त्यांस अन्न वाढीत होते. तेव्हां एक ब्रह्मचारी तेथें अन्नभिक्षा मागण्यासाठीं आला. हा ब्रह्मविच्छौण्ड होता.

**शिष्य**—ब्रह्मविच्छौण्ड म्हणजे ?

**सिद्धान्ती**—'ब्रह्मवेत्त्यांमध्यें मी अत्यंत शूर(ज्ञानी) आहे,' अशी स्वतःच्या संबंधानें कल्पना करणारा हा ब्रह्मचारी होता. ही त्याची अहंमन्यता या उभयतांस त्याच्या चेष्टादिकांनीं समजली, म्हणून त्यांनीं त्याला भिक्षा घातली नाहीं. हेतु हा कीं, तो पुढें काय बोलतो, तें ऐकावयास सांपडावें ॥ ५ ॥

---

**मंत्र सहावा.**

**स होवाच महात्मनश्चतुरो देव एकः कः स जगार भुवनस्य गोपास्तं कापेय नाभिपश्यन्ति मर्त्या अभिप्रतारिन्बहुधा वसन्तं यस्मै वा एतदन्नं तस्मा एतन्न दत्तमिति ॥ ६ ॥**

**अन्वय व अर्थः—सः उवाच ह** (तो म्हणाला) **एकः देवः चतुरः महात्मनः** (चार श्रेष्ठ भूतांस एकत्व देणारा देव एकच आहे) **कः** (कोणता?) **सः जगार** (तो सर्वग्रासक आहे) **भुवनस्य गोपाः** (तो भूतांचें संरक्षण करणारा आहे) **कापेय, मर्त्याः तं न अभिपश्यंति** (हे कापेया, मर्त्यलोकांना (मरणशरण जीवांना) त्याचें ज्ञान होत नाहीं) **अभिप्रतारिन् बहुधा वसंतं** (हे अभिप्रतारिन्! अनेक स्वरूपांनीं दृश्य होणाऱ्या या देवांचें ज्ञान मनुष्यास नसतें) **यस्मै एतत् अन्नं वै, तस्मै एतत् न दत्तं** (ज्याकरितां या अन्नाची सिद्धि करितात, त्याला हें अन्न दिलें जात नाहीं) **इति** (असें तो ब्रह्मचारी म्हणाला) सर्वसंहारक, सर्वसंग्राहक, सर्वपालक व बहुस्वरूपी देवाला कोणी जाणत नाहीं; आणि त्याच्यासाठी सिद्ध केलेलें अन्न त्यालाच कोणीही देत नाहीं! ॥६॥

स होवाच ब्रह्मचारी महात्मनश्चतुर इति द्वितीयाबहुवचनम्। देव एकोऽग्न्यादीन्वायुर्वागादीन्प्राणः कः स प्रजापतिर्जगार ग्रसितवान्। कः स जगारेति प्रश्नमेके। भुवनस्य भवन्त्यस्मिन्भूतानीति भुवनं भूरादिः सर्वो लोकस्तस्य गोपा गोपायिता रक्षिता गोप्तेत्यर्थः। तं कं प्रजापतिं हे कापेय नाभिपश्यन्ति न जानन्ति मर्त्या मरणधर्माणोऽविवेकिनो वा हेऽभिप्रतारिन्बहुधाऽध्यात्माधिदैवताधिभूतप्रकारैर्वसन्तम्। यस्मै वा एतदहन्यहन्यन्नमदनायाऽऽह्रियते संस्क्रियते च तस्मै प्रजापतय एतदन्नं न दत्तमिति॥६॥

**सिद्धान्ती—**तो ब्रह्मचारी म्हणाला. अग्निप्रमुख चार देवतांचा संग्रह करणारा वायु व वाणीप्रमुख प्राणांचा संग्रह करणारा मुख्यप्राण हे दोन्ही एकच आहेत. या उभयतांचाही अंतर्भाव एक देव करितो.

**शिष्य**—कोणता देव तो ?

**सिद्धान्ती**—हा देव म्हणजे प्रजापति होय. हा सर्वांस ग्रसित करणारा व सर्वांचा संग्रह करणारा आहे.

**शिष्य**—सर्वांस गिळून टाकणारा देव कोणता ? असाही प्रश्नपर अर्थ मंत्रांतील पदांच्या ठेवणीवरून होईल.

**सिद्धान्ती**—करावा. त्याचें उत्तर पुढेंच आहे. प्रजापतीचें लक्षण काय, किंवा सर्वग्रासक देवाचें लक्षण काय, तें पुढच्या विशेषणानें सांगितलें आहे. जेथें चराचरांचें वास्तव्य असतें, तीं भुवनें म्हणजे भूर्भुवादि सर्व लोक. त्यांचें पालन करणारा हा प्रजापति आहे. म्हणून त्याला भुवनगोता (भुवनचालक व तत्पालक) असें नांव आहे. हें कापेया, त्या 'क' ला म्हणजे प्रजापतीला कोणताही मरण-धर्मी किंवा अविवेकी जीव ओळखित नाहीं. हें अभिप्रतारिन्, बहुधा म्हणजे अध्यात्म, अधिदैवत, अधिभूत इत्यादि स्वरूपांनीं वावरणाऱ्या या प्रजापतीचें ज्ञान कोणालाही नसतें. अहो ! ज्याच्या खाण्यासाठीं प्रतिदिवशीं तुम्ही अन्न संस्कृत करितां, अन्न सिद्ध करितां, तो अन्नभक्षण करणारा प्राण ( वायु ) आणि सर्वांचें आत्मस्वरूप हीं दोन्हीं एकरूपी असतांनाही मला तुम्ही अन्न देत नाहीं, माझ्या प्राणाला अन्न देत नाहीं, म्हणजे खरोखर त्या प्रजापतीलाच तुम्ही अन्न समर्पित नाहीं, असें होतें ! केवढें हें तुमचें अज्ञान ? ॥ ६ ॥

---

## मंत्र सातवा.

**तदु ह शौनकः कापेयः प्रतिमन्वानः प्रत्येयायाऽऽत्मा देवानां जनिता प्रजानाᳪ हिरण्यदᳪष्ट्रो बभसोऽनसूरिर्महान्तमस्य महिमानमाहुरनद्यमानो यदनन्नमत्तीति वै वयं ब्रह्मचारिन्नेदमुपास्महे दत्तास्मै भिक्षामिति ॥ ७ ॥**

**अन्वय व अर्थः**—**कापेयः शौनकः तत् उ ह प्रतिमन्वानः प्रत्येयाय** ( कपिकुलोत्पन्न शौनकानें हें त्या ब्रह्मचाऱ्याचें भाषण ऐकलें; आणि त्याचा त्यानें विचार केला. नंतर तो त्या ब्रह्मचाऱ्याकडे गेला आणि म्हणाला ) **ब्रह्मचारिन् देवानां आत्मा, प्रजानां जनिता, हिरण्यदंष्ट्रः, बभसः, अनसूरिः; अस्य महिमानं महांतं आहुः; यत् अन-**

**द्यमानः अनन्नं अत्ति इति; ब्रह्मचारिन्, इदं उपास्महे** ( हे ब्रह्मचारिन् , देवांचा आत्मा, प्रजांचा जनक, अमृतदंष्ट्र, भोक्ता, अत्यंत बुद्धिमान् असा हा परमात्मा आहे. याचें माहात्म्य फार मोठें आहे, असें म्हणतात. कोणाचेंही भक्ष्य नसणारा हा आत्मा अनन्न ( अन्न नसणारें अन्न ) भक्षण करितो, हें आम्हांस ठाऊक आहे. आणि त्याचीच आम्ही उपासना करितों !) **अस्मै भिक्षां दत्त इति** ( नंतर त्यानें आपल्या सेवकांस सांगितलें कीं, या ब्रह्मचाऱ्याला भिक्षा द्या ) ॥ ७ ॥

तदु ह ब्रह्मचारिणो वचनं शौनकः कापेयः प्रतिमन्वानो मनसाऽऽलोचयन्ब्रह्मचारिणं प्रत्येयायाऽऽजगाम । गत्वा चाऽऽह यं त्वमवोचो न पश्यन्ति मर्त्या इति त वयं पश्यामः । कथम् । आत्मा सर्वस्य स्थावरजङ्गमस्य । किंच देवानामग्न्यादीनामात्मनि संहृत्य ग्रसित्वा पुनर्जनितोत्पादयिता वायुरूपेणाधिदैवतमग्न्यादीनाम् । अध्यात्मं च प्राणरूपेण वागादीनां प्रजानां च जनिता । अथ वाऽऽत्मा देवानामग्निवागादीनां जनिता प्रजानां स्थावरजङ्गमानाम् । हिरण्यदंष्ट्रोऽमृतदंष्ट्रोऽभग्नदंष्ट्र इति यावत् । बभसो भक्षणशीलः । अनसूरिः सूरिर्मेधावी न सूरिरसूरिस्तत्प्रतिषेधोऽनसूरिः सूरिरेवेत्यर्थः । महान्तमतिप्रमाणमप्रमेयमस्य प्रजापतेर्महिमानं विभूतिमाहुर्ब्रह्मविदः । यस्मात्स्वयमन्यैरनद्यमानोऽभक्ष्यमाणो यदनन्नमग्निवागादिदेवतारूपमत्ति भक्षयतीति । वा इति निरर्थकः । वयं हे ब्रह्मचारिन्, आ, इदमेवं यथोक्तलक्षणं ब्रह्म वयमा उपास्महे । वयमिति व्यवहितेन संबन्धः । अन्ये न वयमिदमुपास्महे किं तर्हि परमेव ब्रह्मोपास्मह इति वर्णयन्ति । दत्तास्मै भिक्षामित्यवोचद्भृत्यान् ॥ ७ ॥

**सिद्धान्ती—** कापेय शौनकानें ब्रह्मचाऱ्याचें वचन ऐकिलें आणि त्याचा मनामध्यें पुष्कळ विचार केला. नंतर तो ब्रह्मचाऱ्याजवळ गेला आणि म्हणाला: हे भिक्षो ! तूं म्हणालास कीं मर्त्य जीव भुवनपालकाला जाणत नाहींत. पण आम्ही त्यास जाणणारे आहों. भिक्षूनें विचारलें, त्याचें स्वरूप कसें असतें ? कोणत्या स्वरूपानें तुम्ही त्याला ओळखतां ? शौनक म्हणाला, तो भुवनपालक सर्व स्थावर-जंगमाचा नियामक ( आत्मा ) आहे. तसेंच, अग्निप्रमुखदेवांस

आपल्यामध्ये लीन करून पुनः त्या अग्निप्रमुखदेवांची उत्पत्ति वायुस्वरूप घेऊन करणारा आणि प्राणस्वरूप घेऊन वाणीप्रमुख ज्या प्रजा आहेत, त्यांची उत्पत्ति करणारा तो आहे. वायु हें अधिदैवतरूप आहे; आणि प्राण हे अध्यात्मरूप आहे. असो; याप्रमाणें सर्व चराचराचा **नियामक** आणि **सर्वसंहारकर्ता** असून **सर्वजनक** हा आत्मा आहे, हे आम्हांस विदित आहे.

**शिष्य**--भगवन् ! किंवा शौनकाचें म्हणण्याचा असाही अभिप्राय असेल कीं, हा भुवनपालक अग्निप्रमुख-देवांचा आत्मा आहे आणि स्थावरजंगमापदार्थांचा उत्पादक आहे ?

**सिद्धान्ती**—कांहीं प्रत्यवाय नाहीं. पहिल्या अर्थानें भुवनपालक अधिदैवी आणि अध्यात्मसृष्टीचा नियामक, संहारकर्ता आणि उत्पादक आहे, हें स्पष्ट होते, आणि तुझ्या अर्थानें हा भुवनपालक अग्निप्रमुख दैवीशक्तीचा नियामक असून दृश्यादृश्य जें स्थावरजंगम त्याचा उत्पादक आहे, हें समजतें. तात्पर्य एकच आहे. असो; शौनक म्हणतो: हा भुवनपालक **हिरण्यदंष्ट्र** आहे. म्हणजे याच्या दाढा अमृत अथवा केव्हांही भग्न न पावणाऱ्या आहेत. तात्पर्य, हा सर्व-संहारक आहे, तथापि संहार करतांना या **अव्ययाला** कोणत्याही प्रकारची क्षीणता येत नाहीं. तसेंच तो **बभस** म्हणजे **सर्वभक्षक** आहे. तो **अनसूरि** आहे. सूरि म्हणजे मेधावी (बुद्धिमान् ;) 'कार्य करण्याविषयीं ज्याची बुद्धि कुशल असते तो अत्यंत विद्वान्' असाही मेधावी या शब्दाचा अर्थ आहे. सूरि नव्हे तो असूरि आणि असुरींचा प्रतिषेध करणारा तो अनसूरि. तात्पर्य अनसूरि म्हणजे ज्याच्या सर्वज्ञानामध्यें अज्ञानाचा यत्किंचित्‌ही गंध नाहीं, असा. पुढें शौनक म्हणतो: हे ब्रह्मचारिन् ! या प्रजापतीचा महिमा किंवा माहात्म्य **अप्रमेय** आहे.

**शि०**—ज्या माहात्म्याचें मोजमाप करितां येत नाहीं, तें अप्रमेय माहात्म्य होय. तात्पर्य, या ब्रह्मवेत्त्याची विभूति अपरिमित आहे, असें दिसतें.

**पू०**—कशावरून ?

**शि०**—कारण, हा स्वतः अनद्यमान म्हणजे अभक्ष्यमाण आहे. याचें कोणालाही भक्षण करितां येत नाहीं. याचा ग्रास करण्याला कोणीही समर्थ नाहीं. असें असूनही अग्निप्रमुख-देवतांचें अनन्नात्मक (अन्न नसणारें) जें देवतास्वरूप आहे, त्याचें सुद्धां भक्षण करणारा हा आहे. तात्पर्य, आपण कोणाचेंही अन्न नसून स्वतः सर्व अन्नात्मक व अनन्नात्मक पदार्थांचें भक्षण करणारा आहे; म्हणून याचें **माहात्म्य अवर्णनीय** आहे, असें म्हणावयाचें.

**सिद्धान्ती**—शौनक म्हणतो: हे ब्रह्मचारिन्, आतांपर्यंत जीं नियामकत्व, सर्वजनकत्व, अव्ययत्व, सर्वभक्षकत्व, सर्वज्ञत्व, सर्वशक्तिमत्व, हीं लक्षणें सांगितलीं, त्या लक्षणांनीं युक्त अशा ब्रह्माचें आम्ही सर्वबाजूंनीं आराधन करितों.

रण 'आम्हीं इतर कोणत्याही दृश्यादृश्य वस्तूचें उपासन करीत नाहीं; तर परब्रह्माचें मात्र करितों,' असा अर्थ इतर व्याख्याकार करितात.

शिष्य—मंत्रांत 'ब्रह्मचारिन्निदं' अशी संहिता आहे, तेव्हां 'ब्रह्मचारिन्, आ इदं' अशी पदें पाडिलीं म्हणजे आपण म्हणतां असा अर्थ होतो. आणि 'ब्रह्मचारिन् न इदं' अशी पदें पाडिली म्हणजे इतर पंडित म्हणतात तसा अर्थ होतो. आपल्या अर्थानें इदं म्हणजे हें जगत् परमार्थतः ब्रह्मस्वरूप आहे, असें होतें आणि दुसऱ्या अर्थानें इदं म्हणजे दृश्य जगत् इतकाच अर्थ होतो.

सिद्धान्ती—तथापि उभय अर्थांचें तात्पर्य एकच आहे. असो; याप्रमाणें उत्पत्ति, स्थिति संहार करणारा, अव्यय, सर्वव्यापक, सर्वज्ञ आणि सर्वभक्षक जो परमात्मा त्याची आम्हीं उपासना करितों, असें शौनक म्हणाला. नंतर त्यानें आपल्या सेवकांस 'ब्रह्मचाऱ्याला भिक्षा वाढा' अशी आज्ञा केली.

शिष्य—म्हणजे शौनक आणि अभिप्रतारी यांचें ज्ञान उत्कृष्टप्रकारचें होतें, असें श्रुतीला येथें सांगावयाचें आहे ॥ ७ ॥

---

## मंत्र आठवा.

**तस्मा उ ह ददुस्ते वा एते पञ्चान्ये पञ्चान्ये दश सन्तस्तत्कृतं तस्मात्सर्वासु दिक्ष्वन्नमेव दश कृतꣳ सैषा विराडन्नादी तयेदꣳ सर्वं दृष्टꣳ सर्वमस्येदं दृष्टं भवत्यन्नादो भवति य एवं वेद य एवं वेद ॥ ८ ॥**

**इति चतुर्थाध्यायस्य तृतीयः खण्डः ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थः**—**तें तस्मै उ ह ददुः** (सेवकांनीं त्या भिक्षार्थी ब्रह्मचाऱ्याला अन्न दिलें, भिक्षा घातली) **एते वै अन्ये पंच, अन्ये पंच दश संतः** (ते हे एक पांच आहेत आणि एक दुसरे पांच आहेत; दोन्ही मिळून दहा होतात) **तत् कृतं** (हे सर्वतः *कृतस्वरूपी आहेत) **तस्मात् सर्वासु दिक्षु अन्नं एव दश कृतं** (म्हणून सर्व दिशांना अन्नाचें म्हणजे कृताचें स्वरूप येतें) **सा एषा विराट् अन्नादी** (ती

---

* खंड १ मंत्र ४ पहा.

हा विराट् अन्नादी–अन्नभक्षक आहे ) **तया इदं सर्वं दृष्टं** ( त्या विराटानें हें सर्व पाहिलें आहे ) **इदं सर्वं अस्य दृष्टं भवति** ( हें सर्व त्यानें पाहिलें ) **यः एवं वेद, यः एवं वेद अन्नादः भवति** ( ज्याला हें सर्व समजतें तो अन्नाद ( अन्नाचा भक्षक ) व सर्वज्ञ होतो ) याचें तात्पर्य भाष्याचें स्पष्टी करण झाल्यानंतर ठीक समजेल ) ॥ ८ ॥

तस्मा उ ह ददुस्ते हि भिक्षाम् । ते वै ये ग्रस्यन्तेऽग्न्यादयो यश्च तेषां ग्रसिता वायुः पञ्चान्ये वागादिभ्यः, तथाऽन्ये तेभ्यः पञ्चाध्यात्मं वागादयः प्राणश्च, ते सर्वे दश भवन्ति संख्यया, दश सन्तस्तत्कृतं भवति ते, । चतुरङ्क एकाय एवं चत्वारस्त्र्यङ्काय एवं त्रयोऽपरे द्व्यङ्काय एवं द्वावन्यावेकाङ्काय एवमेकोऽन्य इत्येवं दश सन्तस्तत्कृतं भवति । यत एवं तस्मात्सर्वासु दिक्षु दशस्वप्यग्न्याद्या वागाद्याश्च दशसंख्यासामान्यादन्नमेव दशाक्षरा विराड्विराडन्नमिति हि श्रुतिः । अतोन्नमेव दशसंख्यत्वात् । तत एव दश कृतं कृतेऽन्तर्भावाच्चतुरायत्वेनेत्यवोचाम ॥

**सिद्धान्ती**–शौनकानें सांगितल्यानंतर त्याच्या सूपसेवकांनीं त्या ब्रह्मचाऱ्याला भिक्षा वाढिली. आतां आपल्यास जो विचार करावयाचा आहे, तो अमळसा कठिण आहे म्हणून लक्ष देऊन श्रुति काय म्हणत आहे, ते ऐका:—मागें अग्नि, सूर्य, चंद्र आणि जल ( वरुण ) इत्यादि देवतांचा ग्रसन करणारा वायु आहे, असें या अध्यायाच्या यान्त खंडांतील पहिल्या व दुसऱ्या मंत्रांत सांगितलें आहे. अग्निप्रमुख ग्रस्य देवता आणि त्यांचा ग्रासक वायु मिळून पांच देवतांचा एक संघ होतो. तसेंच वाणी, कर्ण, चक्षु ( नेत्र ) आणि मन यांचा ग्रासक प्राण आहे, म्हणून प्राणासकट वाणीप्रमुख अध्यात्म–इंद्रियांचा एक पचात्मक संघ होतो. देवता पांच आणि इंद्रियें पांच मिळून दहा होतात. या त्यांच्या दशसंख्यात्मक होण्यानें त्यांस कृताचें स्वरूप प्राप्त होतें. कारण कृत हे दशसंख्यात्मक आहे.

**शिष्य**—कृत म्हणजे या अध्यायाच्या प्रथम खंडांतील चौथ्या मंत्रांत सांगितलेलें चाराचें दान होय.

**सिद्धान्ती**—तसें नव्हे. कृत या शब्दानें येथें 'द्यूत' असा अर्थ समजून घ्यावयाचा आहे. द्यूत हें दशसंख्याकात्मक असतें.

**शिष्य**—हें कसें ?

**सिद्धान्ती**—फांशावर चार, तीन, दोन आणि एक, अशीं निरनिराळीं दानें असतात आणि त्या सर्वांची बेरीज दहा होते. या दशसंख्येंत द्यूतांतील सर्व दानांचा अंतर्भाव होतो. म्हणून द्यूताला दशसंख्याकात्मक असें म्हटलें आहे. आतां अध्यात्म-अधिदैवतांस दशात्मकत्व कसें प्राप्त होतें तें पाहूं. अग्नि-आदि ग्रस्यमान देवता आणि वाणीप्रमुख ग्रस्यमान इंद्रियें, प्रत्येकीं चार चार आहेत. तसेंच द्यूतामध्यें चाराचें एक दान असतें.

**शिष्य**—याच न्यायानें द्यूतांत त्रेता नामक तीन दानांचा एक फांसा असतो. फांशावरील तीन या दानाला त्रेता म्हणतात आणि अग्निचतुष्टय आणि वाणीचतुष्टय यांतून एकेक वस्तु वजा केली म्हणजे तीन तीन होतात; दोन दोन वजा केल्या म्हणजे दोन राहतात ( द्वापर होतात ); आणि तीन तीन वजा केल्या म्हणजे मागें एक एक शिल्लक उरतो ( यालाच कलि म्हणतात ). चार + तीन + दोन + एक = दहा. कृत दशसंख्याकात्मक आहे.

**सिद्धान्ती**—आतां, अग्न्यादिकांचा ग्रसिता वायु आणि वाणीप्रमुखांचा ग्रसिता प्राण, हे दोन ग्रसिते अग्निचतुष्टयाहून आणि वाणीचतुष्टयाहून अनुक्रमें निरनिराळे आहेत, हें स्पष्ट आहे. वायु आणि प्राण हे दोन ग्रसिते व अग्नि-प्रमुख चतुष्टय आणि वाणीप्रमुख चतुष्टय हे आठ ग्रस्यमान, मिळून दहा होतात. कृत म्हणजे द्यूत. हें दशसंख्याकात्मक आहे; व अधिदैवत आणि अध्यात्म यांची संख्या दहा आहे. म्हणून या दोन पंचकांस द्यूतत्व प्राप्त होतें, अशी भावना उपासकानें करावयाची असते. आतां, द्यूत हें सर्व दानांस गिळून टाकणारें आहे, सर्वभक्षक आहे, हें प्रसिद्ध आहे. म्हणून दशसंख्याकात्मक कृतस्वरूपी देवतांसहीं सर्वभक्षकत्व प्राप्त होतें, अशी भावना ठेवावयाची आहे. पुनः दाही दिशांस असणाऱ्या देवतांस दशसंख्याकात्मकत्वभावनेनें संपादिलें आहे. म्हणूनच त्या दशदेवतांस विराटाचें स्वरूप प्राप्त होतें. तेथें विराट् भावना उत्पन्न होते. म्हणून या दश देवतांस अन्नत्व प्राप्त होतें; अशी भावना करण्यास श्रुति सांगते आहे.—

शि०—नाहीं समजत ?

**सिद्धान्ती**—'विराट् अन्न आहे' अशी श्रुति आहे. 'विराट् दशसंख्याकात्मक आहे.' हेंही प्रसिद्ध आहे. वायुपंचक, आणि प्राणपंचक मिळून दहा ही संख्या होते. दशसंख्या अन्नत्वाची प्रदर्शक आहे, म्हणून अधिदैवत पंचक आणि अध्यात्म पंचक हें दश म्हणजे अन्नात्मक होतें, अशी भावना करणें सोपें आहे. याप्रमाणें कृतस्वरूपानें ( देवतांस अमृतत्व ( अन्नादत्व, अन्नभक्षत्व ) प्राप्त होतें. आणि त्यासच विराटदृष्टीनें अन्नत्व प्राप्त होतें.

शि०—म्हणजे यांची संख्या दहा आहे. द्यूत दशसंख्याकात्मक आहे. द्यूतांतील कृतामध्यें ( चार या दानामध्यें ) सर्व दानांचा अंतर्भाव होतो. कृत सर्वांस अंतर्भूत करितें, सर्वांचा ग्रास करितें; म्हणून या दोन पंचकांस कृतत्व अथवा सर्वभक्षकत्व प्राप्त होतें. तसेंच विराट् दृष्टीनें या दशकाला अन्नत्वही प्राप्त होतें. ही अशी भावना उपासकांनीं ठेवावी, हें तात्पर्य आहे.

**सैषा विराड्दशसंख्या सत्यन्नं चान्नाद्यन्नादिनी च कृतत्वेन । कृते हि दशसंख्याऽन्तर्भूताऽतोऽन्नमन्नादिनी च सा । तथा विद्वान्दशदेवतात्मभूतः सन्विराट्त्वेन दशसंख्ययाऽन्नं कृतसंख्ययाऽन्नादी तयाऽन्नान्नादिन्येदं सर्वं जगद्दशदिक्सस्थं दृष्टं कृतसंख्याभूतयोपलब्धम् । तयाऽएवंविदोऽस्य सर्वं कृतसंख्याभूतस्य दशदिक्संबद्धं दृष्टमुपलब्धं भवति । किंचान्नादश्च भवति य एवं वेद यथोक्तदर्शी । द्विरभ्यास उपासनसमाप्त्यर्थः ॥ ८ ॥**

**इति चतुर्थाध्यायस्य तृतीयः खण्डः ॥ ३ ॥**

**सिद्धान्ती**—तात्पर्य, तूं आतांच सांगितलें आहेस. विराटत्व दाखविणारी दशसंख्या हीच अध्यात्माधिदैवतांची संख्या आहे. म्हणून त्या देवता अन्नरूप होतात आणि कृतत्वदृष्टीनें त्या देवता अन्नाद होतात. कारण, कृतामध्यें (द्यूतामध्यें) दश नामक संख्येचा अंतर्भाव होत असतो. म्हणून विराट अन्न असून अन्नाद आहे असें झालें. हें सर्व ज्याला उत्तम समजलें, तो दशदेवतात्मक होऊन म्हणजे विराट् होऊन दशसंख्याकात्मक होतो म्हणजे अन्नात्मक होतो. तसेंच, कृताचें स्वरूप विद्वान् उपासकाला प्राप्त झाल्यामुळें तो अन्नाद होतो. अर्थात् हा विद्वान् अन्न आणि अनाद झाल्यामुळें दशदिशांस विद्यमान असणारें सर्व जगत् स्वस्वरूपानें या विद्वानाला दिसूं लागतें. आणि तो यथार्थ स्वरूप जाणणारा विद्वान् अन्नाद होतो. आपण स्वतःच अन्नस्वरूप असून अन्नद्रष्टा असल्यामुळें, हा ज्ञानी उपासक सर्वज्ञ आणि सर्वसंग्राहक म्हणजे अन्नाद होतो. याप्रमाणें पांच अधिदैवी आणि पांच अध्यात्म देवता ह्यांस कृताचें म्हणजे द्यूताचें स्वरूप दिलें असतां उत्पन्न होणारें दशसंख्याकात्मकत्व विद्वान् उपासकाला प्राप्त होतें. अर्थात् दशात्मक असणाऱ्या विराटाचें म्हणजे अन्नाचें स्वरूप प्राप्त होतें. तसेंच द्यूतांतील कृत सर्वसंग्राहक आहे म्हणून (कृत दशसंख्याकात्मक आहे, या उभय प्रकारच्या देवता दशसंख्याकात्मक आहेत, दश हें कृताचें चिन्ह आहे म्हणून ) या देवतांस व त्यांच्या ज्ञात्या उपासकास अन्नादत्व प्राप्त होतें. सारांश, या दशदेवताच दशदिशांस असणारें अन्न आणि अन्नाद होतात. ही भावना उपासकानें दृढ ठेविली म्हणजे तोही या

ज्ञानानें अन्न आणि अन्नद्रष्टा होतो. तात्पर्य, तो सर्व होतो आणि सर्वज्ञ होतो. हें या ज्ञानाचें व दृढ उपासनेचें फळ आहे. या संवर्गविद्या नामक प्रकरणांत उपासनेप्रीत्यर्थ अवश्य असणारे आत्मगुण आणि भावनेचें सामर्थ्य यांचें वर्णन शौनकादिकांची गोष्ट सांगून केलें आहे. येथें या दृष्टीचें उपासनाप्रकरण संपलें ॥८॥

खंड तिसरा समाप्त.

---

## खंड चौथा.

### मंत्र पहिला.

**सत्यकामो ह जाबालो जबालां मातरमामन्त्रयांचक्रे ब्रह्मचर्यं भवति विवत्स्यामि किंगोत्रो न्वहमस्मीति ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—जाबालः सत्यकामः जबालां मातां आमंत्रयांचक्रे** ( जबालेचा पुत्र जाबाल; त्याचें नांव सत्यकाम होतें. तो एकदां मातेला हांक मारून म्हणाला ) **भवति, ब्रह्मचर्यं विवत्स्यामि किंगोत्रः अहं नु अस्मि इति** ( हे माते, गुरुकुलांत राहून ब्रह्मचर्यव्रताचें आचरण करावें, अशी माझी इच्छा आहे. तेव्हां मी कोणत्या गोत्राचा आहे हें मला सांग ॥ १ ॥

सर्वं वागाद्यग्न्यादि चान्नान्नादत्वसंस्तुतं जगदेकीकृत्य षोडशधा प्रविभज्य तस्मिन्ब्रह्मदृष्टिर्विधातव्येत्यारभ्यते । श्रद्धातपसोर्ब्रह्मोपासनाङ्गत्वप्रदर्शनायाऽऽख्यायिका । सत्यकामो ह नामतो हशब्द ऐतिह्यार्थो जबालाया अपत्यं जाबालो जबालां स्वां मातरमामन्त्रयांचक्र आमन्त्रितवान् । ब्रह्मचर्यं स्वाध्यायग्रहणाय हे भवति विवत्स्याम्याचार्यकुले, किंगोत्रोऽहं किमस्य मम गोत्रं सोऽहं किंगोत्रो न्वहमस्मीति ॥ १ ॥

सिद्धान्ती--वाणीप्रमूख व अग्निप्रमुख सर्व देवता अन्नस्वरूप आणि अन्नादस्वरूप आहेत, असें सांगून उपासकाची भावना कशी असावी, हें सर्व जगत् एक

आहे अशी भावना कशी करावी, हें सांगितलें. आतां सर्व एकरूप जगत् सोळा अवयवात्मक आहे, असा भाग सांगून त्याच्या ठिकाणीं ब्रह्मदृष्टि कशी करावयाची, हा उपासनेचा विधि सांगण्यासाठीं प्रस्तुत प्रकरणाला आरंभ केला आहे. प्रथमतः जाबालाची गोष्ट सांगितली आहे. तिचा हेतु श्रद्धा आणि तप हीं उभयतां ब्रह्मोपासनेचीं अंगें आहेत, हें दाखविण्याचा आहे. गोष्ट अशीः जबाला नामक स्त्रीचा मुलगा जाबाल म्हणून होता. याचें स्वतःचें नांव सत्यकाम होतें.

**शिष्य**---मंत्रांतील ' ह ' हें पद ऐतिह्यार्थी आहे. वस्तुतः गोष्ट तशी झाली आहे, असें ' ह ' पद दाखवितें.

**सिद्धान्ती**--होय. जाबालानें आपल्या आईस हांक मारिली आणि विचारिलें,- हे आई, गुरुकुलीं स्वाध्यायाच्या ग्रहणासाठीं मी ब्रह्मचर्याश्रमामध्यें राहणार आहें. आचार्यकुलांत ( आचार्यांच्या मठांत ) मी जाऊन राहणार आहें. तेथें माझें गोत्र कोणतें ? हें मला विचारतील. म्हणून माझें गोत्र मला कृपा करून सांग ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**सा हैनमुवाच नाहमेतद्वेद तात यद्गोत्रस्त्वमसि बह्वहं चरन्ती परिचारिणी यौवने त्वामलभे साऽह-मेतन्न वेद यद्गोत्रस्त्वमसि जबाला तु नामाहमस्मि सत्यकामो नाम त्वमसि स सत्यकाम एव जाबालो ब्रुवीथा इति ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः—सा एवं उवाच ह** ( ती त्याला म्हणाली ) **तात, यद्गोत्रः त्वं असि, अहं एतत् न वेद** ( मुला, कोणत्या गोत्रांत तुझा जन्म झाला आहे, हें मला ठाऊक नाहीं ) **अहं बहु परिचारिणी चरंती यौवने त्वा अलभे** (माझ्या तारुण्यामध्यें मी पुष्कळ सेवा करणारी होतें, तेव्हां तूं मला झालास ) **यद्गोत्रः त्वं असि, सा अहं एतत् न वेद** ( म्हणून कोणत्या गोत्राचा तूं आहेस हें मला ठाऊक नाहीं ) **अहं जबाला नाम तु अस्मि** ( पण मी जबाला नांवाची आहें. माझें नांव जबाला आहे) **त्वं सत्यकामः नाम असि** ( तुझें नांव सत्यकाम आहे) **स सत्यकामः एवं जाबालः ब्रुवीथाः** ( म्हणून तो तूं ' सत्यकाम

नांवाचा जाबाल ' आहेस, तुझें नांव सत्यकाम जाबाल आहे; असें सांग) इति ( असें आईनें सत्यकामाला सांगितलें ) ॥ २ ॥

एवं पृष्टा जबाला सा हैनं पुत्रमुवाच–नाहमेतत्तव गोत्रं वेद हे तात यद्गोत्रस्त्वमसि ।। कस्मान्न वेत्सीत्युक्ताऽऽह—बहु भर्तृगृहे परिचरचर्याजातमतिथ्यभ्यागतादि चरन्त्यहं परिचारिणी परिचरन्तीति परिचरणशीलैवाहं परिचरणचित्ततया गोत्रादिस्मरणे मम मनो नाभूत्। यौवने च तत्काले त्वामलभे लब्धवत्यस्मि । तदैव ते पितोपरतः । अतोऽनाथाऽहं साऽहमेतन्न वेद यद्गोत्रस्त्वमसि । जबाला तु नामाहमस्मि सत्यकामो नाम त्वमसि स त्वं सत्यकाम एवाहं जाबालोऽस्मीत्याचार्याय ब्रुवीथाः । यदाचार्येण पृष्ट इत्यभिप्रायः ॥ २ ॥

सिद्धान्ती—सत्यकामानें हा प्रश्न विचारल्यावर जबाला आपल्या ह्या पुत्राला म्हणाली, मुला ! तुझें गोत्र कोणतें आहे, हें मला ठाऊक नाहीं.

पूर्वपक्षी—हें कसें? आईला मुलाचें गोत्र ठाऊक नसणें, हा मोठा चमत्कार आहे ?

सिद्धान्ती—जबालेनें कारण सांगितलें आहे, तें ऐका:-ता म्हणते:-यजमानाच्या घरीं अतिथि, अभ्यागत इत्यादिकांची मला पुष्कळ सेवा करावयाची असल्याकारणानें माझें लक्ष सेवेमध्येंच गुंतून राहिलें होतें. माझ्या यजमानाचें गोत्र काय, हें विचारून स्मरणांत ठेवण्याचें मला ध्यानच राहिलें नाहीं. मी तरुण होतें, तेव्हां तूं मला झालास. लागलीच तुझा पिता उपरत झाला ( मेला, किंवा संन्यासी होऊन निघून गेला). वडील मनुष्यांस वगैरे विचारावें, तें लज्जेमुळें मीं विचारलें नाहीं. पुढें मी अनाथच झालें. त्या दुःखामुळें तुझें गोत्र कोणतें हें मीं विचारलें नाहीं. तात्पर्य, तुझें गोत्र कोणतें आहे, हें मला ठाऊक नाहीं. माझें नांव जबाला आहे, आणि तुझें नांव सत्यकाम आहे. तेव्हां जर तुला आचार्यांनीं विचारलें, तर तूं त्यांस असें सांग कीं, माझें नांव सत्यकाम जाबाल आहे ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा व चौथा.

**स ह हारिद्रुमतं गौतममेत्योवाच ब्रह्मचर्यं भगवति वत्स्याम्युपेयां भगवन्तमिति ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थः—तं ह उवाच** ( त्याला आचार्य म्हणाले ) **अब्राह्मणः एतत् विवक्तुं न अर्हति** ( अशाप्रकारचें स्पष्ट भाषण करण्याला अब्राह्मण—ब्राह्मणेतर—समर्थ नसतो ) **सोम्य, समिधं आहर; त्वां उपनेष्ये; सत्यात् न अगाः** ( तूं सत्यापासून पराङ्मुख झाला नाहींस, म्हणून तुझें उपनयन मी करितों. समिधा घेऊन ये ) **इति** ( असे आचार्य म्हणाले, आणि तदनंतर ) **तं उपनीय** ( त्याचें उपनयन करून ) **कृशानां अबलानां चतुःशताः गाः निराकृत्य** ( आणि कृश धेनूंपैकीं चारशें गायी एकीकडे काढून ) **उवाच** (आचार्य म्हणाले) **सोम्य, इमाः अनुसंव्रज इति** ( बाळा ! या गायींच्या पाठीमागून जा ) **ताः अभिप्रस्थापयन्, न असहस्रेण आवर्तेय इति उवाच** ( त्या गायींना अरण्यांत घेऊन जातांना सत्यकाम म्हणाला, कीं मी ह्या गायींची संख्या हजार झाल्याशिवाय परत येणार नाहीं ) **सः वर्षगणं प्रोवास ह** ( तो पुष्कळ वर्षेंपर्यंत अरण्यांत राहिला ) **यदा ता सहस्रं संपेदुः** ( जेव्हां त्या गायींची संख्या हजार झाली, तेव्हां—पण या वाक्याचा संबंध पुढच्या खंडांतील पहिल्या मंत्रांत स्पष्ट होईल ) ॥ ५ ॥

तं होवाच गौतमो नैतद्वचोऽब्राह्मणो विशेषेण वक्तुमर्हत्यार्जवार्थसंयुक्तम् । ऋजवो हि ब्राह्मणा नेतरे स्वभावतः । यस्मान्न सत्याद्ब्राह्मणजातिधर्मादगा नापेतवानासि । अतो ब्राह्मणं त्वामुपनेष्येऽतः संस्कारार्थं होमाय समिधं सोम्याऽऽहरेत्युक्त्वा तमुपनीय कृशानामबलानां गोयूथान्निराकृत्यापकृष्य चतुःशता चत्वारि शतानि गवामुवाचेमा गाः सोम्यानुसंव्रजानुगच्छ । इत्युक्तस्ता अरण्यं प्रत्यभिप्रस्थापयन्नुवाच—नासहस्रेणापूर्णेन सहस्रेण नाऽऽवर्तेय न प्रत्यागच्छेयम् । स एवमुक्त्वा गा अरण्यं तृणोदकबहुलं द्वंद्वरहितं प्रवेश्य स ह वर्षगणं दीर्घं प्रोवास प्रोषितवान् । ताः सम्यग्गावो रक्षिता यदा यस्मिन्काले सहस्रं संपेदुः संपन्ना बभूवुः ॥ ५ ॥

इति चतुर्थाध्यायस्य चतुर्थः खण्डः ॥ ४ ॥

**सिद्धान्ती**—त्याला गौतमाचार्य म्हणाले; शाबास! तूं जितक्या स्पष्टतेनें बोललास, तुझ्या वाणीमध्यें सत्यार्थ जितक्या पूर्णतेनें भरला आहे, तितकी स्पष्टता, आणि ऋजुता (सरळपणा) प्राप्त करून घेण्याला अब्राह्मण योग्य असत नाहीं. सारांश, ब्राह्मणाशिवाय इतर लोक सत्य आणि स्पष्ट बोलत नाहींत.

**शिष्य**—कां बरें?

**सिद्धान्ती**—स्वभावतःच ब्राह्मण ऋजु असतात. तात्पर्य, ज्याला असत्य आवडत नाहीं, तोच ब्राह्मण होय. असो; आचार्य म्हणालेः सत्य हा जो ब्राह्मणजातीचा स्वाभाविक धर्म, त्यापासून तूं भ्रष्ट झाला नाहींस. यावरून माझा सिद्धांत असा आहे, कीं तूं ब्राह्मणच आहेस. चल ये, मीं तुझें उपनयन करितों. पण उपनयनसंस्काराला अवश्य असणाऱ्या होमाला समिधा लागतात, त्या घेऊन ये. असें म्हणून व समिधा आणल्यावर त्याचे विध्युक्त उपनयन करून त्याला आचार्य म्हणाले,—त्यांच्या मठांतील कृश आणि दुर्बल गाईंच्या कळपांतून चारशें गाई एकीकडे काढून जाबालाला आचार्य म्हणाले:—या गाई घेऊन अरण्यांत जा आणि त्यांचें संरक्षण कर. ही आचार्यांची आज्ञा झाल्यावर त्या गाई घेऊन तो अरण्याकडे जावयास निघाला. पण जातांना तो म्हणाला, या चारशें गाई (गाई व बैल) मी नेत आहें. यांची संख्या सहस्र झाल्या शिवाय मी परत यावयाचा नाहीं. असें म्हणून तो एका अरण्यांत गेला. तें अरण्य तृणानें संपन्न असें होतें. तसेंच त्या तृणोदकसंपन्न अरण्यांत गोभक्षक हिंस्र पशू नव्हते. असो; तेथें जाऊन तो पुष्कळ दिवस गायींचें रक्षण हीच तपश्चर्या करिता झाला. त्यानें गायींचें उत्तमप्रकारें रक्षण केलें; तेंच अनुष्ठान श्रद्धेनें करितां झाला. पुढें वाढतां वाढतां तो गायींचा कळप हजारापर्यंत वाढला. जेव्हां सहस्रसंख्या पूर्ण झाली, तेव्हां त्या कळपांतील एक वृषभ त्याला म्हणाला—

**शिष्य**—पण हा सर्व कथाभाग पुढील खंडांत यावयाचा आहेना?

**सिद्धान्ती**—होय ॥ ५ ॥

चवथा खंड समाप्त.

---

# खंड पांचवा.

---

## मंत्र पहिला.

**अथ हैनमृषभोऽभ्युवाद सत्यकाम३ इति। भगव इति ह प्रतिशुश्राव। प्राप्ताः सोम्य सहस्रं स्मः प्रापय न आचार्यकुलम् ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः**—**अथ ह एनं ऋषभः अभ्युवाद सत्यकाम ३ इति** ( नंतर त्या जाबालाला मोठ्यानें हांक मारून ऋषभ (बैल) बोलला; म्हणजे त्यानें ' सत्यकामा ! ' अशी गौतमशिष्याला मोठ्यानें हांक मारिली ) **भगवः इति ह प्रतिशुश्राव** ( ओ भगवन् ! ' असें जाबालानें उत्तर दिलें ) **सोम्य, सहस्रं प्राप्ताः स्मः; आचार्यकुलं नः प्रापय** ( हे सौम्य, आमची संख्या हजार झाली आहे. आम्हांला तूं आतां आचार्यांच्या आश्रमांत घेऊन चल ) ॥ १ ॥

तमेतं श्रद्धातपोभ्यां सिद्धं वायुदेवता दिक्संबन्धिनी तुष्टा सत्यृषभमनुप्रविश्यर्षभापन्नाऽनुग्रहायाथ हैनमृषभोऽभ्युवादाभ्युक्तवान्सत्यकाम३ इति संबोध्य, तमसौ सत्यकामो भगव इति ह प्रतिशुश्राव प्रतिवचनं ददौ। प्राप्ताः सोम्या सहस्रं स्मः पूर्णा तव प्रतिज्ञाऽतः प्रापय नोऽस्मानाचार्यकुलम् ॥ १ ॥

**सिद्धान्ती**—जाबालाच्या श्रद्धेवर व तपश्चर्येवर दिक्संबंधी वायुदेवता संतुष्ट होऊन एका वृषभामध्यें प्रवेश करिती झाली.

**शिष्य**—जाबालाची श्रद्धा ( गुरुवचनावर दृढविश्वास ) आणि त्याची तपश्चर्या पाहून अरण्यामधील सर्व दिशांवर सत्ता चालविणारी वायुदेवता संतुष्ट झाली, हें ठीकच झालें. एका वृषभामध्यें प्रवेश करून त्याच्यावर अनुग्रह करण्यासाठीं वायुदेवता त्याच्याशीं बोलूं लागली, हेंही त्याच्या श्रद्धेचें व तपश्चर्येचें अथवा श्रद्धापूर्वक तपश्चर्येचें फल होय. सत्यकामाला ही समजलें, कीं ही वृषभवाणी म्हणजे देवतावाणी होय.

**सिद्धान्ती**—देवतेनें त्याला ' सत्यकाम ! ' अशी मोठ्यानें हांक मारिली.

शिष्य—'मोस्त्यांनें' हा अर्थ मंत्रांतील '३' या प्लुतामुळें झाला.

सिद्धान्ती—होय. तेव्हां 'भगवती देवी' किंवा 'भगवन् देव' असें म्हणून त्यानें देवतेला 'ओ' दिली. नंतर देवता म्हणाली, 'हे बाल, तपस्विन्! आमची संख्या सहस्र झाली आहे. तुझी गोसेवारूप तपश्चर्याही पूर्ण झाली. म्हणून आतां आम्हांला गौतमऋषीच्या आश्रमाकडे घेऊन चल.' या वेळीं गायी आणि वृषभ चारा खाऊन आणि पाणी पिऊन पुष्ट झाले होते, हें सांगावयास नकोच. असो; प्रसन्न झालेला वायु जाबालाला आणखी काय म्हणाला, तें पुढच्या मंत्रांत सांगितलें आहे ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**ब्रह्मणश्च ते पादं ब्रवाणीति ब्रवीतु मे भगवानिति तस्मै होवाच प्राची दिक्कला प्रतीची दिक्कला दक्षिणा दिक्कलोदीची दिक्कलैष वै सोम्य चतुष्कलः पादो ब्रह्मणः प्रकाशवान्नाम ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः—'च ब्रह्मणः पादं ते ब्रवाणि' इति; 'मे भगवान् ब्रवीतु' इति तस्मै ह उवाच** (आणखी वायु म्हणाला 'मी तुला आतां ब्रह्माचा एक चरण स्पष्ट करून सांगतों.' जाबाल म्हणाला भगवंतांनीं हें मला कृपा करून सांगावें') **प्राची दिक्कला, प्रतीची दिक्कला; दक्षिणा दिक्कला; उदीची दिक्कला; एषः वै सौम्य ब्रह्मणः चतुष्कलः पादः प्रकाशवान् नाम** (पूर्व दिशा ही ब्रह्मचरणाचा चौथा भाग आहे. त्याचप्रमाणें पश्चिम दिशा, दक्षिण दिशा, उत्तर दिशा ह्या प्रत्येकीं ब्रह्मचरणाचा चतुर्थ भाग आहे; आणि ह्या चतुष्कलेचें नांव **प्रकाशवान्** हें आहे) ॥ २ ॥

किंचाहं ब्रह्मणः परस्य ते तुभ्यं पादं ब्रवाणि कथयानि । इत्युक्तः प्रत्युवाच—ब्रवीतु कथयतु मे मह्यं भगवान् । इत्युक्त ऋषभस्तस्मै सत्यकामाय होवाच । प्राची दिक्कला ब्रह्मणः पादस्य चतुर्थो भागः । तथा प्रतीची दिक्कला दक्षिणा दिक्कलोदीची दिक्-

लैष वै सोम्य ब्रह्मणः पादश्चतुष्कलश्चतस्रः कला अवयवा यस्य सोऽयं चतुष्कलः पादो ब्रह्मणः प्रकाशवान्नाम प्रकाशवानित्येव नामाभिधानं यस्य । तथोत्तरेऽपि पादास्त्रयश्चतुष्कला ब्रह्मणः ॥ २ ॥

सिद्धान्ती—वायु पुढें म्हणाला: तुला आतां परब्रह्माच्या चरणाचे ( एका भागाचें ) स्वरूप सांगतों. ते ऐकून आनंदित झालेला जाबाल म्हणाला, भगवन् ! मी श्रवण करण्यास सिद्ध आहें. कृपा करून आपण मला पवित्र करावें. हें ऐकून ऋषभामध्यें प्रविष्ट झालेला वायु म्हणाला: लक्ष देऊन ऐक. पूर्व दिक् ( पूर्वेकडील दिशा ) ही ब्रह्मपादाचा चतुर्थ भाग ( चवथा भाग ) आहे. त्यांचप्रमाणें पश्चिम, दक्षिण आणि उत्तर हे सौम्य, याही दिशा प्रत्येकीं ब्रह्मपादाचा एकेक भाग आहेत.

शिष्य—कला म्हणजे अवयव ? चार दिशा आहेत. कला म्हणजे चार अवयव ज्या ब्रह्मपादाचें तो चतुष्कल ब्रह्मपाद होय. या ब्रह्मपादाचें नांव प्रकाशवान् असें आहे. तात्पर्य, हा ब्रह्मपाद स्वयंप्रकाशत्वानें किंवा प्रकाशाश्रयानें सर्व अज्ञानतिमिराचा विध्वंस करितो ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**स य एतमेवं विद्वांश्चतुष्कलं पादं ब्रह्मणः प्रकाशवानित्युपास्ते प्रकाशवानस्मिँल्लोके भवति प्रकाशवतो ह लोकाञ्जयति य एतमेवं विद्वांश्चतुष्कलं पादं ब्रह्मणः प्रकाशवानित्युपास्ते ॥ ३ ॥**

**इति चतुर्थाध्यायस्य पञ्चमः खण्डः ॥ ५ ॥**

**अन्वय व अर्थः**—**यः विद्वान् एवं एतं ब्रह्मणः चतुष्कलं पादं 'प्रकाशवान्' इति उपास्ते, स अस्मिन् लोके प्रकाशवान् भवति, प्रकाशवतः लोकान् जयति ह** ( या प्रकारचें ज्ञान होऊन जो विद्वान् ह्या चतुष्कल व प्रकाशगुणविशिष्ट ब्रह्मपादाचें आराधन करितो, तो ह्या लोकांत प्रकाशवान् होतो आणि जे जे म्हणून दिव्य लोक आहेत त्या लोकांवर ह्या विद्वानाची सत्ता प्रतिष्ठापित होते ) **यः विद्वान् एवं एतं ब्रह्मणः चतुष्कलं पादं प्रकाशवान् इति उपास्ते, सः इत्यादिः** ( या मंत्रभागाचा अन्वय व अर्थ आतांच सांगितला आहे ) ॥ ३ ॥

स यः कश्चिदेवं यथोक्तमेतं ब्रह्मणश्चतुष्कलं पादं विद्वान्प्रकाशवानित्यनेन गुणेन विशिष्टमुपास्ते तस्येदं फलं प्रकाशवानस्मिँल्लोके भवति प्रख्यातो भवतीत्यर्थः। तथाऽदृष्टं फलं प्रकाशवतो ह लोकान्देवादिसंबन्धिनोऽमृतः सञ्जयति प्राप्नोति। य एतमेवं विद्वांश्चतुष्कलं पादं ब्रह्मणः प्रकाशवानित्युपास्ते ॥ ३ ॥

इति चतुर्थाध्यायस्य पञ्चमः खण्डः ॥ ५ ॥

**सिद्धान्ती**—तो ऋषभ पुढे म्हणालाः जो कोणी विद्वान् या ब्रह्माच्या चतुष्कल (चतुरवयवी, चार अवयवांच्या) पादाचें मीं आतांच सांगितल्याप्रमाणें स्वरूप समजून घेतो व ह्या पादाचा गुण प्रकाश आहे, असें ध्यानांत ठेऊन त्या गुणविशिष्ट ब्रह्मपादाची उपासना करितो, प्रकाशविशिष्ट हा पाद आहे, अशा भावनेनें उपासना करितो, तो या मृत्युलोकीं प्रकाशवान् होतो; म्हणजे त्याची ख्याती सर्वत्र होते. मृत्युलोकांत त्याची कीर्ति सर्वत्र पसरते.

**शिष्य**—हें तर ज्ञानी उपासकाला मिळणारें दृष्ट फल झालें. परंतु या उपासनेचें अदृष्ट फलही कांहीं तरी असेलच ?

**सिद्धान्ती**—आहे तर ! जे जे दिव्य लोक आहेत, देवांचे लोक आहेत, त्या लोकांवर ही याची सत्ता स्थापित होते. तात्पर्य, हा लोक सोडून गेल्यावर ह्या ब्रम्होपासक विद्वानाला देवांचा दिव्य स्वर्ग प्राप्त होतो. जाबालाची निष्ठा कायम राहावी, म्हणून पुनः एकदां ऋषभानें उपासनेचें फल उध्दृत करून सांगितलें आहे ॥ ३ ॥

पांचवा खंड समाप्त.

---

## खंड सहावा.

### मंत्र पहिला.

**अग्निष्टे पादं वक्तेति स ह श्वोभूते गा अभिप्रस्थापयांचकार ता यत्राभि सायं बभूवुस्तत्राग्निमुपसमाधाय गा उपरुध्य समिधमाधाय पश्चादग्नेः प्राङुपोपविवेश ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः**—'ते अग्निः पादं वक्ता' इति ('ह्या पुढील दुसरा ब्रह्मपाद तुला अग्नि सांगेल;' असें म्हणून ऋषभ स्तब्ध झाला) **श्वोभूते सः गाः अभिप्रस्थापयांचकार ह** (नंतर दुसरे दिवशीं जाबाल तो धेनु-संभार आश्रमाकडे वळवून नेऊं लागला) **यत्र सायं ताः अभि बभूवुः, तत्र अग्निं उपसमाधाय, गाः उपरुध्य, समिधं आधाय, पश्चात् अग्नेः प्राक् उपोपविवेश** (आश्रमाकडे गायींचा कळप घेऊन जात असतां जेथें सध्याकाळ झाली व गायी एकत्र झाल्या, तेथें अग्नीची जाबालानें स्थापना केली, गायी थांबविल्या, समिध आणिली आणि नंतर समिध घेऊन अग्नीच्या पुढें ध्यान करीत बसला) ॥ १ ॥

सोऽग्निस्ते पादं वक्तेत्युपरराामर्षभः स सत्यकामो ह श्वोभूते परेद्युर्नैत्यकं नित्यं कर्म कृत्वा गा अभिप्रस्थापयांचकाराऽऽचार्यकुलं प्रति । ताः शनैश्चरन्स आचार्यकुलाभिमुख्यः प्रस्थिता यत्र यस्मिन्काले देशेऽभि सायं निशायामभिसंबभूवुरेकत्राभिमुख्यः संभूताः, तत्राग्निमुपसमाधाय गा उपरुध्य समिधमाधाय पश्चादग्नेः प्राङुपोपविवेश ऋषभवचो ध्यायन् ॥ १ ॥

सिद्धान्ती—ऋषभ म्हणाला:-'आतां तुला दुसरा ब्रह्मपाद सांगावयाचा आहे, तो अग्नि सांगेल.' असें म्हणून ऋषभानें आपलें बोलणें थांबविलें. नंतर सत्यकामानें दुसरे दिवशीं आपलें नित्यनैमित्तिक ब्रह्मकर्म आटपलें आणि गायींचा कळप घेऊन, आचार्यांच्या आश्रमाकडे त्यांस नेण्यासाठीं तो मार्गक्रमण करूं लागला.

शिष्य—सत्यकामानें नित्यनैमित्तिक कर्माचें अनुष्ठान केलें, यावरून ब्रह्मज्ञानाची संपूर्ण प्राप्ति झाली नाहीं, तोंपर्यंत नित्यनैमित्तिक कर्म सोडतां येत नाहीं, असें झालें.

सिद्धान्ती—असो; आचार्यांच्या आश्रमाकडे जात असणारा हा धेनूंचा कळप हळूं हळूं व चरत चरत जात होता. तेव्हां ज्या ठिकाणीं संध्याकाळ झाली, तेथें त्या सर्व गायी एकत्र होऊन तेथेंच थांबल्या. त्यांचीं तोंडें आश्रमाकडे होतीं. तात्पर्य, आश्रमाकडे जाण्यास त्या आतुर झाल्या होत्या. असो; नंतर सायंहोमासाठीं अग्नीची व्यवस्था करून, गायींस थांबवून आणि समिधा आणून जाबाल अग्नीपुढें श्रद्धापूर्वक उपविष्ट झाला. तो अग्नीशीं प्राङ्मुख झाला. नंतर ऋषभवचन ध्यानांत आणून तो जाबाल अग्नीच्या उपदेशाची वाट पाहूं लागला.

शिष्य—'उपसमाधाय,' 'उपरुध्य,' 'उपविवेश' या पदांतील 'उप' हा उपसर्ग असें स्पष्ट सुचवितो कीं, जाबाल हा अग्नि आणि धेनु यांच्या संनिध मोठ्या विनयानें बसला होता नव्हे ?

सिद्धान्ती—होय. शिवाय विचारल्याविना उपदेश करूं नये, असें शास्त्र आहे. तेव्हां अग्निसन्मुख जाऊन बसण्यानें ब्रम्होपदेश ऐकण्याची जाबालास उत्कंठा होती, असेंही श्रुतिनें सुचाविलें. ब्रह्मचर्याश्रमांत अग्निपूजा अवश्य आहे ॥१॥

---

## मंत्र दुसरा.

**तमग्निरभ्युवाद सत्यकाम ३ इति भगव इति ह प्रतिशुश्राव ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः—'तं अग्निः 'सत्यकाम' ३ इति अभ्युवाद, 'भगवः इति प्रतिशुश्राव ह** ('हे सत्यकामा !' अशी अग्नीनें मोठ्यानें हांक मारिली आणि 'भगवन् !' अशी सत्यकामानें ओ दिली) ॥ २ ॥

तमग्निरभ्युवाद सत्यकाम ३ इति संबोध्य, तमसौ सत्यकामो भगव इति ह प्रतिशुश्राव प्रतिवचनं ददौ ॥ २ ॥

सिद्धान्ती—'सत्यकामा !' असें नांव घेऊन अग्नीनें त्याला तारस्वरानें हांक मारिली. तेव्हां आनंदित झालेला सत्यकाम 'भगवन् !' असें म्हणून ओ देता झाला ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**ब्रह्मणः सोम्य ते पादं ब्रवाणीति ब्रवीतु मे भगवानिति तस्मै होवाच पृथिवी कलाऽन्तरिक्षं कला द्यौः कला समुद्रः कलैष वै सोम्य चतुष्कलः पादो ब्रह्मणोऽनन्तवान्नाम ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थः—'सोम्य ते ब्रह्मणः पादं ब्रवाणि' इतिः 'भगवान्, मे ब्रवीतु' इति तस्मै उवाच ह** (अग्नि म्हणाला, हे सौम्य ! तुला आतां मी ब्रह्मपादाचें स्वरूप सांगतों. तें ऐकून सत्यकाम

म्हणाला; ' भगवन् मी ऐकण्यास सिद्ध आहें ) **पृथिवी कला, अंतरिक्षं कला, द्यौः कला, समुद्रः कला; सोम्य, एषः अनंतवान् नाम चतुष्कलः ब्रह्मणः पादः** ( पृथ्वी एक अवयव, आणि अंतरिक्ष, द्युलोक व समुद्र हे दुसरे तीन अवयव आहेत. हे सौम्य, या चार अवयवांनीं सिद्ध झालेल्या या दुसऱ्या ब्रह्मपादाचें **' अनंतवान् '** हें नांव आहे ॥ **२** ॥

ब्रह्मणः सोम्य ते पादं ब्रवाणीति ब्रवीतु मे भगवानिति तस्मै होवाच पृथिवी कलाऽन्तरिक्षं कला द्यौः कला समुद्रः कलेत्यात्मगोचरमेव दर्शनमग्निरब्रवीत् । एष वै सोम्य चतुष्कलः पादो ब्रह्मणोऽनन्तवान्नाम ॥ ३ ॥

सिद्धान्ती—' सौम्य, तुला आतां मी दुसऱ्या ब्रह्मपादाचें स्वरूप सांगतों असें अग्नि म्हणाला. तेव्हां सत्यकाम म्हणाला,—' भगवन्, मी ऐकण्यास सिद्धच आहें. ' तेव्हां अग्नीनें सांगितलें: ' पृथ्वी ( भूलोक ), अंतरिक्ष ( भुवर्लोक ), द्युलोक ( स्वर्लोक ) आणि समुद्र ह्या दुसऱ्या ब्रह्मपादाच्या चार कला आहेत. ' शिष्यराया, हें लक्षांत ठेव कीं, सत्यकामानें या वेळीं जो अग्नि प्रज्वलित केला होता, तोच आत्मज्ञाता अग्नि सत्यकामाला ज्ञानदर्शनाचा उपदेश करीत आहे.

शिष्य—किंवा पृथिव्यादि रूपांनीं अग्नि संचार करितो, असें अग्निविषयक हें दर्शन आहे, असेंही समजावें ?

सिद्धान्ती—तात्पर्य एकच आहे. असो; ' या दुसऱ्या चतुरवयवी ब्रह्मपादाचें ' अनंतवान् ' हें नांव आहे. ' असें अग्नि म्हणाला ॥ २ ॥

---

## मंत्र चवथा.

**स य एतमेवं विद्वाꣳश्चतुष्कलं पादं ब्रह्मणोऽनन्तवानित्युपास्तेऽनन्तवानस्मिँल्लोके भवत्यनन्तवतो ह लोकाञ्जयति य एतमेवं विद्वाꣳश्चतुष्कलं पादं ब्रह्मणोऽनन्तवानित्युपास्ते ॥ ४ ॥**

**इति चतुर्थाध्यायस्य षष्ठः खण्डः ॥ ६ ॥**

अन्वय व अर्थः—**यः एतं एवं विद्वान् ब्रह्मणः चतुष्कलं पादं अनंतवान् इति उपास्ते, स अस्मिन् लोके अनंतवान् भवति;**

**अनंतवंतः लोकान् जयति ह; यः एवं विद्वान् एतं ब्रह्मणः चतुष्कलं पादं 'अनंतवान्' इति उपास्ते, सः इत्यादिः**—(अर्थ मागच्या खंडांतील तिसऱ्या मंत्राप्रमाणें आहे. या ब्रह्मपादाचा विशेष गुण अनंतवत्त्व हा आहे. हा गुण लक्षांत ठेवून जो विद्वान् या चतुरवयवी ब्रह्मपादाची उपासना करितो, तो इहलोकीं अनंत होतो; आणि हा लोक सोडल्यावर अनंत लोकामध्यें जाऊन राहतो, असें तात्पर्य आहे ) ॥ ४ ॥

स यः कश्चिद्यथोक्तं पादमनन्तवत्त्वेन गुणेनोपास्ते स तथैव तद्गुणो भवत्यस्मिँल्लोके मृतश्चानन्तवतो ह लोकान्स जयति य एतमेवमित्यादि पूर्ववत् ॥ ४ ॥

इति चतुर्थाध्यायस्य षष्ठः खण्डः ॥ ६ ॥

**सिद्धान्ती**—वस्तुतः या मंत्राचा अर्थ पांचव्या खंडांतील तिसऱ्या मंत्राप्रमाणें आहे. मात्र हा अग्निकल्पित ब्रह्मपाद अनंतत्व किंवा अनंतवत्त्व ह्या गुणानें विशिष्ट आहे. हा गुण लक्षांत ठेवून उपासना केली म्हणजे उपासकाला अनंतत्व गुणाच्या उपासनेनुसार ह्या लोकीं अनंतत्व हें **दृष्टफल** आणि अनंतवान् असणाऱ्या लोकांची प्राप्ति हें **अदृष्ट फल** मिळतें.

**शिष्य**—ह्या लोकांत अनंतत्व मिळणें म्हणजे ?

**सिद्धान्ती**—त्याचा वंश अविच्छिन्न होतो. त्याचा वंशक्षय केव्हांही होत नाहीं; आणि स्वर्गांतील अनंत म्हणजे अक्षय्य लोक त्याला मिळतो. जो गुण लक्षांत ठेवून उपासक उपास्याची एकाग्र आराधना करितो, त्या गुणाची प्राप्ति उपासकास होते; असें शास्त्र आहे ॥ ४ ॥

सहावा खंड समाप्त.

---

## खंड सातवा.

---

### मंत्र पहिला.

**हंसस्ते पादं वक्तेति स ह श्वोभूते गा अभिप्रस्थापयांचकार ता यत्राभि सायं बभूवुस्तत्राग्निमुपसमाधाय गा उपरुध्य समिधमाधाय पश्चादग्नेः प्राङुपोपविवेश ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—'ते हंसः पादं वक्ता' इति** (यापुढें तिसऱ्या पादाचें वर्णन तुला हंस म्हणजे आदित्य देईल' असें अग्नीनें सांगितलें) **श्वोभूते सः गाः अभिप्रस्थापयांचकार ह; ताः यत्र सायं अभिबभूवुः, तत्र गाः उपरुध्य, अग्निं उपसमाधाय, समिधं आधाय पश्चात् अग्नेः प्राक् उपविवेश** (या मंत्र भागाचा अर्थ खंड ६ मंत्र १ यामध्यें झाला आहे) ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**तꣳ हꣳस उपनिपत्याभ्युवाद सत्यकाम ३ इति भगव इति ह प्रतिशुश्राव ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः—हंसः तं उपनिपत्य अभ्युवाद 'सत्यकाम ३' इति; 'भगवः' इति ह प्रतिशुश्राव** (नंतर अग्निसन्मुख उपासना करणाऱ्या जाबालाजवळ हंस म्हणजे आदित्य आला, सत्यकाम जाबालाला त्यानें हांक मारिली; आणि त्यानें ओ दिली इत्यादि अर्थ मागें सांगितला आहे ॥ २ ॥

सोऽग्निर्हंसस्ते पादं वक्तेत्युक्त्वोपरराम । हंस आदित्यः । शौक्ल्यात्पतनसामान्याच्च । स ह श्वोभूत इत्यादि समानम् ॥१॥२॥

**सिद्धान्ती**—'या पुढचें तृतीय ब्रह्मपादाचें स्वरूप तुला हंस सांगेल'—

**शिष्य**—हा हंस म्हणजे आदित्य असावा ?

**सिद्धान्ती**—होय. कारण, हे उभयतांही शुक्लवर्ण आहेत; आणि उभयतांस पतनसामर्थ्य आहे. पक्षी अंतरिक्षांत भ्रमण करितात आणि पृथ्वीकडे येतात व हा सूर्य आकाशांत भ्रमण करितो, आणि नित्य उदयास्त पावत असतो. असो, अग्नि म्हणाला, पुढचा उपदेश तुला आदित्य म्हणजे सूर्य करील. मंत्राचा पुढील भाग स्पष्टच आहे (खंड सहा मंत्र १।२ पहा) ॥ १ ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**ब्रह्मण: सोम्य ते पादं ब्रवाणीति ब्रवीतु मे भगवानिति तस्मै होवाचाग्नि: कला सूर्य: कला चन्द्र: कला विद्युत्कलैष वै सोम्य चतुष्कल: पादो ब्रह्मणो ज्योतिष्मान्नाम ॥ ३ ॥**

अन्वय व अर्थ:—'सोम्य, ते ब्रह्मण: पादं ब्रवाणि' इति; 'भगवान् मे ब्रवीतु' इति तस्मै ह उवाच; अग्नि: कला, सूर्य: कला, चंद्र: कला, विद्युत् कला; सोम्य, एष: वै ज्योतिष्मान् नाम ब्रह्मण: चतुष्कल: पाद: (अर्थ सांगितला आहे. ह्या तिसऱ्या ब्रह्मपादाचे अग्नि, सूर्य, चंद्र आणि विद्युत् हे अवयव आहेत व या पादाचें नांव ज्योतिष्मान् हें आहे) ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा.

**स य एतमेवं विद्वाꣳश्चतुष्कलं पादं ब्रह्मणो ज्योतिष्मानित्युपास्ते ज्योतिष्मानस्मिँल्लोके भवति ज्योतिष्मतो ह लोकाञ्जयति य एतमेवं विद्वाꣳश्चतुष्कलं पादं ब्रह्मणो ज्योतिष्मानित्युपास्ते ॥ ४ ॥**

**इति चतुर्थाध्यायस्य सप्तमः खण्ड: ॥ ७ ॥**

अन्वय व अर्थ:—य: एवं विद्वान् एतं ब्रह्मण: चतुष्कलं पादं ज्योतिष्मान् इति उपास्ते, स: अस्मिन् लोके ज्योतिष्मान् भवति, ह ज्योतिष्मत: लोकान् जयति; य: एवं विद्वान् एतं ब्रह्मण: चतुष्कलं पादं ज्योतिष्मान् इति उपास्ते, स: इत्यादि: (अर्थ ६ व्या खंडांतील ३ व ४ मंत्राप्रमाणें आहे. मात्र येथें या तिसऱ्या ब्रह्मपादाचा विशेष ज्योतिष्मत्व ह्या आहे. उपासक ज्योतिष्मान् होतो, दीप्तिमान् होतो, आणि दीप्तिवंत लोकांची प्राप्ति ह्याला होते, इत्यादि गोष्टी सांगावयास नकोतच ॥ ४ ॥

अग्निः कला सूर्यः कला चन्द्रः कला विद्युत्कलैष वै सोम्येति ज्योतिर्विषयमेव च दर्शनं प्रोवाचातो हंसस्याऽऽदित्यत्वं प्रतीयते । विद्वत्फलं—ज्योतिष्मान्दीप्तियुक्तोऽस्मिँल्लोके भवति । चन्द्रादित्यादीनां ज्योतिष्मत एव च मृत्वा लोकाञ्जयति । समानमुत्तरम् ॥ ३ ॥ ४ ॥

इति चतुर्थाध्यायस्य सप्तमः खण्डः ॥ ७ ॥

**सिद्धान्ती**—या तिसऱ्या आणि चौथ्या मंत्रांचा अर्थ प्रायः मागें सांगितलाच आहे. या तिसऱ्या ब्रह्मपदाचे अवयव अग्नि, सूर्य, चंद्र आणि विद्युत् ( वीज ) हे आहेत. ह्या ब्रह्मपादाचा साक्षात्कार ज्योतिःस्वरूपानें ( प्रकाशस्वरूपानें ) व्हावयाचा आणि ह्या पादाचा उपदेशही हंसानें केला आहे खरा; पण श्रुतीनें ज्योतिष्मत्ता हा हंसविशेष सांगितला आहे. म्हणून हंस म्हणजे आदित्यच होय असें स्पष्टप्रत्ययानें ठरतें. या स्वरूपाचें ज्ञानविज्ञान ज्या उपासकाला होतें, तो इहलोकीं दीप्तिमान् होतो, स्वयंप्रकाश होतो; आणि हा लोक सोडून गेल्यावर उपासकाला चंद्र–आदित्य प्रमुख दीप्तिवंत लोकांची ( भुवनांची ) प्राप्ति होते. बाकीचा अर्थ वस्तुतः मागें सांगितला आहे. एक गोष्ट विसरावयाची नाहीं, ती हीं की वायु, अग्नि आणि आदित्य यांचे जे विशेष गुण आहेत, तेच लक्षांत ठेऊन या देवतांनीं ब्रह्मस्वरूपाचे गुणगुणानुसार वर्णन केलें आहे ॥ ३ ॥४॥

सातवा खंड समाप्त.

---

## खंड आठवा.

### मंत्र पहिला.

**मद्गुष्टे पादं वक्तेति स ह श्वोभूते गा अभिप्रस्थापयांचकार ता यत्राभि सायं बभूवुस्तत्राग्निमुपसमाधाय गा उपरुध्य समिधमाधाय पश्चादग्नेः प्राङुपोपविवेश ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः**—' ते मद्गुः पादं वक्ता ' इति ('तुला यानंतरचा ब्रह्मोपदेश मद्गु करील. ' असें आदित्यानें सांगितलें आणि तो अंतर्धान

पावला ) श्वोभूते सः गाः अभिप्रस्थापयांचकार; यत्र ताः सायं अभि बभूवुः, तत्र गाः उपरुध्य, अग्निं उपसमाधाय, समिधं आधाय, पश्चात् अग्नेः प्राक्-सः—उपोपविवेश (अर्थ मागच्याप्रमाणें)

हंसोऽपि मद्गुष्टे पादं वक्तेत्युपरराम। मद्गुरुदकचरः पक्षी स चाप्संबन्धात्प्राणः। स ह श्वोभूत इत्यादि पूर्ववत्॥ १॥

**सिद्धान्ती**—आदित्य म्हणाला, तुला आतां चौथ्या ब्रह्मपादाचा उपदेश मद्गु करील.

**शिष्य**—मद्गु म्हणजे ?

**सिद्धान्ती**—हा एक विशेषप्रकारचा रानटी पक्षी आहे. हा उदकचर म्हणजे नेहमीं पाण्यांत वास्तव्य करणारा आहे. जलाशीं याचा संबंध नित्य म्हणून हा प्राणरूपच होय. अर्थात् येथें प्राणानें उपदेश केला आहे. बाकीचा अर्थ पूर्वकथनाशीं समसमान आहे॥ १॥

---

## मंत्र दुसरा.

**तं मद्गुरुपनिपत्याभ्युवाद सत्यकाम ३ इति भगव इति ह प्रतिशुश्राव॥ २॥**

अन्वय व अर्थः—मद्गुः तं उपनिपत्य अभ्युवाद 'सत्यकाम ३' इति, 'भगवः इति ह प्रतिशुश्राव (पक्ष्याचें स्वरूप घेऊन तेथें प्राण आविर्भूत झाला, इतकाच येथें अर्थभेद आहे. बाकीचा अर्थ पूर्वीप्रमाणें)॥२॥

---

## मंत्र तिसरा.

**ब्रह्मणः सोम्य ते पादं ब्रवाणीति ब्रवीतु मे भगवानिति तस्मै होवाच प्राणः कला चक्षुः कला श्रोत्रं कला मनः कलैष वै सोम्य चतुष्कलः पादो ब्रह्मण आयतनवान्नाम॥ ३॥**

अन्वय व अर्थः—सोम्य 'ते ब्रह्मणः पादं ब्रवाणि' इति; 'भगवान् मे ब्रवीतु' इति; तस्मै उवाच ह; 'प्राणः कला, चक्षुः कला, श्रोत्रं कला, मनः कला; सोम्य, एषः आयतनवान् नाम, ब्रह्मणः चतुष्कलः पादः वै (अर्थ प्रायः पूर्वीप्रमाणें. येथें मद्गु वक्ता आहे व प्राण, चक्षु, श्रोत्र आणि मन हे ब्रह्माच्या चौथ्या पादाचे अवयव आहेत, हा विशेष आहे. या पादाचें नांव आयतनवान् आहे) ॥ ३ ॥

स च मद्गुः प्राणः स्वविषयमेव च दर्शनमुवाच प्राणः कलेत्याद्यायतनवानित्येवं नाम। आयतनं नाम मनः सर्वकरणोपहृतानां भोगानां तद्यस्मिन्पादे विद्यत इत्यायतनवान्नाम पादः ॥ २ ॥ ३ ॥

सिद्धान्ती–नंतर त्या मद्गूनें म्हणजे प्राणानें आपलाच स्वरूपविषय असणाऱ्या चौथ्या ब्रह्मपादाचें प्राणविशिष्ट स्वरूप वर्णिलें. तो म्हणाला; प्राण, नेत्र, कर्ण आणि मन हे या पादाचे अवयव आहेत. याचें नांव आयतनवान् असें आहे.

शिष्य—आयतन म्हणजे ?

सिद्धान्ती–आयतन म्हणजे स्थान. सर्व इंद्रियांनीं स्वीकृत केलेले भोग (विषय) जेथें वास्तव्य करितात तें मन होय. मन हें स्थान सर्व इंद्रियोपभोगांचें वसतिगृह आहे. हें मन जेथें राहते तो पाद आयतवान्. तात्पर्य; हा पाद मनोविशिष्ट आहे ॥ २ ॥ ३ ॥

---

### मंत्र चवथा.

स य एतमेवं विद्वांश्चतुष्कलं पादं ब्रह्मण आयतनवानित्युपास्त आयतनवानस्मिँल्लोके भवत्यायतनवतो ह लोकाञ्जयति य एतमेवं विद्वांश्चतुष्कलं पादं ब्रह्मण आयतनवानित्युपास्ते ॥ ४ ॥

इति चतुर्थाध्यायस्याष्टमः खण्डः ॥ ८ ॥

अन्वय व अर्थः—यः एवं विद्वान् एतं ब्रह्मणः चतुष्कलं पादं आयतनवान् इति उपास्ते, सः अस्मिन् लोके आयतनवान् भवति, आयतनवतः लोकान् जयति ह; यः एवं, विद्वान् ब्रह्मणः

**एवं चतुष्कलं पादं आयतनवान् इति उपास्ते, सः इत्यादिः**—(येथें हा चौथा ब्रह्मपाद **आयतनवान्** आहे, असें ध्यान ठेवून जो विद्वान् उपासक उपासना करितो, तो ह्या लोकीं आयतनवान् होतो; आणि पुढेंही त्याला आयतनवंत लोक प्राप्त होतात. विशेष शब्दार्थ मागें सांगितला आहे)॥४॥

तं पादं तथैवोपास्ते यः स आयतनवानाश्रयवानस्मिँल्लोके भवति । तथाऽऽयतनवत एव सावकाशाँल्लोकान्मृतो जयति । य एतमेवमित्यादि पूर्ववत् ॥ ४ ॥

इति चतुर्थाध्यायस्याष्टमः खण्डः ॥ ८ ॥

**सिद्धान्ती**—आयतनवत्त्व गुण ध्यानांत ठेऊन तत्स्वरूपानें जो ज्ञानी उपासक त्या चौथ्या ब्रह्मपादाची उपासना करितो, तो ह्या लोकीं आयतनवान् होतो. म्हणजे त्याला उत्कृष्टप्रकारचा आश्रय ह्या लोकीं मिळतो, किंवा तो सर्व लोकांचें आश्रयस्थान होतो. आणि ह्या मर्त्यदेहाचा त्याग केल्यानंतर त्याला आयतनवंत भुवनांची प्राप्ति होते. म्हणजे पंचत्व पावल्यानंतर हा उपासक ज्या ज्या आयतनीं भुवनांत प्रवेश करितो, तेथें तेथें त्याला मात्र आश्रय मिळतो. बाकीचा अर्थ सांगावयास नको ॥ ४ ॥

खंड आठवा समाप्त.

---

## खंड नववा.

---

### मंत्र पहिला.

**प्राप हाऽऽचार्यकुलं तमाचार्योऽभ्युवाद सत्यकाम ३ इति भगव इति ह प्रतिशुश्राव ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—आचार्यकुलं प्राप ह** ( हा कार्यब्रह्मोपदेश झालेला सत्यकाम शेवटीं आचार्यांच्या आश्रमामध्यें आला ) **तं आचार्यः ‘ सत्यकाम ३ ’ इति अभ्युवाद** ( तो आलेला पाहून आचार्यांनीं त्याला सत्य कामा ! अशी आशीर्वादपूर्वक हांक मारिली ) **‘ भगवः ’ इति ह प्रतिशुश्राव** ( ‘ ओ ! भगवन् ! ’ असें सत्यकामानें उत्तर दिलें ) ॥ १ ॥

स एवं ब्रह्मवित्सन्प्राप ह प्राप्तवानाचार्यकुलम् । तमाचार्योऽभ्युवाद सत्यकाम३ इति । भगव इति ह प्रतिशुश्राव ॥ १ ॥

सिद्धान्ती—याप्रमाणें चतुष्पाद ब्रह्माचा उपदेश झालेला म्हणजे कार्यब्रह्मवेत्ता सत्यकाम आचार्यांच्या आश्रमांत प्रवेश करिता झाला. तो आलेला पाहून 'सत्यकामा!' अशी आचार्यांनीं प्रेमानें त्याला हांक मारिली आणि 'ओ, आलों भगवन्' असें सत्यकामानें साविनय प्रतिवचन केलें, उत्तर दिलें ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**ब्रह्मविदिव वै सोम्य भासि को नु त्वाऽनुशशासेत्यन्ये मनुष्येभ्य इति ह प्रतिजज्ञे भगवाꣳस्त्वेव मे कामे ब्रूयात् ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः—सोम्य, ब्रह्मवित् इव वै भासि** ( बाळा! ब्रह्मवेत्त्यासारखा तूं मला दिसत आहेस ) **कः नु त्वा अनुशशास** ( तुला कोणी हा ब्रह्मोपदेश केला बरें? ) इति ( असें आचार्यांनीं त्याला विचारलें )—'**मनुष्येभ्यः अन्ये**' इति ह **प्रतिजज्ञे** ( मनुष्यांहून इतर अन्य जीवांनीं मला उपदेश केला आहे, असें सत्यकामानें स्पष्ट आणि सरळ उत्तर दिलें ) तु **भगवान् एव कामे ब्रूयात्** (परंतु आपण भगवान् आहांत, आपण मात्र माझी इच्छा पूर्ण करण्यास समर्थ आहांत ) ॥ २ ॥

ब्रह्मविदिव वै सोम्य भासि । प्रसन्नेन्द्रियः प्रहसितवदनश्च निश्चिन्तः कृतार्थो ब्रह्मविद्भवति । अत आचार्यो ब्रह्मविदिव भासीति को न्विति वितर्कयन्नुवाच कस्त्वामनुशशासेति । स चाऽऽह सत्यकामोऽन्ये मनुष्येभ्यः देवता मामनुशिष्टवत्यः । कोऽन्यो भगवच्छिष्यं मां मनुष्यः सन्ननुशासितुमुत्सहेतेत्यभिप्रायः। अतोऽन्ये मनुष्येभ्य इति ह प्रतिजज्ञे प्रतिज्ञातवान् । भगवांस्त्वेव कामे ममेच्छायां ब्रूयात्किमन्यैरुक्तेन नाहं तद्गणयामीत्यभिप्रायः ॥ २ ॥

सिद्धान्ती—आचार्यांनीं त्याला निरखून पाहिलें आणि त्यांनीं त्याला विचारलें: ' अरे, तूं ब्रह्मवेत्त्यासारखा तेजस्वी दिसत आहेस हें कसें ? '

शिष्य—आचार्यांनीं कशावरून ओंळखलें हें ?

सिद्धान्ती—आचार्य सर्वज्ञच होते. शिवाय इंद्रियें प्रसन्न आणि प्रशांत असलीं,-हास्यमुख असलीं,-वृत्ति निश्चिंत (चिंताशून्य) असली, म्हणजे या चिह्नांनीं युक्त असलेला पुरुष कृतार्थ झालेला असतो; आणि कृतार्थ झालेला तोच ब्रह्मवेत्ता असतो; असें शास्त्राचें सांगणें आहे. अर्थात् सत्यकामाची इंद्रियें प्रसन्न आहेत, वदन सुहास्य आहे, सत्यकाम चिंताशून्य आहे, हीं लक्षणें प्रत्यक्ष पाहिलीं तेव्हां ब्रह्मोपदेश होऊन सत्यकाम कृतार्थ झाला आहे, असें आचार्यांनीं ओळखलें. ' आकार, इंगित, गति इत्यादि चिह्नें जीवाचें मनःस्वरूप स्पष्ट सांगतात.' हें त्वां ऐकिलें नाहीं कीं काय ? असो; आचार्य विचारते झाले, तुला हा उपदेश कोणी केला असावा बरें ?

पूर्वपक्षी—उपदेश झाला तर बरेंच झालें. शंका घेऊन प्रश्न करण्याचें आतां कारण काय उरलें होतें ?

सिद्धान्ती—सत्यकामानें गौतमाला गुरु केला होता. गुरुशिवाय दुसऱ्यानें शिष्याला उपदेश करूं नये, व शिष्यानें दुसरा गुरु करूं नये, असा न्याय आहे. दुसऱ्यापासून उपदेश घेतला असतां उपदेशक व शिष्य शापार्ह होतात; असा सिद्धांत आहे. तेव्हां माझ्या शापासही न भिणारा असा सत्यकामाला उपदेश करणारा कोण असावा, अशी शंका आचार्यांस सहज उत्पन्न झाली; म्हणून गुरुजींनीं हा प्रश्न अमळ साक्षेपानेंच विचारला आहे. सत्यकाम म्हणाला: ' मला उपदेश केला ते मनुष्यांहून अन्य होते. भगवन् ! मनुष्यांनीं मला उपदेश केला नाहीं. वायु, अग्नि, आदित्य आणि प्राण या देवतांनीं अनुग्रह करून मला उपदेश केला. '

शिष्य—अर्थात् सत्यकामाच्या बोलण्याचा हा अभिप्राय आहे कीं, ' मी आपला शिष्य असतांना कोणता दुसरा मनुष्य मला उपदेश करण्याचें साहस करील ? हें साहस मनुष्याला संभवत नाहीं.' म्हणून सत्यकामानें प्रतिज्ञापूर्वक सत्य सांगितलें कीं मनुष्याहून अन्यांनीं (अतिमानवांनीं) मला उपदेश केला आहे.

सिद्धान्ती—सत्यकाम म्हणाला:-' हें असें झालें, तथापि ब्रह्मस्वरूपाविषयीं माझी जी जिज्ञासा आहे ती आपल्याशिवाय दुसरा कोण पूर्ण करणार ? शिवाय, दुसऱ्या कोणीही मला उपदेश केला तरी काय झालें ? त्या उपदेशाची किंमत आपल्या अनुग्रहापुढे कांहींच नाहीं, असें मी समजतों '

पूर्व०—हें कशावरून ?

सिद्धान्ती—पुढचा मंत्र पहा, म्हणजे तुमची शंका नाहींशी होईल ॥ २ ॥

## मंत्र तिसरा.

**श्रुतꣳ ह्येव मे भगवद्दृशेभ्य आचार्याद्धैव विद्या विदिता साधिष्ठं प्रापतीति तस्मै हैतदेवोवाचात्र ह न किंचन वीयायेति वीयायेति ॥ ३ ॥**

**इति चतुर्थाध्यायस्य नवमः खण्डः ॥ ९ ॥**

**अन्वय व अर्थ**—'**हि मे श्रुतं एव** ('कारण, मीं असेंच ऐकिलें आहे) **भगवद्दृशेभ्यः आचार्यात् ह एव विदिता विद्या साधिष्ठं प्रापति**' **इति** (कीं आपल्यासारख्या पूज्य गुरुजींकडून प्राप्त झालेली विद्या मात्र श्रेष्ठतम पदवीला पोहोंचते—असें मी ऐकलें आहे—) **तस्मै एतत् एव उवाच ह** (नंतर आचार्यांनीं त्याला देवतांनीं केलेला उपदेशच पुनः सांगितला) **अत्र किंचन वीयाय इति, वीयाय इति ह** (येथें म्हणजे या उपदेशांत कोणतीही गोष्ट सुटली नाहीं, कांहीं एक सुटलें नाहीं, असें आचार्य पुनः पुनः म्हणाले) ॥ ३ ॥

किंच श्रुतं हि यस्मान्मम विद्यत एवास्मिन्नर्थे भगवद्दृशेभ्यो भगवत्समेभ्य ऋषिभ्यः। आचार्याद्धैव विद्या विदिता साधिष्ठं साधुतमत्वं प्रापति प्राप्नोतीत्यतो भगवानेव ब्रूयादित्युक्त आचार्योऽब्रवीत्तत्तस्मै तामेव दैवतैरुक्तां विद्याम्। अत्र ह न किंचन षोडशकलविद्यायाः किंचिदेकदेशमात्रमपि न वीयाय न विगतमित्यर्थः। द्विरभ्यासो विद्यापरिसमाप्त्यर्थः ॥ ३ ॥

इति चतुर्थाध्यायस्य नवमः खण्डः ॥ ९ ॥

**सिद्धान्ती**—सत्यकाम म्हणाला: 'मीं असाही श्रुति-सिद्धांत प्रत्यक्ष ऐकिला आहे, कीं आपल्यासारख्या पूज्य अशा गुरूजींकडून जो ब्रह्मोपदेश होतो, जी विद्या आपल्यासारखे आचार्य शिष्यांना समजून देतात, ती विद्या मात्र श्रेष्ठतम व साधुतम असते व उत्कृष्टप्रकारानें फलप्रद होते. म्हणून आपल्या चरणांजवळ प्रार्थना करितों, कीं आपणच मला विद्येचा उपदेश करावा. आपलाच अनुग्रह व्हावा अशी माझी विनंति आहे.' याप्रमाणें सत्यकाम शरण आला, तेव्हां आचार्यांनीं त्याला ब्रह्मोपदेश केला.

पूर्व०—निराळ्याप्रकारचा ?

सिद्धान्ती—नाहीं, देवतांनीं जें षोडशकलात्मक (सोळा आहेत अवयव ज्याचे अशा) ब्रह्मस्वरूपाचें वर्णन केलें होतें, तेंच त्यांनीं पुनः सांगितलें आणि शेवटीं म्हणाले, कीं देवतांनीं तुला प्रत्येकीं चतुष्कल असणाऱ्या चार ब्रह्मपादांचा जो उपदेश केला, ब्रह्माचे सोळा अवयव सांगून तुला जो उपदेश केला, तो सर्वत: आणि सर्व दिशांनीं परिपूर्ण आहे. त्या त्यांच्या उपदेशांत यत्किंचित्‌ही उणेपणा नाहीं. तथापि प्रत्येक देवतेनें तुला एक एक पादाचा मात्र उपदेश केला. तेव्हां त्या सर्व उपदेशांचा संग्रह करून ब्रह्मस्वरूप एकरस आहे व ह्या ज्ञानाचें फल एकरूप (मोक्ष-रूप) आहे, हें ध्यानांत ठेऊन ब्रह्मचिंतन करीत जा. ब्रह्माच्या एकेक पादाचें मात्र वेगळें वेगळें ध्यान केलेंस तर तुला कार्यब्रह्मस्वरूप (सगुणब्रह्मस्वरूप) कळणार नाहीं; आणि मोक्ष हा जो अंतिम पुरुषार्थ तो ही साध्य होणार नाहीं. वायूनें तुला दिशारूपी ब्रह्माचे अवयव सांगितले; अग्नीनें पृथ्वीप्रमुख लोकांचे स्वरूप सांगितलें; आदित्यानें तेजोरूपाचें वर्णन केलें, आणि प्राणानें अध्यात्म-स्वरूप सांगितलें. हीं स्वरूपें जेथें एकत्र होतात आणि एकरस होतात त्या सर्व-संग्राहक कार्यब्रह्माचें स्वरूप मीं तुला समजून सांगितलें आहे. तेव्हां शुद्धपद्धतीनें ज्ञानविज्ञान करून घे, म्हणजे तुला अंतिमपुरुषार्थाची (मोक्षाची) प्राप्ति होईल. हा आचार्यांचा संग्राहक उपदेश होय. आचार्यांच्या उपदेशाला सार्थत्व येतें, तें असें. असो; ब्रह्मवेत्त्या आचार्यांपासून उपदेश घेतला तरच खरी कृतार्थता प्राप्त होते. येथें 'वीयाय इति' ह्या पदांची द्विरुक्ति आहे; ती सुचविते कीं, येथें सत्यकामाला प्राप्त झालेली जी विद्या तिचें प्रकरण समाप्त झालें ॥ ३ ॥

खंड नववा समाप्त.

## खंड दहावा.

पुनर्ब्रह्मविद्यां प्रकरान्तरेण वक्ष्यामीत्यारभते गतिं च तद्विदोऽग्निविद्यां च। आख्यायिका पूर्ववच्छ्रद्धातपसोर्ब्रह्मविद्यासाधनत्वप्रदर्शनार्था—

सिद्धान्ती—शिष्यराया, अशा च अन्यप्रकारानें ब्रह्मविद्येचें पुनः स्पष्टीकरण करावें, ब्रह्मवेत्त्यांना कोणतें फलप्राप्त होतें तें सांगावें; आणि अग्निविद्येचें स्वरूप प्रकाशित करावें, म्हणून ह्या दहाव्या खंडाला श्रुतीनें आरंभ केला आहे. प्रथमत: आख्यायिकेचा अवतार केला आहे, तो अशासाठीं कीं, श्रद्धा आणि तप हीं उभयतांही ब्रह्मविद्येचीं साधनें आहेत, हें मागच्याप्रमाणेंच येथें ही साधकाला कळवून ठेवावें—

## मंत्र पहिला.

**उपकोसलो ह वै कामलायनः सत्यकामे जाबाले ब्रह्मचर्यमुवास तस्य ह द्वादश वर्षाण्यग्नीन्परिचचार स ह स्मान्यानन्तेवासिनः समावर्तयꣳस्तꣳ ह स्मैव न समावर्तयति ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—कामलायनः उपकोसलः जाबाले सत्यकामे ब्रह्मचर्यं उवास ह वै** ( जबालापुत्र जो सत्यकाम त्यांच्या आश्रमामध्यें कमळाचा पुत्र कामलायन—याचेंच नांव उपकोसल होतें—हा ब्रह्मचर्यव्रत करीत राहिला होता ) **द्वादश वर्षाणि तस्य ह अग्नीन् परिचचार** ( उपकोसलानें सत्यकामाच्या आश्रमांत बारा वर्षेपर्यंत आश्रमस्थ अग्नीची सेवा केली ) **अन्यान् अंतेवासिनः सः समावर्तयन् स्म ह** ( आचार्यांनीं इतर अंतेवासीयांचे—शिष्यांचे—समावर्तन केलें ) **तं एव ह न समावर्तयति स्म** ( पण उपकोसलाचें मात्र त्यानें समावर्तन केलें नाहीं ) ॥ १ ॥

उपकोसलो ह वै नामतः कमलस्यापत्यं कामलायनः सत्यकामे जाबाले ब्रह्मचर्यमुवास तस्य ह ऐतिह्यार्थः । तस्याऽऽचार्यस्य द्वादश वर्षाण्यग्नीन्परिचचाराग्नीनां परिचरणं कृतवान् । स ह स्माऽऽचार्योन्यान्ब्रह्मचारिणः स्वाध्यायं ग्राहयित्वा समावर्तयꣳस्तमेवोपकोसलमेकं न समावर्तयति स्म ह ॥ १ ॥

सिद्धान्ती—कमलाचा मुलगा कामलायन हा उपकोसल नांवाचा होता. हा सत्यकाम जाबालाच्या आश्रमांत ब्रह्मचर्यव्रताचें अनुष्ठान करीत राहिला होता.

शिष्य—‘ ह ’ हें पद इतिहाससूचक आहे.

सिद्धान्ती—असो; यानें आचार्यांच्या घरीं अग्नींची आराधना किंवा सेवा बारावर्षेपर्यंत केली. चमत्कार हा कीं दुसरे कित्येक ब्रह्मचारी स्वाध्यायाचा अभ्यास करीत असत, ता पूर्ण करवून त्यांचें समावर्तन आचार्यांनीं केलें. पण—

शिष्य—समावर्तन हा एक संस्कार आहे. विद्या पूर्ण झाल्यानंतर आचार्य शिष्याला घरीं जाण्याची अनुज्ञा देतात, त्यावेळीं जो विधियुक्त होम करितात, त्याला समावर्तन असें म्हणतात. मग स्वाध्यायज्ञाता ब्रह्मचारी स्नातक होतो, म्हणजे लग्नविधि करण्याचा किंवा इतर आश्रमांचा अधिकार त्याला येतो.

सिद्धान्ती—ठीक. सर्वांचें समावर्तन झालें; पण उपकोसलाचें मात्र आचार्यांनीं समावर्तन केलें नाहीं! त्याला एकट्यालाच घरीं जाण्याची अनुज्ञा म्हणजे परवानगी झाली नाहीं. त्वां म्हटल्याप्रमाणें परवानगी मिळालेल्या म्हणजे विद्याप्राप्ति झालेल्या ब्रह्मचाऱ्यांला स्नातक असें म्हणतात. स्नातकाला मात्र लग्न करण्याचा अधिकार प्राप्त होतो ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**तं जायोवाच तप्तो ब्रह्मचारी कुशलमग्नीन्परिचचारीन्मा त्वाऽग्नयः परिप्रवोचन्प्रब्रूह्यस्मा इति तस्मै हाप्रोच्यैव प्रवासांचक्रे ॥ २ ॥**

अन्वय व अर्थः—**तं जाया उवाच** (त्याला त्याची बायको म्हणाली) “**तप्तः ब्रह्मचारी** (हा उपकोसल ब्रह्मचारी फार तप्त झाला आहे) **अग्नीन् कुशलं परिचचारीत्** (यानें अग्नीची सेवा उत्कृष्टप्रकारानें केली आहे) **त्वा अग्नयः मा परिप्रवोचन्** (अग्नी तुम्हांस दोष देतील, असें करूं नका) **अस्मै प्रब्रूहि** (याला विद्येचें दान करा)” **इति तस्मै** (याप्रमाणें स्त्रीनें जाबालाला प्रेमपूर्ण उपदेश केला) **अप्रोच्य एव प्रवासांचक्रे ह** (परंतु तिला कांहीं एक उत्तर न देतां जाबाल ऋषि प्रवासाला निघून गेले!) ॥ २ ॥

तमाचार्यं जायोवाच तप्तो ब्रह्मचारी कुशलं सम्यगग्नीन्परिचचारीत्परिचरितवान् । भगवांश्चाग्निषु भक्तं न समावर्तयति । अतोऽस्मद्भक्तं न समावर्तयतीति ज्ञात्वा त्वामग्नयो मा परिप्रवोचन्गर्हां तव मा कुर्युः । अतः प्रब्रूह्यस्मै विद्यामिष्टामुपकोसलायेति । तस्मा एवं जाययोक्तोऽपि हाप्रोच्यैवानुक्त्वैव किंचित्प्रवासांचक्रे प्रवसितवान् ॥ २ ॥

सिद्धान्ती—त्या आचार्याला त्याची स्त्री म्हणाली: “भगवन्! हा उपकोसल ब्रह्मचारी आपल्यास इष्ट असणारी अग्निसेवा करून बहुत कष्टी झाला आहे. महाराज, यानें आपली सेवा पुष्कळ केली आहे; तसेंच यानें अग्नीची सेवाही फार चांगली केली आहे. तथापि आपण या अग्निभक्ताला विद्यादान

करून त्याला समावर्तन करूं देण्याला अनुज्ञा देत नाहीं ! भगवन् ! आपल्या भक्ताला समावर्तन आपण करूं देत नाहीं, असें जाणून अग्निदेवता आपल्यावर क्रुद्ध न होवोत, अशी माझी इच्छा आहे.

शिष्य—उपकोसलानें जाबालाची व अग्नीची शास्त्रोक्त सेवा करून आपल्या देहास पुष्कळ दिवस कष्टविलें होतें. तथापि गुरुजी त्याच्यावर अनुग्रह करीनात. हें पाहून जाबालस्त्रियेला वाईट वाटलें आणि अग्नीची सेवा करणाऱ्या त्या कोसलाला विद्यादान देऊन त्याच्याकडून समावर्तन विधि करवीत नाहींत, म्हणून अग्नी संतप्त होतील, आपल्या भर्त्याची निंदा करतील, अशी जाबालाच्या स्त्रियेला भीति वाटली आणि तिनें आपण आतांच सांगितल्याप्रमाणें आपल्या पतीची प्रार्थना केली. असेंच ना ? ठीक.

सिद्धान्ती—आणि शेवटी तिनें आपल्या भर्त्यास विनंति केली कीं, 'भगवन्, उपकोसलास इष्ट असणाऱ्या विद्येचें दान त्याला द्या; म्हणजे अग्नीचा कोप आपल्यावर होणार नाहीं. भगवन् ! उपकोसलावर माझी अनार्य भक्ति आहे असें नव्हे. आपलें, माझ्या परमदैवताचें, अकल्याण होऊं नये, अशी माझी इच्छा आहे; आणि म्हणूनच ही प्रार्थना मी आपल्यास करीत आहें.' इतकें स्त्रियेनें समजाऊन सांगितलें, तरी जाबालानें कांहीं एक प्रत्युत्तर केलें नाहीं. तो कांहीं एक न करितां व न बोलतां प्रवासाला निघून गेला !

शिष्य—असें कां ?

सिद्धान्ती—अरे ! त्या उपकोसलाला देवतांचा प्रसाद मिळावयाचा होता, हें देवताभक्त जाबालाला विदित होतें. पुढें ऐका ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**स ह व्याधिनाऽनशितुं दध्रे तमाचार्यजायोवाच ब्रह्मचारिन्नशान किं नु नाश्नासीति स होवाच बहव इमेऽस्मिन्पुरुषे कामा नानात्यया व्याधिभिः प्रतिपूर्णोऽस्मि नाशिष्यामीति ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थः—सः व्याधिना अनशितुं दध्रे** (उपकोसल मनोव्याधीनें खिन्न झाला होता, म्हणून कांहीं एक खात पीत नाहींसा झाला) **आचार्यजाया तं उवाच** (आचार्यस्त्री त्याला म्हणाली)

**ब्रह्मचारिन्, अशान; किंनु न अश्नासि इति** ( हे ब्रह्मचारिन्, कांहीं तरी थोडें खा; असा तूं खाईनासा कां झाला आहेस?—असें ती म्हणाली—) **सः उवाच ह; अस्मिन् पुरुषे बहवः नानात्ययाः इमे कामाः; व्याधिभिः प्रतिपूर्णः अस्मि; न अशिष्यामि इति** ( उपकोसल म्हणालाः—' मर्यादेचें अतिक्रमण करणारे अनेक काम मला पीडा देत आहेत; त्यांनीं उत्पन्न केलेल्या व्याधींमुळें, मनःखिन्नतेमुळें, माझी तहान-भूक नाहींशी झाली आहे. मातुश्री ! पोट भरलेलें आहे, असें मला वाटतें, म्हणून मी कांहीं एक खात नाहीं ) ॥ २ ॥

स होपकोसलो व्याधिना मानसेन दुःखेनानशितुमनशनं कर्तुं दध्रे धृतवान्मनः । तं तूष्णीमग्न्यागारेऽवस्थितमाचार्यजायोवाच हे ब्रह्मचारिन्नशान भुङ्क्ष्व किं नु कस्मान्नु कारणान्नाश्नासीति । स होवाच बहवोऽनेकेऽस्मिन्पुरुषेऽकृतार्थे प्राकृते कामा इच्छाः कर्तव्यं प्रति नानाऽत्ययोऽतिगमनं येषां व्याधीनां कर्तव्यचिन्तानां ते नानात्यया व्याधयः कर्तव्यताप्राप्तिनिमित्तानि चित्तदुःखानी-त्यर्थः तैः प्रतिपूर्णोऽस्मि । अतो नाशिष्यामीति ॥ २ ॥

सिद्धान्ती—मानसिक व्याधींनीं उपकोसलाला अत्यंत दुःख होत होतें; म्हणून त्यानें निश्चय केला कीं, आपण खाणें—पिणें सर्व टाकून द्यावें.

शिष्य—त्याला इतकें दुःख कसलें झालें होतें?

सिद्धान्ती—विद्या प्राप्त झाली नाहीं, हें दुःखकारण काय लहान आहे होय? असो; आचार्यांनीं आपल्यास विद्या सांगितली नाहीं; याचें त्याला अत्यंत दुःख होत होतें. आचार्यांचा अभिप्राय काय होता, हें त्या बिचाऱ्याला काय ठाऊक? असो; तो दुःखी होता, हें खरें. आचार्य-स्त्रीनें जेव्हां पाहिलें कीं, अग्निगृहा-मध्यें उपकोसल खिन्नतेनें स्तब्ध बसला आहे, तेव्हां ती त्याच्या जवळ गेली आणि म्हणाली, ' बाळा, उपकोसला, हे ब्रह्मचारिन्, तूं कांहीं तरी खा; असें खाणें-पिणें कां टाकून दिलें आहेस? सांग मला.' उपकोसलानें उत्तर दिलें ' माते !, अकृतार्थ म्हणजे—

शिष्य—ज्याची इच्छा पूर्ण झाली नाहीं, तो अकृतार्थ होय. विद्येनें ज्यांचें मन संस्कृत व समाहित झालें नाहीं, ते अकृतार्थ म्हणजे प्राकृत पुरुष होत?

सिद्धान्ती—होय. उपकोसल म्हणाला, प्राकृत पुरुषाच्या इच्छा नाना-त्यय असतात.

शिष्य—नानात्यय म्हणजे ?

सिद्धान्ती—नाना म्हणजे अनेकप्रकारचें, अत्यय म्हणजे अतिगमन. ज्यापासून अनेक व्याधी उत्पन्न होतात, त्या नानाप्रकारच्या कर्तव्यचिंता होत. सारांश, ज्याच्या कर्तव्यचिंता स्वरूप–मर्यादा सोडून विषयांपर्यंत बाहेर गेल्या आहेत, त्या पुरुषाच्या इच्छा नानात्यय होत. उपकोसल म्हणाला, मला जी इष्ट सिद्धि हवी आहे, ती प्राप्त न झाल्यामुळें उत्पन्न होणारीं अनेक मानसिक विषय-संबंधीं दुःखें मला अत्यंत पीडा देत आहेत. म्हणून मला खाणें–पिणें कांहीं एक सुचत नाहीं. मातुःश्री ! मला खाण्यापिण्याची मुळीं इच्छा नाहीं.

शिष्य—अत्यय म्हणजे अतिपूर्ण म्हणजे वाजवीपेक्षा जास्त पूर्णता असणें. नानात्यय म्हणजे विविधप्रकारचें अतिपूर्णत्व. सारांश, आपली इच्छा पूर्ण झाली नाहीं, म्हणजे मनुष्याला अनेकप्रकारच्या चिंता उत्पन्न होतात आणि त्यामुळें तो अत्यंत खिन्न होऊन जातो, अर्थात् त्याला खाण्यापिण्याची मुळींच वासना असत नाहीं ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा.

**अथ हाग्नयः समूदिरे तप्तो ब्रह्मचारी कुशलं नः पर्यचारीद्धन्तास्मै प्रब्रवामेति तस्मै होचुः प्राणो ब्रह्म कं ब्रह्म खं ब्रह्मेति ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थः—अथ ह अग्नयः समूदिरे** (त्यानंतर अग्निगृहांत असलेले अग्नी आला पाहून एकमतानें म्हणजे एकदिलानें आपसांत म्हणाले) **तप्तः ब्रह्मचारी; नः कुशलं पर्यचारीत्** (त्या अग्नींनीं स्वतःशीं विचार केला कीं, यानें स्वतःला झिजवून आमची सेवा उत्कृष्टतऱ्हेची केली आहे. तथापि याची इच्छा पूर्ण न झाल्यामुळें हा संतप्त झाला आहे. आणि म्हणून हा आमची सेवा करीत नाहीं, स्वस्थ बसला आहे) **हंत अस्मै प्रब्रवाम** (अहो, आतां याला आपण विद्येचा उपदेश करूं या) **इति** (असा त्यांनीं स्वतःशीं विचार केला) **तस्मै ह ऊचुः; 'प्राणः ब्रह्म, कं ब्रह्म, खं ब्रह्म' इति** (ते त्याला म्हणाले, 'प्राण ब्रह्म आहे, सुख ब्रह्म आहे आणि आकाश ब्रह्म आहे' ॥ ४ ॥

उक्त्वा तूष्णीभूते ब्रह्मचारिण्यथ हाग्नयः शुश्रूषया वर्जिताः कारुण्याविष्टाः सन्तस्त्रयोऽपि समूदिरे संभूयोक्तवन्तः। हन्तेदानीमस्मै ब्रह्मचारिणेऽस्मद्भक्ताय दुःखिताय तपस्विने श्रद्दधानाय सर्वेऽनुशास्मोऽनुप्रब्रवाम ब्रह्मविद्यामिति। एवं संप्रधार्य तस्मै होचुरुक्तवन्तः प्राणो ब्रह्म कं ब्रह्म खं ब्रह्मेति॥ ४॥

सिद्धान्ती—आचार्यस्त्रियेशीं वर सांगितल्याप्रमाणें बोलून निस्तब्ध झालेल्या ब्रह्मचाऱ्याची दुःखद स्थिति अग्निगृहांतील अग्नींनीं पाहिली. तसेंच आपली सेवा सद्यःकालीं होत नाहीं, ती केवळ स्वरूपतः उत्कृष्ट सेवा करणारा उपकोसल मानसिक व्याधीनें अत्यंत खिन्न झाला आहे; म्हणून होत नाहीं, असें त्यांस समजलें. अर्थात् तिन्ही अग्नींना दया उत्पन्न झाली; आणि ते तिघेही एकत्र होऊन परस्परांशीं बोलूं लागले. अरेरे! गोष्ट वाईट झाली. असो; आतां ह्या आमच्या दुःखी झालेल्या तपस्वी ब्रह्मचाऱ्यावर आपण सर्वजण अनुग्रह करूं या. उपकोसल महाश्रद्धाळु आहे, अधिकारी आहे, आमचा भक्त आहे; म्हणून त्याला ब्रह्मोपदेश करून कृतार्थ करूं या. काय वाईट गोष्ट झाली, कीं आमचा भक्त जो हा ब्रह्मचारी त्याची उपेक्षा करून आचार्य देशांतराला गेले! ते पुनः येऊन याला ब्रह्मविद्या शिकवितील हें खरें; तथापि हा अत्यंत दुखित झाला आहे, म्हणून आपणच त्वरेनें याचें कार्य प्रथम करून टाकूं या.' असा परस्परांशी विचार करून ते सर्व अग्नी त्याला म्हणाले, 'उपकोसल! प्राण ब्रह्म आहे, सुख ब्रह्म आहे, आकाशही ब्रह्म आहे.'

शिष्य—या ब्रह्मविद्येचें साधन जी तपश्चर्या ती ही त्या श्रद्धाळूनें करून ठेवली होती. म्हणून त्याला अग्नींनीं ब्रह्मोपदेश केला, हें ठीकच झालें॥४॥

---

## मंत्र पांचवा.

**स होवाच विजानाम्यहं यत्प्राणो ब्रह्म कं च तु खं च न विजानामीति ते होचुर्यद्वाव कं तदेव खं यदेव खं तदेव कमिति प्राणं च हास्मै तदाकाशं चोचुः॥ ५॥**

**इति चतुर्थाध्यायस्य दशमः खण्डः॥ १०॥**

**अन्वय व अर्थः**—**यत् ' प्राणः ब्रह्म ' अहं विजानामि; कं च तु खं च न विजानामि ' इति सः उवाच** ( ' प्राण ब्रह्म आहे, हें मला ठाऊक आहे; पण कं (म्हणजे सुख) हें ब्रह्म आहे, खं (म्हणजे आकाश) हें ब्रह्म आहे, हें मात्र मला ठाऊक नाहीं. ' असें उपकोसल म्हणाला) **' यत् वाव कं तत् एव खं; यत् एव खं तत् एव कं ' इति ते ह ऊचुः** ( जें कांहीं सुख मात्र आहे तें आकाश आहे आणि जें आकाशमात्र आहे तेंच सुख आहे, असें अग्नींनीं त्याला सांगितलें ) **च ह अस्मै प्राणं तदाकाशं च ऊचुः** ( आणि नंतर त्या ब्रह्मचाऱ्याला 'हृदाकाश—हृदयाकाश—आणि तत्रस्थ प्राण या उभयतांचा समुच्चय करून तीं उभयतां ब्रह्म आहेत,' असेंही अग्नींनीं सांगितलें.—हें श्रुतिवाक्य आहे, अग्निवाक्य नव्हे—) ॥ ५ ॥

स होवाच ब्रह्मचारी विजानाम्यहं यद्भवद्भिरुक्तं प्रसिद्धपदार्थकत्वात्प्राणो ब्रह्मेति । यस्मिन्सति जीवनं यदपगमे च न भवतीति तस्मिन्वायुविशेषे लोके रूढोऽतो युक्तं ब्रह्मत्वं तस्य । तेन प्रसिद्धपदार्थकत्वाद्विजानाम्यहं यत्प्राणो ब्रह्मेति । कं च तु खं च न विजानामीति । ननु कंखंशब्दयोरपि सुखाकाशविषयत्वेन प्रसिद्धपदार्थकत्वमेव, कस्माद्ब्रह्मचारिणोऽज्ञानम् । नूनं सुखस्य कंशब्दवाच्यस्य क्षणप्रध्वंसित्वात्खंशब्दवाच्यस्य चाऽऽकाशस्याचेतनस्य कथं ब्रह्मत्वमिति मन्यते । कथं च भवतां वाक्यमप्रमाणं स्यादिति । अतो न विजानामीत्याह ।

सिद्धान्ती—उपकोसल ब्रह्मचारी म्हणालाः ' प्राण ब्रह्म आहे, हें जें आपण मला सांगितलें, तें पूर्वींच मला ठाऊक होतें. प्राण ब्रह्म आहे ही गोष्ट सर्वप्रसिद्ध आहे. प्राण याचा अर्थ ब्रह्म आहे हें कोणास ठाऊक नाहीं ?' प्राण असेल तर जीव जिवंत राहतो आणि नसेल तर राहात नाहीं; म्हणून प्राणनामक वायुविशेषाला व्यवहारांत सर्व लोक ' ब्रह्म ' असें म्हणतात, हें योग्यच आहे. जीवनकारण ब्रह्म आहे आणि त्याचप्रमाणें प्राणही आहे. तेव्हां प्राण हा शब्द ब्रह्मार्थानें रूढ झाला आहे हें ठीकच आहे; आणि अशी प्रसिद्धि असल्यामुळें मलाही प्राण म्हणजे ब्रह्म हें ठाऊक आहे. परंतु सुख हें ब्रह्म आहे किंवा आकाश हें ब्रह्म आहे, हें मात्र मला ठाऊक नाहीं.

पूर्व०--असें कां असावें बरें ? कं म्हणजे सुख आणि खं म्हणजे आकाश, हे अर्थ तर प्रसिद्ध आहेत. 'ब्रह्म सुखस्वरूप आहे' आणि 'आकाश ब्रह्म आहे' अशीं हीं श्रुतिवाक्यें प्रसिद्ध आहेत, मग ब्रह्मचाऱ्याला हें अज्ञान कां असावें ?

सिद्धान्ती—अज्ञान नसावें, हें तुमचें म्हणणें बरोबर आहे; परंतु 'क' शब्दानें वाच्य असणारें सुख क्षणभंगुर असतें आणि 'ख' शब्द ज्याचा वाचक आहे तें आकाश अचेतन म्हणजे जड असतें. तेव्हां ब्रह्मचारी म्हणतो कीं, 'क्षणभंगुर सुखाला नित्य असणारें ब्रह्म म्हणतां यावयाचें नाहीं. तसेंच जड असणाऱ्या आकाशाला सर्वज्ञ (चैतन्यात्मक) ब्रह्मत्वही प्राप्त व्हावयाचें नाहीं, असें मला वाटतें. पुनः; आपल्यासारख्या देवतांचें 'कं ब्रह्म, खं ब्रह्म' हें वाक्य तरी मीं कसें अप्रमाण मानावें ? दोन्हींकडून पंचाईत आहे; म्हणून मला कांहीं समजत नाहीं, असें मी समजतों.' तात्पर्य, अग्नींनीं उद्गारिलेलें वाक्य विरोधात्मक दिसतें; आणि अग्नी तर अप्रमाण बोलणार नाहींत. तेव्हां वस्तुस्थिति काय आहे हें उपकोसलाला समजेनासें झालें; हें तात्पर्य आहे.

तमेवमुक्तवन्तं ब्रह्मचारिणं ते हाग्नय ऊचुः । यद्वाव यदेव वयं कमवोचाम तदेव खमाकाशमित्येवं खेन विशेष्यमाणं कं विषयेन्द्रियसंयोगजात्सुखान्निवर्तितं स्यान्नीलेनेव विशेष्यमाणमुत्पलं रक्तादिभ्यः । यदेव खमित्याकाशमवोचाम तदेव च कं सुखमिति जानीहि । एवं च सुखेन विशेष्यमाणं खं भौतिकादचेतनात्खान्निवर्तितं स्यान्नीलोत्पलवदेव । सुखमाकाशस्थं नेतरल्लौकिकमाकाशं च सुखाश्रयं नेतरद्भौतिकमित्यर्थः । नन्वाकाशं चेत्सुखेन विशेषयितुमिष्टमस्त्वन्यतरदेव विशेषणं यद्वाव कं तदेव खमित्यतिरिक्तमितरत् । यदेव खं तदेव कमिति पूर्वविशेषणं वा । ननु सुखाकाशयोरुभयोरपि लौकिकसुखाकाशाभ्यां व्यावृत्तिरिष्टेत्यवोचाम ।

सिद्धान्ती--ब्रह्मचाऱ्याचें हें शंकाकुल पण श्रद्धान्वित वचन ऐकून, ते अग्नी त्याला म्हणते झालेः 'बाळा, ज्याला आम्हीं 'कं' असें म्हटलें, तेंच 'खं' म्हणजे आकाश आहे.

शिष्य—म्हणजे काय ?

सिद्धान्ती--कं हेंच खं आहे. या म्हणण्याचा अर्थ असा होतो कीं, आकाश आहे विशेषण ज्या सुखाचें तें कं म्हणजे सुख, ब्रह्म होय. नीलकमल हें पद उच्चारिलें म्हणजे रक्तकमलांपासून 'निळ्या' या विशेषणानें युक्त असलेलें कमल

विभिन्न होतें. त्याप्रमाणें विषयाचा आणि इंद्रियाचा संयोग झाल्यानंतर जें क्षणभंगुर सुख उत्पन्न होतें, त्यापासून आकाशविशिष्टसुखही ( सार्वकालिक असणारें सुख ) निराळें होतें. तात्पर्य, नित्यसुख ब्रह्म आहे हा 'खविशिष्ट क' चा ( आकाशविशिष्ट सुखाचा ) अर्थ आहे. येथें 'आकाश' या विशेषणानें सुखशब्दाची क्षणभंगुर सुखावरील अतिव्याप्ति नाहींशी होते, आणि नित्य सुखाचा मात्र अर्थ प्रतीत होतो.

शिष्य—त्याचप्रमाणें सुखविशिष्ट आकाश ब्रह्म आहे, असें म्हटलें म्हणजे तें सुखविशिष्ट आकाश भौतिक आकाशाहून निराळें असें चैतन्यान्वित आकाश आहे असें प्रतीत होतें. येथेंही नीलोत्पलाचा दृष्टांत लागू पडतो.

सिद्धान्ती—तात्पर्य, आकाशस्थ सुख म्हणजे ब्रह्म, इतर लौकिक सुख ब्रह्म नव्हे, आणि सुखाचा आश्रय असणारें ( सुखान्वित, सुखविशिष्ट ) आकाश आहे, इतर भौतिक आकाश ब्रह्म नव्हे. समजलें ?

पूर्व०—अहो ! सुख हेंच जर आकाशाचें विशेषण होणें इष्ट असेल, तर उभयतांपैकीं कोणतें तरी एक विशेषण असूं द्या. उदाहरणार्थ:—'जें कं आहे तेंच खं आहे' इतकेंच वाक्य असूं द्या. दुसरें 'जें खं आहे तें कं आहे,' हें वाक्य कशाला ? उभयतांपैकीं कोणतें तरी एक वाक्य ठेवा. जें कं तेंच खं हें एक वाक्य आणि जें खं तेंच कं हें दुसरें वाक्य या दोन वाक्यांची अपेक्षा काय आहे ? एक विशेषण आणि दुसरें विशेष्य असा संबंध समजला म्हणजे इष्ट कार्य सिद्ध होतें.

सिद्धान्ती—होत नाहीं. आम्हीं आतांच वर सांगितलें कीं, सुखांतून लौकिक सुख काढून टाकण्यासाठीं आकाश हें सुखाचें विशेषण केलें पाहिजे; आणि आकाशांतून जड आकाशाची व्यावृत्ति करण्यासाठीं सुख या विशेषणानें आकाश अलंकृत किंवा विशेषित झालें पाहिजे. तात्पर्य, दोन्ही वाक्यांचा उपयोग आहे.

सुखेनाऽऽकाशे विशेषितस्यैवाऽऽकाशस्य ध्येयत्वं विहितं न त्वाकाशगुणस्य विशेषणस्य सुखस्य ध्येयत्वं विहितं स्यात् । विशेषणोपादानस्य विशेषनियन्तृत्वेनैवोपक्षयात् । अतः खेन सुखमपि विशेष्यते ध्येयत्वाय । कुतश्चैतन्निश्चीयते । कंशब्दस्यापि ब्रह्मशब्दसंबन्धात्कं ब्रह्मेति । यदि हि सुखगुणविशिष्टस्य खस्य ध्येयत्वं विवक्षितं स्यात्कं खं ब्रह्मेति ब्रूयुरग्नयः प्रथमम् । न चैवमुक्तवन्तः । किं तर्हि कं ब्रह्म खं ब्रह्मेति । अतो ब्रह्मचारिणो मोहापनयनाय कंखंशब्दयोरितरेतरविशेषणविशेष्यत्वनिर्देशो युक्त एवेत्यद्वाव कमित्यादिः ।

पूर्वपक्षी--मला अपेक्षा दिसत नाहीं. सुख हें आकाशाचें विशेषण केलें म्हणजे लौकिक सुखांची व भौतिक आकाशाची व्यावृत्ति अर्थप्राप्तच होते. "सुखविशिष्ट आकाश' हीं पदें उच्चारतांक्षणीं चैतन्यान्वित आकाश आणि नित्यताविशिष्टसुख हें दोन्ही अर्थ प्रतीत होतात.

सिद्धान्ती--तुम्हीं म्हणतां हें खरें आहे; तथापि असा सुखविशिष्ट आकाशाचा अंगीकार केला असतां केवळ सुखविशिष्ट आकाश हेंच काय तें ध्यानविषय होण्यास योग्य आहे, असा श्रुतीचा अभिप्राय आहे, हें उपासकांस वाटूं लागेल; आणि आकाशविशिष्टसुख हा ध्यानविषय श्रुतीला संमत नाहीं, अशी त्यांची समजूत होईल. तात्पर्य सुखविशिष्ट आकाशाचें ध्यान उपासक करतील; पण आकाशविशिष्ट सुखाचें ध्यान कोणींही करणार नाहीं.

पूर्वपक्षी--कां बरें? गुणविशिष्टवस्तूचें ध्यान करीत असतां विशेषणाचाही अंतर्भाव त्या ध्यानांत होतो; सुखविशिष्ट आकाशाचें ध्यान करितांना 'सुख' ही येतेंच. मग दोन वाक्यें अवतारण्याचा हेतु काय?

सिद्धान्ती--हेतु आहे. विशेषणाचें काम केवळ विशेष्याचें नियंत्रण करण्याचें किंवा त्याचा अर्थ स्पष्ट करण्याचें असतें. 'निळें कमळ' अशीं पदें उच्चारलीं म्हणजे तांबड्या, पिंवळ्या कमळांपासून हें कमळ विभिन्न आहे; इतकाच काय तो अर्थ निळें या विशेषणापासून प्रसिद्ध होतो. निळेपणा स्वतंत्रत्वानें प्रतीत होत नाहीं. म्हणून श्रुतीनें सुखविशिष्ट आकाशाचा उल्लेख केला, त्याप्रमाणेंच आकाशविशिष्ट सुखाचा उल्लेख केला आहे. हेतु हा कीं, सुखविशिष्ट आकाशाचें ध्यान करावें हें इष्ट आहे, त्याचप्रमाणें आकाशविशिष्ट सुखाचेंही ध्यान करावें, हें श्रुतीला आदरानें सांगावयाचें आहे. असें सांगितले नाहीं तर सुखाला ध्येयत्व प्राप्त व्हावयाचें नाहीं. तात्पर्य सुख आणि आकाश एकमेकांचीं विशेषणें व्हावीं आणि एकमेकांचीं विशेष्यें व्हावीं, असा श्रुतीचा अभिप्राय आहे. सुख ध्येय व्हावें, व आकाशही ध्येय व्हावें, हें श्रुतीला इष्ट आहे.

पूर्वपक्षी--हें कशावरून ठरतें?

सिद्धान्ती--कं शब्दाचा ब्रह्मशब्दाशीं साक्षात् संबंध श्रुतीनें अवतारिला आहेना? 'कं ब्रह्म' आहे असें तिनें स्पष्ट सांगितलें आहे. जर तिला सुखविशिष्ट आकाश मात्र ध्येय आहे असें सांगावयाचें असतें, तर 'कं खं ब्रह्म' असेंच वाक्य अग्नींनीं प्रथमतः अवतारिलें असतें; पण अग्नी तर असें बोलले नाहींत. कं ब्रह्म आहे व खं ब्रह्म आहे, अशा दोन वाक्यांचा त्यांनीं स्पष्ट उच्चार केला आहे, म्हणून कं आणि खं हे दोन्ही पदार्थ ध्येय असले पाहिजेत, असा अग्नींचा अभिप्राय स्पष्ट आहे. हा अभिप्राय विशद करण्यासाठीं आणि उपको-

सलाला उत्पन्न होणाऱ्या मोहाची निवृत्ति करण्यासाठीं कं आणि खं हे दोन्ही शब्द परस्परांचीं विशेषणें होतील व परस्परांचीं विशेष्यें होतील, असा निर्देश अग्नींनीं केला आहे. अर्थात् त्यांनीं दोन्हीं वाक्यें उच्चारिलीं, तीं सार्थ, साभिप्राय आणि सयुक्तिक आहेत.

तदेतदग्निभिरुक्तं वाक्यार्थमस्मद्बोधाय श्रुतिराह—प्राणं च हास्मै ब्रह्मचारिणे । तस्याऽऽकाशस्तदाकाशः । प्राणस्य संबन्ध्याश्रयत्वेन हार्द आकाश इत्यर्थः । सुखगुणवत्त्वनिर्देशात्तं चाऽऽकाशं सुखगुणविशिष्टं ब्रह्म तत्स्थं च प्राणं ब्रह्मसंपर्कादेव ब्रह्मेत्युभयं प्राणं चाऽऽकाशं च समुच्चित्य ब्रह्मणी ऊचुरग्नयं इति ॥ ५ ॥

इति चतुर्थाध्यायस्य दशमः खण्डः ॥ १० ॥

**सिद्धान्ती**—हा जो अग्नींनीं उपदेश केला, त्याचा बोध सर्व जनांस व्हावा म्हणून श्रुति स्वतः म्हणत आहे कीं, 'प्राणं च अस्मै तदाकाशं च ऊचुः'—

**शिष्य**—म्हणजे स्पष्ट अर्थ काय ? अस्मै म्हणजे ब्रह्मचाऱ्याला, ऊचुः म्हणजे अग्नी बोलले, इतका भाग मला समजला. बाकीचा भाग मला समजून सांगावा.

**सिद्धान्ती**—प्राण हा शब्द तर तुला समजतोच. तदाकाश म्हणजे त्याचें आकाश—

**शिष्य**—त्याचें म्हणजे ?

**सिद्धान्ती**—म्हणजे प्राणाचें. प्राणाचा संबंध ज्या आकाशाशीं आहे, तें आकाश म्हणजे हृदयाकाश होय. सुख आहे गुण ज्याचा तें आकाश, असा निर्देश आहे, म्हणून तें आकाश म्हणजे सुखगुणविशिष्ट ब्रह्म होय. तेथेंच राहणारा हृदयस्थ प्राण याचाही तेथील ब्रह्माशींच संबंध येतो, म्हणून प्राणही ब्रह्म होतो. याप्रमाणें प्राण आणि आकाश यांचा समुच्चय करून दोन्हींही प्रत्येकीं ब्रह्म आहेत, असें अग्नी म्हणाले. हें अग्नींचें वचन श्रुतीनें मुमुक्षु जीवांच्या उपासनेसाठीं सांगितलें आहे. आचार्यांनीं शेवटीं 'इति' या पदाची योजना केली आहे, ती श्रुतीचें सांगणें संपलें, हें दाखविण्यासाठीं आणि कार्य ब्रह्मोपासनेनें समुच्चित झालेल्या कारण-ब्रह्माच्या उपासनेचा उपसंहार होत आहे, हें दाखविण्यासाठीं आहे. हें ध्यानांत ठेवावें बरें ! येथें प्राण व आकाशहीं दोन्हीं कार्य-ब्रह्में अथवा ब्रह्मकार्यें आहेत. या कार्यब्रह्माची उपासना समुच्चित करून कारण-ब्रह्माची उपासना ( ध्यानमार्गाचें कथन ) इति या शब्दानें उपसंहृत केलें आहे ॥ ५ ॥

दहावा खंड समाप्त.

---

## खंड अकरावा.

### मंत्र पहिला.

**अथ हैनं गार्हपत्योऽनुशशास पृथिव्यग्निरन्नमादित्य इति य एष आदित्ये पुरुषो दृश्यते सोऽहमस्मि स एवाहमस्मीति ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—अथ ह एनं गार्हपत्यः अनुशशास** (नंतर गार्हपत्य अग्नीनें त्याला उपदेश केला) **'पृथिवी, अग्निः, अन्नं, आदित्यः' इति** (पृथ्वी, अग्नि, अन्न आणि आदित्य हीं माझीं चार स्वरूपें आहेत) **आदित्ये यः एषः पुरुषः दृश्यते, सः अहं अस्मि, सः एव अहं अस्मि' इति** ('आदित्यबिंबामध्यें जो हा पुरुष दिसत असतो, तो मी आहें, तोच मी आहें.' याप्रमाणें गार्हपत्य अग्नि बोलला)

संभूयाग्नयो ब्रह्मचारिणे ब्रह्मोक्तवन्तः। अथानन्तरं प्रत्येकं स्वस्वविषयां विद्यां वक्तुमारेभिरे। तत्राऽऽदावेनं ब्रह्मचारिणं गार्हपत्योऽग्निरनुशशास। पृथिव्यग्निरन्नमादित्य इति ममैताश्चतस्रस्तनवः। तत्र य आदित्य एष पुरुषो दृश्यते सोऽहमस्मि गार्हपत्योऽग्निर्यश्च गार्हपत्योऽऽग्निः स एवाहमादित्ये पुरुषोऽस्मीति। पुनः परावृत्त्या स एवाहमस्मीति वचनम्। पृथिव्यन्नयोरिव भोज्यत्वलक्षणयोः संबन्धो न गार्हपत्यादित्ययोः। अत्तृत्वपक्तृत्वप्रकाशनधर्मा अविशिष्टा इत्यत एकत्वमेवानयोरत्यन्तम्। पृथिव्यन्नयोस्तु भोज्यत्वेनाऽऽभ्यां संबन्धः ॥ १ ॥

सिद्धान्ती—मागील मंत्रांत तिन्ही अग्नी ब्रह्मचाऱ्याला एकमतानें ब्रह्मोपदेश करिते झाले. आतां, अथ म्हणजे या नंतर प्रत्येक अग्नि आपापल्या विषयाची विद्या उपकोसलास सांगण्याला या मंत्रापासून प्रारंभ करीत आहे. मागें प्रधानविद्या झाली. आतां एथपासून अंगविद्येच्या उपदेशाला आरंभ होत आहे. असो; प्रथम गार्हपत्य अग्नीनें ह्या ब्रह्मचाऱ्याला उपदेश केला, तो असा. पृथ्वी, अग्नि, अन्न आणि आदित्य, असे माझे चार प्रकारचे देह आहेत. त्यांतही आदित्य–

बिंबामध्यें जो पुरुष दृश्यमान होतो तो मी आहें. कुलपरंपरेनें ज्या अग्नीची सेवा अग्नि जिवंत ठेवून प्रत्येक गृहपतीला करावी लागते, तो गार्हपत्य अग्नि होय. हा अग्नि म्हणतो कीं, आदित्यामध्यें जो पुरुष दिसतो तोच मी आहें.

शिष्य—याप्रमाणें अग्नि आणि आदित्य यांचें तादात्म्य आहे, असें सिद्ध होतें.

पूर्वपक्षी—पण दोन दोनदा तेंच वाक्य या मंत्रांत कां दिसत आहे ?

सिद्धान्ती—पृथ्वी आणि अन्न यांचा व आदित्याचा जो संबंध आहे, तो संबंध गार्हपत्य अग्नि आणि आदित्य यांच्यांमध्यें नाहीं. हे अग्न्यादित्य उभयतां एकरूप आहेत, हें स्पष्ट प्रतीत होण्यासाठीं द्विरुक्ति केली आहे. पृथ्वी आणि अन्न हीं उभयतांही भोज्य ( उपभोगास योग्य ) असणारीं आहेत. पृथ्वी आणि अन्न ह्या भोज्य वस्तु आणि आदित्य त्यांचा भोक्ता असा जसा यांचा संबंध आहे, तसा गार्हपत्य आणि आदित्य यांचा संबंध नाहीं. तर त्यांमध्यें तादात्म्यसंबंध आहे. अग्नि हा जसा अत्ता ( खाणारा, उपभोग घेणारा ) पक्ता ( पकविणारा ) आणि प्रकाशक आहे, तसाच आदित्य ही अत्ता, पक्ता व प्रकाशक आहे. अग्नि आणि आदित्य यांचें धर्म समसमान आहेत; म्हणून हे उभयतां एकात्मक, एकरूप किंबहुना तदात्मक होतात. परंतु पृथ्वी आणि अन्न यांचा अग्नि आणि आदित्याशीं भोक्तृभोज्यत्वाचा संबंध आहे. हें सर्व स्पष्ट करण्यासाठीं मंत्रांत द्विरुक्ति झाली आहे ! ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**स य एतमेवं विद्वानुपास्तेऽपहते पापकृत्यां लोकी भवति सर्वमायुरेति ज्योग्जीवति नास्याव-रपुरुषाः क्षीयन्त उप वयं तं भुञ्जामोऽस्मिंश्च लोकेऽमुष्मिंश्च य एतमेवं विद्वानुपास्ते ॥ २ ॥**

**इति चतुर्थाध्यायस्यैकादशः खण्डः ॥ ११ ॥**

**अन्वय व अर्थः—यः एवं विद्वान् एतं उपास्ते, सः पापकृत्यां अपहते, लोकी भवति, सर्व आयुः एति ज्योग् जीवति, अस्य अवरपुरुषाः न क्षीयंते, वयं तं अस्मिन् लोके च अमुष्मिन् लोके**

**च तं भुञ्जामः, यः एवं विद्वान् एतं उपास्ते** (याप्रमाणें जाणणारा जो विद्वान् ह्या अग्नीची उपासना करितो, त्याचीं सर्व पापकृत्यें विनष्ट होतात, तो अग्निलोकवासी होतो, तो सर्वायुषी होतो, त्याचें जीवन उज्ज्वल होतें, त्याचे पुत्रपौत्रादि केव्हांही विनष्ट होत नाहींत; आणि आम्ही अग्नी ह्या लोकीं व परलोकीं त्याचें संरक्षण करितों. जो ज्ञानपूर्वक गार्हपत्याग्नीची उपासना करितो, त्याला हें फल प्राप्त होतें) ॥ २ ॥

स यः कश्चिदेवं यथोक्तं गार्हपत्यमग्निमन्नान्नादत्वेन चतुर्धा प्रविभक्तमुपास्ते सोऽपहते विनाशयति पापकृत्यां पापं कर्म। लोकी लोकवांश्चास्मदीयेन लोकेनाऽऽग्नेयेन तद्वान्भवति यथा वयमिह च लोके सर्वं वर्षशतमायुरेति प्राप्नोति ज्योगुज्ज्वलं जीवति नाप्रख्यात इत्येतत्। न चास्यावराश्च ते पुरुषाश्चास्य विदुषः संततिजा इत्यर्थः। न क्षीयन्ते संतत्युच्छेदो न भवतीत्यर्थः। किं च तं वयमुपभुञ्जामः पालयामोऽस्मिंश्च लोके। य एतमेवं विद्वानुपास्ते यथोक्तं तस्यैतत्फलमित्यर्थः ॥ २ ॥

इति चातुर्थाध्यायस्यैकादशः खण्डः ॥ ११ ॥

**सिद्धान्ती**—मागच्या मंत्रांत गार्हपत्याग्नीचें जें चार प्रकारचें स्वरूप सांगितलें,—

**शिष्य**—गार्हपत्याग्नि हा अन्नरूप आहे (पृथ्वीरूप व अन्नरूप आहे) आणि तोच भोक्ता आहे, (तोच अग्निरूप आहे आणि आदित्यरूपही आहे) तोच उपभोज्य आणि उपभोक्ता आहे, असें?

**सिद्धान्ती**—होय. जें अग्निस्वरूप सांगितलें, त्या अग्नीची जो उपासक सशास्त्र उपासना ज्ञानपूर्वक करितो, त्यानें केलेलीं सर्व पापें विनष्ट होतात. तो आम्हां अग्नींचा जो आग्नेय लोक आहे, तेथें आमच्याप्रमाणेंच राहण्याला अधिकारी होतो. त्याला ह्या लोकीं पूर्ण आयुष्य म्हणजे शंभर वर्षांचें आयुष्य प्राप्त होतें; त्याचें जीवन उज्ज्वल म्हणजे सर्वलोकश्रुत होतें; आणि शेवटीं त्याचे जे पुत्रपौत्रादि वंशज असतात त्यांचा म्हणजे या विद्वान् उपासकांच्या कुलांचा केव्हांही उच्छेद होत नाहीं. गार्हपत्याग्नि पुढें म्हणतो: याचें कारण हें कीं, आम्हीं इहलोकीं व परलोकीं या उपासकाचें पालन पोषण करितों.

तात्पर्य, अग्नीचें स्वरूप जाणून अग्नी-उपासना करणाऱ्या प्रत्येक उपासकाला आम्हीं आतां सांगितलेलें फल प्राप्त होतें.

**शिष्य**—येथें अग्नि म्हणजे गार्हपत्याग्नि असें समजावयाचें आहे ॥ २ ॥

अकरावा खंड संपला.

## खंड बारावा.

### मंत्र पहिला.

**अथ हैनमन्वाहार्यपचनोऽनुशशासाऽऽपो दिशो नक्षत्राणि चन्द्रमा इति य एष चन्द्रमसि पुरुषो दृश्यते सोऽहमस्मि स एवाहमस्मीति ॥ १ ॥**

अन्वय व अर्थः—अथ एनं अन्वाहार्यपचनः अनुशशास ह (त्यानंतर ह्या उपकोसलाला अन्वाहार्यपचन म्हणजे दक्षिणाग्नि अनुशासन करिता झाला) आपः, दिशः, नक्षत्राणि, चंद्रमाः इति; यः एषः पुरुषः चंद्रमसि दृश्यते, सः अहं अस्मि; सः एव अहं अस्मि इति (आप, दिशा, नक्षत्रें आणि चंद्र हीं माझीं चार शरीरें आहेत; आणि चंद्रबिंबामध्यें जो हा पुरुष दिसत आहे, तो हा मी आहें, तोच हा मी आहें,—असें दक्षिणाग्नि म्हणाला) ॥ १ ॥

---

### मंत्र दुसरा.

**स य एतमेवं विद्वानुपास्तेऽपहते पापकृत्यां लोकी भवति सर्वमायुरेति ज्योग्जीवति नास्यावर-पुरुषाः क्षीयन्त उप वयं तं भुञ्जामोऽस्मिꣳश्च लोकेऽमुष्मिꣳश्च य एतमेवं विद्वानुपास्ते ॥ २ ॥**

**इति चतुर्थाध्यायस्य द्वादशः खण्डः ॥ १२ ॥**

अन्वय व अर्थः—यः एवं विद्वान् एतं उपास्ते, पापकृत्यां अपहते, लोकी भवति, सर्वं आयुः एति, ज्योक् जीवति, अस्य अवरपुरुषाः न क्षीयंते, अस्मिन् च अमुष्मिन् च लोके वयं तं उपभुञ्जामः; यः एवं विद्वान् एतं उपास्ते (याप्रकारें दक्षिणाग्नीचें

स्वरूप जाणणाऱ्या उपासकाची सर्व पापकृत्यें विनष्ट होतात; तो दक्षिणाग्नि लोकांचा स्वामी होतो, त्याला पूर्ण आयुष्य प्राप्त होतें, त्याचें जीवन उज्ज्वल असतें, त्याचे पुत्रपौत्रादि कुलपुरुष केव्हांही विनष्ट होत नाहींत, कारण इहपरलोकीं अग्नी त्याचें पालन पोषण करितात. जो याप्रमाणें दक्षिणाग्नीची उपासना ज्ञानपूर्वक करितो, त्याला हीं सर्व फळें प्राप्त होतात ) ॥ २ ॥

अथ हैनमन्वाहार्यपचनोऽनुशशास दक्षिणाग्निरापो दिशो नक्षत्राणि चन्द्रमा इत्येता मम चतस्रस्तनवश्चतुर्धाऽहमन्वाहार्यपचन आत्मानं प्रविभज्यावस्थितः । य एष चन्द्रमसि पुरुषो दृश्यते सोऽहमस्मि सएवाहमस्मीति पूर्ववत् । अन्नसंबन्धाज्ज्योतिष्ट्वसामान्याच्चान्वाहार्यपचनचन्द्रमसोरेकत्वं दाक्षिणा (ण) दिक्संबन्धाच्च । अपां नक्षत्राणां च पूर्ववदन्नत्वेनैव संबन्धः। नक्षत्राणां चंद्रमसो भोग्यत्वप्रसिद्धेः । अपामन्नोत्पादकत्वादन्नत्वं दक्षिणाग्नेः पृथिवीवद्गार्हपत्यस्य । समानमन्यत् ॥ १ ॥ २ ॥

इति चतुर्थाध्यायस्य द्वादशः खण्डः ॥ १२ ॥

सिद्धान्ती—अन्वाहार्यपचन म्हणजे दक्षिणाग्नि त्याला म्हणाला—

शिष्य – अन्वाहार्य म्हणजे जें आपण प्रतिमासिक पितरश्राद्ध करितों तें. हें प्रति आमावास्येला किंवा शुद्ध प्रतिपदेला करितात. ज्या अग्नीच्या साह्यानें हा अन्वाहार्य-श्राद्धविधि अथवा पितृयज्ञ होतो, त्याला अन्वाहार्यपचन असें म्हणावयाचें. हा अग्नि दक्षिणेकडे असतो म्हणून त्याला दक्षिणाग्नि असेंही म्हणतात. ह्या अग्नींतच अभिश्रपणाचें कार्य होत असतें. श्रपण म्हणजे शिजविणें अथवा दुग्धादि पातळ पदार्थ तापविणें.

सिद्धान्ती—ठीक आहे. हा अग्नि उपकोसलाला म्हणाला:–‘आपः’ म्हणजे जलें, दिशा, नक्षत्रें आणि चंद्र हीं चारी माझीं शरीरें आहेत. अथवा मी आपलें शरीर चतुर्धा ( चारप्रकारानें ) विभागलें आहे. आतां चंद्रबिंबामध्यें जो हा पुरुष दिसतो तो मी आहें, इतकेंच नव्हे तर तो मीच आहे.

शिष्य—म्हणजे चंद्र आणि दक्षिणाग्नि हे एकात्मक आहेत. आदित्य आणि गार्हपत्य यांची जशी एकात्मकता तशीच चंद्र आणि दक्षिणाग्नि यांचीही आहे.

प्राप्ति करून देतें. विद्युत्प्रकाशाला आकाश हेंच आश्रयस्थान ( भोगस्थान ) आहे. म्हणून हा भोक्तृभोग्यत्वसंबंध सिद्ध होतो. दुसऱ्या मंत्राचें स्पष्टीकरण मागेंच झालें आहे ॥ १ ॥ २ ॥

तेरावा खंड समाप्त.

---

## खंड चौदावा.

### मंत्र पहिला.

**ते होचुरुपकोसलैषा सोम्य तेऽस्मद्विद्याऽऽत्मविद्या चाऽऽचार्यस्तु ते गतिं वक्तेत्याजगाम हास्याऽऽचार्यस्तमाचार्योऽभ्युवादोपकोसल ३ इति ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—ते ह ऊचुः** ( ते सर्व अग्नी म्हणाले, ) **‘ उपकोसल, सोम्य, एषा ते अस्मद्विद्या आत्मविद्या च** ( ‘ हे सौम्य, उपकोसल, ही आत्मविद्या आणि ही आमची अग्निविद्या होय. ही आम्ही तुला सांगितली. ’ ) **‘ तु आचार्यः ते गतिं वक्ता ’ इति** ( ‘ त्यांची गति तुझे आचार्य तुला सांगतील. ’ असें म्हणून ते स्तब्ध झाले) **अस्य आचार्यः आजगाम ह** (नंतर त्याचे आचार्य आश्रमांत परत आले ) **उपकोसल ३, इति तं आचार्यः अभ्युवाद** ( हे उपकोसला ! अशी आचार्यांनीं आशीर्वादपूर्वक शिष्याला हाक मारिली ) ॥ १ ॥

ते पुनः संभूयोचुर्होपकोसलैषा सोम्य ते तवास्मद्विद्याऽग्निविद्येत्यर्थः । आत्मविद्या पूर्वोक्ता प्राणो ब्रह्म कं ब्रह्म खं ब्रह्मेति च । आचार्यस्तु ते गतिं वक्ता विद्याफलप्राप्तय इत्युक्त्वोपरेमुरग्नयः । आजगाम हास्याऽऽचार्यः कालेन । तं च शिष्यमाचार्योऽभ्युवादोपकोसल ३ इति ॥ १ ॥

**सिद्धान्ती**— त्या सर्व अग्नींनीं उपकोसलाला एकमतानें सांगितलें ‘ हे उपकोसला. हे सौम्य शिष्य ! तुला आम्हीं आमची अग्निविद्या आणि आत्मविद्या ह्या दोन्ही विद्या सांगितल्या आहेत.

**शिष्य**—आत्मविद्या म्हणजे 'प्राणः ब्रह्म, कं ब्रह्म, खं ब्रह्म इति च' अशी पूर्वी अग्नींनीं ऐक्यमत्यानें सांगितलेली ब्रह्मविद्या.

**सिद्धान्ती**—होय. अग्नी म्हणाले, उपकोसला! तुझे आचार्य तुला विद्याफलप्राप्ति करून देणारा मार्ग सांगतील, असे म्हणून ते अग्नी स्तब्ध झाले. नंतर कांहीं दिवसांनीं आचार्य स्वाश्रमीं परत आले. आल्यानंतर आचार्यांनीं शिष्याला उपकोसला! म्हणून आशीर्वादपूर्वक आह्वान केलें.

**शिष्य**—आचार्यांच्या उपदेशाशिवाय कोणतीही विद्या फलवती होत नाहीं, त्यांपासून मात्र प्राप्त झालेली विद्या वीर्यवती होते, असें जाणून अग्नींनीं उपकोसलाला विद्याफलप्राप्तीचा मार्ग सांगितला नाहीं. होय ना?

**सिद्धान्ती**--ठीक आहे. पुढें पाहूं चला ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**भगव इति ह प्रतिशुश्राव ब्रह्मविद इव सोम्य ते मुखं भाति को नु त्वाऽनुशशासेति को नु माऽनुशिष्याद्भो इतीहापेव निहुत इमे नूनमीदृशा अन्यादृशा इतीहाग्नीनभ्यूदे किं नु सोम्य किल तेऽवोचन्निति ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थ**—**'भगवः' इति ह प्रतिशुश्राव** ('आलों भगवन्,' असें उपकोसलानें उत्तर दिलें) **'ब्रह्मविदः इव सोम्य ते मुखं भाति; कः नु त्वा अनुशशास?' इति** ('हे शिष्य, ब्रह्मवेत्त्याच्या मुखाप्रमाणें तुझें मुख तेजस्वी दिसत आहे. तुला कोणीं ब्रह्मोपदेश केला बरें?' असें आचार्यांनीं शिष्याला विचारलें.) **'भोः, मा कः नु अनुशिष्यात्'** ('भगवन्! आपल्याशिवाय मला कोण उपदेश करूं धजणार? असें शिष्यानें उत्तर दिलें) **ह अपनिह्नुते इव** (परंतु स्पष्ट कांहीं बोलला नाहीं. जणूं तो कांहीं लपवूनच ठेवीत होता) **इमे अन्यादृशाः नूनं अमी ईदृशाः इति इह अग्नीन् अभ्यूदे** (पण बोलतांना हे अग्नी पूर्वी निराळ्या

स्वरूपाचे होते, आतां या स्वरूपाचें आहेत; असें अग्नीकडे बोट दाखवून म्हणाला ) सोम्य, 'किं नु ते किल अवोचन्' इति ( हे शिष्य, तुला ह्या अग्नींनीं काय सांगितलें बरें? असें गुरुजींनीं विचारिलें ) ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**इदमिति ह प्रतिजज्ञे लोकान्वाव किल सोम्य तेऽवोचन्नहं तु ते तद्वक्ष्यामि यथा पुष्करपलाश आपो न श्लिष्यन्त एवमेवंविदि पापं कर्म न श्लिष्यत इति ब्रवीतु मे भगवानिति तस्मै होवाच ॥३॥**

**इति चतुर्थाध्यायस्य चतुर्दशः खण्डः ॥ १४ ॥**

**अन्वय व अर्थः**—'इदं' इति ह प्रतिजज्ञे (अग्नींनीं मला हें असें असें सांगितलें, असें उपकोसल संग्रहवाक्यानें बोलला ) **सोम्य, ते लोकान् वाव किल अवोचन्; अहं तु ते तत् वक्ष्यामि, यथा पुष्करपलाशे आपः न श्लिष्यंते; एवंविदि एवं पापं कर्म न श्लिष्यते** ' इति ( हे शिष्य, तुला अग्नींनीं केवळ अग्निप्रमुख लोकांचा एकांगीं मात्र उपदेश केला. परंतु मी तुला इष्ट असणारी समस्त विद्या स्पष्ट सांगेन. पुष्कर-पलाशावर—पद्मपत्रावर—ज्याप्रमाणें पाण्याचा लेप होत नाहीं, त्याप्रमाणें ब्रह्मज्ञान्याच्या ठिकाणीं पापाचा किंवा पापकर्माचा लेप होत नाहीं. ' असें आचार्यांनीं उपकोसलाला आश्वासनपूर्वक सांगितलें) '**मे भगवान् ब्रवीतु**' इति **तस्मै उवाच ह** ( उपकोसल आचार्याला म्हणाला, ' मला भगवंतांनीं हें सर्व सांगावें; आणि माझ्यावर अनुग्रह करावा')॥ ३ ॥

भगव इति ह प्रतिशुश्राव । ब्रह्मविद इव सोम्य ते मुखं प्रसन्नं भाति को नु त्वाऽनुशशासेत्युक्तः प्रत्याह । को नु माऽनुशिष्याद्-नुशासनं कुर्याद्धो भगवंस्त्वयि प्रोषित इतीहापेव निह्नुतेऽपनि-ह्नुत इवेति व्यवहितेन संबन्धो न चापनिह्नुते न च यथावदग्नि-

भिरुक्तं ब्रवीतीत्यभिप्रायः । कथमिमेऽग्नयो मया परिचरिता उक्तवन्तो नूनं यतस्त्वां दृष्ट्वा वेपमाना इवेदृशा दृश्यन्ते पूर्वमन्यादृशाः सन्त इतीहाग्नीनभ्यूदेऽभ्युक्तवान्काकाऽग्नीन्दर्शयन् । किं नु सोम्य किल ते तुभ्यमवोचन्नग्नय इति पृष्ट इत्येवमिदमुक्तवन्त इत्येवं ह प्रतिजज्ञे प्रतिज्ञातवान्प्रतीकमात्रं किंचिन्न सर्वं यथोक्तमग्निभिरुक्तमवोचत् । यत आहाऽऽचार्यो लोकान्वाव पृथिव्यादीन्हे सोम्य किल तेऽवोचन्न ब्रह्म साकल्येन । अहं तु ते तुभ्यं तद्ब्रह्म यदिच्छसि त्वं श्रोतुं वक्ष्यामि, शृणु तस्य मयोच्यमानस्य ब्रह्मणो ज्ञानमाहात्म्यं । यथा पुष्करपलाशे पद्मपत्र आपो न श्लिष्यन्त एवं यथा वक्ष्यामि ब्रह्मैवंविदि पापं कर्म न श्लिष्यते न संबध्यत इत्येवमुक्तवत्याचार्य आहोपकोसलो ब्रवीतु मे भगवानिति तस्मैहोवाचाऽऽचार्यः ॥ २ ॥ ३ ॥

इति चतुर्थाध्यायस्य चतुर्दशः खण्डः ॥ १४ ॥

**सिद्धान्ती**—आचार्यांनीं उपकोसलाला हांक मारल्यावर 'ओ ! आलों भगवान्'! असें शिष्यानें उत्तर दिलें. नंतर, विद्यावंत शिष्याचें प्रसन्नमुख पाहून आचार्य त्याला म्हणाले, ' बाळा ! तुझ्या प्रसन्नमुखावर ब्रह्मविद्येचें तेज दिसत आहे, तेव्हां तुला त्या विद्येचा उपदेश झाला वाटतें ? हा उपदेश कोणी केला, हें मला सांग ' शिष्य म्हणाला; ' आपण प्रवासाला गेलां असतां हे भगवान् ! मला कोण उपदेश करणार ? असें शिष्य म्हणाला, परंतु ह्या त्याच्या बोलण्यावरून तो सर्व वर्तमान सांगण्याला नाखूष आहे, कांहीं छपविल्यासारखें करीत आहे, लपविण्याची त्याची इच्छा नाहीं, तरी अग्नींनीं त्याला उपदेश केला होता, तें सकल वर्तमान कांहीं स्पष्ट सांगत नाहीं, असें दिसलें. असो; हा शिष्याचा झालेला घोंटाळा आचार्यांस दिसला. सारांश, तो उपकोसल चाचपडत बोलत आहे, हें आचार्यांस समजलें.

**शिष्य**—हें कशावरून ?

**सिद्धान्ती**—पुढें उपकोसलच काय म्हणतो आहे, ते पहा: ' मी ज्यांची सेवा केली, तेच अग्नी आतां आपल्यास पाहून भयकंपित झाले आहेतसें दिसतें; आपण येण्यापूर्वी हे अग्नी निराळ्याच स्वरूपाचे दिसत होते ! असें अग्नीच्या संबंधानें बोलण्याच्या मिषानें अग्नीकडे त्यानें भीतभीत बोट दाखविलें. तेव्हां शिष्याची भीति घालविण्यासाठीं आचार्य आश्वासनपूर्वक त्याला म्हणाले. ' बाळा ! भिऊं नकोस. तुला अग्नींनीं कोणता उपदेश केला आहे, ब्रह्मोपदेश कसा केला आहे, तें मला सांग ! हें ऐकून भीतिशून्य झालेल्या शिष्यानें ' अग्नी मला असें असें म्हणाले ' असें संकालित मात्र सांगितलें.

पूर्वपक्षी—सगळी हकीकत नाहीं सांगितली ?

सिद्धान्ती—नाहीं. प्रतीकमात्र, मुद्याच्या गोष्टी मात्र, त्यानें थोडक्यांत सांगितल्या. अग्नींनीं त्याला जो कांहीं उपदेश केला होता, तो त्यानें सर्वच्या सर्व सांगितला नाहीं, म्हणून आचार्यांना त्या शिष्याला पूर्ण ब्रह्मोपदेश करण्याची आवश्यकता वाटली. अहो! आचार्यांच्या उपदेशांशिवाय विद्येला पूर्णत्व येतच नाहीं. असो; ते म्हणाले, 'बाळा! अग्नींनीं तुला आग्नेय, दक्षिण, पूर्व, इत्यादि भुवनांचा मात्र तुला उपदेश केला, ब्रह्माचा' सांगोपांग उपदेश केला नाहीं, असें दिसतें.

पूर्वपक्षी—'क हें ब्रह्म आहे' इत्यादि उपदेश तर अग्नींनीं केला होताच ?

सिद्धान्ती—तें खरें; पण तो उपदेश सांगोपांग झाला नव्हता. ब्रह्माचें माहात्म्य व त्याचें साफल्य तेथें प्रगट झालें नव्हतें. म्हणून आचार्य म्हणाले: ज्या स्वरूपाचें यथास्थित वर्णन समग्र ऐकावें, अशी तुझी इच्छा आहे, ते ब्रह्मस्वरूप तुला समग्रच्या समग्र सांगतों ऐक: मी सांगणार आहें, त्या ब्रह्माचें ज्ञान-फल (ज्ञानमहती) अत्यंत मोठी आहे. कमलपत्रावर जलबिंदु पडले असतां ते कमलपत्राला लिप्त करितात काय? नाहीं. जलें कमलपत्राला लिप्त करीत नाहींत. त्याप्रमाणें मी सांगणार आहें, त्या ब्रह्माचे मी सांगेन तसें संपूर्ण ज्ञान झालें असतां ब्रह्मवेत्त्याला पापमूलक कर्माचा यत्किंचित्‌ही स्पर्श प्रत्यक्ष किंवा परोक्ष होत नाहीं.' हें आचार्यांचें पवित्र भाषण ऐकून उपकोसलाला आनंद झाला; आणि तो म्हणाला:—'भगवन्! ब्रह्मज्ञानाचा उपदेश करून आपण मला कृतार्थ करावें. आपण सांगाल तो व तसा उपदेश ऐकण्यास मी सिद्ध आहें ॥ २ ॥ ३ ॥

चौदावा खंड समाप्त.

---

## खंड पंधरावा.

---

### मंत्र पहिला.

**य एषोऽक्षिणि पुरुषो दृश्यत एष आत्मेति होवाचैतदमृतमभयमेतद्ब्रह्मेति तद्यद्यप्यस्मिन्सर्पि-र्वोदकं वा सिञ्चति वर्त्मनी एव गच्छति ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—'अक्षिणि यः एषः पुरुषः दृश्यते, एषः आत्मा' इति ह उवाच, 'एतत् अमृतं, अभयं, एतत् ब्रह्म' इति** ('नेत्रांमध्यें जो हा पुरुष दिसतो, तोच हा आत्मा होय' असें आचार्य म्हणाले. तसेंच, 'हा आत्मा म्हणजे अमृत आणि अभय असणारें हें ब्रह्म आहे, असेंही त्यांनीं सांगितलें) **यद्यपि अस्मिन् सर्पिः वा उदकं वा सिंचति, तत् वर्त्मनी एव गच्छति** (यद्यपि या नेत्रपुरुषावर सर्पीचें —घृताचें—किंवा जलाचें सिंचन केलें, तथापि तें सिंचन स्वमार्गानें मात्र जातें.—नेत्रपुरुषाशी त्याचा संबंध होत नाहीं) ॥ १ ॥

य एषोऽक्षिणि पुरुषो दृश्यते निवृत्तचक्षुर्भिर्ब्रह्मचर्यादिसाधनसंपन्नैः शान्तैर्विवेकिभिर्दृष्टेर्द्रष्टा। "चक्षुषश्चक्षुः" इत्यादिश्रुत्यन्तरात्। नन्वग्निभिरुक्तं वितथं यत आचार्यस्तु ते गतिं वक्तेति गतिमात्रस्य वक्तेत्यवोचन्भविष्यद्विषयापरिज्ञानं चाग्नीनाम्। नैष दोषः। सुखाकाशस्यैवाक्षिणि दृश्यत इति द्रष्टुरनुवादात्। एष आत्मा प्राणिनामिति होवाचैवमुक्तवानेतद्यद्वाऽऽत्मतत्त्वमवोचाम। एतदमृतममरणधर्म्यविनाश्यत एवाभयं यस्य हि विनाशाशङ्का तस्य भयोपपत्तिस्तदभावादभयमत एवैतद्ब्रह्म बृहदनन्तमिति। किंचास्य ब्रह्मणोऽक्षिपुरुषस्य माहात्म्यं तत्तत्र पुरुषस्य स्थानेऽक्षिणि यद्यप्यस्मिन्सर्पिर्वोदकं वा सिञ्चति वर्त्मनी एव गच्छति पक्ष्मावेव गच्छति न चक्षुषा संबध्यते पद्मपत्रेणेवोदकम्। स्थानस्याप्येतन्माहात्म्यं किं पुनः स्थानिनोऽक्षिपुरुषस्य निरञ्जनत्वं वक्तव्यमित्यभिप्रायः॥ १ ॥

**सिद्धान्ती**—शरण आलेल्या ब्रह्मचाऱ्याला ब्रह्मविद्या सांगतांना आचार्य म्हणाले: नेत्रांमध्यें जो हा पुरुष दिसतो—

**शिष्य**—कोणाला ?

**सिद्धान्ती**—ज्यांनीं आपले नेत्र विषयांपासून सर्वथा निवृत्त केले आहेत, सारांश, ज्यांनीं आपलीं इंद्रियें विषयविन्मुख करून ब्रह्मचर्यादि साधनें सर्वथा आपलींशीं केलीं आहेत, जे शांत झाले आहेत, जे विवेकपूर्णविज्ञानी असतात, त्यांना मात्र हा नेत्रस्थ पुरुष म्हणजे दृष्टीचा द्रष्टा नेत्राचे ठिकाणीं दिसत असतो.

'नेत्राचा नेत्र ' इत्यादि श्रुती ह्या पुरुषाचें असेंच वर्णन करितात. नेत्रस्थान हें एक उपलक्षणच आहे. आत्मा सर्वव्यापी आहे, नेत्रांतच असतो असें नव्हे. असो; ज्यांना हा नेत्रस्थ पुरुष दिसतो--

**शिष्य**—म्हणजे सामान्य पुरुषांना हा पुरुष दिसत नाहीं ? ठीक. नेत्रांमध्यें आमच्या सारख्यांना छायात्मा मात्र दिसत असतो. डोळ्यामध्यें बाहुली दिसते, तो हा पुरुष नव्हे.

**पूर्व०**—म्हणजे असें झालें कीं, अग्नीचें बोलणें खोटें ठरलें. ते उपकोसलाला सांगते झाले होते कीं, ' आचार्य तुला विद्येचा मार्ग मात्र सांगतील. ' पण येथें तसें तर कांहीं दिसत नाहीं. आचार्य ब्रह्मगति न सांगतां ब्रह्मरूप सांगत आहेत. असो; यावरून अग्नींचें बोलणें खरें ठरत नाहीं. शिवाय, आचार्य जो विषय शिष्याला भविष्यकालीं सांगणार होते, त्याचेंही अग्नींस संपूर्ण ज्ञान नव्हतें, असें होतें. तात्पर्य, अग्नींचें बोलणें ( १ ) खरें ठरलें नाहीं; आणि ( २ ) ते ब्रह्मविद्येसंबंधानें अज्ञानी होते असें दिसतें. एवंच, अग्नी लबाड आणि अज्ञानी होते असें झालें.

**सिद्धान्ती**—हा कांहीं दोष नव्हे. तुम्ही जर दहाव्या खंडांत सांगितलेल्या विद्येचें पूर्ण समालोचन कराल, तर तुम्हांसही कळून येईल कीं, त्यांनीं ज्या सुख-विशिष्ट आकाशाची ( ब्रह्माची ) उपासना करावयास सांगितली होती, त्या कारण-ब्रह्माचेंच द्रष्टृत्व—स्वरूप नेत्रांमध्यें विवेकी योग्यांना दृश्य होतें, असा अभ्युपदेशाचा अनुवाद आचार्यांनीं केला आहे; आणि तेंच हें सांगणें गतिव्याख्यान (पुरुषार्थदायी ज्ञान ) होय. तात्पर्य, दोन्ही दोष त्यांच्या पदरीं पडत नाहींत. असो; जो नेत्रस्थ पुरुष अधिकारी विद्वानांस दिसतो, तोच हा सर्व जीवांचा आत्मा आहे. हा छायात्मा नव्हे, हें तुम्हांस समजलेंच आहे. आम्हीं पूर्वीं जें सांगितलें, तें हेंच आत्मतत्त्व होय. हें तत्त्व अमृत आहे; म्हणजे या तत्त्वाचा विनाश केव्हांही होत नाहीं. हें अविनाशी आहे, म्हणूनच तें अभय आहे. त्याच्या विनाशाची शंका केव्हांही यावयाची नाहीं. आपला विनाश होईल अशी ज्याला शंका असते, त्याला भयोत्पत्ति होते; हें नीट आहे. आत्म्याला मरण—शंका नाहीं; म्हणून हेंच ब्रह्म होय. ब्रह्म म्हणजे ज्याचा विस्तार अत्यंत तें; तात्पर्य जें अनंत आहे तें ब्रह्मस्वरूप असतें. तेंच ब्रह्म होय.

**शिष्य**—एतावता विषयविन्मुख विवेकी विद्वानांला नेत्रांमध्यें दिसणारा पुरुष हाच आत्मा आहे; आणि तोच अमृत व अभय आहे, म्हणून तोच हें ब्रह्म आहे, असें ठरलें.

**सिद्धान्ती**—या ब्रह्माचें किंवा नेत्रस्थ पुरुषाचें माहात्म्य काय सांगावें ? पहा कीं, त्या पुरुषाचे स्थानामध्यें म्हणजे नेत्रांमध्यें आपण घृताचें किंवा उदकाचें सिंचन केलें, तरी त्या घृतसिंचनाचा किंवा उदकसिंचनाचा संबंध नेत्रांशीं

मुळींच होत नाहीं; तर नेत्राचे जे पक्ष्म (पापण्या) त्यांच्याच मार्गानें घृत किंवा उदक जातें. तात्पर्य, नेत्रांशीं त्याचा बिलकुल संबंध होत नाहीं.

**शिष्य**—कमलपत्रांवर पाण्याचा थेंब जसा टिकत नाहीं किंवा पाण्यानें कमलपत्र लिप्त होत नाहीं, त्याप्रमाणें नेत्रही जलादिकांनीं लिप्त होत नाहींत.

**पूर्वपक्षी**—कशाला हें ? नेत्रमाहात्म्य सांगणार कीं काय ?

**सिद्धान्ती**—होय. अहो ! नुसत्या नेत्राचें जर हें माहात्म्य तर नेत्रस्थ जो पुरुष त्याचें माहात्म्य काय सांगावें ? अर्थात् तो निरंजन असतो, निर्लेप आणि निर्दुष्ट असतो; असेंच ह्या पुरुषासंबंधानें आपल्यास म्हटलें पाहिजे ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**एतꣳ संयद्वाम इत्याचक्षत एतꣳ हि सर्वाणि वामान्यभिसंयन्ति सर्वाण्येनं वामान्यभिसंयन्ति य एवं वेद ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः**—'**संयद्वाम**' **इति एतं आचक्षते** (याला 'संयद्वाम' असें म्हणतात) **हि** (कारण) **सर्वाणि वामानि अभिसंयंति** (सर्व शोभिवंत वस्तू याच्याकडे आकर्षित होऊन जातात) **यः एवं वेद, एनं सर्वाणि वामानि अभिसंयंति** (ज्याला हें ज्ञान होतें, त्याला सर्व शुभवस्तूंची प्राप्ति होते) ॥ २ ॥

एतं यथोक्तं पुरुषं संयद्वाम इत्याचक्षते । कस्मात् । यस्मादेतं सर्वाणि वामानि वननीयानि संभजनीयानि शोभनान्यभिसंयन्त्यभिसंगच्छन्तीत्यतः संयद्वामः तथैवंविदमेनं सर्वाणि वामान्यभिसयन्ति य एवं वेद ॥ २ ॥

**सिद्धान्ती**—ह्या वर सांगितलेल्या ज्या नेत्रस्थ पुरुषाचे गुण सांगितले, त्याच पुरुषाला 'संयद्वाम' असें म्हणतात. कारण सर्व सुंदर म्हणजे वर्णनीय, इष्ट, पवित्र आणि सुशोभित वस्तू याच्याकडे आकर्षित होतात, याचा आश्रय घेतात, म्हणून याला संयद्वाम (संयत्=आकर्षून जाणाऱ्या वाम म्हणजे शोभनीय वस्तू) असें यथार्थ नांव मिळतें. ह्या पुरुषाचें हें स्वरूप ज्याला समजतें आणि जो याची एवंगुणान्वित उपासना करितो, त्याला सर्व पवित्र व इष्ट वस्तूंची प्राप्ति होते ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**एष उ एव वामनीरेष हि सर्वाणि वामानि नयति सर्वाणि वामानि नयति; य एवं वेद ॥ ३ ॥**

अन्वय व अर्थः—**एषः उ एव वामनीः; हि एषः सर्वाणि वामानि नयति; यः एवं वेद, सर्वाणि नामानि नयति** (या पुरुषालाच 'वामनी' हें नांव आहे. कारण सर्व वाम म्हणजे सुंदर वस्तूंचें नायकत्व याच्याकडे आहे. ज्या ज्ञानी उपासकाला हा गुण समजतो, त्याला सर्व पुण्य वस्तूंचा लाभ होतो ) ॥ ३ ॥

एष उ एव वामनीर्यस्मादेष हि सर्वाणि वामानि पुण्यकर्मफलानि पुण्यानुरूपं प्राणिभ्यो नयति प्रापयति वहति चाऽऽत्मधर्मत्वेन । विदुषःफलं—**सर्वाणि वामानि नयति; य एवं वेद** ॥ ३ ॥

सिद्धान्ती—याचेंच 'वामनी' हें आणखी एक नांव आहे. कारण सर्व वाम म्हणजे पुण्यकर्मफलें पुण्याचरण करणाऱ्या प्राण्यांस मिळवून देणारा हा नेत्रस्थ पुरुष आहे. याचा स्वधर्मच हा आहे कीं, वामवस्तूंचें नायकत्व याला असावें. असो; वामाधिपतीच्या ज्ञानी उपासकाला सर्व पुण्यकर्मांचीं फलें या वामनीच्याच साह्यानें प्राप्त होतात.

शिष्य—वाम म्हणजे सुंदर वस्तूंस नी म्हणजे नेणारा. 'सुंदरवस्तूंचा अधिपति' असा वामनी शब्दाचा अर्थ आहे. असेंच ना ?

सिद्धान्ती—होय ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा.

**एष उ एव भामनीरेष हि सर्वेषु लोकेषु भाति सर्वेषु भाति य एवं वेद ॥ ४ ॥**

अन्वय व अर्थः—**एषः उ एव भामनीः, हि सर्वेषु लोकेषु एषः भाति; यः एवं वेद, सर्वेषु लोकेषु भाति** (सर्व भुवनांमध्यें त्याच नेत्रस्थ पुरुषाचा प्रकाश असतो; म्हणून यालाच 'भामनी' असें म्हणतात. ज्या ज्ञानी उपासकाला हें ज्ञान असतें, तोही स्वप्रकाशानें सर्व लोक प्रकाशित करितो ) ॥ ४ ॥

एष उ एव भामनीरेष हि यस्मात्सर्वेषु हि लोकेष्वादित्यचन्द्राग्न्यादिरूपैर्भाति दीप्यते । " तस्य भासा सर्वमिदं विभाति " इति श्रुतेरतो भामानि नयतीति भामनीः । य एवं वेदासावपि सर्वेषु लोकेषु भाति ॥ ४ ॥

सिद्धान्ती—ज्या अर्थी आदित्य, चंद्र, अग्नि इत्यादिरूपांनीं हा नेत्रस्थपुरुष सर्व भुवनांमध्यें देदिप्यमान असतो, त्या अर्थी त्यालाच 'भामनी' हें नांव उपपन्न होतें. 'त्याच्या तेजानें हें सर्व प्रकाशित होते' अशी श्रुति प्रमाण आहे.

शिष्य—भामाला म्हणजे प्रकाशाला. भा=प्रकाश, नेणारा तो भामनी ?

सिद्धान्ती—ठीक आहे. त्या ज्ञानी उपासकाला हें भामनी स्वरूप कळतें, व तो स्वतेजानें सर्व लोकांत देदिप्यमान होतो. असो; याप्रमाणें हा नेत्रस्थ पुरुष स्वरूपतः प्रत्यगात्मा आणि त्याचप्रमाणें अमृत आणि अभय असणारा परमात्मा आहे, ब्रह्म आहे; आणि हाच पुरुष सर्व इष्टवस्तूंचा, पुण्यवस्तूंचा आणि तेजस्वीवस्तूंचा नायक व संग्रह करणारा आहे. म्हणून त्यालाच अनुक्रमें 'संयद्वाम,' 'वामनी' आणि 'भामनी' अशीं नांवें आहेत. हेंच ब्रह्म होय. हें स्वरूप समजून घेऊन यथार्थ उपासना करणें विहित होय. याच ब्रह्मभक्तीनें ब्रह्म मिळतें. असो; हा ब्रह्मविद्येसंबंधानें व भक्तीसंबंधानें उपकोसलाला जाबालाचार्यांनीं उपदेश केला ॥ ४ ॥

---

## मंत्र पांचवा.

**अथ यदु चैवास्मिञ्छव्यं कुर्वन्ति यदि च नार्चिषमेवाभिसंभवन्त्यर्चिषोऽहरह्न आपूर्यमाणपक्षमापूर्यमाणपक्षाद्यान्षडुदङ्ङेति मासाꣳस्तान्मासेभ्यः संवत्सरꣳ संवत्सरादादित्यमादित्याच्चन्द्रमसं चन्द्रमसो विद्युतं तत्पुरुषोऽमानवः स एनान्ब्रह्म गमयत्येष देवपथो ब्रह्मपथ एतेन प्रतिपद्यमाना इमं मानवमावर्तं नाऽऽवर्तन्ते नाऽऽवर्तन्ते ॥ ५ ॥**

**इति चतुर्थाध्यायस्य पञ्चदशः खण्डः ॥ १५ ॥**

अन्वय व अर्थः—अथ यत् उ च अस्मिन् एव शव्यं कुर्वंति यदि च न (आतां यद्यपि हा ज्ञानी उपासक मृत झाल्यावर त्याची

उत्तरक्रिया कोणी करो किंवा न करो ) **अर्चिषं एव अभिसंभवति** (तथापि हे उपासक तेजस्वरूपाकडेच जातात) **अर्चिषः अहः, अह्न आपूर्यमाणपक्षं आपूर्यमाणपक्षात् यान् षट् उदङ् मासान् एति तान्, मासेभ्यः संवत्सरं, संवत्सरात् आदित्यं, आदित्यात् चंद्रमसं, चंद्रमसः विद्युतं** (तेजस्वरूपापासून दिवसाप्रत, दिवसापासून शुक्लपक्षाप्रत, शुक्लपक्षापासून ज्या सहा महिन्यांत सूर्य उत्तरेकडे असतो त्या महिन्याप्रत, त्या महिन्यापासून संवत्सराप्रत, संवत्सरापासून आदित्याप्रत, आदित्यापासून चंद्राप्रत आणि चंद्रापासून विद्युत्–लोकाप्रत हे उपासक जातात ) **तत्** ( तेथें असतांना ) **सः अमानवः पुरुषः एनान् ब्रह्म गमयति** ( तो अमानव–दिव्य–पुरुष या उपासकांस ब्रह्माप्रत नेतो ) **एषः देवपथः, ब्रह्मपथः** ( हा देवमार्ग आहे, हा ब्रह्ममार्ग आहे ) **एतेन प्रतिपद्यमानाः इमं आवर्तं मानवं न आवर्तन्ते न आवर्तन्ते** ( त्या मार्गानें जाणारे लोक या दृश्य आणि आवर्तन करविणाऱ्या मानवी मार्गाला कधींही परत येत नाहींत ) ॥ ५ ॥

अथेदानीं यथोक्तब्रह्मविदो गतिरुच्यते । यद्यदु चैवास्मिन्नेवंविदि शव्यं शवकर्म मृते कुर्वन्ति यदि च न कुर्वन्ति ऋत्विजः सर्वथाऽप्येवंवित्तेन शवकर्मणाऽकृतेनापि प्रतिबद्धो न, ब्रह्म प्राप्नोति, न च कृतेन शवकर्मणाऽस्य कश्चनाभ्यधिको लोकः । " न कर्मणा वर्धते नो कनीयान् " इति श्रुत्यन्तरात् शवकर्मण्यनादरं दर्शयन्विद्यां स्तौति न पुनः शवकर्मैवंविदो न कर्तव्यमिति । अक्रियमाणे हि शवकर्मणि कर्मणां फलारम्भे प्रतिबन्धः कश्चिदनुमीयतेन्यत्र । यत इह विद्याफलारम्यकाले शवकर्म स्याद्वा न वेति विद्यावतोऽप्रतिबन्धेन फलारम्भं दर्शयति । ये सुखाकाशमक्षिस्थं संयद्वामो वामनीर्भामनीरित्येवंगुणमुपासते प्राणसहितामग्निविद्यां च तेषामन्यत्कर्म भवतु मा वा भूत्सर्वथाऽपि तेऽर्चिषमेवाभिसंभवन्त्यर्चिरभिमानिनीं देवतामभिसंभवन्ति प्रतिपद्यन्त इत्यर्थः ।

सिद्धान्ती—आतां ज्याला ब्रह्माचें यथोक्त ज्ञान झालें आहे, तो कोणत्या मार्गानें जातो, त्याचें (त्या अग्नि-उल्लेखित गतीचें) वर्णन श्रुति करीत आहे. ऐका: या ज्ञानी उपासकाच्या संबंधानें कोणींही शव्य केलें नाहीं—

शिष्य—शव्य म्हणजे शवकर्म? देहपतन झाल्यावर जी उत्तरक्रिया करितात, त्याला शव्य असें म्हणतात?

सिद्धान्ती—होय. हें शव्यकर्म कोणी ऋत्विज करो किंवा न करो, ज्ञानी उपासक तें शवकर्म केलें नाहीं म्हणून प्रतिबद्ध होत्साता ब्रह्मस्वरूप पावत नाहीं, असें नाहीं; किंवा त्याची उत्तरक्रिया कोणी केली म्हणजे त्याला कांहीं अधिक लाभ होतो, अधिकपुण्यप्रद लोक मिळतो असेंही नाहीं. 'कर्मानें आत्मा श्रेष्ठ-तर होत नाहीं किंवा कनिष्ठतरही होत नाहीं.' अशी दुसरी श्रुति प्रमाण आहे.

पूर्वपक्षी—यावरून उत्तरक्रियेसंबंधानें जाबालाचार्य आपला अनादर मात्र व्यक्त करितात आणि उत्तरक्रिया करूं नये असेंही सुचवितात!

सिद्धान्ती—येथें केवळ ब्रह्मविद्येची स्तुति करण्याकरितां मात्र शवकर्माचा अवतार करून अनादर दाखविला आहे. ब्रह्मवेत्त्याचें शवकर्म करूं नये, असा निषेध येथें केला नाहीं. आतां, ज्याला ब्रह्मविद्या प्राप्त झाली नाहीं किंवा ज्यानें या प्रकरणांत सांगितलेली उपासना केली नाहीं, त्याचें जर शवकर्म झालें नाहीं, तर ह्या परेत जीवानें ह्या लोकीं जीं काय सत्कर्में केलीं असतील, तीं फलोन्मुख होण्याला कांहीं तरी प्रतिबंध उत्पन्न होईल, असेंच अनुमान करणें ठीक आहे. हा प्रतिबंध निवारण्यासाठीं शव्यकर्म करावयाचें असतें; पण ब्रह्मवेत्त्याच्या व ब्रह्मोपासकाच्या संबंधानें प्रतिबंध होणें शक्य नाहीं. असें आहे म्हणून ब्रह्मोपासनेच्या फलाला आरंभ होण्याचे वेळीं शवकर्म होवो किंवा न होवो, ब्रह्मोपासकानें केलेल्या उपासनेचें फल उन्मुख होण्यास कोणताही प्रत्यवाय प्राप्त होत नाहीं, हें श्रुतीला सांगावयाचें आहे. सारांश, जे लोक ब्रह्माची उपासना करितात म्हणजे सुखविशिष्ट, नेत्रस्थ, आणि संयद्वाम, वामनी, भामनी, एतद्गुणात्मक ब्रह्माची उपासना करितात, तसेच प्राणासहित अग्निविद्येची उपासना करितात, त्यांच्या संबंधानें शव्यादि कर्में होवोत, वा न होवोत, ते ज्ञानी उपासक अर्चिर्देवतेची म्हणजे तेजाच्या अभिमानी देवतेची प्राप्ति करून घेतात, हें श्रुतीला स्पष्टरीतीनें सांगावयाचें आहे.

**आर्चिषोऽर्चिर्देवताया अहरहरभिमानिनीं देवतामह्न आपूर्यमाणपक्षं शुक्लपक्षदेवतामापूर्यमाणपक्षाद्यान्षण्मासानुदङ्ङुत्तरां दिशमेति सविता तान्मासानुत्तरायणदेवतां, तेभ्यो मासेभ्यः संवत्सरं संवत्सरदेवतां, ततः संवत्सरादादित्यमादित्याच्चन्द्रमसं चन्द्र-**

मसो विद्युतं तत्तत्रस्थांस्तान्पुरुषः कश्चिद्ब्रह्मलोकादेत्यामानवो मानव्यां सृष्टौ भवो मानवो न मानवोऽमानवः स पुरुष एनान्ब्रह्म सत्यलोकस्थं गमयति गन्तृगन्तव्यगमयितृत्वव्यपदेशेभ्यः। सन्मात्रब्रह्मप्राप्तौ तदनुपपत्तेः। ब्रह्मैव सन्ब्रह्माप्येतीति हि तत्र वक्तुं न्याय्यम्। सर्वभेदनिरासेन सन्मात्रप्रतिपत्तिं वक्ष्यति। न चादृष्टो मार्गोऽगमनायोपतिष्ठते। "स एनमविदितो न भुनक्ति" इति श्रुत्यन्तरात्। एष देवपथो देवैरर्चिरादिभिर्गमयितृत्वेनाधिकृतैरुपलक्षितः पन्था देवपथ उच्यते। ब्रह्म गन्तव्यं तेन चोपलक्षित इति ब्रह्मपथः। एतेन प्रतिपद्यमाना गच्छन्तो ब्रह्मेमं मानवं मनुसंबन्धिनं मनोः सृष्टिलक्षणमावर्तं नाऽऽवर्तन्त आवर्तन्तेऽस्मिञ्जननमरणप्रबन्धचक्रारूढा घटीयन्त्रवत्पुनः पुनरित्यावर्तस्तं न प्रतिपद्यन्ते। नाऽऽवर्तन्त इति द्विरुक्तिः सफलाया विद्यायाः परिसमाप्तिप्रदर्शनार्था ॥ ५ ॥

इति चतुर्थाध्यायस्य पञ्चदशः खण्डः ॥ १५ ॥

**सिद्धान्ती**—अर्चिर्देवतेची प्राप्ति करून देऊन अहरहाची ( दिवसाची ) अभिमानी देवता, तेथून शुक्लपक्षाची देवता, त्यानंतर ज्या सहा महिन्यांत सूर्य उत्तरेकडे असतो त्या उत्तरायणमासांची देवता, नंतर संवत्सर-देवता, पुढें आदित्य, त्यानंतर चंद्र, नंतर विद्युत् अशा क्रमानें या सर्व देवता आपल्या ब्रह्मोपासकाला प्राप्त होतात. म्हणजे त्या त्या देवतांच्या लोकांत तो क्रमानें जाऊन तेथें तेथें त्या देवतांचें स्वरूप त्याला प्राप्त होतें. पुढें विद्युद्देवतेच्या लोकांत राहणाऱ्या या ब्रह्मोपासकांना कोणी एक ब्रह्मलोकांतील अमानवा पुरुष सत्यलोकांत राहणाऱ्या ब्रह्माकडे घेऊन जातो.

**शिष्य**—अमानवी म्हणजे ?

**सिद्धान्ती**—मानवी सृष्टींत ( मर्त्यलोकांत ) उत्पन्न न झालेला तो अमानवी होय. किंवा मनूचा वंशज नव्हे तो अमानवी होय. हा अमानवी पुरुष ब्रह्मलोकांत राहतो. असो; सत्यलोकांत राहणाऱ्या ब्रह्माकडे हा अमानवी पुरुष ब्रह्मोपासकाला घेऊन जातो.

**पूर्व०**—हें तुमचें ब्रह्म सत्यलोकांतच राहतें काय ? ज्या ब्रह्माविषयीं तुम्हीं नेहमीं बोलत असतां, तें तर सर्वव्यापी आहे !

**सिद्धान्ती**—येथें मुख्य ब्रह्माचा उल्लेखच श्रुतीला इष्ट नाहीं.

**शिष्य**—कां बरें ?

सिद्धान्ती--कारण, येथें श्रुतीनें जाणारा, जाण्याचें ठिकाण, जाणाऱ्यास वाट दाखविणारा, इत्यादि शब्दांच्या योजना केल्या आहेत, त्यावरून ब्रह्म-शब्दाच्या मुख्यार्थानें ब्रह्मशब्दाची योजना येथें श्रुतीनें केलेली नाहीं. केवळ सत्ता हेंच ज्या ब्रह्माचें स्वरूप आहे, त्याच्या प्राप्तीला जाणें, येणें, इत्यादि संबंध उत्पन्नच होत नाहींत. 'ब्रह्म असून ब्रह्मप्राप्ति करून घेतो' अशी श्रुति प्रमाण आहे. येथें हें सत्तात्मक ब्रह्म जर श्रुतीला इष्ट असतें तर 'ब्रह्म असून ब्रह्मत्व पावतो' असें श्रुतीनें न्यायपूर्वक म्हटलें असतें (असें म्हणणें योग्य व सशास्त्र झालें असतें). पण तसें येथें श्रुतीनें म्हटलें नाहीं. जाणें, जाण्याचें ठिकाण असणें, जाण्याचें कार्य दुसऱ्या कोणाच्या साह्यानें होणें, इत्यादि शब्द येथें आहेत. त्यांवरून कार्यब्रह्माचा मात्र (सगुणब्रह्माचा मात्र) उल्लेख येथें श्रुतीला करावयाचा आहे, हें स्पष्ट आहे. सत्ता हेंच ज्याचें स्वरूप आहे, त्या परब्रह्माच्या प्राप्तीसंबंधानें जें काय सांगावयाचें आहे, तें श्रुति या उपनिषदाच्या सहाव्या अध्यायांत सांगणारच आहे. तेथें आपल्यास कळेल कीं, ज्यांनीं सर्व भेदांचा निरास केला आहे, त्यांना मात्र परब्रह्माची प्राप्ति ज्ञानविज्ञान होतांक्षणीं होते, त्यांस कोठें जावें यावें लागत नाहीं.

पूर्व०---या तुमच्या म्हणण्याचें तात्पर्य जीव सत्तास्वरूप आहे, तो स्वरूपतः ब्रह्म आहे, असें सांगण्याचें आहे. हें जर खरें असेल, प्रत्येक जिव ब्रह्मस्वरूप असेल, तर मग स्वरूपतः ब्रह्म असणाऱ्या उपासकाला तरी गति (जाणें येणें) कां असावी ?

सिद्धान्ती--तुमच्या लक्षांत अद्यापि श्रुतीचा अभिप्राय येत नाहीं, हें आमचें दुर्भाग्य होय. अहो ! एकत्व हेंच ज्याचें लक्षण आहे, तो मार्ग जर समजलाच नाहीं, तर अगमन (जाणें-येणें नसणें) हें उपतिष्ठावयाचें नाहीं. एकत्वच जर समजलें नाहीं तर जाणें येणें कसें थांबेल ? ब्रह्म माझ्यापासून निराळें आहे, असें ध्यान करणाऱ्या ब्रह्मोपासकाचें गमनागमन कसें स्तब्ध होणार ? 'मीं ब्रह्म नाहीं' असें अज्ञानानें ज्याला वाटतें, त्याचें जाणें येणें संपतच नाहीं. मी देहादि आहें; व मला विषयादि हवे, असें वाटून जर आपण आचारविचार करूं लागलों, तर आपल्या अज्ञानरूपी ज्ञानानुरूप आपल्यास फल मिळणार म्हणजे देहादि व विषयादि क्षणभंगुर वस्तू मिळणार. तेव्हां क्षणभंगुर व चंचल फलें जाणें-येणें थांबविणार कसें ? असो; मीं ब्रह्म नाहीं, ही भावना अज्ञानजन्य आहे. त्याचप्रमाणें 'मी ब्रह्मप्राप्तीसाठीं ब्रह्माकडे जाईन' अशी इच्छा असणें हीहि भ्रांतिच आहे. ही भ्रांति आहे तोंपर्यंत जाण्या येण्याची भ्रांति असावयाचीच. याद्दष्टीनें येथें भिन्नद्दष्टि उपासकाला सगुणब्रह्मप्राप्तीचें फल सांगितलें आहे.

**शिष्य**—अथवा आचार्यांच्या भाष्याचा असाही अर्थ होऊं शकेल कीं, जावत्कालपर्यंत एकत्वाचें ज्ञान झालें नाहीं, तावत्कालपर्यंत अगमनाला म्हणजे मोक्षाला प्राप्त करून घेण्याचा अधिकारही मिळत नाहीं. ' ज्याला परमात्म्याचा साक्षात्कार झाला नाहीं, त्या अनधिकारी पुरुषाला मुक्तिफलही प्राप्त होत नाहीं. ' भगवन् ! अशी श्रुति आहेच कीं ?

**सिद्धान्ती**—शाबास ! तात्पर्य, उपासकाला **क्रममार्ग** सांगितला आहे, तो योग्यच आहे. याला **देवपथ** असें म्हणतात. कारण या मार्गामध्यें अर्चिरादि देव ( अर्चिर्देवता, अहर्देवता, शुक्लपक्षदेवता, इत्यादि देव ) उपासकाला मार्ग दाखविण्याचे अधिकारी असतात. ब्रह्म हें जाण्याचें ठिकाण आहे; म्हणून या मार्गाला **ब्रह्मपथ** असेंही म्हणतात. या मार्गानें ब्रह्माकडे जाणारे उपासक केव्हांही मनूच्या सृष्टीमध्यें ( मानवी अथवा मर्त्य लोकांत ) परत येत नाहींत.

**पूर्वपक्षी**—केव्हां सुद्धां ?

**सिद्धान्ती**—या कल्पाच्या अखेरपर्यंत ते येथें परत येत नाहींत. सारांश, भिन्नभाव आहे तोंपर्यंत जाणें येणें ( जन्ममरण ) थांबावयाचें नाहीं. असो; या कल्पांत मात्र हे उपासक पुनः जन्म पावत नाहींत.

**शिष्य**—अर्थात् या कल्पांतील जन्ममरणरूपी दुःखात्मक चक्रावर आरूढ होऊन ( विहिरींतून पाणी काढण्यासाठीं मोठ्या चाकावर घटांची माळ लावून पाणी काढण्याचें चक्ररूपी यंत्र त्यावर बसून ) घटाप्रमाणें वरखालीं जाण्या येण्याची जी क्रिया होते, त्याला **आवर्त** असें म्हणतात. त्या आवर्तांत हे उपासक सांपडत नाहींत, असें श्रुतीला सांगावयाचें आहे. या मंत्रात सांगितलेली ' गति ' हीच अर्थास इष्ट आहे.

**सिद्धान्ती**—बरोबर. असो; श्रुतीनें ' आवर्तते ' या पदाची द्विरुक्ति केली आहे, ती सफल झालेल्या उपासनाविद्येचें, कारणब्रह्म—उपासनेचें प्रकरण संपलें, हें सांगण्यासाठीं आहे ॥ ५ ॥

पंधरावा खंड समाप्त.

---

## खंड सोळावा.

**रहस्यप्रकरणे प्रसङ्गादारण्यकत्वसामान्याच्च यज्ञे क्षत उत्पन्ने व्याहृतयः प्रायश्चित्तार्था विधातव्यास्तदभिज्ञस्य चर्त्विजो ब्रह्मणो मौनमित्यत इदमारभ्यते—**

**सिद्धान्ती**—आतांपर्यंत रहस्यप्रकरण म्हणजे उपासनाप्रकरण सांगितलें; आणि तें सांगतांना उपासकांच्या फलप्राप्तीचा मार्गही सांगितला आहे. येथें या खंडास रहस्याच्या उपदेशाचा हाच प्रसंग लक्षांत ठेऊन यज्ञसमाप्तीसाठीं पुढील प्रायश्चित्त-नामक प्रकरणाला प्रारंभ केला आहे. तसेंच उपासना चालविणारा अग्नियज्ञ आणि त्या यज्ञांत केंव्हां केंव्हां अवश्य असणारीं प्रायश्चित्तें हीं उभयतां हीं आरण्यकांतीलच प्रकरणें आहेत; म्हणून दोन्ही खंडांचा ( पंधराव्या व सोळाव्या खंडांचा ) अवश्य संबंध आहे. तात्पर्य, अग्नियज्ञांमध्यें किंवा आत्मयज्ञामध्यें जर कांहीं व्यंग उत्पन्न झालें, तर यज्ञसांगता करण्यासाठीं 'व्याहृती' नामक प्रायश्चित्त सांगावयाचें, हा या खंडाचा हेतु आहे; आणि ज्ञानी 'ब्रह्मा' नामक ऋत्विजाला मौनव्रतही सांगावयाचें आहे, व एतदर्थ या प्रकरणाला आरंभ केला आहे. ऐका—

---

## मंत्र पहिला.

**एष ह वै यज्ञो योऽयं पवत एष ह यन्निद१ँ सर्वं पुनाति यदेष यन्निद१ँ सर्वं पुनाति तस्मादेष एव यज्ञस्तस्य मनश्च वाक्च वर्तनी ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—यः अयं पवते, एषः ह वै यज्ञः** ( जो हा शुद्धिकारक वायु नित्य वाहतो, तोही ह्या यज्ञस्वरूपाचा आहे ) **ह एषः यन् इदं सर्वं पुनाति** ( हा नित्य चलनात्मक आहे; म्हणून ह्या सर्वांस हा पवित्र करितो ) **यत् एषः यन् इदं सर्वं पुनाति, तस्मात् एषः एव यज्ञः** ( ज्या अर्थी हा यन् म्हणजे चलनात्मक वायु सर्वांस पवित्र करितो, त्या अर्थीं हाच यज्ञ आहे, असें होतें ) **तस्य वर्तनी मनः च वाक् च** ( या यज्ञाची वृद्धि करणारे मार्ग म्हणजे वाणी आणि मन होत ) तात्पर्य, हा पवित्र करणारा यज्ञ ( सर्वशोधक जो वायु ) तत्स्वरूपी आहे; आणि त्याचे वाणी व मन हे शुद्धि करणारे मार्ग आहेत ) ॥ १ ॥

एष ह वा एष वायुर्योऽयं पवतेऽयं यज्ञः। ह वा इति प्रसिद्धार्थावद्योतकौ निपातौ। वायुप्रतिष्ठो हि यज्ञः प्रसिद्धः श्रुतिषु।

"स्वाहा वातेधाः।" "अयं वै यज्ञो योऽयं पवते" इत्यादिश्रुतिभ्यः। वात एव हि चलनात्मकत्वात्क्रियासमवायी। "वात एव यज्ञस्याऽऽरम्भको वातः प्रतिष्ठा" इति च श्रवणात्। एष ह यन्गच्छंश्चलन्निदं सर्वं जगत्पुनाति पावयति शोधयति। न ह्यचलतः शुद्धिरस्ति। दोषनिरसनं चलतो हि दृष्टं न स्थिरस्य। यद्यस्माच्च यन्नेष इदं सर्वं पुनाति तस्मादेष एव यज्ञो यत्पुनातीति। तस्यास्यैवं विशिष्टस्य यज्ञस्य वाक्च मन्त्रोच्चारणे व्यापृता। मनश्च यथाभूतार्थज्ञाने व्यापृतम्। ते एते वाङ्मनसे वर्तनी मार्गौ याभ्यां यज्ञस्तायमानः प्रवर्तते ते वर्तनी। "प्राणापानपरिचलनवत्या हि वाचश्चित्तस्य चोत्तरोत्तरक्रमो यद्यज्ञः" इति हि श्रुत्यन्तरम्। अतो वाङ्मनसाभ्यां यज्ञो वर्तत इति वाङ्मनसे वर्तनी उच्येते यज्ञस्य ॥ १ ॥

सिद्धान्ती—जो हा पवित्र वायु नित्य वाहत असतो, तो हा यज्ञ आहे.

शिष्य—मंत्रांत 'ह' आणि 'वै' दोन निपात आहेत, तें प्रसिद्ध वस्तूचें प्रतिपादन चाललें आहे असें सुचवितात ?

सिद्धान्ती—ठीक आहे. हा यज्ञ वायूचा आश्रय करणारा आहे, वायूनें प्रतिष्ठापित होतो, वाय्वात्मक आहे, हें श्रुतीमध्यें प्रसिद्धच आहे. हा यज्ञ वायुप्रतिष्ठ आहे, असें 'यज्ञांतील स्वाहाकार उच्चारून ते वायूमध्यें निक्षिप्त करितात,' 'जो हा वाहतो व शुद्ध करितो, तो यज्ञ आहे.' 'हा यज्ञ वायुस्वरूपी आहे' इत्यादि श्रुतींवरून सिद्ध होतें. तात्पर्य हें आहे कीं, कर्माच्या समवायानें सिद्ध होणारा यज्ञ म्हणजे क्रियात्मक वायुच होय. कारण, वात ( वायु ) हाच सर्वचलनात्मक क्रियाचें समवायी कारण आहे. वायुव्यतिरिक्त कोणतीही क्रिया होत नाहीं. 'वायु हाच यज्ञाचें आरंभ–कारण आहे; वायु हाच यज्ञाची प्रतिष्ठा ( आश्रयस्थान ) आहे' अशी ही श्रुति प्रमाण आहे. एतावता वायुजन्य व वायुप्रतिष्ठित यज्ञ म्हणजे प्रत्यक्ष वायु होय. यज्ञाचा आत्मा वायु आहे. हा वायु यन् म्हणजे नित्य गत्यात्मक असतो. आपल्या चलनानें हा सर्व जगाला पावन करितो, शुद्ध करितो. तुम्हांस ठाऊकच आहे कीं, जेथें चलन नाहीं तेथें पवित्रता नसते.

शिष्य—खरें आहे. सांचलेलें पाणी अशुद्धच असतें. घरांत वायूच्या आगमनाला अवसर दिला नाहीं, तर तें घर दूषित होतें. कांहीं क्रियाच केली नाहीं, तर वस्तु अशुद्ध होते.

सिद्धान्ती—तसेंच आपलें जें कर्तव्य आहे ते आपण केलें नाहीं तर आपणही अपवित्र होतों. विहितकर्म करणारा पुरुष शुद्ध असतो. स्थिर असणारा कार्यशून्य पुरुष दुष्ट होतो. तात्पर्य ज्याला शुद्धि हवी असते, त्यानें आपलें कर्तव्य नित्य केलें पाहिजे. क्रिया करविणें हें वायूचें कार्य आहे. यज्ञ हाही यन् म्हणजे क्रियात्मक आहे व शोधक म्हणजे शुद्ध करणारा आहे. म्हणून वायूप्रमाणेंच यज्ञाला पावक, शोधक ( शुद्ध करणारा ) अशीं नांवें प्राप्त झालीं आहेत. आतां ज्या अर्थीं चलनात्मक वायु सर्व वस्तूंस पवित्र करितो, त्या अर्थीं सर्वांस पावन करणारा वायु हाही पवित्र करणारा यज्ञच आहे. कारण वायुही यज्ञाप्रमाणें कर्तव्य करावयास लावून पवित्र करणारा आहे. अशा ह्या पावकत्व-गुणविशिष्ट वायुरूपी यज्ञाचे ( म्हणजे यज्ञांत ) अवश्य असणारे मंत्र उच्चारण्यामध्यें वाणी प्रवृत्त होत असते; आणि याच वायुरूपी यज्ञाचें यथार्थ स्वरूप ज्ञात करून घेण्यामध्यें मन व्यापृत होतें. म्हणून वाणी आणि मन हे दोन यज्ञमार्ग आहेत आणि त्यांच्या योगें यज्ञविस्तार होत असतो.

शिष्य—मन आणि वाणी यज्ञविस्तारक आहेत, म्हणून त्यांस यज्ञमार्गत्व प्राप्त झालें ?

सिद्धान्ती—होय. 'प्राणापानाच्या द्वारें अथवा श्वासोच्छ्वासाच्या द्वारानें परिचलन करणारी ( स्वव्यापार करणारी ) जी वाणी तिच्या आणि प्राणापान-साह्यानेंच ध्यान करणाऱ्या चित्ताच्या उत्तरोत्तर क्रमानें जो सिद्ध होतो, तो यज्ञ होय.' असें ऐतरेयांत म्हटलें आहे.

शिष्य—म्हणजे प्रथम यज्ञकर्त्याचें चित्त यज्ञस्वरूप समजून घेतें आणि नंतर वाणी त्या स्वरूपाचा उच्चार करणारा मंत्र म्हणून यज्ञ करिते, किंवा मंत्रोच्चार होऊन यज्ञस्वरूपाचें ध्यान सिद्ध झालेला याज्ञिक यज्ञ करितो, असा पूर्वापर भाव यज्ञामध्यें स्पष्ट दिसतो. वाणी आणि मन यांच्या साह्यानें यज्ञसिद्धि होते. अतएव वाङ्मनद्वयाला ( वाणी आणि मन यांच्या दुकलीला ) 'यज्ञमार्ग' असें नांव प्राप्त झालें आहे.

सिद्धान्ती—तात्पर्य, मन आणि वाणी हे दोन यज्ञविस्तार करणारे मार्ग होत ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**तयोरन्यतरां मनसा सꣳस्करोति ब्रह्मा वाचा होताऽध्वर्युरुद्गाताऽन्यतराꣳ स यत्रोपाकृते प्रातरनुवाके पुरा परिधानीयाया ब्रह्मा व्यववदति ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः—ब्रह्मा मनसा तयोः अन्यतरां संस्करोति** ( याज्ञिकां पैकीं ' ब्रह्मा ' नांवाचा ऋत्विज् ह्या दोन मार्गांतील एकाला मनानें संस्कृत करितो ) **वाचा होता, अध्वर्युः, उद्गाता अन्यन्तरां** ( वाणीनें होता, अध्वर्यु आणि उद्गाता हे तिघेजण दुसऱ्या मार्गाला संस्कृत करितात ) **यत्र उपाकृते प्रातरनुवाके परिधानीयाया पुरा सः ब्रह्मा व्यववदति** ( ज्यावेळीं प्रातःकालीन अनुवाकाला प्रारंभ होतो, तेंव्हां परिधानीय ऋचेच्या पूर्वीं जर ब्रह्यानें बोलण्यास आरंभ केला) ॥२॥

---

## मंत्र तिसरा.

**अन्यतरामेव वर्तनीꣳ सꣳस्करोति हीयतेऽन्य-तरा स यथैकपाद्व्रजन्रथो वैकेन चक्रेण वर्तमानो रिष्यत्येवमस्य यज्ञो रिष्यति यज्ञꣳ रिष्यन्तं यज-मानोऽनुरिष्यति स इष्ट्वा पापीयान्भवति ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थः—अन्यतरां एव वर्तनीं संस्करोति; अन्यतरा हीयते** (तर दुसऱ्या मार्गाला मात्र तो ब्रह्मा संस्कृत करितो आणि पहिला चित्तरूपी मार्ग हीन होतो, त्यामध्यें व्यंग पडतें ) **यथा एकपात् व्रजन्, वा एकेन चक्रेण वर्तमानः रथः रिष्यति** ( ज्या प्रमाणें एकाच पायानें चालणारा पुरुष किंवा एकाच चक्रावर चालणारा रथ अधःपतित होतो ) **एवं अस्य सः यज्ञः रिष्यति** ( त्याचप्रमाणें यजमानाचा यज्ञ विनष्ट होतो ) **यज्ञं रिष्यंतं अनु यजमानः रिष्यति** ( यज्ञविनाश झाल्यावर यजमानाचाही नाश होतो ) **इष्ट्वा सः पापीयान् भवति** ( यज्ञ करूनही तो यजमान पापाचा अधिकारी होतो ) तात्पर्य, यज्ञांतील ब्रह्मानामक ऋत्विजानें आपलें मौनव्रत सोडून मंत्रच म्हणण्यास आरंभ केला, तर चित्तशुद्धीचा संस्कार मनाला होत नाहीं; आणि त्यामुळें यज्ञा-मध्यें व्यंग प्राप्त होऊन यज्ञाचा आणि यजमानाचा नाश होतो. यज्ञ करूनही यजमान पापाचा अधिकारी होतो ! ॥ ३ ॥

तयोर्वर्तन्योरन्यतरां वर्तनीं मनसा विवेकज्ञानवता संस्करोति ब्रह्मर्त्विग्वाचा वर्तन्या होताऽध्वर्युरुद्गातेत्येते त्रयोऽप्यृत्विजोऽन्यतरां वाग्लक्षणां वर्तनीं वाचैव संस्कुर्वन्ति । तत्रैवं सति वाङ्मनसे संस्कार्ये यज्ञे। अथ स ब्रह्मा यत्र यस्मिन्काल उपाकृते प्रारब्धे प्रातरनुवाके शस्त्रे पुरा पूर्वं परिधानीयाया ऋचो ब्रह्मैतस्मिन्नन्तरे काले व्यववदति मौनं परित्यजति यदि तदाऽन्यतरामेव वाग्वर्तनीं संस्करोति। ब्रह्मणाऽसंस्क्रियमाणा मनोवर्तनी हीयते विनश्यति च्छिद्रीभवत्यन्यतरा। स यज्ञो वाग्वर्तन्यैवान्यतरया वर्तितुमशक्नुवन्रिष्यति। कथमिवेत्याह। स यथैकपात्पुरुषो व्रजन्गच्छन्नध्वानं रिष्यति, रथो वैकेन चक्रेण वर्तमानो गच्छन्रिष्यत्येवमस्य यजमानस्य कुब्रह्मणा यज्ञो रिष्यति विनश्यति । यज्ञं रिष्यन्तं यजमानोऽनुरिष्यति। यज्ञप्राणो हि यजमानः। अतो युक्तो यज्ञरेषे रेषस्तस्य। स तं यज्ञमिष्ट्वा तादृशं पापीयान्पापतरो भवति ॥२॥३॥

सिद्धान्ती—यज्ञामध्यें ब्रह्मा नांवाचा जो यज्ञवेत्ता ऋत्विज् असतो, त्याच्याकडे सर्व यज्ञकर्म यथासांग होत आहे कीं नाहीं, हें काळजीपूर्वक बघण्याचें काम असतें. हा ब्रह्मा आपल्या विवेकशुद्धचित्तानें ( विवेकशुद्ध ज्ञान आहे ज्या चित्ताचें त्या चित्तानें) मागच्या दोनमंत्रांमध्यें सांगितलेल्या मार्गांपैकीं एका मार्गाला म्हणजे मनाला संस्कृत करितो, आणि मंत्र म्हणणारा होता, कर्म चालविणारा अध्वर्यु आणि गायन करणारा उद्गाता. हे तिघेजण वाग्लक्षणात्मक जो दुसरा मार्ग आहे, त्याला आपल्या वाणीनें म्हणजे मंत्रपठणानें शुद्ध करितात, संस्कृत करितात.

शिष्य—म्हणजे ब्रह्मा हा ऋत्विज् यज्ञस्वरूपाच्या ज्ञानानें अलंकृत असतो, तेव्हां तो ज्ञानशुद्ध चित्ताच्या साह्यानें चित्तमार्ग संशोधितो आणि बाकीचे तिघे ऋत्विज् आपल्या मंत्रपठणानें वाणीरूपी मार्गाला शुद्ध करितात.

सिद्धान्ती—असा योग्य श्रमविभाग झाला म्हणजे वाणी आणि मन हे दोन्ही यज्ञमार्ग संस्कृत म्हणजे शुद्ध अथवा यज्ञोपयोगी आणि यज्ञविस्तारक होतात. पण जेव्हां प्रातरनुवाक–नामक शस्त्राचे मंत्र ह्मणण्यास प्रारंभ होतो, तेव्हां परिधानीय नामक ऋचेच्या पूर्वीं—

शिष्य—म्हणजे प्रातरनुवाक म्हणण्याचा काल आणि परिधानीय ऋचा म्हणण्याचा काल त्यामध्यें. असा ‘ परिधानीय ऋचेच्यापूर्वीं ’ या पदांचा अर्थ समजावयाचा ना ?

**सिद्धान्ती**—' परिधानीय ' या शब्दाचा अर्थ ' मंत्राचा शेवट ' असा आहे. तात्पर्य, प्रात:सवनाला आरंभ करण्याचे वेळीं प्रातरनुवाकाचें पठण होतें. यावेळीं ब्रह्म्यानें मौन धारण करावयाचें असतें. आतां प्रातरनुवाक मंत्रांचे पठण संपलें नाहीं तोंच ( प्रातरनुवाक म्हणतानांच ) जर ब्रह्मानामक ऋत्विजानें आपलें मौन व्रत सोडून दिलें, तर ( ब्रह्मा मंत्र म्हणूं लागला तर ) वाग्वर्तनी ( वाणीकृत मार्ग ) संस्कृत होतो, हें खरें; परंतु ब्रह्यानें मनोवर्तनी ( चित्तकृतमार्ग ) संस्कृत करावयाची असते, तें कार्य होत नाहीं. याप्रमाणें चित्त संस्कृत होत नाहीं; आणि तो मार्ग अपवित्र होतो, म्हणजे अशुद्ध राहतो. अर्थात् दोन मार्गांनीं सिद्ध होणारा यज्ञ एकमार्गी होतो—

**शिष्य**—म्हणजे त्याचा वाणीमार्ग ( वाङ्मार्ग ) शुद्ध होतो; परंतु चिन्मार्ग शुद्ध होत नाहीं.

**सिद्धान्ती**—अर्थात् या असल्या एकमार्गी ( एकदेशी ) यज्ञाला सांगता प्राप्त होत नाहीं.

**शिष्य**—यज्ञामध्यें व्यंग पडते; म्हणून तो विनष्टच झाला पाहिजे ?

**सिद्धान्ती**—विनष्टच होतो. कसा म्हणशील तर पहा: जसा एका पायावरच चालणारा पांथस्थ मार्ग क्रमूं लागतांक्षणीं खालीं पडतो किंवा एकाच चक्रावर चालणारा रथ खालीं कलंडतो, त्याचप्रमाणें एकमार्गी यज्ञही विनष्ट होतो. उघडच आहे. दोन मार्गांनीं सिद्ध होणारा, दोन्ही मार्गांची आवश्यकता असणारा, यज्ञ जर एकाच उपकरण सामर्थ्याच्या अवलंबानें चालूं लागला, तर तो द्वितीय उपकरणाच्या अभावीं विनष्ट झालाच पाहिजे. अर्थातच यज्ञ करणाऱ्या यजमानाचा यज्ञ अज्ञानी ब्रह्माच्या चुकीमुळें विनष्ट होतो. ही ब्रह्याची चुकी जाणून बुजून होवो किंवा अजाणतेपणानें होवो, यज्ञ विनाश होतो, हें खरें. यज्ञनाश झाला म्हणजे यजमानही नष्ट होतो. कारण यज्ञ चालविणारा जो यजमान तो यज्ञ-प्राणच असतो.

**शिष्य**—यज्ञ आहे प्राण ज्याचा तो यज्ञप्राण अथवा यजमान होय. म्हणून यज्ञनाश झाला कीं, यजमान नाश पावतो. तात्पर्य, यज्ञ करूनही याप्रमाणें यजमान पापाचा अधिकारी होतो !

**पूर्वपक्षी**—यज्ञ करूनही पाप कसें उत्पन्न होतें ?

**सिद्धान्ती**—असला वर सांगितलेला भ्रष्ट यज्ञ करणें हें पापात्मकच होय. यज्ञाच्या अभावीं पाप उत्पन्न होतेंच ! पण असला भ्रष्ट यज्ञ केला तर यजमान जास्तच पापाचा अधिकारी होतो.

**शिष्य**—सारांश, ब्रह्यानें आपलें मौनव्रत मोडलें म्हणजे इतका अनर्थ होतो.

सिद्धान्ती—तसेंच बाकीच्या ऋत्विजांनीं अवश्य मंत्र म्हटलें नाहींत, तरी ही वाणीशुद्धीच्या अभावानें यज्ञ भ्रष्ट होतो; आणि यजमान पापी होतो. म्हणून प्रातरनुवाकाचें वेळीं ब्रह्म्याचें मौन आणि इतर ऋत्विजांचें मंत्रपठण या दोन्हीं गोष्टी आवश्यक आहेत ॥ २ ॥ ३ ॥

---

### मंत्र चवथा.

**अथ यत्रोपाकृते प्रातरनुवाके न पुरा परिधानीयाया ब्रह्मा व्यववदत्युभे एव वर्तनी सꣳस्कुर्वन्ति न हीयतेऽन्यतरा ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थः—अथ, यत्र उपाकृते प्रातरनुवाके परिधानीयाया पुरा ब्रह्मा न व्यववदति** ( आतां प्रातरनुवाकाला आरंभ होऊन त्याचा शेवट होईपर्यंत जर ब्रह्यानें भाषण केलें नाहीं, मौन धारण केलें ) **उभे एव वर्तनी संस्कुर्वंति, अन्यतरा न हीयते** ( तर दोन्हीं मार्ग उभयपक्षांकडून शुद्ध होतात; आणि कोणताही मार्ग स्वरूपभ्रष्ट होत नाहीं. कोणत्याही मार्गांत विघ्न येत नाहीं ) ॥ ४ ॥

---

### मंत्र पांचवा.

**स यथोभयपाद्व्रजन्रथो वोभाभ्यां चक्राभ्यां वर्तमानः प्रतितिष्ठत्येवमस्य यज्ञः प्रतितिष्ठति यज्ञं प्रतितिष्ठन्तं यजमानोऽनुप्रतितिष्ठति स इष्ट्वा श्रेयान्भवति ॥ ५ ॥**

**इति चतुर्थाध्यायस्य षोडशः खण्डः ॥ १६ ॥**

**अन्वय व अर्थः—यथा उभयपात् व्रजन् वा उभाभ्यां चक्राभ्यां वर्तमानः रथः प्रतितिष्ठति, एवं अस्य सः यज्ञः प्रतितिष्ठति; यज्ञं प्रतितिष्ठंतं अनु यजमानः प्रतितिष्ठति; सः इष्ट्वा श्रेयान् भवति** ( दोन्हीं पायांनीं चालणारा पांथस्थ अथवा दोन्हीं चक्रांनीं

जाणारा रथ ज्याप्रमाणें न पडतां मार्गक्रमण करितो; त्याप्रमाणें हा यज्ञही यथासांग सिद्ध होतो; यज्ञसिद्धि झाली म्हणजे यजमानही प्रतिष्ठित होतो; आणि यथासांग यज्ञ केल्यामुळें तो श्रेष्ठ होतो ॥ ५ ॥

अथ पुनर्यत्र ब्रह्मा विद्वान्मौनं परिगृह्य वाग्विसर्गमकुर्वन्वर्तते यावत्परिधानीयाया न व्यववदति तथैव सर्वर्त्विज उभे एव वर्तनी संस्कुर्वन्ति न हीयतेऽन्यतराऽपि । किमिवेत्याह । पूर्वोक्त-विपरीतौ दृष्टान्तौ । एवमस्य यजमानस्य यज्ञः स्ववर्तनीभ्यां वर्तमानः प्रतितिष्ठति स्वेनाऽऽत्मनाऽविनश्यन्वर्तत इत्यर्थः । यज्ञं प्रतितिष्ठन्तं यजमानोऽनुप्रतितिष्ठति स यजमान एवं मौन-विज्ञानवद्ब्रह्मोपेतं यज्ञमिष्ट्वा श्रेयान्भवति श्रेष्ठो भवतीत्यर्थः ॥४॥५॥

इति चतुर्थाध्यायस्य षोडशः खण्डः ॥ १६ ॥

**सिद्धान्ती**—आतां पुनः; यज्ञामध्यें ज्ञानी ब्रह्मा प्रातरनुवाकें पूर्ण होई तोंपर्यंत, मौन धारण करील, वाग्विसर्ग करणार नाहीं, म्हणजे चित्त आपल्या ध्यानानें संस्कृत करील; आणि तसेंच दुसरे ऋत्विज् मंत्रपठणानें वाणीमार्ग संस्कृत करतील, तर हे चारी ऋत्विज् हे दोन्ही यज्ञमार्ग संस्कृत करतील.

**शिष्य**—अर्थात् हे दोन्ही मार्ग सिद्ध झाल्यामुळें कोणत्याच मार्गांत छिद्र पडण्याचें कारण नाहीं; आणि यज्ञ यथासांग होईल.

**सिद्धान्ती**—याला उदाहरण मागचें आहेच. पांथस्थ दोन्ही पायांनीं चालत असला, रथ दोन्ही चाकांवर उभा असला, म्हणजे दोघांचेंही मार्गक्रमण यथास्थित होतें; हें मागच्या दृष्टांतावरून समजून घ्यावयाचें आहे. असो; या-प्रमाणें संस्कृत झालेल्या दोन्ही मार्गांनीं पूर्णत्व पावणारा यज्ञ स्वरूपानें विद्यमान असतो; म्हणजे त्याला कोणत्याही प्रकारें भ्रष्टता येत नाहीं, यज्ञांत कोठेंही बिघाड येत नाहीं. यज्ञ विघटित झाला नाहीं ( बिघडला नाहीं ) म्हणजे यजमानाचाही नाश होत नाहीं. मौन धरणाऱ्या ज्ञानी ब्रह्म्यानें सिद्ध केलेला यज्ञ ( मौन धारण करणाऱ्या ज्ञानी ब्रह्म्यामुळें सिद्ध झालेला यज्ञ ) आणि होतादिकांच्या मंत्रपठणानें भूषित झालेला यज्ञ यथासांग झाल्यामुळें यजमान श्रेष्ठपदवीचा अधिकारी होतो. यथासांग यज्ञाच्या संपादनानें यजमानाचें विशेष कल्याण होतें ॥ ४ ॥ ५ ॥

सोळावा खंड समाप्त.

---

## खंड सतरावा.

अत्र ब्रह्मणो मौनं विहितं तद्रेषे ब्रह्मत्वकर्मणि चाथान्यस्मिंश्च होत्रादिकर्मरेषे व्याहृतिहोमः प्रायश्चित्तमिति तदर्थं व्याहृतयो विधातव्या इत्याह—

सिद्धान्ती—येथें ब्रह्यानें मौन धारण करावें, असा विधि आहे. हा विधि भग्न झाला, ब्रह्यानें मौन धारण केलें नाहीं, तर ब्रह्मत्वकर्म व्यंग होतें. तेथें आणि हौत्रादि दुसऱ्या कर्मामध्यें कांहीं व्यंग झालें, तर 'व्याहृति होम' करावा असें प्रायश्चित्त सांगितलें आहे. हें मनांत आणून श्रुतीनें प्रायश्चित्तास उपयोगी पडणाऱ्या व्याहृती येथें सांगितल्या आहेत. त्यांचा अवतार करण्यासाठीं श्रुति म्हणते:—

### मंत्र पहिला.

**प्रजापतिर्लोकानभ्यतपत्तेषां तप्यमानानाꣳरसान्प्रावृहदग्निं पृथिव्या वायुमन्तरिक्षादादित्यं दिवः ॥१॥**

**अन्वय व अर्थः—प्रजापतिः लोकान् अभ्यतपत्; तप्यमानानां तेषां रसान् प्रावृहत्; पृथिव्याः अग्निं, अंतरिक्षात् वायुं, दिवः आदित्यं** ( सृष्टिकर्त्यानें भुवनांच्या संबंधानें तपश्चर्या केली; आणि तप्त झालेल्या भुवनांपासून सार उत्पन्न केलें. पृथिवीलोकाचें सार अग्नि, अंतरिक्षाचें सार वायु, आणि द्युलोकाचें सार आदित्य, असे या तिनी लोकांचे रस प्रजापतीनें उद्धृत केले ) ॥ १ ॥

प्रजापतिर्लोकानभ्यतपल्लोकानुद्दिश्य तत्र सारजिघृक्षया ध्यानलक्षणं तपश्चचार । तेषां तप्यमानानां लोकानां रसान्साररूपान्प्रावृहदुद्धृतवाञ्जग्राहेत्यर्थः । कान् । अग्निं रसं पृथिव्याः । वायुमन्तरिक्षात् । आदित्यं दिवः ॥ १ ॥

सिद्धान्ती—सृष्टिकर्ता प्रजापति तपश्चर्या करिता झाला. पृथिवी, अंतरिक्ष आणि स्वर्ग हे जे तीन लोक आहेत, त्या लोकांस उद्देशून त्यानें तपश्चर्या केली; म्हणजे ह्या लोकांचें जें काय सारसर्वस्व आहे, तें ग्रहण करण्याच्या हेतूनें ध्यानलक्षणात्मक तपश्चर्या केली; म्हणजे उत्कृष्ट चिंतन केलें. नंतर ह्या ध्यानानें पूर्णतः

आकलित झालेल्या लोकांपासून प्रत्येकाचें सारस्वरूप ( प्राण ) त्यानें उद्धृत केलें. तात्पर्य, प्रत्येक लोकाचें सार त्याच्या लक्षांत आलें. पृथिवी, अंतरिक्ष आणि द्युलोक असे हे तीन लोक होत, हें आतांच सांगितलें. अग्नि, वायु आणि आदित्य हे त्या तिन लोकांचे अनुक्रमें रस अथवा सारभूत प्राण होत. तात्पर्य, त्यानें अग्नि, वायु आणि आदित्य या लोकसारभूत देवतांस उद्धृत केलें ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**स एतास्तिस्रो देवता अभ्यतपत्तासां तप्यमानानाꣳ रसान्प्रावृहदग्नेर्ऋचो वायोर्यजूꣳषि सामान्यादित्यात् ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः—एताः तिस्रः देवताः सः अभ्यतपत्; तप्यमानानां तासां रसान् प्रावृहत्; अग्नेः ऋचः, वायोः यजूंषि, आदित्यात् सामानि** ( या तीन देवतांसंबंधानेंही त्यानें ध्यानात्मक तपश्चर्या केली; आणि त्यांपासून तीन रस उद्धृत केले. अग्नीचा रस ऋचा ( **ऋग्वेद** ), वायूचा रस **यजुर्वेद**; आणि आदित्याचा रस **सामवेद** असे तिन्ही रस प्रजापतीनें आपल्या मनाच्या स्वाधीन करून घेतले) ॥ २ ॥

पुनरप्येवमेवमग्न्याद्याः स एतास्तिस्रो देवता उद्दिश्याभ्यतपत्।
ततोऽपि सारं रसं त्रयीविद्यां जग्राह ॥ २ ॥

सिद्धान्ती—अग्निप्रमुख तिन्ही भुवनदेवतांच्या संबंधानें तपश्चर्या करून ( एकाग्र ध्यान करून ) त्यांपासून तिन्ही वेदांचा उद्धार केला; तिन्ही वेद त्याला प्रकट झाले. अग्निदेवतेचा प्राण ऋग्वेद, वायुदेवतेचा यजुर्वेद आणि आदित्यदेवतेचा सामवेद हे, तीन देवतारस देवतात्रयीचे प्राण होत. हे तीन रस म्हणजे तीन वेद अथवा तीन विद्या होत. या प्रकटलेल्या विद्यात्रयीचा सृष्टिकर्त्यानें स्वीकार केला ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**स एतां त्रयीं विद्यामभ्यतपत्तस्यास्तप्यमानाया रसान्प्रावृहद्भूरित्यृग्भ्यो भुवरिति यजुर्भ्यः स्वरिति सामभ्यः ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थः—एतां त्रयीं विद्यां सः अभ्यतपत्; तप्यमानायाः तस्याः रसान् प्रावृहत्; ऋग्भ्यः भूः इति, यजुर्भ्यः भुवः इति, सामभ्यः स्वः इति** ( प्रजापतीनें ह्या विद्यात्रयीस उद्देशून तपश्चर्या केली आणि त्यांच्यांतून तीन रस बाहेर काढले. 'भूः' हा रस ऋग्वेदापासून निघाला, 'भुवः' हा यजुर्वेदापासून आणि 'स्वः' हा सामवेदापासून. असे तीन रस निवते झाले ) येणेंप्रमाणें 'भूर्भुवः :' हे तीन रस किंवा या तीन व्याहृती निर्माण झाल्या ॥ ३ ॥

---

**मंत्र चवथा.**

**तद्यदृक्तो रिष्येद्भूः स्वाहेति गार्हपत्ये जुहुयादृचामेव तद्रसेनर्चां वीर्येणर्चां यज्ञस्य विरिष्टं संदधाति ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थः—तत्, यत् ऋक्तः ऋष्येत्, 'भूः स्वाहा' इति गार्हपत्ये जुहुयात्** ( यज्ञामध्यें जर ऋचेच्या संबंधानें छिद्र उत्पन्न झालें, तर '**भूः स्वाहा**' असें ह्मणून गार्हपत्याग्नीमध्यें आहुति टाकावी ) **ऋचां एव तत्*** ( हें प्रायश्चित्त ऋचांच्या संबंधानें आहे) **ऋचां रसेन, ऋचां वीर्येण यज्ञस्य विरिष्टं संदधाति** ( ऋचांच्या रसानें आणि त्यांच्या वीर्यानें ऋक्संबंधीं उत्पन्न झालेलें यज्ञांतील क्षत भरून येतें ) यज्ञांत ऋचा म्हणतांना कांहीं चुकभूल झाली तर तन्निवारणार्थ हें प्रायश्चित्त सांगितलें आहे ॥ ४ ॥

स एतां पुनरभ्यतपत्त्रयीं विद्याम् । तस्यास्तप्यमानाया रसं भूरिति व्याहृतिमृग्भ्यो जग्राह । भुवरिति व्याहृतिं यजुर्भ्यः । स्वरिति व्याहृतिं सामभ्यः । अत एव लोकदेववेदरसा महाव्याहृतयः । अतस्तत्तत्र यज्ञे यद्यृक्त ऋक्संबन्धादृङ्निमित्तं रिष्ये-

---

* हीं पदें ( यज्ञस्य विरिष्टं ) या पदांशी आन्वित होणें शक्य आहे काय ? माझ्या समजुतीनें 'ऋचां एव तत् यज्ञस्य विरिष्टं' असा अन्वय होऊन ऋचांच्या संबंधानें यज्ञांत जें विरिष्ट म्हणजे क्षतरूप उत्पन्न होतें, तें ऋचांच्या भूःनामक रसानें भरून जातें, असा अर्थ होणें शक्य आणि इष्ट आहे, असो.

**यज्ञः क्षतं प्राप्नुयाद्भूः स्वाहेति गार्हपत्ये जुहुयात् । सा तत्र प्रायश्चित्तिः । कथम् ? ऋचामेव, तदिति क्रियाविशेषणं, रसेनर्चां वीर्येणौजसर्चां यज्ञस्य ऋक्संबन्धिनो यज्ञस्य विरिष्टं विच्छिन्नं क्षतरूपमुत्पन्नं संदधाति प्रतिसंधत्ते ॥ ३ ॥ ४ ॥**

**सिद्धान्ती**—प्रजापतीनें पुनः त्रयीविद्येस अनुलक्षून ध्यानलक्षणात्मक तपश्चर्या केली. नंतर ध्यानांत प्रविष्ट झालेल्या या तीन विद्यांपासून तीन रस निर्माण झाले; आणि या रसांचा प्रजापतीनें स्वीकार केला. ऋग्वेदापासून 'भूः' या रसाचा म्हणजे व्याहृतीचा त्यानें स्वीकार केला.

**शिष्य**—त्याचप्रमाणें यजुर्वेदापासून 'भुवः' या व्याहृतीचा व सामवेदापासून 'स्वः' ह्या व्याहृतीचा स्वीकार प्रजापतीनें केला असला पाहिजे ?

**सिद्धान्ती**—यांसच महाव्याहृती असें म्हणतात. कारण या व्याहृती म्हणजे तीन लोक, त्यांचे तीन अधिष्ठाते देव, आणि तिन्ही वेद या सर्वांचें रससर्वस्व आहे. 'भूर्भुवः स्वः' या तीन व्याहृती वश करून घेतल्या असतां तिन्ही लोक तिन्ही देव, आणि तिन्ही वेद आपल्या हातांत आलेसे होतात म्हणजे येतात; म्हणून यज्ञामध्यें ऋग्वेदाच्या संबंधानें किंवा ऋचांच्या निमित्तानें जर केव्हां क्षत पडलें ( ऋचा म्हणतांना स्वरभंगादि अनाचार झाला ) तर 'भूः स्वाहा,' असा मंत्र व्याहृतिपूर्वक म्हणून गार्हपत्याग्नीमध्यें आहुती टाकावी. जो अनाचार झाला असेल, तन्निवारक हें प्रायश्चित आहे.

**शिष्य**—हें कसें ?

**सिद्धान्ती**—अरें ऋचांमधूनच उत्पन्न झालेला जो रस म्हणजे 'भूः' ही व्याहृति ऋक्संबंधीं प्रमादांचें अपनयन करण्यास समर्थ असणार. असो; यज्ञ चालला असतां ऋक्संबंधीं जी यज्ञविच्छिन्नता उत्पन्न झालेली असते, ती ऋचांचा रस जी 'भूः' नामक व्याहृति ( आणि ऋचांचें वीर्य अथवा सामर्थ्यसर्वस्व असणारी ही 'भूः' नामक व्याहृति ) ही तें क्षत सांधून घेण्यास ( भरून काढण्यास ) समर्थ असते. तात्पर्य, ऋग्वेदाच्या संबंधानें उत्पन्न झालेले यज्ञव्यंग ऋक्सार असणाऱ्या भूः—व्याहृतीनें नाहींसे होऊन ऋक्संबंधानें यज्ञाला सांगता प्राप्त होते.

**शिष्यः**—कोणत्याही पदार्थाच्या अर्कामध्यें त्या सर्वपदार्थांचें बलसर्वस्व अवतीर्ण होतें, हें सांगावयास नकोच. तेव्हां एखाद-दुसऱ्या ऋचेच्या संबंधानें घडून आलेला प्रमाद किंवा उत्पन्न झालेला दोष अखिल ऋग्वेदाचें सर्वसामर्थ्य असणाऱ्या 'भूः' व्याहृतीनें नाहींसा व्हावा आणि यज्ञ यथासांग व्हावा, हें योग्यच आहे ॥ ३ ॥ ४ ॥

---

## मंत्र पांचवा.

**अथ यदि यजुष्टो रिष्येद्भुवः स्वाहेति दक्षिणाग्नौ जुहुयाद्यजुषामेव तद्रसेन यजुषां वीर्येण यजुषां यज्ञस्य विरिष्टꣳ संदधाति ॥ ५ ॥**

**अन्वय व अर्थः—अथ यदि यजुष्टः रिष्येत्, 'भुवः स्वाहा' इति दक्षिणाग्नौ जुहुयात्, यजुषां एव तत्; यजुषां रसेन, यजुषां वीर्येण, यज्ञस्य विरिष्टं संदधाति** ( आतां जर यजुर्वेदासंबंधानें प्रमाद झाला, तर 'भुवः स्वाहा' असें म्हणून दक्षिणाग्नीमध्यें आहुति द्यावी. यजुर्वेदासंबंधानेंच यज्ञामध्यें उत्पन्न झालेला दोष यजुर्वेदाच्या 'भुव' रसानें आणि वीर्यानें नाहींसा होतो ) ॥ ५ ॥

---

## मंत्र सहावा.

**अथ यदि सामतो रिष्येत्स्वः स्वाहेत्याहवनीये जुहुयात्साम्नामेव तद्रसेन साम्नां वीर्येण साम्नां यज्ञस्य विरिष्टꣳ संदधाति ॥ ६ ॥**

**अन्वय व अर्थः—अथ यदि सामतः रिष्येत्, 'स्वः स्वाहा' इति आहवनीये जुहुयात्; साम्नां एव तत्; साम्नां रसेन, साम्नां वीर्येण, यज्ञस्य विरिष्टं संदधाति** ( सामाच्या संबंधानें जर प्रमाद झाला असेल, तर 'स्वःस्वाहा' असा मंत्र म्हणून आहवनीयाग्नीमध्यें आहुति अर्पण करावी. सामांच्या संबंधानें झालेला यज्ञदोष सामदेवाच्या 'स्वः' नामक रसानें व 'स्वः' च्या वीर्यानें नाहींसा होतो आणि पडलेलें क्षत भरून येतें ) ॥ ६ ॥

अथ यदि यजुष्टो यजुर्निमित्तं रिष्येद्भुवः स्वाहेति दक्षिणाग्नौ जुहुयात् । तथा सामनिमित्ते रेषे स्वः स्वाहेत्याहवनीये जुहुयात् । तथा पूर्ववद्यज्ञं संदधाति । ब्रह्मनिमित्ते तु रेषे त्रिष्वग्निषु तिसृभिर्व्याहृतिभिर्जुहुयात् । त्रय्या हि विद्यायाः स रेषः । "अथ केन

**ब्रह्मत्वमित्यनयैव त्रय्या विद्यया " इति श्रुतेः । न्यायान्तरं वा मृग्यं ब्रह्मत्वनिमित्ते रेषे ॥ ५ ॥ ६ ॥**

**सिद्धान्तीः**— आतां जर यजुर्वेदनिमित्त कांहीं प्रमाद झाला तर 'भुवः' स्वाहा' असा व्याहृतिपूर्वक मंत्र ह्मणून दक्षिणाग्नीमध्यें आहुति अर्पण करावी. तसेंच सामवेदनिमित्तानें दोष झाला असल्यास 'स्वःस्वाहा' असा व्याहृतिपूर्वक मंत्र ह्मणून आहवनीयाग्नीमध्यें आहुति द्यावी. ह्मणजे हें आहुतिपूर्वक घेतलेलें प्रायश्चित्त यज्ञामध्यें झालेला प्रमाद नाहींसा करून टाकतें. (यज्ञाला झालेली जखम भरून काढते). पण ब्रह्मनिमित्त ह्मणजे ब्रह्म्यानें अपराध केला किंवा प्रमाद केला असेल, तर गार्हपत्यादि तिन्ही अग्नीमध्यें भूर्भुवादि तिन्ही व्याहृतीपूर्वक मंत्र ह्मणून आहुति टाकावी; कारण तिन्ही विद्यांचा अपराध ब्रम्ह्यानें केलेला असतो; व या तिन्हीं विद्यांच्या भग्नतेनें यज्ञ व्यर्थ होण्याचा संभव असतो. ह्मणून त्रिव्याहृतिपूर्वक आहुति देणें, हे त्या अपराधाचे किंवा प्रमादाचें प्रायश्चित्त आहे. श्रुति ह्मणते कीं, ब्रह्मत्व-दोषानें झालेल्या क्षताला प्रायश्चित्तत्व कशानें प्राप्त होतें, असा प्रश्न विचारला असतां तीन विद्यांच्या साह्यानें तें ब्रह्मत्वनिमित्त होतें. अपराध झाला असतां प्रायश्चित्ताचा न्याय आतांच सांगितला हा आहे. दुसराही एक न्याय आहे तो असा; सर्व वेदांचा अर्थ जाणणारा जो ब्रह्मा त्याला असलेलें सर्व वेदप्रणीत ज्ञान असें कांहीं प्रभावशील असतें कीं, कोणतेही दोष झाले तरी ते सर्व ब्रह्म्याच्या ज्ञानमहात्म्यानें निरस्त होण्यासारखे असतात. अर्थात् प्रायश्चित्ताची येथें अपेक्षा नसते. वाटेल तर याही न्यायाचा स्वीकार करावा; परंतु या न्यायाचा विचार ब्रह्मज्ञान असणाऱ्या पंडितांनीं मात्र करावयाचा आहे. ॥ ५ ॥ ६ ॥

---

## मंत्र सातवा.

**तद्यथा लवणेन सुवर्णꣳ संदध्यात्सुवर्णेन रजतꣳ रजतेन त्रपु त्रपुणा सीसꣳ सीसेन लोहं लोहेन दारु दारु चर्मणा ॥ ७ ॥**

**अन्वय व अर्थः—यथा तत् लवणेन सुवर्णं, सुवर्णेन रजतं, रजतेन त्रपु, त्रपुणा सीसं, सीसेन लोहं, लोहेन दारु, चर्मणा दारु संदध्यात्** (ज्या प्रमाणें लवणानें सुवर्ण अत्यंत मृदु होतें, सुवर्णानें रुपें, रुप्यानें शिसें, शिशानें लोखंड, लोखंडानें लांकुड आणि चर्मानेंही लांकुड या सर्व वस्तु मृदु होतात) ॥ ७ ॥

---

## मंत्र आठवा.

**एवमेषां लोकानामासां देवतानामस्यास्त्रय्या विद्याया वीर्येण यज्ञस्य विरिष्टꣳ संदधाति भेषजकृतो ह वा एष यज्ञो यत्रैवंविद्ब्रह्मा भवति ॥ ८ ॥**

**अन्वय व अर्थः—एवं एषां लोकांना, आसां देवतानां, अस्याः त्रय्याः विद्यायाः वीर्येण, विरिष्टं संदधाति** ( त्याप्रमाणें ह्या तिन्ही लोकांच्या, तिन्ही देवतांच्या आणि तिन्ही वेदांच्या वीर्यानें यज्ञांत पडलेलें क्षत भरून येतें ) **यत्र ब्रह्मा एवंवित् भवति, भेषजकृतः वै एषः यज्ञः ह** ( जेथें ब्रह्याला याप्रकारचें ज्ञान असतें, तेथें झालेला—जसा वैद्याच्या साह्यानें रोगी बरा होतो, तसा—सुशिक्षित पुरुषाच्या साह्यानें यज्ञ—सिद्ध होतो ) ॥ ८ ॥

तद्यथा लवणेन सुवर्णं संदध्यात् । क्षारेण टङ्कणादिना खरे मृदुत्वकरं हि तत् । सुवर्णेन रजतमशक्यसंधानं संदध्यात् । रजतेन तथा त्रपु, त्रपुणा सीसं, सीसेन लोहं, लोहेन दारु, दारु चर्मणा चर्मबन्धनेन । एवमेषां लोकानामासां देवतानामस्यास्त्रय्या विद्याया वीर्येन रसाख्येनौजसा यज्ञस्य विरिष्टं संदधाति । भेषजकृतो ह वा एष यज्ञः । रोगार्त इव पुमांश्चिकित्सकेन सुशिक्षतेनैष यज्ञो भवति । कोऽसौ । यत्र यस्मिन्यज्ञ एवंविद्यथोक्तव्याहृतिहोमप्रायश्चित्तविद्ब्रह्मार्त्विग्भवति स यज्ञ इत्यर्थः ॥७॥८॥

**सिद्धन्ती**—जरी कांहीं क्षत पडलेलें असलें तर तें वस्तुस्वभावाच्या वैचित्र्यानें भरून येतें. हें स्पष्ट करण्यासाठीं कित्येक दृष्टांत श्रुतीनें दिले आहेत. पहाः व्यवहारामध्यें कठिण सुवर्ण ( सोनें ) क्षारवस्तूच्या संयोगानें ( टाकणखाराच्या संयोगानें ) रसरूप होऊन मृदु होतें, किंवा सुवर्णाशीं रुप्याचाही एकजीव होतो; त्याप्रमाणें रुप्याचा शिश्याशीं ' शिश्याचा लोखंडाशीं, लोखंडाचा दारूशीं ( लांकडाशीं ) आणि चर्माचा लांकडाशीं ( कातड्याचा लांकडाशीं, ही एक जीव होतो व दरजा बुजतात.

**शिष्य**—सुवर्णाशीं रुप्याचा एकजीव होणें अशक्य आहे.

**सिद्धान्ती**—उभयतांचाही वह्निसंयोगानें एकजीव होणें शक्य आहे, इतकेंच नाहीं तर, सोनार नित्य तसा एकजीव उभयतांचा रस करून करीत असतात, हें

प्रसिद्ध आहे. कातड्याच्या दोरीनें लांकडें व कातडे यांचाही एक जीव होतो, इत्यादि गोष्टी प्रसिद्ध आहेत. वस्तुवैचित्र्य असें कांहीं विलक्षण असतें कीं, एकजीव होणें अशक्य असणाऱ्या तीन वस्तूंस अग्निसंस्कार देऊन त्यांचा रस केला ह्मणजे त्याचा एकजीवच होतो. असो. याचप्रमाणें पृथिवीप्रमुख तिन्ही लोकांचे, अग्निप्रमुख तिन्ही देवतांचें; आणि ऋग्वेदप्रमुख तिन्ही वेदांचे वीर्य ज्या ‘ भूर्भुवः स्वः ’ या व्याहृती, त्या यज्ञामध्यें लोकवेददेवांच्या संबंधानें कांहीं प्रमाद झाला असेल, तर तो प्रमाद विनष्ट करितात. या व्याहृतींच्या साह्यानें सर्व चुका दुरुस्त होतात. उघडच आहे. एखादा रोगानें पीडित पुरुष चिकित्सक वैद्यानें पाहून त्या वैद्यानें योग्य औषधोपचार केल्यावर ह्या रोग्याचा रोग राजमान्य आणि लोकमान्य वैद्याच्या औषधानें नाहींसा होतो आणि रोगी बरा होतो, त्याप्रमाणें ज्या यज्ञामध्यें वर सांगितलेल्या व्याहृतींचें व होमप्रायःश्चित्ताचें ज्ञान ब्रह्मा नामक ऋत्विजाला असतें, तो यज्ञ प्रायश्चित्तानंतर सांग सिद्ध होतो

शिष्य—अथवा त्यांत उत्पन्न झालेले सर्व दोष नाहींतसे होऊन यज्ञ स्वरूपतः प्रकाशमान होतो ॥ ७ ॥ ८ ॥

---

## मंत्र नववा.

**एष ह वा उदक्प्रवणो यज्ञो यत्रैवंविद्ब्रह्मा भवत्येवंविद्ँ॰ ह वा एषा ब्रह्माणमनुगाथा यतो यत आवर्तते तत्तद्गच्छति ॥ ९ ॥**

**अन्वय व अर्थः—एषः यज्ञः वै उदक्प्रवणः यत्र ब्रह्मा एवंवित् भवति** ( ज्या यज्ञांत ज्ञानी ब्रह्मा वर सांगितलेल्या स्वरूपाचा असतो —तो यज्ञ उत्तरमार्गाकडे नेणारा असतो ) **एवंविदं ब्रह्माणं ह एषा अनुगाथा वै** ( अशाप्रकारचें ज्ञान असणाऱ्या ब्रह्मयाची स्तुति करणारी ही गाथा आहे ) **यतः यतः आवर्तते, तत् तत् गच्छति** ( जेथें जेथें कर्मांत व्यंग पडतें, तेथें तेथें हा ब्रह्मा तें क्षत बुजवून पुनः सर्व यज्ञ सांग करितो ) ॥ ९ ॥

किंचैष ह वा उदक्प्रवण उदङ्निम्नो दक्षिणोच्छ्रायो यज्ञो भवति । उत्तरमार्गप्रतिपत्तिहेतुरित्यर्थः । यत्रैवंविद्ब्रह्मा भवत्येवं-

विदं ह वै ब्रह्मणामृत्विजं प्रत्येषाऽनुगाथा ब्रह्मणः स्तुतिपरा । येतो यत्र आवर्तते कर्मप्रदेशादृत्विजां यज्ञः क्षतमिवंस्तत्तद्यज्ञस्य क्षतरूपं प्रतिसंदधत्प्रायश्चित्तेन गच्छति परिपाळयतीत्येतत् ॥ ९ ॥

सिद्धान्ती—ज्या ज्या यज्ञामध्यें यजमानाला मागच्या मंत्रांत सांगितल्याप्रमाणें ज्ञानी असणारा ब्रह्मा नामक ऋत्विज् मिळतो, तो यज्ञ उत्तरमार्गवर्ती ह्मणजे उत्तरमार्गाची प्राप्ति करून देणारा होतो. सारांश, हा यज्ञ सिद्ध झाला ह्मणजे यजमानाला देवमार्गाची प्राप्ति होते.

शिष्य—ह्मणजे दक्षिणमार्गाहून श्रेष्ठ असणाऱ्या उत्तरमार्गानें यजमानाला मोक्षप्राप्ति असला यज्ञ करून होते ?

सिद्धान्ती—असो. यथाशास्त्र अध्ययन झालेल्या ब्रह्मानामक ऋत्विजाची ही अनुगाथा आहे.

शिष्य—अनुगाथा ह्मणजे ?

सिद्धान्ती—गायत्री आदि छंदाव्यतिरिक्त असलेल्या छंदाला गाथा असें ह्मणतात. तिन्ही वेदांत समाविष्ट न झालेली धर्मस्तुतिपर कविता ह्मणजे गाथा होय. ही कविता गातांही येते. ऐकाः याज्ञिक–कर्मप्रपंचात ऋत्विजाच्या अज्ञानामुळें यज्ञाला व्यंगता प्राप्त होते. आणि ह्या व्यंग यज्ञामुळें यज्ञसंपादकाला पुनः पुनः जन्म देणाऱ्या दक्षिणमार्गामध्यें ( पितृयाण-मार्गामध्यें ) येऊन पडावें लागतें. त्या त्या यज्ञांतील व्यंगतेचा श्रुतिविहित प्रायश्चित्तानें विनाश करून यज्ञसांगता करणारा ब्रह्मा यज्ञसंपादकाचें संरक्षण आणि परिपालन करणारा होतो ॥ ९ ॥

---

## मंत्र दहावा.

**मानवो ब्रह्मैवैक ऋत्विक्कुरूनश्वाऽभिरक्षत्येवंविद्ध वै ब्रह्मा यज्ञं यजमानꣳ सर्वाꣳश्चर्त्विजोऽभिरक्षति तस्मादेवंविदमेव ब्रह्माणं कुर्वीत नानेवंविदं नानेवंविदम् ॥ १० ॥**

**इति चतुर्थाध्यायस्य सप्तदशः खण्डः ॥ १७ ॥**

**इति च्छान्दोग्योपनिषदि चतुर्थोऽध्यायः समाप्तः ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थः—अश्वा कुरून् अभिरक्षति, मानवो ब्रह्मा एव एकः ऋत्विक् अभिरक्षति** ( अश्वा—उत्तम—घोडी—ज्याप्रमाणें रक्षण करते, त्याप्रमाणें मौन धारण करणारा एक ब्रह्मा मात्र इतर ऋत्विजांचे व यज्ञसंपादकाचें संरक्षण करितो ) **एवंवित् ह वै ब्रह्मा यज्ञं, यजमानं, सर्वान् च ऋत्विजान्, अभिरक्षति** ( ज्ञानी ब्रह्मा यज्ञाचें, यजमानाचें आणि सर्व ऋत्विजांचें संरक्षण करितो ) **तस्मात् एवंविदं एव ब्रह्माणं कुर्वीत** ( म्हणून क्षत आणि प्रायश्चित्त यांचें ज्ञान असणाऱ्या मात्र ब्रह्मयाची यज्ञामध्यें योजना करावी ) **अनेवंविदं न; अनेवंविदं न** ( अज्ञानी ब्रह्मयाची योजना करूं नये; असर्वज्ञ ब्रह्मयाची योजना करूं नये ) ॥१०॥

मानवो ब्रह्मा मौनाचरणान्मननाद्वा ज्ञानतत्त्वात्ततो ब्रह्मैवैकर्त्विक्कुरून्कर्तॄन् योद्धॄनारूढानश्वा वडवा यथाऽभिरक्षत्येवंविद्ध वै ब्रह्मा यज्ञं यजमानं सर्वांश्चर्त्विजोऽभिरक्षति तत्कृतदोषापनयात् । यत एवंविशिष्टो ब्रह्मा विद्वांस्तस्मादेवंविदमेव यथोक्तव्याहृत्यादिविदं ब्रह्माणं कुर्वीत नानेवंविदं कदाचनेति । द्विरभ्यासोऽध्यायपरिसमाप्त्यर्थः ॥ १० ॥

इति चतुर्थाध्यायस्य सप्तदश खण्डः ॥ १७ ॥

## इति च्छान्दोग्योपनिषद्भाष्ये चतुर्थोऽध्यायः

**सिद्धान्ती—**ब्रह्मा मानव असावा; मानव ह्मणजे मौन धारण करणारा अथवा यज्ञस्वरूपाचें मनन करणारा; तात्पर्य ब्रह्मज्ञानी व व्रतस्थ असावा. असा ब्रह्मा असला ह्मणजे तो सर्वसंरक्षक होतो. अश्वा ( वडवा, स्त्री जातीची चपल घोडी ) ज्याप्रमाणें वर बसलेल्या योद्ध्याचें अभिरक्षण करिते, त्याप्रमाणें यज्ञाचें, यजमानाचें आणि सर्व ऋत्विजांचे अभिरक्षण ( उत्तम संरक्षण ) आतांच सांगितल्याप्रमाणें ज्ञान असणारा ब्रह्मा करितो.

**शिष्य—**ह्मणजे यज्ञामध्यें यजमानाच्या अथवा ऋत्विजांच्या हातून जे कांहीं ज्ञाताज्ञात दोष होतात, तें ब्रह्मयाच्या ज्ञानपूर्वक यज्ञसंपादनानें विनष्ट होतात. यज्ञकर्म सांग होतें; आणि सर्वांचें कल्याण होतें. अर्थात् हा ब्रह्मा सर्वांचा रक्षण करणारा आणि सर्वांस उत्तम गति देणारा होतो.

**सिद्धान्ती**—अत्यंत ज्ञानी असणारा ब्रह्मा यज्ञकर्मांत विद्यमान असला ह्मणजे यज्ञकर्माला संपूर्णता येते; ह्मणून भूर्भुवादि व्याहृत्यादिकांचे व यज्ञसर्वांगांचे यथार्थ ज्ञान असणाऱ्या ब्रह्म्याला मात्र यज्ञकर्मांमध्यें आमंत्रण द्यावें. तात्पर्य, व्याहृत्यादिकांचें ज्ञान ज्याला नसतें, त्याची यज्ञकर्मांमध्यें केव्हांही योजना करूं नये. मंत्रांत दोन-वेळ 'नानेवंविदं' या पदांची आवृत्ति केली आहे ती अध्याय समाप्त झाला, हें सुचविण्यासाठीं आहे ॥ १० ॥

सतरावा खंड समाप्त.

**चवथा अध्याय समाप्त.**

---



# पांचवा अध्याय

## खंड पहिला.

सगुणब्रह्मविद्याया उत्तरा गतिरुक्ता । अथेदानीं पञ्चमेऽध्याये पञ्चाग्निविदो गृहस्थस्योर्ध्वरेतसां च श्रद्धालूनां विद्यान्तरशीलिनां तामेव गतिमनूद्यान्या दक्षिणा दिक्संबन्धिनी केवलकर्मिणां धूमादिलक्षणा पुनरावृत्तिरूपा तृतीया च ततः कष्टतरा संसारगतिर्वैराग्यहेतोर्वक्तव्येत्यारभ्यते । प्राणः श्रेष्ठो वागादिभ्यः प्राणो वाव संवर्ग इत्यादि च बहुशोऽतीते ग्रन्थे प्राणग्रहणं कृतं स कथं श्रेष्ठो वागादिषु सर्वैः संहत्यकारित्वाविशेषे कथं च तस्योपासनामिति तस्य श्रेष्ठत्वादिगुणविधित्सयेदमनन्तरमारभ्यते—

**सिद्धांती**—सगुण ब्रह्मविद्या प्राप्त झाली असतां जीवाला उत्तरगति म्हणजे देवयानपंथ प्राप्त होऊन तो पुढें ब्रह्मस्वरूप होतो, हें मागच्या अध्यायांत सांगितलें. आतां, या पांचव्या अध्यायामध्यें पंचाग्निविद्या जाणणाऱ्या गृहस्थाला ही उत्तरगति प्राप्त होते, असें सांगावयाचें आहे.

**शिष्य**—म्हणजे ऊर्ध्वरेते ( नैष्ठिक ब्रह्मचारी ). श्रद्धालू व पंचाग्निविद्येहून श्रेष्ठ असणारी जी सगुणविद्या तिची एकनिष्ठतेनें आराधना करणाऱ्या ज्ञानी उपासकाला जी गति प्राप्त होते, तीच गति ( फल ) पंचाग्निविद्येच्या ज्ञात्याला होतें, असें म्हणावयाचें। हा चमत्कारच आहे, म्हणावयाचा.

**सिद्धांती**—हा चमत्कार कसा होतो, हें श्रुतिमाता स्वतःच सांगणार आहे.

**पूर्वपक्षी**—एवंच, सर्व जीवांस उत्तम ( उत्तर ) गति प्राप्त होते, असेंच म्हणाना ?

**सिद्धांती**—नाहीं, केवळ कर्ममात्र करणारे, ज्ञान नसून कर्ममात्र करणारे, जे लोक आहेत, श्रुतीनें विहित केलेल्या कर्मांवर मात्र ज्यांची निष्ठा आहे त्या लोकांस निराळेंच फल मिळतें. ह्या लोकांस धूमादिलक्षणात्मक दक्षिण मार्गानें स्वर्गसुखें कांहीं कालपर्यंत प्राप्त होतात. पण स्वर्गादि सुखें चिरंतन नसल्यामुळें व कर्मठांचें कर्मफल नियतकालिक असल्यामुळें ह्या स्वर्गवासी जीवांस पुनः कर्मभूमींत जन्ममरणाचें फेरे घालावे लागतात, हें श्रुति सांगेल.

**पूर्व०**—येणेंप्रमाणें उत्तरगति व दक्षिणगति ( देवयानमार्ग व पितृयाणमार्ग ) अशा दोन गती किंवा मार्ग झाले.

**सिद्धांती**—थांबा. या मार्गांहून अन्य असा तिसरा मार्ग आहे. हा मार्ग म्हणजे संसारगति होय. या मार्गांत विद्यमान असणाऱ्या जीवांस अतिशय कष्ट ( यातना ) भोगावे लागतात.

**पूर्व०**—कोणत्या जीवांस भगवन् !

**सिद्धांती**—ज्यांस विद्येचा गंध नाहीं व जे श्रुतिविहित कर्म करीत नाहींत, केवळ संसारी असतात, त्यांस नरकवासासारखीं कष्टतर दुःखें भोगावीं लागतात.

**पूर्व०**—अहो ! जीवाचा उद्धार होण्याचा मार्ग मात्र श्रुतीनें सांगावा. ही संसाराची कष्टमय काहणी कशाला सांगत आहे श्रुति !

**सिद्धांती**--क्षणिक सुख देऊन पुढें अनंत दुःखें देणाऱ्या अज्ञ व भ्रष्टकारी संसाराचें स्वरूप यथार्थ समजलें, देहस्वार्थीनें मात्र कर्म करविणाऱ्या संसाराची स्वरूपतः ओळख झाली, म्हणजे संसारसंबंधानें यथार्थ वैराग्य उत्पन्न होतें. यास्तव संसाररूपाचेंही दिग्दर्शन श्रुति करणार आहे.

**शिष्य०**—या पांचव्या अध्यायांत 'वाणीप्रमुख इंद्रियांपेक्षां प्राण श्रेष्ठ आहे, असा आरंभ श्रुति करणार आहे, असें दिसतें.

**सिद्धांती**--होय. 'प्राण हाच सर्वांचा संहारक व संग्राहक आहे.' 'प्राण ब्रह्म होय.' इत्यादि अनेक श्रुतींनीं प्राणग्रहण करून त्याचें स्वरूपही मागेंच सांगितलें आहे; तथापि—

**पूर्वपक्षी**—पण श्रुतीनें 'प्राण सर्वश्रेष्ठ आहे' असें जें विधान केलें आहे त्याला आधार काय? कर्म संपादण्याला किंवा ज्ञान मिळविण्याला सर्व इंद्रियांच्या सहकारितेची आवश्यकता आहे, असा प्रत्यक्ष अनुभव प्रत्यहीं येत असतां, 'प्राण मात्र सर्वश्रेष्ठ आहे' असें विधान ठोकून देण्याला श्रुतीपाशी काय पुरावा आहे ? आह्मांस तर कार्यसमर्थ असणाऱ्या कोणत्याही इंद्रियापेक्षां प्राणांत कांहीं विशेष आहे असें दिसत नाहीं. कांहीं झालें तरी इंद्रियांचें साह्य घेऊनच प्राण कार्यक्षम होतोना ? मग प्राणालाच श्रेष्ठत्व कां ! इतरांस कां नाही ? तसेंच, 'प्राण श्रेष्ठ आहे,' असें सांगून श्रुति प्राणोपासना विहित करणार; पण आह्मी ह्मणतों त्याप्रमाणें वाणीप्रमुख इंद्रियें प्रत्येकीं श्रेष्ठ झालीं ह्मणजे त्यांचीही उपासना सिद्ध होईल. मग त्यांची ही उपासना कां नको ? तात्पर्य, श्रुतीच्या राज्यांत पक्षपात दिसतो आहे. नव्हे ?

**सिद्धान्ती**—ऐकाः प्राणाला श्रेष्ठत्व कां प्राप्त होतें, याचा व प्राणच उपास्य कां, याचा विचार करण्यासाठीं ह्या श्रुतीनें ह्या ग्रंथाला आरंभ केला आहे. प्राणाचें ज्येष्ठत्व व गुणश्रेष्ठत्व वर्णन करावें, एतदर्थच हा ऊहापोह आहे. ऐकाः—

---

## मंत्र पहिला.

**ॐ यो ह वै ज्येष्ठं च श्रेष्ठं च वेद ज्येष्ठश्च ह वै श्रेष्ठश्च भवति प्राणो वाव ज्येष्ठश्च श्रेष्ठश्च ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः -यः ह वै ज्येष्ठं च श्रेष्ठं च वेद, ज्येष्ठः च श्रेष्ठः च ह वै भवति** ( ज्याला वयोज्येष्ठ आणि गुणश्रेष्ठ वस्तूचें ज्ञान होतें, तो ज्येष्ठ आणि श्रेष्ठ होतो, असा ऐतिहासिक सिद्धांत आहे. **प्राणः ज्येष्ठः च श्रेष्ठः च वाव** ( खरोखर पाहतां प्राण हाच वयानें ज्येष्ठ आणि गुणांनीं श्रेष्ठ आहे ) ॥ १ ॥

**यो ह वै कश्चिज्ज्येष्ठं च प्रथमं वयसा श्रेष्ठं च गुणैरभ्यधिकं वेद स ज्येष्ठश्च ह वै श्रेष्ठश्च भवति । फलेन पुरुषं प्रलोभ्याभिमुखीकृत्याऽऽह—प्राणो वाव ज्येष्ठश्च वयसा वागादिभ्यः । गर्भस्थे हि पुरुषे प्राणस्य वृत्तिर्वागादिभ्यः पूर्वं लब्धात्मिका भवति यया गर्भो विवर्धते । चक्षुरादिस्थानावयवनिष्पत्तौ सत्यां पश्चाद्वागादीनां वृत्तिलाभ इति प्राणो ज्येष्ठो वयसा भवति श्रेष्ठत्वं तु प्रतिपादयिष्यति सुहय इत्यादिनिदर्शनेन । अतः प्राण एव ज्येष्ठश्च श्रेष्ठश्चास्मिन्कार्यकरणसंघाते ॥ १ ॥**

सिद्धान्ती—वयानें जो प्रथम असतो, जो वयोवृद्ध असतो, तो ज्येष्ठ होय. गुणधर्मानें जो सर्वेतोपरि अधिक असतो, तो श्रेष्ठ होय. अशा वयोवृद्ध व गुणाधिक वस्तूचें ज्ञानविज्ञान ज्या पुरुषाला प्राप्त होतें तो पुरुषही स्वतः ज्येष्ठ व श्रेष्ठ होतो. प्राणज्ञानाचें व प्राणोपासनेचें हें असें फल आहे.

शिष्य०—जीवांनीं प्राणस्वरूप समजून घ्यावें व तद्गुणोपासना करावी, एतदर्थ श्रुतीनें प्राणज्ञानाचें व तदुपासनेचें फल प्रथमच सांगून टाकिलें, हें चांगलें केलें. कार्यफल दिसल्याविना जीवांची कार्यप्रवृत्तिच होत नाहीं.

सिद्धांती—जीवाला ज्ञानोन्मुख करवून त्यांचें कल्याण करणाऱ्या श्रुतीचें दयाघनत्व काय वर्णावें ? असो; श्रुति पुढें म्हणते; वाक्, चक्षु, इत्यादिकांमध्यें प्राण हाच वयानें ज्येष्ठ आहे.

पूर्व०—कां बरें ? देहप्राप्ति झाल्यानंतर, नव्हे गर्भावस्थेंतसुद्धां प्राणाच्या उद्भवाबरोबरच इंद्रियांचाही उद्भव होऊन प्राणाप्रमाणेंच हीं इंद्रियें आपआपलीं कर्में जीवाच्या गर्भावस्थेंतही करीत असतात, असा अनुभव आहे.

सिद्धांती—नाहीं. प्राणाचें अस्तित्व प्रथम स्थापन होतें व मग इंद्रियांचें. ज्या प्राणवृत्तीमुळें गर्भाची स्थापना झाल्यानंतर त्याचीच वृद्धि होते, तें प्राणकर्म वाणीआदि इंद्रियांच्या कर्माच्या पूर्वींच प्रारंभित झालेलें असतें.

पूर्व०—कशावरून ?

सिद्धांती—प्राणस्थापनेनंतर नेत्रादि स्थानांची व अवयवांची उत्पत्ति होते; व तदनंतर वाणी आदि इंद्रियांचा उद्भव होऊन मग त्यांचे कर्माला आरंभ होतो. तात्पर्य, गर्भस्थापनेसह प्राणस्थापना, नंतर देहांचे गोलक व अवयव आणि नंतर इंद्रियांची स्थापना अथवा उद्भव, असा क्रम आहे, अर्थात् प्राण हा वयानें सर्वज्येष्ठ आहे यांत शंका नाहीं. आतां प्राणाचें श्रेष्ठत्व श्रुति पुढच्या ११ व्या मंत्रांत सिद्ध करणार आहे. असो; तेव्हां या देहात्मक कार्यकरणसंघातामध्यें प्राण हा ज्येष्ठ असून पुनः गुणश्रेष्ठ आहे असें ठरलें.

पूर्व०—अकरावा मंत्र सिद्ध झाला, म्हणजे मग आम्हांच म्हणूं कीं ज्येष्ठ व श्रेष्ठ असणारा जो प्राण तो उपास्य आहे; कारण श्रेष्ठ उपासनेचें फलही श्रेष्ठ असते.

सिद्धांती—ठीक आहे. गुणश्रेष्ठत्वाच्या तयारीलाच लागूंया ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**यो ह वै वसिष्ठं वेद वसिष्ठो ह स्वानां भवति वाग्वाव वसिष्ठः ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः—यः ह वै वसिष्ठं वेद, स्वानां वसिष्ठः भवति ह** ( वसिष्ठ ह्मणजे सर्वांचें आच्छादन करणारा. असो; वसिष्ठाचें ज्ञान-विज्ञान असणारा पुरुष स्वज्ञातीमध्यें वासिष्ठ होतो ) **वाक् वाव वसिष्ठः** ( वाणी ही खरोखर वसिष्ठ होय ) ॥ २ ॥

यो ह वै वसिष्ठं वसितृतममाच्छादयितृतमं वा यो वेद स तथैव वसिष्ठो ह भवति स्वानां ज्ञातीनाम्। कस्तर्हि वसिष्ठ इत्याह। वाग्वाव वसिष्ठ वाग्मिनो हि पुरुषा वसन्त्यभिभवन्त्यन्यान्वसुमत्तमाश्चातो वाग्वासिष्ठः ॥ २ ॥

सिद्धांती—सर्वांचें आच्छादन करणारी, सर्वांस वस्त्रविभूषित करणारी किंवा सर्वांपेक्षां धनिक असणारी वस्तू, ती वसिष्ठ होय. या वसिष्ठवस्तूचें उपासनाद्वारानें ज्ञानविज्ञान करून घेणारा पुरुष तद्रूप होतो. म्हणजे आपल्या ज्ञातींत तो श्रेष्ठ ठरतो.

शिष्य—धनदानानें सर्वांचा योगक्षेम चालविणारा पुरुष ज्ञातिश्रेष्ठ होतो, यांत काय नवल आहे? बरें? या प्रकरणीं वसिष्ठ कोण?

सिद्धांती—ऐका. वाणी हीच वसिष्ठ होय.

पूर्व०—कां?

**सिद्धांती—**कारण वाचस्पतित्व किंवा धनपतित्व असणारे पुरुष मात्र इतरांस आच्छादून टाकितात. म्हणजे इतरांचा पराभव करण्याला समर्थ असतात. वाणीचें प्रभुत्व प्राप्त झालेल्या पुरुषापुढें इतर लोक हतप्रभ होतात, तसेंच जो वचनाचा खंबीर आहे, त्याच्याच जवळ श्रीचें वास्तव्य असतें. श्रीची वसति झाली कीं, आश्रित गोळा झालेच समजा! धनिक पुरुष सर्वांचा पोषक होतो. हा अनुभव नित्य येतो; म्हणून वाणीचा वसिष्ठत्व हा नित्य सिद्ध गुण आहे ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**यो ह वै प्रतिष्ठां वेद प्रति ह तिष्ठत्यस्मिꣳश्च लोकेऽमुष्मिꣳश्च चक्षुर्वाव प्रतिष्ठा ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थः—यः ह वै प्रतिष्ठां वेद, अस्मिन् च अमुष्मिन् च लोके प्रतितिष्ठति ह** ( ज्यानें प्रतिष्ठेचें ज्ञानविज्ञान करून घेतलें आहे, तो ह्या व स्वर्गलोकीं प्रतिष्ठित होतो ) **चक्षुः वाव प्रतिष्ठा** ( खरोखर चक्षुच प्रतिष्ठा होय ) ॥ ३ ॥

यो ह वै प्रतिष्ठां वेद स चास्मिल्लोकेऽमुष्मिंश्च परे प्रतितिष्ठति ह । का तर्हि प्रतिष्ठेत्याह । चक्षुर्वाव प्रतिष्ठा । चक्षुषा हि पश्यन्समे च दुर्गे च प्रतितिष्ठति यस्मादतः प्रतिष्ठा चक्षुः ॥ ३ ॥

**सिद्धांती—**ध्यानासाठीं दुसरा गुण सांगतात. ज्याला प्रतिष्ठेचें म्हणजे आधारस्थानाचें किंवा अधिष्ठानाचें पूर्ण ज्ञानविज्ञान होतें, तो ह्या मर्त्यलोकीं व त्या स्वर्गलोकीं प्रतिष्ठित होतो.

**शिष्य—** येथें प्रतिष्ठा कोणती; असें विचारल्यास नेत्र हीच प्रतिष्ठा, असें म्हटलें पाहिजे. होय कीं?

**सिद्धांती—**होय. कारण नेत्र स्वकार्यक्षम असतील तरच चांगलें स्थान कोणतें, अवघड कोणतें, सरळ व गुळगुळीत वाट कोणती, आड वाट व खडबडीत वाट कोणती, हे ध्यानांत येतें. म्हणून चक्षु हीच प्रतिष्ठा होय ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा.

**यो ह वै संपदं वेद स हास्मै कामाः पद्यन्ते दैवाश्च मानुषाश्च श्रोत्रं वाव संपत् ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थः—यः ह वै संपदं वेद, अस्मै दैवाः च मानुषा च कामाः संपद्यंते ह; श्रोत्रं वाव संपत्** ( ज्याला संपत्तीचें यथार्थज्ञान असतें, त्याचे दैवी व मानवी सर्व काम सिद्ध होतात. खरोखर पाहतां कर्ण हीच संपत्ति आहे ) ॥ ४ ॥

यो ह वै संपदं वेद तस्मा अस्मै दैवाश्च मानुषाश्च कामाः संपद्यन्ते ह । का तर्हि संपादित्याह ।श्रोत्रं वाव संपत् । यस्माच्छ्रोत्रेण वेदा गृह्यन्ते तदर्थविज्ञानं च ततः कर्माणि क्रियन्ते ततः कामसंपदित्येवं कामसंपद्धेतुत्वाच्छ्रोत्रं वाव संपत् ॥ ४ ॥

**सिद्धान्ती—**आणखी एक गुण पहा. ज्याला संपत्तीचें ( सिद्धीचें ) मुख्य अधिष्ठान, ज्ञानविज्ञान होतें, त्याचे सर्व ऐहिक व पारलौकिक मनोरथ पूर्ण होतात. आतां संपत्तीचें अधिष्ठान कोणतें ह्मणून विचाराल तर श्रुति सांगते. ऐका; कर्ण हें संपत्तीचें मूलस्थान आहे; कारण, कर्णद्वारानेंच मुख्यतः वेदोराशीचें ग्रहण होतें. वेदाचा सांगोपांग अर्थही कर्णसाह्यानें समजतो. वेदविहित विधिविधानांचें व फलाचें यथार्थ ज्ञान झालें ह्मणजे योग्य कर्मप्रवृत्ति आणि शास्त्रोक्त कर्मसिद्धीनंतर अमित द्रव्य मिळून मनोरथासिद्धि होते. याप्रमाणें मनोरथसिद्धीचें मूलस्थान कर्णद्वय आहे. ह्मणून श्रुतीनें कर्णास ' संपत् ' असें संबोधिलें आहे. समजलें ? ॥ ४ ॥

---

## मंत्र पांचवा.

**यो ह वा आयतनं वेदाऽऽयतनꣳ ह स्वानां भवति मनो ह वा आयतनम् ॥ ५ ॥**

**अन्वय व अर्थः—यः ह वै आयतनं वेद, स्वानां आयतनं भवति ह; मनः ह वै आयतनं** ( ज्याला आयतनाचें संपूर्ण ज्ञान होतें, तो आपल्या गणगोताचें आश्रयस्थान होतो. वास्तविक पाहतां मन हेंच आयतन आहे ) ॥ ५ ॥

यो ह वा आयतनं वेदाऽऽयतनं ह स्वानां भवत्याश्रयो भवतीत्यर्थः । किं तदायतनमित्याह । मनो ह वा आयतनम् । इन्द्रियोपहृतानां विषयाणां भोक्त्रर्थानां प्रत्ययरूपाणां मन आयतनमाश्रयः । अतो मनो ह वा आयतनमित्युक्तम् ॥ ५ ॥

**सिद्धान्ती**—येथील शेवटचा गुण आतां सांगतात. सर्वाश्रयाचें ज्याला शास्त्रोक्त ज्ञानविज्ञान होतें, तो आपल्या बंधुबांधवाचा आश्रय होतो. येथें आयतन ( आश्रयस्थान ) कोणतें ? असें विचाराल तर पहाः— मन हें सर्वांचें आश्रयस्थान आहे, कारण उपभोगासाठीं किंवा स्वरूपज्ञानासाठीं प्रतिष्ठापित केलेले विषयांस इंद्रियें प्रकटितात. त्या ह्या सर्व इंद्रियप्राप्त विषयांस आश्रय देणारें मन हेंच आहे. कोणत्याही इंद्रियानें पुढें आणलेल्या दृश्य किंवा भोग्य विषयाचें नामरूप मनानें मात्र संग्राहित होतें, अर्थात् मन हेंच सर्वाश्रय आहे; म्हणून मनाला आयतन हें नांव दिलें.

याप्रमाणें **वाणी** वसिष्ठ, **नेत्र** प्रतिष्ठा, **कर्ण** संपत्, आणि **मन** आयतनें होत, असें इंद्रियांचें गुणवर्णन झालें ॥ ५ ॥

---

## मंत्र सहावा.

**अथ ह प्राणा अहँ श्रेयसि व्यूदिरेऽहँ श्रेयानस्म्यहँ श्रेयानस्मीति ॥ ६ ॥**

**अन्वय व अर्थः—अथ ह ' अहं श्रेयान् अस्मि ' ' अहं श्रेयान् अस्मि ' इति अहंश्रेयसि प्राणाः व्यूदिरे ह** ( एकदां मी सर्वश्रेष्ठ आहे, ' ' मी सर्व श्रेष्ठ आहे ' असा अहंविशेषत्वाचा वाद-विवाद प्राण, वाणी, नेत्र, कर्ण आणि मन यांच्यामध्यें सुरू झाला ) ॥ ६ ॥

अथ ह प्राणा एवं यथोक्तगुणाः सन्तोऽहंश्रेयसि अहं श्रेयानस्म्यहं श्रेयानस्मीत्येतस्मिन्प्रयोजने व्यूदिरे नाना विरुद्धं चोदिर उक्तवन्तः ॥ ६ ॥

**सिद्धान्ती**—याप्रमाणें—

**पूर्व०**—पण काय हो ? प्राणाचें श्रेष्ठत्व सांगण्याचे ऐवजीं तुम्ही वाणीप्रभृतींचे गुण काय सांगत बसलांत ?

**शिष्य**—वाणी-नेत्रादिकांचे स्वगुण प्राणोपजीवी मात्र आहेत, हें शेवटीं सांगण्यासाठीं वरील प्रतिपादन आहे. तसेंच, इंद्रियांचे स्वगुण प्राणोत्पन्न आहेत, हें मनांत

बिंबविण्यासाठीं श्रुतीनें एका मनोरंजक गोष्टीला आरंभ केला आहे. ऐका:—प्राण, वाणी, नेत्र इत्यादिकांस श्रुतीनें 'प्राण' हें नांव दिलें आहे. असो; आपआपल्याला एक विशेष वरिष्ठ गुण आहे, असें पाहून प्रत्येक प्राण ह्मणूं लागला कीं 'मी श्रेष्ठ आहें,' 'मी श्रेष्ठ आहें.' अर्थात् श्रेष्ठत्वासंबंधानें वादविवाद सुरू झाला. वादविवादांत विरुद्ध आक्षेप निघावयाचेच. तेव्हां 'इंद्रियां, इंद्रियां लागलें भांडण' अशी स्थिति झाली. प्रत्येकाला 'अहं विशेषः' असें वाटूं लागलें कीं, तंटा सुरू झालाच ह्मणा ॥ ६ ॥

---

## मंत्र सातवा.

**ते ह प्राणाः प्रजापतिं पितरमेत्योचुर्भगवन्को नः श्रेष्ठ इति तान्होवाच यस्मिन्व उत्क्रान्ते शरीरं पापिष्ठतरमिव दृश्येत स वः श्रेष्ठ इति ॥ ७ ॥**

**अन्वय अर्थः—ते ह प्राणाः पितरं प्रजापतिं एत्य ऊचुः** ( नंतर सर्वपिता जो प्रजापति त्याकडे प्राणादि सर्व वादी गेले व विचारते झाले ) **भगवन् नः कः श्रेष्ठः इति** ( 'भगवन् ! आह्मांपैकीं सर्वश्रेष्ठ कोण तें सांगावें ) **वः यस्मिन् उत्क्रान्ते शरीरं पापिष्ठतरं इव दृश्येत सः-वः-श्रेष्ठ इति तान् उवाच ह** ( तुमच्यांपैकीं जो कोणी जीव—शरीर सोडून गेला असतां तें शरीर कुणपासारखें, प्रेतासारखें दिसेल, तो मात्र तुह्मांमध्यें सर्वश्रेष्ठ आहे, असें जाणा. असें प्रजापतीनें उत्तर दिलें ) तात्पर्य, ज्याच्या अस्तित्वाशिवाय शरीरयात्राच चालत नाहीं, तो सर्वश्रेष्ठ, असा प्रजापतीचे सांगण्याचा भाव आहे; ॥ ७ ॥

ते ह ते हैवं विवदमाना आत्मनः श्रेष्ठत्वविज्ञानाय प्रजापतिं पितरं जनयितारं कंचिदेत्योचुरुक्तवन्तो हे भगवन्को नोऽस्माकं मध्ये श्रेष्ठोऽभ्यधिको गुणैरित्येवं पृष्टवन्तः । तान्पितोवाच ह यस्मिन्वो युष्माकं मध्य उत्क्रान्ते शरीरमिदं पापिष्ठमिवातिशयेन जीवतोऽपि समुत्क्रान्तप्राणं ततोऽपि पापिष्ठतरमिवातिशयेन दृश्येत कुणपमस्पृश्यमशुचि दृश्येत स वो युष्माकं श्रेष्ठ इत्यवोचत्काकातद्दुःखं परिजिहीर्षुः ॥ ७ ॥

**सिद्धान्ती**—याप्रमाणें प्राणासह सर्व इंद्रियें वादविवाद करीत राहिलीं. पण वाद तुटेना. तेव्हां आपणांपैकीं श्रेष्ठ कोण याचा निर्णय करून घेण्यासाठीं सर्वपितर जो प्रजापति त्याकडे हे वादीप्रतिवादी गेले.

**शिष्य**·भगवन्! कश्यपादि अनेक प्रजापती आहेत. नव्हे ?

**सिद्धान्तीः**—होय. त्यांपैकीं कोणाकडे तरी ही सर्व मंडळी गेली. कोणी न्याय केला, हा येथें महत्त्वाचा प्रश्न नाहीं, न्याय कसा झाला, हें आपल्यास पाहावयाचें आहे. असो; कश्यप असो वा मरीचि असो, कोणा तरी अधिकारी व सर्वजनक ज्ञात्याजवळ हे सर्वजण गेले; आणि त्यास विचारिते झाले 'भगवन्' आमच्यांपैकीं श्रेष्ठ कोण, या प्रश्नाचा उलगडा कृपा करून करावा. गुणानें सर्वांत अधिक कोण आहे, हें आह्मांस सांगावें.' हा त्यांचा प्रश्न ऐकून त्यांचा पिता उत्तर देता झाला. 'वत्सानो! हें तुमचें शरीर स्वरूपतःच अतिशय पापी ह्मणजे पापकर्मे घडवून आणणारें आहे. जिवंत मनुष्याचें शरीरसुद्धां वेदमर्यादा अतिक्रांत करून पापकर्मांची प्रवृत्ति करणारें आहे. पण ह्याच्यापेक्षां अत्यंत मलिन, स्पर्शाला अपात्र, असें कुणप असतें. तेव्हां निःप्राण शरीरासारखेंच स्वरूप (प्रेतस्वरूप) तुमच्यांपैकीं ज्या कोणाच्या अभावीं प्राप्त होईल, तुमच्यांपैकीं जो कोण नसला ह्मणजे जीवशरीराला अत्यंत अमंगल प्रेतकला प्राप्त होईल, तो तुह्मां सर्वांमध्यें श्रेष्ठ आहे, हें समजा.

**शिष्य**—ज्याच्या अस्तित्वाव्यतिरिक्त शरीराला स्वकर्म करण्याचें सामर्थ्य राहत नाहीं व त्याला प्रेतकळा येते, तो वादी सर्वश्रेष्ठ होय, असें पित्याला सांगावाचें आहे.

**पूर्व०**—हा असा द्राविडी प्राणायाण कां? प्रजापतीनें स्पष्टच कां नाहीं दिलें उत्तर ?

**सिद्धान्ती**—स्पष्ट उत्तर दिलें असतां एकावाचून सर्वांस दुःख होईल, हें प्रजापतीला विदित होतें. शिवाय, श्रेष्ठत्व हें गुणावर अवलंबून आहे, नुसत्या स्थानावर किंवा कुलावर नाहीं, हें वादींच्या अनुभवास आणून द्यावयाचें होतें प्रजापतीला. तेव्हां त्यानें काकर्थानें, अर्थप्रचुर स्वरादि भंगानें, श्रेष्ठ कोण हें सुचविलें मात्र आहे. श्रेष्ठ कोण, हें आतां ठरेलच ॥ ७ ॥

---

## मंत्र आठवा.

**सा ह वागुच्चक्राम सा संवत्सरं प्रोष्य पर्येत्योवाच कथमशकततें मज्जीवितुमिति यथा कला अवदन्तः प्राणन्तः प्राणेन पश्यन्तश्चक्षुषा शृण्वन्तः श्रोत्रेण ध्यायन्तो मनसैवमिति प्रविवेश ह वाक् ॥ ८ ॥**

**अन्वय व अर्थः—सा ह वाक् उच्चक्राम; सा संवत्सरं प्रोष्य पर्येत्य उवाच** (नंतर प्रथम ती वाणी शरीर सोडून गेली, बाहेर एक वर्ष-भर राहिली; आणि पुनः परत येऊन सर्वांस ह्मणाली ) **मदृते कथं जीवितं अशकत ' इति** ( माझ्याशिवाय तुह्मी सर्वजण कस जगूं शकला तें सांगा ) ते ह्मणालेः—**यथा अवदन्तः कलाः प्राणेन प्राणन्तः, श्रोत्रेण शृण्वन्त; मनसा ध्यायन्त एवं इति** ( ज्याप्रमाणें बोलण्यास असमर्थ असणारे मुके लोक प्राणसाह्यानें जगतात, डोळ्यानें पाहतात, कानानें ऐकतात, मनानें चिंतन कारितात त्याप्रमाणें आह्मी ही तुझ्या शिवाय जिवंत राहूं शकलों; व स्वव्यापार करीत होत्साते शरीरस्थिति ठेवित होतों )—हें ऐकून—**वाक् प्रविवेश ह** ( वाणीनें शरीरांत प्रवेश केला ) तात्पर्य; वाणीशिवाय शरीर जगतें, शरीरस्थिति उत्तम चालते, वाणीवांचून शरीराचें अडत नाहीं, असें वाणीस समजलें आणि तिनें श्रेष्ठत्वाचा नाद सोडून दिला ॥ ८ ॥

---

## मंत्र नववा.

**चक्षुर्होच्चक्राम तत्संवत्सरं प्रोष्य पर्येत्योवाच-कथमशकतर्ते मज्जीवितुमिति यथाऽन्धा अपश्यन्तः प्राणन्तः प्राणेन वदन्तो वाचा शृण्वन्तः श्रोत्रेण ध्यायन्तो मनसैवमिति प्रविवेश ह चक्षुः ॥ ९ ॥**

**अन्वय व अर्थः—चक्षुः ह उच्चक्राम; तत् संवत्सरं प्रोष्य पर्येत्य उवाच; ' मदृते कथं जीवितुं अशकत, इति; यथा अपश्यन्तः अन्धाः प्राणेन प्राणन्तः, वाचा वदन्तः, श्रोत्रेण शृण्वन्तः, मनसा ध्यायन्तः; एवं ' इति; चक्षुः प्रविवेश ह** ( वरप्रमाणेंच अर्थ. चक्षूशिवाय ही जीवास जगतां, बोलतां, ऐकतां व मनन करितां येतें हें येथें दाखविलें आहे ) तात्पर्य, चक्षूशिवाय शरीराचें अडत नाहीं, हें ठरलें ॥ ९ ॥

---

### मंत्र दहावा.

श्रोत्रꣳ होच्चक्राम तत्संवत्सरं प्रोष्य पर्येत्योवाच कथमशकतर्ते मज्जीवितुमिति यथा बधिरा अशृण्वन्तः प्राणन्तः प्राणेन वदन्तो वाचा पश्यन्तश्चक्षुषा ध्यायन्तो मनसैवमिति प्रविवेश ह श्रोत्रम् ॥ १० ॥

अन्वय व अर्थः—श्रोत्रं ह उच्चक्राम; तत् संवत्सरं प्रोष्य पर्येत्य उवाच; ' कथं मदृते जीवितुं अशकत इति; ' यथा अशृण्वन्तः बधिराः प्राणेन प्राणन्तः, वाचा वदन्तः, चक्षुषा पश्यन्तः, मनसा ध्यायन्तः, एवं ' इति; श्रोत्रं प्रविवेश ह ( अर्थ पूर्वीप्रमाणें. येथें ही कर्णाव्यतिरिक्त शरीरव्यापार सुव्यवस्थित चालतात असें दाखविलें ) तात्पर्य, कर्ण नसले, ह्मणून शरीराचें अडतें असें नाहीं, हें निश्चित झालें. ॥ १० ॥

---

### मंत्र अकरावा.

मनो होच्चक्राम तत्संवत्सरं प्रोष्य पर्येत्योवाच कथमशकतर्ते मज्जीवितुमिति यथा बाला अमनसः प्राणन्तः प्राणेन वदन्तो वाचा पश्यन्तश्चक्षुषा शृण्वन्तः श्रोत्रेणैवमिति प्रविवेश ह मनः ॥ ११ ॥

अन्वय व अर्थः—मनः उच्चक्राम ह; तत् संवत्सरं प्रोष्य पर्येत्य उवाच; ' मदृते जीवितुं कथं अशकत ' इति; ' यथा अमनसः बालाः प्राणेन प्राणन्तः, वाचा वदन्तः, चक्षुषा पश्यन्तः, श्रोत्रेण शृण्वन्तः, एवं ' इति; मनः प्रविवेश ह ( अर्थ मागल्या प्रमाणें ) मनाव्यतिरिक्त शरीर सुस्थित राहतें, असें या मंत्रांत निर्दिष्ट केलें. तात्पर्य मनावांचूनही शरीराचें अडत नाहीं, हें प्रमाणतः सिद्ध झालें ॥ ११ ॥

तथोक्तेषु पित्रा प्राणेषु सा ह वागुच्चक्रामोत्क्रान्तवती । सा चोत्क्रम्य संवत्सरमात्रं प्रोष्य स्वव्यापारान्निवृत्ता सती पुनः पर्येत्येतरान्प्राणानुवाच कथं केन प्रकारेणाशकत शक्तवन्तो यूयं मदृते मां विना जीवितुं धारयितुमात्मानमिति ते होचुर्यथा कला इत्यादि । कला मूका यथा लोकेऽवदन्तो वाचा जीवन्ति । कथम् । प्राणन्तः प्राणेन पश्यन्तश्चक्षुषा शृण्वन्तः श्रोत्रेण ध्यायन्तो मनसैवं सर्वकरणचेष्टां कुर्वन्त इत्यर्थः । एवं वयमजीविष्मेत्यर्थः । आत्मनोऽश्रेष्ठतां प्राणेषु बुद्ध्वा प्रविवेश ह वाक्पुनः स्वव्यापारे प्रवृत्ता बभूवेत्यर्थः । समानमन्यच्चक्षुर्होच्चक्राम श्रोत्रं होच्चक्राम मनो होच्चक्रामेत्यादि । यथा बाला अमनसोऽप्ररूढमनस इत्यर्थः ॥ ८ ॥ ९ ॥ १० ॥ ११ ॥

सिद्धान्ती—प्रत्यक्ष प्रयोगानें सिद्ध होणारा हा निर्णयाचा प्रजापत्युक्त उपाय ऐकून प्राणादिकांनीं पितृकथित उपायाचा प्रयोग करून पाहण्याचें ठरविलें. प्रथमतः वाणीची पाळी ठरली. तेव्हां शरीरसंघाताचा त्याग तिनें केला; आणि वर्षभर बाहेर राहिली. तात्पर्य आपल्या व्यापारापासून ती वर्षभर परावृत्त झाली. वर्षभर बोलण्याचें काम थांबलें.

शिष्य०—आपल्याशिवाय शरीरसंघाताचे व्यापार खास अडतील, शरीर प्रेतवत् होईल, असें वाणीस वाटल्यामुळें व तेंच इतरांच्या प्रत्ययाला आणून देण्यासाठीं वाणीनें आपला व्यापार स्तब्ध केला, इतकाच अर्थ समजून घ्यावयाचा आहे, वर्षभर ह्मणजे अडत नाहीं इतकेंच ठरण्यास जो काल लागेल तेथपर्यंत इतरांस कळलें होतें, होय ना ?

सिद्धांती--होय, पण ' अडत नाहीं ' हें इतरांस कळलें होतें, वाणीस मात्र कळलें नव्हतें; असो; माझ्या अस्तित्वाशिवाय शरीराला प्रेतस्वरूप प्राप्त झालें असेल, असें समजणारी वाणी जेव्हां फिरून परत आली, तेव्हां तिला दिसलें कीं शरीर सुस्थित असून त्याचे व्यापार पूर्ववत् चालले आहेत ! तिला सखेद चमत्कार वाटला; आणि ती इतरांस लीनतेनें विचारूं लागली ' अरे मित्रांनो ! माझ्याविना तुह्मी जगण्याला समर्थ कसें झालां ?

शिष्य०—आपल्याशिवाय नाकाडोळा वगैरेचें कांहींच चालणार नाहीं तें मृतवत् होतील, असें वाणीला वाटलें होतें ना ?

सिद्धांती--यांत काय संशय ? प्रत्येक अतिरिक्त अभिमानी पुरुषाला वाटत असतें कीं, माझ्याशिवाय जगताचें अडेल ! असो; इतरांनीं उत्तर दिलें ' बाई ! व्यवहारांत ज्याप्रमाणें मुख्य प्राणाच्या साह्यानें लोक जगतात डोळ्यानें पाहतात, कानानें ऐकतात, मनानें विषयचिंतन करितात, सारांश बोलतां येत नसलें

तरी जिवाचे जिवंतपणीचे इतर सर्व व्यापार ठाकसे ठीक चालतात. तूं नव्हतीस तरी आमचें कांहीं कमी पडलें नाहीं. आमच्यापैकीं प्रत्यकाचें सर्व व्यापार यथापूर्व चालत होते, आहेत व पुढेंही चालतील.

**पूर्व०**--पण मुकीं माणसें बहिरीं असतात नव्हे ?

**सिद्धांती**--असा कांहीं सर्वसाधारण नियम नाहीं. शिवाय वाणीनें आपला व्यापार स्तब्ध ठेविला तरी इतर इंद्रियाचे व्यापार यथास्थित चालतात इतकाच विषय येथें घ्यावयाचा आहे. असो; याप्रमाणें ' श्रेष्ठत्वाची पद्वी आपल्यास लाभणें शक्य नाहीं, आपली योग्यताच तशी नाहीं, हें वाणीच्या प्रत्ययास आलें, ती विराम पावली, विरमली आणि तिनें पुनः शरीरांमध्यें प्रवेश केला.

**शिष्य०**--तात्पर्य, ती पहिल्यासारखी आपल्या कामावर पुनः रुजु झाली. भगवन् ! वाणीप्रमाणेंच चक्षु, श्रोत्र, मन इत्यादिकांची ही खातरजमा झाली असली पाहिजे, असें मंत्रांच्या अन्वयार्थावरून स्पष्ट दिसत आहे. एवंच, वाणी चक्षु, कर्ण किंवा मन ह्यांपेकीं कोणालाही सर्वश्रेष्ठत्व मिळालें नाहीं व प्रत्येकाच्या अभावीं जीव यथापूर्व जगतात, हें ठरलें.

**पूर्व०**--पण काय हो ! मनच नाहीं, अशीं बालकें आह्मी तर नाहीं पाहिलीं !

**सिद्धांती**--' अमनसः ' याचा ' मन नसणारे ' असाच नाहीं येथें अर्थ करावयाचा ! तर ' अप्रबुद्ध ' इतकाच त्या शब्दाचा अर्थ येथें करावयाचा आहे, शिवाय गाढ झोपेंत आपण सर्वजण अमनस्कच असतों, तथापि शरीर सुस्थितच असतें. अहो ! मनच काय पण प्राणाशिवाय सर्व इंद्रियें व सर्व अवयव स्तब्ध झाले तरी शरीराला प्रेतवत्ता येत नाहीं, हें नित्य प्रत्ययास येत नाहीं काय ? विचार न करणारी माणसें जगतात हा तर रोजचा अनुभव आहे ॥८॥९॥१०॥११॥

---

## मंत्र बारावा.

**अथ ह प्राण उच्चिक्रमिषन्स यथा सुहयः पड्वीशशङ्कून्संखिदेदेवमितरान्प्राणान्समखिदत्तꣳ हाभिसमेत्योचुर्भगवन्नेधि त्वं नः श्रेष्ठोऽसि मोत्क्रमीरिति ॥ १२ ॥**

**अन्वय व अर्थः**—**अथ प्राणः ह उच्चिक्रमिषन्** ( नंतर प्राणानें घाट घातला कीं आपण शरीर सोडून बाहेर जावें ) **यथा सुहयः पड्वीशशङ्कून् संखिदेत्**(ज्याप्रमाणें गमन करण्यांत पटाइत असणारा जवान घोडा आपल्या

पायास अडविणाऱ्या खुंट्यांस गदगद हालवून पाडून टाकितो) एवं त्याप्रमाणें **सः इतरान् प्राणान् समखिदत्** ( प्राणानें इतर वाणी आदि प्राणांस उपटून काढण्याचा, त्यांस हतप्रभ करण्याचा प्रभाव उत्पन्न करीत आहे असें झालें ) **तं ह अभिसमेत्य ऊचुः** ( ते हतबल झालेले वाणी, नेत्र, कर्ण वमन मिळून त्याकडे आले आणि ह्मणाले: ) **भगवन् एधि** ( भगवंता ! तूं आमचा स्वामी हो.)**सः्ये त्वं नः श्रेष्ठः असि** (तूं आह्मां सर्वांत श्रेष्ठ आहेस ) **मा उत्क्रमीः** ( शरीर सोडून बाहेर जाऊं नकोस ) **इति** ( याप्रमाणें बोलून इतरांनीं प्राणाचें श्रेष्ठत्व कबूल केलें ) तात्पर्य, प्राण बाहेर जाऊं लागतांक्षणीं सर्व इंद्रियावयवांस व शरीरास प्रेतकळा येऊं लागली. अर्थात्, प्राणाशिवाय प्रत्येक इंद्रियाचें, अवयवाचें व शरीरसंघाताचें अडतें असें झालें. याप्रमाणें प्रजापतीनें सांगितलेल्या उपायानें ' प्राण हा सर्वश्रेष्ठ आहे ' असें प्रत्यक्षप्रमाणानें ठरलें ॥ १२ ॥

**एवं परीक्षितेषु वागादिष्वथानन्तरं ह स मुख्य प्राण उच्चिक्रमिषन्नुत्क्रमितुमिच्छान्किमकरोदित्युच्यते । यथा लोके सुहयः शोभनोऽश्वः पड्वीशशङ्कून्पादबन्धनकीलान्परीक्षणायाऽऽरूढेन कशया हतः सन्संखिदेत्समुत्खनेत्समुत्पाटयेत्, एवमितरान्वागादीन्प्राणान्समखिदत्समुद्धृतवान् । ते प्राणाः संचालिताः सन्तः स्वस्थाने स्थातुमनुत्सहमाना अभिसमेत्य मुख्यं प्राणं तमूचुर्हे भगवन्नेधि भव नः स्वामी यस्मात्त्वं नोऽस्माकं श्रेष्ठोऽसि मा चास्माद्देहादुत्क्रमीरिति ॥ १२ ॥**

**सिद्धांती**--याप्रकारें आताच सांगितल्याप्रमाणें वागादि इंद्रियांची परीक्षा होऊन काय सिद्धांत झाला, हें आपण पाहिलें. या सर्वांच्या पाठीमागून प्राणाची पाळी आली. तेव्हां जीवाचें अधिष्ठान असणाऱ्या मुख्य प्राणानें शरीरांतून बाहेर जाण्याचा संकल्प केला व तो संकल्प सार्थ करणार तों एक चमत्कार घडला अहो! एखादा सुंदर व तेजस्वी अश्व असावा व तो कसा आहे याची परीक्षा घेणाऱ्या अश्वपरीक्षक वीरानें त्याच्या पाठीवर चाबूक ओढला, ह्मणजे तो जवान घोडा जसा आपले पायबंद तोडतो; व पायबंदाच्या खुंट्या उपटून टाकितो--

**शिष्य०**--पड्वीशशङ्कून् ह्मणजे ?

**सिद्धांती**--मार्गक्रमण करणें हा ज्यांचा स्वभाव ते पाद (चरण) त्यांचा समुदाय त्याला पड्वी ह्मणावें; ह्या पड्वीला ह्मणजे पायांना निर्बंध करणारे ते पड्वीश होत. तात्पर्य पड्वीशशंकू ह्मणजे पाठीमागच्या व पुढच्या खुंट्या ! असो; या शंकुचें एकदम उत्पाटन दारुण व तेजस्वी अश्व करितो. या अश्वाप्रमाणेंच बाहेर उडी टाकण्याचा विचार करणारा प्राण उडीचें अवसान घेत आहे, तोंच वाणीप्रमुख इंद्रियादिकांचा आधार तुटून त्यांचेही व्यापार प्राणव्यापाराबरोबर स्तब्ध होण्याचा रंग दिसूं लागला. प्राण उत्क्रांत होऊं लागतांच इतरांचें उच्चाटण होऊं लागलें. याप्रमाणें स्थानभ्रष्ट होऊं लागणारे व प्राणाव्यतिरिक्त जिवंत राहणें शक्य नाहीं, असें निश्चयानें कळून चुकलेले वाणीप्रमुख प्राण मुख्य प्राणाजवळ एकत्र जमले आणि ह्मणाले: ' हे भगवंता ! इकडे ये. तूं आमचा स्वामी हो. आह्मी तुझें स्वामित्व कबूल करितों. तुझ्याशिवाय आह्मांस गती नाहीं. ह्मणून तूं आह्मां सर्वांस श्रेष्ठ आहेस. कृपा कर आणि बाहेर जाऊं नकोस.

**शिष्य०**--याप्रमाणें प्राणाचें श्रेष्ठत्व कायम झालें. वाणीची वसिष्ठता, चक्षूची प्रतिष्ठा, कर्णाची संपन्नता मनाचे सर्वाश्रयत्व हे सर्व गुण प्राणाच्या अमूल्य संधानानें आपले स्वरूप प्रकट करितात, असें ठरलें, तात्पर्य; प्राण सर्वाधार आहे, ह्मणून सर्वश्रेष्ठ आहे, असें समजावें-

**सिध्दांती**--पुढें चला ॥ १२ ॥

---

## मंत्र तेरावा.

**अथ हैनं वागुवाच यदहं वसिष्ठोऽस्मि त्वं तद्वसिष्ठोऽसीत्यथ हैनं चक्षुरुवाच यदहं प्रतिष्ठाऽस्मि त्वं तत्प्रतिष्ठाऽसीति ॥ १३ ॥**

**अन्वय व अर्थः**—**अथ ह एनं वाक् उवाच** ( नंतर ह्या प्राणाला वाणी ह्मणाली ) **' यत् अहं वसिष्ठः अस्मि, ' त्वं तत् वसिष्ठः असि इति** (जें कांहीं माझ्या मध्यें वसिष्ठत्व आहे तें तुलाही अलंकृत करित आहे ) **अथ ह एनं चक्षुः उवाच ' यत् अहं प्रतिष्ठा अस्मि तत् त्वं प्रतिष्ठा असि ' इति** ( नंतर ह्या प्राणाला नेत्र ह्मणाला जो प्रतिष्ठात्व गुण स्वभावतः मला प्राप्त झाला आहे, तोतुला ही तसाच प्राप्त झाला आहे)॥ १३॥

## मंत्र चवदावा.

**अथ हैनॅं श्रोत्रमुवाच यदहॅं संपदस्मि त्वं तत्संपदसीत्यथ हैनं मन उवाच यदहमायतनमस्मि त्वं तदायतनमसीति ॥ १४ ॥**

**अन्वय व अर्थः—अथ ह एनं श्रोत्रं उवाच; 'यत् अहं संपत् अस्मि, त्वं तत् संपत् असि' इति; अथ ह एनं मनः उवाच; 'यत् अहं आयतनं असि, त्वं तत् आयतनं असि' इति** (नंतर त्याला कर्ण ह्मणाला: 'जो संपद्गुण मला जन्मतः लाभला आहे, तो तुला ही जन्मतःच प्राप्त झाला आहे.' नंतर शेवटीं मन प्राणाजवळ येऊन ह्मणालें, 'माझा आयतनत्व गुण तुझ्यांमध्यें ही दृग्गोचर होत आहे) याप्रमाणें मन आणि कर्ण यांचें प्राणास उद्देशून भाषण झालें. तात्पर्य, चारही इंद्रियात्मक प्राणांनीं आपआपले मुख्य विशेष गुण मुख्य प्राणामध्यें आहेत, असें कबूल केलें ॥ १४ ॥

अथ हैनं वागादयः प्राणस्य श्रेष्ठत्वं कार्येणाऽऽपादयन्त आहुर्बलिमिव हरन्तो राज्ञे विशः। कथं, वाक् यावदुवाच यदहं वसिष्ठोऽस्मि यदिति क्रियाविशेषणं यद्वसिष्ठत्वगुणोऽस्मीत्यर्थः। त्वं तद्वसिष्ठस्तेन वसिष्ठत्वगुणेन त्वं तद्वसिष्ठोऽसि तद्गुणस्त्वमित्यर्थः। अथवा तच्छब्दोऽपि क्रियाविशेषणमेव। त्वत्कृतस्त्वदीयोऽसौ वसिष्ठत्वगुणोऽज्ञानान्ममेति मयाऽभिमत इत्येतत्, तथोत्तरेषु योज्यं चक्षुःश्रोत्रमनःसु ॥ १३ ॥ १४ ॥

**सिध्दांती**—प्राणाचें श्रेष्ठत्व कसें हें तर मागेंच ठरलें; तथापि वाणीप्रमुख इंद्रियात्मक प्राणांस प्रत्येकीं कांहीं गुणधर्म असतात, ह्मणून त्यांसही श्रेष्ठत्व पदवी कां मिळूं नये, अशी पृच्छकाला किंवा माणसाला शंका येऊं नयें, ह्मणून श्रुतीनें नेत्रादिकांकरवीं हे दोन मंत्र उच्चारिले आहेत, ऐका: वाणीप्रमुख चारी इंद्रियें प्राणाचें श्रेष्ठत्व स्वस्वव्यापारानें सुद्धां स्थापित करून ते ते व्यापार प्राणमूलक व प्राणाधिष्ठित आहेत, व ते प्राणासच अर्पण केले पाहिजेत, अशा संकल्पानें ह्मणालीं.

शिष्य—आपण राजनिष्ठ प्रजा ज्याप्रमाणें आपल्या हितकर्त्या राजाला प्रेमानें कर-भार देऊन त्याचें वरिष्ठत्व मान्य करितो, त्याप्रमाणें इंद्रियांचा हा संकल्प आहे, ह्मणावयाचा.

सिद्धांती—बरोबर. असो; प्रथमतः वाणी ह्मणाली; ' हे प्राणा ! माझ्यामध्यें वसिष्ठत्व गुण आहे; ह्मणून मला " वसिष्ठ " ह्मणतात, तोच गुण तुझ्यामध्येंही आहे ह्मणून तुलाही "वसिष्ठ"च ह्मटलें पाहिजे. फार काय सांगावें ? वस्तुतः पाहिलें तर हा वसिष्ठ गुण त्वांच निर्मिलेला आहे; व तुझ्यामुळें माझ्यामध्यें संक्रांत झाला आहे; ह्मणून तो तुझा आहे. अज्ञानानें आजवर " वसिष्ठ मी, वसिष्ठत्व हा माझा मात्र गुण असें मी समजत होतों. अर्थात् हा माझा अभिमान वृथा आहे. खरा वसिष्ठ तूंच आहेस, हें मला आतां समजलें.

शिष्य—म्हणजे वाणीचा विशेष धर्म जो वसिष्ठत्व, तो तिला प्राणापासून मिळाला आहे. प्राणच नाहींसा झाला तर वाणीचा वासिष्ठत्व गुण व वाणी नाहींशी होणार. अर्थात् वाणीपेक्षां प्राण श्रेष्ठ आहे, हें ठरलें.

सिद्धांती—याचप्रमाणें चक्षु, कर्ण आणि मन यांनीं ही आपआपली संमति दिली.

शिष्य—सारांश, वाणीचें वसिष्ठत्व, नेत्राचें प्रतिष्ठत्व, कर्णाचें संपत्त्व आणि मनाचें आयतनत्व म्हणजे प्रत्यक्ष प्राणजनितच आहेत, असें ठरतें.

सिद्धांती—आचार्यांनीं ' यत् ' ' तत् ' यांस क्रियाविशेषणत्व दिलें आहे, तें एवढ्याच साठीं बरें ! ॥ १३ ॥ १४ ॥

---

## मंत्र पंधरावा.

**न वै वाचो न चक्षूंषि न श्रोत्राणि न मनांसीत्याचक्षते प्राणा इत्येवाऽऽचक्षते प्राणो ह्येवैतानि सर्वाणि भवति ॥ १५ ॥**

**अन्वय व अर्थः**—न वै ' वाचः ', न ' चक्षूंषि ', न ' श्रोत्राणि न 'मनांसि' इति [illegible] ' हीं आपलीं करणें—इंद्रियें—वाणीतंत्र, किंवा नेत्रतंत्र, कर्णतंत्र [illegible] आहेत, असें कोणीही ह्मणत नाहीं) 'प्राणाः इति एव [illegible] ( [illegible] सर्व [illegible] प्राणतंत्र आहेत असेंच समजून त्यांपैकीं प्रत्येकाला ' प्राण ' असेंच सर्वजण ह्मणत असतात ) हि ( ह्मणून )

**प्राण एव सर्वाणि एतानि भवति** ( प्राणमात्रच हीं सर्व इंद्रियें होतो. अथवा प्राणाचींच हीं भिन्न भिन्न स्वरूपें आहेत ) ॥ १५ ॥

**श्रुतेरिदं वचो युक्तमिदं, वागादिभिर्मुख्यं प्राणं प्रत्यभिहितं यस्मान्न वै लोके वाचो न चक्षूंषि न श्रोत्राणि न मनांसीति वागादीनि करणान्याचक्षते लौकिका आगमज्ञा वा किं तर्हि प्राणा इत्येवाऽऽचक्षते कथयन्ति यस्मात्प्राणो ह्येवैतानि सर्वाणि वागादीनि करणजातानि भवत्यतो मुख्यं प्राणं प्रत्यनुरूपमेव वागादिभिरुक्तमिति प्रकरणार्थमुपसंजिहीर्षति ।**

**सिद्धांती**--या मंत्रांतील ह्मणणें श्रुतीचें आहे; संवाद मागच्याच मंत्रांत संपला. श्रुति ह्मणतेः वागादिकांनीं मुख्य प्राणाला जी विनंति केली, ती सर्वथा योग्य अशीच आहे.

**पूर्व०**--कशावरून ?

**सिद्धांती**--या विश्वांतील व्यवहारज्ञ संसारी लोक घ्या किंवा परमार्थज्ञ संन्यासी घ्या, बुभुक्षु घ्या किंवा मुमुक्षु घ्या, कोणीही ज्ञाता पुरुष असें कधींही ह्मणत नाहीं कीं, ' हीं सर्व करणें ( इंद्रियादि ) वाण्यात्मक आहेत, वाणीतंत्रानें चालणारीं आहेत. ' सर्व करणांचे स्वस्वविशेष वाणीतंत्रानें चालले असते, तर वेदज्ञ अथवा व्यवहारज्ञ जीवांनीं कर्णाला, नेत्राला, मनाला ' वाणी ' या नांवानें संबोधिलें असतें. पण तसा तर अनुभव नाहीं. उलट त्या करणव्यापाराला ' प्राण ' या मात्र नांवानें संबोधितात, वेदाचा व व्यवहाराचाही हाच संप्रदाय आहे. ह्मणून ही वाणीप्रमुख इंद्रियांची विनंतिपूर्वक संमति यथायोग्य आहे. ज्या अर्थी प्राण हाच वागादि सर्व करणांच्या रूपानें आविर्भूत होतो, त्याअर्थी वागादिकांनीं प्राणाला जें सांगितलें, ते सर्वोपरीनें योग्यच होतें. अर्थात् ' प्राण हाच हीं सर्व करणें आहे ' असें श्रुतीनें गोष्टीच्या रूपानें ठरविलें आणि या खंडांतील सर्व प्रकरणाचा उपसंहार करण्याचा संकल्प करून तो सिद्धीस ही नेला आहे तिनें ।

**ननु कथमिदं युक्तं चेतनावन्त इव पुरुषा अहंश्रेष्ठतायै विवदन्तोऽन्योन्यं स्पर्धेरन्निति । न हि चक्षुरादीनां वाचं प्रत्याख्याय प्रत्येकं वदनं संभवति । तथाऽपगमो देहात्पुनः प्रवेशो ब्रह्मगमनं प्राणस्तुतिर्वोपपद्यते ।**

**पूर्व०**--आह्मी कसें कबूल करूं हें कल्पित गोष्टीचें तात्पर्य ? यांत कांहीं चुकचुक विचार दिसतच नाहीं,

शिष्य०—आतां कसली शंका ?

पूर्व०—अहो ! ' मी श्रेष्ठ, कां तूं श्रेष्ठ ' इत्यादि प्रकारचा वाद प्रतिवाद होतो, तो चेतनान्वित पुरुषांच्या मुखानें होत असतो. स्पर्धेनें वादविवाद करणारे सर्वदा सचेतन जीव असतात. वादविवादाला बुद्धि हवी व बुद्धीचे विचार प्रकट करण्याला बोलण्याचें साधन जी वाणी, ती हवी. होयना ? आतां तुह्मीच पहा कीं एका वाणी व्यतिरिक्त चक्षुरादिकांस बोलण्याचें सामर्थ्य आहे का ते ? त्याचप्रमाणें स्वतंत्रतेनें ( १ ) देह सोडून जाणें ( २ ) पुनः शरीरप्रवेश करणें ( ३ ) त्याचप्रमाणें ब्रह्माकडे ह्मणजे कोणातरी ज्ञात्या पुरुषाकडे जाऊन ' न्याय ' करण्याची मागणी मागणे ( ४ ) आणि प्राणाची स्तुति करणें, या गोष्टी अचेतन चक्षुरादिकांस किंवा वाणीस शक्य आहेत काय ? वाणी बोलेल, पण तिला गमनागमन कसें करितां येईल. छेः; यांतील एक गोष्ट सुद्धां आह्माला उपपन्न दिसत नाहीं.

तत्राग्न्यादिचेतनावद्देवताधिष्ठितत्वाद्वागादीनां चेतनावत्त्वं तावत्सिद्धमागमतः । तार्किकसमयविरोध इति चेदेह एकस्मिन्ननेकचेतनावत्त्वे । न ईश्वरस्य निमित्तकारणत्वाभ्युपगमात् । ये तावदीश्वरमभ्युपगच्छन्ति तार्किकास्ते मनआदिकार्यकरणानामाध्यात्मिकानां बाह्याना च पृथिव्यादीनामीश्वराधिष्ठितानामेव नियप्रवृत्तिमिच्छन्ति रथादिवत् । न चास्माभिरग्न्याद्याश्चेतनावत्योऽपिदेवता अध्यात्मं भोक्त्र्योऽभ्युपगम्यन्ते, किं तर्हि, कार्यकरणवतीनां हि तासां प्राणैकदेवताभेदानामध्यात्माधिदैवभेदकोटिविकल्पानामध्यक्षतामात्रेण नियन्तेश्वरोऽभ्युपगम्यते । स ह्यकरणः । " अपाणिपादो जवनो ग्रहीता पश्यत्यचक्षुः स शृणोत्यकर्णः " इत्यादिमन्त्रवर्णात् । " हिरण्यगर्भं पश्यत जायमानम् । ", " हिरण्यगर्भं जनयामास पूर्वम् " इत्यादि च श्वेताश्वतरीयाः पठन्ति । भोक्ता कर्मफलसंबन्धी देहे तद्विलक्षणो जीव इति वक्ष्यामः ।

सिद्धांता—तुह्मी ज्या दृष्टीनें वाणीप्रमुख करणांकडे पाहत आहांत, त्या दृष्टीनें तुवचा आक्षेप ठीक आहे. पण तुमची दृष्टि एक गोष्ट विसरते. अहो ? श्रुतीनें अनेक स्थळीं असें स्पष्ट सांगितलें नाहीं काय, कीं वागादिकरणांच्या अग्निप्रमुख सचेतन देवता स्वस्व-इंद्रियांचें जागीं अधिष्ठित असतात ह्मणून ? वाणीचे ठिकाणीं जर अग्निदेवतेचें अधिष्ठान आहे, असें श्रुति सांगते व तें तुह्मांस पटतें, तर वाणी सचेतन आहे, किंवा नेत्र बोलला, ' असें श्रुतीनें ह्मटलें, तर बिघडलें काय ?

प्रत्येक इंद्रियाची अधिष्ठात्री देवता सचेतन असून तिला भाषणसामर्थ्य असतें, असा श्रुतीचा निश्चय आहे. ह्या निश्चयाविरुद्ध आक्षेप घ्या, पण एकदां श्रुतिप्रमाण घेतल्यानंतर एक रसात्मक श्रुति सिद्धांताविरुद्ध नसते असा आक्षेप काढूं नका. अग्नि बोलतो व त्याला जाण्यायेण्याचें सामर्थ्य आहे. असेंच इतर इंद्रियांच्या संबंधानें म्हणतां येतें. तात्पर्य अग्नि, आदित्य देवतांमध्यें हा कलह तत्पन्न झाला, असें समजा ह्मणजे झालें !

**पूर्वः** समजा कसें ? ह्या समजण्याला नैयायिकांचा आक्षेप आडवा येतो.

**शिष्य—**कोणता तो आडवा येणारा आक्षेप ?

**पूर्वः—**ऐका: एकाच देहामध्यें परस्परविरोधी अनेक प्रेरक आहेत, असें समजलें, तर अनेक प्रेरकांचे अभिप्राय सिद्धीस नेण्याचें बल नसणारा देह अनेक कार्यें करितांना नष्ट तरी होऊन जाईल किंवा कोणतेंही कार्य न करितां स्तब्ध तरी राहील. ही अडचण नाहींशी व्हावी, ह्मणून तार्किकांनीं असा समय गृहीत केला आहे कीं देहांतील प्रेरक एकच असून तो सचेतन असतो.

**शिष्यः—**असे कसें ? नैय्यायिकांनीं ‘ परमेश्वर हा सर्व निमित्तकारण आहे. ’ असें प्रतिपादिलें आहे ना ? सर्व नैय्यायिकांस परमेश्वराचें अस्तित्व मान्यच आहे. ते म्हणतात कीं ‘ मनःप्रमुख जीं कार्यकरणें आध्यात्मिक आहेत व पृथ्वीप्रमुख बाह्य म्हणजे आधिभौतिक विषय आहेत, त्या सर्वांची नियमानें प्रवृत्ति होते, ती केवळ ईश्वराच्या अधिष्ठानानें मात्र होय. तात्पर्य, अस्तिक तार्किकांच्या प्रक्रियेंत ‘ ईश्वर हा सर्व निमित्तकारण आहे ’ असें गृहीत केलें आहे. रथादिकांचा नियंता जसा रथस्वामी असतो, त्याप्रमाणें सर्व आध्यात्मिक व आधिभौतिक या उभयतांचा नियंता, नियामक, निमित्तकारण परमेश्वर आहे, असें तार्किक म्हणतात. पण तुम्ही तार्किकांचा आश्रय घेऊन ‘ देहांतच एक सचेतन प्रेरक असतो ’ असें म्हणतां हें कसें ? हें युक्तीला जुळत नाहीं.

**पूर्वः—**जीव हा शरीराचा प्रेरक आहे, असें त्यांचें मत आहे.

**शिष्य—**झालें. देहाचा प्रेरक सचेतन जीव आणि त्या जीवाचा प्रेरक तार्किकमतें ईश्वर. मग एका शरीरावर दोन अधिष्ठात्यांची योजना झाली तुमच्याच मतानें ! आस्तिक तार्किकांच्या मतानें एकच अधिष्ठाता ना !

**सिद्धांती—**पण वेदांती न्यायाचें सांगणें निराळेंच आहे. वेदांती न्याय असें म्हणतो कीं यद्यपि अग्निप्रमुख अध्यात्म देवता सचेतन ( निमित्तकारण ) आहेत, तथापि त्यांच्याकडे भोक्तृत्वाचा एक लेश सुद्धां असत नाहीं.

**पूर्व—**कर्तृत्व असून भोक्तृत्व नाहीं, असें म्हणणें चमत्कारिकच होय. असो पण भोक्तृत्वाची अधिकारी अन्यदेवता असेल, तुमच्या व वेदांती न्यायाच्या मतें !

**सिद्धांती**—'या देवतेची अन्य, पुनः तिसरी !' असा न्याय असला कीं मग ही मालिका संपावयाचीच नाहीं. असो; ह्या ज्या कार्यकरणवंत अग्निप्रमुख अध्यात्मादि देवता आहेत, ह्या सर्व मुख्य प्राणदेवतेचीं मात्र भिन्न भिन्न स्वरूपें आहेत. अध्यात्म अधिदैव व अधिभूत, विषयांवर अधिष्ठातृत्व असणाऱ्या सर्व प्रकारच्या अनेक देवता ह्या प्राणाचीं निरनिराळीं स्वरूपें आहेत. या सर्वांचा म्हणजे प्राणैक देवतेचा नियंता एक ईश्वर मात्र आहे असें वेदांनी तत्त्वज्ञान सांगतें.

**पूर्व**—बरें आहे, मग तोच कार्यकरणवंत आहे, असें समजावें.

**सिध्दांती**—नाहीं. तो साक्षीरूपानें मात्र नियंता आहे. त्याला कार्यकर्तृत्व नाहीं किंवा त्याला कर्णनेत्रादि करणें ही नाहींत. दीपाप्रमाणें तो केवळ साक्षीरूप आहे.

**पूर्व**—कशावरून ?

**सिद्धान्ती**—'त्याला इंद्रियें नाहींत' असें सांगणाऱ्या अनेक श्रुतींतील एकच पहाः 'तो हस्तपाद शून्य असून ही सर्वग्राहक आणि सर्वगामी आहे. त्याला नेत्र नसून ही तो सर्वद्रष्टा आहे व कर्ण नसून ही तो सर्वश्रोता आहेः'

**पूर्व**—पण ह्या सर्वविलक्षण ईश्वराचा अग्निप्रमुख देवतांशीं संबंध ?

**सिद्धांती**—हिरण्यगर्भ हा सूत्रात्मा आहे. या अग्निप्रमुख देवता म्हणजे हिरण्यगर्भाचे विशेष अंश होत. या विशेष अंशांची समष्टि म्हणजे सूत्रात्मा अथवा हिरण्यगर्भ. अर्थात् या सर्व अंशांचा नियामक एक सर्व विलक्षण ईश्वर म्हणजे ब्रम्ह होय. असा हा परस्पर संबंध आहे. म्हणून सर्व नियामक असून साक्षीरूपानें राहणाऱ्या ब्रम्हाकडे किंवा तदंशभूत असणाऱ्या अग्निरूप देवतांकडे भोक्तृत्वाचा भाग येतच नाहीं. 'हा हिरण्यगर्भ जन्मास येत आहे पहा' 'प्रथमतः परमेश्वरानें हिरण्यगर्भाची उत्पत्ति केली' इत्यादि श्वेतांश्वतरप्रणीत प्रमाणश्रुती स्पष्ट सांगतात कीं हिरण्यगर्भाचा व तदंगभूत असणाऱ्या अग्निप्रमुख देवतांचा नियंता एक परमेश्वर मात्र आहे. तो स्वतः साक्षी आहे, म्हणून व हिरण्यगर्भासह सर्व देवता परमेश्वराचे अंश आहेत, म्हणून या चेतनावेंत असणाऱ्या देवता किंवा तन्नियामक परमेश्वर या कोणाकडे ही भोक्तृत्वाचा संबंध नसतो.

**पूर्व०**—मग या देहांत साक्षिरूपानें असणाऱ्या परमेश्वराकडे किंवा अग्निप्रमुख चेतनावेंत देवतांकडे जर भोक्तृत्व नाहीं, तर तें आहेतरी कोणाकडे ?

**सिद्धांती**—बरोबर आहे प्रश्न. ज्ञानरूप व साक्षीरूप ब्रह्माहून विलक्षण असणारा व अज्ञानानें कर्मकर्तृत्व आणि कर्मफलभोक्तृत्व आपल्याकडे आहे, असें मानून चालणारा जो जीव, तो अज्ञानविच्छेद होईतोंपर्यंत भोक्ता आहे; समजलां ?

**पूर्व०**—हें कशावरून.

**सिद्धांती**—हा अन्य विषय आहे. प्रसंगानुरूप ह्याच उपनिषदांत या प्रश्नाचा खल आपण पुढें करूं.

**शिष्य**—न्यायानें कल्पिल्याप्रमाणें 'कर्तृत्वभोक्तृत्व आपल्या कडे आहे असें मानणारा जीव देहाचा अधिष्ठाता नाहीं, परमेश्वर मात्र अधिष्ठाता साक्षीरूपानें आहे, असें ठरलें. अधिष्ठाता जीव नव्हे, तर परमेश्वर; व तदंगभूत असणाऱ्या देवता यांचें अधिष्ठातृत्व देहावर आहे. हा सिद्धांत झाला. अर्थात परस्पर विरोधी देवतांचा वाद प्रतिवाद होणें युक्त आहे, असें ठरलें.

**वागादीनां चेह संवादः कल्पितो विदुषोऽन्वयव्यतिरेकाभ्यां प्राणश्रेष्ठतानिर्धारणार्थम् । यथा लोके पुरुषा अन्योन्यमात्मनः श्रेष्ठतायैविवदमानाः कंचिद्गुणविशेषाभिज्ञं पृच्छान्ति को नः श्रेष्ठो गुणैरिति । तेनोक्ता एकैकश्येनादः कार्यं साधयितुमुद्यच्छत येनादः कार्यं साध्यते स वः श्रेष्ठ इत्युक्तास्तथै वोद्यच्छन्त आत्मनोऽन्यस्य वा श्रेष्ठतां निर्धारयन्ति । तथेमं संव्यहारं वागादिषु कल्पितवती श्रुतिः । कथं नाम विद्वान्वागादीनामेकैकस्याभावेऽपि जीवनं दृष्टं न तु प्राणस्येति प्राणश्रेष्ठतां प्रतिपद्येतेति । तथाच श्रुतिः कौषीतकिनाम्--" जीवति वागपेतो मूकान्हि पश्यामो जीवति चक्षुरपेतोऽन्धान्हि पश्यामो जीवति श्रोत्रापे बधिरान्हि पश्यामो जीवति मनोपेतो बालान्हि पश्यामो जीवति बाहुच्छिन्नो जीवत्यूरुच्छिन्नः " इत्याद्या ॥ १५ ॥**

**सिद्धांती**—याप्रमाणें अग्निप्रमुख देवता सचेतन आहेत व त्यांत वादचर्चा होणें संभाव्य आहे, असें तुह्मांस समजलें. बाकीचे तुमचे आक्षेप वरील विवेचनानें निरस्त झाले असलेच पाहिजेत. आतां, ही विवाद कथा सांगण्यामध्यें श्रुतीचा एक विशेष अभिप्राय आहे.

**शिष्य**—कोणता तो भगवन् ?

**सिध्दांती**--वादविवाद होणें असंभाव्य नाहीं, असें समजून पुढें चालूं. हा विवाद स्वाभिप्रायसिद्ध्यर्थ श्रुतीनें कल्पिलेला आहे. देहामध्यें प्राण असेल तर देहाचीं व इंद्रियांचीं कार्यें ( व्यापार ) चालतात असा अन्वय व प्राण नसेल तर सर्वांचे व्यापार नाहींसे होतात, असा व्यतिरेक पाहून 'प्राण हाच सर्व श्रेष्ठ आहे. असा विद्वान पुरुषांचा निश्चय व्हावा ह्मणून हा वादसंवाद श्रुतीनें कल्पून त्याची योजना येथें केली आहे.

**शिष्य—**बरेंच. ' मी श्रेष्ठ कीं तूं श्रेष्ठ ' असा स्वश्रेष्ठत्वप्रीत्यर्थ परस्परांशीं वाद करणारे लोक व्यवहारांत एखाद्या चांगल्या गुणाभिज्ञ ज्ञात्याकडे पंचाईत नेमुन देऊन कोणाचें श्रेष्ठत्व तें ठरविण्याविषयीं त्याला विनंति करितात. तेव्हां तो न्यायाधीश त्यांपैकीं प्रत्येकाला एक कांहीं विशेष कार्य करावयास सांगतों आणि ठरवितो कीं ' ज्याला तें विशिष्ट कार्य करितां येईल, तो सर्व श्रेष्ठ होय. ' पुढें त्या विवादकांपैकीं सर्व जण प्रत्येकीं तें कार्य करण्याचा प्रयत्न करितो. आणि ज्याला तें कार्य साधतें तो श्रेष्ठ आहे असें सर्व मान्यही करितात. ह्या लौकिक प्रचाराप्रमाणेंच अर्थात् वरील-अन्वय व्यतिरेक पाहून विद्वानाचीही प्राणाच्या श्रेष्ठतेसंबंधानें समजूत पटली पाहिजे ह्मणून श्रुतीनें या खंडांतील संवाद कल्पिलेला आहे असें आपलें ह्मणणें ?

**पूर्व०**—हा व्यवहारी दृष्टांतानें हा सिद्धांत ठरेल कदाचित्, पण नुसत्या परिछिन्न व्यवहाराच्या जोरावर सिद्ध झालेली गोष्ट आम्हांसारख्या विद्वानाला कशी संमत व्हावी.

**सिद्धांती—**कौषीतकी श्रुति काय ह्मणत आहे, " वाणीवियुक्त असलेला जीव जगतो, कारण अनेक मुके लोक आह्मी पाहतों; चक्षुर्विहीन असणारा जीव जगतो कारण, अनेक अंध जिवंत असलेले दिसतात, ऐकूं न येणारा जगतो, कारण अनेक बहिरे वावरतांना दिसतात. अमनस्क असलेला (अल्पबुद्धमनाचा) बालक जगतो, कारण पुष्कळ बालकें बागडतांना दिसतात. त्याचप्रमाणें हस्तोछिन्न, चरणशून्य लोक आम्ही पाहतों " काय निष्कर्ष ह्या श्रुतीचा बरें ? ' नेत्रकर्णादि इंद्रियें व हस्तपादादि अवयव नसलीं तरी जीव जगतो, पण प्राण नसेल तर जीव जगत नाहीं, ' हें विद्वानाला संमत होणारें मंत्रवाक्य प्राणाची श्रेष्ठता ठरवितें. असो; प्राणोपासना करणें विहित असलेल्या ह्या खंडांत सांगितलेलें प्राणाचें ज्येष्ठत्व व श्रेष्ठत्व कारणासह समजून घेऊन उपासना करावी, एतदर्थ या खंडाचा अवतार आहे ॥ १५ ॥

पांचव्या अध्यायांतील पहिला खंड संपला.

इति पञ्चमाध्यायस्य प्रथमः खण्डः ॥ १ ॥

**इति पञ्चमाध्यायस्य प्रथमः खण्डः ॥ १ ॥**

---

यत्किंचिल्लोके प्राणिभिरन्नमद्यतेऽनस्य प्राणस्य तदन्नं प्राणेनैव तदद्यत इत्यर्थः । सर्वप्रकारचेष्टाव्याप्तिगुणप्रदर्शनार्थमन इति प्राणस्य प्रत्यक्षं नाम । प्राद्युपसर्गपूर्वत्वे हि विशेषगतिरेव स्यात् । तथाच सर्वान्नानामत्तुर्नामग्रहणमितीदं प्रत्यक्षं नामान इति सर्वान्नानामत्तुः साक्षादभिधानम् । न ह वा एवंविदि यथोक्तप्राणविदि प्राणोऽहमस्मि सर्वभूतस्थः सर्वान्नानामत्तेति तस्मिन्नेवंविदि ह वै किंचन किंचदपि प्राणिभिराद्यं सर्वैरनन्नमनाद्यं न भवति सर्वमेवंविद्यन्नं भवतीत्यर्थः । प्राणभूतत्वाद्विदुषः । "प्राणाद्वा एष उदेति प्राणेऽस्तमेति" इत्युपक्रम्य–"एवंविदो ह वा उदेति सूर्य एवंविद्यस्तमेति" इति श्रुत्यन्तरात् ॥ १ ॥

सिद्धांती--तो मुख्यप्राण वागादि इंद्रियास विचारता झाला; अहो इंद्रियांनो ! माझें अन्न कोणतें ?

शिष्य०--मला वाटतें, श्रुतीनें येथें मुख्य प्राणाला प्रष्टा ( प्रश्न विचारणारा ) कल्पून त्याला वागादि इंद्रियाकरवीं उत्तर देवविलें आहे. होयना ?

सिद्धांती--शाबास ! प्राण हा प्रश्न करणारा आणि इंद्रियें उत्तर देणारीं, अशी कल्पना, असें रूपक श्रुतीनें संपादिलें आहे. असो; आतां उत्तर ऐका: श्वानादि पशू व यच्चावत् पक्षी यांचें जें कांहीं अन्न म्हणून आहे, सारांश, सर्व प्राण्याचें जें जें म्हणून आहे, तें तें सर्व प्रसिद्ध अन्नजात तुझेंच अन्न आहे. हे मुख्यप्राणा ! उपभोग्य म्हणून जी वस्तु आहे, ती सर्व तुझ्याच योगक्षेमासाठीं आहे.

शिष्य०--श्रुतीनें ही जी प्रश्नोत्तरावली निर्माण केली आहे, ती कशाकरितां बरें ?

सिद्धांती०-अरे ! हें सारें दृश्य जगत् प्राणाचें अन्न आहे, प्राण हा सर्वभोक्ता आहे, हें आपणा सर्वांस स्पष्टपणानें कळावें, एतदर्थ ही कल्पित गोष्ट श्रुतीनें अवतारिली आहे. समजलें ? हें ज्ञान झालें म्हणजे श्रुतीचा इष्ट हेतु साधला. असो; कथाभाग येथेंच संपवून पुढें श्रुति स्वतः म्हणते.

शिष्य०--कायकाय ? श्रुतीचा काय सिद्धांत आहे ?

सिद्धांती०-या लोकीं जें जें काय प्राणी खातात, तें सर्व अनाचें म्हणजे प्राणाचें अन्न आहे. अन म्हणजे प्राण. या प्राणाकडून जे खाल्लें जातें, तें अन्न होय.

शिष्य०--'अनश्वासोच्छ्वास करणें' हें मला विदित आहे.

सिद्धांती०-श्वासच काय, पण दहन, शोषण इत्यादि सर्वप्रकारच्या चेष्टांचा या 'अन' शब्दांत अंतर्भाव होतो. त्या सर्व चेष्टांचा ( कर्मांचा ) अंतर्भाव करणारा 'अन' शब्द लक्षणेनें प्राणाचा वाचक होतो, हें प्रसिद्धच आहे, हे सर्व गुण प्राणांत आहेत, हें स्पष्ट करण्यासाठीं प्राणाला अन हे नांव दिलें.

शिष्य०—या 'अनाला' 'प्र' हा उपसर्ग लागला म्हणजे ता सर्व कर्मांचा विशेषरीतीनें सर्वथा अंतर्भाव करणारा प्राण शब्द 'सर्वभोक्ता' या अर्थाचा वाचक होतो, हें नीटच आहे. तेव्हां सर्वप्रकारच्या अन्नांचा उपभोक्ता जो प्राण त्याला श्रुतीनें 'अन' या सर्वसंग्रही नांवानें संबोधून प्राणाचें उपभोक्तृत्व जीवास प्रत्यक्ष दाखविलें, हा श्रुतीचा आपणांवर अनुग्रहच आहे.

सिध्दांती—ठीक. असें प्राणविद्येचें ज्ञान झालें. 'सर्वभूतांच्या ठिकाणीं वास्तव्य करणारा मी प्राणरूप असून सर्व अन्नांचा अत्ता ( उपभोक्ता ) आहें' असें ज्ञान जीवाला झालें, म्हणजे प्राण्यांस सेव्य असणारे सर्व पदार्थ त्याला आद्य म्हणजे उपभोग्य होतात. मग अनन्न असें कांहींच राहत नाहीं. कारण, असलें प्राणज्ञान असणारा पुरुष प्राणरूपच होतो.

पूर्व:—म्हणजे विद्वानाला भक्ष्याभक्ष्य विचार नाहींसाच झाला म्हणतां!

सिद्धांती—असें काय ! तो प्राणरूप म्हणजे अधिदैवी स्वरूपाचा होतो, तो शक्तिरूप होतो. हा शारीरिक विचार नव्हे, आधिदैविक विचार आहे. असो; बृहदारण्यकांत 'हा सूर्य प्राणापासून उदय पावतो व याचा प्राणामध्यें अस्त होतो' असा उपक्रम करून 'या ज्ञानी पुरुषापासून सूर्य उदय पावतो व या ज्ञानी पुरुषांतच त्याचा अस्त होतो' असें म्हटलें आहे; यावरून येथें शारीरिक विचार नसून दैवी दृष्टीनें विचार चालला आहे असें सिद्ध होतें. तात्पर्य, 'मी सर्वप्राण आहें' अशी दैवी दृष्टि झाली, म्हणजे प्राणरूपानें 'मी सर्वभोक्ता आहे' असें ज्ञान होतें. येथें शक्तिदृष्टीचा विचार आहे. भक्ष्याभक्ष्याचा विचार करणारे अध्यात्मिक शास्त्रांशीं या शास्त्राचा विरोध नाहीं ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**स होवाच किं मे वासो भविष्यतीत्याप इति होचुस्तस्माद्वा एतदशिष्यन्तः पुरस्ताच्चोपरिष्टा-**

यत्किंचिल्लोके प्राणिभिरन्नमद्यतेऽनस्य प्राणस्य तदन्नं प्राणेनैव तदद्यत इत्यर्थः । सर्वप्रकारचेष्टाव्याप्तिगुणप्रदर्शनार्थमन इति प्राणस्य प्रत्यक्षं नाम । प्राद्युपसर्गपूर्वत्वे हि विशेषगतिरेव स्यात् । तथाच सर्वान्नानामत्तुर्नामग्रहणमितीदं प्रत्यक्षं नामान इति सर्वान्नानामत्तुः साक्षादभिधानम् । न ह वा एवंविदि यथोक्तप्राणविदि प्राणोऽहमस्मि सर्वभूतस्थः सर्वान्नानामत्तेति तस्मिन्नेवंविदि ह वै किंचन किंचदपि प्राणिभिराद्यं सर्वैरनन्नमन्नाद्यं न भवति सर्वमेवंविद्यन्नं भवतीत्यर्थः । प्राणभूतत्वाद्विदुषः । "प्राणाद्वा एष उदेति प्राणेऽस्तमेति" इत्युपक्रम्य–" एवंविदो ह वा उदेति सूर्य एवंविद्यस्तमेति " इति श्रुत्यन्तरात् ॥ १ ॥

**सिद्धांती**––तो मुख्यप्राण वागादि इंद्रियास विचारता झाला; अहो इंद्रियांनो ! माझें अन्न कोणतें ?

**शिष्य०**––मला वाटतें, श्रुतीनें येथें मुख्य प्राणाला प्रष्टा ( प्रश्न विचारणारा ) कल्पून त्याला वागादि इंद्रियाकरवीं उत्तर देवविलें आहे. होयना ?

**सिद्धांती**––शाबास ! प्राण हा प्रश्न करणारा आणि इंद्रियें उत्तर देणारीं, अशी कल्पना, असें रूपक श्रुतीनें संपादिलें आहे. असो; आतां उत्तर ऐका: श्वानादि पशू व यच्चावत् पक्षी यांचें जें कांहीं अन्न म्हणून आहे, सारांश, सर्व प्राण्याचें जें जें म्हणून आहे, तें तें सर्व प्रसिद्ध अन्नजात तुझेंच अन्न आहें. हे मुख्यप्राणा ! उपभोग्य म्हणून जी वस्तु आहे, ती सर्व तुझ्याच योगक्षेमासाठीं आहे.

**शिष्य०**––श्रुतीनें ही जी प्रश्नोत्तरावली निर्माण केली आहे, ती कशाकरितां बरें !

**सिद्धांती०**–अरे ! हें सारें दृश्य जगत् प्राणाचें अन्न आहे, प्राण हा सर्वभोक्ता आहे, हें आपणा सर्वांस स्पष्टपणानें कळावें, एतदर्थ ही कल्पित गोष्ट श्रुतीनें आवतारिली आहे. समजलें ? हें ज्ञान झालें म्हणजे श्रुतीचा इष्ट हेतु साधला. असो; कथाभाग येथेंच संपवून पुढें श्रुति स्वतः म्हणते.

**शिष्य०**––कायकाय ? श्रुतीचा काय सिद्धांत आहे ?

**सिद्धांती०**–या लोकीं जें जें काय प्राणी खातात, तें सर्व **अनाचें** म्हणजे **प्राणाचें अन्न** आहे. अन म्हणजे प्राण. या प्राणाकडून जे खाल्लें जातें, तें अन्न होय.

**शिष्य०**––' अनश्वासोच्छ्वास करणें ' हें मला विदित आहे.

सिद्धांती०-श्वासच काय, पण दहन, शोषण इत्यादि सर्वप्रकारच्या चेष्टांचा या 'अन' शब्दांत अंतर्भाव होतो. ह्या सर्व चेष्टांचा ( कर्मांचा ) अंतर्भाव करणारा 'अन' शब्द लक्षणेनें प्राणाचा वाचक होतो, हें प्रसिद्धच आहे, हे सर्व गुण प्राणांत आहेत, हें स्पष्ट करण्यासाठीं प्राणाला अन हे नांव दिलें.

शिष्य०—या 'अनाला' 'प्र' हा उपसर्ग लागला म्हणजे तर सर्व कर्मांचा विशे- षरीतीनें सर्वथा अंतर्भाव करणारा प्राण शब्द 'सर्वभोक्ता' या अर्थाचा वाचक होतो, हें नीटच आहे. तेव्हां सर्वप्रकारच्या अन्नांचा उपभोक्ता जो प्राण त्याला श्रुतीनें 'अन' या सर्वसंग्रही नांवानें संबोधून प्राणाचें उपभोक्तृत्व जीवास प्रत्यक्ष दाखविलें, हा श्रुती- चा आपणांवर अनुग्रहच आहे.

सिध्दांती—ठीक. असें प्राणविद्येचें ज्ञान झालें. 'सर्वभूतांच्या ठिकाणीं वास्तव्य करणारा मी प्राणरूप असून सर्व अन्नांचा अत्ता ( उपभोक्ता ) आहें' असें ज्ञान जीवाला झालें, म्हणजे प्राण्यांस सेव्य असणारे सर्व पदार्थ त्याला आद्य म्हणजे उप- भोग्य होतात. मग अनन्न असें कांहींच राहत नाहीं. कारण, असलें प्राणज्ञान असणारा पुरुष प्राणरूपच होतो.

पूर्व:—म्हणजे विद्वानाला भक्ष्याभक्ष्य विचार नाहींसाच झाला म्हणतां!

सिद्धांती—असें काय! तो प्राणरूप म्हणजे अधिदैवी स्वरूपाचा होतो, तो शक्ति- रूप होतो. हा शारीरिक विचार नव्हे, अधिदैविक विचार आहे. असो; बृहदारण्यकांत 'हा सूर्य प्राणापासून उदय पावतो व याचा प्राणामध्यें अस्त होतो' असा उपक्रम करून 'या ज्ञानी पुरुषापासून सूर्य उदय पावतो व या ज्ञानी पुरुषांतच त्याचा अस्त होतो' असें म्हटलें आहे; यावरून येथें शारीरिक विचार नसून दैवी दृष्टीनें विचार चालला आहे असें सिद्ध होतें. तात्पर्य, 'मी सर्वप्राण आहें' अशी दैवी दृष्टि झाली, म्हणजे प्राणरूपानें 'मी सर्वभोक्ता आहे' असें ज्ञान होतें. येथें शक्तिदृष्टीचा विचार आहे. भक्ष्याभक्ष्याचा विचार करणारे अध्यात्मिक शास्त्रांशीं या शास्त्राचा विरोध नाहीं ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**स होवाच किं मे वासो भविष्यतीत्याप इति होचुस्तस्माद्वा एतदशिष्यन्तः पुरस्ताच्चोपरिष्टा-**

चाद्भिः परिदधति लम्भुको ह वासो भवत्यनग्नो ह भवति ॥ २ ॥

अन्वय व अर्थः—' किं मे वासः भविष्यति ' इति सः उवाच; ह; ' आपः ' इति ते ऊचुः ( माझें वस्त्र कोणतें ? असें प्राणानें विचारिलें, तेव्हां इंद्रियांनीं उत्तर दिलें 'जल हें तुझें वस्त्र होईल.') तस्मात् वै अशिष्यन्तः एतद् अद्भिः पुरस्तात् उपरिष्टात् च परिदधति ( म्हणून अन्न खाणारे लोक आपल्या अन्नाला प्रथम व शेवटीं पाण्यानें गुंडाळून घेतात. सारांश, अन्नसेवनाच्या आधीं, व मागाहून लोक आचमन रूपानें पाणी पितात व याप्रमाणें अन्नाला मागून पुढून जलानें आच्छादितात ) लंभुकः ह वासः भवति, अनग्नः ह भवति ( याप्रमाणें व्यवस्था करणाऱ्या पुरुषाला वस्त्रप्राप्तीचा लाभ होतो व तो अनग्न म्हणजे वस्त्राभरणांनीं युक्त असा होतो ) ॥ २ ॥

स होवाच पुनः प्राणः । पूर्ववदेव कल्पना । किं मे वासो भविष्यतीत्याप इति होचुर्वागादयः । यस्मात्प्राणस्य वास आपस्तस्माद्वा एतदशिष्यन्तो भोक्ष्यमाणा भुक्तवन्तश्च ब्राह्मणा विद्वांस एतत्कुर्वन्ति । किम् । अद्भिर्वासस्थानीयाभिः पुरस्ताद्भोजनात्पूर्वमुपरिष्टाच्च भोजनादूर्ध्वं च परिदधति परिधानं कुर्वन्ति मुख्यस्य प्राणस्य लम्भुको लम्भनशीलो वासो ह भवति । वाससो लब्धैव भवतीत्यर्थः । अनग्नो ह भवति । वाससो लम्भुकत्वेनार्थसिद्धैवानग्नतेत्यनग्नो ह भवतीत्युत्तरीयवान्भवतीत्येतत् ।

**सिद्धांतीः**—अन्नाची व्यवस्था झाल्यानंतर ' मला वस्त्र कोणतें ? ' असा प्राणानें प्रश्न केला व वागादि इंद्रियांनीं त्यास सांगितलें कीं ' आपः ' म्हणजे जल हें तुझें वस्त्र होईल.

**शिष्य०**— प्राणाचा प्रश्न व इंद्रियाचें उत्तर, ही सर्व मागच्या मंत्रांतील कल्पनेप्रमाणेंच कल्पना आहे.

**सिद्धांती**—ठीक. याप्रमाणें प्राणाचें वस्त्र जल असतें, असें ठरलें आहे, म्हणून शिष्टान्न भक्षण करण्यास उद्युक्त झालेले व भक्षण केलेले विद्वान् ब्राह्मण काय करितात, तें पहा.

शिष्यः—काय करितात बरें ?

सिद्धांती—भोजन करण्याच्या अगोदर व भोजन झाल्यानंतर वास्तव्यस्थानाचें अथवा वस्त्रस्थानाचें स्वरूप प्राप्त झालेल्या जलांनीं मुख्य प्राणाला सर्वबाजूंनीं आच्छादून टाकितात. म्हणजे अर्थातच हा मुख्यप्राण वास्तव्याचा किंवा वस्त्राचा लब्धा होतो. त्याला आच्छादणारें स्थान किंवा वस्त्र मिळतें. हें मिळालें म्हणजे तो अनग्न होतो, त्याची नग्नावस्था, त्याचें दिगंबरत्व नाहींसें होतें.

शिष्यः—वास्तव्यस्थानाची प्राप्ति झाल्यानंतर त्याची नग्नावस्था विनष्ट होते, त्याला पांघरण्यास वस्त्र मिळतें, हें सहजसिद्ध आहे.

**भोक्ष्यमाणस्य भुक्तवतश्च यदाचमनं शुद्ध्यर्थं विज्ञातं तस्मिन्प्राणस्य वास इति दर्शनमात्रमिह विधीयते । अद्भिः परिदधतीति नाऽऽचमनान्तरम् । यथा लौकिकैः प्राणिभिरद्यमानमन्नं प्राणस्येति दर्शनमात्रं तद्वत्किं मेऽन्नं किं मे वास इत्यादिप्रश्नप्रतिवचनयोस्तुल्यत्वात् । यद्याचमनमपूर्वं तादर्थ्येन क्रियेत तदा कृम्याद्यन्नमपि प्राणस्य भक्ष्यत्वेन विहितं स्यात् । तुल्ययोर्विज्ञानार्थयोः प्रश्नप्रतिवचनयोः प्रकरणस्य विज्ञानार्थत्वादर्धजरतीयो न्यायो न युक्तः कल्पयितुम् ।**

सिद्धांती—आतां, हें ध्यानांत ठेव कीं, भोजन करण्यास उद्युक्त होणारे व भोजन केलेले गृहस्थांस शुद्धिप्राप्त्यर्थ जें आचमन सांगितलें आहे, त्या आचमनांतच प्राणाचा वास ( वास्तव्य; वस्त्र ) आहे, अशी दृष्टि ठेवावी; म्हणजे जें आचमन तोच वास असें समजावें.

शिष्यः—जेवावयाचें आधीं ' अमृतोपस्तरणमसि ' व जेवणानंतर ' अमृतापिधानमसि ' अशीं परिशुद्ध्यर्थ जीं आचमनें सांगितलीं आहेत, त्यांवरच वासदृष्टि ठेवावयाची, ' अद्भिः परिदधति ( जलांनीं परिवेष्टन करितो ) ' असें म्हणून निराळें आचमन घ्यावयाचें नाहीं; हा श्रुतीचा भावार्थ आहे.

पूर्व०—कां बरें ? निराळेंच आचमन करावें, असा श्रुत्यर्थ कां नाहीं ?

सिद्धांती—अहो ! व्यवहारांतील म्हणजे लौकिक प्राण्यांनीं भक्षिलें जाणारें सर्व कांहीं ' प्राणाचें अन्न आहे ' अशी दृष्टि ठेवण्यास श्रुतीनें सांगितलें, तसेंच येथें ' आचमनावर वासदृष्टि ठेवावी ' असें सांगितलें. ' माझें अन्न कोणतें ? ' ' माझें

वस्त्र कोणतें ? ' इत्यादि प्रश्न समानजातीचे आहेत, तर त्यांचीं उत्तरेंही समानजातीं चींच असलीं पाहिजेत.

शिष्यः—असें केलें नाहीं, तर भलताच प्रसंग येणार ?

पूर्व०—तो कोणता ?

शिष्यः—वस्त्रासाठींच ( अनग्नतासंपादनासाठींच ) आपण अपूर्व आचमन घेतलें पाहिजे, असें जर येथें ठरविलें, तर कृमिकीटकादि अन्न ( किंवा कृम्यादिकांचें अन्न ) हेंच प्राणाचें अन्न आहे, व तेंच भक्षिलें पाहिजे, असें निष्पन्न होईल. अभक्ष्य तर सर्वथा वर्ज्य आहे. म्हणून कृम्यादींवर जशी अन्नदृष्टि मात्र ठेवावयाची, तद्वत् आचमनांवरच वासदृष्टि ठेवावयाची; हेंच श्रुतितात्पर्य असलें पाहिजे.

सिद्धांती—कारण, आतांच सांगितल्याप्रमाणें प्रश्नप्रतिवचनांच्या उभयठिकाणीं जाणून घेण्याचा अर्थ समसमान आहे. शिवाय, प्रकरणही विज्ञानाचें आहे, अन्न पानाचें नाहीं. जो न्याय एकीकडे, तोच न्याय—समानप्रसंग असतां—दुसरीकडे लाविला पाहिजे. अर्धजरतीन्याय उपयोगी नाहीं. एकच स्त्री अर्धी वृद्धा व अर्धी तरुण असें कधीं असत नाहीं.

पोळी एकच; पण ती सगळी खाईन व सगळी शिल्लक ठेवीन, असें म्हटल्यास कसें चालेल ?

यत्तु प्रसिद्धमाचमनं प्रायत्यार्थं प्राणस्यानग्नतार्थं च न भवतीत्युच्यते न तथा वयमाचमनमुभयार्थं ब्रूमः । किं तर्हि प्रायत्यार्थाचमनसाधनभूता आपः प्राणस्य वास इति दर्शनं चोद्यत इति ब्रूमः । तत्राऽऽचमनस्योभयार्थत्वप्रसङ्गदोषचोदनाऽनुपपन्ना । वासोर्थ एवाऽऽचमने तद्दर्शनं स्यादिति चेत् । न । वासोज्ञानार्थवाक्ये वासोर्थापूर्वाचमनविधाने तत्रानग्नतार्थत्वदृष्टिविधाने च वाक्यभेदः । आचमनस्य तदर्थत्वमन्यार्थत्वं चेति प्रमाणाभावात् ॥ २ ॥

पूर्व०—तुम्हीं कांहीं म्हणा; पण एकच प्रसिद्ध झालेलें ( श्रुतीनें प्रत्यक्ष विहित केलेलें ) आचमन शुद्धिकारक होईल व पुनः प्राणाची नग्नता विनष्ट करील, हें संभवनीय नाहीं. एकच वस्तु एकाच काळीं दोन भिन्न कृत्यें करण्यास समर्थ असणें शक्य नाहीं.

**सिद्धांती**—आम्ही तरी कोठें तसें म्हणत आहोंत. उभय अर्थ हें आचमन संपादितें, असें आम्हीही म्हणत नाहीं.

**पूर्व**:—मग तुम्ही म्हणतां तरी काय ?

**सिद्धांती**:—आमचें म्हणणें स्पष्ट हें आहे कीं, शुद्धी करण्यासाठीं विहित केलेल्या आचमनीय जलांवरच प्राणास उपयोगी असणाऱ्या वासाची दृष्टि ठेवावी. देहशुद्धीकरतां किंवा अन्नशुद्धीकरितां जें आचमनज आपण घेतों, तेंच प्राणवास आहे, असें **समजावयाचें मात्र** आहे. अर्थातच 'एक क्रिया द्व्यर्थकरी होणें' अशक्य आहे, हा तुमचा आक्षेप येथें उत्पन्न होत नाहीं. **आचमनक्रियेवरच वासदृष्टिसंकल्पाची मात्र** क्रिया करावयास सांगितली आहे.

पूर्व:—नाहीं जुळत. शुद्धीसाठीं विहित केलेलें आचमन हा वासदृष्टीचा दुसरा अर्थ संपादन करील, असें होणें अशक्य आहे. अहो ! ही लटपट करण्यापेक्षां वासदृष्टीसाठीं निराळेंच आचमन विहित करूं या; व त्यावरच अनग्नतादृष्टि ठेवूं या. हें जास्त चांगलें.

**सिद्धांती**:—म्हणजे तरी अडचण नाहींशी होत आहे थोडीच ! अहो ? श्रुतीनें वासविज्ञानासाठीं एकच वाक्य अवतारिलें आहे. त्याचा तुम्ही अर्थ करणार कीं ह्या वाक्यांत श्रुतीनें 'वास–अर्थ साध्य होण्यासाठीं अपूर्व **आचमन करावें**,' असा विधि सांगितला आहे आणि तेंच वाक्य 'या आचमनावर अनग्नतादृष्टि ठेवावी' **असा दुसरा विधि** विहित करित आहे ! म्हणजे एक वाक्याचीं दोन निरनिराळीं वाक्यें होतात. एकाच आचमनानें एक 'विधि सांगावा व त्याचवेळीं दुसरा विधि सांगावा, याला कोठें तरी प्रमाण सापडेल काय ? तात्पर्य येथें दुसरें आचमन विहितच नाहीं. शुद्धीकरितां सिद्ध झालेल्या आचमनावर वासदृष्टिमात्र ठेवावयाची, हाच अर्थ योग्य व प्रमाणशुद्ध आहे. तुमचा अर्थ घेतल्यास एका प्रामाणिक वाक्याला अप्रामाणिकत्व येणार ! हें कसें पत्कारितां येणार ? ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**तद्धैतत्सत्यकामो जाबालो गोश्रुतये वैयाघ्रपद्यायोक्त्वोवाच यद्यप्येनच्छुष्काय स्थाणवे ब्रूयाज्जायेरन्नेवास्मिञ्छाखाः प्ररोहेयुः पलाशानीति ॥ ३ ॥**

अन्वय व अर्थ :—सत्यकामः जाबालः वैयाघ्रपद्याय गोश्रुतये तत् एतत् उक्त्वा उवाच ह ( सत्यकाम नामक जाबाल ऋषि हा व्याघ्रपदाचा मुलगा जो गोश्रुति त्याला हें सर्व सांगून पुनः आणखी म्हणाला ) शुष्काय स्थाणवे अपि एतत् ब्रूयात्, अस्मिन् शाखाः जायेरन्, एव पलाशानि प्ररोहेयुः इति ( वाळलेल्या वृक्षखंडाला हें जर सांगितलें, तर तेथें सुद्धां शाखा उत्पन्न होतील व पानें फुटतील !) ॥ ३॥

तद्धैतत्प्राणदर्शनं स्तूयते । कथम् । तद्धैतत्प्राणदर्शनं सत्यकामो जाबालो गोश्रुतये नाम्ना वैयाघ्रपद्याय व्याघ्रपदोऽपत्यं वैयाघ्रपद्यस्तस्मै गोश्रुत्याख्यायोक्त्वोवाचान्यदपि वक्ष्यमाणं वचः । किं तदुवाचेत्याह-यद्यपि शुष्काय स्थाणवे एतद्दर्शनं ब्रूयात्प्राणविज्जायेरन्नुत्पद्येरन्नेवास्मिन्स्थाणौ शाखाः प्ररोहेयुश्च पलाशानि पत्राणि, किमु जीवते पुरुषाय ब्रूयादिति ॥ ३ ॥

**सिद्धांती**—हा तिसरा मंत्र प्राणविद्येच्या स्तुतिपर आहे. हा स्तावक मंत्र काय सांगतो, तें पहाः जाबालाचा पुत्र सत्यकाम जाबाल ( छां. अ. ४ खं. ४ मं. १ पहा ) यानें व्याघ्रपदाचा पुत्र जो गोश्रुति, त्याला हें प्राणदर्शन-प्राणविद्या-शास्त्र सांगितली आणि पुढें आणखी म्हणाला कीं, हे गोश्रुति ! ही प्राणविद्या एखाद्या शुष्क झालेल्या तरुखंडाला सांगितली, तर त्यालासुद्धां शाखा फुटून नूतनपल्लवी प्राप्त होईल बरें ! मग जिवंत म्हणजे चालत्याबोलत्या पुरुषांस मुमुक्षूला सांगितली, तर केवढा मंगल परिपाक होईल, याचें वर्णन काय करावें ? महाफलप्राप्ति होईल, यांत शंकाच नाहीं ॥ ३ ॥

अथोक्तप्राणदर्शनविद इदं मन्थाख्यं कर्म आरभ्यते

**सिद्धांती**—आतांच सांगितलेल्या प्राणविद्येचें यथार्थज्ञान ज्या पुरुषांस झालें त्यास ह्या मंत्रांत विहित केलेलें ' मन्थ ' नामक कर्म सांगितलें आहे. ह्याच मन्थाख्य कर्माचें वर्णन या मंत्रांत आहे. ऐका—

---

मंत्र पांचवा.

**अथ यदि महज्जिगमिषेदमावास्यायां दीक्षित्वा पौर्णमास्याँ रात्रौ सर्वौषधस्य मन्थं दधिमधुनी-**

**रुपमथ्य ज्येष्ठाय श्रेष्ठाय स्वाहेत्यग्नावाज्यस्य हुत्वा मन्थे संपातमवनयेत् ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थः**—अथ यदि महत् जिगमिषेत्, ( जर प्राणविद्या जाणणाऱ्याला महत्त्व प्राप्त व्हावें अशी इच्छा असेल, तर त्यानें हें या व पुढील मंत्रांत सांगितलेलें कर्म करावें ) अमावास्यायां दीक्षित्वा पौर्णमास्यां रात्रौ सर्वौषधस्य मन्थं दधिमधुनोः उपमथ्य, ‘ज्येष्ठाय श्रेष्ठाय स्वाहा’ इति अग्नौ आज्यस्य हुत्वा मन्थे संपातं अवनयेत् ( अमावास्येच्या दिवशीं महत्त्वाकांक्षूनें दीक्षा घेऊन पुढील पौर्णिमेच्या रात्रीं सर्व औषधांचा मंथ दधिमधूच्या पात्रांमध्यें करावा. नंतर दधिमधूंसह तो मंथ चांगला घुसळावा व पुढें ठेवावा. नंतर ‘ज्येष्ठाय, श्रेष्ठाय स्वाहा’ असा मंत्र ह्मणून अग्निमध्यें घृतधारा सोडावी व जो मंथवर उल्लेखिला आहे, त्यावर शेषघृताचे बिंदू सोडावे ) ॥ ४ ॥

अथानन्तरं यदि महन्महत्त्वं जिगमिषेद्गन्तुमिच्छेन्महत्त्वं प्राप्तुं यदि कामयेतेत्यर्थः। तस्येदं कर्म विधीयते। महत्त्वे हि सति श्रीरुपनमते। श्रीमतो ह्यर्थप्राप्तं धनं ततः कर्मानुष्ठानं ततश्च देवयानं पितृयाणं वा पन्थानं प्रतिपत्स्यत इत्येतत्प्रयोजनमुररीकृत्य महत्त्वप्रेप्सोरिदं कर्म न विषयोपभोगकामस्य। तस्यायं कालादिविधिरुच्यते—अमावास्यायां दीक्षित्वा दीक्षित इव भूमिशयनादिनियमं कृत्वा तपोरूपं सत्यवचनं ब्रह्मचर्यमित्यादिधर्मवान्भूत्वेत्यर्थः। न पुनर्दीक्षणमेव कर्मजातं सर्वमुपादत्ते। अतद्विकारत्वान्मन्थाख्यस्य कर्मणः। “उपसद्व्रती” इति श्रुत्यन्तरात्पयोमात्रभक्षणं च शुद्धिकारणं तप उपादत्ते। पौर्णमास्यां रात्रौ कर्माऽऽरभते सर्वौषधस्य ग्राम्यारण्यानामोषधीनां यावच्छक्त्यल्पमल्पमुपादाय तद्वितुषीकृत्याऽऽममेव पिष्टं दधिमधुनोरौदुम्बरे कंसाकारे चमसाकारे वा पात्रे श्रुत्यन्तरात्प्रक्षिप्योपमथ्याग्रतः स्थापयित्वा ज्येष्ठाय श्रेष्ठाय स्वाहेत्यग्नावावसथ्य आज्यस्याऽऽवाप-

**स्थाने हुत्वा स्रुवसंलग्नं मन्थे संपातमवनयेत्संस्रवमधः पातयेत् ॥ ४ ॥**

**सिद्धांती**--आतां ही प्राणविद्या अधिगत झाल्यावर त्या विद्वानाला जर महत्त्व प्राप्त करून घेण्याची इच्छा झाली, तर त्यानें या चवथ्या मंत्रांत सांगितलेलें कर्म करावें.

**शिष्य**—प्राणविद्या आल्यावर मोठें होण्याची इच्छा कशाला ? हीच तर मोठी घातुक आहे.

**सिद्धांती**—अरे ! महत्व प्राप्त झालें म्हणजे लक्ष्मीदेवी घरीं चालत येते. लक्ष्मी-संपादन झालें म्हणजे अर्थप्राप्त धन मिळतें. न्याय्यधनानें श्रुतिविहित कर्मांचें अनुष्ठान साध्य होतें; आणि कर्म सकाम अथवा निष्काम असेल, त्याप्रमाणें पितृयाण अथवा देवयान पंथाचा मार्ग अधिगत होतो. सारांश, श्रेष्ठत्वाकडे जाण्यासाठीं महत्त्वप्राप्तीची इच्छा आहे, असें समजून ( गृहीत घेऊन ) च मोठेपणा प्राप्त करून घेण्याची इच्छा धरणाराला मात्र हें मंथकर्म विहित केलें आहे. मोठेपण मिळवून इहलोकीं मात्र विषयांचा उपभोग घेतां यावा, असें म्हणणाऱ्या व इच्छिणाऱ्या लोकांसाठीं हें कर्म नव्हे. असो; या कर्माला कालद्रव्यादि कोणते योग्य व विहित आहेत, ते सांगतात. महत्त्वप्रेप्सूनें आमवास्येच्या दिवशीं दीक्षा घ्यावी.

**शिष्य०**—म्हणजे दीक्षितानें जें कर्म करावें म्हणून सांगितलें आहे, तें सर्व या प्राणवेत्त्यानें करावें.

**सिद्धांती**—नाहीं, नाहीं. दीक्षिताचे भूमिशयनादि जे नियम आहेत, तपश्चर्या करणें अथवा तपोरूप प्राप्त करून देणारें जें सत्यवचन; ब्रह्मचर्य इत्यादि धर्म आहेत, ते मात्र यथासांग करणें, हीं व्रतें या दीक्षितानें पाळावयाचीं आहेत. दीक्षिताप्रमाणें त्यानें वर्तन ठेवावें, याचा अर्थ दीक्षिताला जे नियम श्रुतीनें घालून दिले आहेत, ते सर्वच्या सर्व त्यानें अनुष्ठिले पाहिजेत, असें नव्हे.

**पूर्व**—हें कशावरून ?

**सिद्धांती**—कारण, येथें जें मंथ-नांवाचें कर्म सांगितलें आहे, तें दीक्षित-कर्मांची जी प्रकृति म्हणून ठरविली आहे, तिचा विकार नाहीं; म्हणजे श्रुतिविहित कर्मापासून मंथकर्मांची उत्पत्ति होत नाहीं. प्रकृत्यनुसार कर्मांची विकृति असावी, असा न्याय आहे. मंथ कर्म येथें सांगितलें. हें कोणत्याही दीक्षितकर्माची विकृति नाहीं; म्हणून पूर्ण दीक्षितत्व येथें इष्ट नसून केवळ भूमिशयन, सत्यव्रत, ब्रह्मचर्य इत्यादि नियम

इष्ट आहेत. अत एव दीक्षित असावें, हा श्रुत्यभिप्राय आहे. शिवाय, 'उपसद्'नामक इष्टी असल्या म्हणजे जें पयोभक्षण करावें, असें बृहदारण्यकांत सांगितलें आहे, तसें दुग्धमात्र विधिपूर्वक भक्षावें. हें व्रत शुद्धिकारक म्हणजे पवित्रता देणारें आहे.

**शिष्य०**—तात्पर्य, ह्या व्रताचा अंगीकार महत्वप्रेप्सु करितो व त्यानें करावा.

**सिद्धांती:**—ठीक. याप्रमाणें अमावास्येपासून पौर्णिमेपर्यंत व्रतस्थ राहून या प्राणवेत्त्या महत्वेच्छूनें त्याच पौर्णिमेच्या रात्रीं मंथकर्माला आरंभ करावा.

**शिष्य०**—म्हणजे ?

**सिद्धांती**—ग्राम्य म्हणजे गांवांतील व अरण्यांतील सर्व औषधी ( वनस्पती व फळें–) यथाशक्ति मिळवून त्यांतील थोडथोड्या प्रमाणानें औषधी निवडून घ्याव्या; त्यांचीं डेखें व साली काढून ( सडून व पाखडून ) त्यांचें पिष्ट करावें; नंतर बृहदारण्यांत सांगितलेलें औदुंबराचें वाटोळें अथवा दर्वीच्या ( लांब वर्तुळाकार ) आकाराचें भांडें, दहीं व मध ठेवून तयार असतें, त्या भांड्यांत हें असलें तयार झालेलें कच्चें ( अपक्व, न शिजविलेलें ) पीठ घालून तें घुसळावें आणि नंतर तें पीठ त्या औदुंबरपात्राच्या मध्यभागीं पुढें ठेवावें. हा मंथ तयार झाला. हा घेऊन दीक्षितानें अग्नीजवळ जावें. नंतर आपला जो आवसथ्य म्हणजे लौकिकाग्नि ( स्मार्ताग्नि ) सिद्ध असतो, त्याच्या आवापस्थानीं–

**शिष्य०**—आवापस्थान म्हणजे आहुतींचा प्रक्षेप करण्याचें स्थान ?

**सिद्धांती**—बरोबर. असो. या स्थानीं 'ज्येष्ठाय, श्रेष्ठाय स्वाहा' अशी घृताची आहुति स्रुवेनें ( पळीनें ) घ्यावी व त्या स्रुवेला जें घृत चिकटून राहतें, तें आतांच सांगितलेला जो मंथ, त्यावर हळूहळू पडेल, अशी स्रुवा धरावी. तात्पर्य आहुति दिल्यानंतर स्रुवेनें घृताचे थेंब मंथावर पाडावे ॥ ४ ॥

---

## मंत्र पांचवा.

**वसिष्ठाय स्वाहेत्यग्नावाज्यस्य हुत्वा मन्थे संपातमवनयेत्प्रतिष्ठायै स्वाहेत्यग्नावाज्यस्य हुत्वा मन्थे संपातमवनयेत्संपदे स्वाहेत्यग्नावाज्यस्य हुत्वा मन्थे संपातमवनयेदायतनाय स्वाहेत्यग्नावाज्यस्य हुत्वा मन्थे संपातमवनयेत् ॥ ५ ॥**

अन्वय व अर्थः—'वसिष्ठाय स्वाहा' इति अग्नौ आज्यस्य हुत्वा मंथे संपातं अवनयेत्; 'प्रतिष्ठायै स्वाहा' इति अग्नौ आज्यस्य हुत्वा मंथे संपातं अवनयेत्; 'संपदे स्वाहा' इति अग्नौ आज्यस्य हुत्वा मंथे संपातं अवनयेत् 'आयतनाय स्वाहा' इति अग्नौ आज्यस्य हुत्वा मंथे संपातं अवनयेत् ('वसिष्ठाय स्वाहा' या मंत्रानें अग्नीमध्यें घृताची आहुति देऊन अवशिष्ट तुपानें मंथ संस्कृत करावा व त्याचप्रमाणें पुढें 'प्रतिष्ठा' 'संपद' व 'आयतन' ह्यांस 'स्वाहा' असें ह्मणून प्रत्येक वेळीं आहुती देऊन स्रुवेला चिकटलेलें तूप मंथावर पाडावें) ॥ ५ ॥

समानमन्यत् । वसिष्ठाय प्रतिष्ठायै संपद आयतनाय स्वाहेति प्रत्येकं तथैव संपातमवनयेद्धुत्वा ॥ ५ ॥

सिद्धांतीः—संपत्तीची, प्रतिष्ठेची, संपदेची व आयतनाची, अशा देवता आहेत ' त्याचें आवाहन करून त्यांस आहुती प्रत्येकीं समंत्रक द्याव्या; व स्रुवेला संलग्न असलेलें घृत मंथावर पाडून तो संस्कृत करावा. याप्रमाणें ज्येष्ठ, श्रेष्ठ, वसिष्ठ, प्रतिष्ठा, संपद् व आयतन, या आहुती देऊन प्रत्येक आहुतीच्या वेळीं आहुतीच्या पळीला लागलेल्या तुपाचें थेंब मंथावर पाडावे व त्याला सिद्ध करावा ॥ ५ ॥

---

## मंत्र सहावा.

**अथ प्रतिसृप्याञ्जलौ मन्थमाधाय जपत्यमो नामास्यमा हि ते सर्वमिदँ स हि ज्येष्ठः श्रेष्ठो राजाऽधिपतिः स मा ज्यैष्ठ्यँ श्रैष्ठ्यँ राज्यमाधिपत्यं गमयत्वहमेवेदँ सर्वमसानीति ॥ ६ ॥**

अन्वय व अर्थः—अथ प्रतिसृप्य (नंतर अग्नीपासून थोडें मागें सरून) मन्थं अञ्जलौ आधाय 'अमः नाम असि; हि अमा ते इदं सर्वं' जपति हि (नंतर मंथ अंजलिपुटांत घ्यावा आणि 'हे प्राण, तुझें

हें मंथ-नाम अम आहे, कारण तुझ्यामुळें हें सर्व आहे') हि 'सः ज्येष्ठः, श्रेष्ठः, राजा, अधिपतिःहि( कारण हा प्राणभूत मंथ ज्येष्ठ आहे, श्रेष्ठ आहे, राजा आहे व अधिपति आहे) 'ज्येष्ठ्यं, श्रैष्ठ्यं, राज्यं आधिपत्यं सः मां गमयतु (हा प्राणभूत मंथ मला ज्येष्ठत्व, श्रेष्ठत्व, राजत्व व आधिपत्य प्राप्त करून देवो); अहं एव इदं सर्वं असानि इति (हे देवा, हें सर्व मीच होईन असें कर, असा हा मंत्र जपावा ॥६॥

अथ प्रतिसृप्याग्नेरीषदपसृत्याञ्जलौ मन्थमाधाय जपतीमं मन्त्रम् । अमो नामास्यमा हि ते । अम इति प्राणस्य नाम । अन्नेन हि प्राणः प्राणिति देह इत्यतो मन्थद्रव्यं प्राणस्यान्नत्वात्प्राणत्वेन स्तूयतेऽमो नामासीति । कुतः । यतोऽमा सह हि यस्मात्ते तव प्राणभूतस्य सर्वं समस्तं जगदिदमतः । स हि प्राणभूतो मन्थो ज्येष्ठः श्रेष्ठश्च । अत एव स राजा दीप्तिमानधिपतिश्चाधिष्ठाय पालयिता सर्वस्य । स मा मामपि मन्थः प्राणो ज्यैष्ठ्यादिगुणपूगमात्मनो गमयत्वहमेवेदं सर्वं जगदसानि भवानि प्राणवत् । इति शब्दो मन्त्रपरिसमाप्त्यर्थः ॥ ६ ॥

सिद्धांती—नंतर अग्नीपासून थोडेसें एकीकडे सरावें, संस्कृत झालेला मंथ आपल्या ओंजळीमध्यें घ्यावा आणि श्रुतीनें सांगितलेला हा मंत्र जपावा.

शिष्यः—येथेंच सांगितलेला मंत्र ?

सिद्धांतीः—होय; तो-मंत्र असाः 'हे मंथा ! तुझें नांव 'अम' असें आहे.

शिष्यः—भगवान्, 'अम' हें प्राणाचें नांव आहेना ?

सिद्धांतीः—होय. पण देहामध्यें प्राण रहातो, तो अन्नामुळेंच ? होयना ! आतां आपण सिद्ध केलेल्या मंथाचें द्रव्य अन्नात्मक आहे. तेव्हां देहामधील प्राणाच्या प्रतिष्ठेला कारण जो मंथ (मंथद्रव्य) त्यालाच श्रुतीनें प्राण (अम) असें म्हटलें. कार्यरूप असणाऱ्या कारणाला कार्यनाम देणें हा भाषेचा अलंकारच आहे. असो;—

पूर्वः—ही श्रुतीची नुसती प्रतिज्ञा झाली. प्रतिज्ञा म्हणजे सिद्धांत नव्हे.

सिद्धांतीः—हा सिद्धांत ठरविण्यासाठींच मंत्र पुढें म्हणतो, 'हे प्राणस्वरूपी मंथा, तुझ्यासह मात्र, तुझ्यामुळें मात्र, ह्या जगताचे सर्व व्यवहार चालतात व हें जगत्

विद्यमान असतें. अन्नच नसतें, तर जगद्व्यवहार कुठले ? असा प्रकार आहे, म्हणून अन्न हें प्राणाचें नांव आहे. प्राणरूपी मंथाचें हें स्तोत्र आहे. मंत्र सांगतोः ' हा मंथ वयानें सर्वज्येष्ठ, योग्यतेनें सर्वश्रेष्ठ, देदीप्यमान म्हणून राजा, सर्वत्र राहून सर्वांचें पालन करणारा म्हणून सर्वाधिपति असा आहे. हे देवी, हा मंथ मला ही उपासकाला आपलें श्रेष्ठत्व, ज्येष्ठत्व, राजत्व आणि आधिपत्य, हा सर्व गुणसमुदाय देवो ! माझ्या मध्यें हे सर्व सद्गुण अवतीर्ण होवोत; आणि प्राण जसा सर्व विश्वंभर आणि विश्वपालक आहे, सर्वविश्व आहे, तसा मी मात्र होवो !

शिष्यः—' इति 'शब्द जपाचा मंत्र संपला, असें दाखवितो.

सिद्धांतीः—होय. महत्त्वेच्छूनें याप्रमाणें करावें, अशीश्रुत्याज्ञा आहे ॥ ६ ॥

---

## मंत्र सातवा.

**अथ खल्वेतयर्चा पच्छ आचामति तत्सवितुर्वृणी-
महं इत्याचामति वयं देवस्य भोजनमित्याचामति
श्रेष्ठꣳ सर्वधातममित्याचामति तुरं भगस्य धीमहीति
सर्वं पिबति निर्णिज्य कꣳसं चमसं वा पश्चादग्नेः
संविशति चर्मणि वा स्थण्डिले वा वाचंयमोऽप्रसाहः
स यदि स्त्रियं पश्येत्समृद्धं कर्मेति विद्यात् ॥ ७ ॥**

**अन्वय व अर्थः—अथ खलु एतया ऋचा पच्छः आचामति** ( नंतर हा महत्त्वेच्छु ह्या ऋग्मंत्रानें पदशः आचमन—भक्षण करितो ) **' तत् सवितुः वृणीमहे ' इति आचामति** ( ' हें—भोजन—सवित्याला निवेदितों ' असा मंत्रखंड ह्मणून आचमन करितो—ग्रास घेतो— ); **' वयं देवस्य भोजनं ' इति आचामति** ( प्राणरूपी सवित्याला आह्मी हें भोजन निवेदितों ' असें ह्मणून २ रा घास घेतो ) **' श्रेष्ठं सर्वधातमं ' इति आचामति** ( हें अन्न सर्व स्तुत्य आणि सर्वाधार आहे ' असें ह्मणून ३ रा घास घेतो ). **तुरं भगस्य धीमही ' इति सर्वं पिबति** (' आह्मी सत्वर सवितृस्वरूपाचें चिंतन करितों ' असें ह्मणून सर्व मंथ प्राशितो—भ-

क्षितो ) **कंसं चमसं वा निर्णिज्य** ( नंतर तें कंसाकार किंवा चमसाकार पात्र प्रक्षाळून ) **अग्नेः पश्चात् चर्मणि वा स्थंडिले वा वाचंयमः अप्रसाहः सः–संविशति** ( अग्नीच्या पश्चिमभागीं अजिनासनावर अथवा केवळ भूमीवर वाग्यत होऊन व मनः संयम करून तो निजतो ) **सः यदि स्त्रियं पश्येत्, समृद्धं कर्म, इति विद्यात्** ( त्या महत्त्वेच्छूला जर स्वप्नांत स्त्रीदर्शन होईल, तर आपलें कर्म शुभफलदायी झालें, समृद्ध झालें असें त्यानें समजावें ) ॥ ७ ॥

अथानन्तरं खल्वेतया वक्ष्यमाणयर्चा पच्छः पादश आचामति भक्षयति, मन्त्रस्यैकैकेन पादेनैकैकं ग्रासं भक्षयति । तद्भोजनं सवितुः सर्वस्य प्रसवितुः । प्राणमादित्यं चैकीकृत्योच्यते । आदित्यस्य वृणीमहे प्रार्थयेमहि मन्थरूपम् । येनान्नेन सावित्रेण भोजनेनोपभुक्तेन वयं सवितृस्वरूपापन्ना भवेमेत्यभिप्रायः । देवस्य सवितुरिति पूर्वेण संबन्धः।श्रेष्ठं प्रशस्यतमं सर्वान्नेभ्यः सर्वाधातमं सर्वस्य जगतो धारयितृतममतिशयेन विधातृतममिति वा । सर्वथा भोजनविशेषणम् । तुरं त्वरं तूर्णं शीघ्रमित्येतत् ।भगस्य देवस्य सवितुःस्वरूपमिति शेषः । धीमहि चिन्तयेमहि विशिष्टभोजनेन संस्कृताः शुद्धात्मानः सन्त इत्यभिप्रायः । अथवा भगस्य श्रियः कारणं महत्त्वं प्राप्तुं कर्म कृतवन्तो वयं तद्धीमहि चिन्तयेमहीति सर्वं च मन्थलेपं पिबति निर्णिज्य प्रक्षाल्य कंसं कंसाकारं चमसं चमसाकारं वौदुम्बरं पात्रम् । पीत्वाऽऽचम्य पश्चादग्नेः प्राक्शिराः संविशति चर्मणि वाऽजिने स्थण्डिले केवलायां वा भूमौ । वाचंयमो वाग्यतः सन्नित्यर्थः । अप्रसाहो न प्रसह्यते नाभिभूयते स्त्र्याद्यनिष्टस्वप्नदर्शनेन यथा तथा संयतचित्तः सन्नित्यर्थः । स एवंभूतो यदि स्त्रियं पश्येत्स्वप्नेषु तदा विद्यात्समृद्धं ममेदं कर्मेति ॥ ७ ॥

सिद्धांतीः—याप्रमाणें आहुतीप्रदानानें संस्कारिलेला मंथ हातांत घेऊन मागच्या ६ व्या मंत्रांत विहित केलेला मंत्र जपला म्हणजे पुढें काय करावयाचें, तें ह्या मंत्र

सांगत आहे. जप संपल्यानंतर हातांत असलेल्या मंथाचें आचमन म्हणजे भक्षण कसें करावयाचें, तो विधि कसा तो पहा: ' तत्सवितुर्वृणीमहे, वयं देवस्य भोजनं, श्रेष्ठं सर्वधातमं-तुरं भगस्य धीमही ' असा ऋग्मंत्र आहे. स्वल्पविराम केले आहेत, ते या मंत्राचे पाद अथवा खंड दाखविण्यासाठीं होत: ' सर्वश्रेष्ठ आणि सर्वाधार असणारें हें भोजन आह्मी सवितादेवाला प्रार्थनापूर्वक निवेदतों ' असा या मंत्राचा स्थूल अर्थ आहे. असो; श्रुति ह्मणत आहे कीं या मंत्राचे पादांचा ( खंडांचा ) उच्चार करून महत्वेच्छूनें चार घासांत त्या मंथद्रव्याचें भक्षण करावें. ' तत्सवितुः वृणीमहे ' म्हणजे तें मंथरूप भोजन आह्मी सवित्याला प्रार्थनापूर्वक निवेदितों.

**शिष्यः**---सविता ह्मणजे प्रसविता, सर्वांची उत्पत्ति करणारा.

**पूर्वः**---असेल, पण येथें सूर्याचा काय संबंध ? मंथ प्राणाचें अन्न आहे, असें मघाशीं ठरलें ना ? मग सवित्याला कसला नैवेद्य येथें ?

**सिद्धांतिः**---प्राण म्हणजेच आदित्य. प्रश्नोपनिषदांत ठरविलेंच आपण हें. असो; प्राण व सविता एक आहेत, अशी भावना येथें आहे. असो; ' तत्सवितुर्वृणीमहे ' हा पाद म्हणून महत्त्वेच्छूनें पहिला घास घ्यावा. अभिप्राय हा कीं सवित्यास प्रिय असणारें पवित्र अन्न उपासकानें भक्षिल्यास तो ही सवितृस्वरूपाची प्राप्ति करून घेईल. ' वयं देवस्य भोजनं ' हा दुसरा चरण. हा म्हणून दुसरा घास घ्यावा. येथील 'देवस्य' पद मंत्रांतील ' सवितुः ' या पदाशीं व ' भोजन ' हें पद ' तत् ' या पदाशीं संबंद्ध आहे, हें सांगणें नलगे. ' श्रेष्ठं सर्वधातमं ' हा तिसरा चरण होय. यांत संस्कारलेल्या मंथरूपी अन्नाची स्तुति आहे. येथील विशेषणें मंत्रांतील ' भोजन ' या पदाशीं संबंद्ध आहेत. श्रेष्ठ म्हणजे सर्वस्तुतीला पात्र आणि ' सर्वधातमं ' म्हणजे सर्व जगताचा मुख्य व पहिला आधार असणारें अथवा जगतांची उत्पत्ति करणारें आदिकारण होय.

**शिष्यः**---' तुरं भगस्य धीमही ' हा चवथा पाद. हा ह्मणून चवथा घास घ्यावयाचा असेल ?

**सिद्धांतीः**---चवथा ह्मणजे शेवटचा घास. येथें मंथद्रव्य निःशेष झालें पाहिजे. असो; ' तुरं ' ह्मणजे शीघ्र. भगवान् देव जो प्रकाशवंत सविता त्याच्या स्वरूपाचें आह्मी लवकर ध्यानसिद्ध होण्यासाठीं आह्मी त्याचें ( तत्स्वरूपाचें ) दृढ व एकाग्र चिंतन करतों, असें उपासक ह्मणतो. या संस्कारित मंथद्रव्याच्या विशिष्ट भोजननें शुद्धचित्त झालेले उपासक सवितृध्यान करण्यास योग्य अधिकारी होतात, हें सांगावयास हवें काय ?

**शिष्यः**---' किंवा भगाचें, संपत्तीचें मुख्य कारण जें महत्त्व, तें प्राप्त करून घेण्याचें कर्म यथासांग केलेले आह्मी आतां महत्त्व प्रसिद्ध करून देण्याचा अनुग्रह

करणाऱ्या सवित्याचें ध्यान करितों ? असा होईल काय अर्थ भगवन् !

सिद्धांती:—शुद्धचित्तानें ध्यान केलें असें आह्मी म्हणतों; यथासांग कर्म केलेल्या कर्त्यानें ध्यान केलें, अथवा संकल्प केला, असें तूं म्हणणार; तात्पर्य एकच आहे. दोन्ही गोष्टी अवश्य आहेत. असो, याप्रमाणें पादशः मंत्रखंड म्हणून चवथ्या घासांत मंथ-द्रव्य संपवावें. नंतर तें औदुंबर पात्र कंसाकृति असो, या चमसाकृति असो—उपासकानें स्वच्छ धुवावें आणि आचमन करावें. नंतर अग्नीच्या पश्चिम दिशेकडे एखाद्या चर्मासनावर अथवा स्थंडिलाच्या एका भागीं शुद्ध भूमीवर शयन करावें. या वेळीं उपासकानें मूक व्रत धारण करावें व मनोनिग्रह उत्कृष्ट करावा.

शिष्य—'अप्रसाह म्हणजे पराभव न होण्याचें सामर्थ्य ना ? प्रहसन होत नाहीं, पराभव होत नाहीं जेथें तो अप्रसाह.

सिद्धांती—ठीक. दुष्ट स्त्रियादि अनिष्ट स्वप्नदर्शनाला भीत नाहीं, अशी स्थिति ती अप्रसाह स्थिति, निर्भयता होय. तात्पर्य, ज्ञानकर्मेंद्रियें स्तब्ध करून उपासकानें शयन करावें. शयन केल्यावर उपासकाला जर शुभ म्हणजे सौभाग्यसंपन्न स्त्रीचें दर्शन झालें, तर त्यानें समजावें कीं, आपलें कर्म यशस्वी झालें. महत्त्वेच्छूनें हें असें मंथकर्म करावें ॥ ७ ॥

---

## मंत्र आठवा.

**तदेष श्लोको यदा कर्मसु काम्येषु स्त्रियꣳ स्वप्नेषु पश्यति समृद्धिं तत्र जानीयात्तस्मिन्स्वप्ननिदर्शने तस्मिन्स्वप्ननिदर्शने ॥ ८ ॥**

**इति पञ्चमाध्यायस्य द्वितीयः खण्डः ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थ:**—**तत् एषः श्लोकः** ( वरील अभिप्रायाचें समर्थन करणारा श्लोक ) **यदा काम्येषु कर्मसु स्वप्नेषु स्त्रियं पश्यति, तत्र तस्मिन् स्वप्ननिदर्शने समृद्धिं जानीयात्** ( काम्य कर्में चाललीं असतां जेव्हां स्वप्नामध्यें स्त्रीदर्शन होतें, तेव्हां म्हणजे असें स्वप्नदर्शन झालें असतां कर्मसमृद्धि झाली, असें जाणावें ) ॥ ८ ॥

तदेतस्मिन्नर्थ एष श्लोको मन्त्रोऽपि भवति । यदा कर्मसु काम्येषु कामार्थेषु स्त्रियं स्वप्नेषु स्वप्नदर्शनेषु स्वप्नकालेषु वा पश्यति समृद्धिं तत्र जानीयात् । कर्मणां फलनिष्पत्तिर्भविष्यतीति जानीयादित्यर्थः । तस्मिन्स्त्र्यादिप्रशस्तस्वप्नदर्शने सतीत्यभिप्रायः । द्विरुक्तिः कर्मसमाप्त्यर्था ॥ ८ ॥

इति पञ्चमाध्यायस्य द्वितीयः खण्डः ॥ २ ॥

**सिद्धांतीः**—वरील मंत्राशीं समानार्थक हा दुसरा श्लोक म्हणजे मंत्र पहा. आपली कामना सिद्ध व्हावी, म्हणून उपासक काम्य कर्म करीत असतांना जर त्याला स्वप्नांतील प्रशस्त कथानकामध्यें एखादी स्त्री दिसली किंवा स्वप्नकालीं त्याला स्त्री दर्शनच झालें, तर त्यानें खुणगांठ बांधून ठेवावी कीं आपल्या कर्माची फलनिष्पत्ति आपल्या मनोगताप्रमाणें होणार. शुभस्त्रीचें मंगलदर्शन मात्र हवें. येथें द्विरुक्ति आहे, ती मंथकर्म समाप्त झालें, हें सुचविण्यासाठीं आहे ॥ ८ ॥

( पांचव्या अध्यायांतील दुसरा खंड संपला. )

---

## खंड तिसरा.

ब्रह्मादिस्तम्बपर्यन्ताः संसारगतयो वक्तव्या वैराग्यहेतोर्मुमुक्षूणामित्यत आख्यायिकाऽऽरभ्यते —

**सिद्धांतीः**—ब्रह्मापासून स्तंबापर्यंतच्या कोणत्याही स्थितींत संसाररूप दुःखद आहे, हें सांगायचें कशासाठीं? तर मुमुक्षुला वैराग्य व्हावें हा हेतु. असो; हा हेतु साधण्यासाठीं प्रथम एक आख्यायिका सांगतात—

---

### मंत्र पहिला.

**श्वेतकेतुर्हाऽऽरुणेयः पञ्चालाना*ँ* समितिमेयाय त*ँ* ह प्रवाहणो जैवलिरुवाच कुमारानु त्वाऽशिषत्पितेत्यनु हि भगव इति ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः**— आरुणेयः श्वेतकेतुः पञ्चालानां समितिं एयाय ( पंचालांच्या सभेमध्यें एकदां आरुणिपुत्रश्वेतकेतु गेला ) तं जैवलिः प्रवा-

**हणः उवाच ह** ( त्याला जीवलपुत्र प्रवाहण विचारता झाला ) **कुमार, त्वा पिता अनुशिषत् इति** ( कुमारा, तुला तुझ्या बापानें शिकवून तयार केला आहें काय ? ) **भगवः अनु हि** ( ' होय, मला पित्यानें शिकविलें आहे' ) ॥ १ ॥

श्वेतकेतुर्नामतो ह, इत्यैतिह्यार्थः । अरुणस्यापत्यमारुणिस्तस्यापत्यमारुणेयः पञ्चालानां जनपदानां समितिं सभामेयायाऽऽजगाम । तमागतवन्तं ह प्रवाहणो नामतो जीवलस्यापत्यं जैवलिरुवाचोक्तवान् । हे कुमारानु त्वा त्वामशिषदन्वशिषत्पिता । किमनुशिष्टस्त्वं पित्रेत्यर्थः । इत्युक्तः स आहानु ह्यनुशिष्टोऽस्मि भगव इति सूचयन्नाह ॥ १ ॥

सिद्धांती—मंत्रांत 'ह' आहे, त्यावरून पुढील गोष्ट वास्तविक घडली, असें होतें. अरुणाचा मुलगा आरुणि व नातु आरुणेय होय. श्वेतकेतु हें या नातवाचें नांव. हा श्वेतकेतु पंचाल देशांतील राजसभेला गेला. हा तरुण ब्राह्मण मोठ्या ऐटीनें येत आहे, असें पाहून जीवलाचा पुत्र, राजा प्रवहण, त्याला म्हणाला, ' हे कुमार, तुझ्या पित्यानें तुला विद्यासंपन्न केलें आहे काय ? '

शिष्यः०—' कुमार ' या नांवानें हांक मारिली, ती केवळ श्वेतकेतूचा अभिमान विगलित करण्यासाठींच असावी ! तरुण पुरुषाला ' मुला ' म्हणून संबोधिलें असतां रागच येतो. ठीक.

सिद्धांतीः—असो; श्वेतकेतु विनोदानेंच म्हणाला 'भगवन्, होय ' ह्मणजे माझ्या पित्यानें मला सर्व कांहीं शिकविलें आहे; असें आरुणेयानें सुचविलें. ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**वेत्थ यदितोऽधि प्रजाः प्रयन्तीति न भगव इति, वेत्थ यथा पुनरावर्तन्त ३ इति न भगव इति, वेत्थ पथोर्देवयानस्य पितृयाणस्य च व्यावर्तना ३ इति, न भगव इति ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः—** ( १ ) '**इतः प्रजाः यत् अधि प्रयन्ति, वेत्थ?' इति** (येथून जीव वरच्या कोणत्या प्रदेशांत जातात, हें तुला विदित आहे काय ?) '**न, भगवः' इति**( नाहीं, भगवन्, असें श्वेतकेतूनें उत्तर दिलें ) ( २ ) **यथा पुनः आवर्तन्ते, वेत्थ ? इति** ( ते जीव पुनः कोणत्या मार्गानें कसे परत ह्या लोकीं येतात, हें माहित आहे? ) '**न, भगवः' इति** ( नाहीं, भगवन्, मला तेंही माहित नाहीं ); ( ३ ) **देवयानस्य पितृयाणस्य च पथोः व्यावर्तना वेत्थ ? इति** ( देवयान व पितृयाण या दोन मार्गांची ताटातूट कोठें होते, हें ठाऊक आहे काय ? असें राजानें विचारिलें ) '**न, भगवः इति**' ( नाहीं, नाहीं, मला तेंही कांहीं ठाऊक नाहीं. असें आरुणेयानें उत्तर दिलें ) ॥ २ ॥

तं होवाच यदनुशिष्टोऽसि वेत्थ यदितोऽस्माल्लोकादध्यूर्ध्वं यत्प्रजाः प्रयन्ति यद्गच्छन्ति तत्किं जानीष इत्यर्थः । न भगव इत्याहेतरो न जानेऽहं तद्यत्पृच्छसि । एवं तर्हि वेत्थ जानीषे यथा येन प्रकारेण पुनरावर्तन्त इति । न भगव इति प्रत्याह । वेत्थ पथोर्मार्गयोः सहप्रयाणयोर्देवयानस्य पितृयाणस्य च व्यावर्तना व्यावर्तनमितरेतरवियोगस्थानं सह गच्छतामित्यर्थः । न भगव इति ॥ २ ॥

**सिद्धांती**—राजा म्हणाला, 'जर तूं सर्व–विद्या–संपन्न झाला आहेस, तर हा लोक सोडून दिल्यानंतर, मेल्यानंतर, ते कोणत्या ऊर्ध्व प्रदेशांत जाऊन राहतात, तो प्रदेश व त्यांचा जाण्याचा प्रकार, तुला माहित आहे ना ?' श्वेतकेतु म्हणाला, 'नाहीं महाराज' ते कोठें व कसे जातात, हें मी समजून घेतलें नाहीं. राजानें 'बरें' असें म्हणून दुसरा प्रश्न विचारिला. 'हे जीव पुनः कोणत्या मार्गानें व कसे परत येतात; पुनः मृत्युलोकीं कसे येतात, हें तुला ठाऊक आहे काय ?' श्वेतकेतूनें मान हालवून उत्तर दिलें, 'नाहीं; महाराज, तेंही मला ठाऊक नाहीं' राजानें तिसरा प्रश्न विचारला, 'देवयान व पितृयाण हे जे वर जाण्याचे दोन मार्ग आहेत, त्या मार्गांनीं जाण्यास सोबतीनें निघालेले लोकांस केव्हां व कशा निरनिराळ्या मार्गांनीं जावें लागतें, सारांश, हे मार्ग कोठें फुटतात, हें तरी निदान तुला विदित असलें पाहिजे. त्या तरुणानें उत्तर दिलें, 'नाहीं; तेंही मला विदित नाहीं.'

शिष्य—देवयान मार्गानें विद्वान् जातात व पितृयाण मार्गानें केवळ कर्मठ लोक जातात. नव्हे ? तेव्हां तिसरा प्रश्न असा कीं हा लोक सुटल्यानंतर विद्वानांची व कर्मठांची तातातूट कोठें होते ? असो, मरणप्राप्ति झाल्यानंतर जीव जातो कोठें, परत कसा येतो व दोन मार्गांची फाटाफूट केव्हां, कशी व कोठें होते, इत्यादि प्रश्नांचीं उत्तरें सर्वविद्यासंपन्न ह्मणून ऐटीनें आलेल्या श्वेतकेतूला देतां आलीं नाहींत.

सिद्धांती—थांब. अद्यापि दोन प्रश्नांचीं उत्तरें या पंडितंमन्याला देतां आलीं नाहींत, हेंही ठरवावयाचें आहे. ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**वेत्थ यथाऽसौ लोको न संपूर्यत ३ इति न भगव इति, वेत्थ यथा पञ्चम्यामाहुतावापः पुरुषवचसो भवन्तीति नैव भगव इति ॥ ३ ॥**

अन्वय व अर्थ:—‘ असौ लोकः यथा न संपूर्यते, इति वेत्थ ?’ ( तो पितृलोक पूर्ण भरून कां जात नाहीं, याचें कारण तूं जाणतोस ना ? हा राजाचा चवथा प्रश्न आहे. ) न, भगवः इति ( नाहीं, भगवन्, तें मी जाणत नाहीं असें आरुणेयानें सांगितलें ); यथा पंचम्यां आहुतौ आपः पुरुषवचसः भवन्ति, वेत्थ ? इति ( पांचवी आहुति ह्मणजे पांचव्या आहुतींतील जलें पुल्लिंगी कशीं होतात, हें तरी शिकला आहेस काय ? हा पांचवा राजप्रश्न आहे: ) ‘ न एव, भगवः ’ इति ( मुलानें उत्तर दिलें, तेंही मी शिकलों नाहीं ) ॥ ३ ॥

वेत्थ यथाऽसौ लोकः पितृसंबन्धी यं प्राप्य पुनरावर्तन्ते बहुभिः प्रयद्भिरपि येन कारणेन न संपूर्यत इति । न भगव इति प्रत्याह । वेत्थ यथा येन क्रमेण पञ्चम्यां पञ्चसंख्याकायामाहुतौ हुतायामाहुतिनिर्वृत्ता आहुतिसाधनाश्चाऽऽपः पुरुषवचसः पुरुष इत्येवं वचोऽभिधानं यासां हूयमानानां क्रमेण षष्ठाहुतिभूतानां ताः पुरुषवचसः पुरुषशब्दवाच्या भवन्ति पुरुषाख्यां लभन्त इत्यर्थः । इत्युक्तो नैव भगव इत्याह । नैवाहमत्र किंचन जानामीत्यर्थः ॥ ३ ॥

सिद्धांती--आतां राजाचा चवथा प्रश्न पहा: तो विचारतो: 'मुला, ज्या लोकीं गेलें असतां पुनः परत फिरावें लागतें, त्या पितृलोकास अनेक लोक प्रत्यहीं जात असतां, तो भरून कसा जात नाहीं, तेथें गर्दी कशी होत नाहीं, हें तुला माहित असावें.' श्वेतकेतूनें नकारार्थी उत्तर दिल्यानंतर राजानें पांचवा प्रश्न विचारला: 'पांचवी आहुति दिल्यानंतर त्या आहुतिसंस्कारानें अपूर्व उत्पन्न करणारीं, अदृष्टरूप, पुण्यापुण्यरूप झालेलीं म्हणजे आहुतिसाधन असणारीं जलें पुलिंगी कशीं होतात, जलें भाषायोगतः स्त्रीलिंगी असतांही त्यांस पुल्लिंगी नांव कसें मिळतें व हें नांव मिळाल्यावर साहाव्या आहुतीचें कार्य पुल्लिंगी झालेलीं जलें कसें करतात; ह्या प्रश्नाचें उत्तर तुला यथासांग देतां येईल काय?' हताश झालेल्या आरुणेय श्वेतकेतूनें उत्तर दिलें, 'मला यांपैकीं कोणत्या एकाही प्रश्नाचें उत्तर देतां येत नाहीं.' समजलें?

शिष्य:—भगवन्, हा पांचवा प्रश्नच मला मुळीं समजत नाहीं.

सिद्धांती—श्रुति त्याच प्रश्नाचें उद्घाटन प्रथमतः करणार आहे. आपण या अध्यायाचा चवथा खंड वाचूं लागलों, म्हणजे पांचवी आहुति म्हणजे काय, पुल्लिंगी होणें याचा अर्थ काय, सहावी आहुति याचा अर्थ काय, हें सर्व समजेल. आहुतिप्रक्षेपानें जलांस अपूर्वत्व प्राप्त होतें, त्या जलांत इतर वायुतेजादिकांचा अंतर्भाव होतो, इत्यादि गोष्टी, यांच्या आहुतींचा क्रम, हें सर्व आपण पुढील खंडांत समजून घेऊं. सध्यां ही श्वेतकेतूची गोष्ट मात्र कांहीं वेळ पुढें चालवूं या ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा.

**अथानु किमनुशिष्टोऽवोचथा यो हीमानि न विद्यात्कथꣳ सोऽनुशिष्टो ब्रुवीतेति स हाऽऽयस्तः पितुरर्धमेयाय तꣳ होवाचाननुशिष्य वाव किल मा भगवानब्रवीदनु त्वाऽशिषमिति ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थ:—"अथ अनु 'नु?' 'अनुशिष्टः' किं अवोचथाः; हि इमानि यः न विद्यात्, कथं सः 'अनुशिष्टः' ब्रूयात्" इति "असा प्रकार आहे तर 'मी विद्यासंपन्न आहें' असें कसें म्हणतोस, मुला? कारण, ज्या पंडिताला या पांचही प्रश्नांचीं उत्तरें देतां येत**

नाहींत, ज्याला ह्या गोष्टी ठाऊक नाहींत, त्यानें ' मी विद्वान् आहें ' असें समजूं नये व तसें बोलूंही नये " असे प्रवहणराजानें त्या मुलास स्पष्ट सांगितलें ) **स आयस्तः ह पितुः अर्धं एयाय** ( हतगर्व झाल्यामुळें खिन्न वदन झालेला श्रमी श्वेतकेतु आपल्या पित्याच्या वसतिस्थानीं गेला ) **तं उवाच ह** ( आणि त्याला म्हणाला ) " **अननुशिष्य किल मा** ( मला वस्तुतः सर्वविद्यासंपन्न न करितां ) ' **त्वा अनु-आशिषं** ' **इति भगवान् अब्रवीत्** " **इति** ( ' मीं तुला अन्वशिष्ट केला आहे, सर्व विद्यासपंन्न केला आहें ' असें आपण मला सांगितलेंत ! ) याप्रमाणें प्रक्रुद्ध श्वेतकेतु आपल्या बापाला म्हणाला. तात्पर्य, आपण सर्वज्ञ नसतांही ' तूं सर्वज्ञ आहेस ' असें बापानें व्यर्थ सांगितलें, हींच मुलाची तक्रार ! ॥ ४ ॥

**अथैवमज्ञः सन्किमनु कस्मात्त्वमनुशिष्टोऽसीत्यवोचथा उक्तवानसि । यो हीमानि मया पृष्टान्यर्थजातानि न विद्यान्न विजानीयात्कथं स विद्वत्स्वनुशिष्टोऽसीति ब्रुवीत । इत्येवं स श्वेतकेतू राज्ञाऽऽयस्त आयासितः सन्पितुरर्धं स्थानमेयायाऽऽगतवांस्तं च पितरमुवाचाननुशिष्यानुशासनमकृत्वैव मा मां किल भगवान्समावर्तनकालेऽब्रवीदुक्तवाननु त्वाऽशिषमन्वशिषं त्वामिति ॥ ४ ॥**

**सिद्धांती**—या पांचही प्रश्नांचीं उत्तरें श्वेतकेतूला देतां येत नाहींत, असें पाहून प्रवहण राजा त्या मुलास म्हणाला, ' बाबा, तुझें याप्रकारचें गंभीर अज्ञान असतांही ' मला बापानें सर्व कांहीं शिकविलें आहे ' असें कसें म्हणालास व म्हणतोस ! कारण ध्यानांत ठेव कीं मी हे जे प्रश्न तुला विचारले, त्या आतिभौतिक व तात्विक प्रश्नांचीं उत्तरें व त्यांतील विषय ज्याला मुळींच ठाऊक नाहींत, त्यानें ह्या असल्या पंडितसभेंत यावें व ' मी सर्व कांहीं शिकलों आहें, असें म्हणावें, हें कोणाला तरी शोभतें काय ! मी विचारलेल्या विषयाचें ज्याला ज्ञान नाहीं, त्याला ' मी सर्वज्ञ आहें, असें विद्वत्सभेंत कसें म्हणतां येईल व म्हटलें तरी ते टिकेल कसें ! याप्रमाणें राजानें चक्रावर धरल्यामुळें डोळे उंघडलेला श्वेतकेतू हतगर्व झाला. आपला झालेला हा योग्य अपमान पाहून त्याला आपल्या अज्ञानाच्या संबंधानें आयास म्हणजे श्रम झाले, तो खिन्नमनस्क झाला व तसाच

तडक आपला पिता राहत होता तेथें, आपल्या घरीं, आला. नंतर लागलीच बापाची गांठ घेऊन मुलगा म्हणाला, " बाबा, कित्येक गोष्टींत मला अज्ञानी ठेऊन समावर्तनाच्या वेळीं, माझी सोडमुंज झाली तेव्हां, मला आपण म्हणालात कीं, 'श्वेतकेतो, शिकवावयाचें होतें, तें मी सर्व तुला पढविलें आहे ।

**शिष्य०**—बापानें असें कसें केलें, ही श्वेतकेतूची तक्रार आहे. असो, त्यानें राजसभेंत झालेला वृत्तांत बापाला सांगितलाच असेल !

**सिद्धांती०**—पुढच्या मंत्रांत हें सर्व सांगितलें आहे कीं ! ॥ ४ ॥

---

## मंत्र पांचवा व सहावा.

**पञ्च मा राजन्यबन्धुः प्रश्नानप्राक्षीत्तेषां नैकंचनाशकं विवक्तुमिति स होवाच यथा मा त्वं तदैतानवदो यथाऽहमेषां नैकंचन वेद यद्यहमिमानवेदिष्यं कथं ते नावक्ष्यमिति ॥ ५ ॥**

**स ह गौतमो राज्ञोऽर्धमेयाय तस्मै ह प्राप्तायार्हां चकार स ह प्रातः सभाग उदेयाय तं होवाच मानुषस्य भगवन्गौतम वित्तस्य वरं वृणीथा इति स होवाच तवैव राजन्मानुषं वित्तं;यामेव कुमारस्यान्ते वाचमभाषथास्तामेव मे ब्रूहीति स ह कृच्छ्री बभूव ॥ ६ ॥**

**अन्वय व अर्थः**—**राजन्यबन्धुः मा पंच प्रश्नान् अप्राक्षीत् इति** ( त्या दुष्ट व माझा अपमान करणाऱ्या राजानें मला पांच प्रश्न विचारिले ) **तेषां एकंचन विवक्तुं न अशकं** ( त्यांपैकीं एका सुद्धां प्रश्नाचें सोपपत्तिक अथवा निरुपपत्तिक उत्तर मला देतां आलें नाहीं ) **इति** ( असें मुलानें बापाला, आरुणीला सांगितलें ) **सः उवाच** ( बाप ह्मणाला ) **यथा मा त्वं तदा एतान् अवदः** ( हे प्रश्नपंचक जें तूं मला सांगितलेंस, तसेंच त्या या प्रश्नपंचकाचीं उत्तरें देण्याला तूं असमर्थ आहेस.

असें ही सांगितलेंस, त्याप्रमाणें मीही असमर्थ आहें– ) **यथा अहं एतेषां एकंचन न वेद** ( कारण यांपैकीं मला एकाही प्रश्नाचें उत्तर येत नाहीं ) **यदि अहं इमान् अवेदिष्यं, कथं ते न अवक्ष्यं ? इति** ( जर मला ह्या प्रश्नांचीं उत्तरें माहित असतीं, तर मी तुला पूर्वींच सांगितलीं नसतीं, असें होणें शक्य आहे का ? तात्पर्य, मला हें अति-भौतिक शास्त्र ठाउकच नाहीं असें बाप ह्मणाला ) ॥ ५ ॥

अन्वय व अर्थः—**सः गौतमः राज्ञः अर्धं एयाय ह** ( नंतर तो एकटाच आरुणिऋषी राजाच्या राजधानीस जाऊन राजाकडे गेला ) **प्राप्ताय तस्मै अर्हां चकार** ( या आलेल्या अतिथीचा राजानें योग्य सत्कार केला ) **प्रातः सः सभागः उदेयाय ह** ( दुसरे दिवशीं प्रातःकाळीं तो पूज्य आरुणि सभास्थित राजाकडे गेला ) **तं उवाच ह भगवन् गौतम, 'मानुषस्य वित्तस्य वरं वृणीथाः' इति** ( राजा ह्मणालाः हे गौतम, भगवन्, मनुष्याला उपलब्ध असलेली कोणती वस्तु आपल्याला अपेक्षित आहे ती मागावी ' ) इति ( ही राजप्रार्थना होती ) —ती ऐकून–" **सः उवाच** ( गौतम ह्मणाला ) **राजन् तव एव मानुषं वित्तं** ( ' मानवी संपत्ति तुलाच लखलाभ असो, राजा ! ) **कुमारस्य अन्ते यां एव वाचं अभाषथाः तां एव मे ब्रूहि " इति** ( माझ्या पुत्राच्या जवळ जी भाषा आपण बोललात, जे प्रश्न माझ्या पुत्राला ' कुमार ' ह्मणून आपण केलेत, तेच प्रश्न व त्यांचीं उत्तरें मला आपण कृपा करून सांगावीं " असें गौतम ह्मणाला ) **सः कृच्छ्री बभूव ह** ( हें ऐकून तो राजा दुःखी झाला ) ॥ ६ ॥

यतःपञ्च पञ्चसंख्याकान्प्रश्नान्राजन्यबन्धू राजन्या बन्धवोऽस्येति राजन्यबंधुः स्वयं दुर्वृत्त इत्यर्थः। अप्राक्षीत्पृष्टवांस्तेषां प्रश्नानां नैकंचनैकमपि नाशकं न शक्तवानहं विवक्तुं विशेषेणार्थतो निर्णेतुमित्यर्थः स होवाच पिता यथा मा मां वत्स त्वं तदाऽऽगतमात्र

एवैतान्प्रश्नानवद उक्तवानसि तेषां नैकंचनाशकं विवक्तुमिति तथा मां जानीहि त्वदीयाज्ञानेन लिङ्गेन मम तद्विषयमज्ञानं जानीहीत्यर्थः । कथं यथाऽहमेषां प्रश्नानामेकंचनैकमपि न वेद न जान इति । यथा त्वमेवाङ्गैतान्प्रश्नान्न जानीषे तथाऽहमप्येतान्न जान इत्यर्थः । अतो मय्यन्यथाभावो न कर्तव्यः । कुत एतदेवं यतो न जाने यद्यहमिमान्प्रश्नानवेदिष्यं विदितवानास्मि कथं ते तुभ्यं प्रियाय पुत्राय समावर्तनकाले पुरा नावक्ष्यं नोक्तवानस्मी-त्युक्त्वा स ह गौतमो गोत्रतो राज्ञो जैवलेरर्धं स्थानमेयाय गतवान् । तस्मै ह गौतमाय प्राप्तायार्हामर्हणां चकार कृतवान् । स च गौतमः कृतातिथ्य उषित्वा परेद्युः प्रातःकाले सभागे सभां गते राज्ञ्युदेयाय । भजनं भागः पूजा सेवा सह भागेन वर्तमानो वा सभागः पूज्यमानोऽन्यैः स्वयं गौतम उदेयाय । राजानमुद्गतवान् तं होवाच गौतमं राजा मानुषस्य भगवन्गौतम मनुष्यसंबन्धिनो वित्तस्य ग्रामादेर्वरं वरणीयं कामं वृणीथाः प्रार्थयेथाः । स हो-वाच गौतमस्तवैव तिष्ठतु राजन्मानुषं वित्तम् । यामेव कुमारस्य मम पुत्रस्यान्ते समीपे वाचं पञ्चप्रश्नलक्षणामभाषथा उक्तवानसि तामेव वाचं मे मह्यं ब्रूहि कथयेत्युक्तो गौतमेन राजा स ह कृच्छ्री दुःखी बभूव । कथं त्विदमिति ॥ ५ ॥ ६ ॥

**सिध्दांती**--मुलगा काय म्हणतो तें ऐका. ' बाबा ! आपल्याला राजा म्हणवून घेणारा तो दुर्वृत्त प्रवहण—

**शिष्य०**—दुर्वृत्त ! राजन्यबंधु म्हणजे राजकीय पुरुष आहेत बंधु ज्याचे, असा अर्थ ना !

**सिद्धांती**—मुलाचा अपमान झाला होता, म्हणून तो रागवश होऊन बोलत आहे हे विसरूं नको. असो, मुलगा म्हणाला, त्या स्वतः दुष्ट अरुणाच्या राजानें मला एकापुढें एक असे पांच प्रश्न विचारले; पण त्यांपैकीं एका तरी प्रश्नाचें विवरण मला करितां आलें असलें तर शपथ ! बाबा ! एका देखील प्रश्नाचें मला सार्थ व सोपपत्तिक विवरण करितां आलें नाहीं; आणि तुम्ही तर माझें समावर्तन केलेंत ! काय हें ! तेव्हां आरुणि म्हणाला, बाळा; ज्या अज्ञानाला वश झाला असल्यामुळें तूं आतांच येण्याबरोबर सांगि

तलेल्या प्रश्नांचीं उत्तरें तुला देतां आलीं नाहींत, तेंच अज्ञान माझेठिकाणींहि आहे, असे ते प्रश्न ऐकतांच मला समजलें. जशीं तुला ह्या प्रश्नांचीं उत्तरें देतां आलीं नाहींत तशींच मलाही देतां आलीं नसतीं.तात्पर्य, ह्या तुझ्या अज्ञानाच्या प्रदर्शनानें माझें अज्ञान उघडकीस आलें हें जाण. कारण, मला तरी यांपैकी कोणत्या प्रश्नाचें उत्तर देतां येत आहे ? जसा ह्या प्रश्नासंबंधानें तूं अज्ञानी, तसाच मीही अज्ञानी आहे, बाळ ! मला विद्या अवगत असूनही मीं ती तुला शिकविली नाहीं, असें मात्र मनांत समजूं नकोस. कारण, उघड आहे कीं, तुझ्यासारखा प्रिय व जिज्ञासु पुत्र असतांना, मला येत असलेली विद्या तुला मी शिकविणार नाहीं, समावर्तनकालीं ' तूं अधीतविद्य झालास,' असें म्हणतांना मला अवगत असलेली विद्या मी लिकवून ठेवीन, असें होणें शक्यही नाहीं व संभवनीयही नाहीं. समजलास ? मला ही विद्या खरोखरी अवगत नाहीं. याप्रमाणें पुत्राचें समाधान करून तो गौतमगोत्रोत्पन्न आरुणि प्रवहण राजाच्या राजसभेंत गेला. योग्य ब्राह्मण आला आहे, असें पाहून राजानें त्याचा आदरपुरःस्सर सत्कार केला, व त्यास ठेऊन घेतलें. नंतर दुसरे दिवशीं प्रातःकाळीं हा राजमान्य गौतम राजसभेस गेला, तों राजा तेथें आलेलाच होता. सभेमध्यें जाऊन तेथें विद्यमान असणारा तो सभाग होय. हें राजाचें विशेषण आहे.

**शिष्यः**—'भाग' या शब्दाचा अर्थ पूजा असा आहेना ?

**सिद्धांतीः**—तसा अर्थ केला तर 'पूजेसह असणारा, तो सभाग होईल.'

तात्पर्य, दुसऱ्यांनीं ज्याची योग्य व सादर अर्हणा केली आहे, सत्कार केला आहे तो सभाग होय. असा विग्रह करून 'सभाग' हें गौतमाचें विशेषण करावें. असो; गौतम हा योगक्षेमाच्या इच्छेनें आलेला आहे असा तर्क करून राजा म्हणाला, मनुष्याला योग्य असून उपलब्ध होण्यासारखी कोणतीही वस्तु देण्याविषयीं आपण मला आज्ञा करा, ग्राम, धन काय हवें, तें तुम्हांस देतों. गौतम म्हणाला; मी कृतकृत्य आहें, मला मानुषी संपत्ती नकोच आहे. ती तुझी तुला असूं दे. मी धनलोभानें आलों नाहीं. तर माझ्या पुत्रकुमाराला जें त्वां पंचप्रश्नक विचारलें व त्याला निरुत्तर केलें, त्याचीं उत्तरें मलाही ठाऊक नाहींत. म्हणून ती विद्याभिक्षा मागण्यास मी आलों आहे. ही भिक्षा द्याल. हें ऐकून राजा कष्टी झाला. कां ते पुढच्या मंत्रांत समजेल. ॥५॥६॥

---

## मंत्र सातवा.

**तꣳह चिरं वसेत्याज्ञापयांचकार तꣳ होवाच**
**यथा मा त्वं गौतमावदो यथेयं न प्राक्त्वत्तः पुरा**

**विद्या ब्राह्मणान्गच्छति तस्मादु सर्वेषु लोकेषु क्षत्रस्यैव प्रशासनमभूदिति तस्मै होवाच ॥ ७ ॥**

**इति पञ्चमाध्यायस्य तृतीयः खण्डः ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थः— ' चिरं वस ' इति तं आज्ञापयांचकार ह** ' ( येथें दीर्घकाळ वास्तव्य करा ' अशी राजानें गौतमास आज्ञा केली ) **तं उवाच ह** (आणि नंतर त्याला म्हणाला) **गौतम यथा मां त्वं अवदः** ( ज्याअर्थीं तुम्ही माझ्याशीं ' ही विद्या मला शिकीव ' असें बोललां ) **यथा इयं विद्या त्वत्तः प्राक् ब्राह्मणान् पुरा न गच्छति** ( आणि ज्या अर्थीं ही विद्या पूर्वीं ब्राह्मणांस अवगत झालेली नाहीं ) **तस्मात् उ** ( म्हणून ) **सर्वेषु लोकेषु क्षत्रस्य एव पुरा प्रशासनं अभूत इति** (सर्व लोकांस-भुवनांत-पूर्वीं क्षत्रियांचें मात्र शिक्षण-या विद्येमध्यें होतं-असें-असें स्पष्ट होतें ) **तस्मै उवाच ह** ( नंतर तो राजा गौतमास विद्या सांगता झाला ) ॥ ७ ॥

स ह कृच्छ्रीभूतोऽप्रत्याख्येयं ब्राह्मणं मन्वानो न्यायेन विद्या वक्तव्येति मत्वा तं ह गौतमं चिरं दीर्घकाळं वसेत्येवमाज्ञापयांचकाराऽऽज्ञप्तवान् । यत्पूर्वं प्रत्याख्यातवान्राजा विद्यां यच्च पश्चाच्चिरं वसेत्याज्ञप्तवान्, तन्निमित्तं ब्राह्मणं क्षमापयति हेतुवचनेनोक्त्या । तं होवाच राजा सर्वविद्यो ब्राह्मणोऽपि सन्यथा येन प्रकारेण मा मां हे गौतमावदस्त्वं तामेव विद्यालक्षणां वाचं मे ब्रूहीत्यज्ञानात्तेन त्वं जानीहि । तत्रास्ति वक्तव्यं यथा येन प्रकारेणेयं विद्या वाक्त्वत्तो ब्राह्मणान्न गच्छति न गतवती, न च ब्राह्मणा अनया विद्ययाऽनुशासितवन्तः, तथैतत्प्रसिद्धं लोके यतस्तस्मादु पुरा पूर्वं सर्वेषु लोकेषु क्षत्रस्यैव क्षत्रजातेरेवानया विद्यया प्रशासनं प्रशास्तृत्वं शिष्याणामभूद्बभूव । क्षत्रियपरम्परयैवेयं विद्यैतावन्तं काळमागता । तथाऽप्यहमेतां तुभ्यं वक्ष्यामि त्वत्संप्रदानादूर्ध्वं ब्राह्मणा-

न्गमिष्यति । अतो मया यदुक्तं तत्क्षन्तुमर्हसीत्युक्त्वा तस्मै होवाच विद्यां राजा ॥ ७ ॥

इति पञ्चमाध्यायस्य तृतीयः खण्डः ॥ ३ ॥

सिद्धांतिः—राजाला भारी वाईट वाटलें, हें मागें सांगितलेंच. वाईट वाटण्याचें कारण असें कीं, तो गौतम 'मला अतिभौतिक विद्या शिकीव' असें म्हणाला होता; ब्राह्मणाला विद्या शिकविण्याचा प्रसंग क्षत्रियाला यावा हेंच वाईट, असें त्याला वाटलें व या ब्राह्मणास तर शिकविण्याशिवाय परत पाठविण्याची सोय नव्हती.

पूर्व०—त्याला नकारार्थी उत्तर देऊन वाटेला लावावयाचा होता त्यानें!

सिद्धांतीः—तसें कसें करितां येणार ? ब्राह्मण अधिकारीसा दिसला म्हणून त्यास 'नाहीं' म्हणण्याची तर सोय नव्हती, तेव्हां कोणीही झाला तरी त्याला न्यायानें (म्हणजे विद्याशिक्षणाच्या नियमांनींच) विद्या शिकविली पाहिजे, असें जाणून त्याला राजा म्हणाला कीं 'दीर्घकाल-एक वर्ष तरी तुम्ही येथें व्रतस्थ राहिलें पाहिजे, तात्पर्य येथें एक वर्ष राहा' अशी राजानें आज्ञा केली.

शिष्य०—ब्राह्मणाला राजा आज्ञा करितो, हें आश्चर्यच आहे!

सिद्धांती—प्रत्येक न्याय्य गोष्टीला न्याय्य हेतु असतोच. तो कोणता हें आतांच स्पष्ट होईल.

पूर्व०—पण पूर्वीं गौतमाचा मुलगा आला होता, त्यावेळीं अतिभौतिक प्रश्न करून ब्रह्मवेद्येचें स्वरूप—निदान अतिभौतिक विद्येचें स्वरूप-राजानें दिग्दर्शित केलेंच होतें आणि आतां विद्याप्रवचनाचा प्रसंग आला, तेव्हां 'दीर्घकाल माझ्या येथें राहा' अशी राजा आज्ञा करितो, हें काय ?

सिद्धांती०—ठरलेल्या नियमान्वयें विद्या शिकलीच पाहिजे. असो. प्र तुतचा शिष्य ब्राह्मण आहे, असें पाहून राजानें कमी जास्ती बोलल्याची व 'विद्याप्रतिपादन-साठीं गुरुत्वाचा अधिकार आपल्याकडे आला ह्या विपरीत गोष्टीची क्षमा स्वतः मागितली. राजा म्हणाला. "गौतमा, ब्राह्मण ह्मणजे सर्वविद्यासंपन्न असलाच पाहिजे, अशी सर्वसाधारण समजूत आहे, आतां आपण ब्राह्मण असतांही 'राजा, अतिभौतिक विद्येचें स्वरूप सांगणारें प्रवचन मला ऐकूंद्' असें आपण मला ह्मणाला, त्यावरून त्या विद्येच्या तरी संबंधानें आपलें अज्ञान पूर्ण आहे, असें मला दिसलें. त्यावरून विद्येनें श्रेष्ठ व वर्णानें सर्वश्रेष्ठ असून ही विद्या आपणां ब्राम्हणांस वश झाली नाहीं, असें दिसतें. आपल्या पूर्वीं ही विद्या ब्राम्हणांस अधिगत झाली नाहीं; पूर्वीं ब्राम्हणास ही विद्या शिकविलीच जात नसे, हें सर्वप्रसिद्धच आहे. यावरून असें स्पष्ट सिद्ध होतें कीं,

क्षत्रियजातीनें मात्र शिक्षण या विद्येच्या द्वारा पूर्वीपासून आतांपर्यंत होत आलें आहे. शिक्षक क्षत्रिय व शिष्यही क्षत्रिय असत व असतात. तात्पर्य आतांपर्यंत क्षत्रियपरंपरेनें मात्र या विद्येचें अध्ययन व अध्यापन चालत आलें आहे; तथापि हा संप्रदाय सोडून मी ही विद्या आपल्यास सांगून देतों, आपण या विद्येचा स्वीकार केल्यानंतर शिष्यपरंपरेनें ती ब्राह्मणवर्णांत प्रकट होईल, यांत शंका नाहीं असो. झालेलें वर्तमान आपल्यास कळविलें आहे; व प्रथम आपल्या पुत्राचा मी धिःकार केला, याचें कारणहा कळविलें आहे. कृपा करून त्या पहिल्या धिःकाराचीही मला क्षमा करण्यास आपण समर्थ आहांत." याप्रमाणें विद्येच्या अज्ञानास्तव धिःकार व विद्याप्राप्तीस्तव अवश्य असणारा जो चिरवास त्याची आज्ञा, यांचीं कारणें सांगून आपल्या हातून धिःकार झाला याबद्दल राजास दुःख कां झालें, ह्याचेंही कारण सांगून राजानें विधिपूर्वक गौतमाला विद्या सांगितली.

पूर्व०---तात्पर्य, क्षत्रियपरंपरेनें ही अध्यात्म विद्या प्रकट झाली. बरें, पण गौतमपुत्राला जे प्रश्न विचारिले, त्याचीं उत्तरें कोठें आहेत ?

सिद्धांती---येथें लक्षांत ठेवावयाचें तें हें कीं गौतमानें ही विद्या आपल्या पुत्रास ही शिकविली नाहीं, यावरून व ह्या विद्येच्या प्राप्तीस्तव गौतमानें क्षत्रियाचें शिष्यत्व पत्करिलें, यावरून ही विद्या ब्राह्मणांत नव्हती, असें स्पष्ट होतें. पुढच्या खंडांत तेंच प्रकरण श्रुतीनें आरंभिलें आहे. ॥ ७ ॥

तिसरा खंड समाप्त.

---

## पांचवा अध्याय खंड चौथा.

---

पञ्चम्यामाहुतावाप इत्ययं प्रश्नः प्राथम्येनापाक्रियते । तदपाकरणमन्वितरेषामपाकरणमनुकूलं भवेदिति । अग्निहोत्राहुत्योः कार्यारम्भो यः स उक्तो वाजसनेयके —" तं प्रति प्रश्नाः । उत्क्रान्तिराहुत्योर्गतिः प्रतिष्ठा तृप्तिः पुनरावृत्तिर्लोकं प्रत्युत्थायी " इति । तेषां चापाकरणमुक्तं तत्रैव —" ते वा एते आहुती हुते उत्क्रामतस्ते अन्तरिक्षमाविशतस्ते अन्तरिक्षमेवाऽऽहवनीयं कुर्वाते वायुं समिधं मरीचीरेव शुक्रामाहुतिं ते अन्तरिक्षं तर्पयतस्ते तत उत्क्रामत इत्याद्येवमेव पूर्ववद्दिवं तर्पयतस्ते तत आवर्तेते । इमामा-

विश्य तर्पयित्वा पुरुषमाविशतः । ततः स्त्रियमाविश्य लोकं प्रत्युत्थायी भवति " इति । तत्राग्निहोत्राहुत्योः कार्यारम्भमात्रमेवंप्रकारं भवतीत्युक्तम् । इह तु तं कार्यारम्भमग्निहोत्रापूर्णविपरिणामलक्षणं पञ्चधा प्रविभज्याग्नित्वेनोपासनमुत्तरमार्गप्रतिपत्तिसाधनं विधित्सन्नाह—

**सिद्धांती**—श्रुतीनें प्रथम शेवटच्या प्रश्नाचा निर्णय करण्यास आरंभ केला आहे. 'पांचव्या आहुतींत जें संस्कृत जल असतें' इत्यादि स्वरूपाचा प्रश्न राजानें गौतमपुत्रास केला होता, त्याचा निर्णय श्रुति प्रथम करीत आहे.

**पूर्व०**—हें काय ? जसे प्रश्न घातले, तशींच त्यांचींही उत्तरें द्यावीं.

**सिद्धांती**—तें खरें. पण या पांचव्या प्रश्नाचें निराकरण प्रथम केलें असतां बाकीच्या प्रश्नांचें निराकरण स्वल्पतर होईल, पांचव्या प्रश्नाचें उत्तर इतर प्रश्नांच्या सोडवणुकीला पुष्कळ अनुकूल होईल, असें जाणून श्रुतीनें पाचवा प्रश्न प्रथम घेतला आहे. अर्थाच्या धोरणानेंच प्रवचन चालवावें, असा शिक्षणपद्धतींतील न्याय आहे. असो; अग्निहोत्रांतील आहुतींचा कार्यारंभ कसा होतो, त्याचें स्वरूप वाजसनेयामध्यें असें सांगितलें आहे. ऐकाः याज्ञवल्क्यानें जनकाला या कार्यारंभासंबंधानें प्रश्न विचारले आहेत. आहुतींसह जीवांची उत्क्रांति, त्यांची गति, त्यांची प्रतिष्ठा, त्यांची तृप्ति, त्यांची या लोकांत पुनः आवृत्ति व ह्या भूमिलोकांतून पुनः स्वर्लोंत जाणें, असे ते सहा प्रश्न आहेत. या सर्व प्रश्नांचीं निराकरणीं उत्तरेंही तेथेंच जनकानें दिलीं आहेत.

**शिष्य०**—तीं काय उत्तरें आहेत ?

**सिद्धांती०**—अग्निहोत्रस्थ आहुतिरूप अन्नाचा अपूर्व परिणाम ह्मणजे हें जगत् होय, असें वाजसनेयकांत सांगितलें आहे. कसें तें पहाः प्रातःकाळीं व सायंकाळीं ज्या आहुती वैदिक देतात, त्या हा लोक सोडून वर जातात; जाणें ही उत्क्रांति, परलोकीं गमन ही त्यांची गति, परलोकीं राहणें ही प्रतिष्ठा, ह्या प्रतिष्ठित आहुतींनीं आपल्या आश्रयदात्यास दिलेलें सुख ती तृप्ति; तृप्ति संपल्यावर या लोकीं परत येणें ती प्रत्यावृत्ति आणि परत येऊन पुरुषशरीरांत प्रवेश करणें व त्या पुनर्जन्मित जीवाला उत्थानशील करणें हें प्रत्युत्थान होय.

**शिष्य**—कांहींएक समजलें नाहीं, भगवन् !

**सिद्धांती**—हें पहाः अग्निहोत्र घेऊन सकाम कर्मठ प्रतिदिनीं ( सकाळीं व सायंकाळीं ) दोन आहुती देतात ना ? त्या आहुती एक अपूर्व ( अदृष्ट फळ ) उत्पन्न करि-

तात; आणि तें फळ यजमानानें स्थूलदेह सोडून लिंगदेह धारण केला, म्हणजे त्या यजमानलिंगदेहाचा आश्रय करितें. यजमान सकाम कर्मठ असतो, तेव्हां तो पितृयाण मार्गानें जातो. त्याबरोबरच या आहुती ( अपूर्व फलरूपानें ) जातात. धूमादि मार्गानें यजमान अंतरिक्षांत प्रविष्ट झाला कीं या तेथें असतातच, आणि तेथें यजमानास अनुकूल असें वर्तन करून त्या अंतरिक्षालाच आहवनीयाग्नीचें स्वरूप देतात.

**शिष्य०**—पण तेथें समिधा कोठील ?

**सिद्धांती**—अग्नीला प्रज्वलित करणारा वायु ही समिधा आणि तेथें असणारे सूर्यकिरण ही आहुति ! हा यज्ञ झाला व अंतरिक्ष तृप्त झालें कीं यजमानाचें कर्म फलोन्मुख होतें; व तेथून दिव्य म्हणजे चंद्रात्मक स्वर्गलोकीं जाण्यासाठीं यजमान निघतो. ( उत्क्रमण करितो. ) यजमानासह आहुती निघतात, व यजमानासह द्युलोकीं प्रवेश करून तेथेंही द्युलोकाला आहवनीय, सूर्यसमिधा इत्यादि जमवून ( या प्रकारें ) यजमानाला उपकारक होतात. तात्पर्य, तेथें यजमानाला कृतकर्माचें सुख देतात. याप्रमाणें कर्मक्षय होईपर्यंत सुखी यजमान तेथें राहतो व क्षीण पुण्य झाला कीं यजमान मृत्युलोकीं येऊं लागतो, तेव्हां त्या लिंगदेहाबरोबरच त्या आहुतींही जलरूपानें या लोकीं येतात. येथें आल्यावर यजमानलिंगदेहाला व्रीह्यादि अन्नामध्यें प्रविष्ट करवून त्याच्यासह या आहुती पुत्रोत्पादनसमर्थ पुरुषाच्या शरीरांत शिरतात. तेथून त्यांचा यजमान लिंगदेहासह स्त्रीशरीरांत प्रविष्ट होतो आणि याच आहुती गर्भस्थ यजमानाला कर्मानुष्ठाला योग्य असा देह प्राप्त करून देतात. पुढें देहप्राप्तीनंतर यजमान पारलौकिक कर्म ( स्वर्ग देणारें कर्म ) करून शेवटीं स्वर्गलोकीं जाण्याला योग्य होतो. हीं जनकानें उत्तरें दिलीं. वाजसनेयप्रकरणांत याप्रमाणें कार्यारंभ मात्र अशा अशा प्रकारें होतो, असें सांगितलें आहे; पण छांदोग्यांत त्याहून निराळा प्रकार सांगितला आहे. अग्निहोत्राहुतींचा जो अपूर्व परिणाम होतो ( अदृष्ट उत्पन्न होतें ) त्याचे पांच विशेष प्रकार कोणते, ते वर्णिले आहेत व उत्तरायणमार्गाची ( देवयानाची ) प्राप्ति करून घेण्याची इच्छा असणाऱ्यानें अग्नीची उपासना कशी करावी हेंही सांगितलें आहे. ऐका:

---

## मंत्र पहिला.

**असौ वाव लोको गौतमाग्निस्तस्याऽऽदित्य एव समिद्रश्मयो धूमोऽहरर्चिश्चन्द्रमा अङ्गारा नक्षत्राणि विस्फुलिङ्गाः ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—गौतम, असौ वाव लोकः अग्निः** ( तो द्युलोक हा अग्निच आहे ) **तस्य आदित्यः एव समित्; रश्मयः धूमः; अहः अर्चिः; चंद्रमा अंगाराः; नक्षत्राणि विस्फुलिंगाः**(त्या अग्नीची आदित्य हा समिधा, सूर्यकिरण हा धूम, अहर्देवता ही ज्वाला, चंद्र हा निखारे आणि नक्षत्रें ह्या ठिणग्या होत. ॥ १ ॥

असौ वाव लोको गौतमाग्निरित्यादि । इह सायंप्रातरग्निहोत्राहुती हुते पयआदिसाधने श्रद्धापुरःसरे आहवनीयाग्निसमिद्धूमार्चिरङ्गारविस्फुलिङ्गभाविते कर्त्रादिकारकभाविते चान्तरिक्षक्रमेणोत्क्रम्य द्युलोकं प्रविशन्त्यौ सूक्ष्मभूते अप्समवायित्वादप्शब्दवाच्ये श्रद्धाहेतुत्वाच्च श्रद्धाशब्दवाच्ये तयोरधिकरणोऽग्निरन्यच्च तत्संबन्धं समिदादीत्युच्यते । या चासावग्न्यादिभावनाऽऽहुत्यौः साऽपि तथैव निर्दिश्यते । असौ वाव लोकोऽग्निर्हे गौतम यथाऽग्निहोत्राधिकरणमाहवनीय इह । तस्याग्नेर्द्युलोकाख्यस्याऽऽदित्य एव समित्तेन हीद्धोऽसौ लोको दीप्यते । अतः समिन्धनात्समिदादित्यः । रश्मयो धूमस्तदुत्थानात्, समिधो हि धूम उत्तिष्ठति । अहरर्चिः प्रकाशसामान्यात्, आदित्यकार्यत्वाच्च । चन्द्रमा अङ्गाराः । अहःप्रशमेऽभिव्यक्तेः । अर्चिषो हि प्रशमेऽङ्गारा अभिव्यज्यन्ते । नक्षत्राणि विस्फुलिङ्गाश्चन्द्रमसोऽवयवा इव विप्रकीर्णत्वसामान्यात् ॥ १ ॥

सिद्धांतीः—हे गौतम ऋषे ! तो द्युलोक हाच आहवनीय अग्नि आहे.

पूर्व०—असें काय! पांचव्या प्रश्नांतील अग्निहोत्राहुतींचा विचार सोडून स्वर्गलोकाची कथा कशाला ?

सिद्धांती—चांगला प्रश्न विचारलात. नीट लक्ष देऊन ऐका. आह्मी काय ह्मणतों तें या लोकीं जे अग्निहोत्री सांजसकाळ आहुती समर्पितात, ते श्रद्धापुरःसर स्वकर्म करीत असतात. आहुती ही पयादि साधनांनीं सिद्ध झालेल्या असतात. आहवनीय अग्नि, समिधा, धूम, ज्वाला, अंगार ( निखारे ), ठिणग्या, या शास्त्रोक्त गोष्टींनीं त्या आहुतींचा प्रक्षेप कोणी तरी पोक्त यजमान करीत असतो. अशारीतीनें संस्कृत झालेल्या दोन्ही आहुती अंतरिक्ष मार्गानें उत्क्रमण करून द्युलोकांत प्रवेश करितात. तेथें त्यांस अति

सूक्ष्म रूप प्राप्त होतें. या रूपांत जलाचा अंश पुष्कळसा असतो; म्हणून त्यांस 'आप्' अशी संज्ञा मिळते आणि श्रद्धापुरस्सर हवन झालेलें असतें म्हणून श्रद्धेचें कार्य ज्या दोन आहुती त्यांसच श्रद्धा म्हणतात. ह्या आहुतींचें अधिकरण म्हणजे आश्रयस्थान अग्निच होय. आतांच मघाशीं जें द्युलोकांतील कल्पनासिद्ध अग्निहोत्र उल्लेखिलें, त्याचेंच अवतरण येथें आहे समजलें ? आहुतींचेंच हें प्रकरण आहे. अग्निहोत्र म्हटलें कीं तत्संबंधीं आहवनीयाग्नि, समिधा इत्यादिकांचा अवतार सहजच होतो तात्पर्य, आहुतींसंबंधानें जी अग्न्यादि भावना येथें आहे, तशीच द्युलोकांत आहे, असा श्रुतीनें निर्देश केला आहे. ही भावना जशी भाविली, तसाच श्रुति तिचा निर्देश करीत आहे ऐका —

**शिष्य०**—येथें आतां मंत्रार्थाला प्रारंभ व्हावयाचा. ठीक आहे.

**सिद्धांती**—राजा म्हणतो, हे ऋषे ! आहवनीयामध्यें जसा अग्निहोत्राचें अधिकरण या लोकीं अग्नि आहे, त्याचप्रमाणें तो द्युलोक हा अग्नि आहे. ह्या द्युलोक नामक अग्नीची आदित्य ही समिधा आहे. हें श्रद्धाभावित द्युलोकीय अग्निहोत्र आहे. येथें द्युलोक हा अग्नि व आदित्य ही समिधा आहे.

**शिष्य०**—कारण आदित्यप्रकाशामुळेंच तो द्युलोक तेजस्वी व देदीप्यमान होतो. तो अग्नि प्रज्वलनाला उपकारक होतो, म्हणून त्याला 'समिध' म्हटलें. समिधेमुळें प्रज्वलित होऊं पाहणाऱ्या अग्नीला प्रथम धूमरूपानें समिधा प्रकट करिते, तसला धूम म्हणजे आदित्याचे किरण होत. समिधेपासून धूम, तसे सूर्यापासून अग्निकिरण. अह-म्हणजे दिवस ही ज्वाला, कारण ज्वाला व दिन हे दोन्ही प्रकाशवंत असून दोघांचा उत्पादक आदित्य आहे. बरें, पण येथें अंगार कोणते ?

**सिध्दांती**—चंद्र म्हणजेच अंगार ( निखारे ) ! कारण दिवस मावळला म्हणजेच चंद्र स्पष्टत्वानें प्रकाशतो. दिवसां तो निखाऱ्यासारखाच ताम्रवर्ण असतो. त्याला शांतता आली म्हणजे निखारे दिसतात, तसाच चंद्राचा प्रकार; म्हणून तो अंगार होय; आणि चंद्राचे अवयवच जणो असून त्यापासून विभक्त झालेलीं नक्षत्रें तीं म्हणजे निखाऱ्यापासून विभक्त होणाऱ्या ठिणग्या होत. याप्रमाणें द्युलोक हा आहवनीय, सूर्य ही समिध, किरण धूम, अह ही ज्वाला, चंद्र हा अंगार आणि नक्षत्रें म्हणजे विस्फुलिंग ( ठिणग्या ) असें हें श्रद्धासिद्ध रूपक तयार झालें, या रूपकात्मक द्युलोकीय अग्निहोत्राचा उपयोग पुढील मंत्रांत स्पष्ट होईल ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**तस्मिन्नेतस्मिन्नग्नौ देवाः श्रद्धां जुह्वति तस्या आहुतेः सोमो राजा संभवति ॥ २ ॥**

**इति पञ्चमाध्यायस्य चतुर्थः खण्डः ॥ ४ ॥**

अन्वय व अर्थः—तस्मिन् एतस्मिन् अग्नौ देवाः श्रद्धां जुह्वति; तस्याः आहुतेः सोमः राजा संभवति ( त्या ह्या द्युलोकाग्नीमध्यें यजमानाचे प्राण श्रद्धेची आहुति देतात; व त्या आहुतीपासून सोमराजा संभवतो ) ॥ १ ॥

तस्मिन्नेतस्मिन्यथोक्तलक्षणेऽग्नौ देवा यजमानप्राणा अग्न्यादिरूपा अधिदैवतम् । श्रद्धामग्निहोत्राहुतिपरिणामावस्थारूपाः सूक्ष्मा आपः श्रद्धाभाविताः श्रद्धा उच्यन्ते । "पञ्चम्यामाहुतावापः पुरुषवचसो भवन्ति" इत्यपां होम्यतया प्रश्ने श्रुतत्वात् । "श्रद्धा वा आपः श्रद्धामेवाऽऽरभ्य प्रणीय प्रचरन्ति" इति च विज्ञायते । तां श्रद्धामब्रूपां जुह्वति । तस्या आहुतेः सोमो राजाऽपां श्रद्धाशब्दवाच्यानां द्युलोकाग्नौ हुतानां परिणामः सोमो राजा संभवति । यथर्ग्वेदादिपुष्परसा ऋगादिमधुकरोपनीतास्त आदित्ये यशआदिकार्यं रोहितादिरूपलक्षणमारभन्त इत्युक्तं तथेमा अग्निहोत्राहुतिसमवायिन्यः सूक्ष्माः श्रद्धाशब्दवाच्या आपो द्युलोकमनुप्रविश्य चान्द्रं कार्यमारभन्ते फलरूपमग्निहोत्राहुत्योः । यजमानाश्च तत्कर्तार आहुतिमया आहुतिभावनाभाविता आहुतिरूपेण कर्मणाऽऽकृष्टाः श्रद्धाप्समवायिनो द्युलोकमनुप्रविश्य सोमभूता भवन्ति । तदर्थं हि तैरग्निहोत्रं हुतम् । अत्र त्वाहुतिपरिणाम एव पञ्चाग्निसंबन्धक्रमेण प्राधान्येन विवक्षित उपासनार्थं न यजमानानां गतिः । तां त्वविदुषां धूमादिक्रमेणोत्तरत्र वक्ष्यति विदुषां चोत्तरां विद्याकृताम् ॥ २ ॥

इति पञ्चमाध्यायस्य चतुर्थः खण्डः ॥ ४ ॥

सिद्धांती—मागच्या मंत्रांत जो द्युलोकाग्नि सिद्ध केला, त्या अग्नीमध्यें देव ह्मणजे यजमानाचे प्राण—

पूर्व०—थांबा. येथें यजमानप्राण कोठून आले ?

सिद्धांतीः—तुम्ही भारी विसरभोळे. अहो ! मागच्या मंत्रावरील अवतरणांत सांगितलेंना कीं, अग्निहोत्र्यानें हा लोक सोडून लिंगदेहद्वारा द्युलोकापर्यंतची यात्रा आक्रमिली म्हणजे पूर्वकर्मानुसार तो द्युलोकीं राहून आहवनीय अग्नीची स्थापना करितो म्हणून ? त्याचें अपूर्व त्याबरोबर असतें म्हणून त्याला द्युलोकांतील कर्म करितां येतें व सुखें

होतें. असो, या द्युलोकस्थ कर्माचा कर्ता म्हणजे यजमानाचा प्राण ( लिंगदेह ) होय. येथे हे अग्निरूपानें असतात. त्यांचें अधिदैवत स्वरूप म्हणजे अग्न्यादि होय. हे देव श्रद्धेची आहुति देतात.

**पूर्व०**—म्हणजे श्रद्धेला जाळून टाकितात ?

**सिध्दांती:**—होय. पण तुम्ही समजतां, त्या अभिप्रायानें नाहीं. येथें अग्निहोत्रांत ज्या आहुति दिल्या जातात, त्यांचा परिणाम म्हणजे त्यांस अति सूक्ष्म स्वरूप, जलरूप, प्राप्त होणें हें होय. त्या आहुति श्रद्धापुरःसर दिलेल्या असतात म्हणून त्यांस श्रद्धा म्हटलें, श्रद्धेनें संस्कृत झालेल्या आहुतींस श्रद्धा म्हणणें युक्तच आहे.

**पूर्व०**—अहो ! आहुती जलरूप होतात काय ?

**सिद्धांती:**—' आपांच्या ' समवायानें ( बाहुल्यानें ) त्या सिद्ध होतात, म्हणून त्यांस ' आप ' ही संज्ञा मिळते, असें आपण ठरविलें, नव्हे ? शिवाय, " पांचव्या आहुतींत ' आप ' पुल्लिंगी होतात ' असा प्रश्नच आहे व त्यांतच आप ही होम्यवस्तु आहे, असें गृहीत केलें आहे. तसेंच, ' श्रद्धा म्हणजेच पय, सोम इत्यादि द्रव्यांनीं सिद्ध झालेलें " आप " होय. हे ' आप ' ( जल ) श्रद्धेला जन्म देऊन वाढवितात; आणि मग संचार करितात ' अशी तैत्तिरियकांत ग्वाही दिली आहे. असो; येथें दिलेल्या आहुती जलरूपानें अतिसूक्ष्मरूप होतात. त्यांसच श्रद्धा म्हणतात. या आपरूपी श्रद्धेचें हवन यजमानाचे प्राण करितात. तात्पर्य द्युलोकांतही यजमानाचे प्राण श्रद्धापुरःसर हवन करितात. ह्या द्युलोकांतील हवनांमध्यें आहुतींचा ( श्रद्धाशब्दानें संबोधिलेल्या सूक्ष्मरूपी जलांचा ) परिपाक म्हणजे सोमराजाची उत्पत्ति होय. तुम्हांस आठवत असेलच कीं याच उपनिषदांत वर्णिलेल्या मधुविद्येंत ...

**शिष्य०**—होय, होय. ऋचा, यजु इत्यादि मधुकरांनीं आणलेलीं आहुति-जलें ऋग्वेद यजुर्वेदादि पुष्पांचा मधुररस होऊन तींच ( पय, आप इत्यादि द्रवसाधनांनीं सिद्ध झालेलीं ) जलें सूर्यस्वरूपामध्यें रोहित (लाल) श्वेतादि रूपांनीं यशादि कार्यें आरंभितात हें श्रुतीनें सांगितलेलें मला चांगलें आठवत आहे. मग त्याचे येथें काय ?

**सिद्धांती:**—त्या ह्या अग्निहोत्रांतील आहुतींनीं घटित झालेलीं व श्रद्धा या नांवानें वाच्य ( ओळख पटण्यासारखीं ) असलेलीं हीं अतिसूक्ष्म जलें द्युलोकांत अनुप्रवेश करून चांद्रकार्याला आरंभ करितात.

**शिष्य:**—चांद्र म्हणजे चंद्रासारखें ?

**सिद्धांती**—इतकेंच नव्हे. चंद्रासमीप राहून चंद्राचेंच जणो शरीर धारण करितात. हें येथें हवन केलेल्या आह्वनीयाग्नींतील आहुतींचें फल आहे. तात्पर्य या आहुती द्युलोकीं चंद्ररूप होतात.

पूर्व०—पण यापासून यजमानाला लाभ कोणता ?

सिद्धांतीः—आहुती देणारे यजमानही आहुतिमयच होतात. आहुतीमुळें स्तुत्यत्वास पावलेले, आहुतीस आश्रय देऊन पुनः त्यांच्या आश्रयानें आहुत्यनुसार जाणारे हे यजमान स्वाहुतिकर्मानें आकर्षित होतात. ते इतके कीं, श्रद्धेनें-पयःसोमांनीं-घटित झालेल्या आहुतींचें स्वरूप (आहुतींच्या संस्कारांनीं शुद्ध व संस्कृत स्वरूप) धारण करून ते द्युलोकांत प्रवेश करितात; व आहुतींप्रमाणें सोमरूप होतात।

पूर्व०—सोमरूप ?

शिष्य०—होय. त्यासाठीं तर त्यांनीं अग्निहोत्राचें अनुष्ठान केलेलें असतें.

पूर्व०—यावरून यजमान द्युलोकाला जातो, असें ठरलें.

सिद्धांतीः—नाहीं, नाहीं. श्रुति ज्या पांच अग्नींचें क्रमशः वर्णन करणार आहे, त्या क्रमांत आहुतींचा परिपाक कोणत्या स्वरूपाचा होतो, हें प्रधानत्वानें येथें सांगावयाचें आहे.

पूर्व०—कशाला ?

शिष्य०—अहो ! उपासनेसाठीं। भगवन्! पांच अग्नी श्रुति सांगणार आहे, त्यांतलाच द्युलोकाग्नि ना ?

सिद्धांतीः—होय. असो; हें प्रकरण आहुति परिपाकाचें आहे. येथें उत्क्रांत झालेल्या यजमान प्राणांची गति सांगण्याचा हेतु मुख्य नाहीं.

शिष्य०—ही गति केव्हां सांगणार ?

सिद्धांतीः—अविद्वान् जीव धूमादि क्रमानें ह्मणजे पितृयाणमार्गानें जातो व विद्वान् कर्मकर्ता जीव उत्तरमार्गानें अर्चिरादि क्रमानें जातो, हें पुढें याच अध्यायाच्या १० व्या खंडांत श्रुति सांगणार आहे. उत्तरमार्ग विद्याकृत असतो व दक्षिणमार्ग अविद्याकृत असतो, हेंही आपल्यास तेथेंच समजेल. ॥ २ ॥

चवथा खंड समाप्त.

---

## पांचवा अध्याय खंड पांचवा.

---

### मंत्र पहिला.

**पर्जन्यो वाव गौतमाग्निस्तस्य वायुरेव समिदभ्रं धूमो विद्युदर्चिरशनिरंगारा ह्रादनयो विस्फुलिङ्गाः ॥ १ ॥**

अन्वय व अर्थः—गौतम, पर्जन्यः वाव अग्निः; तस्य वायुः एव समित्; अभ्रं धूमः; विद्युत् अर्चिः; अशनिः अंगाराः; ह्रादनयः विस्फुलिंगाः ( हे गौतम, पर्जन्य हा अग्नि, ह्याची वायु ही समिध, अभ्र हा धूम, विद्युत्-वीज-ही ज्वाला, अशनि हे अंगार, आणि मेघगर्जना विस्फुलिंग ह्मणजे ठिणग्या होत ) ॥ १ ॥

द्वितीयहोमपर्यायार्थमाह—पर्जन्यो वाव पर्जन्य एव गौतमाग्निः पर्जन्यो नाम वृष्ट्युपकरणाभिमानी देवताविशेषः । तस्य वायुरेव समित् । वायुना हि पर्जन्योऽग्निः समिध्यते । पुरोवातादिप्राबल्ये वृष्टिदर्शनात् । अभ्रं धूमो धूमकार्यत्वाद्धूमवच्च लक्ष्यमाणत्वात् । विद्युदर्चिः । प्रकाशसामान्यात् । अशनिरङ्गाराः । काठिन्याद्विद्युत्संबन्धाद्वा । ह्रादनयो विस्फुलिङ्गाः । ह्रादनयो गर्जितशब्दाः मेघानां विप्रकीर्णत्वसामान्यात् ॥ १ ॥

सिद्धांती—पहिला द्युलोकाग्नीचा पर्याय झाला. आतां पर्जन्याग्नीच्या दुसऱ्या पर्यायाला आरंभ करितात. येथें पर्जन्य हा अग्नि होय.

पूर्व०—खाशी सोय ! अग्नि विझविणारा पर्जन्य आग्नि होतो ना ?

सिद्धां—अहो, येथें पर्जन्य ह्मणजे पर्जन्याच्या उपकरण सामग्रीवर ज्या देवतेचें अधिष्ठातृत्व आहे, ती विशिष्ट देवता होयः असो, येथें पर्जन्यदेवता हा अग्नि आहे. या देवतेला अनुकूल असून तिची पुष्टि करणारा वायु, ही समिध—

शिष्य०—बरोबर; पुरोवातादि वायु जोरानें वाहूं लागले कीं, पर्जन्य येतो, भगवन् ! या रूपकांत अभ्राला धूमत्व मिळावें. कारण त्याची उत्पत्ति धूमांपासून ( धुराच्या रूपानें असणाऱ्या जळापासून ) होते; व तीं अभ्रें धुरासारखींच दिसतात. तसेंच विद्युत्प्रकाशही ज्वाला व्हावी; कारण उभयत्र प्रकाश आहे.

पूर्व०—तसेंच, अशनि म्हणजे कडाडून पडणारी वीज ( वज्र ) हे अंगार (निखारे) व्हावे. कारण अशनि भारी कठिण म्हणजे अभंग असून विजेचा व त्याचा नित्य संबंध आहे. शेवटीं गर्जना विस्फुलिंग व्हावी. ठिणग्या दूर दूर पळतात, तसे मेघ विस्कळीत होऊन एकमेकांवर आपटले, म्हणजे गर्जना होते.

सिद्धांतीः—वाहवा ! छान रूपक झालें. हा दुसरा पर्याय आहे. पहिला द्युलोकाग्नि व दुसरा पर्जन्याग्नि. येथें आहुति कोणती, ती पुढील मंत्रांत निवेदिली आहे ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**तस्मिन्नेतस्मिन्नग्नौ देवाः सोमꣳ राजानं जुह्वति तस्या आहुतेर्वर्षꣳ संभवति ॥ २ ॥**

**इति पञ्चमाध्यायस्य पञ्चमः खण्डः ॥ ५ ॥**

**अन्वय व अर्थः**—तस्मिन् एतस्मिन् अग्नौ देवाः सोमं राजानं जुह्वति; तस्याः आहुतेः वर्षं संभवति ( त्या ह्या पर्जन्याग्नीमध्यें देव ह्मणजे यजमानप्राण हे सोमराजाची आहुति देतात. पर्जन्याची उत्पत्ति या आहुतीपासून होते ) ॥ २ ॥

तस्मिन्नेतस्मिन्नग्नौ देवाः पूर्ववत्सोमं राजानं जुह्वति । तस्या आहुतेर्वर्षं संभवति । श्रद्धाख्या आपः सोमाकारपरिणता द्वितीये पर्याये पर्जन्याग्निं प्राप्य वृष्टित्वेन परिणमन्ते ॥ २ ॥

इति पञ्चमाध्यायस्य पञ्चमः खण्डः ॥ ५ ॥

सिद्धांती०—अर्थ सरळ आहे. यजमानप्राण ( यजमानाचे लिंग शरीरांत राहणारा जीव ) मागच्या मंत्रांत सिद्ध झालेल्या सोमराजाची आहुति देतात. पर्जन्याची उत्पत्ति या सोमात्मक आहुतीपासून होते. श्रद्धा नामक जलें सोम झाल्यानंतर त्याची आहुती द्वितीय पर्यायांतील पर्जन्याग्नींत दिली ह्मणजे तीच आहुति वृष्टिरूपानें प्रकट होते. तात्पर्य, आहुति-जलें सोमरसांत व सोमरस वृष्टींत परिणत होतात. ॥ २ ॥

पांचवा खंड समाप्त.

---

## पांचवा अध्याय खंड सहावा.

---

## मंत्र पहिला.

**पृथिवी वाव गौतमाग्निस्तस्याः संवत्सर एव समिदाकाशो धूमो रात्रिरर्चिर्दिशोऽङ्गारा अवान्तरदिशो विस्फुलिङ्गाः ॥ १ ॥**

अन्वय व अर्थः—गौतम, पृथ्वी वाव अग्निः; तस्याः संवत्सर एव समित्; आकाशः धूमः; रात्रिः अर्चिः; दिशः अंगाराः; अवांतरदिशः विस्फुलिंगाः ( या तिसऱ्या पर्यायांत—पृथ्वी हा अग्नि, संवत्सर समिध, आकाश धूम, रात्रि ज्वाला, मुख्य चार दिशा हे अंगार आणि अवांतर दिशा हे विस्फुलिंग होतात ) ॥ १ ॥

**पृथिवी वाव गौतमाग्निरित्यादि पूर्ववत् । तस्याः पृथिव्याख्यस्याग्नेः संवत्सर एव समित् । संवत्सरेण हि कालेन समिद्धा पृथिवी व्रीह्यादिनिष्पत्तये भवति । आकाशो धूमः पृथिव्या इवोत्थित आकाशो दृश्यते । यथाऽग्नेर्धूमः । रात्रिरर्चिः पृथिव्या ह्यप्रकाशात्मिकाया अनुरूपा रात्रिः । तमोरूपत्वात् । अग्नेरिवानुरूपमर्चिः । दिशोऽङ्गारा उपशान्तत्वसामान्यात् । अवान्तरदिशो विस्फुलिङ्गाः क्षुद्रत्वसामान्यात् ॥ १ ॥**

**सिद्धांती**—गौतमा ! हा तिसरा पर्याय. याचें नांव पृथ्वी नामक अग्नि. येथें पृथ्वी हा अग्नि. संवत्सरात्मक कालरूपी समिध पेटली म्हणजे व्रीह्यादि धान्यांची उत्पत्ति होते. पृथ्वीपासून जणो जन्म घेऊन वरवर जातेंसें दिसणारें आकाश हा पृथ्व्यग्नीचा धूम होय. तसेंच स्वतः अप्रकाश असणाऱ्या पृथ्वीला ( पृथ्व्यग्नीला ) अनुरूप असणारी रात्र ( रात्रिज्वाला ) ही ज्वाला होय.

**शिष्य०**—जसा अग्नि, तशीच ज्वाला ! उभयतां ही तमोरूप ( अंधारमय ) आहेत. तसेंच उपशांत म्हणजे अग्नि शांत झाल्यानंतरचे निखारे म्हणजे प्रायः अदृश्य असणाऱ्या मुख्य चार दिशा हे या अग्नीचे निखारे आणि याच्या क्षुद्र ठिणग्या म्हणजे अगदींच अंधेरांत असणाऱ्या अवांतर ( कमी महत्वाच्या ) दिशा होत. आग्नेय, नैर्ऋत्य इत्यादि अवांतर दिशांस रोज संध्येमध्यें आपण नमन करितोंच ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**तस्मिन्नेतस्मिन्नग्नौ देवा वर्षं जुह्वति तस्या आहुतेरन्नꣳ संभवति ॥ २ ॥**

**इति पञ्चमाध्यायस्य षष्ठः खण्डः ॥ ६ ॥**

**अन्वय व अर्थः—तस्मिन् एतस्मिन् अग्नौ देवाः वर्षं जुह्वति; तस्याः आहुतेः अन्नं संभवति** ( अर्थ सरळ आहे. या तिसऱ्या पर्यायांतील पृथ्व्यग्नींत यजमानप्राण वर्षाची ( वृष्टीची ) आहुति देतात व त्या आहुतीपासून अन्न उत्पन्न होतें ) ॥ २ ॥

तस्मिन्नित्यादि समानम् । तस्या आहुतेरन्नं व्रीहियवादि संभवति ॥ २ ॥

इति पञ्चमाध्यायस्य षष्ठः खण्डः ॥ ६ ॥

सिद्धांती०—अर्थ सरळ व स्पष्ट आहे, येथील ' वर्ष ' नामक आहुतीचा पृथ्व्यग्नीमधील विपाक अन्नरसामर्थ्ये होतो ॥ २ ॥

सहावा खंड समाप्त.

---

## अध्याय पांचवा खंड सातवा.

---

### मंत्र पहिला.

**पुरुषो वाव गौतमाग्निस्तस्य वागेव समित्प्राणो धूमो जिह्वाऽर्चिश्चक्षुरंगाराः श्रोत्रं विस्फुलिंगाः ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—गौतम, पुरुषः वाव अग्निः; तस्य वाक् एव समित्; प्राणः धूमः; जिव्हा अर्चिः; चक्षुः अंगाराः; श्रोत्रं विस्फुलिंगाः** ( या चवथ्या पर्यायांत पुरुष हा अग्नि, त्याचे वाणी समिध, प्राण धूम, जिव्हा ज्वाला, नेत्र निखारे आणि कर्ण हे विस्फुलिंग होत )॥ १ ॥

पुरुषो वाव गौतमाग्निः । तस्य वागेव समित् । वाचा हि मुखेन समिध्यते पुरुषो न मूकः । प्राणो धूमो धूम इव मुखान्निर्गमनात् । जिह्वाऽर्चिर्लोहितत्वात् । चक्षुरङ्गारा भास आश्रयत्वात् । श्रोत्रं विस्फुलिङ्गा । विप्रकीर्णत्वसाम्यात् ॥ १ ॥

सिद्धांती:—ऐका: राजा गौतमास म्हणतो: गौतमा, चवथा पर्याय ऐक. या पर्यायांत पुरुष अग्नि होतो. मग त्याची वाणी ही समिध—

शिष्य०—हें कसें ?

सिद्धांती—अरे ! वाणीनेंच पुरुष आपले स्वरूप प्रकाशित करतोना ! समिधा अग्नीला पुष्ट करून प्रज्वलित करतात; तशीच आपली वाणी ( बोलणें ) पुरुषाचें (या अग्नीचें ) स्वरूप प्रकट करिते. मुक्या जीवाचें स्वरूप समजतें काय ? असो; मुखांतून ( वाणीच्या द्वारानें ) श्वास चालतो, तो समिधेपासून निघणारा धूम होय. पुनः; या मुखांत असणारी लाल जीभ ही अग्निज्वाला; नेत्र हे अंगार—

शिष्य०—कारण निखाऱ्यासारखेच हे थोडेबहुत मात्र प्रकाशित असतात. शिवाय उभयताही प्रकाशाच्या आश्रयानें राहत असून प्रकाशाला आश्रय देणारे असतात. होयना ? तसेंच विभक्त होऊन राहणारे आपले कान म्हणजे या अग्नीचें विभक्त विस्फुलिंग होत !

सिद्धांती०—शाबास ! आतां येथील आहुति कोणती ती पहा:—॥ १ ॥

---

### मंत्र दुसरा.

**तस्मिन्नेतस्मिन्नग्नौ देवा अन्नं जुह्वति तस्या आहुते रेतः संभवति ॥ २ ॥**

**इति पञ्चमाध्यायस्य सप्तमः खण्डः ॥ ७ ॥**

**अन्वय व अर्थ:—तस्मिन् एतस्मिन् अग्नौ देवाः अन्नं जुह्वति; तस्यः आहुतेः रेतः संभवति** ( अर्थ सरळ आहे. या पुरुषाग्नीस यजमानप्राण अन्नाची—रेत उत्पन्न करणाऱ्या-अन्नाची आहुति देतात. ॥ २ ॥

**समानमन्यत् । अन्नं जुह्वति व्रीह्यादिसंस्कृतम् । तस्या आहुते रेतः संभवति ॥ २ ॥**

**इति पञ्चमाध्यायस्य सप्तमः खण्डः ॥ ७ ॥**

सिद्धांती०—भावार्थ स्पष्ट आहे.मागच्या सारखेंच रूपक लावावयाचें.येथें संस्कारानें शुद्ध झालेल्या(भाजून व शिजवून तयार झालेल्या) अन्नाची आहुति यजमानप्राण देतात व या हवनापासून रेतोत्पत्ति होते ॥ २ ॥

सातवा खंड समाप्त.

---

## पांचवा अध्याय, आठवा खंड.

### मंत्र पहिला.

**योषा वाव गौतमाग्निस्तस्या उपस्थ एव समिद्यदु-पमन्त्रयते स धूमो योनिरर्चिर्यदन्तः करोति तेऽङ्गारा अभिनन्दा विस्फुलिङ्गाः ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः**—गौतम, योषा वाव अग्निः; तस्याः उपस्थः एव समित्; यत् उपमंत्रयते, स धूमः; योनिः आर्चिः; यत् अंतः-करोति, ते अंगाराः; अभिनंदाः विस्फुलिंगाः (हा पांचवा पर्याय होय. येथें स्त्री हा अग्नि; तिचें उपस्थ ही समिध, तिच्याशीं जो मंत्र करितो, बोलतो चालतो, तो धूम; तिची योनि ही ज्वाला; प्रजनन ते अंगार आणि जो कांहीं आनंद होतो, ते विस्फुलिंग होत) ॥ १ ॥

योषा वाव गौतमाग्निः । तस्या उपस्थ एव समित् । तेन हि सा पुत्राद्युत्पादनाय समिध्यते । यदुपमन्त्रयते स धूमः । स्त्रीसंभवादुपमन्त्र-णस्य । योनिरर्चिर्लोहितत्वात् । यदन्तः करोति तेऽङ्गारा अग्निसंबन्धात् । अभिनन्दाः सुखलवा विस्फुलिङ्गाः क्षुद्रत्वात् ॥ १ ॥

सिद्धांतीः—हा शेवटचा पर्याय आहे. द्यु, पर्जन्य, पृथ्वी, पुरुष, हे अग्नीचे चार पर्याय सांगून आतां पांचव्या पर्यायांत स्त्रीरूपी अग्नीचें वर्णन श्रुति करीत आहे. अर्थात् या अग्नीची समिध म्हणजे तिचें उपस्थ. ह्याच इंद्रियाच्या प्रभावानें तिला पुत्रादि उत्पत्तीची प्रेरणा होऊन ती आतुर होते व कामाग्नि पेटतो. प्रथम जें रतिप्रेरक गुह्य भाषण होतें, तो धूम होय. हें उपमंत्रण, गुह्य भाषण, स्त्रीपासूनच होणें शक्य. तिची योनि ही ज्वाला, कारण योनीचा रंग लोहित म्हणजे लाल असतो. पुढें जें काम संभोगकार्य होतें, ते अंगार होत. स्त्रीला अग्नित्व प्राप्त झालें म्हणजे संभोगाला अंगारत्व यावें, हें नीट आहे. या वेळीं आनंदाचा यत्किंचित् आभास जो विषयानंद होतो, ते विस्फुलिंग होत. ठिणग्या क्षुद्र आणि येथील क्षणभंगुर आनंद ही क्षुद्रच होय ॥ १ ॥

मंत्र दुसरा.

तस्मिन्नेतस्मिन्नग्नौ देवा रेतो जुह्वति तस्या आहु-
तेर्गर्भः संभवति ॥ २ ॥

इति पञ्चमाध्यायस्याष्टमः खण्डः ॥ ८ ॥

अन्वय व अर्थः--तस्मिन् एतस्मिन् अग्नौ देवाः रेतः जुह्वति; तस्याः आहुतेः गर्भः संभवति ( अर्थ मागच्या सारखाच. यजमानप्राण येथें रेतोरूपी आहुति देतात; व त्यापासून गर्भाची उत्पत्ति निदान उत्पत्ति-संभव तरी होतो ) ॥ २ ॥

तस्मिन्नेतस्मिन्नग्नौ देवा रेतो जुह्वति । तस्या आहुतेर्गर्भः संभवतीति । एवं श्रद्धासोमवर्षान्नरेतोहवनपर्यायक्रमेणाऽऽप एव गर्भीभूतास्ता: । तत्रापामाहुतिसमवायित्वात्प्राधान्यविवक्षाऽऽपः पञ्चम्यामाहुतौ पुरुषवचसो भवन्तीति । न त्वाप एव केवलाः सोमादिकार्यमारभन्ते । न चाऽऽपोऽत्रिवृत्कृताः सन्तीति । त्रिवृत्कृतत्वेऽपि विशेषसंज्ञालाभो दृष्टः पृथिवीयमिमा आपोऽयमग्निरित्यन्यतमबाहुल्यनिमित्तः । तस्मात्समुदितान्येव भूतान्यब्बाहुल्यात्कर्मसमवायीनि सोमादिकार्यारम्भकाण्याप इत्युच्यन्ते । दृश्यते च द्रवबाहुल्यं सोमवृष्ट्यन्नरेतोदेहेषु । बहुद्रवं च शरीरं यद्यपि पार्थिवम् । तत्र पञ्चम्यामाहुतौ हुतायां रेतो आपो गर्भीभूताः ॥ २ ॥

इति पञ्चमाध्यायस्याष्टमः खण्डः ॥ ८ ॥

सिद्धांती—मंत्राचा आतांच सांगितलेला अर्थ स्पष्ट आहे. यजमानानें हविलेल्या रेतोरूपी आहुतीचा परिपाक गर्भसंभवामध्यें होतो. स्त्रीलिंगी आहुतीला गर्भरूपी पुलिंगत्व येतें तें असें. असो. पदार्थ आपण पाहिले, त्यांत अनुक्रमें श्रद्धा, सोम, वृष्टि, अन्न आणि रेत या आहुती सांगितल्या आहेत. तथापि आप् ( जल ) हीच आहुती यजमानानें जिवंत असतां पूर्वजन्मीं दिली होती. तिचा परिपाक श्रद्धेमध्यें, श्रद्धेचा सोमामध्यें, अशा क्रमानें आपण रेतोरूपी आहुतीपर्यंत आलों. पण आपांचें ( जलांचें ) स्वरूप सुटलें नाहीं, अर्थात् गर्भोत्पत्ति व्हावयाची, ती आपांची ह्मणजे पूर्वी हुत केलेल्या

जलांचीच होय. जलालाच श्रद्धा-सोमादिकांचीं स्वरूपें प्राप्त होऊन शेवटीं तेंच रेतोरूप झालें. समजलें ?

पूर्व०---पण गर्भ पंचभूतात्मक असतो. पृथ्व्यादि सर्व भूतें मिळून गर्भोत्पत्ति होते मग आपांचा मात्र गर्भ-परिपाक होतो असें श्रुतिनें कां ह्मटलें ?

सिद्धांती—कारण, आपांचाच काय तो आहुति-समवाय आहे हें, कसें तें आपण मागेंच पाहिलें आहे. शिवाय, श्रुतीला जलांचीच विवक्षा मुख्यतः आहे. हें पुढील मंत्र पाहिलांत ह्मणजे समजेल. ' पांचव्या आहुतींत जलें पुरुषांगी होतात 'अशा अर्थाचा हा मंत्र आहे.

पूर्व०---मुख्यतः कशाला ? सर्व या आपांपासूनच गर्भकार्याला आरंभ होतो असें ह्मणाना ?

सिद्धांतीः—तसें कसें ह्मणतां येईल ? आणि श्रुति तरी तसें कसें ह्मणेल ? कारण पृथ्व्यादि महाभूतांचें साह्य न घेतां केवळ जलांनींच गर्भ-कार्य संपादिलें, असें म्हटलें तर जलांचे स्वरूप अति चंचल असल्यामुळें यजमानाला भोग भोगण्यास अवश्य असणारें जें स्थिर भोगायतन ( शरीर ) तें केवळ प्रवाह्य जलांस उत्पन्न करितां येणार नाहीं. इतकेंच नव्हे; तर सोमादि कार्यें होतात ह्मणून सांगितलें, तीं ही कार्यें केवळ जलांस उत्पन्न करितां येणार नाहींत. शिवाय, श्रुतिच पुढें ६ व्या अध्यायांत सांगणार आहे कीं, हीं आहुती जल ( आप ) केव्हांही अत्रिवृत्त नसतात.

शिष्य०---अत्रिवृत् म्हणजे ?

सिध्दांती—त्रिवृत्त म्हणजे तीनींचे एकीकरण. जानवें तयार करतांना आपण तीन सुतें एकत्र करितों ना ? त्याचप्रमाणें तेज, आप्, आणि अन्न ही त्रयी एकत्र झाली, म्हणजे त्रिवृत्त झालें. ज्या पदार्थांत निरनिराळे तीन पदार्थ नाहींत, तें अत्रिवृत होय. तात्पर्य, केव्हांही पहा, हीं आहुति जलें त्रिवृत्त म्हणजे तेज, आप व पृथ्वी यांच्या अंशांनीं मिश्रित असतात.

पूर्व०—मग तिन्ही महाभूतांचा निर्देश करावा. एका आप नांवानें या आहुतींचा उल्लेख कां ? यांना ' आप् ' शब्दानेंच कां संबोधिलें आहे ?

सिद्धांती—कारण आपांचें बाहुल्य आहे ' आप् ' शब्द नित्य अनेक वचनीं असतो. ही पृथ्वी, हा अग्नि असें आपण म्हणतों, पण तेव्हांच हीं जलें, असेंच म्हणतो. म्हणून, ' आप ' अशी विशेष संज्ञा ( नांव ) या आहुतींस दिली आहे. तात्पर्य, यद्यपि पंच महाभूतांचा-येथें श्रुतिनें तिन्हींचाच मात्र उल्लेख केला आहे असो—

समुदाय होऊन आहुति सिद्ध होते, तथापि त्यांत बाहुल्य ( ज्यास्तीपणा ) आहे, म्हणून कर्म-सहचारी व सोमादि कार्य उत्पन्न करणारी जलेंच होत, असें श्रुति समजते. बाहुल्यामुळेच आपांसच हा मान मिळावा. आणखी; सोम, वृष्टि, अन्न, रेत, आणि देह, यांपैकीं कोणतेंही कार्य पहा, त्यांत द्रवत्व ( पातळपणा ) ज्यास्त दिसतो.

**पूर्व०**--पार्थिवशरीरांत सुद्धां ?

**सिद्धांती**--संशय काय ? या पार्थिव ( पृथ्वीसंबंधी ) शरीरांत द्रवपदार्थच पुष्कळ पणानें आहेत. असो; स्त्रीरूपी अग्नींत दिलेल्या पांचव्या रेतोरूप आहुतीचाही ही जलरूपच आहे--गर्भरूपी परिपाक होतो ॥ २ ॥

आठवा खंड संपला.

---

## अध्याय पांचवा; खंड नववा.

### मंत्र पहिला.

**इति तु पञ्चम्यामाहुतावापः पुरुषवचसो भवन्तीति स उल्बावृतो गर्भो दश वा नव वा मासानन्तःशयित्वा यावद्वाऽथ जायते ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः**--इति तु ( याप्रमाणें जलरूपी स्त्रीलिंगी आहुतीला परिपाकक्रमानें गर्भरूपी पुल्लिंगत्व प्राप्त होतें, त्याचें वर्णन झालें. ) '**पंचम्यां आहुतौ आपः पुरुषवचसः भवन्ति**' इति ( पांचव्या आहुतीमध्यें जलें पुल्लिंगी होतात, असा प्रश्न होता, त्याचें हें उत्तर आहे. ) **सः उल्बावृतः गर्भः दश वा नव वा मासान् यावत् वा अंतःशयित्वा, अथ जायते** ( तो जरायूनें मढविलेला गर्भ नऊ किंवा दहा किंवा अवश्य तितके महिने-मातेच्या उदरांत पडून राहून नंतर बाहेर येतो. अथवा आपण त्या जीवाचा जन्म झाला असें म्हणतों ) ॥ १ ॥

इति त्वेवं तु पञ्चम्यामाहुतावापः पुरुषवचसो भवन्तीति व्याख्यात एकः प्रश्नः। यत्तु द्युलोकादिमां प्रत्यावृत्तयोराहुत्योः पृथिवीं पुरुषं स्त्रियं क्रमेणाऽऽविश्य लोकं प्रत्युत्थायी भवतीति वाजसनेयक उक्तं तत्प्रासङ्गिकमिहोच्यते । इह च प्रथमे प्रश्न उक्तो वेत्थ यदितोऽधि प्रजाः प्रयन्तीति । तस्य चायमुपक्रमः । स गर्भोऽपां पञ्चमः परिणामविशेष आहुतिकर्मसमवायिनीनां श्रद्धाशब्दवाच्यानामुल्बावृत उल्बेन जरायुणाऽऽवृतो वेष्टितो दश वा नव वा मासानन्तर्मातुः कुक्षौ शयित्वा यावद्वा यावता कालेन न्यूनेनातिरिक्तेन वाऽथानन्तरं जायते ।

**सिद्धांती**—पूर्वी प्रवहण राजानें गौतम पुत्रास जे पांच प्रश्न केले होते व ज्यांपैकी एकाचेंही उत्तर त्या ब्राम्हणाला देतां आलें नाहीं; व त्याचा बाप म्हणजे गौतम ज्यां विषयीं सर्वथा अज्ञानी होता, त्यांपैकीं पांचव्या प्रश्नाचें उत्तर राजानें गौतमाच्या ज्ञानशुद्धीसाठीं दिलें आहे, त्याचें सांगोपांग विवेचन आतांपर्यंत झालें. आतां यापुढें—

**शिष्य०**—भगवन् ! माझ्या समजुतीकरितां मात्र मी अनुवादितों कीं ‘ पांचव्या आहुतीच्या प्रक्षेपाचे वेळीं ‘ आप् ’ ( स्त्रीलिंगी जलें ) पुल्लींगी होतात, गर्भरूप होतात, असें पांचव्या प्रश्नाचें उत्तर म्हणून राजानें दिलें. होयना ? ठीक.

**सिद्धांती**—आतां वाजसनेयक उपनिषदांत सांगितलें आहे कीं ‘ द्युलोकापासून परत फिरलेल्या जलरूपी आहुती ह्या पृथ्वीमध्यें, पुरुषामध्यें व स्त्रीमध्यें क्रमशः प्रवेश करून तत्तत्संबधी लोक म्हणजे भुवनें पुनः अस्तित्वांत आणितात’ ( बृह० अ० ६ खं २ पहा ) त्याच्याच संबंधानें प्रसंगप्राप्त कांहीं सांगावयाचें तें सांगितलें.

**शिष्य०**—म्हणजे गर्भाची व्यवस्था काय होते, तें तेथें सांगितलें नाहीं; म्हणून ओघानें प्राप्त झालेली गोष्ट छांदोग्य श्रुति येथें सांगती झाली आहे ना ?

**सिद्धांती**—ठीक ! ‘ प्रजा येथून म्हणजे मरण पावल्या नंतर या लोकांतून कोठें जातात ? असा पहिला प्रश्न राजानें केला होता; त्याचें उत्तर पुढें येईलच; पण त्या उत्तराची दिशा ठीक समजावी, म्हणून, प्रजांची उत्पत्ति सांगावयास अवश्य हवी म्हणून, हा पुढें विस्तार आहे.

**शिष्य०**—म्हणजे पहिल्या प्रश्नाचें उत्तर देण्याचा हा उपक्रम आहे.

**सिद्धांती**—होय. तो रेताचा परिपाक होऊन सिद्ध झालेला गर्भ—

शिष्य०—अर्थात् हा गर्भ म्हणजे जलांचा ( आपांचा ) पांचवा व शेवटचा विशेष परिणाम आहे. आहुति कर्माला कार्यत्व देऊन त्याचे समवायी ( उपादान ) कारण असणारीं व श्रद्धा शब्दानें वाच्य असलेलीं जळें पांचवें विशेष स्वरूप धारण करितात, ते पुढिंची गर्भाचे होय !

सिद्धांती—शाबास ! असो; हा गर्भ उल्बेनें म्हणजे जरायूनें वेष्टित असतो यालाच जरायु असें आपण म्हणतों, मनुष्यादि जातींस 'जरायुज म्हणतात, तें यासाठींच होय. असो; हा जरायूनें वेढिलेला गर्भ मातेच्या कुशींत नऊ महिने कधीं दहा किंवा कधीं अवश्य तितके कमी जास्त दिवस राहून नंतर तो गर्भ बाहेर येतो. अथवा आपल्या व्यवहारी भाषेंत ' अमुक एक जन्म पावतो,' असें म्हणतात. मातेच्या उदरांतून बाहेर येणें हाच जीवांचा येथें जन्म होय.

उल्बावृत इत्यादि वैराग्यहेतोरिदमुच्यते । कष्टं हि मातुः कुक्षौ मूत्रपुरीषवातपित्तश्लेष्मादिपूर्णे तदनुलिप्तस्य गर्भस्योल्बाशुचिपटावृतस्य लोहितरेतोशुचिबीजस्य मातुरशितपीतरसानुप्रवेशेन विवर्धमानस्य निरुद्धशक्तिबलवीर्यतेजःप्रज्ञाचेष्टस्य शयनम् । ततो योनिद्वारेण पीड्यमानस्य कष्टतरा निःसृतिर्जन्मेति वैराग्यं ग्राहयति । मुहूर्तमप्यसह्यं दश वा नव वा मासानतिदीर्घकालमन्तः शयित्वेति च ॥ २ ॥

पुर्व०—भगवन् ! जरायूनें वेढलेलें असणें उदरांत राहणें बाहेर येणें इत्यादि गर्भगत गोष्टी सर्व प्रसिद्ध आहेत. श्रुतीनें ह्या गोष्टी कशाला सांगाव्या ? जें प्रमाणगोचर नाहीं, तेंच श्रुति सांगत असते, असें आपण म्हणत असतों !

सिद्धांतीः—तें ठीक. पण ह्या सर्व किळसवाण्या गोष्टी सांगण्यांत श्रुतीचा हेतु आहे, तो नाहीं आला तुमच्या लक्षांत. अहो ! जीवाच्या उत्पत्तीची बीभत्स कथा श्रुति सांगत आहे, त्याचा हेतु जीवास वैराग्य उत्पन्न व्हावें, हा आहे. अहो ! मूत्र, पुरीष, वात, पित्त, कफ, रक्त, पू, इत्यादि घाणेरड्या पदार्थांनीं पूर्ण भरलेल्या मातेच्या उदरांत ह्या गर्भानें राहावयाचें, ह्याच दुर्गंधी पदार्थांनीं स्वतः लिंपलेले ( बरबटलेलें ) असावयाचें, जरायूसारख्या अशुद्ध वेष्टनानें घातलेल्या वेढ्यांत असावयाचें, रक्त, रेत यांसारख्या अपूत ( अस्वच्छ ) बीजांपासून उत्पन्न व्हावयाचें, आपली माता जें कांहीं खातपीत असेल, त्याच्या रसांचा स्वीकार करून त्यांवरच वाढावयाचें; आणि बुद्धि, शक्ति, शरीरबल, इंद्रियसामर्थ्य, शरीरकांति, जीवप्रज्ञा ( जीवाचें चैतन्यबल ) आणि प्राणचेष्टा, ह्या सर्वांचा अवरोध करून घेऊन स्वस्थ पडावयाचें, ह्या गोष्टी काय मोठ्या सुखकारक

आहेत, नव्हे ! हीं दुःखेंही पुरवलीं. पण योनिद्वारांतून बाहेर येतांना जी काय पीडा होते ती तर सर्वथा अवर्णनीय आहे. कोण कष्टकारक स्थिति ही ! राम ! राम !! अशी ही आनि दुःखकर स्थिति आहे. ही जन्मकहाणी ऐकून तरी जीवाला जन्ममरणाचा वीट यावा; व त्यानें ह्या भवचक्रांतून सुटण्याचा उपाय सुधरावा. या हेतूनें श्रुतीनें जन्म-समयाच्या दुःखकारक प्रसंगाची ही कथा येथें दिग्दर्शविली आहे.

शिष्य० —भगवन् ! आपण वर्णिलेल्या या खडतर यात्रेंत 'एक घटकाभर प्रवास कर' असें कोणास सांगितलें, तर तो अज्ञानी जीवसुद्धां पत्करणार नाहीं. मग नऊ दहा महिन्यांसारख्या दीर्घकाळभर कोणताही स्वतंत्र जीव हे असह्य कष्ट सोसण्यास तयार होईल, ही गोष्टच बोलावयास नको ! छेः छेः फार कष्टकारी स्थिति ही ! ही गर्भस्थिति म्हणजे तोंड दाबून बुक्क्यांचा मार होय ! ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**स जातो यावदायुषं जीवति तं प्रेतं दिष्टमितोऽग्नय एव हरन्ति यत एवेतो यतः संभूतो भवति ॥ २ ॥**

**इति पञ्चमाध्यायस्य नवमः खण्डः**

**अन्वय व अर्थः**—स जातः यावदायुषं जीवति ( तो उत्पन्न होऊन आयुर्मर्यादा असेल, तितके दिवस जगतो ) **तं प्रेतं इतः दिष्टं अग्नयः हरंति** ( आणि तो मेल्यावर त्याला कर्मप्राप्त परलोकीं जाण्या-साठीं अग्नीकडे ( स्मशानांत ) घेऊन जातात ) यतः एव इतः, यतः **संभूतः भवति** ( ज्या अग्नीपासून तो या भूलोकीं आला व ज्यांच्या साह्यानें तो जन्म पावला—त्या अग्नींकडे शेवटीं त्याला नेतात ) ॥ २ ॥

स एवं जातो यावदायुषं पुनः पुनर्घटीयन्त्रवद्गमनागमनाय कर्म कुर्वन्कुलालचक्रवद्वा तिर्यग्भ्रमणाय यावत्कर्मणोपात्तमायुस्तावज्जीवति । तमेनं क्षीणायुषं प्रेतं मृतं दिष्टं कर्मणा निर्दिष्टं परलोकं प्रति यदि चेज्जीवन्वैदिके कर्मणि ज्ञाने वाऽधिकृतस्तमेनं मृतमितोऽस्माद्ग्रामादग्नयेऽग्न्यर्थमृत्विजो हरन्ति पुत्रा वाऽन्त्यकर्मणे । यत एवेत आगतोऽग्नेः सका-

श्रद्धाद्याहुतिक्रमेण, यतश्च पञ्चभ्योऽग्निभ्यः संभूत उत्पन्नो भवति तस्मा एवाग्नये हरन्ति स्वामेव योनिमग्निमापादयन्तीत्यर्थः ॥ २ ॥

इति पञ्चमाध्यायस्य नवमः खण्डः ॥ ९ ॥

सिध्दांती०—याप्रमाणें हा प्राणी जन्मास येतो आणि यावत्कालपर्यंत आयुष्य असेल, तोंपर्यंत जगतो.

शिष्य०—भगवन् ! या जगण्याचा हेतु काय ?

सिद्धांती०—हेतु म्हणजे ह्या प्राण्याच्या जगण्याला प्रेरक कोण असतो, ह्या प्राण्याचें मनोगत काय असतें, असा तुझे विचारण्याचा मतलब असेल, तर श्रुति म्हणते कीं, लोकांत घटीयंत्र किंवा माळेचा रहाट असतो, त्यांतील घट ( घागरी, पात्रें ) ज्याप्रमाणें वरखालीं जात असतात, त्याप्रमाणें स्वर्गलोकीं जाऊन पुनः भूलोकीं येण्यास लागणारें वेदविहित कर्म तरी प्राणी करितो किंवा कुंभाराचें चक्र खालच्या व वांकड्या दिशेनें फिरत असतें त्याप्रमाणें खालच्या योनींत ढकलून देणारें कर्म करीत असतो. तात्पर्य, वेदविहित कर्म सकामतः करून स्वर्गांतून पृथ्वीवर व पृथ्वीवरून स्वर्गांत जाण्याची तयारी प्राणी करितो, किंवा निषिद्ध कर्म करून मनुष्ययोनींतून पशुपक्ष्यांच्या योनींत जाऊन येण्याची तयारी करितो.

शिष्य०—म्हणजे गमनागमन किंवा यातायात त्याच्या मागची सुटत नाहीं.

सिध्दांती०—सकाम कर्म-कर्त्यांची यातायात सुटणें शक्यच नाहीं. आतां, त्याला या लोकीं किती दिवस रहाण्याची परवानगी असते व ती कां असते, असा जर तुझ्या प्रश्नाचा मतलब असेल, तर पूर्वजन्मीं त्यानें ज्या किंमतीचें कर्म केलें असेल व त्यापैकीं जितक्या कर्माला प्रारब्धत्व फलोन्मुखत्व-प्राप्त झालें असेल, तितक्या किंमतीच्या त्या प्रारब्धानुसार तो येथें जगतो.

पूर्व०—आणि मेल्यावर मुक्त होतो ! प्रारब्ध संपलें कीं झालें !!

सिध्दांती०—ज्ञानाशिवाय नांव कशाला घेतां, मोक्षाचें ? प्रारब्ध संपलें, म्हणून संचित संपत नाहीं. शिवाय, जिवंत असतांना अज्ञानप्रेरित कर्म चालूंच असतें. कर्मफल भोगणें आहे, तोंपर्यंत मोक्षाची वार्तासुद्धां बोलूं नका. असो; क्षीणायुष होऊन हा जीव मृत झाला म्हणजे कर्मानुसार ठरलेल्या परलोकाप्रत जाण्यासाठीं—

पूर्व०—म्हणजे सगळेच लोक परलोकीं म्हणजे स्वर्गांत सुख भोगण्यास जातात !

सिध्दांती०—मात्र त्यांनीं वेदांत सांगितलेलें सत्कर्म केलें असेल किंवा कांहीं ज्ञान मिळवून चित्तशुद्धि करून घेतली असेल, तरच स्वर्गलोक मिळतो. बरें. बाकीचे लोक पशुपक्ष्यांच्या योनींतच जावयाचे. श्रुतीला सध्यां सत्कर्माला किंवा आत्मज्ञानाला

अधिकारी होणाऱ्या जीवांचाच विचार कर्तव्य आहे ] समजलें ? याप्रमाणें गेल्यानंतर त्या जीवाचे पुरोहित किंवा पुत्र त्या जीवाच्या देहाला अंत्येष्टीचा संस्कार व्हावा म्हणून श्मशानांत नेतात व तेथें उत्तरक्रिया करून तो देह अग्नीला समर्पण करितात. या अग्नीलाच क्रव्याद् म्हणतात.

शिष्यः—ठीकच आहे. ज्या अग्नीपासून हा जीव श्रद्धा सोमादि क्रमानें ह्या लोकीं आला व ज्या द्युपर्जन्यादि अग्नीच्या द्वारानें ह्या लोकीं जन्म पावला, त्या अग्नीकडे नेणें व या जीवानें अग्नीकडे जाणें हें योग्यच आहे. कोणताही पदार्थ प्रलयकाळीं आपल्या मूळ स्वरूपांतच जावयाचा, असा जो निसर्गाचा नियम आहे. त्याच्या अनुसारच हें कथन व हा परिपाक आहे. अग्निजन्य जीव अग्निरूप होतो ॥ २ ॥

नववा खंड संपला.

---

## अध्याय पांचवा खंड दहावा.

---

### मंत्र पहिला व दुसरा.

**तद्य इत्थं विदुः । ये चेमेऽरण्ये श्रद्धा तप इत्युपासते तेऽर्चिषमभिसंभवन्त्यर्चिषोऽहरह्न आपूर्यमाणपक्षमापूर्यमाणपक्षाद्यान्षडुदङ्ङेति मासाꣳस्तान् ॥१॥ मासेभ्यः संवत्सरꣳ संवत्सरादादित्यमादित्याच्चन्द्रमसं चन्द्रमसो विद्युतं तत्पुरुषोऽमानवः स एनान्ब्रह्म गमयत्येष देवयानः पन्था इति ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः**—ये तत् इत्थं विदुः [ ज्या जीवांस ह्या तत्त्वाचें याप्रमाणें ज्ञान झालें ] ये च इमे अरण्ये श्रद्धा, तप इति उपासते [ आणि जे वैखानसादि जीव श्रद्धा, तप इत्यादींच्या साधनांनीं उपासना करितात ] ते अर्चिष अभि संभवन्ति, आर्चिषः अहरहः अपूर्यमाणपक्षं, आपूर्यमाणपक्षात् यान् षट् उदङ् एति मासान् तान्, मासेभ्यः संवत्सरं, संवत्सरात् आदित्यं आदित्यात् चन्द्रमसं,

चंद्रमसः विद्युतं [ ते जीव, अरण्यवासी वानप्रस्थादि जीव, श्रद्धातप-पुरःसर अर्चिर्देवता, नंतर अहर्देवता, नंतर शुक्लपक्ष देवता, पुढें उत्तरायण मासाची देवता [ १ ] नंतर संवत्सर आदित्य, चंद्रमा, विद्युत् इत्यादि देवतांच्या लोकीं जातात ] तत् अमानवः पुरुषः [ नंतर अमानव पुरुषाची व आदित्य पुरुषाची गांठ पडते ] सः एनान् ब्रह्म गमयति [ तो या निष्काम ज्ञान जीवांस ब्रह्मापर्यंत नेऊन पोहोंचवितो ] एषः देवयानः पंथाः इति [ हाच देवयानमार्ग आहे. याप्रमाणें हा मंत्र गतमार्ग आहे ] ॥ १ ॥ २ ॥

वेत्थ यदितोऽधि प्रजाः प्रयन्तीत्ययं प्रश्नः प्रत्युपस्थितोऽपाकर्तव्यतया । तत्तत्र लोकं प्रत्युत्थितानामधिकृतानां गृहमेधिनां य इत्थमेवं तथोक्तं पञ्चाग्निदर्शनं द्युलोकाद्यग्निभ्यो वयं क्रमेण जाता अग्निस्वरूपाः पञ्चाग्न्यात्मान इत्येवं विदुर्जानीयुः । कथमवगम्यत इत्थं विदुरिति गृहस्था एवोच्यन्ते नान्य इति ।गृहस्थानां ये त्वनित्थं विदुः केवलेष्टापूर्तदत्तपरास्ते धूमादिना चन्द्रं गच्छन्तीति वक्ष्यति । ये चारण्योपलक्षिता वैखानसाः परिव्राजकाश्च श्रद्धा तप इत्युपासते तेषां चेत्थंविद्भिः सहार्चिरादिना गमनं वक्ष्यति पारिशेष्यादग्निहोत्राहुतिसंबन्धाच्च गृहस्था एव गृह्यन्त इत्थं विदुरिति ।

**सिद्धांती**—तुम्हां सर्वांच्या लक्षांत असेलच कीं ' मरणानंतर येथून जीव कोठें जातात ? असा राजानें गौतमपुत्राला पहिला प्रश्न केला होता. त्याप्रश्नाचें उत्तर देण्यासाठीं त्याची पुनः उपस्थिति केली आहे. असो; नंतर म्हणजे तत् म्हणजे तत्र अथवा त्या ह्या लोकीं पुनः जन्मास्थितीला आलेल्या जीवांपैकीं ज्या अधिकारी गृहमेधी म्हणजे गृहस्थाश्रमी जीवांस आतांच श्रुतीनें सांगितलेली पंचाग्निविद्या—

**शिष्य०**—म्हणजे द्युलोक, पर्जन्य, पृथ्वी पुरुष व स्त्री हे पांच अग्नी आहेत, असें ज्ञान म्हणजे आपण या पांच अग्नीपासून उत्पन्न होऊन अग्निस्वरूपच आहोंत, आपली घटना पांच अग्नी मिळून झाली आहे, असें ज्ञान ज्यांस यथासांग झालें आहे. ते गृहस्थाश्रमांतील पंचाग्निज्ञानी जीव ? त्यांचें काय ?

**सिद्धांतीः**—तेंच आतां श्रुति सांगत आहे, ऐका. हे पंचाग्निविद्या जाणणारे ज्ञानी गृहस्थ—

पूर्व०—क्षणभर थांबा ' गृहस्थ ' ' गृहस्थ ' असें तुम्ही म्हणतां. पण श्रुतीनें तर ' ये ' या सर्व नामानें सामान्यतः सर्व आश्रमांतील जीवांचा निर्देश केला आहे. तेव्हां ज्ञानी गृहस्थांचेंच हें प्रकरण आहे, असें कशावरून ? दुसरे म्हणजे ब्रम्हचारी, वानप्रस्थ, संन्यासी, हे कां नाहीं घ्यावयाचे ?

सिद्धांती:—चांगलें विचारलेंत. ऐका: गृहस्थ, ज्ञानी गृहस्थ, ब्रह्मचारी, वानप्रस्थ आणि संन्यस्त या पांचांपैकीं येथें कोण विवक्षित आहे, हें आपण ठरवूं. आतां ( १ ) ज्यांस पंचाग्निविद्या माहीत नाहीं, जसे अज्ञानी गृहस्थ तर येथून श्रुतीनेंच काढून टाकिले आहेत.

शिष्य—कारण ' ज्यांस ही पंचाग्नि विद्या अवगत झाली आहे, ' असें प्रत्यक्ष म्हटलेंच आहे. तेव्हां त्यांचा निकाल झालाच.

सिद्धांती—शिवाय, हें सर्व न जाणणारे आणि म्हणून इष्टापूर्तादि सकाम कर्मे करणारे गृहस्थ धूमादि मार्गानें जातात ' असें याच खंडाच्या तिसऱ्या मंत्रांत श्रुति सांगणार आहे.

पूर्व०—पुन: गृहस्थ आणलेतच ! ब्रह्मचारी म्हणाना ?

शिष्य०—अग्नि ठेऊन सायंप्रातःकालीं कुटुंबासह आहुती देणारे ब्रम्हचारी असणें शक्यच नाहीं.

सिद्धांती—आणखी, ' येच इमे अरण्ये श्रद्धा इ० ' या शब्दांनी प्रत्यक्ष उपलक्षित केलेले व श्रद्धातप इत्यादि साधनांनीं उपासना करणारे वैखानस ( वानप्रस्थ ) व यती, हे व पंचाग्नि विद्यावेत्ते हे सुद्धां आर्चिरादि देवयान पंथानें जातात, असेंही श्रुति सांगणार आहे, सारांश, या वैखानसादिकांचा निराळा निर्देश होणार आहे. एवंच ब्रम्हचारी, अज्ञानी गृहस्थ आणि श्रद्धातपादि साधनांनीं उपासना करणारे वानप्रस्थादि हे वगळले म्हणजे ' ये इत्थं विदुः ' या वाक्यांतील ' ये ' हें सर्वनाम केवळ पंचाग्नि वेत्ते गृहस्थांसंबंधेंच आहे, हें उघड झालें.

शिष्य—' परिशेष पद्धति ' ( अप्रस्तुत पदार्थ वगळून प्रस्तुताचा निर्णय करण्याची पद्धति ) ती ही होय.

**ननु ब्रह्मचारिणोऽप्यगृहीता ग्रामश्रुत्याऽरण्यश्रुत्या चानुपलक्षिता विद्यन्ते कथं पारिशेष्यसिद्धिः । नैष दोषः । पुराणस्मृतिप्रामाण्यादूर्ध्वरेतसां नैष्ठिकब्रह्मचारिणामुत्तरेणार्यम्णः पन्थाः प्रसिद्धः । अतस्तेऽप्यरण्यवासिभिः सह भविष्यन्ति । उपकुर्वाणकास्तु स्वाध्यायग्रहणार्था इति न विशेषनिर्देशार्हाः ।**

सिद्धांती—याप्रमाणें पंचाग्नि विद्या जाणणारे ज्ञानी गृहस्थांचा हा गमनमार्ग—

पूर्व०—थांबा ! तुमची पद्धति चुकत आहे. या पद्धतीनें ब्रम्हचाऱ्यांचा निकाल होत नाहीं, परिशेष पद्धति सिद्ध होत नाहीं. कारण पहा: ब्रम्हचाऱ्यांचा स्पष्ट नामनिर्देश नाहीं; शिवाय गांवांत राहून अग्निहोत्र ठेवणारे सपत्नीकच असावयास हवेत. तसेंच अरण्यामध्यें केवळ वानप्रस्थ व यती राहतात. ब्रह्मचारी गुरुकुलांत राहतात. तेव्हां ब्रह्मचाऱ्यांचा अंतर्भाव ग्रामश्रुतींत होत नाहीं; व अरण्यश्रुतींतही होत नाहीं; आणि श्रुतीनें ब्रम्हचाऱ्यांस प्राप्त होणारा मार्ग तर सांगितला पाहिजे. तेव्हां मी म्हणतों कीं या आपल्या वादविषयक ' ये ' मध्यें ब्रम्हचाऱ्यांचा ही अंतर्भाव व्हावा.

सिद्धांतीः—नाहीं. शिवाय, श्रुतीनें प्रत्यक्ष सांगितलें नाहीं, म्हणून, दोषही उत्पन्न होत नाहीं. तुम्हीं प्रमाणभूत असणाऱ्या स्मृति किंवा पुराणें काळजीपूर्वक पाहिलींत, तर ' ऊर्ध्वरेते ( कोणत्याहि कारणानें रेतस्खलन होऊं न देणारे नैष्ठिक ब्रह्मचारी ) यांचा उत्तरगामी सूर्यमार्ग प्रसिद्ध आहे ' असें हे ग्रंथ सांगतात, हें स्पष्ट होईल. तात्पर्य, ब्रम्हचाऱ्यांस गृह्याग्निविषयक अग्निविद्येची अपेक्षा मुळींच नाहीं, अर्थात् ते ब्रह्मचारी वैखानसांसारखेच किंवा त्यांबरोबरच उत्तरमार्गानें जातात. आतां उपकुर्वाणक जे आहेत—

शिष्य०—उपकुर्वाणक म्हणजे ब्रम्हचर्याश्रमांतून गृहस्थाश्रमांत जाणारे ?

सिद्धां०—होय. हे तर स्वाध्यायासाठीं गुरुकुलीं ब्रम्हचर्य घेऊन राहतात अध्ययन संपल्यानंतर ते गृहस्थाश्रमांत शिरतात; तेव्हां त्यांचा विशेष निर्देश करण्याचें कारणच नाहीं.

ननूर्ध्वरेतस्त्वं चेदुत्तरमार्गप्रतिपत्तिकारणं पुराणस्मृतिप्रामाण्यादिष्यत इत्थंवित्त्वमनर्थकं प्राप्तम् । न । गृहस्थान्प्रत्यर्थवत्त्वात् । ये गृहस्था अनित्थंविदस्तेषां स्वभावतो दाक्षिणो धूमादिः पन्थाः प्रसिद्धस्तेषां य इत्थं विदुः सगुणं वाऽन्यद्ब्रह्म विदुः । " अथ यदु चैवास्मिञ्शव्यं कुर्वन्ति यदि नार्चिषमेव " इति लिङ्गादुत्तरेण ते गच्छन्ति । ननूर्ध्वरेतसां गृहस्थानां च समान आश्रमित्व ऊर्ध्वरेतसामेवोत्तरेण पथा गमनं न गृहस्थानामिति न युक्तमग्निहोत्रादिवैदिककर्मबाहुल्ये च सति । नैष दोषः । अपूता हि ते । शत्रुमित्रसंयोगनिमित्तं हि तेषां रागद्वेषौ । तथा धर्माधर्मौ हिंसानुग्रहनिमित्तौ । हिंसानृतमायाब्रह्मचर्यादि च बह्वशुद्धिकारणमपरिहार्यं तेषाम् । अतोऽपूताः । अपूतत्वान्नोत्तरेण पथा गमनम् ।

हिंसानृतमायाब्रह्मचर्यादिपरिहाराच्च शुद्धात्मानो हीतरे शत्रुमित्ररागद्वेषादिपरिहाराच्च विरजसस्तेषां युक्त उत्तरः पन्थाः । तथाच पौराणिकाः—

" ये प्रजामीषिरेऽधीरास्ते श्मशानानि भेजिरे ।
ये प्रजां नेषिरे धीरास्तेऽमृतत्वं हि भेजिरे " इत्याहुः ।

**पूर्व०**—ठीक ठीक. ऊर्ध्वरेतस्त्व हें जर उत्तरमार्गानें जाण्याचें साधन आहे, त्यानें जर देवयानमार्ग मिळतो असें पुराणें, स्मृती इत्यादिकांचें सप्रमाण सांगणें आहे, तर पंचाग्निविद्येचें ज्ञान करून घेणें व्यर्थच आहे म्हणा ना ?

**सिद्धांती०**—असें कसें ? गृहस्थांस या विद्येचा उपयोग आहे ना ? ब्रम्हचाऱ्यांस ही विद्या नको, पण गृहस्थांस तर हवी ! आतां ज्यांस ही विद्या प्राप्त झाली नाहीं, त्यांना त्यांच्या सकाम इष्टापूर्तादि कर्मानींच दक्षिणेकडील धूमादि मार्गानींच जावें लागतें, हें प्रसिद्ध आहे. तेव्हां आतांच सांगितल्याप्रमाणें ते पंचाग्निविद्येचे व ब्रम्हविद्येचे विद्वान् गृहस्थ उत्तर मार्गानेंच जातात.

**शिष्य०**—' या लोकांस मरण आल्यानंतर उत्तरक्रियेचा संस्कार होवो वा न होवो ते अर्चिरादि मार्गानें जातात ' असें याच अध्यायांत सांगितलें आहे नव्हे ? या श्रुतिलिंगांवरून अनुमानितां येतें कीं, विद्वानांस निर्गुण ब्रम्हाचें अथवा निदान सगुण ब्रम्हाचें ज्ञानविज्ञान झालें असतें म्हणून ते देवयान पंथानें जाणार हें उघड आहे.

**पूर्व०**—फार चांगला रोजगार ! अहो ! या तुमच्या न्यायानें ऊर्ध्वरेते ब्रम्हचारी आणि ब्रम्हवेत्ते गृहस्थ हे उभयतां ही जर उत्तर मार्गानेंच जातात, तर हे दोन्ही आश्रमांचें फल व दोघांचें आश्रमित्व सारखेंच झालें. मग ऊर्ध्वरेते व ज्ञानी गृहस्थ तेवढे देवयानमार्गानें जावयाचे आणि इष्टापूर्तादि करणारे जावयाचे नाहींत, हा काय न्याय झाला ? अहो ! गृहस्थाश्रमांत अग्निहोत्रादि अनेक पुण्यदायी कर्में करावयाचीं असतात व गृहस्थ तीं तीं कर्में करितातही. तेव्हां गृहस्थांची योग्यता जास्तीच असली पाहिजे.

**सिद्धांतीः**—ह्याचा दोष श्रुतीकडे नाहीं. यद्यपि आश्रमित्व समान आहे, तथापि धर्मविहित आचरण कोठें सारखें असतें ? गृहस्थाश्रम म्हटला कीं तेथें दोषांचा प्रश्न येतोच. प्रथम विद्येचें अज्ञान. नंतर संसारांत शत्रुमित्र असावयाचे. मित्राच्या ठिकाणीं प्रेमाचा आवेश, शत्रुसंबंधानें द्वेषाचा आवेग; हे निर्माण होणें ठरलेलेंच आहे. तसेंच यज्ञकर्मादि करीत असतां पशुप्रभृतींची अकारण हिंसा, कोणावर निष्कारण अनुग्रह, असे प्रकार चालतात. तात्पर्य अज्ञानी संसारांत हिंसा, अनृत, कपट, अब्रह्मचर्य, इत्यादि अनेक कारणें गृहस्थांस दूषित करण्याला सज्ज असतात; म्हणून दूषित होणें अपरिहार्य आहे गृहस्थांस. तात्पर्य, अज्ञानी गृहस्थाश्रम दोषमय आहे. दूषित जीवांस उत्तरमार्गानें कसें जातां यावें ? नाहींच येणार. पण ऊर्ध्वरेत्यांची गोष्ट निराळी. हिंसा, असत्य, कपट, अब्रह्मचर्य, इत्यादि दोष नैष्ठिक ब्रह्मचारी परिहृतच करितो हे दोष त्याला लागणें शक्यच नाहीं. ते शुद्ध असतात. तसेंच, शत्रुमित्रादि नसल्यामुळें रागद्वेषादि

विकारही त्यांस बाधा देत नाहींत. म्हणून ते विरज ( निर्लेप ) असतात. अशा शुद्ध व निर्लेप ब्रह्मचाऱ्यांनीं उत्तरमार्गानें जावें, हें योग्य व न्याय्यच आहे. पुराणकर्ते म्हणतात: “ जे अधीर जीव अज्ञानामुळें प्रजादिकांची इच्छा करितात, ते जन्ममरण देणाऱ्या श्मशानांचे भोक्ते होतात; आणि जे प्रजादि विषयांची अपेक्षा न करितां विद्वान् होतात, ते अमृताचे भोक्ते होतात. ”

**इत्थंविदां गृहस्थानामरण्यवासिनां च समानमार्गत्वेऽमृतत्वफले च सत्यरण्यवासिनां विद्यानर्थक्यं प्राप्तम् । तथाच श्रुतिविरोधः । “ न तत्र दक्षिणा यन्ति नाविद्वांसस्तपस्विनः ” इति । “स एनमविदितो न भुनक्ति” इति च विरुद्धम् । न । आभूतसंप्लवस्थानस्यामृतत्वेन विवक्षितत्वात् । तत्रैवोक्तं पौराणिकैः–“आभूतसंप्लवं स्थानममृतत्वं हि भाष्यते ” इति । यच्चाऽऽत्यन्तिकममृतत्वं तदपेक्षया न तत्र दक्षिणा यन्ति स एनमविदितो न भुनक्तीत्याद्याः श्रुतय इत्यतो न विरोधः । न च पुनरावर्तन्त इतीमं मानवमावर्तं नाऽऽवर्तन्त इत्यादिश्रुतिविरोध इति चेत् । न । इमं मानवमिति विशेषणात्तेषामिह न पुनरावृत्तिरस्तीति च । यदि ह्येकान्तेनैव नाऽऽवर्तेरन्निमं मानवमिहेति च विशेषणमनर्थकं स्यात् । इममिहेत्याकृतिमात्रमुच्यत इति चेत् । न । अनावृत्तिशब्देनैव नित्यानावृत्त्यर्थस्य प्रतीतत्वादाकृतिकल्पनाऽनर्थिका । अत इममिहेति च विशेषणार्थवत्त्वायान्यत्राऽऽवृत्तिः कल्पनीया । न च सदेकमेवाद्वितीयमित्येवं प्रत्ययवतां मूर्धन्यया नाड्याऽर्चिरादिमार्गेण गमनम् । “ ब्रह्मैव सन्ब्रह्माप्येति ” । “ तस्मात्तत्सर्वमभवत् ” । “ न तस्य प्राणा उत्क्रामन्ति । अत्रैव समवलीयन्ते” इत्यादिश्रुतिशतेभ्यः ।**

सिद्धांती:—याप्रमाणें पंचाग्निविद्या जाणणारे निष्काम गृहस्थ व अरण्यांत राहणारे वैखानस ( वानप्रस्थ ) या उभयतांस ही देवयानमार्गाची प्राप्ति होते, असे झालें.

पूर्व०—म्हणजे आश्रमधर्म चालविणाऱ्या अरण्यवासीयांनीं विद्या शिकली नाहीं, तरी चालेल, असें झालें. नुसता अरण्यवास पत्करून जर अमृतफल म्हणजे मोक्ष मिळत आहे तर गृहस्थांस अवश्य असणाऱ्या विद्येची भानगड ते करतील कशाला? ह्या तुमच्या युक्तिशून्य व अनर्थवादी मताला श्रुति ही विरोध करीत आहे. “ तेथें

दक्षिण मार्गस्थांचा, अविद्वानांचा व अतपस्व्यांचा प्रवेश होत नाहीं. " तसेंच, " तो परमात्मा स्वस्वरूप न जाणणाऱ्या लोकांचें पालनपोषणही करीत नाहीं. " अर्थात् श्रुति-युक्तीला अनाम्य असें तुमचें हें मत आहे.

सिद्धांती०—ठीक. येथें ' अमृत ' शब्दाचा अर्थ ' आभूतसंप्लवस्थान ' असा आहे. भूतांचा जो संप्लव म्हणजे प्रलयकालीन नाश, तो भूतसंप्लव होय; ' सर्व भूतांचा ( प्राण्यांचा, अथवा चराचर वस्तूंचा ) सर्वथा प्रलय होईपर्यंत निरंतर चिरंजीवित्व हा आभूतसंप्लवाचा अर्थ आहे. तेव्हां प्रलयकालपर्यंत ज्यांस चिरंजीवित्व प्राप्त होतें ते अमृत होतात, असें येथें श्रुतीला सांगावयाचें आहे. ' आभूतसंप्लवाच्या स्थानाला ' अमृत ' असें म्हणून त्या स्थानीं अमृतत्व मिळतें, असें पुराणकर्ते म्हणतात. एक अमृतत्व निरपेक्ष व दुसरें सापेक्ष आहे. येथें सापेक्ष अमृतत्वाचा उल्लेख आहे. म्हणजे वर्णाश्रमानें वागणारे वानप्रस्थादि जीव विद्या ( आत्मविद्या ) नसेल तर सापेक्ष अमृत-त्वाप्रत जातात, असें श्रुतीला सांगावयाचें आहे. अर्थात् ' तेथें दक्षिणमार्गी किंवा अविद्वान लोक जात नाहींत ' हें श्रुतिवाक्य किंवा ' अज्ञानी जीवांचें परमात्मा पालन करीत नाहीं, त्यांस नित्य अमरत्व देत नाहीं ' हें श्रुतिवाक्य आमच्या म्हणजे श्रुतीच्या येथील अभिप्रायाला मुळींच बाधा करीत नाहींत. हीं तुम्हीं उद्धृत केलेलीं वाक्यें आत्यं-तिक अथवा निरपेक्ष अमृतत्वाच्या दृष्टीनें प्रकट झालीं आहेत. तेव्हां ' प्रलयकाल होऊन जाईपर्यंत मात्र पुनः जन्म न पावणाऱ्या स्थानांत राहतात ' या सापेक्ष अमृतत्व वाक्यांत व ' केव्हांही पुनः जन्म पावत नाहीं ' या वाक्यांत विरोध येणें शक्यच नाहीं.

पूर्व०—पण ' पुनः परत येत नाहींत म्हणजे ' या मानवलोकांस पुनः परत येत नाहींत' हीं याच अध्यायांतील श्रुतिवाक्यें तर विरुद्ध आहेत !

सिद्धांती०—नाहीं. इमं मानवं म्हणजे ह्या मानवलोकाला हीं विशेषणें त्या जीवांची येथें मनुष्यलोकीं पुनरावृत्ति होत नाहीं, असें स्पष्ट सांगतात. ' मुळींच परत फिरत नाहींत ' असें जर श्रुतीला निरपेक्षतः ( कांहीं विकल्प किंवा पडदा न ठेवितां ) सांगावयाचें असतें, तर ' ह्या मानवलोकाला, येथें, इत्यादि विशेष अर्थ सांगणारीं विशेषणें व्यर्थच झालीं असतीं नव्हे ?

पूर्व०—अहो ! या विशेषणांचें काय ? तीं नुसतीं पादपूरक आहेत. त्यांच्याकडे अर्थव्यंजनाचें ( अर्थ स्पष्ट किंवा विशिष्ट करण्याचें ) मुळींच काम नाहीं.

सिद्धांती०—केवळ ' अनावृत्ति ' शब्दानें जर ' केव्हांही पुनरावर्तन व्हावयाचें नाहीं, पुनः जन्म यावयाचा नाहीं ' असा स्पष्ट अर्थ निर्मलत्वानें प्रकट होतो, तर पादपूरणार्थ किंवा पानशोभेकरितां हीं विशेषणें सर्वज्ञ श्रुतीनें योजिलीं, असें म्हणण्यांत

काय तात्पर्य आहे ? तेव्हां 'ह्या' व 'येथें' ह्या विशेषणाचें कार्य होणें (त्यांस अर्थवत्त्व प्राप्त होणें) जर इष्ट व अवश्य आहे, तर त्या ह्या आत्मज्ञान न झालेल्या वर्णाश्रमनिष्ठ लोकांस कोठें तरी पुनः जन्म घेतलाच पाहिजे, हें उघड आहे. आत्मस्वरूपाचें शुद्ध ज्ञानविज्ञान होत नाहीं, तोंपर्यंत जन्ममरण चुकावयाचें नाहीं. कमी जास्त वेळ लागेल इतकेंच; तें सर्वतः, सर्वकालीं व सर्वस्थलीं चुकावयाचें असेल, तर शुद्ध आत्मविज्ञान करून घेतलेंच पाहिजे, फार कशाला ! 'एकच आत्मा आहे, तो अद्वितीय आहे.' असें साक्षात्कारतः ज्यांस ज्ञान झालें, त्यांचें गमन मूर्धन्य नाडीद्वारां अर्चिरादिमार्गानें होतें, असें श्रुतीनें केव्हांही म्हटलें नाहीं. 'ब्रह्म होऊन तो ब्रह्माप्रत जातो' म्हणून तो तें सर्व (ब्रह्म) झाला 'त्याचे प्राण उत्क्रांत होत नाहींत, येथेंच लीन होतात' इत्यादि शेकडों श्रुतींचा अभिप्राय पहा; म्हणजे तुमच्या लक्षांत येईल कीं, अर्चिरादिमार्गानें जाणारे अब्रह्मज्ञ लोकांस परब्रह्मत्व प्राप्त होत नाहीं. त्यांस इतर जीवांप्रमाणें जन्ममरण येत नाहीं, हें खरें; पण कोठपर्यंत ? प्रलयकालपर्यंत ते अमर राहतात, इतकेंच.

**ननु तस्माज्जीवादुच्चिक्रमिषोः प्राणा नोत्क्रामन्ति सहैव गच्छन्तीत्ययमर्थः कल्प्यत इति चेत् । न । अत्रैव समवलीयन्त इति विशेषणानर्थक्यात् । सर्वे प्राणा अनूत्क्रामन्तीति च प्राणैर्गमनस्य प्राप्तत्वात् । तस्मादुत्क्रामन्तीत्यनाशङ्कैवैषा । यदाऽपि मोक्षस्य संसारगतिवैलक्षण्यात्प्राणानां जीवेन सहागमनमाशंक्य तस्मान्नोत्क्रामन्तीत्युच्यते तदाऽप्यत्रैव समवलीयन्त इति विशेषणमनर्थकं स्यात् ।**

सिद्धांती—त्यांचे प्राण उत्क्रांत होत नाहींत ' ह्या श्रुतीप्रमाणें—

पूर्व०—कृपाकरून थांबा. ह्या श्रुतीचा अर्थ निराळा आहे. 'त्या जीवापासून त्या ज्ञानी पुरुषाचे प्राण एकटेच उत्क्रमण करीत नाहींत, म्हणजे त्याचे प्राण त्याच्या जीवाबरोबर इतरत्र जातात' असा श्रुतीचा अर्थ आहे. निदान मला वाटतें तसा आहे म्हणून.

सिद्धांती—पण संबंध तर पाहाल ! 'ते प्राण येथेंच लीन होतात' असें पुढचें विशेषणात्मक वाक्य लक्षांत ठेविलेंत, म्हणजे हा तुमचा काल्पनिक अर्थ चुकला आहे, असें तुम्हांसच कळेल. तुम्ही म्हणतां तसा अर्थ असता, तर त्याचे प्राण येथेंच लीन होतात' हें सांगण्याची काय जरूर होती ?

**पूर्व०—आपणच सांगा, त्या ह्या वाक्याचें स्वारस्य ।**

सिध्दांती:—' सर्व प्राण—जीवा—मागून जातात ' असें सामान्यतः अज्ञजनांच्या संबंधानें श्रुतीनें सांगून ठेविलें आहे. तेव्हां प्राणांचें गमन अथवा उत्क्रमण ठरलेलेंच आहे. तो प्रसंग येथें म्हणजे आत्मज्ञानी लोकांच्या संबंधानें येत नाहीं, हें स्पष्टविण्या-साठीं विशेषण वाक्य श्रुतीनें अवतारिलें आहे. तेव्हां ' जीवापासून ते प्राण उत्क्रांत होतात ' इत्यादि अर्थ श्रुतीस मान्य होणें नाहीं; व 'ज्ञान्याचे प्राण जीवाबरोबर जातात' ही कल्पनाही व्यर्थ आहे.

शिष्य०—भगवन् ! मोक्ष आणि संसार यांच्या गतीमध्यें विलक्षण वैधर्म्य आहे. तेव्हां मोक्ष स्थितींत प्राण जीवाबरोबर जातात किंवा कसें ? ही शंका येते. तिच्या निरसनार्थ आत्मज्ञाचे प्राण त्याला, जीवाला, सोडून जात नाहींत असें म्हणण्याचा या पूर्वपक्षाचा अभिप्राय दिसतो.

सिद्धांती:—तथापि ' ते प्राण येथेंच लीन होतात ' या वाक्यांची वाट काय ? जावत्कालपर्यंत या वाक्याची व्यवस्था लागत नाहीं, तोंपर्यंत त्या पूर्वपक्षाची शंका व्यर्थ होते.

न च प्राणैर्वियुक्तस्य गतिरुपपद्यते जीवत्वं वा । सर्वगतत्वा-त्सदात्मनो निरवयवत्वात्प्राणसंबन्धमात्रमेव ह्यग्निविस्फुलिङ्गवज्जी-वत्वभेदकारणमित्यतस्तद्वियोगे जीवत्वं गतिर्वा न शक्या परिक-ल्पयितुं श्रुतयश्चेत्प्रमाणम् । न सतोऽणुरवयवः स्फुटितो जीवाख्यः सद्रूपं छिद्रीकुर्वन्गच्छतीति शक्यं कल्पयितुम् । तस्मात् " तयो-र्ध्वमायन्नमृतत्वमेति " इति सगुणब्रह्मोपासकस्य प्राणैः सह नाड्या गमनं सापेक्षमेव चामृतत्वं न साक्षान्मोक्ष इति गम्यते । " तदपराजितापूस्तदैरं मदीयं सरः " इत्याद्युक्त्वा " तेषामे-वैष ब्रह्मलोकः " इति विशेषणात् ।

पुर्व०—प्राण मात्र येथें लीन होतात आणि जीव परलोकीं जातो, असें कां नाहीं म्हणतां येणार ?

सिद्धांती—पण प्रथम सांगा, प्राणवियोग झाला असतां आत्मा गमनागमन तरी कसें करील ? नव्हें, त्याचें जीवत्व तरी राहील काय ? अहो ! स्वरूपतः आत्मा हा आत्मरूप आहे. अर्थात् तो सर्वव्यापी, सत्तात्मक ( अस्तित्वात्मक ) व निरवयवी असा आहे. तात्पर्य, जीव हा सर्वत्र अस्तिस्वरूपानें राहणारा असून त्याला अवयव बिलकुल नाहींत. त्याचा प्राणाशीं संबंध अज्ञानानें होतो ( होतोसा दिसतो ) तेव्हां मात्र ' हा जीव, ' तो जीव ' असा भेद उत्पन्न होतो. आग्नि एक स्वरूप असतां ही कांहीं

फांद्यांनीं तो निष्फळ झालेले किरण त्याच्या छिद्रांच्या इकडे तिकडे पसरतांना दिसतात नाहीं ? पण छिद्रांचें कारण निरस्त झालें, म्हणजे त्या अदृश्य होऊन जातात, व आणि स्वरूप रहातें. तसेंच, प्राणांचा व आत्म्याचा वियोग झाला, संबंध तुटला, उपाधी संपल्या, म्हणजे त्या आत्म्याचें जीवत्व संपलें व गमनागमनही सरलें, असेंच म्हटलें पाहिजे.

पूर्वी०---पण श्रुतीनींच सांगितलें कीं, ' जीव स्वरूपतः जातो येतो ' तर ?

सिद्धांती:---श्रुति सांगणारच नाहीं; पण तिनें सांगितलेंच तर तें आम्हीं कसें ऐकावें ? ' वंध्यापुत्रानें आकाशपुष्पांची माळा धारण केली आहे ' असें परमेश्वरानें किंवा श्रुतीनें सांगितलें म्हणून आम्हीं ऐकूं कीं काय ? " बाबावाक्यं प्रमाणं " हा मात्र न्याय कोण जागता विचारी पत्करील ?

पूर्वी०---फार चांगलें !

सिद्धांती---चांगल्या वाइटाचा प्रश्न नाहीं. अवयवशून्य असणारा आत्मा हा सद्रूपामध्यें भोंक पाडणारा सत्ताचा ( अस्तित्व रूपाचा ) एक अणु, एक अवयव म्हणजे जीव होय ! अशी विलक्षण कल्पना करून जीव स्वतःच गमनागमन करितो, असें म्हणतां तरी कसें ! किंवा अशी कल्पना करणें तुम्हाला शक्य तरी कसें आहे ? तात्पर्य, प्राणांचा व जीवाचा वियोग होणें म्हणजे जीवाची गति व जीवत्व संपणें, जीव आत्मा होणे होय. पण याला आत्मज्ञानविज्ञान झालें पाहिजे. हें ज्यांस झालें नाहीं, ते अज्ञ होत. आतां, वानप्रस्थादि आश्रमांचें यथासांग आचरण ज्या अनात्मज्ञ पुरुषांनीं केलें, ते लोक म्हणजे त्या त्या लोकांचा जीव ' ऊर्ध्व नाडीच्या साह्यानें ऊर्ध्व म्हणजे श्रेष्ठ लोकांस जाऊन अमरत्व पावतो ' ह्या श्रुति-वाक्यांतील शब्दांचा अर्थच असा आहे कीं ' सगुण ब्रह्माची उपासना करणाऱ्या पुरुषाचा जीव प्राणांसह ऊर्ध्व मार्गानें गमन करून जें अमरत्व पावतो, तें सापेक्ष अथवा सोपाधिक असतें. ' हें अमृतत्व नित्य नव्हे, चिरकालिक असतें, इतकेंच.

शिष्य०---आपण मुलांस " चिरंजीव " म्हणतों ; याचा अर्थ ' अमर व्हा ' असा नसतो. ' पुष्कळ वर्षें जग ' असाच असतो. हें चिरंजीवित्व जसें सापेक्ष, तसाच सगुणब्रह्मोपासनांचा अमरपणा ही सापेक्षच होय. सारांश, आत्मज्ञानाच्या मोक्षांत कोठें ही जावें यावें लागत नाहीं. अनात्मज्ञांस जावें यावें लागत असल्यामुळें त्यांची अमरता सापेक्ष असते. याच उपनिषदांतील आठवा अध्याय, पांचवा खंड पाहिल्यास तुम्हांसच समजेल कीं " तत् म्हणजे त्या ब्रह्मलोकांतील पूः म्हणजे पुरि ( हिरण्यगर्भाचा लोक ) हा अपराजित म्हणजे ब्रह्मचर्याव्यतिरिक्त इतर कोणास ही जित

म्हणजे साध्य व्हावयाचा नाहीं. तेथील सर म्हणजे समुद्र व मदीय म्हणजे आनंदो० मादक असून तो ऐर म्हणजे अन्नपूर्ण मंड आहे.”

दुसरा शिष्य०—मंडाचा अर्थ पक्वान्नाचा फेस, साई किंवा पेज, तो अन्नरसांतील मादक भाग, असें आपण सांगितलें.

सिद्धांतीः—तेथेंच ‘ त्यांस ( ब्रह्मचाऱ्यांस ) मात्र ब्रह्मलोक प्राप्त होतो, असें ही सांगितलें आहे. असो; वर्णाश्रमानुपालकांस सापेक्ष अमरत्व मिळतें, हें ठरलें.

अतः पञ्चाग्निविदो गृहस्था ये चारण्ये वानप्रस्थाः परिव्राजकाश्च सह नैष्ठिकब्रह्मचारिभिः श्रद्धा तप इत्येवमाद्युपासते श्रद्धधानास्तपस्विनश्चेत्यर्थः । उपासनशब्दस्तात्पर्यार्थः । इष्टापूर्ते दत्तमित्युपासत इति यद्वत् । श्रुत्यन्तराच्च सत्यं ब्रह्म हिरण्यगर्भाख्यमुपासते ते सर्वेऽर्चिषमर्चिरभिमानिनीं देवतामभिसंभवन्ति प्रतिपद्यन्ते । समानमन्यच्चतुर्थगतिव्याख्यानेन । एष देवयानः पन्था व्याख्यातः सत्यलोकावसानो नाण्डबहिः ; “ अन्तरा पितरं मातरं च ” इति मन्त्रवर्णात् ॥ १ ॥ २ ॥

सिद्धांतीः—तात्पर्य काय ठरलें, तर मग ?

शिष्यः—पंचाग्निविद्या जाणणारे, तसेंच अरण्यांत राहून वानप्रस्थ व संन्यास या आश्रमांतील धर्मानुसार चालणारे आणि नैष्ठिक ब्रह्मचारी हे सर्व श्रद्धा, तप इत्यादि पुरुषार्थ असें समजून त्यांची उपासना एक निष्ठेनें करितात, तात्पर्य, पूर्ण श्रद्धालु असून तपश्चर्या एकनिष्ठेनें करितात, ते सर्व अर्चिर म्हणजे ज्वालाभिमानी देवते प्रत प्राप्त करून घेतात. इष्टापूर्त करून दानधर्म करणारे जशी एकनिष्ठेनें सकामतः उपासना करितात, तद्वत् हे श्रद्धा तप इत्यादिकांची निष्कामतः उपासना तत्परतेनें करितात, ह्या निष्कामोपासकांस अर्चिर्देवता प्राप्त होते.

पूर्वः—हेंच का फल ?

शिष्य०—असें काय ! अर्चि, अह, शुक्लपक्ष, उत्तरायण इत्यादि मार्ग मागेंच चवथ्या अध्ययनांत सांगितलाना ?

सिद्धांतीः—हाच देवयानपंथ होय. सत्य लोकापर्यंत या मार्गाने हे लोक जातात.

शिष्यः—सत्यलोक ब्रह्मांडांतच आहे. बाहेर नाहीं !

सिद्धांतीः—बाहेर नाहीं. मंत्रवर्णच आहे, हें सांगणारा. ‘ पितृस्थान म्हणजे द्युलोक आणि मातृस्थान म्हणजे पृथ्वी, या उभयतांच्यामध्यें हे देवयान व पितृयाण

हे दोन्ही मार्ग आहेत. द्युलोक व पृथ्वी हीं ब्रह्मांडाचीं दोन कपालें असून त्यायोगें ब्रह्मांडकपाट होतें. तात्पर्य, ब्रह्मांडांत हे दोन्ही मार्ग आहेत. तेव्हां येथें प्राप्त होणारें अमृतत्व सापेक्ष म्हणजे कालभंगुर अथवा अनित्यच असणार ! ॥ १ ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**अथ य इमे ग्राम इष्टापूर्ते दत्तमित्युपासते ते धूममभिसंभवन्ति धूमाद्रात्रिꣳ रात्रेरपरपक्षमपरपक्षाद्यान्षड्दक्षिणैति मासाꣳस्तान्नैते संवत्सरमभिप्राप्नुवन्ति ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थः--अथ ये इमे** [आतां जे गृहस्थ ] **ग्रामे इष्टापूर्ते, दत्तं इति उपासते** [ गांवांत इष्टापूर्त करून व दक्षिणा देऊन उपासना करितात ] **ते धूमं अभिसंभवंति** [ ते प्रथम धूम स्थितीप्रत पावतात ] **धूमात् रात्रिं, रात्रेः अपरपक्षं, अपरपक्षात् यान् षट् मासान् दक्षिणा एति तान् मासान्** [ धूमापासून रात्र, रात्रीपासून कृष्णपक्ष, तेथून ते सहामहिने कीं जेथें दक्षिणगामी सूर्याची वसति असते ते सहामहिने प्राप्त करून घेतात ] **एते संवत्सरं न प्राप्नुवंति** [ हे संवत्सरदेवतेप्रत जात नाहींत ] ॥ ३ ॥

अथेत्यर्थान्तरप्रस्तावनार्थो य इमे गृहस्था ग्रामे । ग्राम इति गृहस्थानामसाधारणं विशेषणमरण्यवासिभ्यो व्यावृत्त्यर्थम् । यथा वानप्रस्थपरिव्राजकानामरण्यं विशेषणं गृहस्थेभ्यो व्यावृत्त्यर्थं तद्वत् । इष्टापूर्ते इष्टमग्निहोत्रादिवैदिकं कर्म पूर्तं वापीकूपतडागारामादिकरणम् । दत्तं बहिर्वेदि यथाशक्त्यर्हेभ्यो द्रव्यसंविभागो दत्तम् । इत्येवंविधं परिचरणपरित्राणाद्युपासते । इतिशब्दस्य प्रकारदर्शनार्थत्वात् । ते दर्शनवर्जितत्वाद्धूमं धूमाभिमानिनीं देवतामभिसंभवन्ति प्रतिपद्यन्ते । तयाऽतिवाहिता धूमाद्रात्रिं रात्रिदेवतां रात्रेरपरपक्षदेवतामेव कृष्णपक्षाभिमानिनीमपरपक्षाद्यान्षण्मासान्दक्षिणा दक्षिणां दिशमेति सविता । तान्मासान्दक्षिणायनषण्मासाभिमानिनीर्देवताः प्रतिपद्यन्त इत्यर्थः । मघाचं-

रिण्यो हि षण्मासदेवता इति मासानिति बहुवचनप्रयोगस्तासु । नैते कर्मिणः प्रकृताः संवत्सरं संवत्सराभिमानिनीं देवतामभिप्राप्नुवन्ति । कुतः पुनः संवत्सरप्राप्तिप्रसङ्गो यतः प्रतिषिध्यते । अस्ति हि प्रसङ्गः । संवत्सरस्य ह्येकस्यावयवभूते दक्षिणोत्तरायणे तत्रार्चिरादिमार्गप्रवृत्तानामुदगयनमासेभ्योऽवयविनः संवत्सरस्य प्राप्तिरुक्ता । अत इहापि तदवयवभूतानां दक्षिणायनमासानां प्राप्तिं श्रुत्वा तदवयविनः संवत्सरस्यापि पूर्ववत्प्राप्तिरापन्नेत्यतस्तत्प्राप्तिः प्रतिषिध्यते नैते संवत्सरमभिप्राप्नुवन्तीति ॥ ३ ॥

सिद्धांतीः—याप्रमाणें मागच्या मंत्रांत वैखानसादि ज्ञानी लोकांस प्राप्त होणाऱ्या लोकांचें वर्णन झालें. आतां, अथ म्हणजे याहून भिन्न लोकांची गति सांगण्यास श्रुति प्रारंभ करित आहे. ऐका:—जे गृहस्थाश्रमी गांवामध्यें राहतात—

शिष्य०—'ग्राम' ह्या शब्दाची काय आवश्यकता ?

सिद्धांती०—तो शब्द गृहस्थांचा असाधारण गुण दाखवितो. ह्मणजे गृहस्थाश्रमी ह्मटला कीं तो गांवांत पत्नीसह राहणारा असलाच पाहिजे. मागच्या मंत्रांत अरण्यवासी ज्ञानी लोक सांगितले. त्या ज्ञान्यांपासून गृहस्थांची व्यावृत्ति व्हावी, गृहस्थ निराळे काढितां यावे, ह्मणून 'अरण्यवासी' हें विशेषण तेथें उपयोजिलें.

शिष्य०—वानप्रस्थ, यती, यांचें अरण्यवासी हें विशेष विशेषण जसें य अरण्यस्थांस गृहस्थांपासून निराळें काढितें, तसें ग्रामवासी हें विशेष विशेषण गृहस्थांस अरण्यस्थांहून विभक्त करितें. ठीक आहे.

सिद्धांती०—अग्निहोत्रादि वैदिक कर्म ह्मणजे इष्ट; वापी, कूप, तडाग, आराम (धर्मशाळा, विश्रांतिस्थानें, अंबराई) इत्यादि लोकोपयोगी व्यावहारिक कर्में करणें ह्मणजे पूर्त आणि यज्ञकर्मांतील वेदीच्या बाहेर येऊन यथाशक्ति दानधर्म सत्पात्रीं करणे याचें नांव दत्त हीं इष्टापूर्त व दत्त इत्यादि कर्में—

शिष्य०—'इति' ह्या शब्दाचें प्रयोजन ?

सिद्धांती—इष्टापूर्तादिप्रमाणेंच असणारीं कर्में; उदाहरणार्थ गुरुजनांची सेवा, त्यांचें व पुत्रादिकांचें संरक्षण, स्वाध्याय, ह्या कर्मांचाही समावेश व्हावा, ह्मणून 'इति' शब्द उपयोजिला आहे. 'इति' ह्मणजे याप्रकारचीं सर्व दैविक व नैतिक कर्में. असो, जे आत्मज्ञान नसणारे अथवा पंचाग्निविद्या न जाणणारे गृहस्थ इष्टापूर्तादि कर्मांनींच उपासना करितात—

शिष्य०—उपासना ह्मणजे तत्परतेनें कर्म करणें ?

सिद्धांती—ठीक. त्या अविद्वान् लोकांस मरण प्राप्त झाल्यानंतर ते धूमलोकीं ह्मणजे धूमाच्या अभिमानी देवतेच्या लोकीं प्रथम जातात. नंतर त्या देवतेच्या अनुग्रहानें ते लोक रात्रिदेवतेच्या लोकांत, तेथून कृष्णपक्ष देवतेच्या व तेथून दक्षिणायनाची

स्वामिनी जी देवता, तिच्या लोकांत त्या त्या देवतांकडून वाहून नेले जातात. तात्पर्य धूम, रात्र, कृष्णपक्ष व दक्षिणायन इत्यादि लोकांत त्यांची क्रमशः पाठवणी होते. मंत्रांत ' दक्षिणा ' हें जें दक्षिणा आहे, हा त्याचें प्रयोग !

शिष्य०—दक्षिणेकडे जेव्हां सूर्य असतो, ते सहा महिने दक्षिणायनाचे !

सिद्धांती—होय. ' मास ' हा शब्द अनेक वचनांत आहे; ते मास अनेक आहेत. म्हणून या मासांच्या सहा अभिमानी देवता सहचारिणी म्हणजे एकत्र जमून वागणाऱ्या असतात. याप्रकारें दक्षिणायनी देवतांपर्यंत हे अभिज्ञान पण वैदिक कर्मकर्ते घेऊन पोहोंचतात.

पूर्व०—अर्थात् पुढें त्यांस संवत्सरदेवतेच्या लोकींचा प्रसाद मिळत असेल ?

सिद्धांती—नाहीं. या अज्ञानी कर्मठांस ही प्राप्ति होत नाहीं.

शिष्य०—पण संवत्सर प्राप्तीचा प्रसंगच कसा येतो मुळीं ?

सिद्धांती—असें कसें म्हणतोस ! प्रसंग आहेच पूर्वपक्षाची शंका आहे.

शिष्यः—तो कसा प्रसंग उत्पन्न होतो ?

पूर्वः—अहो ! दक्षिणायनाचे सहा महिने व उत्तरायणाचे सहा महिने मिळून बारा महिन्यांचा एक संवत्सर होतो. तेव्हां संवत्सर हा अवयवी व दक्षिणायन व उत्तरायण हे त्याचे अवयव झाले. आतां, अर्चिरादि मार्गानें ( देवयान पंथानें ) जाणारे जे ज्ञानी कर्मठ आहेत, ते उत्तरायणमासांच्या देवतांचा प्रसाद घेऊन तद्द्वारा संवत्सर देवतेचा प्रसाद मिळवितात, अवयवाकडून अवयवीकडे जातात, असें आपण आतांच शिकलों. तेव्हां येथें जसा अवयवाच्या द्वारानें त्यांस संवत्सर देवतेचा लाभ होतो तसा इकडेही व्हावा.

सिद्धांती—ही शंका उत्पन्न होईल, हें जाणूनच श्रुतीनें स्पष्ट प्रतिषेध सांगितला कीं ' या लोकांस संवत्सरप्राप्ति होत नाहीं व व्हावयाचीही नाहीं. तेजात्मक संवत्सराची प्राप्ति होण्याला प्रकाशात्मक ज्ञानाची आवश्यकता असते. संवत्सर हा एक प्रजापति आहे, हें विसरूं नका ॥ ३ ॥

---

मंत्र व्याख्या.

मासेभ्यः पितृलोकं पितृलोकादाकाशमाकाशा-च्चन्द्रमसमेष सोमो राजा तद्देवानामन्नं तं देवा भक्षयन्ति ॥ ४ ॥

अन्वय व अर्थः—मासेभ्यः पितृलोकात् आकाशं, आकाशात् चंद्रमसं ( मासांपासून पितृलोक, तेथून आकाश, तेथून चंद्रलोक, असें हे कर्मठ जातात ) एषः सोमः राजा ( हा सोम राजा होय ) तत् देवानां अन्नं ( हा सोम देवांचें अन्न—भक्ष्य—आहे ) देवाः तं भक्षयन्ति ( देव त्याचें भक्षण करितात ) ॥ ४ ॥

मासेभ्यः पितृलोकं पितृलोकादाकाशमाकाशाच्चन्द्रमसम् । कोऽसौ यस्तैः प्राप्यते चन्द्रमा य एष दृश्यतेऽन्तरिक्षे सोमो राजा ब्राह्मणानां तदन्नं देवानां तं चन्द्रमसमन्नं देवा इन्द्रादयो भक्षयन्ति । अतस्ते धूमादिना गत्वा चन्द्रभूताः कर्मिणो देवैर्भक्ष्यन्ते । ननु अनर्थायेष्टादिकरणं यदन्नभूता देवैर्भक्ष्येरन् । नैष दोषः । अन्नमित्युपकरणमात्रस्य विवक्षितत्वात् । न हि ते कवलोत्क्षेपेण देवैर्भक्ष्यन्ते । किं तर्ह्युपकरणमात्रं देवानां भवन्ति ते स्त्रीपशुभृत्यादिवत् । दृष्टश्चान्नशब्द उपकरणेषु स्त्रियोऽन्नं पशवोऽन्नं राज्ञामित्यादौ न च तेषां स्त्र्यादीनां पुरुषोपभोग्यत्वेऽप्युपभोगो नास्ति । तस्मात्कर्मिणो देवानामुपभोग्या अपि सन्तः सुखिनो देवैः क्रीडन्ति । शरीरं च तेषां सुखोपभोगयोग्यं चन्द्रमण्डल आप्यमारभ्यते । तदुक्तं पुरस्ताच्छ्रद्धाशब्दा आपो द्युलोकाग्नौ हुताः सोमो राजा संभवतीति । ता आपः कर्मसमवायिन्य इतरैश्च भूतैरनुगता द्युलोकं प्राप्य चन्द्रत्वमापन्नाः शरीराद्यारम्भिका इष्टाद्युपासकानां भवन्ति अन्त्यायां च शरीराहुतावग्नौ हूयमानायामग्निना दह्यमाने शरीरे तदुत्था आपो धूमेन सहोर्ध्वं यजमानमावेष्ट्य चन्द्रमण्डलं प्राप्य कुशमृत्तिकास्थानीया बाह्यशरीरारम्भिका भवन्ति । तदारब्धेन च शरीरेणेष्टादिफलमुपभुञ्जाना आसते ॥ ४ ॥

सिद्धांती०—दक्षिणायन, तेथून पितरांचा लोक, पुढें आकाश, त्यानंतर चंद्रलोक अथवा त्या त्या लोकांतील देवताप्राप्ति अशी ह्या अज्ञानी कर्मठांची पाठवणी होत असते.

शिष्य०—हा चंद्र आपल्यास अंतरिक्षांत दिसतो, तोच ना ? हाच सोम, हाच ब्राह्मणांचा राजा आहे. चंद्राच्या अनुग्रहानेंच कर्मठ ब्राह्मणांस कृतकर्मांचीं फळें मिळतात.

सिद्धांतीः—सर्व कर्मठांचा राजा चंद्रच आहे. पण सोमप्राशन करण्याचा ज्या याज्ञिकांस विशेष अधिकार आहे त्या याज्ञिक ब्राह्मणांचा राजा सोम आहे, हें श्रुतीस सांगावयाचें आहे. हें प्रकरण ब्राह्मणांपुरतेंच आहे हें विसरूं नका. असो; सोम ( चंद्र ) हें तर इंद्रादि देवांचें नित्याचें भक्ष्य, तेव्हां चंद्रलोकास प्राप्त होऊन चंद्रमय झालेल्या या कर्मठांचें भक्षण इंद्रादि देव करितात ! पहा. अज्ञानी कर्मठांस धूमादि मार्गानें जावें लागून चंद्रत्व प्राप्त होतें खरें; पण शेवटीं ते देवांचें भक्ष्य होतात !

पूर्वः—म्हणजे ही पीडाच ! अन्न होऊन शेवटीं देवांच्या भक्ष्यस्थानीं पडणें हाच इष्टापूर्तादिकांचा परिपाक असेल, तर इष्टापूर्तादिकर्में सुतोळाच लक्षलाभ असोत. पदुरी

पडलेलें दुःख सोडून अग्निहोत्रादि करा आणि फल काय, देवांचें भक्ष्य होणें ! नमस्कार त्या कार्याला व कर्म तसलें विहित करणाऱ्या श्रुतीला !

सिद्धांती—असे भिता काय! अहो ! भक्ष्य ह्मणजे व्रीहि यव, इत्यादि होणें नव्हे ! तर भक्ष्य ह्मणजे दुसऱ्याच्या सुखाचें उपकरण ( साधन ) होणें होय. पहा कीं स्त्री पशू, भृत्य ( सेवक ) इत्यादि जसे पुरुष यजमानाचीं उपकरणें होतात, उपभोगाचीं साधनें असतात, त्याप्रमाणें ह्या कर्मठ लोकांचे जीव चंद्रत्व पाऊन देवांच्या उपभोगांचीं साधनें होतात. आपण अन्नाचा ग्रास ( घास ) हातांत घेऊन भक्षितों, तसें देव या कर्मठांचें भक्षण करीत नाहींत; तर त्या जीवांस आपल्या कामीं लावितात व गुलामां-कडून आपण कामें करून घेतों तशीं ह्या जीवांकडून देव आपलीं कामें करून घेतात. तात्पर्य, अन्न ह्मणजे उपकरण, साधन, होय.

पूर्व०—' अन्न ' शब्दाचा उपकरण हा विचित्रच अर्थ !

सिद्धांती—नाहीं. ' स्त्रिया हें अन्न आहे. पशू अन्न होत, वैश्य हा राजांचें अन्नच' असे प्रयोग आपल्या पाहण्यांत आहेतच.

पूर्व०—अहो ! उपकरण ह्मणा, साधन ह्मणा, दुसऱ्याच्या मात्र उपभोगा-साठीं आपण मरमर मरावयाचें, हाच का विहित कर्मांचा विपाक ? नमस्कार !

सिद्धांती—काय ह्मणावें तुह्मांला ! अहो ! यद्यपि स्त्रिया पुरुषाच्या उपभोगाला उप-कारक होतात, तथापि त्यांस स्वतःसही हा सुखाचा उपभोग मिळतोच ना ? यजमान पैसे देऊन सेवकांकडून काम करून घेतो, त्याचप्रमाणें सेवकही यजमानाच्या उपयोगी पडून त्याकडून पैसे घेतो व आपल्या सुखाची योजना करून सुखप्राप्ति करून घेतो. तात्पर्य, कर्मठांस सुख मिळतें. त्यांच्या वैदिक कर्माचें फल त्यांस मिळतें; मात्र देवाच्या उपयोगी पडल्यानंतर ते सुख मिळतें, इतकेंच. म्हणजे देवांस सुख मिळतें व कर्मठांस ही चंद्रलोकीं सुख मिळतें. ते देवांचीं सुखसाधनें होऊन ही स्वतःस सुखप्राप्ति करून घेतात.

पूर्व०—असो ! पण या कर्मठांस शरीर कोठीलें सुख भोगण्याला प्रत्यक्ष शरीर हवें.

सिध्दांती—चंद्रमंडळांत त्यांस आप्य म्हणजे जलात्मक शरीर प्राप्त होतेंच.

शिष्य०—खरेंच. मघाशींच आपण पाहिलें कीं ' श्रद्धा शब्दानें वाच्य असणाऱ्या जलांची आहुति द्युलोकरूपी अग्नीमध्यें हुत होऊन त्यापासून सोम राजा होतो ( खंड ४ मं० २ पहा )

सिद्धांती—कर्म आहे उपादानकारण ज्यांचें अशीं जलें--

शिष्य०—इतर पृथ्व्यादि भूतेंही येथें असतात, पण जलांचें बहुलत्व असतें, ह्मणून यांस ' जल ' हें नांव मिळतें, असें ही आपण सांगितलें.

सिद्धांती—ठीक. हीं जलें यजमानप्राणांसह द्युलोकीं जाऊन चंद्रत्व पावतात; आणि इष्टादि उपासकांस शरीरादि उपाधींनीं वेष्टण्यास आरंभ करितात.

चित्वा चन्द्रं गच्छन्ति । तत्क्षये चाऽऽवर्तन्ते । क्षणमात्रमपि तत्र स्थातुं न लभ्यते । स्थितिनिमित्तकर्मक्षयात् । स्नेहक्षयादिव प्रदीपस्य ।

सिद्धांती०—हे लोक चंद्रलोकीं किती वेळ राहतात ? या प्रश्नाला उत्तर हें कीं, उपभोगाला निमित्तकारण असणारे कर्मांचा क्षय होईपर्यंत ते जीव येथें राहतात.

शिष्य०—ह्मणजे ज्या कर्मांच्या फलांचा उपभोग घेण्यासाठीं चंद्रलोकीं हे जीव जातात, त्या कर्मांचा ( कर्मफलांचा ) शेवट होईपर्यंत ते तेथें राहतात.

सिद्धांती०—हा क्षय झाला कीं संपात येतो. ज्याच्या योगानें जीवांस खालीं भूलोकीं यावें लागतें, त्या कर्मक्षयाला संपात असें ह्मणावें. एवंच कर्मांचा ह्मणजे फल देणाऱ्या कर्मांचा क्षय झाला कीं जीवाचा अधःपात होतो, हाच संपात होय. याप्रमाणें संपातकालापर्यंत चंद्रमंडळांत हे लोक राहतात. नंतर श्रुति जो मार्ग आतां सांगणार आहे, त्या मार्गानेंच पुनः परत या लोकीं येण्याला निघतात.

शिष्य—' पुनः परत फिरतात ' ह्मणजे ?

सिद्धांतीः—ह्मणजे हे कर्मठ जीव पूर्वीं अनेक वेळ चंद्रमंडळांत गेलेले आहेत व तेथून परत आलेले आहेत, असें या 'पुनः निवर्तन्ते' या शब्दांवरून स्पष्ट अनुमानितां येतें. सारांश, ह्यालोकीं इष्टापूर्तादि कर्मे करावीं, तत्फलें भोगण्यासाठीं चंद्रलोकीं जावें आणि कर्मफलांचे उपभोग संपले ( सुख देणारें कर्मफल संपलें, कर्म संपलें ) ह्मणजे पुनः परत या लोकीं यावें, या क्रमानुसार हे कर्मठ जीव कर्म ( कर्मफल ) संपताक्षणीं एक क्षणभर देखील तेथें राहूं शकत नाहींत. चंद्रलोकीं स्थिति देणारें कर्म संपले कीं यांची रवानगी या लोकाला होते. तेल संपलें कीं दीप नाहींसा होतो, तद्वत् कर्मक्षय झाला कीं हे लोक या लोकीं येतात.

तत्र किं येन कर्मणा चन्द्रमण्डलमारूढस्तस्य सर्वस्य क्षये तस्मादवरोहणं किं वा सावशेष इति । किं ततः । यदि सर्वस्यैव क्षयः कर्मणश्चन्द्रमण्डलस्थस्यैव मोक्षः प्राप्नोति । तिष्ठतु तावत्तत्रैव स्यान्न वेति । तत आगतस्येह शरीरोपभोगादि न संभवति । ततः शेषेणेत्यादिस्मृतिविरोधश्च स्यात् । नन्विष्टापूर्तदत्तव्यतिरेकेण्यापि मनुष्यलोके शरीरोपभोगनिमित्तानि कर्माण्यनेकानि संभवन्ति न च तेषां चन्द्रमण्डल उपभोगः । अतोऽक्षीणानि तानि । यन्निमित्तं चन्द्रमण्डलमारूढस्तान्येव क्षीणानीत्यविरोधः । शेष-

शब्दश्च सर्वेषां कर्मत्वसामान्यादविरुद्धः । अत एव च तत्रैव मोक्षः स्यादिति दोषाभावः । विरुद्धानेकयोन्युपभोगफलानां च कर्मणामेकैकस्य जन्तोरारम्भकत्वसंभवात् । न चैकस्मिञ्जन्मनि सर्वकर्मणां क्षय उपपद्यते । ब्रह्महत्यादेश्चैकैकस्य कर्मणोऽनेक-जन्मारम्भकत्वस्मरणात् । स्थावरादिप्राप्तानां चात्यन्तमूढाना-मुत्कर्षहेतोः कर्मण आरम्भकत्वासंभवात् । गर्भभूतानां च स्रंस-मानानां कर्मासंभवे संसारानुपपत्तिः । तस्मान्नैकस्मिञ्जन्मनि सर्वेषां कर्मणामुपभोगः ।

सिद्धांती०—कर्मक्षय होऊन हे खाली येतात, तेव्हां—

पूर्व०—थांबा. ज्या प्रकारच्या कर्मांनें चंद्रलोकाची प्राप्ति झाली, चंद्रमंडलामध्यें वास्तव्य करून कर्मफल भोगण्याची ज्या अज्ञानकृत वैदिक कर्मांनें योग्यता प्राप्त झाली, तें कर्म सर्वांशीं संपल्यानंतर कर्मठांचा जीव खालीं येतो, किंवा खालीं येतांना कांहीं कर्मांचें फल भोगणें शिल्लक राहून हा जीव खालीं येतो, हें ठरविलें पाहिजे.

शिष्य०—या ठरविण्याची फलप्राप्ति ?

पूर्व०—अहो ! यच्चयावत् सर्व कर्मांचा क्षय होतो, असें जर असेल, तर मग हो काय ! चंद्रलोकांतच या जीवाला मोक्ष मिळणार ! कर्मच जर शिलक नाहीं, तर पुनः जन्म घेण्याची पाळी यावयाचीच नाहीं.

सिद्धांती०—पण ज्ञानविज्ञानाशिवाय मोक्ष कसा मिळेल ?

पूर्व०—मोक्ष राहूं द्या. तो मिळो, किंवा न मिळो; पण निदान चंद्रलोकांतून खालीं पाडणारें कर्म शिलक नसल्यामुळें तो जीव तेथेंच राहिला पाहिजे. कारण, समजा, स्थिति-हेतुक कर्म नसल्यामुळें तो खालीं पडला, तरी त्याला शरीर देणारें कर्म शिलक नस-ल्यामुळें भूलोकींहि येतां येत नाहीं; व येथील विषयोपभोगही घेतां येत नाहींत. तात्पर्य, तो चंद्रलोकांतच राहणार. तुमच्याच स्मृति सांगत असतात ना, कीं, शेषकर्म (न भोगलिलें कर्म असेल, तरच जन्मप्राप्ति होते ? तात्पर्य, तो तेथेंच राहिला पाहिजे.

शिष्य०—पण इष्टापूर्तादि चंद्रलोकीं नेणाऱ्या कर्मांव्यतिरिक्त अशीं अनेक कर्में त्याच मनुष्याचीं शिलक असतात कीं, त्यांचा उपभोग घेण्यासाठीं जीवाला या लोकीं जन्म घेणें भाग पडतें. ज्या कर्मांचा चंद्रमंडळीं उपभोग घेतां येत नाहीं, त्या अनुप-भुक्त ह्मणून क्षीण न झालेल्या कर्मांच्या फलांचा उपभोग घेण्यासाठीं शरीर धारण केलेंच पाहिजे. आतांच गुरुजींनीं कर्मक्षय झाला असें ह्मटलें, तो क्षय चंद्रमंडळाला नेणाऱ्या मात्र कर्मांचा होय, तेव्हां येथें विरोधाला जागाच नाहीं. चंद्रमंडलप्रापक कर्मांशिवाय इतर कर्में ( संचित कर्में ) असतात. तेव्हां आतांच सांगितलेला कर्मक्षय ह्मणजे केवळ चंद्रमंडळाला नेणाऱ्या कर्मांचा क्षय होय.

सिद्धांती:— आणि स्मृतींत शेष शब्द योजिला आहे, तो, सर्व कर्में फलांत व जातीमध्यें अंतर्भूत होतात, या दृष्टीनेंच होय. तात्पर्य अनेक कर्में उपभोगावयाचीं असतात, म्हणून येवढ्योकीं उपभोग घेणारा अज्ञानी जीव निःशेषरूपानें केव्हांही होत नाहीं. अर्थात्च ' शेषेण ... मोक्ष मिळावा ' असें म्हणून श्रुतिविरुद्ध आक्षेप घेतलात, त्याला जागाच नाहीं !

**शिष्य०—कर्मक्षय केव्हांच होत नाहीं !**

**सिद्धांती:—**नाहीं. अज्ञानी जीवाच्या अनंत जन्मींच्या अमुक कर्मांचा क्षय केव्हांही होत नाहीं. ज्ञान झाल्याशिवाय कर्मक्षय होणेंच नाहीं. कारण उघड आहे. परस्पर विरोधी असणारीं, अनेक योनीमध्यें जाऊनच ज्यांचा उपभोग घेतला पाहिजे, अशीं अनंत कर्में असतात. त्या कर्मांपैकीं एक एक कर्मसुद्धां जीवाला जन्म देण्याला समर्थ असतें. त्याचा उपभोग झाला कीं दुसरें संचित प्रारब्धाचें स्वरूप घेतें. त्याच्या मागून तिसरें तयारच असतें.

शिष्य०—सारांश, एका कोणत्या तरी जन्मांत अज्ञानी जीवाच्या कर्मांचा निःशेष क्षय व्हावयाचाच नाहीं, तर मग ?

सिद्धांती:— नाहीं. शक्य नाहीं. अरे ! ब्रह्महत्येसारखें एक एकच कर्म जीवांस अनेक श्वानशूकरादिकांचे जन्म घ्यावयास लाविते, असें स्मृतिशास्त्रें सांगताहेत ना ? शिवाय ज्या जीवांस स्थावरत्व प्राप्त झालें किंवा मनुष्य जन्म येऊनही ते अत्यंत मूर्ख असले, तर आपल्या जीवाची उन्नति करून देणाऱ्या कर्मास प्रकट होण्याला ( चांगलें कर्म करण्याला ) अवसरच मिळत नाहीं. शिवाय, जन्म प्राप्त झाला तरी गर्भांतच मरण आल्यामुळें ( गर्भपात झाल्यामुळें ) कर्मच होत नाहीं, आणि कर्मफलाचा उपभोग देणाऱ्या अथवा श्रेष्ठ कर्म करविणाऱ्या संसाराचाही संभव असत नाहीं. म्हणून एका जन्मांत सर्व कर्मांचा उपभोग घेईल म्हटलें किंवा एकाच कर्माचा एका जन्मांत उपभोग घेणें ठरविलें, तर तो आपला हेतु सिद्धीस जात नाहीं.

**यत्तु कैश्चिदुच्यते सर्वकर्माश्रयोपमर्देन प्रायणे कर्मणां जन्मारम्भकत्वम् । तत्र कानिचित्कर्माण्यनारम्भकत्वेनैव तिष्ठन्ति कानिचिज्जन्माऽऽरभन्त इति नोपपद्यते । मरणस्य सर्वकर्माभिव्यञ्जकत्वात्स्वगोचराभिव्यञ्जकप्रदीपवदिति । तदसत् । सर्वस्य सर्वात्मकत्वाभ्युपगमात् । न हि सर्वस्य सर्वात्मकत्वे देशकालनिमित्तावरुद्धत्वात्सर्वात्मनोपमर्दः कस्यचित्क्वचिदभिव्यक्तिर्वा सर्वात्मनोपपद्यते । तथा कर्मणामपि साश्रयाणां भवेत् । यथा च पूर्वानुभूतमनुष्यमयूरमर्कटादिजन्माभिसंस्कृता विरुद्धानेकवासना मर्कट-**

स्वभावकेन (५) कर्मणा मर्कटजन्माऽऽरम्भणेन नोपमृद्यन्ते तथा कर्मान्तरारब्धजन्मप्राप्तिनिमित्तानि नोपमृद्यन्त इति युक्तम् । यदि हि सर्वाः पूर्वजन्मानुभववासना उपमृद्येरन्मर्कटजन्मनिमित्तेन कर्मणा मर्कटजन्मारम्भे मर्कटस्य जातमात्रस्य मातुः शाखायाः शाखान्तरगमने मातुरुदरसंलग्नत्वादिकौशलं न प्राप्नोति । इह जन्मन्यननुभूतत्वात् । न चातीतानन्तरजन्मनि मर्कटत्वमेवाऽऽसीत्तस्येति वक्तुं शक्यम् । " तं विद्याकर्मणी समन्वारभेते पूर्वप्रज्ञा च " इति श्रुतेः । तस्मात्संस्कारशेषकर्मोपमर्द इति शेषकर्मसंस्कारः । यत एवं तस्मात्केषांचिदुपस्थापककर्मणः संस्कार उपपद्यत इति न कश्चिद्विरोधः ।

पूर्व०—हें ठीक. पण जीवाला मरण प्राप्त झालें असतां सर्व कर्मांला आश्रय देणारें शरीर नष्ट होतें. अर्थात् त्याचवेळीं उघड्या पडलेल्या, निराधार झालेल्या सर्व कर्मांस प्रारब्धत्व येऊन त्यांनी आपापलें फल देण्याची तयारी करून आलें पाहिजे, हें उघड आहे. आधार असल्याशिवाय कर्म राहणार कोठें ? एवंच जर सर्वांस प्रारब्धत्व आलें पाहिजे असें ठरतें, तर कांहीं कर्में मात्र प्रारब्धाच्या सदरांत यावीं व कांहींनीं दुसऱ्या तिसऱ्या जन्मापर्यंत अंधारांत लोंबत रहावें, हें कांहीं योग्य नव्हे. मरणाच्या वेळीं कोणताही अडथळा नसतो. तेव्हां प्रदीप जसा आपल्या प्रकाशांत असणाऱ्या सर्व पदार्थांस प्रकाशित करितो त्याप्रमाणें सर्व शरीरेंच नष्ट झालेल्या मरणानें सर्व कर्में प्रकट करून त्यांस प्रारब्धत्व दिलें पाहिजे.

सिध्दांती—हें तुमचें म्हणणें ठीक नाहीं. मधुविद्येमध्यें आपण असें शिकलों कीं, यच्चावत् म्हणून जेवढे पदार्थ आहेत, ते सर्व सर्वरूप असतात ( मधुविद्या अध्याय ३ ), सर्वात्मक असणारे सर्व पदार्थ केव्हां देशाच्या उपाधीनें, केव्हां कालाच्या उपाधीनें व केव्हां निमित्ताच्या उपाधीनें अवरुद्ध झालेले असतात. तेव्हां त्या त्या पदार्थांचा सर्वथा उपमर्द होणें, सर्वथा नाश होणें, संभवनीय नाहीं, किंवा कोणा एकाची केव्हांही सर्वात्मना अभिव्यक्ति ( प्रकटता ) ही होणें शक्य नाहीं. हीच स्थिति शरीराचा आश्रय घेऊन राहणाऱ्या कर्मांची असली पाहिजे. एक कालींच सर्व कर्मांचा उच्छेद होणें किंवा प्रकटता होणें असंभवनीय आहे. पहा कीं, पूर्वी प्राप्त झालेल्या मनुष्य, मोर, माकड इत्यादि जन्मांतील संस्कृतीनें सिद्ध झालेल्या अनेक विरुद्धस्वरूपी वासना जशा माकडाचा जन्म देणाऱ्या प्रारब्धकर्मानें तो जन्म आला असतां नाहींशा होत नाहींत, मनुष्य किंवा मयूर जन्मांतील वासना तशाच राहतात, त्याचप्रमाणें अन्य जन्माची प्राप्ति करून देणारीं जीं

कर्में असतात, त्यांचा विनाश झाल्याच देहाचा विनाश झाला म्हणून म्हणायाचा नाहीं, हें उघड आहे.

पूर्व०—पण नष्ट होत नाहींतच हें कशावरून .

सिद्धांती:—जर पूर्व जन्मांतील सर्व वासनांचा क्षय होतो, असें म्हटलें तर माकडाचा जन्म देणाऱ्या कर्मानें माकडाचा जन्म दिल्यानंतर जो चमत्कार दिसतो, त्याची उपपत्ति लागत नाहीं.

शिष्य०—कोणता चमत्कार ?

सिद्धांती:—अरे ! जन्म होऊन एक क्षण लोटला नाहीं; तों तें मर्कट—बालक आपल्या मातेच्या उदरांशीं अगदीं चिकटून राहतें ना ? या झाडावरून त्या झाडावर उड्या मारणाऱ्या आईच्या पोटाशीं लगटून बसण्याचें कौशल्य त्या बालकाला जन्मतांक्षणीं प्राप्त होतें. तें कौशल्य पूर्व—वासना सर्वथा नष्ट झाल्या असें ह्मटलें तर कसें उत्पन्न होईल ? पूर्व संस्कार नसते तर त्या माकडाच्या पोराला आईच्या पोटाशीं चिकटून कसें बसतां आलें असतें ? या जन्मीं तर त्यानें चिकटून बसण्याचा अभ्यास केलेला नसतो! किंवा त्याचा मागचाच जन्म माकडाचाच होता, हे ही म्हणतां येत नाहीं.

पूर्व०—' मेल्यानंतर त्या जीवाबरोबरच विद्या व कर्म आणि पूर्वप्रज्ञा ( पूर्वी अनुभविलेल्या उपभोगाची वासना, हीं जातात. ' अशा श्रुतीची वाट काय ?

सिद्धांती:—श्रुति बरोबर सांगते. वासना जीवाला अनुसरते, इतकेंच ती म्हणते. मागच्याच जन्मीची प्रत्येक वासना ही आहे ह्याला काय आधार ? तात्पर्य, याप्रमाणें वासनेचा विनाश होत नाहीं, त्याचप्रमाणें सर्व कर्माचाही उपमर्द होत नाहीं. कांहीं कर्म अवशिष्ट राहतेंच राहतें, अर्थात् उपभुक्त झालेल्या कर्माहून हें कर्म निराळें असतें व या अनुपभुक्त कर्मानें संसाराची प्राप्ति होते. झालें ? तुमचा आक्षेप संपला ? नाहींना आतां लौकिक वैदिक आक्षेप ?

पूर्व०—पुढें चालूं द्या.

सिद्धांती:—ठीक.

कोऽसावध्वा यं प्रति निवर्तन्त इत्युच्यते । यथेतं यथागतं निवर्तन्ते । ननु मासेभ्यः पितृलोकं पितृलोकादाकाशमाकाशाच्चन्द्रमसमिति गमनक्रम उक्तो न तथा निवृत्तिः । किं तर्ह्याकाशाद्वायुमित्यादि, कथं यथेतमित्युच्यते । नैष दोषः । आकाशप्राप्तेस्तुल्यत्वात्पृथिवीप्राप्तेश्च । न चात्र यथेतमेवेति नियमोऽनेवंविधमपि निवर्तन्ते पुनर्निवर्तन्त इति तु नियमः । अत उपलक्षणार्थमेतद्यथेत-

मिति । अतो भौतिकमाकाशं तावत्प्रतिपद्यन्ते । यास्तेषां चन्द्रमण्डले शरीरारम्भिका आप आसंस्तास्तेषां तत्रोपभोगनिमित्तानां कर्मणां क्षये विलीयन्ते । घृतसंस्थानमिवाग्निसंयोगे ता विलीना अन्तरिक्षस्था आकाशभूता इव सूक्ष्मा भवन्ति । ता अन्तरिक्षाद्वायुर्भवन्ति । वायुप्रतिष्ठा वायुभूता इतश्चामुतश्चोह्यमानास्ताभिः सह क्षीणकर्मा वायुभूतो भवति । वायुर्भूत्वा ताभिः सहैव धूमो भवति । धूमो भूत्वाऽभ्रसम्भरणमात्ररूपो भवति ॥ ५ ॥

सिद्धांतीः—आतां या जीवांच्या निवर्तनाचा, परत येण्यासाठीं ज्या मार्गानें मार्गस्थ झाले, तो मार्ग कोणता तो पाहूं. ऐकाः—यथा म्हणजे ज्या प्रकारें आले, त्या प्रकारेंच ते जातात.

पूर्व०—मास ( महिने ) पितृलोक, आकाश, चंद्रमंडळ, असा ह्या जीवांचा गमनक्रम सांगितला आहे, तसाच निवृत्तिक्रम असेल ?

सिद्धांती०—त्यांचें निवर्तन तसें नाहीं.

शिष्य०—कसें आहे तें ?

सिध्दांती०—ते आकाशांत जाऊन पुढें वायुरूप होतात.

पूर्व०—मग आले, तसे गेले असें म्हणणारा निवृत्ति शब्द कशाला ?

सिद्धांती—कांहीं दोष नाहीं. उभय ठिकाणीं आकाशप्राप्ति व पृथ्वीप्राप्ति आहेच. शिवाय आले त्याच मार्गानें हे जीव परत गेले पाहिजेत असा नियमही नाहीं. दुसऱ्याही मार्गानें ते जीव परत फिरतील कदाचित्. तात्पर्य, ते पुण्यक्षीण झालेले जीव पुनः **माघारे परत फिरतात**, हा मात्र नियम आहे. तेव्हां ' यथाइत ' असें श्रुतीनें म्हटलें आहे, तें केवळ उपलक्षण मात्र असून आकाश व पृथ्वी हीं दोन स्थानें कायम राहतात, हें दाखवितें. असो; निर्णय काय ? तर ते प्रथम **भौतिक** आकाशाप्रत **परत येतात.**

शिष्य०—नुसतें आकाश म्हटलें तर परमात्म्याप्रत जातात, असें होईल.

सिद्धांती—शाबास ! आतां चंद्रमंडलांत असतांना शरीराला प्रारंभ करणारीं जीं जलें ( आप् ) होतीं, त्यांचा विनाश या आकाशांत होतो. म्हणजे आकाशांत ज्या कर्मफलांचा उपभोग घेणें असतो, तो घेतल्यानंतर ( तीं कर्में उपभोगानें नष्ट झाल्यानंतर ) त्या जलांच्या जड स्वरूपाचा ही विनाश होतो व त्यांस सूक्ष्मत्त्व येतें. अग्निसंयोग झाला असतां घृताचें काठिण्य नष्ट होतें, तद्वत् तीं जलें विलीन होऊन अंतरिक्षस्थ होतात, जणो आकाशासारखीं अतिसूक्ष्म होतात. नंतर त्याच जलांस वायुरूप येतें.

अर्थात् [illegible] प्रवेश करून [illegible] आप बनें वायुरूपाकाशसें रूप धारण [illegible] ही जळें (आहुती) वायुरूपानें प्रकट [illegible] निघते व निघाल्यावर [illegible] असतात. त्यांच्या [illegible] नंतर त्यांच्यासह त्या जीवाला वृष्टिरूप व पुढें जलसेचन [illegible] होतें ॥ ५ ॥

---

मंत्र सहावा.

**अभ्रं भूत्वा मेघो भवति मेघो भूत्वा प्रवर्षति त इह व्रीहियवा ओषधिवनस्पतयस्तिलमाषा इति जायन्तेऽतो वै खलु दुर्निष्प्रपतरं यो यो ह्यन्नमत्ति यो रेतः सिञ्चति तद्भूय एव भवति ॥ ६ ॥**

**अन्वय व अर्थः**—**अभ्रं भूत्वा मेघः भवति, मेघः भूत्वा प्रवर्षति** (अभ्र होऊन मेघ व मेघ होऊन पर्जन्य होतात) **ते इह व्रीहियवाः, ओषधिवनस्पतयः, तिलमाषाः इति जायन्ते** (ते येथें व्रीहि, यव, ओषधि, वनस्पती, तीळ उडीद या प्रकारांनी जन्म पावतात) **अतः वै खलु दुर्निष्प्रपतरं** (म्हणून येथून सुटका होणें भारी कठिण आहे.) **हि** (कारण) **यः यः अन्नं अत्ति यः रेतः सिंचति** (जर कोणी अन्न खाल्लें व जर त्यानें रेतसिंचन केलें, तर) **तत् भूयः एव भवति** (तर त्या त्या आकाराचे होतात) ॥ ६ ॥

अभ्रं भूत्वा ततः सेचनसमर्थो मेघो भवति मेघो भूत्वोन्नतेषु प्रदेशेष्वथ प्रवर्षति । वर्षधारारूपेण शेषकर्मा पततीत्यर्थः । त इह व्रीहियवा ओषधिवनस्पतयस्तिलमाषा इत्येवंप्रकारा जायन्ते । क्षीणकर्मणामनेकत्वाद्बहुवचननिर्देशः । मेघादिषु पूर्वेष्वेकरूपत्वादेकवचननिर्देशः । यस्माद्गिरितटदुर्गनदीसमुद्रारण्यमरुदेशादिसंनिवेशसहस्राणि वर्षधाराभिः पतितानाम् । अतस्तस्माद्धेतोर्वै खलु दुर्निष्प्रपतरं दुर्निष्क्रमणं दुर्निःसरणम् । यतो गिरितटादुदकस्रोतसोह्यमाना नदीः प्राप्नुवन्ति ततः समुद्रं ततो मकरादिभिर्भक्ष्यन्ते । तेऽ-

अन्वय व अर्थः—अथ एतयोः पथोः कतरेण च न (पण वर सांगितलेल्या दोन्ही मार्गांपैकीं एकाहि मार्गाचा जे स्वीकार करीत नाहींत) तानि इमानि, क्षुद्राणि भूतानि असकृदावर्तीनि भवन्ति, 'जायस्व', 'म्रियस्व' इति (तीं हीं क्षुद्र भूतें वारंवार आवृत्ती करणारीं होतात, जन्मास यावें आणि मरावें, या आज्ञेचें तें अनुपालन करीत असतात) एतत् तृतीयं स्थानं (हें तिसरें स्थान आहे) तेन असौ लोकः न संपूर्यते (ह्या तिसऱ्या मार्गामुळें तो लोक भरून जात नाहीं) तस्मात् जुगुप्सेत (म्हणून निंद्य आहे) तत् एषः श्लोकः (त्यासंबंधानें हा पुढील श्लोक आहे.) ॥ ८ ॥

यदा तु न विद्यासेविनो नापीष्टादिकर्म सेवन्ते तदाऽथैतयोः पथोर्यथोक्तयोरर्चिर्धूमादिलक्षणयोर्न कतरेणान्यतरेण च नापि यन्ति तानीमानि भूतानि क्षुद्राणि दंशमशककीटादीन्यसकृदावर्तीनि भवन्ति । अत उभयमार्गपरिभ्रष्टा ह्यसकृज्जायन्ते म्रियन्ते चेत्यर्थः । तेषां जननमरणसंततेरनुकरणमिदमुच्यते । जायस्व म्रियस्वेतीश्वरनिमित्तचेष्टोच्यते । जननमरणलक्षणेनैव कालयापना भवति । न तु क्रियासु भोगेषु वा कालोऽस्तीत्यर्थः । एतत्क्षुद्रजन्तुलक्षणं तृतीयं पूर्वोक्तौ पन्थानावपेक्ष्य स्थानं संसरताम् । येनैवं दक्षिणमार्गगा अपि पुनरागच्छन्त्यनधिकृतानां ज्ञानकर्मणोरगमनमेव दक्षिणेन पथेति । तेनासौ लोको न संपूर्यते । पञ्चमस्तु प्रश्नः पञ्चाग्निविद्यया व्याख्यातः । प्रथमो दक्षिणोत्तरमार्गाभ्यामपाकृतो दक्षिणोत्तरयोः पथोर्व्यावर्तनाऽपि भूतानामग्नौ प्रक्षेपः समानस्ततो व्यावर्तनाऽन्येऽर्चिरादिना यन्त्यन्ये धूमादिना पुनरुत्तरदक्षिणायने षण्मासान्प्राप्नुवन्तः संयुज्य पुनर्व्यावर्तन्ते । अन्ये संवत्सरमन्ये मासेभ्यः पितृलोकमिति व्याख्याता । पुनरावृत्तिरपि क्षीणानुशयानां चन्द्रमण्डलादाकाशादिक्रमेणोक्ता । अमुष्य लोकस्यापूरणं स्वशब्देनैवोक्तम्—तेनासौ लोको न संपूर्यत इति । यस्मादेवं कष्टा संसारगतिस्तस्माज्जुगुप्सेत । यस्माच्च जन्ममरणजनितवेदनानुभवकृतक्षणाः क्षुद्रजन्तवो ध्वान्ते च घोरे दुस्तरे प्रवेशिताः सागर इवागाधेऽप्लवे निराशाश्चोत्तरणं प्रति तस्माच्चैवंविधां संसारगतिं जुगुप्सेत बीभत्सेत घृणी भवेन्मा भूदेवंविधे संसारमहोदधौ घोरे पात इति । तदेतस्मिन्नर्थ एष श्लोकः पञ्चाग्निविद्यास्तुतये ॥ ८ ॥

सिद्धांती०—परंतु कोणी जीव विद्येचें सेवन करीत नाहींत, किंवा इष्टादिकर्में करीत नाहींत. अर्थात् गेल्या मंत्रांत अर्चिर्मार्ग व धूममार्ग हे जे दोन मार्ग सांगितले त्यापैकीं कोणत्याहि एका मार्गानें ते जीव जात नाहींत. ते हे जीव ह्मणजे दंश ( डांस ) मशक ( माशा ) कीटक इत्यादि क्षुद्र जीव होत. हे जीव वारंवार परत येणारे असतात. उभयमार्गापासून सर्वथा भ्रष्ट झालेले हे जीव वारंवार अतिशय लवकर मरतात; आणि लागलेच जन्माला येतात. त्यांच्या जन्ममरणाची अविच्छिन्न संतति ( धारा ) असते हें स्पष्ट करण्यासाठीं श्रुतीनें ' जायस्व, म्रियस्व ( जन्मा आणि मरा ) हीं पदें मंत्रांत योजिलीं आहेत. तात्पर्य ईश्वराच्या सत्तेनें ह्या जन्ममरणाच्या चेष्टा हे जीव करीत असतात. जन्मावें व लागलीच मरावें. ह्या व्यापारामध्यें मात्र त्यांचा सर्वकाल जात असतो. क्रिया करण्याला अथवा क्रिया-फल भोगण्याला या भ्रष्ट जीवांस अवसरच मिळत नाहीं. हें क्षुद्र जीवांचें लक्षण होय. हेंच तें तिसरें स्थान. पूर्वोक्त जे दोन मार्ग आहेत त्याहून निराळा हा तिसरा मार्ग किंवा स्थान आहे. संसारी क्षुद्र जीवांचें हें स्थान होय; आणि ह्मणूनच यद्यपि हे दक्षिणमार्गानें जाणारे असतात, तथापि पुन्हः पुन्हा, लवकरच परत येतात. कारण ज्ञानकर्मांचा अधिकार ज्यानां नाहीं. त्यानां दक्षिण मार्गानें जातां येणें शक्यच नाहीं. हें असें आहे ह्मणून, म्हणजे चंद्रमंडळांत हे जीव जात नाहींत ह्मणून, तो लोक भरून जात नाहीं. याप्रमाणें पांचीं प्रश्नांचीं उत्तरें झालीं. पांचव्या प्रश्नाचें उत्तर पंचाग्निविद्येचें विवरण करून सांगितलें आहे. पहिल्या प्रश्नाचें उत्तर दक्षिणोत्तर मार्गाचें विवरण करून, दिलें. दक्षिणोत्तर मार्गाची व्यावर्तना हीं सांगितली, ती अशी कीं मृत झाल्यानंतर अग्नीमध्यें प्रक्षिप्त होणें हें उभयतांसही समान आहे. नंतर पुढें व्यावर्तनाला ह्मणजे भेद होण्याला सुरवात होते. कांहीं जीव अर्चिरादिमार्गानें जातात. आणि कांहीं धूमादिमार्गानें जातात. पुढें उत्तरदक्षिणायनें षण्मासाला उभयतां प्राप्त झालीं, ह्मणजे तेथें एकत्र होऊन पुन्हां हे दोन्ही प्रकारचे जीव निरनिराळा मार्ग स्वीकारतात. कांहीं संवत्सर-देवतेच्या लोकांत जातात आणि कांहीं षण्मासदेवतेच्या लोकांत पितृलोकांत जातात. हीच ती व्यावर्तना होय.

( श्मशानांतील अग्नींत ज्ञानमार्गी व कर्ममार्गी एकाच पद्धतीनें जातात. पुढें विभक्त होऊन निष्काम कर्मी जीव उत्तरपंथानें व सकामकर्मी जीव दक्षिणपंथानें जात असतां उभयतांची गांठ दक्षिणायनाचा व उत्तरायणाचा जेथें संयोग होतो तेथें पडते. पुनः वियोग होऊन निष्कामकर्मी-यानांच ज्ञानी ह्मणावयाचें-विज्ञानमंडळापर्यंत जातात आणि सकामकर्मी पितृलोकांत जाऊन तेथून पुढें चंद्रलोकांत जातात. हीच व्यावर्तना होय. )

सकामकर्मी जीव चंद्रमंडळांत स्वकर्मफळाचा उपभोग घेतात, आणि क्षीणानुशय झाल्यानंतर हे जीव चंद्रमंडळापासून आकाशादि क्रमानें खालीं पडतात. याप्रमाणें

बाकीच्या प्रश्नाचा निकाल झाला. तो लोक भरून जात नाहीं, याचें उत्तर श्रुतीनें आपणच होऊन स्पष्ट दिलें आहे. "तेन असौ लोकः न संपूर्यते इति" असो; ज्याअर्थी ही संसार गति ( जन्ममरणाचा मार्ग ) अत्यंत कष्टकर आहे. त्याअर्थी ती निंद्य आहे, असें म्हटलें पाहिजे. पहा कीं जन्ममरणाच्या असह्य वेदनांचा अनुभव प्रत्येक क्षणीं घेण्यासाठींच हे क्षुद्र जीव या ध्वांत ( अंधकारपूर्ण ), घोर आणि दुस्तर अशा अगाध महासागरामध्यें प्रविष्ट झाले आहेत। या सागरांत कसल्याही प्रकारच्या नौकेचा आश्रय नसल्यामुळें त्याच्या परतीरास जाण्याची आशाच नको. म्हणून अशा प्रकारच्या संसारगतीची जितकी निंदा करावी तितकी थोडीच आहे. खरोखर ही स्थिति दीन म्हणून अनुकंपनीय आहे. परमेश्वरानें दया करावी आणि असल्याप्रकारच्या घोर संसारमहासागरामध्यें कोणाचेंही पतन होऊं नये. क्षुद्र जीवांना संसारांत पडावें लागतें, त्याचप्रमाणें सकामकर्मी जीवांसही पडावें लागतें; आणि घोर यातना भोगाव्या लागतात. असो, हाच अर्थ स्पष्ट करणारा पुढील श्लोक आहे, पंचाग्निविद्येची स्तुति करण्याकरितां असलेल्या प्रकरणांत पुढील श्लोकाची योजना आहे हें स्पष्ट होईल. ॥ ८ ॥

---

### मंत्र नववा.

**स्तेनो हिरण्यस्य सुरां पिबꣳश्च गुरोस्तल्पमावसन्ब्रह्महा चैते पतन्ति चत्वारः पञ्चमश्चाऽऽचरꣳस्तैरिति ॥ ९ ॥**

**अन्वय व अर्थः—हिरणस्य स्तेनः सुरां पिबन्, गुरौ तल्पं आवसन्, च ब्रह्महा, एते चत्वारः पतन्ति** (सुवर्णाची चोरी करणारा, मद्यपान करणारा, गुरुतल्पगामी आणि ब्रह्महत्या करणारा चौघे पापी, पतित होतात) **तैः आचरन् पंचमः च** ( आणि त्यांच्यासह असणारा पांचवाही पतित होतो) इति हें पंचमहापातकी होत ॥९॥

स्तेनो हिरण्यस्य ब्राह्मणसुवर्णस्य हर्ता। सुरां पिबन्ब्राह्मणः सन्। गुरोश्च तल्पं दारानावसन्। ब्रह्महा ब्राह्मणस्य हन्ता चेत्येते पतन्ति चत्वारः। पञ्चमश्च तैः सहाऽऽचरन्निति ॥ ९ ॥

सिद्धांतीः—हिरण्याची चोरी करणारा ( ब्राह्मणाच्या सुवर्णाचा अपहार करणारा ) ब्राह्मण असून मद्य पिणारा, गुरुपत्नीशी व्यभिचार करणारा, ब्रह्महत्या करणारा हे चारी धर्मपतित होतात; आणि या पातक्याबरोबर संगति करणाराही महापातकी होतो ॥ ९ ॥

मूळ सूत्र.

अथ ह य एतानेवं पञ्चाग्नीन्वेद न सह तैरप्याचरन्पाप्मना लिप्यते शुद्धः पूतः पुण्यलोको भवति य एवं वेद य एवं वेद ॥ १० ॥

इति पञ्चमाध्यायस्य दशमः खण्डः ॥ १० ॥

अन्वय व अर्थः— अथ यः एतान् एवं पंचाग्नीन् वेद ह, तैः सह आचरन् अपि पाप्मना न लिप्यते (पण जो कोणी मागें सांगितलेल्या पंचाग्नींचें स्वरूप यथार्थ समजून घेतो, त्याला या पातक्यांशीं संबंध ठेऊनही पापाचा लेप लागत नाहीं ) यः एवं वेद शुद्धः पूतः पुण्यलोकः भवति; यः एवं वेद ( ज्याला या खंडांतील यांच्या प्रश्नांचीं उत्तरें यथार्थ समजलीं, तो शुद्ध आणि पवित्र होतो व तो पुण्यलोकांस जातो ) ॥१०॥

अथ ह पुनर्यो यथोक्तान्पञ्चाग्नीन्वेद स तैरप्याचरन्महापातकिभिः सह न पाप्मना लिप्यते शुद्ध एव । तेन पञ्चाग्निदर्शनेन पावितो यस्मात्पूतः पुण्यो लोकः प्राजापत्यादिर्यस्य सोऽयं पुण्यलोको भवति य एवं वेद यथोक्तं समस्तं पञ्चभिः प्रश्नैः पृष्टमर्थजातं वेद । द्विरुक्तिः समस्तप्रश्ननिर्णयप्रदर्शनार्था ॥ १० ॥

## अध्याय पांचवा; खंड दहावा.

सिद्धांतीः—आतां पुन; पंचाग्निविद्येचें यथोक्त स्वरूप ज्याला पूंर्णपणें कळतें, तो महापातकी लोकांशीं संबंध ठेऊनसुद्धां कोणत्याही प्रकारें पापलिप्त होत नाहीं; कारण तो शुद्धच असतो. पंचाग्नींच्या ज्ञानदर्शनानें तो पवित्र झालेला असतो. म्हणून प्राजापत्यादि पुण्य लोकांचा तो रहीवासी होतो. असो. या खंडांत जे पांच प्रश्न विचारले आहेत त्यांचीं उत्तरें ज्यास यथार्थ आणि सामग्र्यानें कळलीं, तात्पर्य ज्याला या प्रश्नाचें ज्ञान यथार्थ झालें, तो शुद्ध, पवित्र आणि पुण्यलोकाचा रहिवासी होतो. मंत्रांत पांचही प्रश्नांचा निर्णय झाला हे त्या द्विरुक्तीवरून कळतें ॥ १० ॥

अध्याय पांचवा; खंड दहावा समाप्त.

## अध्याय पांचवा खंड अकरावा

दक्षिणेन पथा गच्छतामन्नभाव उक्तस्तद्देवानामन्नं तं देवा भक्षयन्तीति क्षुद्रजन्तुलक्षणा च कष्टा संसारगतिरुक्ता । तदुभयदोषपरिजिहीर्षया वैश्वानरात्तृभावप्रतिपत्त्यर्थमुत्तरो ग्रन्थ आरभ्यते । अत्स्यन्नं पश्यसि प्रियमित्यादिलिङ्गात् । आख्यायिका तु सुखावबोधार्था विद्यासंप्रदानन्यायप्रदर्शनार्था च—

सिद्धांतीः—दक्षिणमार्गानें गेलेले जीव अन्नभूत होतात, हें आपण ठरविलेंच या अध्यायांत. तसेंच ते जीव देवांचें अन्न होतात, देव त्या अन्नाचें भक्षण करितात अशी, अन्न लक्षणात्मक व क्षुद्रजंतू हेंच लक्षण आहे जिचें, अशी दुःखात्मक संसाराची गति ही मागे सांगितली. अतो; आतां या दोन्ही दोषांचा परिहार करण्याच्या इच्छेनें व वैश्वानराचा अत्तृभाव समजावा, प्राप्त व्हावा, एतदर्थ पुढील ग्रंथाला श्रुति आरंभ करीत आहे. ' अन्न खातोस, प्रियही पाहतोस ' इत्यादि स्पष्ट असणान्या वाक्यरूपी चिन्हांवरून हा अत्तृभाव समजून घेऊन पूर्वोक्त दोष जीवास वारितां यावेत, तदर्थच हा पुढील ग्रंथ आहे, हें उघड आहे. आख्यायिकेचा अवतार केला आहे, तो हा भाग सुखानें ( सहज ) समजावा; आणि विद्यासंप्रदानाची पूर्वपद्धति कशी होती, हें समजावें, एतदर्थ होय —

---

### मंत्र पहिला.

**प्राचीनशाल औपमान्यवः सत्ययज्ञः पौलुषिरिन्द्रद्युम्नो भाल्लवेयो जनः शार्कराक्ष्यो बुडिल आश्वतराश्विस्ते हैते महाशाला महाश्रोत्रियाः समेत्य मीमाꣳसां चक्रुः को न आत्मा किं ब्रह्मेति ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—औपमन्यवः प्राचीनशालः, पौलुषिः सत्ययज्ञः, भाल्लवेयः इंद्रद्युम्नः, शार्कराक्ष्यः जनः, आश्वतराश्विः बुडिलः; ते ह एते महाशालाः, महाश्रोत्रियाः समेत्य ' नः कः आत्मा किं ब्रह्म इति मीमांसांचक्रुः** ( उपमन्युपुत्र प्राचीनशाल, पुलुषपुत्र सत्ययज्ञ, भल्लवाचा पुत्र इंद्रद्युम्न, शर्कराक्षपुत्र जन, अश्वतराश्वपुत्र बुडिल; ते हे सर्व विद्यासंपन्न असून गृहस्थ होते. ते सर्व एकत्र जमून

विचार करू लागले की, आपला आत्मा कोणत्या स्वरूपाचा? ब्रह्म म्हणजे काय?) आत्मा व ब्रह्म यासंबंधी त्यांची मीमांसा होती ॥ १ ॥

प्राचीनशाल इति नामत उपमन्योरपत्यमौपमन्यवः । सत्ययज्ञो नामतः पुलुषस्यापत्यं पौलुषिः । तथेन्द्रद्युम्नो नामतो भल्लवेरपत्यं भाल्लविस्तस्यापत्यं भाल्लवेयः । जन इति नामतः शर्कराक्षस्यापत्यं शार्कराक्ष्यः । बुडिलो नामतोऽश्वतराश्वस्यापत्यमाश्वतराश्विः । पञ्चापि ते हैते महाशाला महागृहस्था विस्तीर्णाभिः शालाभिर्युक्ताः संपन्ना इत्यर्थः । महाश्रोत्रियाः श्रुताध्ययनवृत्तसंपन्ना इत्यर्थः । त एवंभूताः सन्तः समेत्य संभूय क्वचिन्मीमांसां विचारणां चक्रुः कृतवन्त इत्यर्थः । कथम् । को नोऽस्माकमात्मा किं ब्रह्मेत्यात्मब्रह्मशब्दयोरितरेतरविशेषणविशेष्यत्वम् । ब्रह्मेत्यध्यात्मपरिच्छिन्नमात्मानं निवर्तयत्यात्मेति चाऽऽत्मव्यतिरिक्तस्याऽऽदित्यादिब्रह्मण उपास्यत्वं निवर्तयति । अभेदेनाऽऽत्मैव ब्रह्म ब्रह्मैवाऽऽत्मेत्येवं सर्वात्मा वैश्वानरो ब्रह्म स आत्मेत्येतत्सिद्धं भवति । मूर्धा ते व्यपतिष्यदन्धोऽभविष्यदित्यादिलिङ्गात् ॥ १ ॥

**सिद्धांती:**—उपमन्यूचा मुलगा प्राचीनशाल, पुलुषाचा मुलगा सत्ययज्ञ, त्याचप्रमाणें भल्लवीचा मुलगा इंद्रद्युम्न, शर्कराक्षाचा मुलगा जन; व अश्वतराश्वाचा पुत्र बुडिल, असे हे पांच गृहस्थ होते. यांची घरें ( शाला ) फार मोठीं होतीं; ह्मणजे हे सुसंपन्न असत. तसेंच यांनी अध्ययन पुष्कळच केलेलें असून यांचें वर्तन ही सभ्य असे. असे हे पांच ही गृहस्थ सुखानें नांदत असतां—नेहमीप्रमाणें—एकत्र जमले. तेव्हां त्या दिवशीं चर्चेचा विषय निघाला तो हा: ' आपला आत्मा कोण ( कोणत्या स्वरूपाचा )? ब्रह्म ह्मणजे काय ? ध्यानांत ठेवा कीं, येथें ब्रह्म आणि आत्मा हीं परस्पर विशेष्यविशेषणें आहेत. आत्मा हें ब्रह्माचें विशेषण व ब्रह्म हें आत्म्याचें विशेषण आहे. देहसंघातामध्यें जो प्रत्यगात्मा आहे, तेवढाच आत्मा नव्हे, असें स्पष्टविण्यासाठीं ब्रह्म या विशेषणाची उपयोजना केली; आणि आत्मा हे विशेषण देऊन आदित्यादिब्रह्मांचें आत्मव्यतिरिक्त स्वरूप उपास्य समजूं नये, असें दाखविलें. तात्पर्य आत्मा ब्रह्म आहे, ब्रह्म आत्मा आहे, असें झालें. उभयतांमध्यें अभेद आहे, ब्रह्मच आत्मा असें ज्ञान करून घ्यावें. याप्रमाणें सर्वात्मा जो वैश्वानर, तो ब्रह्म आहे, तो आत्मा आहे, असें सिद्ध होणार आहे. ' तुझें मस्तक खालीं पडेल. तूं अंध होशील ' इत्यादि चिह्नात्मक वाक्यें पुढें येतील, त्या चिन्हांवरूनच सिद्ध होईल कीं, वैश्वानर ब्रह्म आहे, वैश्वानर आत्मा आहे. ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

ते ह संपादयांचक्रुरुद्दालको वै भगवन्तोऽयमारुणिः संप्रतीममात्मानं वैश्वानरमध्येति तं हन्ताभ्यागच्छामेति तं हाभ्याजग्मुः ॥ २ ॥

अन्वय व अर्थः—ते भगवन्तः संपादयांचक्रुः ह ( त्यांनीं भगवंतांनीं— एक उपदेष्टा— ध्यानांत आणिला ) अयं आरुणिः उद्दालकः संप्रति इमं आत्मानं वैश्वानरं अध्येति वै ( हा आरुणि उद्दालक सद्यःकाळीं या विवादवस्तूची, आत्म्याची, ह्मणजे वैश्वानराची स्मरणिका करितो ) तं हन्त, अभ्यागच्छाम ( त्याकडे आपण जाऊं हो चला ) तं ह अभ्याजग्मुः ( ते त्या उद्दालकाकडे गेले ) ॥ २ ॥

ते ह मीमांसन्तोऽपि निश्चयमलभमानाः संपादयांचक्रुः संपादितवन्त आत्मन उपदेष्टारम्। उद्दालको वै प्रसिद्धो नामतो भगवन्तः पूजावन्तोऽयमारुणिररुणस्यापत्यं संप्रति सम्यगिममात्मानं वैश्वानरमस्मदभिप्रेतमध्येति स्मरति। तं हन्तेदानीमभ्यागच्छामेत्येवं निश्चित्य तं हाभ्याजग्मुर्गतवन्तस्तमारुणिम् ॥ २ ॥

सिद्धांतः—त्यांच्या ऊहापोहामध्यें ही निश्चयात्मक निर्णय ठरेना; ह्मणून त्या सर्व पूज्य आणि पूजित मुमुक्षूंनीं एक आत्म्याचा उपदेष्टा मिळविला; ह्मणजे त्यांस एका उपदेष्ट्याचें स्मरण झालें. आरुणीचा पुत्र व अरुणीचा नातु जो प्रसिद्ध उद्दालक तो सद्यःकाळीं वैश्वानर आत्म्याचें स्मरण करितो, तात्पर्य त्याला हें अस्मदुद्दिष्ट ( आह्मांस हवें असणारें ) ज्ञान आहे, असें सर्वांस स्मरलें. तेव्हां त्याकडे जाऊं या, असा निश्चय करून ते सर्व जण आरुणीच्या आश्रमाला गेले ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**स ह संपादयांचकार प्रक्ष्यन्ति मामिमे महाशाला महाश्रोत्रियास्तेभ्यो न सर्वमिव प्रतिपत्स्ये हन्ताहमन्यमभ्यनुशासानीति ॥ ३ ॥**

अन्वय व अर्थ—सः ह संपादयांचकार ( आरुणानें आपल्या मनांत अगोदरच ठरविलें कीं) इमे महाशालाः महाश्रोत्रियाः प्रक्ष्यन्ति

( हे महाशाल व महाविद्वान मला विचारतील ) न सर्वं इव प्रति-पत्स्ये ( मला सर्व ठाऊक आहे, असें नाहीं ) अहं अन्यं अभ्यनुशा-सानि इति ( मी यांस अन्य उपदेष्टा आहे, असें सांगेन )--तात्पर्य विद्वान उपदेशक मी दाखवून देईन ॥ ३ ॥

स ह तान्दृष्ट्वैव तेषामागमनप्रयोजनं बुद्ध्वा संपादयांचकार । कथम् । प्रक्ष्यन्ति मां वैश्वानरमिमे महाशाला महाश्रोत्रियास्तेभ्योऽ-हं न सर्वमिव पृष्टं प्रतिपत्स्ये वक्तुं नोत्सहे । अतो हन्ताहमिदानी-मन्यमेषामभ्यनुशासानि वक्ष्याम्युपदेष्टारमिति ॥ ३ ॥

सिद्धांती:---त्या या अतिथींचा मेळा आल्पयाकडे कां येत आहे, हें तर्कानें जाणून त्यानें मनांत ठरविलें कीं हे महाविद्वान् व महासंपन्न गृहस्थ मला वैश्वानर विद्येसंबंधीं प्रश्न विचारण्यासाठीं आले आहेत. परंतु त्यांच्या प्रश्नाचें समग्र उत्तर देण्याची माझी तयारी नाहीं. यासाठीं या सर्वांस उत्तम उपदेश करणारा एक दुसराच ब्रह्मज्ञ गांठून देतों. हें त्यानें ठरविलें ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा.

**तान्होवाचाश्वपतिर्वै भगवन्तोऽयं कैकेयः संप्र-तीममात्मानं वैश्वानरमध्येति त ँ हन्ताभ्यागच्छा-मेति त ँ हाभ्याजग्मुः ॥ ४ ॥**

अन्वय व अर्थ---**तान् उवाच ह** ( त्यांस उद्दालक ह्मणाला ) **भगवन्तः, अयं कैकेयः अश्वपतिः वै संप्रति इमं आत्मानं वैश्वा-नरं अध्येति** ( हे भगवंतानो, हा कैकय अश्वपति सद्यःकालीं या वैश्वानर-आत्म्याचें स्मरण करितो. त्याला हें ज्ञान आहे ) **हन्त तं ह अभ्याग-च्छाम** ( अहो ! त्याकडे आपण सर्वजण जाऊं या ) **तं ह अभ्या-जग्मुः** ( त्याकडे ते सर्वजण गेले ) ॥ ४ ॥

एवं संपाद्य तान्होवाच । अश्वपतिर्वै नामतोभगवन्तोऽयं केक-यस्यापत्य कैकेयः संप्रति सम्यगिममात्मानं वैश्वानरमध्येतीत्यादि समानम् ॥ ४ ॥

सिद्धांती--ह्याप्रमाणें विचार करून तो त्यांस ह्मणाला; केक याचा पुत्र जो कैकेय ( अश्वपति ) त्याला या वैश्वानर आत्म्याचें ज्ञान आहे, म्हणून त्याकडे जाऊं या. याप्रमाणें ठरून ते तिकडे गेले, हा पहिल्यासारखाच अर्थ ॥ ४ ॥

---

## मंत्र पांचवा सहावा व सातवा.

तेभ्यो ह प्राप्तेभ्यः पृथगर्हाणि कारयांचकार स ह प्रातः संजिहान उवाच न मे स्तेनो जनपदे न कदर्यो न मद्यपो नानाहिताग्निर्नाविद्वान्न स्वैरी स्वैरिणी कुतो यक्ष्यमाणो वै भगवन्तोऽहमस्मि यावदेकैकस्मा ऋत्विजे धनं दास्यामि तावद्भगवद्भ्यो दास्यामि वसन्तु भगवन्त इति ॥ ५ ॥

ते होचुर्येन हैवार्थेन पुरुषश्चरेत्तꣳ हैव वदेदात्मानमेवेमं वैश्वानरꣳ संप्रत्यध्येषि तमेव नो ब्रूहीति ॥६॥

तान्होवाच प्रातर्वः प्रतिवक्तास्मीति ते ह समित्पाणयः पूर्वाह्णे प्रतिचक्रमिरे तान्हानुपनीयैवैतदुवाच ॥ ७ ॥

इति पञ्चमाध्यायस्यैकादशः खण्डः ॥ ११ ॥

**अन्वय व अर्थ—तेभ्यः प्राप्तेभ्यः पृथक् अर्हाणि ह कारयांचकार** ( ते सर्व आलेले अतिथी पाहून त्यांपैकीं प्रत्येकाचा आदर व पूजा यथायोग्य अश्वपतीनें करविली ) **प्रातः संजिहानः सः उवाच ह** ( प्रातःकालीं जाऊन गांठ पडल्यावर तो त्यांस म्हणाला ) **मे जनपदे न स्तेनः, न कदर्यः, न मद्यपः, न अनाहिताग्निः, न अविद्वान, न स्वैरी, स्वैरिणी कुतः** ( माझ्या राज्यांत कोणी चोर, कद्रु, मद्यपी, अनग्निक—अग्नि न ठेवणारा गृहस्थ, अविद्वान, व्यभिचारी नाहीं. मग व्यभिचारीणी कोठून असणार ? ) **भगवन्तः, अहं यक्ष्यमाणः वै अस्मि** ( हे भगवंतानो ! मी यज्ञ करीत आहे ) **एकैकस्मै ऋत्विजे यावत् धनं दास्यामि, भगवद्भ्यः तावत् दास्यामि** ( प्रत्येक ऋत्विजाला मी जितकी दक्षिणा देईन, तितकी तुम्हांलाही देईन ) **भगवन्तः वसन्तु इति** ( आपण सर्वांनीं येथें राहावें,-अशी राजानें विनंति केली ) ॥५॥

**अन्वय व अर्थ—ते ऊचुः ह** ( ते म्हणाले ) **येन अर्थेन एव पुरुषः ह चरेत्, तं ह एव वदेत्** ( ज्या अर्थाची—इच्छेची अपेक्षा करून

जो अतिथि येतो,त्याला तो मात्र अर्थ सांगावा) **इमं आत्मानं एव वैश्वानरं संप्रत्यध्येषि, तं एव नः ब्रूहि** ( ज्या ह्या वैश्वानर आत्म्याचें तुला उत्तम ज्ञान आहे, तो आत्मा—वैश्वानर आह्मांस स्पष्ट करून सांग ) **ते ह ऊचुः** ( असे ते जिज्ञासू महाशाल राजास ह्मणाले ) ॥ ६ ॥

**अन्वय व अर्थः—तान् ह उवाच** ( त्यांस जो राजा ह्मणाला ) **प्रातः वः प्रति वक्ता अस्मि इति** (मी उद्यां सकाळीं तुह्मांस सर्व सांगतों) **ते ह पूर्वाह्ले समित्पाणयः प्रतिचक्रमिरे** ( दुसरे दिवशीं सकाळीं ते समिधा हातांत घेऊन राजाजवळ गेले ) **अनुपनीय एव तान् एतत् उवाच** ( त्यांकडून कोणताही प्रवेशसंस्कार न करवितां त्यांस तो राजा विद्यादान करविता झाला ) ॥ ७ ॥

तेभ्यो ह राजा प्राप्तेभ्यः पृथक्पृथगर्हाण्यर्हणानि पुरोहितैर्भृत्यैश्च कारयांचकार कारितवान् । स ह्यन्येद्यू राजा प्रातः संजिहान उवाच विनयेनोपगम्यैतद्धनं मत्त उपादद्ध्वमिति तैः प्रत्याख्यातो मयि दोषं पश्यन्ति नूनं यतो न प्रतिगृह्णन्ति मत्तो धनमिति मन्वान आत्मनः सद्वृत्ततां प्रतिपिपादयिषन्नाह । न मे मम जनपदे स्तेनः परस्वहर्ता विद्यते । न कदर्योऽदाता सति विभवे । न मद्यपी द्विजोत्तमः सन् । नानाहिताग्निः शतगुः । नाविद्वानधिकारानुरूपम् । न स्वैरी परदारेषु गन्ता । अत एव स्वैरिणी कुतो दुष्टचारिणी न संभवतीत्यर्थः । तैश्च न वयं धनेनार्थिन इत्युक्त आहाल्पं मत्वैते धनं न गृह्णन्तीति । यक्ष्यमाणो वै कतिभिरहोभिरहं हे भगवन्तोऽस्मि । तदर्थं क्लृप्तं धनं मया यावदेकैकस्मै यथोक्तमृत्विजे धनं दास्यामि तावत्प्रत्येकं भगवद्भ्योऽपि दास्यामि । वसन्तु भगवन्तः पश्यन्तु च मम यागमित्युक्तास्ते होचुः । येन हैवार्थेन प्रयोजनेन यं प्रति चरेद्गच्छेत्पुरुषस्तं हैवार्थं वदेत् । इदमेव प्रयोजनमागमनस्येत्ययं न्यायः सताम् । वयं वैश्वानरज्ञानार्थिनः । आत्मानमेवेमं वैश्वानरं संप्रत्यध्येषि सम्यग्जानासि । अतस्तमेव नोऽस्मभ्यं ब्रूहीत्युक्तस्तान्होवाच । प्रातर्वो युष्मभ्यं प्रतिवक्तास्मि प्रतिवाक्यं दातास्मीत्युक्तास्ते ह राज्ञोऽभिप्रायज्ञाः समित्पाणयः समिद्भारहस्ता अपरेद्युः पूर्वाह्णे राजानं प्रतिचक्रमिरे गतवन्तः । यत एवं महाशाला महाश्रोत्रिया ब्राह्मणाः सन्तो महा-

शालत्वाद्यभिमानं हित्वा समिद्भारहस्ता जातितो हीनं राजानं विद्यार्थिनो विनयेनोपजग्मुः । तथाऽन्यैर्विद्योपादित्सुभिर्भवितव्यम् । तेभ्यश्चाददाद्विद्यामनुपनीयैवोपनयनमकृत्वैव तान् । यथा योग्येभ्यो विद्यामदात्तथाऽन्येनापि विद्या दातव्येत्याख्यायिकार्थः । एतद्वैश्वानरविज्ञानमुवाचेति वक्ष्यमाणेन संबन्धः ॥ ५ ॥ ६ ॥ ७ ॥

इति पञ्चमाध्यायस्यैकादशः खण्डः ॥ ७ ॥

सिद्धांती:—राजाच्या घरीं आलेल्या या जिज्ञासू अतिथींपैकीं प्रत्येकाची अर्हणा ( पूजा, सत्कार ) राजानें पुरोहितांकरवीं व सेवकांकरवीं यथासांग करविला. दुसरे दिवशीं प्रातःकाळीं राजा मोठ्या नम्रतेनें या नवीन अतिथींकडे गेला आणि म्हणाला 'हें मी धन आणिलें आहे, हें आपल्यास अर्पण करितों, आपण घ्यावें' त्यांनीं ती दक्षिणा घेतली नाहीं. हें पाहून राजास वाटलें कीं, आपल्यांत कांहींतरी दोष, न्यूनें, या विप्रांला दिसतात, म्हणून हे माझी दक्षिणा घेत नाहींत. मग आपली शुद्ध वागणूक आहे, निर्दोष आहे, हें सिद्ध करण्यासाठीं राजा म्हणालाः—भगवन्तानो ! माझ्या राज्यांत परधनाचा अपहार करणारा ( चोर ) नाहीं; सामर्थ्य असून दान न देणारा कोणी नाहीं; द्विजांपैकीं कोणी ही मद्यपी नाहीं; शतगु ( शंभर गाईंचा धनी ) असून अग्नीचें आधान न करणारा कोणी नाहीं; अधिकारानुसार सर्व ज्ञाते आहेत; कोणीच व्यभिचारी नाहीं; मग व्यभिचारिणी स्त्रिया कोठून असणार ! ' हें ऐकून अतिथी म्हणाले, कीं, 'आम्ही धनाच्या आशेनें आलों नाहीं.' राजास वाटलें कीं, हें धन अल्प आहे, हें पाहून कदाचित् हे ब्राह्मण दान घेत नसतील. तदनंतर तो म्हणालाः हे भगवंतानो, किस्येक दिवसपर्यंत हा माझा यज्ञ चालणार आहे. या यज्ञासाठीं सिद्ध केलेल्या धनांतून जितकी दक्षिणा ऋत्विजास द्यावी, असें शास्त्रानें सांगितलें आहे, तितकी त्यांस देईन व आपल्यापैकीं प्रत्येकाला ऋत्विजाचीच दक्षिणा देईन. आपण येथें खुशाल राहा आणि यागसमारंभ सुखानें पहा. ' हें राजाचें भाषण ऐकून ब्राह्मण म्हणालेः ' राजा ज्या विशेष कार्यासाठीं कोणी पुरुष दुसऱ्याकडे जातो, तें कोणतें कार्य आहे, हें समजून घेऊन त्यामात्र कार्यासंबंधानें आलेल्या पुरुषाशीं बोलावें, अशी साधुपद्धति आहे व ती न्याय्यही आहे. आम्ही 'वैश्वानरज्ञानाचे' आर्थी आहों. राजा, ह्या आत्मस्वरूपी वैश्वानराचेंच ( आत्माच काय तो वैश्वानर आहे, याचें ) तुला उत्कृष्ट ज्ञान शास्त्रोक्तपद्धतीनें झालेलें आहे. म्हणून त्याच ज्ञानाचा आम्हांस उपदेश कर ' हें ऐकून राजा म्हणाला 'याचें उत्तर मी उद्यां सकाळीं देईन. ' ब्राह्मणांनीं राजाचें भाषण ऐकिलें व त्याचा अभिप्राय जाणून दुसरे दिवशीं प्रातःकाळीं समिधांचे भार हातामध्यें घेऊन उपदेश घेण्यासाठीं राजमंदिरांत गेले. हे ब्राह्मण महाधनिक व महाविद्वान् असतांही त्यांनीं संपत्तीचा व

विद्वत्तेचा सर्व अभिमान सोडून राजाकडे, आपल्यापेक्षां कमी जाति असणाऱ्या राजाकडे, जातांना समिधादि भार हातांत घेतले व ते राजासमीप मोठ्या विनयानें गेले. हेंच उदाहरण सदैव विद्योपार्जन करणाऱ्यांनीं ध्यानांत ठेवून अनुकरण करावयाचें आहे. असो; विद्याग्रहणाचे वेळीं गुरूच्या आश्रमांत जे विशेष संस्कार-( उपनयनादि ) करावयाचे असतात, ते येथें न करितांच त्यास राजानें हें विद्यादान केलें. आख्यायिकेचें तात्पर्य हें आहे कीं, या राजानें जशी विद्या योग्य पुरुषांस दिली, तशीच इतर गुरूंनींहि योग्य शिष्यास विद्या द्यावी. मंत्रांत ' एतत् ' असें पद आहे, त्याचा अर्थ ' पुढच्या मंत्रांत सांगितलेल्या ' विद्येचें दान राजानें केलें असा आहे. ॥ ५ ॥ ६ ॥ ७ ॥

---

## अध्याय, पांचवा खंड १२ वा.

### मंत्र पहिला.

औपमन्यव कं त्वमात्मानमुपास्स इति दिवमेव भगवो राजन्निति होवाचैष वै सुतेजा आत्मा वैश्वानरो यं त्वमात्मानमुपास्से तस्मात्तव सुतं प्रसुतमासुतं कुले दृश्यते ॥ १ ॥

अन्वय व अर्थः—औपमन्यव, त्वं कं आत्मानं उपास्से, इति ( हे औपमन्यवा, तूं कोणत्या आत्म्याची—वैश्वानराची—उपासना करितोस ? असें अश्वपति राजा विचारता झाला ) भगवः, राजन्, दिवं एव, इति उवाच ह ( हे भगवन्, हे राजा, दिव हा वैश्वानर आहे असें समजून मी उपासना करितों, असें त्यानें उत्तर दिलें. ) यं त्वं आत्मानं उपास्से, एषः, वै सुतेजाः आत्मा वैश्वानरः ( ज्या आत्म्याची तूं उपासना करितोस, तो हा तेजस्वी वैश्वानर आत्मा आहे ) तस्मात् तव कुले सुतं प्रसुतं, आसुतं दृश्यते ( ह्मणून तुझ्या कुलांत सुत, प्रसुत, आणि आसुत हीं दिसतात.—सुत, प्रसुतादि सोमसवनांतील कर्में आहेत ) ॥ १ ॥

स कथमुवाचेत्याह—औपमन्यव हे, कमात्मानं वैश्वानरं त्वमुपास्स इति पप्रच्छ। नन्वयमन्याय आचार्यः सन्शिष्यं पृच्छतीति। नैष दोषः। यद्वेत्थ तेन मोपसीद ततस्त ऊर्ध्वं वक्ष्यामीति न्याय-

दर्शनात् । अन्यत्राप्याचार्यस्याप्रतिभानवति शिष्ये प्रतिभोत्पादनार्थः प्रश्नो दृष्टोऽजातशत्रोः, क्वैष तदाऽभूत्कुत एतदागादिति । दिवमेव द्युलोकमेव वैश्वानरमुपास्से भगवो राजन्निति होवाच । एष वै सुतेजाः शोभनं तेजो यस्य सोऽयं सुतेजा इति प्रसिद्धो वैश्वानर आत्माऽऽत्मनोऽवयवभूतत्वाद्यं त्वमात्मानमात्थैकदेशमुपास्से । तस्मात्सुतेजसो वैश्वानरस्योपासनात्तव सुतमभिषुतं सोमरूपं कर्मणि प्रसुतं प्रकर्षेण च सुतमासुतं चाहर्गणादिषु तव कुले दृश्यतेऽतीव कर्मिणस्त्वत्कुलीना इत्यर्थः ॥ १ ॥

सिद्धांती०—अश्वपति राजा काय बोलता झाला, हें आतां श्रुति सांगत आहे. तो ह्मणाला; हे औपमन्यव ! तूं कोणत्या आत्म्याची ह्मणजे वैश्वानराची उपासना करितोस तें सांग. कोणत्या स्वरूपानें वैश्वानरोपासना करितोस, हा प्रश्नाचा भावार्थ.

पूर्व०—हा अन्याय आहे. स्वतः आचार्य असून शिष्याला प्रश्न विचारणें, ही पद्धति शास्त्र शुद्ध नव्हे.

सिद्धांती—कांहीं बिघडत नाहीं. शिष्याला काय ठाऊक आहे, तें प्रथम विचारून घ्यावें आणि नंतर आपल्यास काय सांगावयाचें आहे तें सांगावें, ही न्याय–मान्य पद्धति आहे. आणखी शिष्याची; प्रतिभा जागृत झाली नसेल तर ती चेतविण्यासाठीं अजातशत्रु नामक आचार्यानें शिष्याला प्रश्न केला आहे, अशी कथा बृहदारण्यकांत आहे. “ हा केव्हां कोठें होता, हा कोठून आला ” इत्यादि प्रश्न तेथें स्पष्ट दिसतात असो; औपमन्यवानें उत्तर केलें कीं ‘ द्युलोक ’ हाच वैश्वानर आहे, असें समजून, हे राजन्! हे भगवन्! मी उपासना करितों ’ हें ऐकून राजा ह्मणाला; हा तुझा वैश्वानर अत्यंत तेजस्वी आहे. त्याचें तेज सुंदर आणि पुण्यशील आहे, अशी प्रसिद्धी आहे. आतां ज्या द्युलोकाची आत्मा ह्मणून तूं उपासना करितोस, तो आत्म्याचा ह्मणजे वैश्वानराचा एक भाग मात्र आहे, तथापि वैश्वानर तेजस्वी असल्यामुळें त्याच्या एकदेशी उपासनेचेंही फल तुला मिळतच आहे. कारण यज्ञकर्मांत सुत ह्मणजे सोमरूप सवन तसेंच प्रसुत आणि आसुत तुझ्या कुलामध्यें दिसत आहेत. तात्पर्य तुझ्या कुलांतील पुरुष अत्यंत कर्मी आहेत.

( एकाहादि रूप-एक दिवसाचा—ज्योतिष्टोमादि यज्ञ असतो. त्याला अहर्गण ह्मणतात. तेथें सोमरूपलताद्रव्याचें रसोत्पादन होतें; त्याला सुत ह्मणतात. अहीनांत त्याला प्रसुत ह्मणतात आणि सत्रांतील सुताला आसुत ह्मणतात ) ॥ १ ॥

अत्स्यन्नं पश्यसि प्रियमत्त्यन्नं पश्यति प्रियं भवत्यस्य ब्रह्मवर्चसं कुले य एतमेवमात्मानं वैश्वानरमुपास्ते मूर्धा त्वेष आत्मन इति होवाच मूर्धा ते व्यपतिष्यद्यन्मां नाऽऽगमिष्य इति ॥ २ ॥

इति पञ्चमाध्यायस्य द्वादशः खण्डः ॥ १२ ॥

**अन्वय व अर्थः**—अन्नं अत्सि, प्रियं पश्यसि, अन्नं अत्ति, प्रियं पश्यति; अस्य कुले ब्रह्मवर्चसं भवति यः एतं आत्मानं वैश्वानरं एव उपास्ते ( तूं अन्न खातोस, इष्ट पाहतोस. आणि कुलामध्यें जो कोणी या ब्रह्मवर्चस वैश्वानराची याप्रकारें उपासना करितो त्याला खावयास अन्न मिळतें, प्रिय दृष्टीस पडतें, आणि त्याचें कर्महि ब्रह्मतेज देणारें होतें ) तु एषः आत्मनः मूर्धा इति ( परंतु हा द्युलोक संपूर्ण आत्म्याचें शिर मात्र आहे) यत् मां न आगमिष्यः, ते मूर्धा व्यपतिष्यत् इति ह उवाच ( जर तूं माझ्याकडे आला नसतास तर तुझें शिर खालीं पडलें असतें, असें राजा ह्मणाला ) ॥ २ ॥

अत्स्यन्नं दीप्ताग्निः सन्पश्यसि च पुत्रपौत्रादि प्रियमिष्टम् । अन्योऽप्यत्त्यन्नं पश्यति च प्रियं भवत्यस्य सुतं प्रसुतमासुतमित्यादि कर्मित्वं ब्रह्मवर्चसं कुले यः कश्चिदेतं यथोक्तमेवं वैश्वानरमुपास्ते । मूर्धा त्वात्मनो वैश्वानरस्यैष न समस्तो वैश्वानरः । अतः समस्तबुद्ध्या वैश्वानरस्योपासनान्मूर्धा शिरस्ते विपरीतग्राहिणो व्यपतिष्यद्विपतितमभविष्यत् । यद्यदि मां नाऽऽगमिष्यो नाऽऽगतोऽभविष्यः । साध्वकार्षीर्यन्मामागतोऽसीत्यभिप्रायः ॥ २ ॥

इति पञ्चमाध्यायस्य द्वादशः खण्डः ॥ १२ ॥

**सिद्धांती०**—राजा म्हणाला तूं अन्न खातोस, यावरून तुझा अग्नि ( जठराग्नि ) प्रदीप्त आहे असें दिसतें. तसेंच पुत्रपौत्रादि इष्ट वस्तुहि तुला पाहावयास मिळतात. सारांश, पुत्रपौत्रादिकांचें सुख तूं भोगतोस. तसेंच जो कोणी ह्या वैश्वानराची यथोक्त उपासना करितो, तोही प्रदीप्त अग्नीचा असतो आणि त्याच्याहि कुलांत सुत, प्रसुत, आसुत इत्यादि प्रकारचें ब्रह्मतेज देणारें वेदोक्त कर्म घडत असतें. परंतु द्युलोक हा वैश्वानर-

रूपी आत्म्याचा मूर्धा ( शिर ) आहे. द्युलोक हा समग्र वैश्वानर नव्हे. म्हणून हा समस्त वैश्वानर आहे ह्या बुद्धीनें तूं द्युलोकाची उपासना केली असतीस तर असें विपरीत ज्ञान असणारा तूं त्या तुझें मस्तकच खालीं पडलें असतें, जर तूं माझ्याकडे आला नसतास तर. असो; माझ्याकडे आलास फार चांगलें झालें, असें म्हणण्याचा राजाचा अभिप्राय आहे. ॥ २ ॥

खंड बारावा समाप्त.

---

## अध्याय पांचवा, खंड १३ वा.

**अथ होवाच सत्ययज्ञं पौलुषिं प्राचीनयोग्य कं त्वमात्मानमुपास्स इत्यादित्यमेव भगवो राजन्निति होवाचैष वै विश्वरूप आत्मा वैश्वानरो यं त्वमात्मानमुपास्से तस्मात्तव बहु विश्वरूपं कुले दृश्यते ॥ १ ॥**

अन्वय व अर्थः--अथ पौलुषिं सत्ययज्ञं उवाच ह; 'प्राचीनयोग्य, त्वं कं आत्मानं उपास्से' इति 'भगवः राजन् आदित्यं एव' इति ह उवाच; त्वं इमं आत्मानं उपास्से । एषः विश्वरूपः आत्मा वैश्वानरः; तस्मात् तव कुले विश्वरूपं दृश्यते ( नंतर पौलुषि सत्ययज्ञाला राजानें विचारलें, हे प्राचीनयोग्या, तूं कोणत्या आत्म्याची उपासना करितोस ? तेव्हां तो ह्मणाला 'हे भगवन्, हे राजन् ! मी आदित्याची उपासना करितो.' तेव्हां राजा ह्मणाला; 'ज्या आत्म्याची तूं उपासना करितोस तो विश्वरूप आत्मा वैश्वानर आहे; ह्मणून तुझ्या कुळांत पुष्कळ विश्वरूप दिसत आहे ) ॥ १ ॥

अथ होवाच सत्ययज्ञं पौलुषिं हे प्राचीनयोग्य कं त्वमात्मानमुपास्स इत्यादित्यमेव भगवो राजन्निति होवाच । शुक्लनीलादिरूपत्वाद्विश्वरूपत्वमादित्यस्य सर्वरूपत्वाद्वा । सर्वाणि रूपाणि हि त्वाष्ट्राणि यतोऽतो वा विश्वरूप आदित्यस्तदुपासनात्तव बहु विश्वरूपमिहामुत्रार्थमुपकरणं दृश्यते कुले ॥ १ ॥

सिद्धांती०--नंतर राजानें पौलुषी सत्ययज्ञाला विचारलें, हे प्राचीनयोग्य, तूं कोणत्या आत्म्याची उपासना करितोस ? तेव्हां तो म्हणाला, हे राजन्, हे भगवन्, मी

आदित्याची उपासना करितो. अर्थात् आदित्य हा शुभ्र, नील, इत्यादि रूपाचा आहे; अथवा सर्व रूपें त्याच्याठिकाणीं दिसतात, म्हणून त्याला विश्वरूप असें विशेषण उपयोजिलें आहे. कारण सर्व रूपें त्वष्ट्यानेंच केलीं आहेत. म्हणून ही आदित्याला विश्वरूप म्हटलें आहे. असो; आदित्याची उपासना तूं करितोस म्हणून तुझ्या कुळांत ह्या लोकीं व परलोकीं उपयुक्त असणारी अर्थसामग्री दिसत आहे. ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**प्रवृत्तोऽश्वतरीरथो दासीनिष्कोऽत्स्यन्नं पश्यसि प्रियमत्त्यन्नं पश्यति प्रियं भवत्यस्य ब्रह्मवर्चसं कुले य एतमेवमात्मानं वैश्वानरमुपास्ते चक्षुष्ट्वेतदात्मन इति होवाचान्धोऽभविष्यो यन्मां नाऽऽगमिष्य इति ॥ २ ॥**

इति पञ्चमाध्यायस्य त्रयोदशः खण्डः ॥ १३ ॥

**अन्वय व अर्थ**—**अश्वतरीरथः दासीनिष्कः प्रवृत्तः** ( तुझ्या पाठीमागें अश्वतरींनीं युक्त असणारा रथ आहे आणि दासीनिष्क आहे ) **अन्नं अत्सि, प्रियं पश्यसि** (तूं दीप्ताग्नी, भोक्ता आहेस आणि तुला इष्ट तेंच प्राप्त होतें ) **यः एतं आत्मानं वैश्वानरं एवं उपास्ते, अन्नं अत्ति, प्रियं पश्यति, अस्य कुले ब्रह्मवर्चसं भवति** ( जो ह्या आत्म्याची, वैश्वानराची यथोक्त उपासना करितो तोही दीप्ताग्नि व प्रियद्रष्टा होऊन त्याच्या कुलांत ब्रह्मतेज वाढविणारीं कर्में होतात ) **तु एतद् आत्मनः चक्षुः इति, यत् मां न आगमिष्यः, अंधः अभविष्यः इति ह उवाच** (परंतु आदित्य हा वैश्वानररूपी आत्म्याचा नेत्र मात्र आहे; जर माझ्याकडे आला नसतास, तर तूं आंधळा झाला असतास ) ॥ २ ॥

किंच त्वामनु प्रवृत्तोऽश्वतरीभ्यां युक्तो रथोऽश्वतरीरथो दासीनिष्को दासीभिर्युक्तो निष्को हारो दासीनिष्कः। अत्स्यन्नमित्यादि समानम् । चक्षुर्वैश्वानरस्य तु सविता । तस्य समस्तबुद्ध्योपासनादन्धोऽभविष्यश्चक्षुर्हीनोऽभविष्यो यन्मां नाऽगमिष्य इति पूर्ववत्॥२॥

इति पञ्चमाध्यायस्य त्रयोदशः खण्डः ॥ १३ ॥

सिद्धांतीः—तसेंच अश्वतरींनीं (अश्वतर म्हणजे खेचर आणि अश्वतरी ह्मणजे खेचर जातींतील स्त्री ) युक्त असा रथ आणि दासींनीं युक्त असा सुवर्णहार तुझें अनुसरण करितो. सारांश तूं श्रीमंत आहेस. तूं अन्न खातोस इत्यादि विवेचन मागें झालें आहे. आदित्य हा वैश्वानराचा चक्षु मात्र आहे, अर्थात् तोच समस्त वैश्वानर आहे, अशा बुद्धीनें ( ही अज्ञानजन्य विपरीत बुद्धि होय. ) उपासना केली असतीस, तर तूं आंधळा झाला असतास. माझ्याकडे आलास हें फार चांगलें झालें. ॥ २ ॥

खंड तेरावा समाप्त.

---

## अध्याय पांचवा; खंड चवदावा.

---

### मंत्र पहिला.

**अथ होवाचेन्द्रद्युम्नं भाल्लवेयं वैयाघ्रपद्य कं त्वमात्मानमुपास्स इति वायुमेव भगवो राजन्निति होवाचैष वै पृथग्वर्त्माऽऽत्मा वैश्वानरो यं त्वमात्मानमुपास्से तस्मात्त्वां पृथग्बलय आयन्ति पृथग्रथश्रेणयोऽनुयन्ति ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—अथ भाल्लवेयं इंद्रद्युम्नं उवाच ह, ‘ वैयाघ्रपद्य त्वं कं आत्मानं उपास्से’ इति; भगवः, राजन्, वायुं एव’ इति ह उवाच; ‘ यं त्वं आत्मानं उपास्से, एषः वै पृथक्वर्त्मा, आत्मा वैश्वानरः, तस्मात् त्वां पृथक् बलयः आयन्ति, पृथक् रथश्रेणयः अनुयन्ति** ( नंतर भाल्लवेय इंद्रद्युम्नाला राजानें विचारलें; वैयाघ्रपद्य, तूं कोणत्या आत्म्याची उपासना करितोस ? तेव्हां तो ह्मणाला; हे भगवन्, हे राजन्, मीं वायूची उपासना करितो. राजा ह्मणाला; ज्या आत्म्याची तूं उपासना करितोस तो वायु नानास्वरूपाचा आहे ह्मणून तुला नानाप्रकारची संपत्ति मिळते; आणि अनेक प्रकारचे रथ तुझ्या मागून जातात ) ॥ १ ॥

अथ होवाचेन्द्रद्युम्नं भाल्लवेयं वैयाघ्रपद्य कं त्वमात्मानमुपास्स इत्यादि समानम् । पृथग्वर्त्मा नानावर्त्मानि यस्य वायोरावहोद्वहादिभिर्भेदैर्वर्तमानस्य सोऽयं पृथग्वर्त्मा वायुः । तस्मात्पृथग्वर्त्मात्मनो वैश्वानरस्योपासनात्पृथङ्नानादिक्कास्त्वां बलयो वस्त्रान्नादिलक्षणा बलय आयन्त्यागच्छन्ति । पृथग्रथश्रेणयो रथपङ्क्तयोऽपि त्वामनुयन्ति ॥ १ ॥

सिद्धांती—नंतर राजानें भाल्लवेय इंद्रद्युम्नाला तूं कोणत्या आत्म्याची उपासना करितोस, इत्यादि प्रश्न विचारून घेतले; आणि शेवटीं वायूचें स्वरूप स्पष्ट केलें. आवह, उद्वह, इत्यादि भेदांनीं वर्तमान असणारा वायु अनेकस्वरूपी आहे. अशा अनेकरूपी वायुची उपासना इंद्रद्युम्न करीत असे ह्मणून अनेक दिशांस असणाऱ्या देशांतून त्याला बली ह्मणजे अन्नवस्त्रादि संपत्ति मिळत असे. तसेंच त्याच्यामागून अनेक रथपंक्ति ( रथाचे समूह ) जात येत असत. तात्पर्य; इंद्रद्युम्न फारच श्रीमान् होता. ॥ १ ॥

## मंत्र दुसरा.

अत्स्यन्नं पश्यसि प्रियमत्त्यन्नं पश्यति प्रियं भवत्यस्य ब्रह्मवर्चसं कुले य एतमेवमात्मानं वैश्वानरमुपास्ते प्राणस्त्वेष आत्मन इति होवाच प्राणस्त उदक्रमिष्यद्यन्मां नाऽऽगमिष्य इति ॥ २ ॥

इति पञ्चमाध्यायस्य चतुर्दशः खण्डः ॥ १४ ॥

**अन्वय व अर्थः**—( हा मंत्र आणि मागच्या खंडांतील २ रा मंत्र हे प्रायः सारखेच आहेत. द्युलोकाच्या किंवा आदित्याच्या ऐवजीं वायूची ( प्राणाची ) योजना करावयाची आहे. येथें प्राणनाश होणार होता. ) ॥ २ ॥

अत्स्यन्नमित्यादि समानम् । प्राणस्त्वेष आत्मन इति होवाच प्राणस्ते तवोदक्रमिष्यदुत्क्रान्तोऽभविष्यद्यन्मां नाऽऽगमिष्य इति ॥ २ ॥

इति पञ्चमाध्यायस्य चतुर्दशः खण्डः

सिद्धांतीः—अन्नसेवन इत्यादि सर्व प्रकार मागच्यासारखेच आहेत. वायु हा वैश्वानराचा प्राण आहे; ह्मणून इंद्रद्युम्न राजाकडे गेला नसता तर त्याचा प्राणनाश झाला असता. ॥ २ ॥

अध्याय पांचवा; खंड चवदावा समाप्त.

## अध्याय पांचवा; खंड पंधरावा.

### मंत्र पहिला.

**अथ होवाच जनꣳ शार्कराक्ष्य कं त्वमात्मानमुपास्स इत्याकाशमेव भगवो राजन्निति होवाचैष वै बहुल आत्मा वैश्वानरो यं त्वमात्मानमुपास्से तस्मात्त्वं बहुलोऽसि प्रजया च धनेन च ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः**—(मंत्रातील अन्वयार्थ प्रायः मागच्यासारखेच आहेत. प्रश्न शार्कराक्ष्याला विचारला आहे; आणि त्यानें 'बहुलाची' ह्मणजे आकाशाची उपासना करितो' असें सांगितलें आहे; आणि या उपासनेचें फल शार्कराक्ष्य हा संतति संपत्तींनीं पूर्ण झाला होता, हें होतें ) ॥ १ ॥

अथ होवाच जनामित्यादि समानम् । एष वै बहुल आत्मा वैश्वानरः । बहुलत्वमाकाशस्य सर्वगतत्वाद्बहुलगुणोपासनाच्च । त्वं बहुलोऽसि प्रजया च पुत्रपौत्रादिलक्षणया धनेन च हिरण्यादिना ॥ १ ॥

**सिद्धांती**--विवेचन मागच्यासारखेंच आहे. आकाश सर्वव्यापी आहे; ह्मणून त्याला 'बहुल' ह्मटलें, बहुलगुणात्मक आकाशाची उपासना केली म्हणून शार्कराक्ष्य हा धनसंपन्न व संततीसंपन्न होता, त्याची प्रजा विपुल होती; आणि त्याच्या जवळ हिरण्यहि विपुल होतें. ॥ १ ॥

### मंत्र दुसरा.

**अत्स्यन्नं पश्यसि प्रियमत्त्यन्नं पश्यति प्रियं भवत्यस्य ब्रह्मवर्चसं कुले य एतमेवमात्मानं वैश्वानरमुपास्ते संदेहस्त्वेष आत्मान इति होवाच संदेहस्ते व्यशीर्यद्यन्मां नाऽऽगमिष्य इति ॥ २ ॥**

**इति पञ्चमाध्यायस्य पञ्चदशः खण्डः ॥ १५ ॥**

**अन्वय व अर्थ**—( हाही मंत्र मागच्या खंडांतील २ ऱ्या मंत्राप्रमाणें आहे. आकाश हें वैश्वानर आत्म्याचे 'बहुल' ह्मणजे शरीर आहे; शरीरनाशाचा प्रसंग येथें येणार होता. ) ॥ २ ॥

संदेहस्त्वेष संदेहो मध्यमं शरीरं वैश्वानरस्य । दिहेरुपचयार्थत्वान्मांसरुधिरास्थ्यादिभिश्च बहुलं शरीरं तत्संदेहस्ते तव शरीरं व्यशीर्यच्छीर्णमभविष्यद्यन्मां नाऽऽगमिष्य इति ॥ २ ॥

इति पञ्चमाध्यायस्य पञ्चदश खण्डः ॥ १५ ॥

**सिद्धांती**—आकाश वैश्वानराचें मध्यम शरीर आहे. शिर व पाय सोडून देऊन मधील भाग ह्मणजे **संदेह** अथवा **मध्यम शरीर** होय, 'दिह' याचा अर्थ उपचय अथवा वृद्धि असा आहे. मांस, रुधिर, अस्थी इत्यादिकांनीं शरीर वाढतें ह्मणून मध्यम शरीराला संदेह असें ह्मटलें आहे. या शरीराचा नाश होणार होतो, राजाची गांठ न पडती तर ॥ २ ॥

खंड पंधरावा समाप्त.

---

## अध्याय ५ खंड १६ वा.

### मंत्र पहिला.

**अथ होवाच बुडिलमाश्वतराश्विं वैयाघ्रपद्य कं त्वमात्मानमुपास्स इत्यप एव भगवो राजन्निति होवाचैष वै रयिरात्मा वैश्वानरो यं त्वमात्मानमुपास्से तस्मात्त्वꣳ रयिमान्पुष्टिमानसि ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः**—याही मंत्राचा अन्वयार्थ मागच्याप्रमाणें जुळवावा. येथें बुडिलाशीं संवाद आहे. बुडिल अपाची ह्मणजे रयीची ( धनरूपाची ) उपासना करीत होता ह्मणून तो पुष्ट होता. ) ॥ १ ॥

अथ होवाच बुडिलमाश्वतराश्विमित्यादि समानम् । एष वै रयिरात्मा वैश्वानरो धनरूपः । अद्भ्योऽन्नं ततो धनमिति । तस्माद्रयिमान्धनवांस्त्वां पुष्टिमांश्च शरीरेण पुष्टेश्चान्ननिमित्तत्वात् ॥ १ ॥

**सिद्धांती**—विवेचन मागच्याप्रमाणें आहे. रयी म्हणजे धन. जलापासून अन्न उत्पन्न होतें; आणि अन्नापासून धन होतें. बुडील धनवान् होता, म्हणून तो शरीरानें पुष्टहि होता, अन्नाच्या सेवनानें जीव पुष्ट होतात, हें सांगावयास नकोच ॥ १ ॥

---

### मंत्र दुसरा.

अत्स्यन्नं पश्यसि प्रियमत्त्यन्नं पश्यति प्रियं भवत्यस्य ब्रह्मवर्चसं कुले य एतमेवमात्मानं वैश्वानरमुपास्ते बस्तिस्त्वेष आत्मन इति होवाच बस्तिस्ते व्यभेत्स्यद्यन्मां नाऽऽगमिष्य इति ॥ २ ॥

इति पञ्चमाध्यायस्य षोडशः खण्डः ॥ १६ ॥

अन्वय व अर्थः—येथें रयी ही वैश्वानराची बस्ती आहे. बुडीळाचा बस्ती-भेद होण्याचा संभव होता. बस्ती ह्मणजे पोटाच्या खालील भाग, ओटी किंवा मूत्रसंग्रहाचें स्थान ॥ २ ॥

बस्तिस्त्वेष आत्मनो वैश्वानरस्य बस्तिर्मूत्रसंग्रहस्थानं बस्तिस्ते व्यभेत्स्यद्भिन्नोऽभविष्यद्यन्मां नाऽऽगमिष्य इति ॥ २ ॥

इति पञ्चमाध्यायस्य षोडशः खण्डः ॥ १६ ॥

सिद्धांती—रयी वैश्वानर आत्म्याची बस्ती आहे. बस्ती हें मूत्रसंग्रहाचें स्थान आहे. बुडिलाची बस्ती फुटण्याचा संभव तो राजाकडे आला नसता तर येणार होता ॥ २ ॥

खंड सोळावा समाप्त.

---

## अध्याय ५, खंड १७ वा.

### मंत्र पहिला व दुसरा.

अथ होवाचोद्दालकमारुणिं गौतम कं त्वमात्मानमुपास्स इति पृथिवीमेव भगवो राजन्निति होवाचैष वै प्रतिष्ठाऽऽत्मा वैश्वानरो यं त्वमात्मानमुपास्से तस्मात्त्वं प्रतिष्ठितोऽसि प्रजया च पशुभिश्च ॥ १ ॥

अत्स्यन्नं पश्यसि प्रियमत्त्यन्नं पश्यति प्रियं भवत्यस्य ब्रह्मवर्चसं कुले य एतमेवमात्मानं वैश्वानरमुपास्ते पादौ त्वेतावात्मन इति होवाच पादौ ते व्यम्लास्येतां यन्मां नाऽऽगमिष्य इति ॥ २ ॥

इति पञ्चमाध्यायस्य सप्तदशः खण्डः ॥ १७ ॥

अन्वय व अर्थ—मागें प्रमाणें. [illegible] आहे.
तो पृथ्वीची उपासना करणारा आहे. पृथ्वी ही प्रतिष्ठा होय. म्हणून उद्दालक संततीनें संपन्न होता, पशूही आजजवळ पुष्कळ असत. पृथ्वी वैश्वानराचे चरण. चरणनाशाचा प्रसंग होता ) ॥ १ ॥ २ ॥

अथ होवाचोद्दालकमित्यादि समानम् । पृथिवीमेव भगवो राजन्निति होवाच । एष वै प्रतिष्ठा पादौ ते व्यम्लास्येतां विम्ला- नावभविष्यतां श्लथीभूतौ यन्मां नाऽऽगमिष्य इति ॥ १ ॥ २ ॥

इति पञ्चमाध्यायस्य सप्तदशः खण्डः ॥१७॥

सिद्धांती—विवेचन समान आहे. पृथ्वी ही वैश्वानराची चरणरूप आहे. राजाकडे उद्दालक आला नसता, तर उद्दालकाच्या चरणांचा नाश झाला असता ॥ १ ॥ २ ॥

खंड सतरावा समाप्त.

---

## अध्याय ५ खंड १८ वा.

### मंत्र पहिला.

**तान्होवाचैते वै खलु यूयं पृथगिवेममात्मानं वैश्वानरं विद्वाꣳसोऽन्नमत्थ यस्त्वेतमेवं प्रादेशमात्रम- भिविमानमात्मानं वैश्वानरमुपास्ते स सर्वेषु लोकेषु भूतेषु सर्वेष्वात्मस्वन्नमत्ति ॥ १ ॥**

अन्वय व अर्थ—तान् उवाच ह ( त्या महाशालांला अश्वपति ह्मणाला ) एते यूयं विद्वांसः इमं आत्मानं पृथक् इव वैश्वानरं **अन्नं अत्थ वै खलु** ( हे तुह्मी सर्वजण ह्या आत्मरूपी वैश्वानराला निरनिराळ्या भेदक स्वरूपानें जाणून अन्न खात होता ) **तु एतं एवं प्रादेशमात्रं अभिविमानं आत्मानं वैश्वानरं यः उपास्ते, सः सर्वेषु लोकेषु, सर्वेषु भूतेषु, सर्वेषु आत्मसु अन्नं अत्ति,** ( परंतु ह्याप्रमाणें प्रादेशमात्र असणारा हा आत्मा प्रत्यगात्मरूपी वैश्वानर आहे, असें समजून जो त्याची उपासना करितो तो भुवनांमध्यें, सर्व भूतांमध्यें आणि सर्व आत्म्यांमध्यें राहून अन्न खातो ) ॥ १ ॥

तान्यथोक्तवैश्वानरदर्शनवतो होवाच । एते यूयं वै खल्वित्यनर्थकौ यूयं पृथगिवापृथक्सन्तमिममेकं वैश्वानरमात्मानं विद्वांसोऽन्नमत्थ परिच्छिन्नात्मबुद्ध्येत्येतद्धस्तिदर्शन इव जात्यन्धाः । यस्त्वेतमेवं यथोक्तावयवैर्द्युमूर्धादिभिः पृथिवीपादान्तैर्विशिष्टमेकं प्रादेशमात्रं प्रादेशैर्द्युमूर्धादिभिः पृथिवीपादान्तैरध्यात्मं मीयते ज्ञायत इति प्रादेशमात्रम् । मुखादिषु वा करणेष्वत्तृत्वेन मीयत इति प्रादेशमात्रः । द्युलोकादिपृथिव्यन्तप्रदेशपरिमाणो वा प्रादेशमात्रः । प्रकर्षेण शास्त्रेणाऽऽदिश्यन्त इति प्रादेशा द्युलोकादय एव तावत्परिमाणः प्रादेशमात्रः । शाखान्तरे तु मूर्धादिश्चिबुकप्रतिष्ठ इति प्रादेशमात्रं कल्पयन्ति । इह तु न तथाऽभिप्रेतः । तस्य ह वा एतस्याऽऽत्मन इत्याद्युपसंहारात् । प्रत्यगात्मतयाऽभिविमीयतेऽहमिति ज्ञायत इत्यभिविमानस्तमेतमात्मानं वैश्वानरं विश्वान्नरान्नयति पुण्यपापानुरूपां गतिं सर्वात्मैष ईश्वरो वैश्वानरो विश्वो नर एव वा सर्वात्मत्वात् । विश्वैर्वा नरैः प्रत्यगात्मतया प्रविभज्य नीयत इति वैश्वानरस्तमेवमुपास्ते यः सोऽदन्नादी सर्वेषु लोकेषु द्युलोकादिषु सर्वेषु भूतेषु चराचरेषु सर्वेष्वात्मसु शरीरेन्द्रियमनोबुद्धिषु तेषु ह्यात्मकल्पनाव्यपदेशः प्राणिनामन्नमत्ति वैश्वानरवित्सर्वात्मा सन्नन्नमत्ति । न यथाऽज्ञः पिण्डमात्राभिमानः सन्नित्यर्थः ॥ १ ॥

सिद्धांतीः—मागें सांगितल्या प्रकारचें एकांगी वैश्वानर-ज्ञान त्या महाशाळांस होतें. त्यांना समस्त वैश्वानराचें ज्ञान देण्यासाठीं अश्वपति ह्मणाला, तुह्मी सर्वजण आतांपर्यंत समस्त स्वरूपानें राहणारा एक एकटा जो वैश्वानर आत्मा, त्याचें तुमच्या प्रत्येकाच्या दृष्टीनें निरनिराळें असलेलें एकांगी स्वरूप मात्र जाणून तुह्मी अन्नभक्षण करित होता. तात्पर्य तुमच्या परिच्छिन्न बुद्धीनें ( मर्यादित बुद्धीनें ) तुह्मीं समस्त वैश्वानरावर एकदेशी स्वरूपाचा आरोप करीत होता. जन्मापासून अंध असलेले पुरुषांस हत्तीचें स्वरूप विचारलें तर ते जशी निरनिराळीं उत्तरें देतात आणि फसतात त्याप्रमाणें हें तुमचें ज्ञान आहे; परंतु शिरःप्रभृति अधिदैवी जे अवयव तुह्मी सांगितले, तेथपासून पृथ्वीरूपी चरणापर्यंतच्या अवयवांनीं विशिष्ट ह्मणजे युक्त असणाऱ्या वैश्वानराचा शिरादि एक एक अवयव घेऊन त्याची अध्यात्मदृष्टीनें उपासना करणें, ह्यास प्रादेशमात्र असें ह्मणावें. द्युलोकापासून पृथ्वीरूपी चरणापर्यंत असलेल्या सर्व आणि

अन्वय व अर्थ—[illegible] आहे. तो पृथ्वीची उपासना करणारा आहे. पृथ्वी ही प्रतिष्ठा होय. म्हणून उद्दालक संततीनें संपन्न होता, पशुही त्याजजवळ पुष्कळ असत. पृथ्वी वैश्वानराचे चरण. चरणनाशाचा प्रसंग होता ) ॥ १ ॥ २ ॥

**अथ होवाचोद्दालकमित्यादि समानम् । पृथिवीमेव भगवो राजन्निति होवाच । एष वै प्रतिष्ठा पादौ ते व्यम्लास्येतां विम्लानावभविष्यतां श्लथीभूतौ यन्मां नाऽऽगमिष्य इति ॥ १ ॥ २ ॥**

इति पञ्चमाध्यायस्य सप्तदशः खण्डः ॥१७॥

सिद्धांती—विवेचन समान आहे. पृथ्वी ही वैश्वानराची चरणरूप आहे. राजाकडे उद्दालक आला नसता, तर उद्दालकाच्या चरणांचा नाश झाला असता ॥ १ ॥ २ ॥

खंड सातरावा समाप्त.

---

## अध्याय ५ खंड १८ वा.

### मंत्र पहिला.

**तान्होवाचैते वै खलु यूयं पृथगिवेममात्मानं वैश्वानरं विद्वांसोऽन्नमत्थ यस्त्वेतमेवं प्रादेशमात्रमभिविमानमात्मानं वैश्वानरमुपास्ते स सर्वेषु लोकेषु भूतेषु सर्वेष्वात्मस्वन्नमत्ति ॥ १ ॥**

अन्वय व अर्थ—तान् उवाच ह ( त्या महाशालांला अश्वपति म्हणाला ) **एते यूयं विद्वांसः इमं आत्मानं पृथक् इव वैश्वानरं अन्नं अत्थ वै खलु** ( हे तुह्मी सर्वजण ह्या आत्मरूपी वैश्वानराला निरनिराळ्या भेदक स्वरूपानें जाणून अन्न खात होता ) **तु एतं एवं प्रादेशमात्रं अभिविमानं आत्मानं वैश्वानरं यः उपास्ते, सः सर्वेषु लोकेषु, सर्वेषु भूतेषु, सर्वेषु आत्मसु अन्नं अत्ति,** ( परंतु ह्याप्रमाणें प्रादेशमात्र असणारा हा आत्मा प्रत्यगात्मरूपी वैश्वानर आहे, असें समजून जो त्याची उपासना करितो तो भुवनांमध्यें, सर्व भूतांमध्यें आणि सर्व आत्म्यांमध्यें राहून अन्न खातो ) ॥ १ ॥

तान्यथोक्तवैश्वानरदर्शनवतो होवाच । एते यूयं वै खल्वित्यनर्थकौ यूयं पृथगिवापृथक्सन्तमिममेकं वैश्वानरमात्मानं विद्वांसोऽन्नमत्थ परिच्छिन्नात्मबुद्ध्येत्येतद्धस्तिदर्शन इव जात्यन्धाः । यस्त्वेतमेवं यथोक्तावयवैर्द्युमूर्धादिभिः पृथिवीपादान्तैर्विशिष्टमेकं प्रादेशमात्रं प्रादेशैर्द्युमूर्धादिभिः पृथिवीपादान्तैरध्यात्मं मीयते ज्ञायत इति प्रादेशमात्रम् । मुखादिषु वा करणेष्वनुभवत्वेन मीयत इति प्रादेशमात्रः । द्युलोकादिपृथिव्यन्तप्रदेशपरिमाणो वा प्रादेशमात्रः । प्रकर्षेण शास्त्रेणाऽऽदिश्यन्त इति प्रादेशा द्युलोकादय एव तावत्परिमाणः प्रादेशमात्रः । शाखान्तरे तु मूर्धादिचिबुकप्रतिष्ठ इति प्रादेशमात्रं कल्पयन्ति । इह तु न तथाऽभिप्रेतः । तस्य ह वा एतस्याऽऽत्मन इत्याद्युपसंहारात् । प्रत्यगात्मतयाऽभिविमीयतेऽहमिति ज्ञायत इत्यभिविमानस्तमेतमात्मानं वैश्वानरं विश्वान्नरान्नयति पुण्यपापानुरूपां गतिं सर्वात्मैष ईश्वरो वैश्वानरो विश्वो नर एव वा सर्वात्मत्वात् । विश्वैर्वा नरैः प्रत्यगात्मतया प्रविभज्य नीयत इति वैश्वानरस्तमेवमुपास्ते यः सोऽदन्नन्नादी सर्वेषु लोकेषु द्युलोकादिषु सर्वेषु भूतेषु चराचरेषु सर्वेष्वात्मसु शरीरेन्द्रियमनोबुद्धिषु तेषु ह्यात्मकल्पनाव्यपदेशः प्राणिनामन्नमत्ति वैश्वानरवित्सर्वात्मा सन्नन्नमत्ति । न यथाऽज्ञः पिण्डमात्राभिमानः सन्नित्यर्थः ॥ १ ॥

सिद्धांतीः—मागें सांगितल्या प्रकारचें एकांगी वैश्वानर-ज्ञान त्या महाशालांस होतें. त्यांना समस्त वैश्वानराचें ज्ञान देण्यासाठीं अश्वपति ह्मणाला; तुह्मी सर्वजण आतांपर्यंत समस्त स्वरूपानें राहणार एक रसाळ जो वैश्वानर आत्मा, त्याचें तुमच्या प्रत्येकाच्या दृष्टीनें निरानिराळें असलेलें एकांगी स्वरूप मात्र जाणून तुह्मी अन्नभक्षण करित होता. तात्पर्य तुमच्या परिच्छिन्न बुद्धीनें ( मर्यादित बुद्धीनें ) तुह्मीं समस्त वैश्वानरावर एकदेशी स्वरूपाचा आरोप करीत होता. जन्मापासून अंध असलेले पुरुषांस हत्तीचें स्वरूप विचारलें तर ते जशी निरनिराळीं उत्तरें देतात आणि फसतात त्याप्रमाणें हें तुमचें ज्ञान आहे; परंतु शिरःप्रभृति अधिदैवी जे अवयव तुह्मीं सांगितले, तेथपासून पृथ्वीरूपी चरणापर्यंतच्या अवयवांनीं विशिष्ट ह्मणजे युक्त असणाऱ्या वैश्वानराचा शिरादि एक एक अवयव घेऊन त्याची अध्यात्मदृष्टीनें उपासना करणें, ह्यास प्रादेशमात्र असें ह्मणावें. द्युलोकापासून पृथ्वीरूपी चरणापर्यंत असलेल्या सर्व अधि

दैविक अवयवांपैकीं प्रत्येकाविषयीं सांगितलें, आदेशानें [illegible] असें म्हणून त्याला प्रादेशमात्र म्हणावें किंवा मुखप्रभृति अवयवांच्या अनुरूपानें ज्ञानाच्या सामर्थ्यानें ) जें मोजलें जातें त्यास प्रादेशमात्र म्हणावें. किंवा द्युलोकादि पासून पृथ्वीपर्यंत जो प्रदेश आहे त्यालाहि प्रादेश मात्र म्हणावें अथवा उत्कृष्ट शास्त्रानें जें सांगितलें असेल त्यास प्रादेश म्हणावें. द्युलोकाचें मोजमाप इतकें आहे, असें शास्त्रांत सांगितलें असतें, म्हणून मात्र त्याला प्रादेशमात्र म्हणावें. दुसऱ्या शाखेंत प्रादेशमात्र याचा अर्थ मस्तकापासून हनवटीपर्यंतचा प्रदेश असा कल्पिला आहे; परंतु तो अर्थ येथें उपयोगी नाहीं. कारण पुढचाच उपसंहार करणारा 'त्या ह्या आत्म्याचा इत्यादि' मंत्र त्या अर्थाच्या उलट आहे. मंत्रांत 'अभिविमानं' असें पद आहे. त्याचा अर्थ असाः—प्रत्यगात्म्याच्या दृष्टीनें 'मी आहे' असें ज्ञान होतें त्यास 'अभिविमान' म्हणावें. 'मी प्रत्यगात्मा आहें' या ज्ञानाला अभिविमान म्हणतात. हाच प्रत्यगात्मा वैश्वानर होय. सर्व लोकांस पुण्यपापानुरूप गति देणारा जो सर्वात्मा, जो ईश्वर तो वैश्वानर होय. तसेंच सर्व नर नेणारा, सर्वात्मक असणारा, तो वैश्वानर होय, किंवा सर्व लोकांना प्रत्यगात्मदृष्टीनें निरनिराळा भासतो आणि स्वरूपतः एकच असतो, त्यास वैश्वानर म्हणावें. ( वैश्वानर सर्वेश्वर, सर्वात्मा आणि सर्वप्रत्यक्ष आहे हें ध्यानांत ठेवणें अगत्याचें आहे. ) असो, अशा वैश्वानराची जो उपासना करितो तो अन्न सेवन करीत असतां सर्व द्युलोकादि भुवनांमध्यें सर्व चराचरभूतांमध्यें, आणि सर्व * आत्म्यांमध्यें असणारें प्राण्यांचें अन्न खातो असें होतें. तात्पर्य वैश्वानरविद्या जाणणारा सर्वात्मा होऊन अन्न खातो. ही विद्या न जाणणारा अज्ञानी आणि केवळ पिंडमात्राचा मात्र अभिमान धरणारा जीव अन्न खातो; आणि स्वतःस तृप्त करितो. त्याप्रमाणें वैश्वानर वेत्ता अन्न खात नाहीं तर त्यानें अन्न सेवन केलें म्हणजे सर्व विश्वानें अन्न भक्षण केलें असें होतें. ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**तस्य ह वा एतस्याऽऽत्मनो वैश्वानरस्य मूर्धैव सुतेजाश्चक्षुर्विश्वरूपः प्राणः पृथग्वर्त्माऽऽत्मा संदेहो बहुलो बस्तिरेव रयिः पृथिव्येव पादावुर एव वेदिर्लोमानि बर्हिर्हृदयं गार्हपत्यो मनोऽन्वाहार्यपचन आस्यमाहवनीयः ॥ २ ॥**

**इति पञ्चमाध्यायस्याष्टादशः खण्डः ॥ १८ ॥**

---

* शरीर, इंद्रियें, मन, बुद्धि यांस ही आत्मसंज्ञा आहे, हें विसरूं नये.

कस्मादेवम् । यस्मात्तस्य ह वै एतस्यैवैतस्यात्मनो वैश्वानरस्य मूर्धैव सुतेजाश्चक्षुर्विश्वरूपः प्राणः पृथग्वर्त्माऽऽत्मा संदेहो बहुलो बस्तिरेव रयिः पृथिव्येव पादौ । अथवा विध्यर्थमेतद्वचनमेवमुपास्य इति । अथेदानीं वैश्वानरविदो भोजनेऽग्निहोत्रं निष्पादयिषन्नाह—एतस्य वैश्वानरस्य भोक्तुः उर एव वेदिराकारसामान्यात् । लोमानि बर्हिर्वेद्यामिवोरसि आस्तीर्णानि दृश्यन्ते । हृदयं गार्हपत्योऽन्वाहार्यपचनोऽग्निर्मनः । आस्यं मुखमाहवनीय इवाऽऽहवनीयो हूयतेऽस्मिन्नन्नमिति ॥ २ ॥

इति पञ्चमाध्यायस्याष्टादशः खण्डः ॥ १८ ॥

सिद्धांतीः—मागच्या मंत्रांत सांगितलेला अर्थ खरा कशावरून, असें म्हणाल तर ऐका. ज्याअर्थी त्या ह्या प्रस्तुत असलेल्या आत्म्याचें म्हणजे वैश्वानराचें मस्तक द्युलोक आहे, नेत्र विश्वरूपी आदित्य आहे, प्राण भिन्नस्वरूपी वायु आहे, मध्यदेह आकाश आहे. बस्ती हीच रयि आहे (रयी. धनसंपत्ती) आणि पृथ्वी हेच चरण आहेत, त्याअर्थी हा वैश्वानर आहे असेंच म्हटलें पाहिजे, किंवा मंत्राचा अर्थ असाहि करावा कीं, द्युलोक हेंच मस्तक आहे, असें समजून त्याची उपासना करावी, व याप्रमाणें दुसऱ्या अवयवांची उपासना करावी. असो; त्यानंतर श्रुति वैश्वानरवेत्त्याचें भोजन हें एक अग्निहोत्र आहे, अशी भावना ठेवावयास सांगत आहे; आणि ही भावना लोकांची असावी अशी तिची इच्छा आहे. ह्या वैश्वानराचा म्हणजे भोक्त्याचा उर ही एक यज्ञवेदी होय, कारण उराचा व यज्ञवेदीचा आकार एकसारखाच असतो. वेदीवर ज्याप्रमाणें बर्हि (दर्भ) आस्तीर्ण करितात, त्याप्रमाणें वैश्वानरवेत्त्यांच्या छातीवर केस असतात त्यांस श्रुतीनें दर्भ ही संज्ञा दिली आहे. त्याचें हृदय गार्हपत्य अग्नि होय. हृदय हें मनाचें प्रणयन करितें, मनाला उत्पन्न केल्यासारखें करितें म्हणून मनाला अन्वाहार्यपचन नामक अग्नि म्हटलें पाहिजे हाच दक्षिणाग्नि होय. वैश्वानरवेत्त्याचें मुख हा आहवनीय अग्नि होय. मुखामध्यें अन्नाची आहुती आपण देतों त्याप्रमाणें आहवनीयामध्यें आहुति देतात.

(तात्पर्यः—वैश्वानर हा विश्वरूप आहे म्हणून वैश्वानरवेत्त्यानें खाल्लेलें अन्न विश्वाला तृप्ति देणारें होतें; आणि वैश्वानरवेत्त्याचें अन्नभक्षण म्हणजे एकतऱ्हेचें अग्निहोत्र होतें.) ॥ २ ॥

खंड अठरावा समाप्त.

## अध्याय पांचवा खंड एकोणीसावा.

---

### मंत्र पहिला.

**तद्यद्भक्तं प्रथममागच्छेत्तद्धोमीयꣳ स यां प्रथमामाहुतिं जुहुयात्तां जुहुयात्प्राणाय स्वाहेति प्राणस्तृप्यति ॥ १ ॥**

अन्वय व अर्थ—तत् यद्भक्तं प्रथमं आगच्छेत्, तत् होमीयं ( तेथें जें प्रथम अन्न भोजनासाठीं येईल, त्याची आहुति द्यावी ) यां प्रथमां आहुतिं सः जुहुयात् तां 'प्राणाय स्वाहा' इति जुहुयात् ( तो जी प्रथम आहुति देईल ती 'प्राणाय स्वाहा' असें ह्मणून द्यावी ) प्राणः तृप्यति ( प्राण तृप्त होतो ) ॥ १ ॥

तत्तत्रैवं सति यद्भक्तं भोजनकाल आगच्छेद्भोजनार्थं तद्धोमीयं तद्धोतव्यमग्निहोत्रसंपन्मात्रस्य विवक्षितत्वान्नाग्निहोत्राङ्गेतिकर्तव्यताप्राप्तिरिह स भोक्ता यां प्रथमामाहुतिं जुहुयात्तां कथं जुहुयादित्याह—प्राणाय स्वाहेत्यनेन मन्त्रेणाऽऽहुतिशब्दादवदानप्रमाणमन्नं प्रक्षिपेदित्यर्थः । तेन प्राणस्तृप्यति ॥ १ ॥

सिद्धांतीः—याप्रमाणें अग्निहोत्राचें संपादन झालें असतां भोजनाच्या वेळीं पहिल्या प्रथम जो पदार्थ खाण्यासाठीं येईल त्याचें हवन करावें. येथें अग्निहोत्राचें संपादन मात्र केलें आहे ही विवक्षा आहे. हें हवन करणें म्हणजे प्रसिद्ध अग्निहोत्राचें जें एक अंग असतें तो हा प्रकार नव्हे. तात्पर्य येथें प्रत्यक्ष अग्निहोत्रांत आहुति द्यावयाची नाहीं, तर मागच्या खंडांत अग्निहोत्रसंपादनाचें जें विवरण केलें आहे तें लक्षांत ठेवावयाचें. असो; तो विद्वान् भोक्ता ( जेवणारा ) पहिली आहुति घेतांना "प्राणाय स्वाहा" हा मंत्र म्हणून पहिला घास घेतो अथवा त्यानें घ्यावा. अग्नीमध्यें अवदान देतांना ( आहुति देतांना ) आहुतीचें जें प्रमाण धरितो तेंच प्रमाण प्राणाहुति घेतांनाहि असावें. या आहुतीनें प्राणाची तृप्ति होते. ॥ १ ॥

---

### मंत्र दुसरा.

**प्राणे तृप्यति चक्षुस्तृप्यति चक्षुषि तृप्यत्यादित्यस्तृप्यत्यादित्ये तृप्यति द्यौस्तृप्यति दिवि तृप्य-**

न्त्यां यत्किंच द्यौश्चाऽऽदित्यश्चाधितिष्ठतस्तत्तृप्यति तस्यानु तृप्तिं तृप्यति प्रजया पशुभिरन्नाद्येन तेजसा ब्रह्मवर्चसेनेति ॥ २ ॥

इति पञ्चमाध्यायस्यैकोनविंशः खण्डः ॥ १९ ॥

अन्वय व अर्थ—प्राणे तृप्यति, चक्षुः तृप्यति; चक्षुषि तृप्यति, आदित्यः तृप्यति; आदित्ये तृप्यति द्यौः तृप्यति; दिवि तृप्यंत्याम्, यत्किंच द्यौः च आदित्यः च अधितिष्ठतः तत् तृप्यति, तस्यानु प्रजया पशुभिः अन्नाद्येन तेजसा, ब्रह्मवर्चसेन तृप्तिं तृप्यति इति (प्राण तृप्त झाला म्हणजे नेत्र तृप्त होतो, नेत्राच्या तृप्तीनें आदित्यतृप्ति; आदित्य-तृप्तीनें द्युलोकतृप्ति, द्युलोकतृप्तीनें ज्या ज्या वस्तूवर द्युलोक आणि आदित्य यांचें स्वामित्व आहे, त्या सर्व वस्तूंची तृप्ति आणि त्याच्या मागून प्रजा, पशु, तेज, ब्रह्मवर्चस इत्यादि सर्व तृप्तींची तृप्ती होते म्हणजे भोक्त्याची तृप्ति होते) ॥ २ ॥

प्राणे तृप्यति चक्षुस्तृप्यति चक्षुरादित्यो द्यौश्चेत्यादि तृप्यति यच्चान्यद्द्यौश्चाऽऽदित्यश्च स्वामित्वेनाधितिष्ठतस्तच्च तृप्यति तस्य तृप्तिमनु स्वयं भुञ्जानस्तृप्यत्येवं प्रत्यक्षम् । किं च प्रजादिभिश्च । तेजः शरीरस्था दीप्तिरुज्ज्वलत्वं प्रागल्भ्यं वा, ब्रह्मवर्चसं वृत्त-स्वाध्यायनिमित्तं तेजः ॥ २ ॥

इति पञ्चमाध्यायस्यैकोनविंशः खण्डः ॥ १९ ॥

सिद्धांतीः—प्राण तृप्त झाला म्हणजे नेत्र तृप्त होतो. नेत्राच्या तृप्तीनंतर आदित्य इत्यादि तृप्त होतात. इतकेंच नव्हे तर त्या ज्या वस्तूवर द्युलोकाचें व आदित्याचें स्वामित्व आहे, तीं तीं सर्व भूतें तृप्त होतात; आणि त्याच्या मागून स्वतः भोक्ता तृप्त होतो. हा नित्याचा अनुभव आहे. प्रजा (संतती) पशु, अन्न, सामग्री, शरीराचें उज्ज्वलत्व अथवा प्रगल्भता व ब्रह्मवर्चस म्हणजे सद्वर्तनाच्या आणि विद्येच्या योगानें प्राप्त होणारें तेज, इत्यादि सर्व तृप्त होतात, प्रफुल्लित होतात; आणि भोक्त्याला तृप्ति देतात. ॥ २ ॥

खंड एकोणिसावा समाप्त.

## अध्याय पांचवा, खंड २० वा.

### मंत्र पहिला व दुसरा.

अथ यां द्वितीयां जुहुयात्तां जुहुयाद्व्यानाय स्वाहेति व्यानस्तृप्यति ॥ १ ॥

व्याने तृप्यति श्रोत्रं तृप्यति श्रोत्रे तृप्यति चन्द्रमास्तृप्यति चन्द्रमसि तृप्यति दिशस्तृप्यन्ति दिक्षु तृप्यन्तीषु यत्किंच दिशश्च चन्द्रमाश्चाधितिष्ठन्ति तत्तृप्यति तस्यानु तृप्तिं तृप्यति प्रजया पशुभिरन्नाद्येन तेजसा ब्रह्मवर्चसेनेति ॥ २ ॥

इति पञ्चमाध्यायस्य विंशः खण्डः ॥ २० ॥

अन्वय व अर्थ—( या मंत्राचा अन्वयार्थ सहज समजणारा आणि सोपा आहे म्हणून येथें दिला नाहीं. दुसऱ्या मंत्रांत व्यानाची, चंद्रमाची इत्यादि योजना करावयाची. त्या तर सहज समजण्यासारख्या आहेत ) ॥ १ ॥ २ ॥

इति पञ्चमाध्यायस्य विंशः खण्डः ॥ २० ॥

खंड विसावा समाप्त.

---

## अध्याय पांचवा, खंड २१ वा.

### मंत्र पहिला व दुसरा.

अथ यां तृतीयां जुहुयात्तां जुहुयादपानाय स्वाहेत्यपानस्तृप्यति ॥ १ ॥

अपाने तृप्यति वाक्तृप्यति वाचि तृप्यन्त्यामग्निस्तृप्यत्यग्नौ तृप्यति पृथिवी तृप्यति पृथिव्यां तृप्यन्त्यां यत्किंच पृथिवी चाग्निश्चाधितिष्ठतस्तत्तृप्यति

तस्यानु तृप्यति प्रजया पशुभिरन्नाद्येन तेजसा ब्रह्मवर्चसेनेति ॥ २ ॥

इति पञ्चमाध्यायस्यैकविंशः खण्डः ॥ २१ ॥

अन्वय व अर्थ—( अन्वयांची व्यवस्था मागीलप्रमाणें ) ॥ १ ॥ २ ॥

इति पञ्चमाध्यायस्यैकविंशः खण्डः ॥ २१ ॥

खंड एकविसावा समाप्त.

---

## अध्याय पांचवा; खंड २२ वा.

### मंत्र पहिला व दुसरा.

अथ यां चतुर्थीं जुहुयात्तां जुहुयात्समानाय स्वाहेति समानस्तृप्यति ॥ १ ॥

समाने तृप्यति मनस्तृप्यति मनसि तृप्यति पर्जन्यस्तृप्यति पर्जन्ये तृप्यति विद्युत्तृप्यति विद्युति तृप्यन्त्यां यत्किंच विद्युच्च पर्जन्यश्चाधितिष्ठतस्तत्तृप्यति तस्यानु तृप्तिं तृप्यति प्रजया पशुभिरन्नाद्येन तेजसा ब्रह्मवर्चसेनेति ॥ २ ॥

इति पञ्चमाध्यायस्य द्वाविंशः खंडः ॥ २२ ॥

अन्वय व अर्थ—( अन्वयार्थांची व्यवस्था मागीलप्रमाणें ) ॥१॥२॥

इति पञ्चमाध्यायस्य द्वाविंशः खण्डः ॥ २२ ॥

खंड बाविसावा समाप्त.

---

## अध्याय पांचवा, खण्ड २३ वा.

### मंत्र पहिला व दुसरा.

अथ यां पञ्चमीं जुहुयात्तां जुहुयादुदानाय स्वाहेत्युदानस्तृप्यति ॥ १ ॥

उदाने तृप्यति त्वक्तृप्यति त्वचि तृप्यन्त्यां वायुस्तृप्यति वायौ तृप्यत्याकाशस्तृप्यत्याकाशे

तृप्यति यत्किंच वायुश्चाऽऽकाशश्चाधितिष्ठतस्तत्तृप्यति तस्यानु तृप्तिं तृप्यति प्रजया पशुभिरन्नाद्येन तेजसा ब्रह्मवर्चसेनेति ॥ २ ॥

इति पञ्चमाध्यायस्य त्रयोविंशः खण्डः ॥ २३ ॥

**अन्वय व अर्थ**—( अन्वयार्थाची व्यवस्था मागीलप्रमाणें. )॥१॥२॥

अथ यां द्वितीयां तृतीयां चतुर्थीं पञ्चमीमिति समानम् ॥ १ ॥ २ ॥

इति पञ्चमाध्ययस्य त्रयोविंशः खण्डः ॥ २३ ॥

सिद्धांतीः—या चारी खंडांत विशेष असें कांहींच सांगावयाचें नाहीं. पहिल्या आहुतीप्रमाणेंच दुसऱ्या तिसऱ्या चौथ्या आणि पांचव्या आहुतींची व्यवस्था आहे. योग्य तो फेरफार कोणालाही सहज करितां येईल. ॥ २० ॥ २१ ॥ २२ २३ ॥

खंड तेविसावा समाप्त.

---

## अध्याय पांचवा, खण्ड २४ वा.

---

### मंत्र पहिला.

स य इदमविद्वानग्निहोत्रं जुहोति यथाऽङ्गारानपोह्य भस्मनि जुहुयात्तादृक्तत्स्यात् ॥ १ ॥

**अन्वय व अर्थ**—**इदं अविद्वान् यः अग्निहोत्रं जुहोति** (हें वैश्वानरज्ञान नसणारा जो कोणी अग्निहोत्राचें अनुष्ठान करितो ) **सः यथा अंगारान् अपोह्य भस्मनि जुहुयात् तादृक् तत् स्यात्** ( कुंडांतील निखारे काढून भस्मामध्यें—राखेमध्यें—त्यानें आहुति द्यावी, त्याप्रमाणें त्याचें तें—अग्निहोत्रांतील—हवन होईल ) ॥ १ ॥

स यः कश्चिदिदं वैश्वानरदर्शनं यथोक्तमविद्वान्सन्नग्निहोत्रं प्रसिद्धं जुहोति यथाऽङ्गारानाहुतियोग्यानपोह्यानाहुतिस्थाने भस्मनि जुहुयात्तादृक्तत्तुल्यं तस्य तदग्निहोत्रहवनं स्याद्वैश्वानरविदोऽग्निहोत्रमपेक्ष्येति प्रसिद्धाग्निहोत्रनिन्दया वैश्वानरविदोऽग्निहोत्रं स्तूयते ॥ १ ॥

**सिद्धांती**—वैश्वानराचें मागच्या खंडांत जें यथार्थज्ञान व विधि हीं सांगितलीं, तसें ज्ञानादि नसतांना ही जो प्रसिद्ध अग्निहोत्राचें अनुष्ठान मात्र करितो, त्याचें तें हवन म्हणजे आहुतींस योग्य व अवश्य असणारें निखारे काढून घेऊन आहुतिस्थानीं

असणाऱ्या भस्मामध्यें आहुति देणें हें होय. अर्थात् वैश्वानरविद्येच्या अपेक्षेनें ( ती दृष्टि ठेवून ) मात्र हें सांगणें आहे. तात्पर्य अग्निहोत्राची ही निंदा आहे, तथापि ती निंदा केवळ वैश्वानरविद्येमध्यें पारीण असणाऱ्या विद्वानांच्या अग्निहोत्राची स्तुति करण्यासाठीं मात्र—निंदा—केली आहे ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**अथ य एतदेवं विद्वानग्निहोत्रं जुहोति तस्य सर्वेषु लोकेषु सर्वेषु भूतेषु सर्वेष्वात्मसु हुतं भवति ॥ २ ॥**

**अन्यव व अर्थ—अथ यः एतत् एवं विद्वान् अग्निहोत्रं जुहोति तस्य सर्वेषु लोकेषु, सर्वेषु भूतेषु, सर्वेषु आत्मसु, हुतं भवति** ( आतां ही वैश्वानराग्निहोत्राची—विद्या पूर्ण अवगत असून जो अग्निहोत्रानुष्ठान यथासांग करितो, तो सर्व भुवनें, सर्व भूतें व सर्व भूतात्मे यांस आहुती देऊन संतुष्ट करितो ) ॥ २ ॥

अतश्चैतद्विशिष्टमग्निहोत्रम् । कथम् । अथ य एतदेवं विद्वानग्निहोत्रं जुहोति तस्य यथोक्तवैश्वानरविज्ञानवतः सर्वेषु लोकेष्वित्याद्युक्तार्थम् । हुतमन्नमत्तीत्यनयोरेकार्थत्वात् ॥ २ ॥

सिद्धांतीः—या साठींही हें अग्निहोत्र एवंविशिष्ट आहे. कसें तें पहा. जो कोणी वैश्वानराग्निहोत्राचा ज्ञाता संपन्न ( भावनाकल्पित ) अग्निहोत्राचें यजन करितो, त्याला वैश्वानराचें स्वरूप वर्णिलें आहे, तें सर्व ज्ञान असतें, ह्मणून त्याचें हवन सर्व भुवनांस तृप्त करितें, इत्यादि अर्थ पूर्वीं ( मंत्र १ पहा ) सांगितलाच आहे. हुत आणि अन्नसेवन यांचा एकच अर्थ आहे, कारण पहिल्या मंत्रांतील ( खंड १८ ) अन्न खाणें व हवन करणें हीं एकाच स्वरूपाचीं आहेत ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**तद्यथेषीकातूलमग्नौ प्रोतं प्रदूयेतैवꣳ हास्य सर्वे पाप्मानः प्रदूयन्ते य एतदेवं विद्वानग्निहोत्रं जुहोति ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थ**—तत् यथा ( तो प्रकार असा आहे ) अग्नौ इषीकातूलं प्रोतं-यथा-प्रदूयेत एवं अस्य सर्वे पाप्मानः प्रदूयन्ते ह यः एतत् एवं विद्वान् अग्निहोत्रं जुहोति ( इषीकेवर असलेला कापूस अग्नीमध्यें टाकला असतां दग्ध होऊन जातो, त्याप्रमाणें वैश्वानरविद्यापारंगत विद्वानानें संपन्न केलेलें अग्निहोत्र, त्या विद्वान् याजकांचीं सर्व पातकें दग्ध करून टाकितें ) ॥ ३ ॥

**किंच तद्यथेषीकायास्तूलमग्रमग्नौ प्रोतं प्रक्षिप्तं प्रदूयेत प्रदह्येत क्षिप्रमेवं हास्य विदुषः सर्वात्मभूतस्य सर्वान्नानामत्तुः सर्वे निरवशिष्टाः पाप्मानो धर्माधर्माख्या अनेकजन्मसंचिता इह च प्राग्ज्ञानोत्पत्तेर्ज्ञानसहभाविनश्च प्रदूयन्ते प्रदह्येरन्वर्तमानशरीरारम्भकपाप्मवर्जं; लक्ष्यं प्रति मुक्तेषुवत्प्रवृत्तफलत्वात्तस्य न दाहः। य एतदेवं विद्वानग्निहोत्रं जुहोति भुङ्क्ते ॥ ३ ॥**

**सिद्धांतीः**—आणखी पहा. इषीकेला ( विताऱ्याच्या लेखणीला ) असलेला कापूस अग्नींत टाकिला असतां लागलाच दग्ध होऊन जातो, त्याप्रमाणेंच ह्या वैश्वानराग्निहोत्राच्या विद्वानानें यथोक्त संपादिलेलें अग्निहोत्र केलें तर त्या सर्वात्मभूत झालेल्या, सर्व अन्नांचा भोक्ता असलेल्या विद्वानाचीं सर्व ( अखिल ) पापें निःशेष दग्ध होऊन जातात. अनेक पूर्वजन्मांतील संचित झालेलीं 'धर्म—अधर्म' नामक पुण्य—पापें, ज्ञान उत्पन्न होण्यापूर्वी व ज्ञान होत असतां या जन्मांत केलेलीं पापें, तात्पर्य तत्कृत सर्वेच्या सर्व संचित पापें व या जन्मांतील भूतवर्तमान सर्व पापें, दग्ध होऊन जातात. मात्र ज्या बद्धक कर्मांनें ( पुण्यपापानें, पापानें ह्मणावयाचें ! ) वर्तमान देहाला आरंभ झाला, तीं वर्तमानजन्मदायी पापें वर्ज्य करून बाकींचीं सर्व पापें दग्ध होतात. शरीरारंभक मात्र पापें दग्ध होत नाहींत, कारण लक्ष्याकडे सोडलेला बाण जसा वेग संपेपर्यंत थांबत नाहीं, त्याप्रमाणें प्रारब्धकर्मज्ञान झालें, तरी फलोत्पत्तीपर्यंत दग्ध होत नाहीं ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा.

**तस्मादु हैवंविद्यद्यपि चण्डालायोच्छिष्टं प्रयच्छेदात्मनि हैवास्य तद्वैश्वानरे हुतꣳ स्यादिति तदेष श्लोकः ॥ ४ ॥**

अन्वय व अर्थः—तस्मात् उ ह (म्हणूनच असेंही होतें कीं) **यद्यपि एवंवित् चांडालाय उच्छिष्टं प्रयच्छेत्, आत्मनि वैश्वानरे एव अस्य हुतं स्यात् ह इति** (यद्यपि विद्वानानें चांडाळाला उच्छिष्ट दिलें, तथापि तें उच्छिष्ट म्हणजे आत्मरूपी वैश्वानराग्निहोत्रांत दिलेली आहुतिच होय. असा नियम आहे) **तत् एषः श्लोकः** (तत्संबंधीं हा श्लोक आहे) ॥४॥

स यद्यपि चण्डालायोच्छिष्टानर्हायोच्छिष्टं प्रयच्छेदुच्छिष्टं दद्यात्प्रतिषिद्धमुच्छिष्टदानं यद्यपि कुर्यादात्मनि हैवास्य चण्डालदेहस्थे वैश्वानरे तद्धुतं स्यान्नाधर्मनिमित्तमिति विद्यामेव स्तौति । तदेतस्मिन्स्तुत्यर्थे श्लोको मन्त्रोऽप्येष भवति ॥ ४ ॥

सिद्धांतीः—त्या विद्वानानें यद्यपि एखाद्या अयोग्य मनुष्याला ह्मणजे चांडाळाला जरी उच्छिष्ट (उष्टें) दिलें;—कोणालाही उष्टें देऊं नये, असा प्रतिबंध आहे, तो एकीकडे ठेऊन जरी चांडाळाला उष्टें या विद्वानानें दिलें,—तथापि त्या चांडाळाच्या देहांत जो आत्मा, जो वैश्वानर, वास्तव्य करीत आहे, त्यालाच ती आहुति समर्पण झाली, असें होतें. अर्थात् या उच्छिष्ट दानापासून कांहीं अधर्म होत नाहीं. हें वैश्वानरविद्येची स्तुति करण्यासाठीं सांगितलें. ह्या स्तुतीचा परिपोषक हा श्लोक ह्मणजे मंत्र आहे, पहा ॥ ४ ॥

---

### मंत्र पांचवा.

**यथेह क्षुधिता बाला मातरं पर्युपासत एवꣳ सर्वाणि भूतान्यग्निहोत्रमुपासत इत्यग्निहोत्रमुपासत इति ॥ ५ ॥**

**इति पञ्चमाध्यायस्य चतुर्विंशः खंडः ॥ २४ ॥**

**इति च्छान्दोग्योपनिषदि पञ्चमोऽध्यायः समाप्तः ॥ ५ ॥**

अन्वय व अर्थ—**इह यथा क्षुधिताः बालाः मातरं पर्युपासते, एवं सर्वाणि भूतानि अग्निहोत्रं उपासते इति; अग्निहोत्रं उपासते इति** (या लोकीं भुकेलेलीं बालकें आपल्या आईची आराधना करतात,

त्याप्रमाणें सर्व प्राणी अग्निहोत्राची आराधना करितात, आराधना करि-तात ) ॥ ५ ॥

यह लोके क्षुधिता बुभुक्षिता बाला मातरं पर्युपासते कदा नो माताऽन्नं प्रयच्छतीत्येवं सर्वाणि भूतान्यन्नादान्येवंविदोऽग्निहोत्रं भोजनमुपासते कदा त्वसौ भोक्ष्यत इति, जगत्सर्वं विद्वद्भोजनेन तृप्तं भवतीत्यर्थः । द्विरुक्तिरध्यायपरिसमाप्त्यर्था ॥ ५ ॥

इति पञ्चमाध्यायस्य चतुर्विंशः खण्डः ॥ २४ ॥

इति श्रीमद्गोविन्दभगवत्पूज्यपादशिष्यस्य परमहंसपरिव्राजकाचा-र्यस्य श्रीमच्छंकरभगवतः कृतौ छान्दोग्योपनिषद्विवरणे पञ्चमोऽध्यायः समाप्तः ॥ ५ ॥

**सिद्धांतीः—**आपल्याला ठाऊकच आहे कीं, या भूलोकी भुक लागलेलीं मुलें 'आप-ल्याला आपली आई केव्हां जेवावयास घालील' या चिंतेनें प्रेरित होऊन आपल्या आईची आराधना करितात व वाट पाहतात, त्याप्रमाणें अन्नसेवन करणारीं सर्व भूतें वैश्वानराग्निहोत्रविद्या जाणणाऱ्याचें भोजनाचा-अग्निहोत्रच तें !-आराधना करून वाट पाहतात, त्याच्या भोजनाची मार्गप्रतीक्षा करीत असतात. कारण सर्व जग विद्वानाच्या भोजनानें तृप्त होतें. तो जेवला कीं सर्व जगत् जेवलें असें होतें. ' अग्निहोत्रमुपासते ' या पदांची दोनदां आवृत्ति आहे, ती अध्यायपरिसमाप्तीसाठीं आहे ॥ ५ ॥

खंड चोविसावा समाप्त.

अध्याय पांचवा समाप्त.

---

अध्याय सहावा खंड १ ला.

---

अंक पहिला.

श्रुतिः ॐ ।

श्वेतकेतुर्हाऽऽरुणेय आस तं ह पितोवाच श्वेत-केतो वस ब्रह्मचर्यं न वै सोम्यास्मत्कुलीनोऽननूच्य ब्रह्मबन्धुरिव भवतीति ॥ १ ॥

**अन्वय व अर्थः—**आरुणेयः श्वेतकेतुः आस ह ( आरुणीचा मुलगा श्वेतकेतु असता झाला ) पिता तं उवाच ह ( त्याचा पिता

त्याला ह्मणाला ) श्वेतकेतो, ब्रह्मचर्यं वस, सोम्य, अस्मत् कुलीनः अननूच्य ब्रह्मबंधुः इव न भवति इति ( श्वेतकेतो, ब्रह्मचर्याश्रमामध्यें राहा; आमच्या कुलामध्यें वेदाध्ययन न करितां, ब्रह्मबंधूप्रमाणें राहण्याची मुळींच वहिवाट नाहीं ) ॥ १ ॥

श्वेतकेतुर्हाऽऽरुणेय आसेत्यस्याध्यायस्य संबन्धः । सर्वं खल्विदं ब्रह्म तज्जलानित्युक्तं कथं तस्माज्जगदिदं जायते तस्मिन्नेव च लीयतेऽनिति च तेनैवेत्येतद्वक्तव्यम् । अनन्तरं चैकस्मिन्मुक्ते विदुषि सर्वं जगत्तृप्तं भवतीत्युक्तं।तदेकत्वे सत्यात्मनः सर्वभूतस्य-स्योपपद्यते नाऽऽत्मभेदे कथं च तदेकत्वमिति तदर्थोऽयं षष्ठोऽ-ध्याय आरभ्यते । पितापुत्राख्यायिका विद्यायाः सारिष्ठत्वप्रदर्श-नार्था । श्वेतकेतुरिति नामतो हेत्यैतिह्यार्थः । आरुणेयोऽरुणस्य पौत्र आस बभूव । तं पुत्रं हाऽऽरुणिः पिता योग्यं विद्याभाजनं मन्वानस्तस्योपनयनकालात्ययं च पश्यन्नुवाच हे श्वेतकेतोऽनुरूप गुरुं कुलस्य नो गत्वा वस ब्रह्मचर्यम् । न चैतद्युक्तं यदस्मत्कु-लीनो हे सोम्याननूच्यानधीत्य ब्रह्मबन्धुरिव भवतीति ब्राह्मणान्ब-न्धून्व्यपदिशति न स्वयं ब्राह्मणवृत्त इति ॥ १ ॥

सिद्धांती:—आरुणीचा मुलगा श्वेतकेतु या नांवाचा होता, असा उल्लेख गेल्या पांचव्या अध्यायांत आलाच आहे. "हें सर्व वस्तुतः ब्रह्म आहे, ब्रह्मापासून याची उत्पत्ति, लय, आणि स्थिति आहे" असें तेथें सांगितलें आहे. हें कसें, ब्रह्मापासून जग उत्पन्न होतें कसें, त्याच्यामध्यें लीन होतें कसें; आणि त्याच्या आधारानें दृश्य स्थितींत राहतें कसें, हें या सहाव्या अध्यायांत सांगावयाचें आहे. तेथें असेंही ह्मटलें होतें कीं, एक विद्वान् तृप्त झाला ह्मणजे, सर्व जगत् आणि त्यांतील प्राणी तृप्त होतात. याही सिद्धांताचा उलगडा करावयाचा आहे. सर्व भूतांच्या ठिकाणीं एकच आत्मा राहत असेल, तर हा आतांच सांगितलेला सिद्धांत उपपन्न होतो, परंतु आत्मे निरनिराळे असून भिन्नस्वरूपाचे असतील तर वरील सिद्धांताची उपस्थिति लागणार नाहीं. असो. आत्म-स्वरूपाची एकता सिद्ध केली ह्मणजे वरील सिद्धांत आपोआपच सिद्ध होईल. ह्मणून या अध्यायांत आत्मैकत्व सिद्ध करण्याचा संकल्प करून श्रुतीनें या अध्यायाला आरंभ केला आहे. प्रथमतः पितापुत्राची गोष्ट सांगितली आहे. ती विद्येचें श्रेष्ठत्व सर्वांस कळावें एतदर्थ आहे. मुलाचें नांव श्वेतकेतु होतें.

शिष्यः—मंत्रांतील 'ह' हा ऐतिह्य आहे, ह्मणजे ऐतिहासिक आहे. अरुणाचा पुत्र आरुणी आणि त्याचा पुत्र आरुणेय ह्मणजे श्वेतकेतु होय.

सिद्धांती—श्वेतकेतूला त्याचा बाप ह्मणाला: तूं आतां विद्या शिकण्यास योग्य झाला आहेस, ब्राह्मणाचें उपनयन होण्याचा जो काल तोही अतिक्रांत होण्याची वेळ आली आहे. ह्मणून हे श्वेतकेतो ! उत्कृष्ट शिक्षण देण्याचें सामर्थ्य असणाऱ्या आमच्या कुलगुरूंच्या आश्रमांत तूं जाऊन राहा, ब्रह्मचर्य धारण कर, आणि त्या कुलीन गुरूंचा अनुग्रह संपादन करून विद्येचें अध्ययन कर. बाळा, आमच्या कुळामध्यें ज्यानें जन्म घेतला आहे, त्यानें अध्ययन केल्याशिवाय राहावें, ब्रह्मबंधूसारखें वागावें, हें आमचें कुलव्रत नाहीं.

शिष्य०—ब्रह्मबंधु ह्मणजे काय ?

सिद्धांती—ब्राह्मणास योग्य जें अध्ययन ते केल्याशिवाय राहणें ह्मणजे ब्रह्मबंधु होणें होय.

शिष्य०—स्वतः आरुणि विद्वान् नव्हता काय ?

सिद्धांती—तो विद्वान् होता, त्याची विद्वत्ता केवढी होती हें आपणास पुढें समजेल ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**स ह द्वादशवर्ष उपेत्य चतुर्विंशतिवर्षः सर्वान्वेदानधीत्य महामना अनूचानमानी स्तब्ध एयाय तं ह पितोवाच श्वेतकेतो यन्नु सोम्येदं महामना अनूचानमानी स्तब्धोऽस्युत तमादेशमप्राक्ष्यः ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थ—द्वादशवर्षः सः उपेत्य** (बारा वर्षांचा तो—गुरुगृहीं जाऊन राहीला) **चतुर्विंशतिवर्षः, सर्वान् वेदान् अधीत्य महामनाः, अनूचानमानी, स्तब्धः एयाय** (तो चोविस वर्षांचा झाला. त्याचें सर्व वेदाध्ययन संपलें, नंतर आपण मोठे विद्वान् झालों, आपलें अध्ययन फार उत्कृष्ट झालें, असा अभिमान झालेला हा श्वेतकेतु अविनतस्वभावी होऊन घरीं परत आला) **पिता तं उवाच ह** (त्याला त्याचा बाप म्हणाला) **श्वेतकेतो, यत् नु सोम्य इदं महामनाः अनूचानमानी स्तब्धः असि, उत तं आदेशं अप्राक्ष्यः** (श्वेतकेतो, ज्या अर्थीं तूं हा असा अभिमानी, पंडितंमन्य आणि मौनव्रत धारण करणारा परत आला आहेस, त्या अर्थीं तूं आपल्या आचार्याला तो आदेश विचारला आहेस काय? आचार्यापासून तूं तो मुख्य सिद्धांत समजून घेतला आहेस काय?) ॥ २ ॥

तस्मात: प्रवासोऽनुमीयते पितुः । येन स्वयं गुणवान्सन्पुत्रं नोपनेष्यति । स पित्रोक्तः श्वेतकेतुर्ह द्वादशवर्षः सन्नुपेत्याऽऽचार्यं यावच्चतुर्विंशतिवर्षो बभूव तावत्सर्वान्वेदांश्चतुरोऽप्यधीत्य तदर्थं च बुद्ध्वा महामना महद्गम्भीरं मनो यस्यासममात्मानमन्यैर्मन्यमानं मनो यस्य सोऽयं महामना अनूचानमान्यनूचानमात्मानं मन्यत इत्येवंशीलो यः सोऽनूचानमानी स्तब्धोऽप्रणतस्वभाव एयाय गृहम् । तमेवंभूतं हाऽऽत्मनोऽननुरूपशीलं स्तब्धं मानिनं पुत्रं दृष्ट्वा पितोवाच सद्धर्मावतारचिकीर्षया । श्वेतकेतो यन्न्विदं महामना अनूचानमानी स्तब्धश्चासि कस्तेऽतिशयः प्राप्त उपाध्यायादुतापि तमादेशमादिश्यत इत्यादेशः केवलशास्त्राचार्योपदेशगम्यमित्येतद्येन वा परं ब्रह्माऽऽदिश्यते स आदेशस्तमप्राक्ष्यः पृष्टवानस्याचार्यम् ॥ २ ॥

सिध्दांती:—मंत्रांच्या योजनेवरून अर्थात् बाप प्रवासाला निघाला होता, असें अनुमान स्पष्ट निघतें. उघड आहे. आपण स्वतः विद्वान् असतांही ज्यापक्षीं त्यानें आपल्या स्वतःच्या पुत्राचें उपनयन करून त्याला विद्या शिकविली नाहीं, त्या पक्षीं तो या वेळीं प्रवासालाच गेला असला पाहिजे, असो. बापानें सांगितल्यावरून १२ वर्षांचा हा श्वेतकेतु आचार्यांच्या आश्रमांत गेला आणि तो स्वतः २४ वर्षांचा होईपर्यंत त्यानें चारीही वेदांचें यथासांग अध्ययन करून त्यांचा अर्थही समजून घेतला. इतकी विद्वत्ता प्राप्त झाल्यावर तो महामना झाला.

शिष्य०—ह्मणजे तो उदार मनाचा झाला काय ?

सिद्धांती:—छेः नाहीं. आपल्यासारखा या भूतळावर दुसरा कोणी पंडित विद्यमान नाहीं, असें नसतें. मोठेपण त्याच्या मनानें घेतलें. तसेंच आपलें अध्ययनही उत्कृष्ट रीतीनें पार पडलें आहे, असेंही त्यास वाटूं लागलें. इतकी जाडी विद्वत्ता आणि एवढा थोरला बहुश्रुतपणा प्राप्त झाल्यावर अर्थात् तो अतिशय गर्विष्ठ झाला, यांत कांहीं नवल नाहीं. आपल्याबरोबरीचा कोणी नाहीं असें श्वेतकेतु समजत असल्यामुळें तो कोणाशी बोलेनासाही झाला. तात्पर्य तो अविनयशील, अनम्र, आणि उन्मत्त होऊन घरीं परत आला. तो परत येतांक्षणीं त्याच्या बापानें ओळखलें कीं, आपल्या मुलाचें शील आपल्या कुळास व आत्मज्ञास अयोग्य असें झालें आहे. हा उन्मत्त आणि अभिमानी झाला आहे. नंतर त्याला ताळ्यावर आणून सद्धर्माकडे त्याची प्रवृत्ति करावी, एतदर्थ त्याचा पिता त्याला ह्मणाला ' श्वेतकेतो, तूं महामानी, पंडीतंमन्य आणि गर्विष्ठ झाला आहेस. त्या अर्थी तुला तुझ्या गुरूपासून अशी कोणती विलक्षण विद्या प्राप्त झाली आहे कीं, ज्यायोगें तूं असें उन्मत्त व्हावेंस ? बरें, मला असें तरी सांग कीं, तूं आपल्या आचार्यांला तो आदेश विचारिलास काय ?

शिष्यः—आदेश ह्मणजे काय भगवन् ?

सिद्धांती:—स्वतःच्या बुद्धीनें आकलन करितां न आल्यामुळें केवळ शास्त्राच्या आणि आचार्यांच्या उपदेशानें जें ज्ञान प्राप्त होतें त्याला आदेश असें ह्मणावें; किंवा ज्याच्या सहाय्यानें परब्रह्माचें ज्ञानविज्ञान होतें, त्याला आदेश असें ह्मणावें; अशा आदेशासंबंधानें श्वेतकेतूनें आपल्या गुरूपाशी चौकशी केली होती किंवा नाहीं हें आरुणीला समजून घ्यावयाचें आहे.

पूर्व०—ह्या प्रश्नाचें रहस्य काय ?

सिद्धांती:—ब्रह्मविद्या प्राप्त झाली असतां मनुष्य अभिमानविगलित होतो. आपला पुत्र अभिमानी आहे, तेव्हां ब्रह्मविद्येसारखी विद्या आपल्याला प्राप्त झाली नाहीं, असें त्याचें त्याला कळवून त्यास गर्वहत करावें, असा आरुणीचा उद्देश आहे.

शिष्यः—तो आदेश कोणता भगवन् ।

सिद्धांती:—पुढच्याच मंत्रांत हें सिद्ध होईल ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**येनाश्रुतꣳ श्रुतं भवत्यमतं मतमविज्ञातं विज्ञात-मिति कथं नु भगवः स आदेशो भवतीति ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थ:—येन अश्रुतं श्रुतं, अमतं मतं, अविज्ञातं विज्ञातं, भवति इति** (ज्या आदेशाच्या योगानें न ऐकलेलें ऐकल्यासारखें होतें, न विचार केलेलें, विचार केल्यासारखें होतें; आणि न जाणलेलें जाणतां येतें, तो आदेश तूं आपल्या गुरुजीस विचारिलास काय? ) **कथं नु भगवः सः आदेशः भवति इति** (हे भगवन् , हे तात, हा आदेश कोणत्या स्वरूपाचा आहे, हें कृपा करून मला सांगावें, अशी मुलानें बापाची प्रार्थना केली ) ॥ ३ ॥

**तमादेशं विशिनष्टि येनाऽऽदेशेन श्रुतेनाश्रुतमप्यन्यच्छ्रुतं भवत्यमतं मतमतर्कितं तार्कितं भवत्यविज्ञातं विज्ञातमनिश्चितं निश्चितं भवतीति । सर्वानपि वेदानधीत्य सर्वं चान्यद्वेद्यमधिगम्याप्यकृतार्थ एव भवति यावदात्मतत्त्वं न जानातीत्याख्यायिकातोऽवगम्यते । तदेतदद्भुतं श्रुत्वाऽऽहं कथं न्वेतदप्रसिद्धमन्यविज्ञानेनान्यद्विज्ञातं भवतीत्येवं मन्वानः पृच्छति कथं नु केन प्रकारेण हे भगवः स आदेशो भवतीति ॥ ३ ॥**

सिद्धांती०—त्या आदेशाचें स्पष्टीकरण या मंत्रांत श्रुतीनें केलें आहे. हा आदेश उपलब्ध झाला असतां जें आपण कधींही ऐकलें नाहीं, ते ऐकल्याचें श्रेय प्राप्त होतें; ज्याची आपल्यास केव्हांही कल्पना करितां येणार नाहीं तें कल्पितां व तर्कितां येतें आणि ज्याचें आपल्यास निश्चित ज्ञान झालें नसतें त्याचेंही निश्चित ज्ञान होतें. असें या आदेशाचें सामर्थ्य आहे. यद्यपि चारी वेदांचे अध्ययन यथासांग झालें, ज्या कांहीं लौकिक आणि वैदिक गोष्टी समजून घेण्यासारख्या आहेत, त्या जरी आपणास समजल्या, तथापि आपण कृतार्थ होत नाहीं. जोंपर्यंत आत्मतत्वाचें ज्ञानविज्ञान झालेलें नसतें, तोंपर्यंत कोणताही जीव अकृतार्थच राहतो, असें या पितापुत्रांच्या आख्यायिकेवरून समजतें. असो. आपल्या बापाचें हें अनुभवविलक्षण बोलणें ऐकून श्वेतकेतु पित्यास शरण गेला; आणि ह्मणाला 'बाबा आपण काय ह्मणतां ? हें मला मुळींच समजत नाहीं. हा एक आदेश समजून घेतला असतां आपल्यास विज्ञात नसणाऱ्या दुसऱ्याच गोष्टी विज्ञात होतात, एका वस्तूचें ज्ञान झालें असतां दुसरीच अविज्ञात असलेली गोष्ट आपणास कशी कळतें, हें मला समजत नाहीं. तेव्हां कृपा करा आणि हा आदेश कोणत्या स्वरूपाचा आहे हें मला समजून द्या ॥ ३ ॥

---

### मंत्र ४ था.

**यथा सौम्यैकेन मृत्पिण्डेन सर्वं मृन्मयं विज्ञातँ स्याद्वाचाऽऽरम्भणं विकारो नामधेयं मृत्तिकेत्येव सत्यम् ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थः—सौम्य, यथा एकेन मृत्पिंडेन सर्वं मृन्मयं विज्ञातं स्यात्** ( हे सौम्य, एका मृत्पिंडाचें ज्ञान झालें असतां सर्व मृत्तिकापदार्थांचे ज्ञान होतें,—तसेंच हा आदेश समजला असतां सर्व ज्ञेय वस्तूंचे ज्ञान होतें—) **वाचारंभणं विकारः नामधेयं, 'मृत्तिका' इति एव सत्यं** ( प्रत्येक विकार वाणीचे मात्र कार्य असून ते फक्त नाममात्र आहे. मृत्तिका हीच सत्य वस्तु आहे ) ॥ ४ ॥

यथा स आदेशो भवति तच्छृणु हे सोम्य । यथा लोक एकेन मृत्पिण्डेन रुचककुम्भादिकारणभूतेन विज्ञातेन सर्वमन्यत्तद्विकारजातं मृन्मयं मृद्विकारजातं विज्ञातं स्यात् । कथं मृत्पिण्डे कारणे विज्ञाते कार्यमन्यद्विज्ञातं स्यात् । नैष दोषः । कारणेनानन्यत्वात्कार्यस्य । यन्मन्यसेऽन्यस्मिन्विज्ञातेऽन्यन्न ज्ञायत इति । सत्यमेवं

**स्यात् । यद्यन्यत्कारणात्कार्यं स्यान्नत्वेवमन्यत्कारणात्कार्यम् । कथं तर्हीदं लोक इदं कारणमयमस्य विकार इति । शृणु । वाचाऽऽरम्भणं वागारम्भणं वागालम्बनमित्येतत् । कोऽसौ विकारो नामधेयं नामैव नामधेयं स्वार्थे धेयप्रत्ययः । वागालम्बनमात्रं नामैव केवलं न विकारो नाम वस्त्वस्ति परमार्थतो मृत्तिकेत्येव मृत्तिकैव तु सत्यं वस्त्वस्ति ॥ ४ ॥**

**सिद्धांतीः**—आरुणी ह्मणतो; मुला ! या आदेशाचें स्वरूप कोणत्याप्रकारचें आहे तें तुला सांगतों, ऐक. व्यवहारामध्यें आपण पाहतो कीं, कुंभ ( घागर ) परळ, इत्यादि मातीच्या भांड्यांचें उपादान कारण असणारा मातीचा पिण्ड नीट समजून घेतला असतां, त्या गोळ्यापासून होणाऱ्या सर्व पदार्थांचे ज्ञान होतें. तात्पर्य मातीच्या गोळ्यापासून होणारे सर्व पदार्थ मृन्मय असतात, मातींचींच निरनिराळ्या आकाराचीं स्वरूपें असतात असें आपणास समजतें.

**पूर्व०**—मृत्पिंड ह्मणजे उपादान कारण समजलें असतां कारणाहून भिन्न असणाऱ्या कार्याचें ज्ञान कसें व्हावें ? होणार नाहीं. एक वस्तु समजली असतां दुसऱ्या वस्तुचें ज्ञान झालें, असें कसें ह्मणतां येईल ?

**सिद्धांती**—हा कांहीं दोष नव्हे. पहा कीं, कार्य हें उपादान कारणापासून भिन्न असत नाहीं. आतां तुम्ही म्हणतां कीं, एक गोष्ट समजली असतां दुसरी तद्भिन्न गोष्ट समजणें शक्य नाहीं. हें तुमचें ह्मणणें खरें झालें असतें. केव्हां ? जर कारणाहून कार्य भिन्न असतें तर, पण प्रस्तुत स्थळीं उपादान कारण आणि तज्जन्य कार्य यांत भिन्नभाव नसून तीं स्वरूपतः एकच आहेत.

**पूर्व०**—असें कसें म्हणतां ? आपण तर नेहमीं असें म्हणतों कीं, अमुक एक वस्तु कार्य आहे, विकार आहे; आणि दुसरी वस्तु तिचें कारण आहे. कार्य आणि कारण ह्या भिन्न वस्तू एकच असत्या तर कार्य आणि कारण असे शब्दच निर्माण झाले नसतें.

**सिद्धांतीः**—ऐका. विकार म्हणजे कार्य होय. आतां विकाराचें स्वरूप 'नाममात्र' आहे. नांवापलीकडे विकारांत किंवा कार्यांत कारणापेक्षां काय अधिक आहे तें सांगा बरें! नाम किंवा नांव हा वाणीच्या आश्रयानें उत्पन्न झालेला एक शब्द आहे, वाणीविकार आहे. तात्पर्य कोणताही विकार किंवा कार्य ह्मणजे वाणीनें उत्पन्न केलेलें नाममात्र होय. परमार्थदृष्टीनें विकार म्हणून वस्तु नाहीं. खरें बोलावयाचें, म्हणजे मृत्तिका हीच केवळ सत्य वस्तु आहे ॥ ४ ॥

---

## मंत्र पांचवा.

**यथा सोम्यैकेन लोहमणिना सर्वं लोहमयं विज्ञात५ स्याद्वाचाऽऽरम्भणं विकारो नामधेयं लोहमित्येव सत्यम् ॥ ५ ॥**

**अन्वय व अर्थः**—सोम्य, यथा एकेन लोहमणिना सर्वं लोहमयं विज्ञातं स्यात्; विकारः वाचारंभणं नामधेयं; लोहं इत्येव सत्यं ( या मंत्राचा अर्थ चौथ्या मंत्रासारखाच आहे. मृत्पिण्डाचे स्थानीं लोहमणी आहे, इतकें ध्यानांत ठेवलें ह्मणजे झालें ) ॥ ५ ॥

यथा सोम्यैकेन लोहमणिना सुवर्णपिण्डेन सर्वमन्यद्विकारजातं कटकमुकुटकेयूरादि विज्ञातं स्यात् । वाचाऽऽरम्भणमित्यादि समानम् ॥ ५ ॥

**सिद्धांती०**—सोम्य, एका लोहमण्याचे म्हणजे सुवर्णपिण्डाचें विज्ञान ( म्हणजे निश्चित ज्ञान ) झालें असतां कडीं, मुकुट, केयूर इत्यादि सर्व सुवर्णालंकाराचें ज्ञान होतें.

शिष्यः—बाकीचा सर्व भाष्यार्थ पूर्वीप्रमाणेंच असला पाहिजे.

**सिद्धांती०**—येथेंही एका कारणाचें ज्ञान झालें असतां त्या कारणापासून होणाऱ्या सर्व कार्यांचें ज्ञान होतें असें सिद्ध केलें आहे. कारण सत्य वस्तु आहे; आणि कार्य हा कारणाचा विकार असून वाणीनें उत्पन्न केलेला एक शब्द मात्र आहे, इत्यादि सर्व भाग चौथ्या मंत्रांत सांगितलाच आहे ॥ ५ ॥

---

## मंत्र सहावा व सातवा.

**यथा सोम्यैकेन नखनिकृन्तनेन सर्वं कार्ष्णायसं विज्ञातꣳ स्याद्वाचाऽऽरम्भणं विकारो नामधेयं कृष्णायसमित्येव सत्यमेवꣳ सोम्य स आदेशो भवतीति ॥ ६ ॥**

**न वै नूनं भगवन्तस्त एतदवेदिषुर्यद्ध्येतदवेदिष्यन्कथं मे नावक्ष्यन्निति भगवाꣳस्त्वेव मे तद्ब्रवीत्विति तथा सोम्येति होवाच ॥ ७ ॥**

**इति षष्ठाध्यायस्य प्रथमः खण्डः ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः**—यथा सोम्य, एकेन नखनिकृंतनेन सर्वं कार्ष्णायसं विज्ञातं स्यात् ( हे सोम्य ! ज्याप्रमाणें नखनिकृंतनानें सर्व कृष्ण लोखंड विज्ञात होतें ) वाचारंभणं विकारो नामधेयं; कृष्णायसं इति एव सत्यं. ( विकार ह्मणजे कार्य हें वाणीपासून उत्पन्न

होऊन केवळ शब्द मात्र असतें. कृष्णायस ही मात्र सत्य वस्तु आहे ) **एवं सौम्य, सः आदेशः भवति इति** ( याप्रमाणें हे सौम्य मी ह्मणतों तो आदेश ह्मणजे तत्त्वसिद्धांत आहे. ) याप्रमाणें पित्यानें श्वेत-केतूला सांगितलें ॥ ६ ॥

**न वै नूनं ते भगवंतः ते एतद् अवेदिषुः** (खरोखर मला वाटतें कीं, त्या भगवान् गुरूस आपण म्हणतां हें तत्वज्ञान ठाऊक नव्हतें असें असलें पाहिजे. ) **यत् ही एतद् अवेदिष्यन्, कथं मे न अवक्ष्यन्** ( कारण जर त्यांना हें ज्ञान अवगत असतें, तर तें त्यांनीं मला सांगितलें नाहीं, असें कसें झालें असतें ? ) **इति** ( असें ह्मणून श्वेतकेतु पुढें ह्मणाला ) **तु भगवान् एव मे तत् ब्रवीतु** ( ह्मणून आपण भगवंतांनीं मला ते तत्वज्ञान शिकवावें. अशी माझी प्रार्थना आहे. ) **इति** ( याप्रमाणें मुलानें बापाची प्रार्थना केली ) **' सोम्य तथा ' इति ह उवाच** ( हे सौम्य, तथास्तु असें ह्मणून पित्यानें बोलण्यास आरंभ केला ) ॥ ७ ॥

यथा सोम्यैकेन नखनिकृन्तनेनोपलक्षितेन कृष्णायसपिण्डेनेत्यर्थः। सर्वं कार्ष्णायसं कृष्णायसविकारजातं विज्ञातं स्यात् । समानमन्यत् । अनेकदृष्टान्तोपादानं दार्ष्टान्तिकानेकभेदानुगमार्थं दृढप्रतीत्यर्थं च । एवं सोम्य स आदेशो यो मयोक्तो भवतीत्युक्तवति पितर्यीतरो न वै नूनं भगवन्तः पूजावन्तो गुरवो मम ये त एतद्यद्भवदुक्तं वस्तु नावेदिषुर्न विज्ञातवन्तो नूनम् । यद्यदि ह्यवेदिष्यन्विदितवन्त एतद्वस्तु कथं मे गुणवते भक्तायानुगताय नावक्ष्यन्नोक्तवन्तस्तेनाहं मन्ये न विदितवन्त इति । अवाच्यमपि गुरोर्न्यग्भावमवादीत्पुनर्गुरुकुलं प्रति प्रेषणभयात् । अतो भगवांस्त्वेव मे मह्यं तद्वस्तु येन सर्वज्ञत्वं ज्ञातेन मे स्यात्तद्ब्रवीतु कथयत्वित्युक्तः पितोवाच तथाऽस्तु सोम्येति ॥ ६ ॥ ७ ॥

इति षष्ठाध्यायस्य प्रथमः खण्डः ॥ १ ॥

**सिद्धांती**—हे सोम्य, एक नखनिकृंतन केलें असतां अथवा एक काळ्या लोखंडाचा गोळा पाहिला असतां, जसें त्या कृष्ण लोखंडापासून होणाऱ्या सर्व कार्यांचें (म्हणजे सर्व लोखंडी पदार्थांचें) स्वरूपज्ञान स्पष्ट होतें, त्याप्रमाणेंच एक आणि अद्वितीय असणाऱ्या ब्रह्माचें ज्ञानविज्ञान झालें असतां त्या ब्रह्माच्या अधिष्ठानावर दृश्य भास्य

होणाऱ्या सर्व कार्यांचें स्वरूपज्ञान होतें, असा चौथ्या मंत्राप्रमाणेंच या सहाव्या मंत्राचा स्पष्ट अर्थ आहे. येथें श्रुतीनें अनेक दृष्टांतांचा स्वीकार केला आहे तो ज्या ब्रह्माच्या संबंधानें हे दृष्टांत दिले आहेत, त्यामध्यें दृश्य भास्य मात्र होणारे अनेक भेद विज्ञात व्हावे; आणि मुख्य सिद्धांताची दृढ प्रतीति व्हावी, त्याचा दृढ प्रत्यय यावा, यांसाठीं केला आहे. हे सोम्य, याप्रमाणें परब्रह्माचें स्वरूप आविष्कृत करणारा जो आदेश ( सिद्धांती ) आहे म्हणून सांगितलें, त्याचें हें असें स्वरूप आहे. हें पित्याचें भाषण ऐकून त्याचा पुत्र श्वेतकेतु म्हणाला. ' बाबा, मी खरेंच सांगतों कीं, माझ्या त्या पूज्य गुरूंना आपण ज्या सिद्धांतरूपी वस्तूचा उल्लेख केला ती वस्तु आणि तिचें ज्ञान मुळींच विदित नव्हतीं असलीं पाहिजेत. कारण जर त्यांना आपण म्हणतां, त्या वस्तूचें ज्ञान असतें, तर माझ्यासारख्या गुणी, भक्तिवान् आणि गुरुनिष्ठ शिष्याला त्यांनीं सांगितलें नसतें असें व्हावयाचें नाहीं. पण ज्याअर्थी माझ्या गुरूंनीं मला त्या वस्तूचें ज्ञान दिलें नाहीं, त्याअर्थी ती वस्तु त्यांस माहितच नव्हती. असें मला वाटतें. शिष्यानें आपल्या गुरूचा कमीपणा सांगूं नये, गुरुद्रोह करूं नये, असा नियम असतांही तो मोडून त्यांचा कमीपणा सांगितला. याचा भाव असा दिसतो कीं, पित्यानें आपणास पुनः गुरुकुलाकडे पाठवूं नये. बाप आपल्यास पुनः गुरुकुलाकडे पाठविल, अशी भीति श्वेतकेतुला होती, म्हणून त्यानें अवाच्य अशी गुरुनिंदा देखील केली. श्वेतकेतु पुढें म्हणालाः—हे भगवन् ! आपणच मला ती वस्तु ज्ञातविज्ञात होईल असें करा. हें ज्ञान-विज्ञान जाहलें म्हणजे मला सर्वज्ञत्व प्राप्त होईल. म्हणून कृपा करून आपण मला तो आदेश समजाऊन द्या. मुलाची ही विनंति ऐकून पिता म्हणाला, ' तथास्तु ' ( ठीक आहे ) मी सांगतों. पुढील खंडांत सर्वज्ञत्व देणाऱ्या या आदेशाचा उल्लेख झाला आहे ॥ ६॥७ ॥

सहाव्या अध्यायाचा खंड १ ला समाप्त.

---

## अध्याय ६ वा खंड २ रा.

### मंत्र पहिला.

**सदेव सोम्येदमग्र आसीदेकमेवाद्वितीयम् । तद्धैक आहुरसदेवेदमग्र आसीदेकमेवाद्वितीयं तस्मादसतः सज्जायत ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—सोम्य, अग्रे इदं सत् एव आसीत्; एकं एव अद्वितीयम्** ( हे सौम्य, प्रथमारंभीं हें सर्व सतच होतें. हें सत्

एक आणि अद्वितीय आहे ) तत् तें एके आहुः ( यासंबंधानें कोणी कोणी असें ह्मणतात ) अग्रे इदं असत् एव आसीत्, एकं एव अद्वितीयम्; तस्मात् असतः सत् जायत—अजायत—( हें सर्व प्रथमारंभीं एक आणि अद्वितीय असें असत् होतें, त्या असतापासूनच सताची उत्पत्ति झाली आहे. ) ॥ १ ॥

सदेव सदित्यस्तितामात्रं वस्तु सूक्ष्मं निर्विशेषं सर्वगतमेकं निरञ्जनं निरवयवं विज्ञानं यदवगम्यते सर्ववेदान्तेभ्यः । एवशब्दोऽवधारणार्थः । किं तदवध्रियत इत्याह । इदं जगन्नामरूपक्रियावद्विकृतमुपलभ्यते यत्तत्सदेवाऽऽसीदित्यासीच्छब्देन संबध्यते । कदा सदेवेदमासीदित्युच्यते । अग्रे जगतः प्रागुत्पत्तेः ।

सिद्धांती—सत् म्हणजे आस्तित्व मात्र असणारी वस्तु होय. ही अत्यंत सूक्ष्म, निर्विशेष ( जिला गुण नाहीं म्हणून कोणताही विशेष नाही, जी सर्वसामान्य आहे ), सर्वगामी, एक, निरंजन म्हणजे निर्मल, निरवयव ( जिला एकही अवयव नाहीं अशी ), आणि ज्ञानीविज्ञानरूप आहे. ही वस्तु सर्व वेदान्तशास्त्राच्या दृढ अभ्यासानें मात्र समजण्यासारखी आहे; व समजते. सर्व वेदान्तशास्त्र ह्या वस्तूच्या अस्तित्वाला प्रमाण आहे. मंत्रांत 'एव' हें पद अवधारणार्थी आहे. अवधारण कोणतें तें पहा. हें म्हणजे हें दृश्य विश्व होय. हें विश्व नाम, रूप आणि क्रिया यांनीं घटित झालेलें आहे. हें विकार्य आणि विकारी स्वरूपानें आपल्यास दृश्य होतें. जें हें नामरूपक्रियात्मक विकारी जगत् आपणा जीवांस उपलब्ध होतें हें सद्रूपच होतें, असा "आसीत्" या शब्दानें संबंध दाखविला आहे. हें जगत् केव्हां सद्रूप मात्र होतें, या प्रश्नाला श्रुति उत्तर देते कीं, प्रथमारंभीं, जगाची उत्पत्ति होण्यापूर्वीं, हें सर्व दृश्य भास्य विश्व 'सत् एव' सद्रूप मात्र होतें.

किं नेदानीमिदं सद्येनाग्र आसीदिति विशेष्यते । न । कथं तर्हि विशेषणम् । इदानीमपीदं सदेव किंतु नामरूपविशेषणवदिदंशब्दबुद्धिविषयं चेतीदं च भवति । प्रागुत्पत्तेस्त्वग्रे केवलसच्छब्दबुद्धिमात्रगम्यमेवेति सदेवेदमग्र आसीदित्यवधार्यते । न हि प्रागुत्पत्तेर्नामवद्रूपवद्वेदमिति ग्रहीतुं शक्यं वस्तु सुषुप्तकाल इव। यथा सुषुप्तादुत्थितः सत्त्वमात्रमवगच्छति सुषुप्ते सन्मात्रमेव केवलं वस्त्विति तथा प्रागुत्पत्तेरित्यभिप्रायः।

सिद्धांती०—आतां कोणी असें ह्मणेल कीं प्रस्तुत काळीं हें जग सद्रूप नाहीं असें दाखविण्यासाठीं 'पूर्वीं तें सद्रूप होतें' असें श्रुतीनें विशेष स्वरूपानें वर्णन केलें आहे

काय ? ही शंका बरोबर नाहीं. मग या विशेषणांचें स्वारस्य काय, असें विचाराल तर सांगतों ऐका. आतां सुद्धां हें जगत् सद्रूपच आहे. परंतु आतां हें जगत् नामरूपादिकांनीं विशिष्ट झालें आहे. 'हें' या शब्दानें प्रकट होऊन तें 'इदं' शब्दरूपानें बुद्धीचा विषय झालें आहे. आणि म्हणून त्याला 'दृश्य जगत् व बुद्धीला विषय होणारें हें जगत्' अशीं नांवें प्राप्त झालीं आहेत; परंतु अग्रे म्हणजे उत्पत्तीच्या पूर्वीं केवळ 'सत्' या शब्दानें व तद्बुद्धीनें मात्र अवगत होणारें इतकाच अर्थ 'पूर्वीं हें जग सद्रूपी मात्र होतें' या वाक्यानें समजून घ्यावयाचा आहे. कारण उघड आहे कीं, जगाच्या उत्पत्तीच्या आधीं हें नामवंत आहे, रूपवंत आहे असें ज्ञान होणें शक्यच नव्हतें. गाढ निद्रा लागली असतां ज्याप्रमाणें सर्व नामरूपाचा लय होतो, त्यावेळीं त्यांचें ज्ञान होत नाहीं; त्याप्रमाणेंच उत्पत्तीच्या पूर्वीं दुसरें कांहीं नसतें म्हणून नामरूपाचें ज्ञान होणें अशक्य होतें. तसेंच गाढ निद्रेंतून जागा झालेला पुरुष निद्रेंत सत्तेचें मात्र भान ग्रहण करणारा असतो; आणि त्या गाढ निद्रेमध्यें एक केवळ सद्वस्तु मात्र होती दुसरें कांहीं नव्हतें असें त्याला स्मरण होतें; त्याप्रमाणेच सृष्टीच्या उत्पत्तीपूर्वीची व्यवस्था होती, असें श्रुति सांगत आहे.*

यथेदमुच्यते लोके पूर्वाह्णे घटादि सिसृक्षुणा कुलालेन मृत्पिण्डं प्रसारितमुपलभ्य ग्रामान्तरं गत्वा प्रत्यागतोऽपराह्णे तत्रैव घटशरावाद्यनेकभेदभिन्नं कार्यमुपलभ्य मृदेवेदं घटशरावादि केवलं पूर्वाह्ण आसीदिति तथेहाप्युच्यते सदेवेदमग्र आसीदिति । एकमेवेति । स्वकार्यपतितमन्यन्नास्तीत्येकमेवेत्युच्यते । अद्वितीयमिति । मृद्व्यतिरेकेण मृदो यथाऽन्यद्घटाद्याकारेण परिणमयितृकुलालादिनिमित्तकारणं दृष्टं तथा सद्व्यतिरेकेण सतः सहकारिकारणं द्वितीयं वस्त्वन्तरं प्राप्तं प्रतिषिध्यतेऽद्वितीयमिति नास्य द्वितीयं वस्त्वन्तरं विद्यत

---

* तात्पर्य हें ब्रह्मांड उत्पन्न होण्याच्या पूर्वीं एक आणि अद्वितीय अशी सद्वस्तु मात्र होती त्यावेळीं दृश्य भास्य नामरूपादि कोणतीही सोपाधिक वस्तु अस्तित्वांत नव्हती, आतांही हें ब्रह्मांड सद्रूप नाहीं असें नाहीं; पण आतां पाहणारा, पाहणें, आणि पाहण्याची वस्तु असा त्रिपूटीचा प्रकार झाल्यामुळें 'हें ब्रह्मांड' असे शब्द उच्चारल्याबरोबर नाम, रूप, क्रिया, विकार इत्यादि उपाधींसह ह्या ब्रह्मांडाचा आभास होतो. पूर्वीं असा आभास होत नव्हता. म्हणून सद्रूपी मात्र हें सर्व होतें, हें सर्वांच्या लक्षांत यावें म्हणून श्रुतीनें 'अग्रे' आणि 'आसीत्' अशी कालवाचक विशेषणें उपयोजून 'एव' शब्दाचें अवधारणरहस्य सांगितलें आहे.

इत्यद्वितीयम् । ननु वैशेषिकपक्षेऽपि सत्सामानाधिकरण्यं सर्वस्योपपद्यते । द्रव्यगुणादिषु सच्छब्दबुद्ध्यनुवृत्तेः । सद्द्रव्यं सन्गुणः सत्कर्मेत्यादिदर्शनात् । सत्यमेवं स्यादिदानीं प्रागुत्पत्तेस्तु नैवेदं कार्यं सदेवाऽऽसीदित्यभ्युपगम्यते वैशेषिकैः प्रागुत्पत्तेः कार्यस्यासत्त्वाभ्युपगमात् । न चैकमेव सदद्वितीयं प्रागुत्पत्तेरिच्छन्ति ।

तस्माद्वैशेषिकपरिकल्पितात्सतोऽन्यत्कारणमिदं सदुच्यते मृदादि-
दृष्टान्तेभ्यः ।

सिद्धांती:—व्यवहारामध्येंही आपण असेंच बोलतों पहा. एखाद्या घटादि भांडीं निर्माण करणाऱ्या कुलालानें ( कुंभारानें ) मातीचे गोळे अथवा माती पसरलेली आहे असें पाहून कोणी पुरुष दुसऱ्या गांवीं जातो; आणि दुसरे दिवशीं परत आल्यावर त्याला तेथेंच घागरी मडकीं परळ इत्यादि प्रकारचीं अनेक आणि भिन्न भिन्न कार्यें म्हणजे मातीचीं भांडीं दिसतात. असें पाहून तो काय म्हणतो तर " पूर्व दिवशीं हे घट शरावादि सकल मृत्तीका मात्र होतें. " तसेंच येथेंही श्रुति म्हणत आहे कीं, विश्वोत्पत्तीपूर्वीं हें सर्व सत् मात्र होतें. श्रुति पुढें म्हणते: तें एकच एक होतें; म्हणजे स्वत:-पासून उत्पन्न होणाऱ्या कार्यांच्या यादींतील कोणतीही वस्तु त्या वेळीं नव्हती. म्हणजे त्या वेळीं दुसरें कांहीं एक नव्हतें. ही वस्तु अद्वितीय आहे, असें श्रुतीचें सांगणें आहे. कारण असें आहे की, व्यवहारांत मृत्तिकेशिवाय असणारीं व मृत्तिकेला घटादि आकार देणारीं कुलाल, चक्र, दंड इत्यादि दुसरीं निमित्त कारणें असतात असें दिसतें. त्याप्रमाणें सताहून व्यतिरिक्त असणारें, सताचें साह्य करणारें दुसरें कांहीं सहकारी कारण असलें पाहिजे. सतासह जगत् कार्य उत्पन्न करणारी दुसरी कोणती तरी वस्तु असली पाहिजे, अशी शंका येईल. तिचें निराकरण दुसरी वस्तु नव्हती, सद्वस्तु अद्वितीय होती, असें सांगून केलें आहे. याप्रमाणें एक आणि अद्वितीयस्वरूपी सताचें स्वरूप सांगितलें. आतां वैशेषिक पक्षाचा अभिमानी असें ह्मणेल कीं, वैशेषिक दर्शनांतही सर्वत्र ' सत् ' हें इतर वस्तूंशीं समानाधिकरण आहे, असें प्रतिपादन करितें; ह्मणून वेदांतपद्धतींत विशेष तें काय आहे ? द्रव्य, गुण, कर्म इत्यादिकांच्या ठिकाणींहीं सत् शब्दाची व सत् ज्ञानाची अनुवृत्ति होत असते. सद्द्रव्य (असणारें द्रव्य,) असणारा गुण, असणारें कर्म, इत्यादि प्रकारांनीं आपण बोलत असतों. तात्पर्य, येथें, द्रव्य किंवा गुण किंवा कर्म असतें, तेथेंच अस्तित्वही असतें; ह्मणून वैशेषिक दर्शन आणि त्यांतील सिद्धांत वेदांत्यास ग्राह्य असले पाहिजेत. याचें उत्तर असें: तुह्मी ह्मणतां हें आतां प्रस्तुत काळीं मात्र खरें आहे, असें ह्मणतां येईल; परंतु उत्पत्तीच्या पूर्वीं हें जें कार्यरूपी विश्व आपल्यास दिसत आहे, आणि आतां तुमच्या ह्मणण्याप्रमाणें सद्रूपी आहे, तें विश्व उत्पत्तीच्या पूर्वीं सद्रूप होतें, असें तुमचे वैशेषिक दर्शनकार ( कणादमुनी ) ह्मणत नाहींत. त्यांचा तर सिद्धांत असा आहे कीं, उत्पत्तीच्या पूर्वीं प्रत्येक कार्य अभावरूपानें, ह्मणजे असद्रूपानें असतें. अर्थात् वेदांती ह्मणतात त्याप्रमाणें " उत्पत्तीच्या पूर्वीं एक आणि अद्वितीय सत् होय " हा सिद्धांत कणादांस मान्य नाहीं, ह्मणून वैशेषिकांनीं ज्या सताची कल्पना धारण केली आहे, त्याहून निराळ्या स्वरूपाचें, भिन्न कारणरूपी असणारें हें श्रुतीचें ' सत् ' आहे, असें तिनें मृत्तिका वगैरेचे दृष्टांत देऊन सिद्ध केलें आहे.

( व्यवहारांत मृत्तिका सुवर्ण इत्यादि नित्य सत्य असणाऱ्या वस्तू असतात. उपादान कारण सत्य आणि नामरूपात्मक कार्य आभासिक असतें असें श्रुतीस सांगावयाचें आहे. मृदादि कारण घटादि कार्यापासून केव्हांही विभक्त होत नाहीं, कार्याच्या आधीं, कार्य विद्यमान असतां आणि कार्य नाशानंतर विद्यमान असतें. वैशेषिकपंथाची ही प्रक्रिया नाहीं हा वेदांत दर्शनांत आणि वैशेषिक दर्शनांत अति महत्वाचा भेद आहे )

तत्तत्र हैतस्मिन्प्रागुत्पत्तेर्वस्तुनिरूपण एके वैनाशिका आहुर्वस्तु निरूपयन्तोऽसत्सद्भावमात्रं प्रागुत्पत्तेरिदं जगदेकमेवाद्वितीयमासीदिति। सद्भावमात्रं हि प्रागुत्पत्तेस्तत्त्वं कल्पयन्ति बौद्धाः। न तु सत्प्रतिद्वंद्वि वस्त्वन्तरमिच्छन्ति । यथा सच्चासदिति गृह्यमाणं यथाभूतं तद्विपरीतं तत्त्वं भवतीति नैयायिकाः । ननु सद्भावमात्रं प्रागुत्पत्तेश्चेदभिप्रेतं वैनाशिकैः । कथं प्रागुत्पत्तेरिदमासीदसदेकमेवाद्वितीयं चेति कालसंबन्धः संख्यासंबन्धोऽद्वितीयत्वं चोच्यते तैः । बाढं न युक्तं तेषां भावाभावमात्रमभ्युपगच्छताम् । असत्त्वमात्राभ्युपगमोऽप्ययुक्त एवाभ्युपगन्तुरनभ्युपगमानुपपत्तेः । इदानीमभ्युपगन्ताऽभ्युपगम्यते न प्रागुत्पत्तेरिति चेत् । न । प्रागुत्पत्तेः सद्भावस्य प्रमाणाभावात् । प्रागुत्पत्तेरसदेवेतिकल्पनानुपपत्तिः ।

सिद्धांतीः—मंत्रांतील 'तत् ह एके आहुः' या वाक्यांत 'तत्' या शब्दाचा तेथें हा अर्थ आहे. त्या ह्या प्राग उत्पत्तीच्या वेळीं ( सृष्टीच्या पूर्वीं ) कोणती वस्तु होती, त्याचा निर्णय करितांना 'एके' म्हणजे वैनाशिक बुद्ध हे म्हणतात कीं, सृष्टयुत्पत्तीच्या पूर्वीं हें जगत् असत् म्हणजे सताचा अभाव असणारें मात्र असून तें एकच आणि अद्वितीय असें होतें. या बौद्धांची अशी कल्पना आहे कीं, उत्पत्तीपूर्वकाळीं जें एक आणि अद्वितीय तत्त्व होतें तें सताचा अभाव मात्र होतें. ज्याप्रमाणें कणाद सत्चेंच प्रतियोगी असणारें असत् अशी दुसरी वस्तु कल्पितात, ती ही कल्पना बौद्धांस मान्य नाहीं. वस्तु यथार्थरूपानें दिसते, तिला सत् असें ह्मणावें आणि सताच्या विपरीत असणाऱ्या वस्तूला असत् ह्मणावें, अशी कणादादि नैयायिकांची रीति आहे. सत् आणि असत् अशा दोन वस्तूंची कल्पना नैय्यायिक करितात. बौद्धांचा तसा प्रकार नाहीं. असत् ह्मणजे सद्वस्तूचा अभाव हा त्यांचा अर्थ आहे. *

---

*( तात्पर्य असें आहे कीं, जें दृश्य भास्य सत् आहे. त्याच्या शुद्ध अभावापासून या दृश्य भास्याची उत्पत्ति झाली, असें वैनाशिकांचें ह्मणणें आहे. पदार्थांच्या अभावा-

आतां अशी शंका येईल की, वैनाशिकांच्या समजुतीप्रमाणें प्रागुत्पत्तीचे वेळीं सताचा अभाव मात्र जर होता तर ‘ प्रागुत्पत्तीचे समयीं हें सर्व असत् असून तें एक आणि अद्वितीय होतें असें कसें ह्मणतां येईल. ’ कारण अवतरणांत असलेल्या वाक्यांत काल ( वेळ ) संख्या आणि अद्वितीयत्व ह्या तीन वास्तविक गोष्टी आणि त्यांचे संबंध हे ग्रहीत केलेले दिसतात.

( ‘ एक आणि अद्वितीय सताचा अभाव उत्पत्तीपूर्वी होता. ’ या वाक्यावरून कालाच्या अस्तित्वाचा, ‘ एक ’ ह्या संख्येच्या अस्तित्वाचा, आणि अद्वितीयाच्या अस्तित्वाचा बोध होतो. या सर्व गोष्टी सद्रूपी आहेत, सताचा अभाव मात्र असतो असें ह्मणणाऱ्या पुरुषाला कालाचें सत्त्व, संख्येचें सत्त्व आणि अद्वितीयत्वाचें सत्त्व अशीं गृहीत धरीतां येणार नाहींत, असा वरील शंकेचा तात्पर्यार्थ आहे )

शंका वास्तविक आहे. सताचा अभाव मात्र गृहीत करणाऱ्या वैनाशिकांस कालादिकांचें अस्तित्व गृहीत करतां येत नाहीं. इतकेंच नव्हे; तर सताचा अभाव मात्र गृहीत करणें सुद्धां अयोग्य आहे. कारण या अभावाचें ग्रहण करणारा तरी अवश्य हवा असतो ! तोही या वैनाशिकांनीं गृहीत केलेला नाहीं. कोणी ह्मणेल कीं, या अभावाचा द्रष्टा किंवा ग्राहक आतां विद्यमान आहे, असे वैनाशिक पक्ष ह्मणतो. उत्पत्तीच्या पूर्वी त्याचें ग्रहणच करीत नाहीं. असें ह्मटलें तरी वरील शंकेचें समाधान होत नाहीं, कारण प्रागुत्पत्तीच्या पूर्वी सताचा अभाव होता, असें म्हणण्याला ग्राहकाच्या अभावीं प्रमाणच असत नाहीं. तात्पर्य उत्पत्तीच्या पूर्वी असत् म्हणजे सताचा अभाव मात्र होता, ही कल्पना उपपन्न होत नाहीं.

ननु कथं वस्त्वाकृतेः शब्दार्थत्वेऽसदेकमेवाद्वितीयमितिपदार्थवाक्यार्थोपपत्तिस्तदनुपपत्तौ चेदं वाक्यमप्रमाणं प्रसज्येतेति चेति । नैष दोषः । सद्ग्रहणनिवृत्तिपरत्वाद्वाक्यस्य । सदित्ययं तावच्छब्दः सदाकृतिवाचकः। एकमेवाद्वितीयमित्येतौ च सच्छब्देन समानाधिकरणौ । तथेदमासीदिति च । तत्र नञ्सद्वाक्ये प्रयुक्तः सद्वाक्यमेवावलम्ब्य सद्वाक्यार्थविषयां बुद्धिं सदेकमेवाद्वितीयमिदमासी-

---

पासून पदार्थांची उत्पत्ति होते, असें ते ह्मणतात. नैय्यायिक ह्मणतात कीं, असत् ही अस्तित्वांत असणारी वस्तू आहे; आणि तिच्यापासून सताची उत्पत्ति होते. असा बौद्ध आणि नैय्यायिक या दोन पक्षांत असत् शब्दाच्या अर्थासंबंधानें विलक्षण भेद आहे. अश्वाच्या शुद्ध अभावापासून अश्व उत्पन्न होतो, असा विलक्षण सिद्धांत वैनाशिक पक्ष करणार आणि नसणारा घोडा कांहीं कारणांनीं अस्तित्वांत येतो, असें कणादादि नैय्यायिक ह्मणतात. वेदान्तमतानें या दोन्ही कल्पना असमंजस आहेत. )

दित्येवंलक्षणां ततः सद्वाक्यार्थान्निवर्तयत्यश्वारूढ इवाश्वालम्बनोऽश्वं तदभिमुखविषयान्निवर्तयति तद्वत् । न तु पुनः सदभावमेवाभिधत्ते । अतः पुरुषस्य विपरीतग्रहणनिवृत्त्यर्थपरमिदमसदेवेत्यादि वाक्यं प्रयुज्यते । दर्शयित्वा हि विपरीतग्रहणं ततो निवर्तयितुं शक्यत इत्यर्थवत्त्वादसदादिवाक्यस्य श्रौतत्वं प्रामाण्यं च सिद्धमित्यदोषः । तस्मादसतः सर्वाभावरूपात्सद्विद्यमानमजायत समुत्पन्नम् । अडभावश्छान्दसः ॥ १ ॥

सिद्धांती:—आणखी अशी एक शंका येतें कीं वस्तूची आकृति शब्दार्थमय असल्यामुळें 'एक आणि अद्वितीय असत् मात्र होतें' या वाक्यांतील पदांच्या अर्थांची व वाक्याच्या अर्थांची उपपत्ति लागत नाहीं. याप्रमाणें वाक्य अनुपपन्न म्हणजे असमंजस होतें; आणि म्हणून हे श्रुतिवाक्य प्रमाणभूत होत नाहीं. अशी ही शंका बरोबर नाहीं, कारण वाक्याचें तात्पर्य 'सत्' ग्रहणाच्या निवृत्तिपर आहे; म्हणजे असें. सत् हा शब्द अस्तित्वाच्या आकृतीचा वाचक आहे. अस्तित्व सांगणारा हा शब्द आहे. मंत्रांतील एक आणि अद्वितीय हे दोन्ही शब्द सत् शब्दाशीं समानाधिकरण आहेत. तसेंच 'हें पूर्वी होतें.' हे शब्दही सत् शब्दाचे अनुयायी आहेत.

आतां या सद्वाक्याशीं 'न' हा नकारार्थी शब्द उपयोजिला म्हणजे तो सद्वाक्याचा मात्र आश्रय घेऊन, सद्वाक्याच्या अर्थाला विषयकरणारी जी बुद्धि,–(एक आणि अद्वितीय सत् मात्र हें सर्व सृष्ट्युत्पत्तीच्या पूर्वीं होतें असा अर्थ ग्रहण करणारी) जी बुद्धि तिला हा आपण योजिलेला-'न'-शब्द सद्वाक्याच्या अर्थापासून निवृत्त करतो. अश्वाचा आधार घेऊन अश्वावर आरूढ झालेला अश्वपति ज्याप्रमाणें अश्वापुढें असणाऱ्या विषयांपासून अश्वाला निवृत्त करितो त्याप्रमाणें मंत्रांतील 'अ' हा उपसर्ग सद्वाक्याच्या अर्थापासून बुद्धीला निवृत्त करितो.*

असत् म्हणजे सत्तेचा अभाव मात्र होय असें सांगण्याचें तात्पर्य नाहीं. म्हणून सृष्ट्युत्पत्तीपूर्वी असत्मात्र इत्यादि वाक्याचें तात्पर्य असें आहे कीं, पुरुषाला विपरीत अर्थ ग्रहण करण्याची जी बुद्धि असते तिला त्या विपरीत ग्रहणापासून निवृत्त करावें हें आहे. विपरीत ग्रहण कोणत्या स्वरूपाचें असतें हें दाखविल्यानंतर त्या ग्रहणापासून बुद्धीला सहज निवृत्त करितां येते, असे जाणून श्रुतीनें मंत्रांतील 'असदेव' इत्यादि

---

* (एक आणि अद्वितीय असें हें (दृश्यभास्य विश्व) सृष्टीच्या उत्पत्तीपूर्वीं सत्रूपी होतें या वाक्यांतील प्रत्येक शब्द आणि त्याचा अर्थ व सर्व वाक्याचा अर्थ हे दोन्ही उपपन्न आहेत. तेव्हां या वाक्याविषयीं शंका येणें शक्यच नाहीं.)

सृष्टीपूर्वीं एक आणि अद्वितीय सत् होतें, या वाक्यापासून आपली बुद्धि 'अ' हा उपसर्ग लागला म्हणजे निवृत्त होते, असें समजावें.

वाक्याची उपयोजना केली आहे. आणि म्हणूनच तिचें श्रौतत्व सप्रमाण आहे. शंकाकारानें काढलेला दोष येथें उत्पन्न होत नाहीं; म्हणून सर्वाभावरूपानें विद्यमान असणाऱ्या असतापासून विद्यमान असणारें हें सत् उत्पन्न झालें आहे, असें श्रुति म्हणते. मंत्रात ' अजायत ' असें रूप नसून 'जायत' असें रूप उपयोजिलें आहे तें छांदस किंवा आर्ष होय ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**कुतस्तु खलु सोम्यैवꣳ स्यादिति होवाच कथमसतः सज्जायेतेति । सत्त्वेव सोम्येदमग्र आसीदेकमेवाद्वितीयम् ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थ**--**कुतः तु खलु सोम्य, एवं स्यात् इति ह उवाच** ( हे सौम्य, परंतु याप्रमाणें उत्पत्ति कशी होऊं शकेल असें दाखविण्याकरितां पुन्हा आरुणी ह्मणाला) **सत् असतः कथं जायेत इति** ( असतापासून सत् कसें उत्पन्न होईल ? ) **तु सत् एव इदं अग्रे एकं एव अद्वितीयं आसीत्, सोम्य** ( परंतु हे सौम्य, हें सर्व प्रथमतः एकच आणि अद्वितीय सत् मात्र होतें ) ॥ २ ॥

तदेतद्विपरीतग्रहणं महावैनाशिकपक्षं दर्शयित्वा प्रतिषेधति । कुतस्तु प्रमाणात्खलु हे सोम्यैवं स्यादसतः सज्जायेतेत्येवं कुतो भवेन्न कुतश्चित्प्रमाणादेवं संभवतीत्यर्थः । यदपि बीजोपमर्देऽङ्कुरो जायमानो दृष्टोऽभावादेवेति तदप्यभ्युपगमविरुद्धं तेषाम् । कथम् । ये तावद्बीजावयवा बीजसंस्थानविशिष्टास्तेऽङ्कुरेऽप्यनुवर्तन्त एव न तेषामुपमर्दोऽङ्कुरजन्मनि । यत्पुनर्बीजाकारसंस्थानं तद्बीजावयवव्यतिरेकेण वस्तुभूतं न वैनाशिकैरभ्युपगम्यते यदङ्कुरजन्मन्युपमृद्येत । अथ तदस्त्यवयवव्यतिरिक्तं वस्तुभूतं तथा च सत्यभ्युपगमविरोधः । अथ संवृत्याऽभ्युपगतं बीजसंस्थानरूपमुपमृद्यत इति चेत् । केयं संवृतिर्नाम किमसावभाव उत भाव इति । यद्यभावो दृष्टान्ताभावः । अथ भावस्तथाऽपि नाभावादङ्कुरोत्पत्तिर्बीजावयवेभ्यो ह्यङ्कुरोत्पत्तिः ।

**सिद्धांतीः**---मागच्या मंत्रांत जें हें विपरीत ग्रहण सांगितलें, तें महावैनाशिक पक्षाचें म्हणणें आहे, त्या पक्षाचें म्हणणें स्पष्टपणानें सांगून त्याचा निषेध आतां श्रुति करीत आहे.

श्रुति म्हणते असें कोणतें प्रमाण आहे कीं, जें असतापासून सताची उत्पत्ति होते, असें सिद्ध करितें ? नाहीं. असें कोणतें ही प्रमाण नाहीं कीं, तें असतापासून सताची उत्पत्ति सिद्ध करील. हें वरील मंत्राचें तात्पर्य आहे. आतां यद्यपि बीजाचा नाश होऊन अंकुराची उत्पत्ति होतांना दिसते आणि याप्रमाणें अभावापासूनच भावाची उत्पत्ति होते असें म्हणतां येतें, तेंही वैनाशिक प्रश्नाचें जे अभ्युपगम ( गृहीत घेतलेले सिद्धांत ) आहेत, त्यांच्या विरुद्ध आहे, पहा. प्रत्येक बीजाच्या पिंडाचे जे विशेष अवयव असतात ते बीजावयवच अंकुरामध्यें ही अनुवृत्त होतात. बीजांचे अवयव अंकुरामध्यें प्रतीत होतात म्हणून अंकुराचा जन्म होत असतां या अवयवांचा उपमर्द म्हणजे विनाश होतो असें त्यांस म्हणतां येत नाहीं. आतां वैनाशिकांस हें केव्हांही मान्य नाहीं कीं, बाजी-काराचा स्वयंभु पिंड असतो. बीजावयव विद्यमान नसले तरी तो वस्तुभूत असतो अथवा बीजावयवाशिवाय बीजाकाराचा पिंड असूं शकतो, असें वैनाशिक केव्हांही म्हणत नाहींत. तात्पर्य, अंकुराचा जन्म होत असतां अवयवव्यतिरिक्त नसणारे बीज ( बीजपिंड ) नष्ट होतें, असें यापक्षाचें म्हणणें नाहीं. अवयवाशिवाय बीजपिंड असूं शकतो, असें कोणी म्हटलेंच तर तें वैनाशिकांच्या प्रक्रियेच्या विरुद्ध आहे. शिवाय संवृत्तीनें म्हणजे तत्त्व स्वरूपावर आवरण घालणाऱ्या लौकिकबुद्धीनें गृहीत केलेलें बीजसंस्थान अभावरूप असेल किंवा भावरूप तरी असेल. ही लौकिकबुद्धि अभावरूप आहे, असें म्हणाल तर अभावापासून भावोत्पत्ति होते, असें सिद्ध करणारा दृष्टांत उपलब्धच नाहीं. तसेंच ती बुद्धि भावरूपी आहे, असें म्हटलें तर तुम्हांस अभावापसून अंकुराची उत्पत्ती होते, असें म्हणतां येत नाहीं, तात्पर्य बीजांच्या अवयवांपासून अंकुराची उत्पत्ति होते हें स्पष्ट आहे.

( असतापासून सताची उत्पत्ति होणें शक्य नाहीं, हें बीजांकुराचा दृष्टांत घेऊन येथें सिद्ध केलें आहे. बीज नष्ट होतानां दिसतें खरें; परंतु बीजाचे अवयव ( घटक ) अंकुरांत विद्यमान असतात, तेव्हां बीजाच्या अवयवांपासून अंकुराची उत्पत्ति होते, असें म्हटलें पाहिजे. अवयवाशिवाय बीजाचा पिंड सिद्ध होणें शक्य नाहीं. एवंच बीजाच्या अवयवांमधें स्थित्यंतर होऊन अंकुराची उत्पत्ति होते असें ठरतें. बीजाचें नष्ट होणें म्हणजे त्यांत असणाऱ्या अवयवांचे स्थित्यंतर होणें होय. )

अवयवा अप्युपमृद्यन्त इति चेत् । न। तदवयवेषु तुल्यत्वात् । यथा वैनाशिकानां बीजसंस्थानरूपोऽवयवो नास्ति तथाऽवयवा अपीति तेषामप्युपमर्दानुपपत्तिः। बीजावयवानामपि सूक्ष्मावयवास्तदवयवानामप्यन्ये सूक्ष्मतरावयवा इत्येवं प्रसङ्गस्यानिवृत्तेः सर्वत्रोपमर्दानुपपत्तिः। सद्बुद्ध्यनुवृत्तेः सत्त्वानिवृत्तिश्चेति सद्वादिनां सत एव सदुत्पत्तिः सेत्स्यति । न त्वसद्वादिनां दृष्टान्तोऽ-

**स्त्यसतः सदुत्पत्तेः । मृत्पिण्डाद्घटोत्पत्तिर्दृश्यते सद्वादिनां तद्भावे भावात्तदभावे चाभावात् ।**

**सिद्धांती:**—अवयवच स्वरूपतः नाहींसे होतात, असें कोणी म्हणेल तर तेंही योग्य नाहीं. कारण वैनाशिकपक्षाच्या मताप्रमाणें अवयवघटित बीजरूपी पिंड विद्यमान असत नाहीं, त्याचप्रमाणें अवयवपिंडहि असणें त्यांच्या मताप्रमाणें अशक्य आहे. अर्थात् प्रत्येक अवयवाला जर पिंडत्वच असणें अशक्य आहे, तर त्याचा नाश होणेंही अशक्य आहे. नसलेल्या वस्तूचा नाश तो कसा व्हावयाचा ? बीजाच्या अवयवाचे सूक्ष्म अवयव आहेत, असें गृहीत धरून पहिले अवयव नष्ट होतात, असें म्हटलें तरी त्या दुसऱ्या सूक्ष्म अवयवाचे तिसरे सूक्ष्मतर अवयव, चवथे सूक्ष्मतम अवयव, अशी न संपणारी मालिका तयार होऊन, कोणत्यातरी अवयवांचा नाश केव्हांही होत नाहीं हें सिद्ध होईल. )

( मागच्या भाष्यांत बीजाचा नाश होतांना अवयवांचा मात्र नाश होत नाहीं, असें आपल्यास दिसलें. येथील विचारसरणींत अवयवांचा नाश होतो, अशी कल्पना केली आहे. वैनाशिक पक्षांत पिंडाची कल्पना नाहीं. अवयवाचा नाश होतो, असें म्हटल्यानें प्रत्येक अवयवपिंडाचा नाश होतो, असें म्हटल्यासारखें होतें; आणि पुनः त्याचे व पुनः त्याचे अवयव इत्यादिप्रकारची अनवस्था प्राप्त होऊन कोणत्या तरी प्रसंगी मूळ अवयवांचा नाश होत नाहीं; असें म्हणणें भाग पडतें; आणि याप्रमाणें सत्तेचा ( अस्तित्वाची ) निवृत्ति केव्हांही करितां येत नसल्यामुळें प्रत्येक वेळीं अस्तित्वबुद्धि अनुवृत्त होते; म्हणून 'सतापासून सताची उत्पत्ती होते' असें म्हणणाऱ्या सद्वादि पक्षाचें म्हणणें मात्र सिद्ध होतें. असो; असतापासून सताची उत्पत्ति होते असें दाखविणारा सिद्धांत नसल्यामुळें किंवा असणें शक्य नसल्यामुळें असद्वादी लोकांचें म्हणणें लटकें पडतें. विद्यमान असणाऱ्या मृत्पिंडापासून घटोत्पत्ति होते, आणि मृत्पिंड नसेल तर घटोत्पत्ति होत नाहीं, या अन्वयव्यतिरेकी अनुभवावरून सद्वादिपक्षाचें म्हणणें खरें आहे असें होतें. )

**यद्यभावादेव घट उत्पद्येत घटार्थिना मृत्पिण्डो नोपादीयेत । अभावशब्दबुद्ध्यनुवृत्तिश्च घटादौ प्रसज्येत न त्वेतदस्त्यतो नासतः सदुत्पत्तिः । यदप्याहुर्मृद्बुद्धिर्घटबुद्धेर्निमित्तमिति मृद्बुद्धिर्घटबुद्धेः कारणमुच्यते न तु परमार्थत एव मृद्घटो वाऽस्तीति तदपि मृद्बुद्धिर्विद्यमाना विद्यमानाया एव घटबुद्धेः कारणमिति नासतः सदुत्पत्तिः । मृद्घटबुद्ध्योर्निमित्तनैमित्तिकतयाऽऽनन्तर्यमात्रं न तु कार्यकारणत्वमिति चेत् । न । बुद्धीनां नैरन्तर्ये गम्यमाने वैनाशिकानां बहिर्दृष्टान्ताभावात् । अतः कुतस्तु खलु**

सोम्यैवं स्यादिति होवाच कथं केन प्रकारेणासतः सज्जायेतेति । असतः सदुत्पत्तौ न कश्चिदपि दृष्टान्तप्रकारोऽस्तीत्यभिप्रायः । एवमसद्वादिपक्षमुन्मथ्योपसंहरति सत्त्वेव सोम्येदमग्र आसीदिति स्वपक्षसिद्धिम् ।

सिद्धांती:—आतां अभावापासूनच घट उत्पन्न होतो, असें असतें तर घट उत्पन्न करणारा कुंभार केव्हांही मृत्पिंडाची अपेक्षा करणार नाहीं. तसेंच अभाव हेंच घटकारण असेल तर घटालाहि अभावशब्द आणि अभावबुद्धि अनुवृत्त झाली असती. (न्यायमताप्रमाणें उपादान कारण स्वकार्यांत विद्यमान असतें तेव्हां अभाव हेंच घटाचें कारण असतें, तर घट या शब्दाचा उच्चार अभावदर्शक शब्दानें झाला असता व घटाचा प्रत्ययही अभावरूपी असता.) पण आपण घट पाहिला असतां अभाव पाहिला असें ह्मणत नाहीं; किंवा आपल्या बुद्धीचा विषय अभाव आहे, आपल्यास अभावाचा प्रत्यय येतो, असेंही ह्मणत नाहीं. म्हणून असतापासून सताची उत्पत्ति होते, असे म्हणणें असमंजस आहे. आतां आणखी एक अशी शंका येईल कीं, ज्याअर्थीं घटबुद्धीचें निमित्त मृद्बुद्धि आहे, त्याअर्थीं मृद्बुद्धि हें घटबुद्धीचें कारण आहे. वस्तुतः मृद्घट (मातीचा घट) असतच नाहीं. ही ही शंका बरोबर नाहीं. कारण विद्यमान असणारी मृद्बुद्धि विद्यमान असणाऱ्या घटबुद्धीचें कारण आहे, असें होऊन असतापासून सदुत्पत्ती होते, हा पक्ष सिद्ध होत नाहीं. त्यावरही कोणी असें म्हणेल कीं, मृद्बुद्धि आणि घटबुद्धि यांमध्यें जो 'निमित्तनैमित्तिक संबंध सांगतां, तो आनंतर्य मात्र दाखविणारा आहे, मृद्बुद्धीनंतर घटबुद्धि अस्तित्वांत येते, असा या संबंधाचा अर्थ आहे. येथें प्रत्येक बुद्धि (ज्ञान) क्षणभंगुर असल्यामुळें कार्यकारणसंबंध विद्यमान असत नाहीं. तरी वैनाशिकपक्षाच्या दृष्टीनें हीही शंका बरोबर होत नाहीं. कारण या दोन बुद्धींमध्यें जो पूर्वापरभाव अंतःकरणांत मात्र उत्पन्न होतो, तो समजून देण्यास बाहेरची सृष्टि शून्य आहे, असें मानणाऱ्या वैनाशिक दृष्टीनें दृष्टांतच उपलब्ध होत नाहीं; म्हणूनच श्रुति ह्मणत आहे कीं, "असतापासून सताची उत्पत्ति होते" हें ह्मणणें कसें सिद्ध होईल. असतापासून सत् कोणत्याप्रकारानें उत्पन्न होईल हें सांगण्याला किंवा असें असण्याला प्रत्यंतर ह्मणून दुसरा दृष्टांत कोठेंहि उपलब्ध होणें शक्य नाहीं. ह्मणून हा असद्वाद्यांचा (असतापासून सत् होतें असें ह्मणणाऱ्या लोकांचा) पक्ष सर्वथा असमंजस आहे. याप्रमाणें असद्वाद्यांच्या पक्षाचें पूर्ण खंडण करून श्रुतीनें येथें " हे सौम्य, सृष्ट्युत्पत्तीपूर्वी एक आणि एक मात्र अद्वितीय असणारें सत् हेंच काय तें विद्यमान होतें " असा उपसंहार करून आपला स्वतःचा पक्ष सिद्ध केला आहे.

ननु सद्वादिनोऽपि सतः सदुत्पद्यत इति नैव दृष्टान्तोऽस्ति । घटाद्घटान्तरोत्पत्त्यदर्शनात् । सत्यमेवं न सतः सदन्तरमुत्पद्यते किं तर्हि सदेव संस्थानान्तरेणावतिष्ठते । यथा सर्पः कुण्डली-भवति । तथा च मृच्चूर्णपिण्डघटकपालादिप्रभेदैः । यद्येवं सदेव सर्वप्रकारावस्थं कथं प्रागुत्पत्तेरिदमासीदित्युच्यते । ननु न श्रुतं त्वया सदेवेत्यवधारणमिदंशब्दवाच्यस्य कार्यस्य । प्राप्तं तर्हि प्रागुत्पत्तेरसदेवाऽऽसीन्नेदंशब्दवाच्यमिदानीमिदं जात मिति । न । सत एवेदंशब्दबुद्धिविषयतयाऽवस्थानाद्यथा मृदेव पिण्डघटादिशब्दबुद्धिविषयत्वेनावतिष्ठते तद्वत् ।

सिद्धांती—या सिद्धांताविरुद्ध असा आक्षेप घेण्यांत येतो कीं, "सता पासून सताची उत्पत्ति होते" असें म्हणणाऱ्या सद्वादयांसही आपलें म्हणणें सिद्ध करील असा दृष्टांत उपलब्ध होत नाहीं. एका घटापासून दुसरा घट निर्माण झाला, असें आपण कधींही पहात नाहीं. एका सतापासून दुसरें सत् उत्पन्न होत नाहीं, हें शंकाकाराचें म्हणणें खरें आहे. तथापि सिद्धांतपक्षाचें म्हणणें असें आहे कीं, पसरलेला सर्प जसा कुंडलाकार होतो, त्या प्रमाणें सत् ही एकच वस्तु, एक पिंड किंवा आकार सोडून दुसऱ्या पिंडांत विद्यमान होते. मातीचा गोळा घट. कपाल, परळ इत्यादि मातीच्या सर्व पदार्थांत मृत्तिका विद्यमान असते; त्याप्रमाणें सत् ही वस्तु अनंत वस्तूंमध्यें प्रतिष्ठित होत असते. सतापासून सताची उत्पत्ति होत असते, याचा अर्थ एक आकार सोडून सत् ही वस्तु दुसरा आकर धारण करितें आणि याप्रमाणें सत् ही वस्तु अनंतप्रकारांनीं आपल्या इंद्रियांस आणि मनोबुद्धींस गोचर होतें. या सिद्धांत पक्षाविरुद्ध असें म्हणतां येईल कीं, सत् हेंच जर सर्वदा आणि सर्वत्र विद्यमान असले' तर "सृष्टीपूर्वीच सत्-दृश्यविश्व-होतें" असें कसें म्हणतां येईल, याचें समाधान असें आहे "इदं" शब्दानें वाच्य होणाऱ्या कार्याचें अवधारण "सत् हेंच" आहे असें ( एव ) शद्वानें सुचविलें तें शंकाकारानें बरोबर ऐकलें नाहीं, असें होतें. यावरही एक आक्षेप निघतो. उत्पत्तीपूर्वी असत् मात्र होतें, इदं या शब्दानें वाच्य असणारें विश्व त्या वेळीं नव्हतें, आतां उत्पन्न झालें आहे. हेंही म्हणणें ठीक नाहीं. कारण 'इदं' हा शब्द आणि ( हा ) हा प्रत्यय यांचा विषयच त्यावेळी सत् मात्र होता. ( म्हणजे इदं सत्रुपी असून त्याचा प्रत्ययही सत् होता- ) पिंड, घट, इत्यादि शब्दांचा आणि बुद्धींचा विषय एक मृत्तिका मात्र असते; ह्या प्रमाणें ह्या दृश्य विश्वाच्या वाचक शब्दांचा आणि प्रत्यय येणाऱ्या बुद्धींचा विषय सत् ही एकच वस्तु सृष्टीपूर्वी होती.

**ननु यथा मृद्वस्त्वेवं पिण्डघटाद्यपि तद्वत्सद्बुद्धेरन्यबुद्धिविषयत्वत्कार्यस्य सतोऽन्यद्वस्त्वन्तरं स्यात्कार्यजातं यथाऽश्वाद्गौः । न । पिण्डघटादीनामितरेतरव्यभिचारेऽपि मृत्त्वाव्यभिचारात् । यद्यपि घटः पिण्डं व्यभिचरति पिण्डश्च घटं तथाऽपि पिण्डघटौ मृत्त्वं न व्यभिचरतस्तस्मान्मृन्मात्रं पिण्डघटौ । व्यभिचरति त्वश्वं गौरश्वो वा गाम् । तस्मान्मृदादि संस्थानमात्रं घटादयः । एवं सत्संस्थानमात्रमिदं सर्वमिति युक्तं प्रागुत्पत्तेः सदेवेति । वाचारम्भणमात्रत्वाद्विकारसंस्थानमात्रस्य ।**

**सिद्धांतीः**—येथें अशी शंका येईल कीं, ज्याप्रमाणें मृत्तिका ( कारण ) वस्तु आहे, त्याप्रमाणेंच मृत्पिंड, मृद्घट, इत्यादि ( कार्य ) निराळ्या वस्तू आहेत. याच न्यायानें सद्बुद्धिहून ( कारणाहून ) अन्य असणाऱ्या बुद्धींला कार्यत्व प्राप्त होतें, ह्मणजे सतापासून कार्यरूपानें होणारी दुसरी वस्तु निराळी असते. अश्वाहून वृषभ जसा निराळा त्याप्रमाणें सतापासून उत्पन्न होणारी अन्य सद्वस्तु ही सताहून अगदीं निराळी असली पाहिजे. पण ही शंका बरोबर नाहीं. कारण परळघटादि मृत्तिकेच्या वस्तु एकमेकांपासून व्यभिचारित * होतात.

पण मृत्तिकेपासून मात्र त्यांचा केव्हांही व्यभिचार होत नाहीं. घट असेल तेथें पिंड नसतो किंवा पिंड असेल तेथें घट नसतो हें खरें, तथापि पिंड आणि घट हे उभयतांही मृत्तिकेपासून विभक्त होत नाहींत. ( पिंड, घट, इत्यादि सर्व मृण्मय वस्तू असतात, तेथें मृत्तिका ही असलीच पाहिजे; आणि मृत्तिका नसेल तेथें मृण्मय वस्तूंचें अस्तित्व शक्य नसतें ) म्हणून पिंडघटादि मृत्तिकामात्र आहेत. परंतु शंकाकारानें जो वृषभाचा दृष्टांत घेतला त्यांत गोववृषभ विभक्त व्यभिचारित होऊं शकतात म्हणून, तो दृष्टांत असमंजस आहे. एवंच घटादि सर्व मृद्वस्तू मृत्तिकासंस्थान मात्र आहेत. याचप्रमाणें 'सृष्टयुत्पत्तीच्या पूर्वीं सद् हेंच काय तें हें सर्व होतें' असें म्हणणें योग्य आहे. कारण हें सर्व दृश्य विश्व सत्स्वरूपी मात्र आहे. सद्रूपाहून अन्य जी विकारसंस्था ( दृश्य विश्वांत असणारे सर्व पदार्थ ) वाचारंभण मात्र ( शब्द मात्र ) आहेत.

तात्पर्य सतापासून उत्पन्न होणारीं सर्व कार्यें सद्रूपच असतात. नित्य अस्तित्वाशिवाय या कार्यजातांत जें कांहीं दुसरें दिसतें व भासतें तें शब्द मात्र आहे. सताशिवाय शब्दापलीकडे तेथें कांहीं नाहीं.

**ननु निरवयवं सन्निष्कलं निष्क्रियं शान्तं निरवद्यं निरञ्जनं दिव्यो ह्यमूर्तः पुरुषः सबाह्याभ्यन्तरो ह्यज इत्यादिश्रुतिभ्यो**

* ( दोन वस्तूंपैकीं एक असतां दुसरी नसेल किंवा दुसरी असतां पहिली नसेल तर त्या दोन्ही वस्तू व्यभिचारी आहेत असें ह्मणतात. )

निरवयवस्य सतः कथं विकारसंस्थानमुपपद्यते । नैष दोषः । रज्ज्वाद्यवयवेभ्यः सर्पादिसंस्थानवद्बुद्धिपरिकल्पितेभ्यः सदवयवेभ्यो विकारसंस्थानोपपत्तेः । वाचाऽऽरम्भणं विकारो नामधेयं मृत्तिकेत्येव सत्यमेवं सदेव सत्यमिति श्रुतेः । एकमेवाद्वितीयं परमार्थत इदंबुद्धिकालेऽपि ॥ २ ॥

सिद्धांतीः—आतां सत् हीं वस्तू अवयवशून्य, कलाशून्य, क्रियाशून्य, शांत, निष्पाप, निर्दोष, दिव्य, नामरूपशून्य, आत्मरूप, एकरस, अज, ( अजन्मा ) इत्यादि लक्षणांनीं मंडित आहे, असें श्रुती म्हणतात, तेव्हां अवयवशून्य असणाऱ्या निर्विकारी सतापासून विकारी कार्य संस्था उत्पन्न होणें युक्तीला योग्य दिसत नाहीं. अशी शंका येईल; पण ती शंका बरोबर नाहीं. रज्जू-आदींच्या अवयवांपासून सर्पादि कार्य–संस्था ग्रहण करणाऱ्या बुद्धीनें सताच्या कल्पिलेल्या अवयवापासून विकारसंस्था उत्पन्न होते, असें मानणें योग्यच आहे. ( मंद प्रकाशांत असलेल्या रज्जूवर आपल्याला सर्पभ्रांती होते हें प्रसिद्ध आहे. ही भ्रांति कशी झाली? याची मीमांसा करूं लागलों म्हणजे रज्जूच्या अवयवांपासून सर्प नामक कार्य उत्पन्न झालें, असें आपण भ्रांतास्थितींत म्हणतों, त्याप्रमाणेंच भ्रांतास्थितींत असणारी आपली बुद्धि निरवयव सताला अवयव आहेत अशी कल्पना करून त्या सतापासूनच हें सर्व दृश्य विश्व उत्पन्न झालें, अशी आपल्या मनाची समजूत करून घेते. ) वस्तुतः जो जो विकार म्हणून आहे तो तो वाचारंभण ( वाणीच्या मात्र आश्रयानें राहणारा शब्द मात्र ) आहे. मृत्तिका हीच काय ती सत् वस्तू आहे, असें जसें आपण मागें ठरवून घेतलें. त्याचप्रमाणें येथेंही सत् हीच काय ती सद्वस्तू आहे आणि सर्व विकार शब्द मात्र आहेत असें समजावें.

तात्पर्य 'हें सर्व सत् मात्र होतें' अशी आतां इदंबुद्धि असतांनाहि परमार्थतः एक आणि अद्वितीय असणारें सत् हेंच पूर्वीं अस्तित्वांत होतें हा सिद्धांत श्रुतियुक्तींला मान्य होतो ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**तदैक्षत बहु स्यां प्रजायेयेति तत्तेजोऽसृजत तत्तेज ऐक्षत बहु स्यां प्रजायेयेति तदपोऽसृजत । तस्माद्यत्र क्व च शोचति स्वेदते वा पुरुषस्तेजस एव तदध्यापो जायन्ते ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थ**—तत् ऐक्षत 'बहुस्याम् प्रजायेय' इति ( त्यानें पाहिलें म्हणजे विचार केला कीं मी पुष्कळ होईन, विशेष जोरानें उत्पत्ति

करीन ) **तत् तेजः असृजत्** ( त्यानें तें तेज उत्पन्न केलें ) **तत् तेजः ऐक्षत बहु स्याम् प्रजायेय** ' इति ( त्यानें विचार केला कीं मीं पुष्कळ होऊन पुष्कळाची उत्पत्ति करीन ) **तत अपः असृजत** ( त्या तेजानें अप ह्मणजे जलें उत्पन्न केली ) **तस्मात् यत्र क्वच पुरुषः शोचति स्वेदते वा, तेजसः तत आपः अधिजायंते** ( ह्मणून जेव्हां व जेथें कोणी पुरुष शोक करितो किंवा त्याला घाम येतो, तेव्हां तीं शोकजलें व घर्मजलें—दुःखाश्रु किंवा घर्माश्रु—तेजापासूनच उत्पन्न होतात ) ॥ ३ ॥

**तत्सदैक्षतेक्षां दर्शनं कृतवत् । अतश्च न प्रधानं सांख्यपरिकल्पितं जगत्कारणम् । प्रधानस्याचेतनत्वाभ्युपगमात् । इदं तु सच्चेतनमीक्षितृत्वात् । तत्कथमैक्षतेत्याह—बहु प्रभूतं स्यां भवेयं प्रजायेयं प्रकर्षेणोत्पद्येय । यथा मृद्घटाद्याकारेण यथा वा रज्ज्वादि सर्पाद्याकारेण बुद्धिपरिकल्पितेन । असदेव तर्हि सर्वं यद्गृह्यते रज्जुरिव सर्पाद्याकारेण । न । सत एव द्वैतभेदेनान्यथागृह्यमाणत्वान्नासत्त्वं कस्यचित्क्वचिदिति ब्रूमः । यथा सतोऽन्यद्वस्त्वन्तरं परिकल्प्य पुनस्तस्यैव प्रागुत्पत्तेः प्रध्वंसाच्चोर्ध्वमसत्त्वं ब्रुवते तार्किका न तथाऽस्माभिः कदाचित्क्वचिदपि सतोऽन्यदभिधानमभिधेयं वा वस्तु परिकल्प्यते । सदेव तु सर्वमभिधानमभिधीयते च यदन्यबुद्ध्या । यथा रज्जुरेव सर्पबुद्ध्या सर्प इत्यभिधीयते यथा वा पिण्डघटादि मृदोऽन्यबुद्ध्या पिण्डघटादिशब्देनाभिधीयते लोके रज्जुविवेकदर्शिनां तु सर्पाभिधानबुद्धी निवर्तेते यथा च मृद्विवेकदर्शिनां घटादिशब्दबुद्धी तद्वत्सद्विवेकदर्शिनामन्यविकारशब्दबुद्धी निवर्तेते । यतो वाचो निवर्तन्ते । अप्राप्य मनसा सहेति । अनिरुक्तेऽनिलयन इत्यादिश्रुतिभ्यः ।**

सिद्धांतीः—त्या सतानें विचार केला, बुद्धिपूर्वक निरीक्षण केलें. सतानें निरीक्षण केलें असें श्रुति म्हणते; म्हणून कापिलसांख्यांनीं कल्पिलेला प्रधान ( प्रकृति ) या जगताचें कारण नाहीं असें ठरतें. कारण स्वरूपतः च प्रधान अचेतन दर्शनादि विचार करण्यास असमर्थ आहे, असें म्हणत असतात; परंतु श्रुतीला अभीष्ट असणारें सत् चेतनवान् आहे कारण पाहण्याची क्रिया त्याच्या हातून झाली आहे. त्यानें विचार केला असें श्रुति ह्मणते, असो. सतानें कोणता विचार केला व तो कसा केला? हें पहा. श्रुति म्हणते ' मी पुष्कळ होइन, प्रकर्षानें उत्पत्ति करीन,' असें सतानें बुद्धिपूर्वक ठरविलें. मृत्तिकेला घटादि आकार देऊन अथवा रज्जू-आदिला सर्पादि आकार देऊन बुद्धि जशी स्वव्यापार करिते, त्याप्रमाणें सतानें ( ब्रह्मानें ) 'मी पुष्कळ होईन' असा बुद्धिव्यापार केला.

यावरून असें म्हणतां नये कीं, हें सर्व दृश्यभास्य सर्वथा असत् म्हणजे शून्यमात्र आहे. रज्जूवर आभासित होणारा सर्प जसा सर्वथा असत् आहे, असें म्हणतां नये. कारण द्वैतभेद उत्पन्न करून सद्वस्तूलाच आपण विपरीतस्वरूपानें पहात असतो, इतकेंच.कायतें. वस्तुतः कोणतेंहि कार्य केव्हांही आणि कोठेंहि असद्रूपी नसतें (हें सर्व विश्व सद्रूप आहे; आणि आपल्या बुद्धीनें कोणतेही जरी आरोप केले तरी हें सद्रूप कोठेंही आणि केव्हांही विनष्ट होणें शक्य नाहीं. ) तार्किक लोक मात्र सताहून ( कारणाहून ) अत्यंतभिन्न अशा वस्तूचि कल्पना करितात;आणि पुन्हा त्या कार्याला तदुत्पत्तीच्या पूर्वी व तन्नाशानंतर असत (असत्व ) असें नांव देत असतात. आमची अशी प्रक्रिया नाहीं. सताहून निराळा असा नामात्मक शब्द आहे किंवा सताहून निराळी वाच्य वस्तु आहे असें आम्ही केव्हांहि चुकून सुद्धां म्हणत नाहीं. अन्यबुद्धीनें ज्याला भ्रांतिकाळीं निराळें स्वरूप देतों, तें सर्व परमार्थतः सद्रूप मात्र आहे. सर्पबुद्धीनें रज्जूला सर्प असें नांव आपण भ्रांतिकाळीं देतों, किंवा अन्यबुद्धीनें पिंडघटादिकल्पित वस्तु उत्पन्न करून व्यवहारांत त्यांस आपण पिंड, घट हीं नांवे देतों, हें प्रसिद्ध आहे. परंतु रज्जुसर्पांचा विवेक ज्यांस प्राप्त झाला त्यांची सर्पविषयक बुद्धि आणि सर्प नाम देणारी बुद्धि निवृत्त होतात. (लीन होतात, नाहींशा होतात) किंवा मृत्तिकेचा विवेक करणाऱ्या विद्वानांची घटादि बुद्धि आणि घटादि शब्द जशीं विनिष्ट होतात, त्याप्रमाणें सताचा विवेक करणारें आत्मज्ञ पुरुषाची कार्यबुद्धि आणि कार्यशब्द हे निवृत्त होतात. सत् ( आत्मा ) हा वाणीला अगोचर आहे " येथून मनासह वाणी आत्मरूप प्राप्त न होत्साता परत फिरते " " हें सत् आणि अनिलयन आश्रयागोचर व शब्दागोचर आहे " इत्यादि श्रुती प्रमाण आहेत. तैतिरीय पहा.

एवमीक्षित्वा तत्तेजोऽसृजत तेजः सृष्टवत् । ननु तस्माद्वा एतस्मादात्मन आकाशः संभूत इति श्रुत्यन्तरं आकाशाद्वायुस्ततस्तृतीयं तेजः श्रुतमिह कथं प्राथम्येन तस्मादेव तेजः सृज्यते तत एव चाऽऽकाशमिति विरुद्धम् । नैष दोषः । आकाशवायुसर्गानन्तरं तत्सत्तेजोऽसृजतेतिकल्पनोपपत्तेः । अथवाऽविवक्षित इह सृष्टिक्रमः सत्कार्यमिदं सर्वमतः सदेकमेवाद्वितीयमित्येतद्विवक्षितम् । मृदादिदृष्टान्तात् । अथवा त्रिवृत्करणस्य विवक्षितत्वात्तेजोबन्नानामेव सृष्टिमाचष्टे । तेज इति प्रसिद्धं लोके दग्धृपक्तृप्रकाशकं रोहितं चेति । तत्सत्सृष्टं तेज ऐक्षत तेजोरूपसंस्थितं सदैक्षतत्यर्थः । बहु स्यां प्रजायेयेति पूर्ववत् । तदपोऽसृजत । आपो द्रवाः स्निग्धाः स्यन्दिन्यः शुक्लाश्चेति प्रसिद्धा लोके । तस्मात्तेजसः कार्यभूता आपस्तस्माद्यत्र क्व च देशे काले वा

शोचति संतप्यते स्वेदते प्रस्विद्यते वा पुरुषस्तेजस एव तत्तदाऽऽपोऽधि जायन्ते ॥ ३ ॥

सिद्धांतिः—याप्रमाणें विचार करणाऱ्या सचेतन सतानें तेज उत्पन्न केलें. तैत्तिरीयकउपनिषदांत म्हटलें आहे कीं ' त्या ह्या आत्म्यापासून आकाशाची उत्पत्ति झाली. आकाशापसून वायू आणि वायुपासून तेज उत्पन्न झालें ' याप्रमाणें उत्पत्ति क्रमांत तेज तिसरें असतां येथें सतानें प्रथमतःच तेज उत्पन्न केलें असें कसें म्हटलें ? शिवाय तेजापासून आकाश उत्पन्न होणें हेंही श्रुतियुक्तीविरुद्ध आहे अशी शंका घेण्याला जागा आहे. पण ही शंका बरोबर नाहीं पहा कीं आकाश वायूंची उत्पत्ती केल्यानंतर त्या सतानें तेजाची उत्पत्ति केली अशी कल्पना करणें केव्हांही गैरवाजवी होणार नाहीं शिवाय सृष्टिक्रम सांगण्याची विवक्षाही नाहीं. हें सर्व सताचें कार्य आहे; म्हणून सत् हें एकच आणि अद्वितीय आहे इतकेंच सांगण्याची विवक्षा ( सांगण्याची इच्छा ) आहे मृत्तिका वगैरेंचे दृष्टांत दिले आहेत त्यावरून ही आम्हीं म्हणतों अशीच श्रुतीची विवक्षा असावी असें होतें. आणखी असेंही म्हणतां येईल कीं येथें त्रिवृत् करणाची ( तीन वस्तू कांहीं एक प्रमाणानें एक करणें याला त्रिवृत्करण असें म्हणतात ) विवक्षा असल्यामुळें येथें श्रुतीनें, तेज, आप आणि अन्न या तीन वस्तूंचाच स्वीकार करून त्यांपासून ही सृष्टि उत्पन्न झाली असें श्रुतिनें म्हटलें आहे. तेज ही वस्तु प्रसिद्धच आहे. दहन करणें, पकविणें, प्रकाश करणें रक्तरूप असणें हे तेजाचे धर्म आहेत. असो. त्यापासून उत्पन्न झालेल्या तेजानें अथवा तेजो रूपानें विद्यमान असणाऱ्या सतानें मीं पुष्कळ होईन इत्यादि पूर्ववत् प्रकारचा संकल्प केला. नंतर सद्रूपी तेजापासून जलें उत्पन्न झालीं. पातळ, मऊ, प्रवाहरूपी आणि शभ्रवर्णी असणें हे जलाचे प्रसिद्ध धर्म आहेत. आतां ज्या अर्थीं जलं हीं तेजाचीं कार्यें आहेत, त्या अर्थीं कोठेंही केव्हांही कोणी पुरुष संतापानें शोक करूं लागला किंवा उष्णाच्या तापानें घर्मयुक्त झाला, तर त्या पुरुषाचे ते दुःखाश्रु किंवा घर्मबिंदु तेजापासूनच उत्पन्न होतात असें श्रुति म्हणते तें योग्य आहे ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा.

**ता आप ऐक्षन्त बह्व्यः स्याम प्रजायेमहीति ता अन्नमसृजन्त तस्माद्यत्र क्व च वर्षति तदेव भूयिष्ठमन्नं भवत्यद्भ्य एव तदध्यन्नाद्यं जायते ॥ ४ ॥**

**इति षष्ठाध्यायस्य द्वितीयः खण्डः ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः—' ताः आपः ऐक्षंत "बह्व्यः स्याम, प्रजायेमहि ' इति** ( त्या जलांनीं आह्मीं बहुरूप होऊं आणि पुष्कळ उत्पत्ति

करूं असा संकल्प केला ) ' ताः अन्नं असृजन्त ( त्यानीं अन्न उत्पन्न केलें. ) तस्मात् यत्र क्व वर्षति तत् एव भूयिष्ठं अन्नं भवति, अद्भ्यः एव तत् अन्नाद्यम् अधिजायते ( असें आहे ह्मणून जेथें कोठें केव्हांही पाऊस पडतो तेथें आणि तेव्हां पुष्कळ अन्न उत्पन्न होतें. अर्थात् जलापासूनच तें अन्नाद्य उत्पन्न होतें ॥ ४ ॥

ता आप ऐक्षन्त पूर्ववदेवाबाकारसंस्थितं सदैक्षतेत्यर्थः । बह्वयः प्रभूताः स्याम भवेम प्रजायेमह्युत्पद्येमहीति । ता अन्नमसृजन्त पृथिवीलक्षणम् । पार्थिवं ह्यन्नं यस्मादप्कार्यमन्नं तस्माद्यत्र क्व च वर्षति देशे तत्तत्रैव भूयिष्ठं प्रभूतमन्नं भवति । अतोऽद्भ्य एव तदन्नाद्यमधिजायते । ता अन्नमसृजन्तेति पृथिव्युक्ता पूर्वमिह तु दृष्टान्तेऽन्नं च तदाद्यं चेति विशेषणाद्व्रीहियवा उच्यन्ते । अन्नं च गुरु स्थिरं धारणं कृष्णं च रूपतः प्रसिद्धम् । ननु तेजःप्रभृतिष्वीक्षणं न गम्यते हिंसादिप्रतिषेधाभावात्त्रासादिकार्यानुपलम्भाच्च तत्र कथं तत्तेज ऐक्षतेत्यादि । नैष दोषः । ईक्षितृकारणपरिणामत्वात्तेजःप्रभृतीनां सत एवेक्षितुर्नियतक्रमविशिष्टकार्योत्पादकत्वाच्च तेजःप्रभृतीक्षत इवेक्षत इत्युच्यते भूतम् ।

**सिद्धांतीः**—त्या जलांनीं बुद्धिपूर्वक पाहिलें म्हणजे संकल्प केला, याचाहि अर्थ पूर्वीप्रमाणेंच समजून घ्यावा; ह्मणजे जलांचा आकार धारण करणाऱ्या सतानें विचार केला असें समजावें 'आपण पुष्कळ होऊं आणि आपण पुष्कळ उत्पन्न करूं' अशा रूपाचा हा संकल्प होता. त्या जलांनीं पार्थिव अन्न उत्पन्न केलें. या अन्नाचें लक्षण पार्थिव ( पृथ्वीपासून उत्पन्न झालेलें ) आहे; कारण सर्व अन्न पार्थिव म्हणजे पृथ्वीपासून उत्पन्न झालेलें असतें. आतां अन्न हें जलकार्य आहे. देशांत जेव्हां जेव्हां पाऊस चांगला पडतो तेव्हां तेव्हां तेथें पुष्कळ अन्न वर्षाकालीं झालेल्या पर्जन्यापासून निर्माण होतें. अर्थात सर्व अन्नाद्य जलापासून मात्र उत्पन्न होतें. त्या जलांनीं अन्न उत्पन्न केलें असें म्हणण्यानें पृथ्वी उत्पन्न केली असें पूर्वीच म्हटलें आहे. परंतु येथें दृष्टांतामध्यें मात्र अन्नाद्य ( अन्न असून तें खाण्यासारखें असलें म्हणजे त्यास अन्नाद्य म्हणतात. ) हें विशेषण उपस्थित केल्यामुळें व्रीहि, यव इत्यादि सर्व भक्ष्य पदार्थांचा अंतर्भाव होतो. अन्न हें स्वभावतः जड स्थिर, धारण करतां येण्यासारखें आणि वर्णानें कृष्ण ( काळें ) असतें हें प्रसिद्ध आहे. आतां कोणी असें म्हणेल कीं, सतापासून उत्पन्न झालेल्या या तेजःप्रभृति वस्तूंस ईक्षण करतां येणार नाहीं; कारण त्या चेतन वस्तू नाहींत. शिवाय, जीवांस हिंसादि पापकर्म करूं नये, असे निषेध सांगितले आहेत तसे तेजादिकांस सांगितले नाहींत; आणि त्रासादि कार्यें चेतनावंत जीवांस दिसतात, तशीं तेजादिकांत दिसत नाहींत; म्हणून तेजादिकांनीं पाहिलें, विचार केला, संकल्प केला, हें श्रुतीनें म्हटलें आहे तें योग्य नाहीं. ही शंकाहि अस्थानीं आहे. कारण

ईक्षण करणारा आत्मा हा सर्वकारण आहे आणि तेज, आप इत्यादि त्याचीं कार्यें आहेत. वस्तुतः सत् हाच द्रष्टा आहे. आणि त्यानें जो नियम ठरविला आहे त्या नियमानेंच विशिष्ट कार्यें करणारा आत्मा आहे. आत्मा पाहातो यावरच लक्षणा करून श्रुति ह्मणते कीं, तेजःप्रभृति पदार्थ जणूं काय पाहतात किंवा पाहते झाले. कारणाचे धर्म कार्यांत कल्पिले, म्हणून हें वाक्य सत्यार्थाचें वाचक आहे.

**ननु सतोऽप्युपचरितमेवेक्षितृत्वम् । न । सदीक्षणस्य केवलशब्दगम्यत्वान्न शक्यमुपचरितं कल्पयितुम् । तेजःप्रभृतीनां त्वनुमीयते मुख्येक्षणाभाव इति युक्तमुपचरितं कल्पयितुम् । ननु सतोऽपि मृद्वत्कारणत्वादचेतनत्वं शक्यमनुमातुम् । अतः प्रधानस्यैवाचेतनस्य सतश्चेतनार्थत्वान्नियतकालक्रमविशिष्टकार्योत्पादकत्वाचैक्षतेवैक्षतेति शक्यमनुमातुमुपचरितमेवेक्षणम् । दृष्टश्च लोकेऽचेतने चेतनवदुपचारः । यथा कूलं पिपतिषतीति तद्वत्सतोऽपि स्यात् । न । तत्सत्यं स आत्मेति तस्मिन्नात्मोपदेशात् । आत्मोपदेशोऽप्युपचरित इति चेद्यथा ममाऽऽत्मा भद्रसेन इति सर्वार्थकारिण्यनात्मन्यात्मोपचारस्तद्वत् । न । सदस्मीति सत्सत्याभिसंधस्य तस्य तावदेव चिरमिति मोक्षोपदेशात् ।**

**सिद्धांती:**—तेजादि वस्तूंच्या ईक्षणासंबंधानें लक्षणा आहे; ह्मणून सांगितलें. तशीच सताच्या ईक्षणासंबधानें कां नसावी, सतानें 'पाहिलें' हेंही आलंकारिक भाषण कां नसावें ? असें कोणी म्हणेल तर तें म्हणणें बरोबर नाहीं. सतानें ईक्षण केलें ' हें प्रत्यक्ष प्रामाणिक श्रुतीनें सांगितलें आहे; म्हणून व शब्दप्रमाणाशिवाय ही गोष्ट कळणें शक्य नाहीं; म्हणून येथें अलंकाराची कल्पना उपपन्न होत नाहीं. तेजादिकांची गोष्ट तशी नाहीं. तेजादिकांस मुख्यार्थानें ईक्षण क्रिया केव्हाही शक्य नाहीं, म्हणून आपल्यास अनुमान करतां येतें कीं येथें तेजादिकांचें ईक्षण शुद्ध आलंकारीक आहे. आता अचेतन मृत्तिका अचेतन घटादिकांचे कारण आहे, त्याप्रमाणेंच अचेतन तेजादिकांचें कारण जें सत् तेंहि अचेतन आहे असें अनुमानिणें शक्य आहे; म्हणून सांख्यांच्या प्रधानाप्रमाणेंच या वेदांताच्या अचेतन सताला चैतन्याचा अलंकार घालणें योग्यच आहे. ठरलेल्या काळीं व क्रमानें विशिष्ठ कार्यांची उत्पत्ति सांख्याच्या प्रधानाप्रमाणेंच वेदांत्यांचें सत् करितें म्हणून ही 'अचेतन' सतानें पाहिलें अथवा पाहिल्यासारखें केलें असें अनुमानून 'सतानें पाहिलें' हा अलंकारच आहे, असें समजावें. आपण नेहमीं व्यवहारांत अचेतनावर सचेतनाचा आरोप करतो. नदीची दरड 'पडूं पाहत आहे, पडण्याची इच्छा करीत आहे, असें म्हणतों त्याप्रमाणेंच सताचीही व्यवस्था असेल" पण ही शंका बरोबर नाहीं. कारण 'तें सत्य आहे, तोच आत्मा आहे' असा सताच्यासंबंधाने चेतनत्वदर्शक श्रुतीचा उपदेश आहे. 'हा उपदेशही अलंकारच पहा 'माझा आत्मा भद्रसेन आहे' असें आपण आपली सर्व कार्यें करणाऱ्या भद्रसेनाच्या संबंधानें म्हणतों. भद्रसेन हा आपला आत्मा नसतांहि तो आपला आत्मा आहे असें

ह्मणतां. त्याप्रमाणेंच श्रुतीनें सतावर आत्म्याचा आरोप केला असेल' असेंहि ह्मणतां येत नाहीं. कारण 'मीच सत आहें,' 'सताचें अहर्निश चिंतन करणारा आणि सत् प्राप्ति करून घेणारा, सत् होणारा, देह पातानंतर मुक्त होतो' असें श्रुतीचें सांगणें आहे, यावरून सतावर चैतन्याचा आरोप नाहीं, सत् हें चेतनात्मक आहे, हें सिद्ध होतें.

**सोऽप्युपचार इति चेत् । प्रधानात्माभिसंधस्य मोक्षसामीप्यं वर्तत इति मोक्षोपदेशोऽप्युपचरित एव । यथालोके ग्रामं गन्तुं प्रस्थितः प्राप्तवानहं ग्राममिति ब्रूयात्त्वरापेक्षया तद्वत् । न । येन विज्ञातेनाविज्ञातं विज्ञातं भवतीत्युपक्रमात् । सत्येकस्मिन्विज्ञाते सर्वं विज्ञातं भवति तदनन्यत्वात्सर्वस्याद्वितीयवचनाच्च । न चान्यद्विज्ञातव्यमवशिष्टं श्रावितं श्रुत्याऽनुमेयं वा लिङ्गतोऽस्ति येन मोक्षोपदेश उपचरितः स्यात् । सर्वस्य च प्रपाठकार्थस्योपचरितत्वपरिकल्पनायां वृथा श्रमः परिकल्पयितुः स्यात्पुरुषार्थसाधनविज्ञानस्य तर्केणैवाधिगतत्वात्तस्य । तस्माद्वेदप्रामाण्यान्न युक्तः श्रुतार्थपरित्यागः । अतश्चेतनावत्कारणे जगत इति सिद्धम् ॥ ४ ॥**

**इति षष्ठाध्यायस्य द्वितीयः खण्डः ॥ २ ॥**

**सिद्धांतीः**—'हाही उपचार आहे' असें ह्मणाल आणि व्यवहारांत गांवाला जाण्याकरितां निघालेला मनुष्य मीं गांवाला जाऊन पोंचलोंच पहा. असें त्वरेच्या आपेक्षेनें बोलतो, त्याप्रमाणें मोक्षाजवळ अत्यंत सन्निधतेनें असणारा जो प्रधान आत्मा तो मुक्तच झाला असें श्रुतीनें म्हटलें असावें; आणि मोक्षाचा आरोप केला असावा. पण असेंही म्हणतां येणार नाहीं. कारण 'जी एक वस्तु विज्ञात झाली असतां सर्व अविज्ञात होते' असा उपक्रम करून श्रुति पुढें म्हणत आहे कीं, एक सत् विज्ञात झालें असतां विज्ञात सर्वज्ञत्व प्राप्त होतें. सताहून दुसरें कांहीं नाहीं, हें सर्वदृश्य सद्रूप मात्र आहे, असें तिनें शेवटीं म्हटलें आहे. यावरून येथें म्हणजे सताच्या ठिकाणीं चेतनत्वाचा उपचार आहे, 'आलंकारिक भाषण आहे,' असें म्हणतां येत नाहीं. सताशिवाय दुसरी अशी कोणतीही प्रत्यक्ष गोष्ट शिल्लक उरत नाहीं किंवा श्रुतीनें सांगितलेली ठरत नाहीं किंवा अनुमित करतां येत नाहीं कीं जी आपल्यास कोणत्या तरी प्रमाणानें समजून घेणें अवश्य आहे. दुसरी गोष्ट असेल आणि ती समजून घ्यावयाची असेल तर उपचार करणें ठीक आहे; पण सताशिवाय दुसरी गोष्टच अस्तित्वांत नाहीं; ह्मणून सताच्या ठिकाणीं चैतन्यस्थापना करणें हा उपचार नाहीं. आतां सर्वच प्रपाठक उपचारित आहेत, अशीच कोणी वेड्यासारखी कल्पना केल्यास त्या वेड्याला या व्यर्थ कल्पनेचा विनाकारण शीण मात्र होईल.

व्यर्थ शीण होईल असें आह्मीं म्हणतों याचें कारण इतकेंच कीं, पुरुषार्थाचें साधन कोणतें आहे हें त्याला (सांख्यवाद्याला) केवळ अप्रतिष्ठित तर्कानें मात्र समजण्यासारखें आहे, असें वाटतें. आणि तर्कानें जी गोष्ट समजते ती समजाऊन देण्याला श्रुतीची अपेक्षा नसते, हा सिद्धांत सर्वमान्य आहे. पण श्रुति स्वतःप्रमाण व अज्ञेयज्ञापक

आहे. ह्मणून सांख्यांचे व्यर्थ श्रम होत असें आह्मीं ह्मटलें. असो. वेद हे स्वतः प्रमाण असल्यामुळें त्यांचा जो स्पष्ट अर्थ प्रतीत होतो त्याचा विनाकारण त्याग करणें हें केव्हांही इष्ट नाहीं. एवंच सत् चेतन आहे; आणि तें सचेतन सत् जगताचें कारण आहे असें ठरलें ॥ ४ ॥

अध्याय साहावा खंड दुसरा समाप्त.

---

## अध्याय सहावा खंड तिसरा.

---

### मंत्र पहिला.

**तेषां खल्वेषां भूतानां त्रीण्येव बीजानि भवन्त्या- ण्डजं जीवजमुद्भिज्जमिति ॥ १ ॥**

अन्वय व अर्थः--**तेषां एषां भूतानां त्रीणि एव बीजानि भवंति खलु** ( त्या ह्या भूतांची तीन मात्र बीजें असतात ) **आंडजं, जीवजं, उद्भिज्जं इति** ( आण्डज, जीवज--जारज,--आणि उद्भिज्ज अशी तीं तीन बीजें आहेत ) ॥ १ ॥

तेषां जीवाविष्टानां खल्वेषां पक्ष्यादीनां भूतानामेषामिति प्रत्यक्षनिर्देशान्न तु तेजःप्रभृतीनां तेषां त्रिवृत्करणस्य वक्ष्यमाणत्वादसति त्रिवृत्करणे प्रत्यक्षनिर्देशानुपपत्तेः । देवताशब्दप्रयोगाच्च तेजःप्रभृतिष्विमास्तिस्रो देवता इति । तस्मात्तेषां खल्वेषां भूतानां पक्षिपशुस्थावरादीनां त्रीण्येव नातिरिक्तानि बीजानि कारणानि भवन्ति । कानि तानीत्युच्यन्ते । आण्डजमण्डाज्जातमण्डजमण्डजमेवाऽऽण्डजं पक्ष्यादि । पक्षिसर्पादिभ्यो हि पक्षिसर्पादयो जायमाना दृश्यन्ते । तेन पक्षी पक्षिणां बीजं सर्पः सर्पाणां तथाऽन्यदप्यण्डाज्जातं तज्जातीयानां बीजमित्यर्थः ।

सिद्धांती—जीवतत्वानें सचेतन झालेल्या त्या ह्या पक्ष्यादि प्रत्यक्ष भूतांचीं तीन बीजें आहेत. येथें तेजःप्रभृत्ती अचेतन भूतांचा विचार कर्तव्य नाहीं. पक्ष्यादि स्पष्ट दिसत आहेत; ह्मणून ' ह्या ' ह्मटलें. अचेतन भूतांचें त्रिवृत्करण ( तिन्ही भूतांचे नियत परिमाणानें एकीकरण ) पुढें श्रुती सांगणार आहे आणि जोंपर्यंत त्रिवृत्करण झालें नाहीं तोंपर्यंत तेजःप्रभृति भूतें प्रत्यक्ष निर्दिष्ट करितां येत नाहींत. येथें तर प्रत्यक्ष निर्देश ' एषां ' ह्या शब्दानें केला आहे; ह्मणून येथें सचेतन पशुपक्ष्यादिकांचाच

विचार आहे हें स्पष्ट आहे. शिवाय तेजःप्रभृति भूतांस "ह्या तीन देवता" शब्दाचा प्रयोग केला आहे, असेंही आपल्यास दिसेल; ह्मणूनहि तेजःप्रभृति भूतांचा येथें विचार नाहीं. ह्या सर्व विवेचनावरून त्या ह्या भूतांचा म्हणजे पक्षी पशु, स्थावरादिकांचा विचार येथें कर्तव्य आहे, हें स्पष्ट आहे. यांचीं तीनच बीजें आहेत, अधिक नाहींत, असें श्रुति म्हणत आहे. तीं तीन बीजें कोणतीं तीं पहा. अंडापासून उत्पन्न झालेले 'आण्डज' पक्ष्यादि होत. (येथें अंडज तेच आंडज समजावेत). पक्षीसर्पादिकां-पासून मात्र पक्षीसर्पादि उत्पन्न होताना दिसतात; म्हणून समक्ष असणाऱ्या पक्ष्यांचें बीज पक्षी आणि सरपटणाऱ्या सर्पांचें बीज सर्प; आणि त्याच प्रमाणें गोधादि प्राणी अंडा-पासून उत्पन्न होतात, त्यांचे बीज आंडजच होत असें समजावें.

**नन्वण्डाज्जातमण्डजमुच्यतेऽतोऽण्डमेव बीजमिति युक्तं कथ-मण्डजं बीजमुच्यते । सत्यमेवं स्याद्यदि त्वदिच्छातन्त्रा श्रुतिः स्यात्स्वतन्त्रा तु श्रुतिर्यत आहाऽऽण्डजाद्येव बीजं नाण्डादीति । दृश्यते चाण्डजाद्यभावे तज्जातीयसंतत्यभावो नाण्डाद्यभावे । अतोऽण्डजादीन्येव बीजान्यण्डजादीनाम् । तथा जीवाज्जातं जीवजं जरायुजमित्येतत्पुरुषपश्वादि । उद्भिज्जमुद्भिनत्तीत्युद्भि-त्स्थावरं ततो जातमुद्भिज्जं धाना वोद्भित्ततो जायत इत्युद्भिज्जं स्थावरबीजं स्थावराणां बीजमित्यर्थः । स्वेदसंशोकजयोरण्डजो-द्भिज्जयोरेव यथासंभवमन्तर्भावः । एवं ह्यवधारणं त्रीण्येव बीजा-नीत्युपपन्नं भवति ॥ १ ॥**

**सिद्धांति**—आतां कोणी असें ह्मणेल कीं, अण्डापासून उत्पन्न झालेल्यास जर आपण अंडज ह्मणतों तर या अंडजांचे अण्ड हेंच बीज समजणें योग्य आहे. मग आंडजाला बीज ही संज्ञा श्रुतीनें कशी दिली? ह्या शंकेचें समाधान असें आहे; शंका-काराचें ह्मणणें सत्य होईल. केव्हां? जेव्हां त्याच्या इच्छेप्रमाणें श्रुति आपलें ह्मणणें निर्दिष्ट करील! पण श्रुति परतंत्र नाहीं स्वतंत्र आहे आणि ज्यापक्षीं आंडजादि हेंच बीज आहे, असें श्रुतीनें ह्मटलें आहे त्याअर्थी पौरुषेय व्युत्पत्ति सोडून देऊन आंडज हेंच बीज आहे, अडादि नाहीं असें आपल्यास ह्मटलें पाहिजे! शिवाय, व्यवहारांतहि आपाल्यास असें दिसते कीं, आंडजाच्या अभावीं, आंडजजातीचीं संतति विद्यमान असूं शकत नाहीं. आंडजांच्या अभाव असून अंडांचा भाव असला तरी संततीची वृद्धि होत नाहीं, हेंही आपल्यास दिसतें. ह्मणून आंडजांचीं बीजें आंडजच होत. याचप्रमाणें जीवापासून जीवज अथवा जरायुत म्हणजे पुरुषपश्वादि जन्म पावतात म्हणून त्यास जीवज म्हणतात. उद्भिज्ज म्हणजे उद्भिदापासून, स्थावरापासून, झालेंली भूतें होत. धाना इत्यादि बीज-विषय आहेत, त्यापासून उत्पन्न झालेले ते उद्भिज्ज होत तात्पर्य-स्थावरांचे स्थावर बीज असतें. आतां स्वेदज, घर्मापासून झालेले डास, माशा इत्यादि यांचा अंतर्भाव उद्भिज्जामध्यें होतो आणि संशोक म्हणजे उष्णता इच्यापासून झालेले यूकादि यांचा अंतर्भाव अंडजामधें होतो. तात्पर्य बाकीच्या सर्वांचा अंतर्भाव श्रुतीनें

सांगितलेल्या तीन बीजांत होतो. ह्मणून श्रुतीनं मंत्रामध्यें "त्रीणीएव" या शब्दांचा उपयोग करून तीनच बीजें आहेत, असें सांगितलें आहे. तीनच बीजें आहेत आणि तें सांगणें योग्यही आहे ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**सेयं देवतैक्षत हन्ताहमिमास्तिस्रो देवता अनेन जीवेनाऽऽत्मनाऽनुप्रविश्य नामरूपे व्याकरवाणीति ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थ**—**सा इयं देवता ऐक्षत** ( त्या ह्या देवतेनें पाहिलें ह्मणजे संकल्प केला ) **हंत अहं इमाः तिस्रः देवताः अनेन जीवेन आत्मना अनुप्रविश्य नामरूपे व्याकरवाणि इति** ( अहो ! आतां येथें त्या तीन देवता आहेत. त्या देवतांमध्यें ह्या जीवरूपी आत्म्यासह मीं प्रवेश करून नामरूपांचे व्याकरण—स्पष्टीकरण करणार आहें करावें ) ॥२॥

सेयं प्रकृता सदाख्या तेजोबन्नयोनिर्देवतोक्तैक्षतेक्षितवती यथा पूर्वं बहु स्यामिति । तदेव बहुभवनं प्रयोजनं नाद्यापि निर्वृत्तमित्यत ईक्षां पुनः कृतवती बहुभवनमेव प्रयोजनमुररीकृत्य । कथम् । हन्तेदानीमहमिमा यथोक्तास्तेजआद्यास्तिस्रो देवता अनेन जीवेनेति स्वबुद्धिस्थं पूर्वसृष्ट्यनुभूतप्राणधारणमात्मानमेव स्मरन्त्याहानेन जीवेनाऽऽत्मनेति । प्राणधारणकर्त्राऽऽत्मनेति वचनात्स्वात्मनोऽव्यतिरिक्तेन चैतन्यस्वरूपतयाऽविशिष्टेनेत्येतद्दर्शयति । अनुप्रविश्य तेजोबन्नभूतमात्रासंसर्गेण लब्धविशेषविज्ञाना सती नाम च रूपं च नामरूपे व्याकरवाणि विस्पष्टमाकरवाण्यसौ नामाऽयमिदंरूप इति व्याकुर्यामित्यर्थः ।

**सिद्धांतीः**—तीही प्रस्तुत चर्चेचा विषय असलेली सत् नामक देवता तेज, आप, आणि अन्न यांची उत्पादक आहे. असो; पूर्वीच सांगितली आहे. त्या देवतेनें पूर्वीप्रमाणेंच पुष्कळ होण्याचा संकल्प केला. अद्यापपर्यंत पुष्कळ होण्याचा हेतु सिद्ध झाला नव्हता; म्हणून पुष्कळ होण्याच्या हेतूनेंच पुन्हा तिनें संकल्प, केला असें श्रुति सांगत आहे, हा संकल्प असा आहे. सत् देवता म्हणते. तेजःप्रभृति ह्या त्या तीन देवता आहेत. आतां ह्मणजे महाभूतांच्या उत्पत्तीनंतर ह्या जीवानें ह्मणजे आपल्या बुद्धीच्या ठिकाणीं राहणारा आणि पूर्वसृष्टीमधें प्राणधारण करण्याचा अनुभव आलेला जो आत्मरूपी जीव त्या जीवाचें स्मरण करित होत्साती देवता म्हणते. त्या जीव स्वरूपी आत्म्यानें मीं ह्या देवतांमधें प्रवेश करणार आहें. प्राणधारण करणारा आत्म असें

झाल्याचें कारण हें आहे कीं, आत्मस्वरूपाशिवाय भिन्न नसणारा आणि केवळ चैतन्यस्वरूप असल्यामुळें कोणत्याही उपाधीनें विशिष्ट न झालेला आत्मा होय, असें श्रुतीस सांगावयाचें आहे. अनुविश्यप्रविश्य म्हणजे प्रवेश करून. तेज, जल, अन्न या महाभूतांच्या तन्मात्रांशीं ( महाभूतांचा शुद्ध अंश म्हणजे तन्मात्रा होय ) संसर्ग झाल्यामुळें या सत् नामक देवतेला विशेष ज्ञान प्राप्त होतें. प्रवेश करून प्रत्येक तेजादि भुतांचे विशेष ज्ञान झाल्या नंतर आपण नामरूपांचे व्याकरण करूं, प्रत्येकास विशेष रूप आणि विशेष नाम देऊं. आमक्या पदार्थाचें नांव अमूक हें ठरवूं, असा श्रुतीनें ठराव केला.

( निर्विकल्प, चिन्मात्ररूपी सतानें मायेला वश करून घेऊन तिच्या साह्यानें तेज प्रभृति महाभूतें उत्पन्न केलीं; आणि नंतर पूर्वकल्पांत आलेल्या अनुभवाचें स्मरण होऊन ही सद्रूपी देवता तेजःप्रभृती महाभूतांत प्रवेश करिती झाली. आणि नंतर सूत्रात्मा विराटात्मा, विशिष्टात्मा अशी स्वरूपें घेऊन समष्टीच्या रूपानें आणि व्यष्टीच्या रूपानें प्रवेश करिती झाली. नतर तिनें त्या, त्या, देवांचा अभिमान धरून प्रत्येक वस्तूंचें स्वरूप आणि तिचें नांव ठरविलें. असें वरील मंत्राचें तात्पर्य आहे. )

ननु न युक्तमिदमसंसारिण्याः सर्वज्ञाया देवताया बुद्धिपूर्वकमनेकशतसहस्रानर्थाश्रयं देहमनुप्रविश्य दुःखमनुभविष्यामीति संकल्पनमनुप्रवेशश्च स्वातन्त्र्ये सति । सत्यमेवं न युक्तं स्याद्यदि स्वेनैवाविकृतेन रूपेणानुप्रविशेयं दुःखमनुभवेयमिति च संकल्पितवती न त्वेवम् । कथं तर्हि । अनेन जीवेनाऽऽत्मनाऽनुप्रविश्येति वचनात् । जीवो हि नाम देवताया आभासमात्रम् । बुद्ध्यादिभूतमात्रासंसर्गजनित आदर्शे इव प्रविष्टः पुरुषप्रतिबिम्बो जलादिष्विव च सूर्यादीनाम् । अचिन्त्यानन्तशक्तिमत्या देवताया बुद्ध्यादिसंबन्धश्चैतन्याभासो देवतास्वरूपाविवेकग्रहणनिमित्तः सुखी दुःखी मूढ इत्याद्यनेकविकल्पप्रत्ययहेतुः । छायामात्रेण जीवरूपेणानुप्रविष्टत्वाद्देवता न दैहिकैः स्वतः सुखदुःखादिभिः संबध्यते । यथा पुरुषादित्यादय आदर्शोदकादिषु च्छायामात्रेणानुप्रविष्टा आदर्शोदकादिदोषैर्न संबध्यन्ते तद्वद्देवताऽपि ।

" सूर्यो यथा सर्वलोकस्य चक्षुर्न लिप्यते चाक्षुषैर्बाह्यदोषैः ।
एकस्तथा सर्वभूतान्तरात्मा न लिप्यते लोकदुःखेन बाह्यः ।
आकाशवत्सर्वगतश्च नित्यः " इति हि काठके ।
" ध्यायतीव लेलायतीव" इति च वाजसनेयके ।

सिद्धांतीः—येथें शंका येते ती अशी कीं, सत्नामक देवता संसारातीत आणि सर्वज्ञ अशी आहे. आतां या देवतेनें बुद्धिपूर्वक ( जाणूनसवरून ) अनेक लक्षावधी अनर्था-

चें अधिष्ठान असणाऱ्या देहामधें प्रवेश करण्याचा आणि तेथें राहून तेथें उत्पन्न होणाऱ्या दुःखांचा अनुभव घेण्याचा संकल्प करावा; आणि त्या संकल्पाप्रमाणें प्रवेशही करावा, हें योग्य दिसत नाहीं. स्वतंत्र असणाऱ्या सन्नामक देवतेला परतंत्र होऊन दुःख भोगण्याची अपेक्षा कां उत्पन्न व्हावी ? या शंकाकाराचें म्हणणें खरें झालें असतें. स्वतःच्या अविकृत स्वरूपानें म्हणजे आत्मैकस्वरूपानें प्रवेश करून दुःखानुभव घेण्याचा संकल्प या सत्नामक देवतेनें केला असतां तर शंकाकाराचे म्हणणें योग्य झालें असतें. पण तेजःप्रभृती भूतांमधें. सताचा प्रवेश झालाच नाहीं. श्रुतीचें वचन " अनेन जीवेन आत्मना अनुप्रविश्य " असें आहे. जीव म्हणजे आत्मस्वरूपाचा आभास मात्र आहे. आरशामधें पुरुषाचें प्रतिबिंब प्रवेश करितें. किंवा जलामधें सूर्यचंद्रादि प्रतिबिंबरूपानें प्रवेश करितात, त्याप्रमाणें बुद्धिप्रभृति भूतमात्राशीं चिदात्म्याचा संपर्ग झाल्यामुळें उत्पन्न झालेला, तो जीव होय अर्थात तो बुध्यादिकांच्या तंत्रानेंच चालणारा असतो. चिदात्म्याचा बुद्ध्यादि भूतमात्राशीं संसर्ग होतो तो अचित्य आणि अनंत शक्तीची जी दैवी माया आहे, तिच्यामुळें होतो. संबंध म्हणजेच चैतन्याभास म्हणजे जीव. याजी-वाला माझें परमात्मस्वरूप आहे, या जाणिवेचा अभाव होतो आणि मी सुखी, दुःखी, मूढ इत्यादि अनेक प्रकारचे विक्षेप उत्पन्न होतात असा या मायेचा हा खेळ आहे.

छायामात्र स्वरूपानें, प्रवेश करणे म्हणजेच जीवरूपानें प्रवेश करणें होय. जीव म्हणजे आत्मस्वरूपाची छाया. असें असल्यामुळें जीवाच्या मूळ स्वरूपाचा म्हणजे आत्म्याचा, देहास प्राप्त होणाऱ्या सुखदुःखादिकाशीं, कोणताही वास्तविक संबंध नसतो. आरशामध्यें किंवा उदकामध्यें छायामात्रेंकरून प्रतिबिंबत झालेला पुरुष किंवा आदित्य हे जसे आरशाच्या किंवा उदकाच्या दोषानें मूळस्वरूपांत लिप्त होत नाहींत त्याप्रमाणें छायेला होतातशी भासणारीं सुखदुःखं आत्मस्वरूपाला विकृत करूं शकत नाहींत. म्हटलें आहे " सर्व लोकांचा चक्षु असणारा सूर्य, चक्षूच्या बाह्यदोषांनीं लिप्त होत नाहीं, याप्रमाणें सर्व भूतांच्या अतर्यामीं राहणारा एक रस परमात्मा लोकाच्या दुःखानें मुळींच लिप्त होत नाहीं. कारण तो सर्वातीत आहे.

तो आकाशाप्रमाणें सर्वगामी असून नित्य आहे. "

अशी काठक श्रुति आहे.

" तो ध्यान करितोसा दिसतो; व लीला करितोसा दिसतो ' असें वाजसनेय श्रुति म्हणते.

**ननु च्छायामात्रश्चेज्जीवो मृषैव प्राप्तस्तथा परलोकेहलोकादि च तस्य । नैष दोषः । सदात्मना सत्यत्वाभ्युपगमात् । सर्वं च नामरूपादि सदात्मनैव सत्यं विकारजातं स्वतस्त्वनृतमेव । वाचाऽऽरम्भणं विकारो नामधेयमित्युक्तत्वात् । तथा जीवोऽपीति । यक्षानुरूपो हि बलिरिति न्यायप्रसिद्धिः । अतः सदात्मना सर्वव्यवहाराणां सर्वविकाराणां च सत्यत्वं सतोऽन्यत्वे चानृतत्वमिति न कश्चिद्दोषस्तार्किकैरिहानुवक्तुं शक्यः । यथेतरेतरविरुद्धद्वैतवादाः स्वबुद्धिविकल्पमात्रा अतत्त्वनिष्ठा इति शक्यं वक्तुम् ॥ २ ॥**

पूर्व०—जर जीव छायामात्र आहे तर तो मृषा ह्मणजे मिथ्याच असला पाहिजे. त्याचप्रमाणें परलोक, हा लोक, हेही त्याला मिथ्या असले पाहिजेत. तात्पर्य, सर्वच मिथ्या असले पाहिजे.

सिद्धांति—हा कांहीं दोष नव्हे. विशिष्टरूपानें जीव मिथ्या आहे तरी स्वरूपतः जीव सद्रूप आहे; आणि ह्मणून मात्र मोक्षही सद्रूप, सत्य आहे, असा श्रुतीचा सिद्धांत आहे. हें जें आपल्यास नामरूपात्मक जगत् दिसत आहे, तें स्वरूपतः सदात्मक आहे; ह्मणून परमार्थतः सत्यच आहे; पण नामरूपादि जे असन्मूलक विकार आहेत आणि आपल्यास जे अनंत पदार्थ दिसतात, तें दिसणें आत्मव्यतिरिक्त असल्यामुळें अनृत ह्मणजे असत् होय. प्रत्येक विकार शब्दमात्र आहे, शब्दापलीकडे तेथें कांहीं नाहीं. असें आपण मागेंच ठरविलें आहे. अशीच स्थिति जीवाचीही आहे.

( प्रपंच ब्रह्मात्मक आहे; ह्मणून सत्य आहे, तथापि तो स्वतः मिथ्याच आहे. कारण तो कार्यरूप आहे. त्याचप्रमाणें जीवशब्दानें वाच्य असणारी वस्तु ब्रह्मात्मक आहे ह्मणून सत्य तथापि कार्य दिसतें, ह्मणून असत्य आहे. )

सिद्धांती—यक्षानुरूप बली असावा, असा न्याय प्रसिद्ध आहे; ह्मणून सर्व व्यवहार आणि सर्व विकार ( कार्यें ) यद्यपि ब्रह्मस्वरूप आहेत; ह्मणून खरीं आहेत तथापि तीं सताहून अन्य दिसणारीं आहेत; ह्मणून तीं सर्व मिथ्या आहेत. छायामात्र दिसणारा विकारी जीव मिथ्या, त्याचप्रमाणें आपले सर्व व्यवहार मिथ्या होत, असें आहे ह्मणून आमच्या प्रक्रियेवर तार्किकांना कोणताही आक्षेप घेतां येत नाहीं.

प्रपंच मिथ्या आहे, असें ह्मटलें ह्मणजे आम्हीं बुद्धांचा पक्ष स्वीकारातों, असें तार्किकांस वाटतें; पण हें वाटणें बरोबर नाहीं. प्रपंच मिथ्या याचा अर्थ तो शून्यरूप आहे असें नव्हे. दृश्यभास्य मिथ्या असलें तरी त्याच्या पाठीमागें नित्य व अखंड विद्यमान असणारें ब्रम्ह सत्य आहे. बुद्धांस हें अखंड सद्रूप मान्य नाहीं.

असो. सर्व द्वैतवादी परस्पराच्या विरुद्ध आक्षेप घेत असतात; व परस्परांस निरुत्तर करतात. याचें कारण त्यांनीं जे मूळ सिद्धांत ह्मणून घेतलेले असतात ते त्यांनीं आपल्या बुद्धींतून मात्र निर्माण केलेले असतात. त्याना तत्वांचा ह्मणजे श्रुतीचा आधार नसताच नसतो; म्हणून ते जसे अतत्त्वनिष्ठ,तसेच हे तार्किकही ( न्यायवादी ) अतत्त्वनिष्ठ होत.

आमची श्रुतिनिष्ठ अद्वैत प्रक्रिया श्रुतीला मान्य आहे; म्हणून आमच्या विरुद्ध कोणालाही निरुत्तर आक्षेप घेतां येत नाहीं. आमचा निराबाध सिद्धांत खराच आहे ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**तासां त्रिवृतं त्रिवृतमेकैकां करवाणीति सेयं देवतेमास्तिस्रो देवता अनेनैव जीवेनाऽऽत्मनाऽनुप्रविश्य नामरूपे व्याकरोत् ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थ—तासां एकैकां त्रिवृतं त्रिवृतं करवाणि इति** ( देवतेनें संकल्प केला कीं, ह्या तिन्हींपैकीं प्रत्येकीस मीं त्रिवृत, त्रिवृत करीन. ) **सा इयं देवता इमाः तिस्रः देवताः अनेन एव जीवेन आत्मना अनुप्रविश्य नामरूपे व्याकरोत्** ( ह्या तीन देवतांपैकीं प्रत्येकींमध्यें ह्याच जीवासह आपण आत्मस्वरूपानें प्रवेश करून ह्या देवतेनें नामरूपांचें व्याकरण केलें ) ॥ ३ ॥

सैवं तिस्रो देवता अनुप्रविश्य स्वात्मावस्थे बीजभूते अव्याकृते नामरूपे व्याकरवाणीतीक्षित्वा तासां च तिसृणां देवतानामेकैकां त्रिवृतं त्रिवृतं करवाणि । एकैकस्यास्त्रिवृत्करणं एकैकस्याः प्राधान्यं द्वयोर्द्वयोर्गुणभावोऽन्यथा हि रज्ज्वा इवैकमेव त्रिवृत्करणं स्यात् । न तु तिसृणां पृथक्पृथक्त्रिवृत्करणमिति । एवं हि तेजोबन्नानां पृथङ्नामप्रत्ययलाभः स्यात्तेज इदमिमा आपोऽन्नमिदमिति च । सति च पृथङ्नामप्रत्ययलाभे देवतानां सम्यग्व्यवहारस्य प्रसिद्धिः प्रयोजनं स्यात् । एवमीक्षित्वा सेयं देवतेमास्तिस्रो देवता अनेनैव यथोक्तेनैव जीवेन सूर्यबिम्बवदन्तः प्रविश्य वैराजं पिण्डं प्रथमं देवादीनां च पिण्डानुप्रविश्य यथासंकल्पमेव नामरूपे व्याकरोदसौनामाऽयमिदंरूप इति ॥ ३ ॥

सिद्धांती:—याप्रमाणें ह्या तीन देवतांमध्यें प्रवेश करून त्यांच्यामध्यें बीजरूपानें अव्याकृत असलेलीं नामरूपें व्याकृत करावीं असा संकल्प करून व 'त्या तीन देवतांपैकीं प्रत्येक देवतेला त्रिवृत्त त्रिवृत करीन' असे संकल्प आत्मदेवतेनें केले. ( त्रिवृत् करणें म्हणजे प्रथमतः प्रत्येक देवतेचे दोन दोन भाग करणें आणि पुन्हा त्या अर्ध्या भागाचे दोन भाग करणें आणि नंतर एका देवतेचा अर्धा भाग व दुसऱ्या दोन देवतांचा ¼ भाग एकत्र करणें याचें नांव त्रिवृत्त करण होय,

असो प्रत्येक देवतेचे त्रिवृत्त करण केलें म्हणजे प्रत्येक देवतेचे प्राधान्य राहून बाकीच्या दोन्हींही देवतांस गुणभाव येतो. ( उदाहरणार्थ अग्निदेवतेचें त्रिवृत् करण झाले म्हणजे अग्नि देवतेचा अर्धा भाग जल देवतेचा ¼ भाग आणि अन्नदेवतेचा, पृथ्वीचा, ¼ भाग. तेथें असतात. याचप्रमाणें जल देवतेचे व अन्न देवतेचें त्रिवृत करण होत असतें. अर्थातच अग्नीमध्यें अग्नि देवतेचा प्रधान भाग असतो; म्हणून त्याला अग्नि म्हणतात. अग्नींत इतर देवतांचा भाग थोडा म्हणजे ¼ असतो.

याप्रमाणें त्रिवृत् करण केलें नाहीं तर तीन सुतें एकत्र करून जसा एकच दोर निर्माण करितो असा प्रसंग प्राप्त होईल. सर्वांस एक स्वरूप येईल; आणि तिन्हीं देवतांचें भिन्न भिन्न त्रिवृत् करण होणार, हें वर आम्ही सांगितलें आहे, तसें त्रिवृत् करण झालें म्हणजे तेज, आप आणि अन्न यांनां विशेष नांव आणि विशेष प्रत्यय प्राप्त

होऊन हें तेज, हीं जळें, हें अन्न, अशीं निरनिराळीं विशेषनामें आणि विशेष प्रत्यय देणारीं रूपें ठरवितां येतील. विशेषनामें आणि विशेष प्रत्यय देणारीं रूपें प्रत्येक देवतेला मिळून यथार्थ व्यवहाराची सिद्धि व्हावी, हे आत्मदेवतेचें प्रयोजन सिद्ध होतें. याप्रमाणें संकल्प करून ती ही आत्मदेवता ह्या तीन देवतांमध्यें पूर्वकथित जीवस्वरूपासह आपण स्वतः प्रविष्ट झाली. जलामध्यें सूर्यबिंब प्रवेश करितें त्याप्रमाणें प्रथम विराट् स्वरूपामध्यें प्रवेश करून नंतर देवतांच्या पिंडांत तिनें प्रवेश केला; आणि स्वसंकल्पाप्रमाणें नामरूपें व्याकृत केलीं. ह्या पदार्थांचें हें नांव आणि हें स्वरूप अशीं नामरूपें स्पष्ट केलीं ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा.

**तासां त्रिवृतं त्रिवृतमेकैकामकरोद्यथा तु खलु सोम्येमास्तिस्रो देवतास्त्रिवृत्त्रिवृदेकैका भवति तन्मे विजानीहीति ॥ ४ ॥**

**इति षष्ठाध्यायस्य तृतीयः खण्डः ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थः—तासां एकैकां त्रिवृतं त्रिवृतं अकरोत्** ( त्या तिन्ही देवतांपैकीं प्रत्येकीचें त्रिवृत्करण केलें ) **सोम्य यथा तु खलु इमाः तिस्रः देवताः त्रिवृत् त्रिवृत् एकैका भवति, तत् मे विजानीहि इति** ( हे सोम्य, या तिन्ही देवतांचें त्रिवृत् त्रिवृत् करण होऊन प्रत्येक देवता कशी झाली तें मीं तुला सांगतों, नीट लक्ष देऊन ऐक, सारांश माझ्यापासून समजून घे ) ॥ ४ ॥

तासां च देवतानां गुणप्रधानभावेन त्रिवृतं त्रिवृतमेकैकामकरोत्कृतवती देवता । तिष्ठतु तावद्देवतादिपिण्डानां नामरूपाभ्यां व्याकृतानां तेजोबन्नमयत्वेन त्रिधात्वं यथा तु बहिरिमाः पिण्डेभ्यास्तिस्रो देवतास्त्रिवृत्त्रिवृदेकैका भवति तन्मे मम निगदतो विजानीहि विस्पष्टमवधारयोदाहरणतः ॥ ४ ॥

इति षष्ठाध्यायस्य तृतीयः खण्डः ॥ ३ ॥

सिद्धांतीः—मागें सांगितल्याप्रमाणें गुणप्रधान भाग कायम ठेऊन त्या देवतांपैकीं प्रत्येक देवतेचे आत्मदेवतेनें त्रिवृत करण केलें नामरूपादि रूपांनीं व्याकृत झालेल्या देवतादि पिण्डाचें तेज, आप आणि अन्नस्वरूपांनीं त्रिप्रकारित्व झालें, हें तर ठरावलेंच ?

आतां प्रथम ह्या देहपिण्डाबाहेर असणाऱ्या तिन्ही देवतांपैकीं प्रत्येक देवता कशी त्रिवृत् झाली तें तुला मीं सांगतों, तें लक्ष देऊन ऐक. एक उदाहरण घेऊन तुला मीं

हें सर्व स्पष्ट करून सांगतों. प्रथमत देवतांच्या त्रिवृत्करणाचा विचार व नंतर देहांतील त्रिवृत्करणाचा विचार करावयाचा ॥ ४ ॥

सहाव्या अध्यायाचा तिसरा खंड समाप्त.

---

## अध्याय ६ वा खंड ४ था.

### मंत्र पहिला.

**यदग्ने रोहितँ रूपं तेजसस्तद्रूपं यच्छुक्लं तदपां यत्कृष्णं तदन्नस्यापागादग्नेरग्नित्वं वाचाऽऽरम्भणं विकारो नामधेयं त्रीणि रूपाणीत्येव सत्यम् ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थ—यत् अग्नेः रोहितं रूपं तत् तेजसः रूपं; यत् शुक्लं तत् अपां; यत् कृष्णं तत् अन्नस्य** ( अग्नीचें जें रोहित ह्मणजे तांबडें स्वरूप आहे, तें तेजाचें रूप आहे, जें पांढरें रूप आहे, तें जलांचें आणि काळें रूप आहे तें अन्नाचें होय ) **अग्नेः अग्नित्वं अपागात्** ( याप्रमाणें अग्नीचें अग्नित्व नाहींसें होतें ) **वाचाऽऽरंभणं विकारः नामधेयं; त्रीणि रूपाणि इति एव सत्यं** ( प्रत्येक विकार वाणीचा आश्रित असून शब्द मात्र आहे. तीन रूपें ही मात्र सत्य वस्तू आहे ) ॥ १ ॥

यत्तद्देवतानां त्रिवृत्करणमुक्तं तस्यैवोदाहरणमुच्यते । उदाहरणं नामैकदेशप्रसिद्ध्याऽशेषप्रसिद्ध्यर्थमुदाह्रियत इति । तदेतदाह— यदग्नेस्त्रिवृत्कृतस्य रोहितं रूपं प्रसिद्धं लोके तदत्रिवृत्कृतस्य तेजसो रूपमिति विद्धि । तथा यच्छुक्लं रूपमग्नेरेव तदपामत्रिवृत्कृतानां यत्कृष्णं तस्यैवाग्ने रूपं तदन्नस्य पृथिव्या अत्रिवृत्कृताया इति विद्धि । तत्रैवं सति रूपत्रयव्यतिरेकेणाग्निरिति यन्मन्यसे त्वं तस्याग्नेरग्नित्वमिदानीमपागादपगतम् । प्राग्रूपत्रयविवेकाविज्ञानाद्याऽग्निबुद्धिरासीत्ते साऽग्निबुद्धिरपगताऽग्निशब्दश्चेत्यर्थः । यथा दृश्यमानरक्तोपधानसंयुक्तः स्फटिको गृह्यमाणः पद्मरागोऽयमिति-शब्दबुद्ध्योः प्रयोजको भवति प्रागुपधानस्फटिकयोर्विवेकविज्ञाना-त्तद्विवेकविज्ञाने तु पद्मरागशब्दबुद्धी निवर्तेते तद्विवेकविज्ञातु-स्तद्वत् । ननु किमत्र बुद्धिशब्दकल्पनया क्रियते प्राग्रूपत्रयविवेक-

करणादग्निरेवाऽऽसीदग्नेरग्नित्वं रोहितादिरूपविवेककरणादपागा-दिति युक्तं यथा तन्त्वपकर्षणे पटाभावः । नैवं बुद्धिशब्दमात्रमेव ह्यग्निर्यत आह वाचाऽऽरम्भणमग्निर्नाम विकारो नामधेयं नाम-मात्रमित्यर्थः । अतोऽग्निबुद्धिरपि मृषैव । किं तर्हि तत्र सत्यं त्रीणि रूपाणीत्येव सत्यं नाणुमात्रमपि रूपत्रयव्यतिरेकेण सत्य-मस्तीत्यवधारणार्थः ॥ १ ॥

**सिद्धांती**—त्या देवतांचें जें त्रिवृत्करण झालें ह्मणून सांगितलें त्याचेंच येथें एक उदाहरण श्रुति देत आहे. बाकीच्या तज्जातीय गोष्टींच्या सिद्धीसाठीं एकदेशामध्यें प्रसिद्ध असलेल्या वस्तूंची जी प्रसिद्ध असलेली गोष्ट घेणें त्याचें नांव उदाहरण होय. हें उदाहरण कसें आहे तें पहा. त्रिवृत्करण झालेल्या अग्नीचें स्वरूप तांबडें असतें अशी लोकांत प्रसिद्धि आहे. तें तांबडें रूप त्रिवृत्करण न झालेल्या तेजाचें असतें, हें ध्यानांत ठेव. त्याचप्रमाणें ह्या त्रिवृत्कृत अग्नीचें शुभ्ररूप दिसतें तें त्रिवृत् न झालेल्या जलाचें आहे. आणि ह्याच अग्नींत काळेपणा दिसतो, तो मूळचा अन्नाचा आहे. असें आहे ह्मणून तांबडें पांढरें आणि काळें अशीं अग्नीचीं रूपें दिसतात, त्यांशिवाय अग्नि ह्मणून कांहीं निराळी वस्तु आहे असें जर ह्मणशील, तर तुला कळेल कीं, येथें अग्नीचें अग्नित्व विनष्ट होतें ( आपल्याला अग्नीमध्यें ज्वाळमध्यें तीन रंग दिसतात, ते तेज, आप, आणि अन्न ह्यांचे अंश आहेत, हे अंश काढून घेतले असतां आपल्यास दिसणाऱ्या अग्नीचें अग्नित्वच नाहींसें होईल, यांत शंका नाहीं. )

तात्पर्य. रूपत्रयाचें विवेकविज्ञान होण्यापूर्वी अग्निसंबंधानें जी तुझी बुद्धि होती, अग्नीचें तुला ज्ञान होतें, तें ज्ञान किंवा बुद्धि रूपत्रयाचा विवेक होऊन विज्ञान झाल्यानंतर नाहींशी होते; व अग्नि शब्दाहि अयथार्थ ह्मणजे व्यर्थ होतो. पहा कीं एखाद्या स्फटिकाच्या मागें तांबडा पदार्थ ठेविला असतां व आपण तो पाहिला असतां हा पद्मराग आहे, असा प्रत्यय आपल्यास येतो आणि ‘ पद्मराग ’ हा शब्दही आपण उपयोजितों. हें कोठपर्यंत ? तो ठेवलेला तांबडा पदार्थ आणि स्फटिक ह्यांच्या विवेकाचें विज्ञान झालें नाहीं तोंपर्यंत. परंतु एकदां विवेक विज्ञान झालें ह्मणजे पद्मराग हा शब्द आणि पद्मरागाचा प्रत्यय हीं दोन्हीं मावळून जातात आणि विवेकविज्ञाता ‘ हा पद्मराग आहे ’ असें म्हणतही नाहीं.

**पूर्व:** –अहो, श्रुतींतील मंत्रामध्यें बुद्धीची आणि शब्दाची कल्पनाच नाहीं. ही अधिक कल्पनाच तुह्मी कशाला घेतां ? रूपत्रयाचा विवेक करण्यापूर्वीही तो अग्निच होता. तें अग्नीचें अग्नित्व रूपत्रयविवेक झाल्यानंतर नाहींसें झालें, असें ह्मणा. पटांतून सर्व तंतू काढून घेतले ह्मणजे पटाचा अभाव होतो, त्याप्रमाणें विवेका-पूर्वी विद्यमान असलेल्या अविद्येचें रूपत्रय काढून घेतलें ह्मणजे अग्नीचें अग्नित्वही नाहींसें होतें, असें ह्मणा ?

**सिद्धांती:**—तसें नाहीं. कारण अग्नि हा वस्तुतः बुद्धिमात्र व शब्दमात्र आहे. आप-ल्याला प्रत्यय येतो व आपण नाम देतों इतकेंच. याच्यापलीकडे कार्यरूपीं असणारा अग्नि

वस्तुतः कांहीं नाहीं. आणि म्हणूनच श्रुति ह्मणते कीं, अग्नि हे नांव केवळ वाचारंभण आहे, विकार आहे, शब्दमात्र आहे; ह्मणून अग्नि बुद्धि सुद्धां मिथ्या आहे, सत्य-काय आहे म्हणाल तर रोहितादि तीन रूपें मात्र सत्य आहेत. या रूपत्र-याच्या व्यतिरिक्त अग्नि वस्तूंत अणुमात्र सुद्धां सत्यत्व नाहीं, हें ध्यानांत ठेवा ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा, तिसरा, चवथा.

**यदादित्यस्य रोहितꣳ रूपं तेजसस्तद्रूपं यच्छुक्लं तदपां यत्कृष्णं तदन्नस्यापागादादित्यादादित्यत्वं वाचाऽऽरम्भणं विकारो नामधेयं त्रीणि रूपाणीत्येव सत्यम् ॥ २ ॥**

**यच्चन्द्रमसो रोहितꣳ रूपं तेजसस्तद्रूपं यच्छुक्लं तदपां यत्कृष्णं तदन्नस्यापागाच्चन्द्राच्चन्द्रत्वं वाचाऽऽरम्भणं विकारो नामधेयं त्रीणि रूपाणीत्येव सत्यम् ॥ ३ ॥**

**यद्विद्युतो रोहितꣳ रूपं तेजसस्तद्रूपं यच्छुक्लं तदपां यत्कृष्णं तदन्नस्यापागाद्विद्युतो विद्युत्त्वं वाचाऽऽरम्भणं विकारो नामधेयं त्रीणि रूपाणीत्येव सत्यम् ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थः**—( ह्या तिन्ही मंत्राचा अन्वयार्थ पहिल्या मंत्रा-प्रमाणें आहे. दुसऱ्या मंत्रांत आदित्य, तिसऱ्यांत चंद्रमा व चौथ्यांत विद्युत् अशीं तेजस्वी पदार्थांचीं उदाहरणें घेतलीं आहेत. अन्वय व अर्थ स्पष्ट आहेत ह्मणून ते येथें दिले नाहींत ) ॥ २ ॥ ३ ॥ ४ ॥

तथा यदादित्यस्य यच्चन्द्रमसो यद्विद्युत इत्यादि समानम् । ननु यथा तु खलु सोम्येमास्तिस्रो देवतास्त्रिवृत्त्रिवृदेकैका भवति तन्मे विजानीहीत्युक्त्वा तेजस एव चतुर्भिरप्युदाहरणैरग्न्यादिभिस्त्रिवृत्करणं दर्शितं नाबन्नयोरुदाहरणं दर्शितं त्रिवृत्करणे । नैष दोषः । अबन्नविषयाण्यप्युदाहरणान्येवमेव च द्रष्टव्यानीति मन्यते श्रुतिः । तेजस उदाहरणमुपलक्षणार्थम् । रूपवत्त्वात्स्पष्टार्थत्वोपपत्तेश्च । गन्धरसयोरनुदाहरणं त्रयाणामसंभवात् । न हि गन्धरसौ तेजसि स्तः । स्पर्शशब्दयोरनुदाहरणं विभागेन दर्शयितुमशक्यत्वात् ।

सिद्धांतीः—आदित्य, चंद्र, विद्युत् यांचें जें तेज आहे" वगैरेचें स्पष्टीकरण भाष्यांत मंत्रांत सांगितल्याप्रमाणेंच आहे.

पूर्व०—"याप्रमाणें हे सौम्य ह्या तीन देवतांपैकीं प्रत्येकाचें त्रिवृत्करण होतें, तें कसें तें माझ्याकडून समजून घे" असें म्हणून श्रुतीनें तेजाचीच चार उदाहरणें घेतली आहेत आणि अग्नि आदि उदाहरणांमध्यें तेजाचेंच त्रिवृत्करण सांगितले आहे. जल आणि अन्न यांचें उदाहरण घेऊन तेथील त्रिवृत्करण स्पष्ट केलें नाहीं हा मोठा दोष दिसतो.

सिद्धांतीः—नाहीं. जल आणि अन्न हें विषय घेऊन त्यांचीं उदाहरणें सांगावयाचीं. पण आतांच तेजाचीं उदाहरणें दिलीं आहेत त्याच-प्रमाणें अन्नजलाचीं उदाहरणें समजून घ्यावींत, असा श्रुतीचा अभिप्राय आहे. तेजाचें उदाहरण घेतलें, तें उपलक्षणार्थ आहे, (हें उदाहरण समजलें म्हणजे जल, अन्न यांच्या उदाहरणांची समजूत पडेल असें श्रुतीस वाटतें) शिवाय तेज रूपवंत आहे; आणि त्याची उपपत्तिही स्पष्टतऱ्हेने सांगतां येते. गंध आणि रस यांचीं उदाहरणें घेऊन त्रिवृत्करण स्पष्ट केलें नाहीं, याचें कारण तेजाचें त्रिवृत् स्वरूप सहज सांगतां आलें, तसें अबन्नाचें (जल व अन्न याचे) असतें, हें समजणें अशक्य आहे. आतां तेजःप्रभृति तिन्ही देवतांस रूप आहे, तसेंच तेथें गंध व रसही आहेत. मग त्या गंध-रसांत त्रिवृत्करण होत आहे, असें कां सांगत नाहीं? असें म्हणाल तर यद्यपि गंधरसांत त्रिप्रकार आहेत, तथापि ते स्पष्टरीतीनें समजाऊन देतां येण्यासारखे नाहींत. म्हणून त्यांच्या त्रिवृत्करणाची फोड येथें केली नाहीं. तसेंच वायु-आकाश या भूतांमध्यें विद्यमान् असलेले स्पर्श व शब्द ह्या गुणांचींही उदाहरणें दिलीं नाहींत. याचें कारण तेजामध्यें रोहितादि रूपत्रय विभागशः दाखवितां आले, तसें रूपत्रय विभागशः शब्द व स्पर्शांत असलें तरी दिसत नाहीं; म्हणून तसें दाखविणें अशक्य व अर्थात् स्पर्शशब्दांची उदाहरणें देणेंहि अशक्य होय.

यदि सर्वं जगत्त्रिवृत्कृतमित्यग्न्यादिवत्त्रीणि रूपाणीत्येव सत्य-मग्नेरग्नित्ववदपागाज्जगतो जगत्त्वम् । तथाऽन्नस्याप्यप्छुङ्गत्वादाप इत्येव सत्यं वाचारम्भणमात्रमन्नम् । तथाऽपामपि तेजःशुङ्गत्वा-द्वाचारम्भणत्वं तेज इत्येव सत्यम् । तेजसोऽपि सच्छुङ्गत्वाद्वाचा-रम्भणत्वं सदित्येव सत्यमित्येषोऽर्थो विवक्षितः । ननु वाय्वन्त-रिक्षे त्वत्रिवृत्कृते तेजःप्रभृतिष्वनन्तर्भूतत्वादवशिष्येते । एवं गन्ध-रसशब्दस्पर्शाश्चावशिष्टा इति कथं सता विज्ञातेन सर्वमन्यदवि-ज्ञातं भवेत्तद्विज्ञाने वा प्रकारान्तरं वाच्यम् । नैष दोषः । रूपव-द्द्रव्ये सर्वस्य दर्शनात् । कथम् । तेजसि तावद्रूपवति शब्दस्पर्शया-रप्युपलम्भाद्वाय्वन्तरिक्षयोस्तत्र स्पर्शशब्दगुणवतोः सद्भावोऽनुमी-यते । तथाऽबन्नयो रूपवतो रसगन्धान्तर्भाव इति । रूपवतां

त्रयाणां तेजोबन्नानां त्रिवृत्करणप्रदर्शनेन सर्वं तदन्तर्भूतं सद्विकारत्वात्त्रीण्येव रूपाणि विज्ञातं मन्यते श्रुतिः । न हि मूर्तं रूपवद्द्रव्यं प्रत्याख्याय वाय्वाकाशयोस्तद्गुणयोर्गन्धरसयोर्वा ग्रहणमस्ति । अथवा रूपवतामपि त्रिवृत्करणं प्रदर्शनार्थमेव मन्यते श्रुतिः । यथा तु त्रिवृत्कृते त्रीणि रूपाणीत्येव सत्यं तथा पञ्चीकरणेऽपि समानो न्याय इत्यतः सर्वस्य सद्विकारत्वात्सता विज्ञातेन सर्वमिदं विज्ञातं स्यात्सदेकमेवाद्वितीयं सत्यमिति सिद्धमेव भवति । तदेकस्मिन्सति विज्ञाते सर्वमिदं विज्ञातं भवतीति सूक्तम् ॥ २ ॥ ३ ॥ ४ ॥

**सिद्धांती**—याप्रमाणें सर्व जर त्रिवृत्कृत आहे तर अग्नीच्या उदाहरणांत दाखविल्याप्रमाणें ( मंत्र १ ला पहा ) तीन रूपें काय तीं सत्य आहेत, व अग्नि हा विकार असल्यामुळें अग्नीचें अग्नित्व मिथ्या आहे, असें ठरलें. तसेंच जगताचें जगत्वहि कार्यरूपास्तव मिथ्या ठरणार हें उघड आहे. याच न्यायानें अन्न हें जलाचें कार्य आहे म्हणून जल हीच काय ती सत्य वस्तु आहे. अन्न हें वाचारंभण म्हणजे शब्द मात्र अथवा मिथ्या आहे हें ठरतें. आणि असाच विचार पुढें केला म्हणजे जल तेजाचें कार्य आहे, म्हणून जल हा विकार शब्द मात्र अथवा मिथ्या आणि तेज काय ती खरी वस्तु सत्य आहे, असें न्यायाच्या दृष्टीनें ठरतें. श्रुतीला तरी हाच अभिप्राय प्रगट करावयाचा आहे.

**पूर्व०**—अहो ! वायु आणि आकाश तर अत्रिवृत्कृत आहेत. यांचा अंतर्भाव तेजादि तीन देवतांत होत नाहीं; म्हणून ते तर शिल्लक राहतात कीं नाहीं. अर्थात् गंध, रस, शब्द आणि स्पर्श इतक्या वस्तु अवशिष्ट राहात असतां "सताचें विज्ञान झालें तर दुसऱ्या सर्व अविज्ञात वस्तु विज्ञात होतात असें तुम्हीं कसें म्हणतां ? निदान असें तरी करा कीं, दुसरा काहीं प्रकार काढून या गंधरसादिकांचे ज्ञान होईल असें करा.

**सिद्धांती**.—हें तुमचें म्हणणें बरोबर नाहीं; व आमचे म्हणणेंहि दूषित नाहीं. पहा कीं, रूपवान् म्हणून जें द्रव्य आहे, त्यांत गंधरसादि सर्वांचेंच दर्शन होतें. तेज रूपवान् वस्तु आहे. त्या तेजांत शब्दाची ही उपलब्धि होते. अर्थात् शब्द आणि स्पर्श ही ज्यापक्षीं आकाश आणि वायु यांचे गुण आहेत त्यापक्षीं वायु आणि आकाश तेजामध्यें आहेत, असें अनुमान सहज निघतें. गुण असेल तेथें गुणी असावयाचा. त्याचप्रमाणें जल आणि अन्न ह्या रूपवंत वस्तूंत रस गंध यांचा अंतर्भाव होतो! तेज, जल, आणि अन्न ह्या तीन रूपवंत वस्तूंचें त्रिवृत्करण श्रुतीनें प्रकट केलें आहे; म्हणजे त्यांतच गंधरसादिशब्दस्पर्शांचा अंतर्भाव होतो. असें न्यायतः प्राप्त होतें. रोहितादि तिन्हीं रूपें अथवा तेजःप्रभृति तिन्ही वस्तू सताचे विकार

आहेत, म्हणून हा गंध रसादिकांचा अंतर्भाव करणारी तिन्ही रूपें ' एक सत सत्य आहे असें समजतात ' अशा श्रुतीचा सिद्धांत एक आहे. शिवाय रूपवंत मूर्त द्रव्य एकीकडे केलें, विचारांत घेतलें नाहीं तर वायु व आकाश, तसेंच त्यांचे स्पर्श व शब्द हे गुण आणि गंध व रस यांचें आपल्यास गृहणच करितां येणार नाहीं. रूपवंत वस्तु असेल तर गृहण. ज्या अर्थीं रूपवंत तेजादि वस्तूंतच सर्व गुणांचा व वस्तूंचा अंतर्भाव होतो व ज्या अर्थीं तेजादि रूपवंत वस्तू व त्यांचे गुण हे सत्ताचे विकार आहेत त्या अर्थीं एका सताचे ज्ञान झालें म्हणजे सताहून निराळ्या असणाऱ्या सर्व वस्तूचें ज्ञान होतें हे उघड आहे. कारणांचें ज्ञान संपूर्ण झालें म्हणजे कार्याचें ज्ञान होतें. शिवाय रूपवंत वस्तु नाहींत असें समजलें, तर आपल्यास आकाशवायूंची व व शब्दस्पर्शाचे तसेंच गंध व रस याची हे जे त्याचें गुण त्याची उपलब्धिच व्हावयाची नाहीं. एतावता एका सताचें ज्ञान झालें म्हणजे सताच्या सर्व विकाराचें ज्ञान होतें. किंवा याचा अर्थ दुसऱ्याही रीतीनें असा करितां येईल कीं, तेजादि रूपवंत वस्तूचे त्रिवृत्करण श्रुतीनें येथें उल्लेखिलें आहे, ते केवळ प्रदर्शनासाठीं ( पांच तत्वाचें पंचीकरण कसें कसें होतें तें दाखविण्यासाठीं ) केलें आहे. त्रिवृत्करण केल्यानंतर तीन रूपें मात्र ज्याप्रमाणें सत्य आहेत असें ठरविलें त्याप्रमाणेंच पंचीकरणाच्या वेळींही हाच न्याय उपयोजून पांच तत्वें मात्र खरीं आहेत असें मात्र ठरविलें पाहिजे. आतां ही तीन किंवा पांच भूतें एका सताचे मात्र विकार आहेत; म्हणून सताचें विज्ञान झालें असतां या सर्व दृश्य आणि कल्प्य विश्वाचें ज्ञान होतें; म्हणून सताचें हें एकच अद्वितीय असून सत्य आहे हें सिद्ध होतें. अर्थात् सत्स्वरूपानें एकच असणाऱ्या सताचें ज्ञान झालें असतां हें सर्व विज्ञात होतें, असें श्रुतीनें म्हटलें आहे तें योग्यच आहे. ॥ २, ३, ४ ॥

---

## मंत्र पांचवा.

**एतद्ध स्म वै तद्विद्वांस आहुः पूर्वे महाशाला महाश्रोत्रिया न नोऽद्य कश्चनाश्रुतममतमविज्ञात-मुदाहरिष्यतीति ह्येभ्यो विदांचक्रुः ॥ ५ ॥**

**अन्वय व अर्थ—महाशालाः महाश्रोत्रियाः पूर्वे विद्वांसः तत् एतद्ह वै आहुः स्म** ( महाशाल आणि महाविद्वान असे पूर्वीचे हे सर्व जाणणारे विद्वान म्हणत असत ) **अद्य नः कश्चन अश्रुतम्, अमतम्, अविज्ञातम् न उदाहरिष्यति इति** ( आमच्या पैकीं कोणीही

आजपासून अश्रुत, अमत आणि अविज्ञात कांहीं आहे असें ह्मणणार नाहीं.) हि एभ्यः विदांचक्रुः (कारण त्या सर्वांना ह्या गुरूपासून ज्ञान झालें होतें.) ॥ ५ ॥

एतद्विद्वांसो विदितवन्तः पूर्वेऽतिक्रान्ता महाशाला महाश्रोत्रिया आहुर्ह स्म वै किल। किमुक्तवन्त इत्याह—न नोऽस्माकं कुलेऽद्येदानीं यथोक्तविज्ञानवतां कश्चन कश्चिदप्यश्रुतममतमविज्ञातमुदाहरिष्यति नोदाहरिष्यति सर्वं विज्ञातमेवास्मत्कुलीनानां सद्विज्ञानवत्त्वादित्यभिप्रायः। ते पुनः कथं सर्वं विज्ञातवन्त इत्याह—एभ्यस्त्रिभ्यो रोहितादिरूपेभ्यस्त्रिवृत्कृतेभ्यो विज्ञातेभ्यः सर्वमप्यन्यच्छिष्टमेवमेवेति विदांचक्रुर्विज्ञातवन्तो यस्मात्तस्मात्सर्वज्ञा एव सद्विज्ञानात्त आसुरित्यर्थः। अथवैभ्यो विदांचक्रुरित्यग्न्यादिभ्यो दृष्टान्तेभ्यो विज्ञातेभ्यः सर्वमन्यद्विदांचक्रुरित्येतत्॥ ५॥

सिद्धांती—फार पूर्वी होऊन गेलेले महाशाल आणि महाश्रोते विद्वान् मागच्या मंत्रांत सांगितलेल्या त्या ह्या सिद्धांताचे ज्ञाते होते. ते ह्मणाले आमच्या कुळामध्यें असा कोणीही सांपडणार नाहीं कीं जो पूर्वोक्त सिद्धांत जाणणारा असून "मला कांहीं अश्रुत आहे, काहीं अमत आहे, कांहीं अविज्ञात आहे असें ह्मणेल." सारांश आमच्या कुळांतील प्रत्येकाला सताचें ज्ञानविज्ञान झालें असल्यामुळें त्याला सर्व श्रुत झालें आहे, त्यानें विचार केला आहे, त्याला सगळ्याचा अनुभवही आला आहे. या विद्वानांना हें सर्व कसें कळलें असें म्हणाल तर ऐका. ही जी आपल्या परिचयाचीं रोहितादि (रक्तवर्णादि) तीन रूपें, अत्रिवृत्कृत आहेत, त्यांचे पूर्ण विज्ञान झालें असल्यामुळें बाकीचे इतर सर्व अवशिष्ट पदार्थ ह्याच न्यायानें समजून घेतले पाहिजेत असें जाणून त्यानीं त्या त्या पदार्थांचें विज्ञान करून घेतलें. असें आहे ह्मणून ते विद्वान सर्वज्ञच झाले. या सर्वज्ञत्वाचें बीज सताचें विज्ञान हें आहे. तात्पर्य सताचें विज्ञान त्यांस होतें, ह्मणून रोहितादिरूपांच्या विज्ञानानें ते सर्व सर्वज्ञ झाले. किंवा असेंही ह्मणावें कीं, मागें जे अग्निप्रमुख दृष्टांत दिले आहेत त्यांचें विज्ञान झालें ह्मणून बाकीच्या सर्व गोष्टींचे विज्ञान त्यांस झालें. ॥ ५ ॥

---

### मंत्र सहावा व सातवा.

**यदु रोहितमिवाभूदिति तेजसस्तद्रूपमिति तद्विदांचक्रुर्यदु शुक्लमिवाभूदित्यपा रूपमिति तद्विदांचक्रुर्यदु कृष्णमिवाभूदित्यन्नस्य रूपमिति तद्विदांचक्रुः॥ ६ ॥**

**यद्वविज्ञातमिवाभूदित्येतासामेव देवतानाꣳ समास इति तद्विदांचक्रुर्यथा खलु नु सोम्येमास्तिस्रो देवताः पुरुषं प्राप्य त्रिवृत्त्रिवृदेकैका भवति तन्मे विजानीहीति ॥ ७ ॥**

**इति षष्ठाध्यायस्य चतुर्थः खण्डः ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थ—यत् उ रोहितं इव अभूत् इति, तेजसः तत् रूपं इति, तत् विदांचक्रुः** ( ज्याचें रोहिताप्रमाणें रूप दिसलें तें तेजाचें रूप आहे असें त्या विद्वानांस ज्ञान झालें ) **यत् उ शुक्लं इव अभूत् इति, अपां रूपं इति; तत् विदांचक्रुः; यत् उ कृष्णं इव अभूत् इति अन्नस्य रूपं इति, तत् विदांचक्रुः** ( जें जें शुभ्रासारखें दिसलें तें तें जलाचें रूप व ज ज कृष्णवर्णासारखें दिसलें तें तें अन्नाचें रूप आहे, असें ज्ञान त्यांस झालें ). ॥ ६ ॥

**अन्वय व अर्थ—यत् उ अविज्ञातं इव अभूत् इति, एतासां एव देवतानां समासः इति, तत् विदांचक्रुः** [ आणि जेंजें त्यास अविज्ञानसें वाटलें, तें तें ह्या तिन्ही देवतांच्या समासाचें रूप आहे, असें ज्ञान त्यास झालें. ) **यथा खलु सोम्य, इमाः तिस्र देवताः पुरुषं नु प्राप्य त्रिवृत् त्रिवृत् एका एका भवति, तत् मे विजानीहि इति** [ हे सौम्य, ह्या तिन्ही देवता जीवरूपी देहधारी पुरुषाशीं संगत होऊन त्यापैकीं प्रत्येक देवता त्रिवृत् होते, ती कशी होते हें मीं आतां तुला सांगतों तें चित्त देऊन ऐक ] ॥ ७ ॥

कथम् । यदन्यद्रूपेण संदिह्यमाने कपोतादिरूपे रोहितमिव यद्गृह्यमाणमभूत्तेषां पूर्वेषां ब्रह्मविदां तत्तेजसो रूपमिति विदांचक्रुः । तथा यच्छुक्लमिवाभूद्गृह्यमाणं तदपां रूपं यत्कृष्णमिव गृह्यमाणं तदन्नस्येति विदांचक्रुरेवमेवात्यन्तदुर्लक्ष्यं यदु अप्यविज्ञातमिव विशेषतोऽगृह्यमाणमभूत्तदप्येतासामेव तिसृणां देवतानां समासः समुदाय इति विदांचक्रुः । एवं तावद्बाह्यवस्त्वग्न्यादिवद्विज्ञातं तथेदानीं यथा नु खलु हे सोम्येमा यथोक्तास्तिस्रो देवताः पुरुषं शिरःपाण्यादिलक्षणं कार्यकारणसंघातं प्राप्य पुरुषेणोपयुज्यमाना-

त्रिवृत्त्रिवृदेकैका भवति तन्मे विजानीहि निगदत इत्युक्त्वाऽऽह ॥ ६ ॥ ७ ॥

इति षष्ठाध्यायस्य चतुर्थः खण्डः ॥ ४ ॥

सिद्धांतीः—पूर्वीच्या विद्वांनांनीं कसें ज्ञान करून घेतलें तें पहा. कपोतादिकाचें दर्शन झालें असतां व तेथील अग्न्यादिकांकडून भिन्न रूप पाहून संशय उत्पन्न झाला असतां तेथें जो रोहित ह्मणजे रक्तवर्णासारखा त्यांस दिसला, त्या भागाला ह्या ब्रह्मवेत्त्यांनीं "हें तेजाचें रूप आहे" असें समजून घेतलें. त्याचप्रमाणें शुक्लासारखें दिसणारें रूप तें जळाचें रूप आणि जें कृष्णवर्णासारखें दिसणारें रूप तें अन्नाचें रूप असें ज्ञान त्यांनीं करून घेतलें. त्याचप्रमाणें दुसऱ्या ठीकाणाहून आल्यामुळें ज्याचें रूप दुर्लक्ष्य ( लक्षण करण्यास कठीण ) आणि ह्मणून जें जणों अविज्ञातच होतें, विशिष्टप्रकारानें ज्याचें ग्रहण करतां येईना, तें रूपही ह्या तीन देवतांच्या समुदायानें सिद्ध झालें आहे असें ज्ञान त्यांस झालें. याप्रमाणें अग्निप्रमुख तिन्ही देवतांनीं सिद्ध केलेल्या बाह्य वस्तूंचें ज्ञान जसें ज्ञात झालें, तसें त्यां विद्वानांस हे सौम्य, आंतर वस्तुचें ज्ञान कसें झालें हें मीं आतां तुला सांगतों. पूर्वी सांगितलेल्या तिन्ही देवतांनीं हस्तमस्तकादि लक्षणांनी युक्त असणारा व कार्यकरणांचा संघात असणारा जो पुरुष ( जीव ) याची प्राप्ती करून घेतली. अर्थात् या देवता पुरुषांचीं कार्यें करण्यास उपयोगी झाल्या. नंतर त्यांपैकींचें त्रिवृत्करण कसें झालें तें मी आतां तुला सांगतों ऐकः—ह्या त्रिवृताच्या कथनाला पुढील खंडातील पहिल्या मंत्रात आरंभ झाला आहे— ॥ ६,७ ॥

सहाव्या अध्यायाचा ४ खंड समाप्त.

---

## अध्याय ६ खंड ५ वा.

### मंत्र पहिला.

**अन्नमशितं त्रेधा विधीयते तस्य यः स्थविष्ठो धातुस्तत्पुरीषं भवति यो मध्यमस्तन्मा ँसं योऽणिष्ठस्तन्मनः ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः**—**अशितं अन्नं त्रेधा विधीयते** [ खाल्लेल्या अन्नाचे तीन प्रकारानें रूपांतर होतें ] **तस्य यः स्थविष्ठः धातुः तत् पुरीषं भवति, यः मध्यमः तत् मांसं; यः अणिष्ठः तत् मनः** [ त्या अन्नाचा जो स्थूलतम भाग असतो तो पुरीषरूपी होतो, जो

मध्य भाग असतो तो मांसरूपी आणि जो लघुतम अंश असतो तो मनो-रूपी होतो ] ॥ १ ॥

अन्नमशितं भुक्तं त्रेधा विधीयते जाठरेणाग्निना पच्यमानं त्रिधा विभज्यते । कथं, तस्यान्नस्य त्रिधा विधीयमानस्य यः स्थविष्ठः स्थूलतमो धातुः स्थूलतमं वस्तु विभक्तस्य स्थूलोऽशस्तत्पुरीषं भवति । यो मध्यमोऽशो धातुरन्नस्य तद्रसादिक्रमेण परिणम्य मांसं भवति योऽणिष्ठोऽणुतमो धातुः स ऊर्ध्वं हृदयं प्राप्य सूक्ष्मासु हिताख्यासु नाडीष्वनुप्रविश्य वागादिकरणसंघातस्य स्थितिमुत्पादयन्मनो भवति मनोरूपेण विपरिणमन्मनस उपचयं करोति । ततश्चान्नोपचितत्वान्मनसो भौतिकत्वमेव न वैशेषिकतन्त्रोक्तलक्षणं नित्यं निरवयवं चेति गृह्यते । यदपि मनोऽस्य दैवं चक्षुरिति वक्ष्यति तदपि न नित्यत्वापेक्षया किं तर्हि सूक्ष्मव्यवहितविप्रकृष्टादिसर्वेन्द्रियाविषयव्यापकत्वापेक्षया । यच्चान्येन्द्रियविषयापेक्षया नित्यत्वं तदप्यापेक्षिकमेवेति वक्ष्यामः । सदेकमेवाद्वितीयमिति श्रुतेः ॥ १ ॥

**सिद्धांतीः**—आपण जें अन्न खातो व ज्याचें पचन जठराग्नीनें होत असतें, त्या अन्नाचे तीन भिन्न स्वरूपी विभाग होतात. या तीन रूपांनीं विभक्त होणाऱ्या अन्नापैकीं जो अत्यंत जड भाग असतो त्याला पुरीषाचें म्हणजे मलाचें रूप प्राप्त होतें, जो मध्यम ( फार जड नाहीं व फार हलकाही नाहीं असा ) भाग या अन्नाचा असतो त्याचा रसादिप्रकारानें परिपाक होऊन तो मध्यभाग शेवटीं मांसरूपी होतो. आणि जो अतिसूक्ष्म भाग असतो तो वर म्हणजे हृदयांत प्रवेश करून अत्यंत सूक्ष्म अशा "हित" नामक नाडींत शिरतो आणि वाणी प्रमुख अवयवांच्या संघाताला आस्तित्व देणाऱ्या मनोरूपानें प्रगट होतो. तात्पर्य या लघुतम अन्नांशाचा परिपाक मनोरूपी होऊन तो मनाची—पूर्वीच विद्यमान असलेल्या मनाची—वृद्धि करतो. ज्यापक्षीं मनाची वृद्धि अन्नानें होतें त्यापक्षीं हें आपलें मन भौतिक म्हणजे अन्नासारखेंच जड आहे असें ठरतें. वैशेषिकांनीं आपल्या दर्शनामध्यें "मन हें नित्य आणि निरवयव आहे " असें म्हटलें आहे तें श्रुतीला ग्राह्य नाहीं, असें झालें. यद्यपि "मन हें ह्याचा दैवी नेत्र आहे " असें श्रुति पुढें आपल्यास सांगेल, तथापि तेथेंही मन हें नित्य आहे असें सांगण्याची श्रुतीची अपेक्षा नाहीं. तर सूक्ष्म, निःसंबद्ध असलेल्या व दूरदेशीं असणाऱ्या सर्व इंद्रियविषयांस मन व्यापून टाकतें; म्हणून श्रुतीनें त्याला दैवीनेत्र असें म्हटलें आहे. तसेंच अन्य इंद्रियविषयांच्या अपेक्षेनें मन नित्य आहे हें खरें, तथापि त्याचें तें नित्यत्व सापेक्ष असतें, शुद्ध नसतें.

(मन नित्य आहे असें श्रुति म्हणत नाहीं. विषय सूक्ष्म असो, दूरचा असो, इंद्रियांस अगोचर होणाऱ्या सर्व विषयांचें व्यापकत्व मनाला आहे; म्हणून त्याला दिव्य हें विशेषण

दिलें आहे. तसेंच विषय अत्यंत चंचळ आहेत, त्या विषयांस व्यापणारें मन क्रमीं चंचळ आहे; म्हणून त्याला नित्य असें जरी म्हटलें तथापि मनाला त्रिकालाबाधित नित्यत्व नाहीं.' नित्यवस्तु एकच आहे. आणि ती वस्तु म्हणजे सत् होय.)

सत् हीं एकच अद्वितीय वस्तु आहे, हा श्रुति येथें प्रमाण आहे. ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**आपः पीतास्त्रेधा विधीयन्ते तासां यः स्थविष्ठो धातुस्तन्मूत्रं भवति यो मध्यमस्तल्लोहितं योऽणिष्ठः स प्राणः ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थ—पीताः आपः त्रेधा विधीयंते; तासा यः स्थविष्ठः धातुः तत् मूत्रं भवति; यः मध्यमः तत लोहितं; यः अणिष्ठः सः प्राणः** [ प्यालेल्या जलांची तीन भिन्न रूपें होतात; जो अतिस्थूल भाग असतो तो मूत्ररूप, जो मध्यम तो रक्तरूप आणि जो लघुतम तो प्राणरूप होतो. ] ॥ २ ॥

**तथाऽऽपः पीतास्त्रेधा विधीयन्ते तासां यः स्थविष्ठो धातुस्तन्मूत्रं भवति। यो मध्यमस्तल्लोहितं भवति। योऽणिष्ठः स प्राणो भवति। वक्ष्यति ह्यापोमयः प्राणो न पिबतो विच्छेत्स्यत इति ॥ २ ॥**

सिद्धांतः—याचप्रमाणें प्यालेल्या जलांचीं तीन रूपें होतात. जो अति जडभाग असतो तो मूत्ररूप, जो मध्यम तो रक्तरूप आणि लघुतम तो प्राणरूप होतो. श्रुति आपल्यास पुढें सांगेल कीं, आपला प्राण आपोमय म्हणजे जलमय आहे. पाणी प्यालें नाहीं, तर प्राण विच्छिन्न होतो. ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**तेजोऽशितं त्रेधा विधीयते तस्य यः स्थविष्ठो धातुस्तदस्थि भवति यो मध्यमः स मज्जा योऽणिष्ठः सा वाक् ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थ—अशितं तेजः त्रेधा विधीयते तस्य यः स्थविष्ठः धातुः तत अस्थि भवति; यः मध्यमः सः मज्जा; यः अणिष्ठः**

श्वेत०—याप्रमाणें जरी आपण माझें समाधान करून मला निरुत्तर केलें; तथापि हाच सिद्धांत म्हणजे मन हें अन्नमय आहे, प्राण जलमय आहे, वाणी तेजोमय आहे, हा सिद्धांत कांहीं दृष्टांत देऊन मला स्पष्ट समजेल अशी योजना करावी. कारण अद्यापिहि ह्या आपल्या सिद्धांतासंबंधानें माझ्या बुद्धीचा पूर्ण आणि यथार्थ निश्चय झाला नाहीं. मला अशी शंका आहे कीं, अविशिष्ट ( सर्वसामान्य, भागप्रभाग न झालेल्या अशा प्राण्याच्या एका देहामध्येंच तेजोघटित, जलघटित, आणि अन्नघटित द्रव्यें उपयोजिलीं असतां अन्न, जल, आणि तेज यांचे लघुतम भाग मन, प्राण आणि वाणी यांचे संपोषण करितात व आपले गुण सोडित नाहींत, असें कसें होतें ? ( सारांश एकाच अविभक्त देहामध्यें तेजादि द्रव्यांची उपयोजना होत असतांहि तीं तीं द्रव्यें आपआपले स्वभाव न सोडतां आपापल्या अणिष्ठ ( लघुतम ) अंशांनीं मनादिकांचें संवर्धन कसें करितात, सामान्यरूपानें प्रविष्ट झालेलीं रूपें विशेषरूपें कशीं घेतात, हें श्वेतकेतूस समजत नाहीं ) म्हणून हे गुरो, मला पुन्हा एकदां हा सिद्धांत समजाऊन सांगावा, अशी माझी आपल्यास प्रार्थना आहे.

" पुत्राचें हें बोलणें ऐकून हे सौम्य ठीक आहे, हा सिद्धांत मी तुला समजाऊन देणार आहें. जे सिद्धांत तुला हवे आहेत, ते दृष्टांतपूर्वक मीं तुला सांगतों. ऐक " ॥ ४ ॥

अध्याय साहावा खंड ५ समाप्त.

---

## अध्याय ६ खंड ६ वा.

---

### मंत्र पहिला.

**दध्नः सोम्य मथ्यमानस्य योऽणिमा स ऊर्ध्वः समुदीषति तत्सर्पिर्भवति ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थ—सोम्य, मथ्यमानस्य दध्नः यः अणिमा, सः ऊर्ध्वः समुदीषति; तत् सर्पिः भवति** [ हे सौम्य, घुसळले जाणाऱ्या दह्याचा जो लघुतम अतिशय हलका-भाग असतो तो वर येऊन एकत्र जमून राहतो. हाच भाग सर्पि म्हणजे तूप होय. ] ॥ १ ॥

दध्नः सोम्य मथ्यमानस्य योऽणिमाऽणुभावःस ऊर्ध्वः समुदीषति संभूयोर्ध्वं नवनीतभावेन गच्छति तत्सर्पिर्भवति ॥ १ ॥

**सिद्धांती**—दहीं पूर्णपणें घुसळल्यानंतर त्याचा अत्यंत लघुतम भाग वर येऊन तो नवनीतरूपानें ( लोण्याच्या रूपानें ) एकत्र होतो. त्यांचेंच आपण पुढें तूप करितों. ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**एवमेव खलु सोम्यान्नस्याश्यमानस्य योऽणिमा स ऊर्ध्वः समुदीषति तन्मनो भवति ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः**—सोम्य एवं एव खलु अश्यमानस्य अन्नस्य यः अणिमा, सः ऊर्ध्वः समुदीषति; तत् मनः भवति [ हे सौम्य याचप्रमाणें भक्षण केले जाणाऱ्या अन्नाचा जो सूक्ष्म अंश असतो तो वर येऊन एकत्र होतो. पुढें त्याचेंच मन होतें ] ॥ २ ॥

यथाऽयं दृष्टान्त एवमेव खलु सोम्यान्नस्यौदनादेरश्यमानस्य भुज्यमानस्योदर्येणाग्निना वायुसहितेन खजेनेव मथ्यमानस्य योऽणिमा स ऊर्ध्वः समुदीषति तन्मनो भवति मनोऽवयवैः सह संभूय मन उपाचिनोतीत्येतत् ॥ २ ॥

सिद्धांतीः—हे सोम्य, मागच्या मंत्रांत उल्लेखिलेल्या दृष्टांताप्रमाणेंच आपण भाक्षिलेल्या अथवा भाक्षित असलेल्या अन्नाची व्यवस्था होते. दह्याचें घुसळण जसें रवीनें होतें त्याप्रमाणें आपण सेविलेलें अन्न घुसाविलें जातें, तेव्हां त्या अन्नाचे जे अत्यंत सूक्ष्म अंश असतात ते वर येऊन एकत्र जमतात; आणि मनाची रचना करितात; म्हणजे आपलें पूर्वीचें जें मन असतें त्यालाच पुष्टि देणारें हे अन्नांचे सूक्ष्म अंश होतात, असें तात्पर्य आहे. ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**अपाँ सोम्य पीयमानानां योऽणिमा स ऊर्ध्वः समुदीषति स प्राणो भवति ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थः**—सोम्य, पीयमानानां अपां यः अणिमा सः ऊर्ध्वः समुदीषति; सः प्राणः भवति [ हे सौम्य आपण प्राशन केलेल्या किंवा पीत असलेल्या जलांचे जे लघुतम अंश असतात ते वर येऊन एकत्र जमतात आणि तेच प्राणाची विरचना करितात ] ॥ ३ ॥

तथाऽपां सोम्य पीयमानानां योऽणिमा स ऊर्ध्वः समुदीषति स प्राणो भवतीति ॥ ३ ॥

सिद्धांतीः—याचप्रमाणें जे सूक्ष्म अंश असतात ते वर येऊन एकत्र होतात; आणि प्राणरूप होतात, म्हणजे संवर्धन करितात. ॥ ३ ॥

---

मंत्र चवथा.

**तेजसः सोम्याश्यमानस्य योऽणिमा स ऊर्ध्वः समुदीषति सा वाग्भवति ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थः—सौम्य, अश्यमानस्य तेजसः यः आणिमा सः ऊर्ध्वः समुदीषति; सा वाक् भवति** [ हे सौम्य, आपण सेवित असलेल्या तेजांचा—तेल घृतादिकांचा जो सूक्ष्मतम अंश असतो तो वर येऊन एकत्र होतो. आणि त्याचीच वाणी होते. ] ॥ ४ ॥

एवमेव खलु सोम्य तेजसोऽश्यमानस्य योऽणिमा स ऊर्ध्वः समुदीषति सा वाग्भवति ॥ ४ ॥

सिद्धांतः— हे सौम्य, याचप्रमाणें भक्षिलेल्या घृततैलादि पदार्थांचे अत्यंत सूक्ष्म अंश वर येतात आणि तेच वाणीचे संवर्धन करितात. ॥ ४ ॥

---

मंत्र पांचवा.

**अन्नमयꣳ हि सोम्य मन आपोमयः प्राणस्तेजोमयी वागिति भूय एव मा भगवान्विज्ञापयत्विति तथा सोम्येति होवाच ॥ ५ ॥**

**इति षष्ठाध्यायस्य षष्ठः खण्डः ॥ ६ ॥**

**अन्वय व अर्थः—** [ या मंत्राचा अन्वय व अर्थ ५ व्या खंडांतील ४ थ्या मंत्राप्रमाणें आहे. दोन्ही मंत्र एकत्र आहेत, हें सांगावयास नकोच ) ॥ ५ ॥

अन्नमयं हि सोम्य मन आपोमयः प्राणस्तेजोमयी वागिति युक्तमेव मयोक्तमित्यभिप्रायोऽतोऽप्तेजसोरस्त्वेतत्सर्वमेवम् । मनस्त्वन्नमयमित्यत्र नैकान्तेन मम निश्चयो जातोऽतो भूय एव मा भगवान्मनसोऽन्नमयत्वं दृष्टान्तेन विज्ञापयत्विति । तथा सोम्येति होवाच पिता ॥ ५ ॥

इति षष्ठाध्यायस्य षष्ठः खण्डः ॥ ६ ॥

**सिद्धांती:**—हे सौम्य, हे श्वेतकेतो, मन अन्नमय आहे, प्राण आपोमय आहे आणि वाणी तेजोमय आहे, असा श्रुतिमान्य सिद्धांत मी जो पहिल्या प्रथम तुला सांगितला तो योग्य आहे, उपपन्न आहे हें तुलाही आतां समजलें असेल. हें सर्व दृश्य विश्व अन्न, जल आणि तेज, ह्या तीन महाद्रव्यांनीं घटित आहे असें सिद्ध झालें. हा माझा अभिप्राय तुला समजलाच असेल.

श्वेतकेतु:—नाहीं; मन हें अन्नमय आहे. असा अद्यापिहि माझा निःसंशय सिद्धांत झाला नाहीं म्हणून पुन्हा एकवार मनाचें अन्नमयत्व सिद्ध करणारा दृष्टांत उकलून माझी समजूत पाडा; आणि मला निःसंदेह करा.

**सिद्धांती:**—'तथास्तु' असें श्वेतकेतूचा पिता त्याला म्हणाला. ॥ ५ ॥

अध्याय ६ खंड ६ समाप्त.

---

## अध्याय सहावा, खण्ड ७ वा.

### मंत्र पहिला.

**षोडशकलः सोम्य पुरुषः पञ्चदशाहानि माऽशीः काममपः पिबाऽऽपोमयः प्राणो न पिबतो विच्छेत्स्यत इति ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः-सौम्य, षोडशकलः पुरुषः** ( हे सौम्य पुरुष हा सोळा कलांनीं घडलेला आहे ) **पंचदश अहानि मा आशीः अपः कामं पिब; आपोमय प्राणः न पिबतः विच्छेत्स्यते इति** [ १५ दिवस कांहीं एक खाऊं नको, लागेल तितकें पाणी मात्र पी. कारण प्राण हा आपोमय आहे; आणि जलपान केलें नाहींस तर प्राणाचा विच्छेद होईल असें पित्यानें श्वेतकेतूला सांगितलें. ॥ १ ॥

अन्नस्य भुक्तस्य योऽणिष्ठो धातुः स मनसि शक्तिमधात्साऽन्नोपचिता मनसः शक्तिः षोडशधा प्रविभज्य पुरुषस्य कलात्वेन निर्दिदिक्षिता । तया मनस्यन्नोपचितया शक्त्या षोडशधा प्रविभक्त्या संयुक्तस्तद्वान्कार्यकारणसंघातलक्षणो जीवविशिष्टः पुरुषः षोडशकल उच्यते यस्यां सत्यां द्रष्टा श्रोता मन्ता बोद्धा कर्ता विज्ञाता सर्वक्रियासमर्थः पुरुषो भवति हीयमानायां च यस्यां सामर्थ्यहानिः । वक्ष्यति चाथान्नस्याऽऽयै द्रष्टेत्यादि । सर्वस्य कार्यकारणस्य सामर्थ्यं मनःकृतमेव । मानसेन हि बलेन संपन्ना बलिनो दृश्यन्ते लोके ध्यानाहाराश्च केचिदन्नस्य सर्वात्मकत्वात् ।

अतोऽन्नकृते मानसे वीर्ये षोडशधा कृता यस्य पुरुषस्य सोऽयं षोडशकलः पुरुष एतच्चेत्प्रत्यक्षीकर्तुमिच्छसि पञ्चदशसंख्याकान्यहानि माऽशीरशनं मा कार्षीः काममिच्छातोऽपः पिब यस्मान्नपिबतोऽपस्ते प्राणो विच्छेत्स्यते विच्छेदमापत्स्यते यस्मादापोमयोऽब्विकार प्राण इत्यवोचाम । न हि कार्यं स्वकारणोपष्टम्भमन्तरेणाविभ्रंशमानं स्थातुमुत्सहते ॥ १ ॥

सिद्धांतीः—आपण भक्षिलेल्या अन्नाचे जे वरिष्ठ म्हणजे लघुतम अंश असतात, ते मनाचें पोषण करून त्याला सशक्त करितात. अन्नानें पुष्ट झालेली ही मनाची शक्ति सोळा भागामध्यें विभागली जाऊन प्रत्येक भागाला 'कला' अशा नांवानें संबोधण्याचा श्रुतीचा मनोदय आहे. याप्रमाणें मनामध्यें पुष्ट राहून झालेल्या आणि सोळा भागांमध्यें विभागलेल्या शक्तीनें युक्त झालेला जो पुरुष त्याला षोडशकल असें श्रुति संबोधिते. हा पुरुष जीवाविशिष्ट असून कार्यकरणांचा संघात--यालाच देहसंघांत असें म्हणतात-आहे. या देहाविशिष्ट आणि जीवाविशिष्ट पुरुषाला मनःपुष्टि करणारी अन्नमय शक्ति असली म्हणजे तो द्रष्टा, श्रोता, मंता ( मनन करणारा ), बोद्धा ( ज्ञान करून घेणारा ) कर्ता, विज्ञाता ( अनुभव घेणारा ) आणि सर्वक्रिया करण्याचें सामर्थ्य असणारा-हा पुरुष होतो. ( मनांचे सामर्थ्य वाढविणारें अन्न मिळालें तर मात्र देहीं मनुष्यप्राण्याचे सर्व मनोव्यापार आणि सर्व क्रिया यथास्थित चालतात. आणि ही मनःशक्ति कमी झाली तर पुरुषाची दृष्टृत्वादि सर्व सामर्थ्यें कमी होतात. ) पुढेंहि श्रुती सांगेल कीं अन्नाची प्राप्ति झाली तरच पुरुषाचें दृष्टृत्व कायम राहतें. तात्पर्य, सर्वकार्य करणाचें सामर्थ्य मनःकृत आहे. मनोबलानें संपन्न असलेले लोक बलवंत दिसतात; आणि कांहीं विचारवंत लोक दिसतात, ते तर मनस्सामर्थ्याचा परिपाक होत. कारण अन्न हें सर्वात्मक आहे. म्हणून मानसिक कार्यशक्ति अन्नापासून उत्पन्न झालेली असते. ज्या पुरुषाला १६ कळा आहेत तो हा षोडशकल पुरुष होय. पुरुष षोडशकलात्मक असतो, याचा प्रत्यय तुला प्रत्यक्ष हवा असेल तर १५ दिवसपर्यंत कांहीं एक खाऊं नको. इच्छेस येईल तितकें पाणी पीत जा. जलप्राशन न करशील, तर तुझ्या प्राणाचा उच्छेद होईल, तूं गतप्राण होशील. कारण मागें आह्मी सांगितलेंच आहे कीं प्राण हा जलाचें कार्य आहे. नेहमींचा असा सिद्धांत आहे कीं, कोणतेंही कार्य आपल्या कारणाच्या अस्तित्वाशिवाय आपलें स्वरूप भ्रष्ट होऊं न देतां विद्यमान असूं शकत नाहीं. म्हणजे उपादान कारण, नष्ट झालें असतां कार्य नाहीसें होतें. श्वेतकेतु पाणी पीत राहील, तर त्याचे प्राण उत्क्रांत होणें शक्य नाहीं, असें पित्यानें श्वेतकेतूस सांगितलें ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**स ह पञ्चदशाहानि नाऽऽशाथ हैनमुपससाद किं ब्रवीमि भो इत्यृचः सोम्य यजूꣳषि सामा-**

**नीति स होवाच न वै मा प्रतिभान्ति भो इति ॥ २ ॥**

अन्वय व अर्थः—स पंचदश अहानि न आश ह ( श्वेतकेतूनें १५ दिवस कांहीं खाल्लें नाहीं ) अथ एनं उपससाद ( नंतर श्वेतकेतु पित्याजवळ जाऊन बसला ) भोः किं ब्रवीमि इति ( आणि म्हणाला मीं आतां कोणता पाठ म्हणूं ) सोम्य ऋचः यजूंषि सामानि ' इति ( ऋग्वेद ' यजुर्वेद आणि सामवेद यांची आवृत्ति कर ) **भो मा न प्रतिभांति** ' इति सः उवाच ह ( भगवन्, मला यांतील कांहीं एक आठवत नाहीं, असें श्वेतकेतु म्हणाला ) ॥ २ ॥

स हैवं श्रुत्वा मनसोऽन्नमयत्वं प्रत्यक्षीकर्तुमिच्छन्पञ्चदशाहानि **नाऽऽशाशनं न कृतवान् । अथ षोडशेऽहनि हैनं पितरमुपससा दोपगतवानुपगम्य चोवाच किं ब्रवीमि भो इति । इतर आह ऋचः सोम्य यजूंषि सामान्यधीष्वेति । एवमुक्तः पित्राऽऽह—न वै मा मामृगादीनि प्रतिभान्ति मम मनसि न दृश्यन्त इत्यर्थो हे भो भगवन्निति ॥ २ ॥**

**सिद्धांतीः**—श्वेतकेतूनें हें ऐकिलें आणि मनाचें अन्नमयत्व प्रत्यक्ष पाहण्याच्या इच्छेनें त्यानें १५ दिवसपर्यंत कांहीं खाल्लें नाहीं. नंतर १६ व्या दिवशीं तो आपल्या बापाजवळ जाऊन बसला; आणि ह्मणाला भगवन् ! मीं आतां कोणता पाठ घेऊं ? पिता ह्मणाला, ऋग्वेद, सामवेद आणि यजुर्वेद, हें जें तूं शिकला आहेस, त्याची आवृत्ति मला ह्मणून दाखव.' बापाचें हें बोलणें ऐकून मुलगा ह्मणाला 'बाबा! ऋग्वेदादि तिन्ही वेदांपैकीं कोणत्याही पाठाचें मला स्मरण होत नाहीं. माझ्या मनाला सध्यां कांहीं एक स्मरत नाहीं.

तात्पर्य. १५ दिवस श्वेतकेतूनें कांहीं एक खाल्लें नव्हतें ह्मणून त्याच्या मनाचें सामर्थ्य शून्यप्राय झालें होतें ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**तꣳ होवाच यथा सोम्य महतोऽभ्याहितस्यैकोऽङ्गारः खद्योतमात्रः परिशिष्टः स्यात्तेन ततोऽपि न बहु दहेदेवꣳ सोम्य ते षोडशानां कलानामेका**

कलाऽतिशिष्टा स्यात्तयैतर्हि वेदान्नानुभवस्यशानाथ मे विज्ञास्यसीति ॥ ३ ॥

अन्वय व अर्थः—**तं उवाच ह** ( श्वेतकेतूला पिता म्हणाला ) **यथा सोम्य, महतः अभ्याहितस्य एकः खद्योतमात्रः अंगारः परिशिष्टः स्यात्** ( हे सौम्य, ज्याप्रमाणें अतिशय मोठ्या प्रमाणावर पेटलेल्या अग्नीचा एखादा मात्र खद्योता एवढा निखारा शिल्लक राहिला असेल ) **तेन ततः अपि बहु न दहेत्** ( तर त्याच्यापेक्षां मोठ्या प्रमाणाची वस्तु त्याला जाळतां येणार नाहीं ) **एवं सोम्य, ते षोडशानां कलानां एका कला अतिशिष्टा स्यात्** ( त्याप्रमाणें हे सौम्य तुझ्या १६ कलांपैकीं एकच कला अवशिष्ट राहिली ) **तया एतर्हि वेदान् न अनुभवसि** ( त्यामुळें आतां तुला वेदांचें ज्ञान ग्रहण करितां येत नाहीं ) **अथ अशान; मे विज्ञास्यसि इति** ( या नंतर तूं भोजन कर म्हणजे तुला मीं जें काय सांगेन तें सर्व समजूं लागेल. ॥ ३ ॥

एवमुक्तवन्तं पिताऽऽह शृणु तत्र कारणं येन ते तान्यृगादीनि न प्रतिभान्तीति तं होवाच यथा लोके हे सोम्य महतो महत्परिमाणस्याभ्याहितस्योपचितस्येन्धनैरग्नेरेकोऽङ्गारः खद्योतमात्रः खद्योतपरिमाणः शान्तस्य परिशिष्टोऽवशिष्टः स्यात्तेनाङ्गारेण ततोऽपि तत्परिमाणीदाप्यदपि न बहु दहेदेवमेव खलु सोम्य ते तवान्नोपचितानां षोडशानां कलानामेका कलाऽवयवोऽतिशिष्टाऽवशिष्टा स्यात्तया त्वं खद्योतमात्राङ्गारतुल्ययैतर्हीदानीं वेदान्नानुभवसि न प्रतिपद्यसे श्रुत्वा च मे मम वाचमथाशेषं विज्ञास्यस्यशान भुङ्क्ष्व तावत् ॥ ३ ॥

**सिध्दांतीः**—श्वेतकेतूचे हें बोलणें ऐकून पिता म्हणाला "तुला त्या ह्या ऋग्वेदादिकांचें ग्रहण करितां येत नाहीं, त्याचें कारण मीं तुला सांगतों, तें ऐकः व्यवहारामध्यें हे सौम्य, मोठ्या प्रमाणावर काष्ठादिकांनीं प्रज्वलित झालेल्या अग्नीचा एखादा खद्योतप्रकाशाच्या आकारा एवढा लहान निखारा शिल्लक राहून बाकी सर्व अग्नि शांत झाला असेल, तर त्या अवशिष्ट राहिलेल्या ठिणगीनें तिच्यापेक्षां मोठ्या प्रमाणाची तर नकोच पण अगदीं लहान वस्तूसुद्धां जालतां येणें शक्य नाहीं. त्याप्रमाणेंच अन्नानें पुष्ट झालेल्या तुझ्या १६ कलापैकीं तुझ्या उपवासानें एकच कला शिल्लक राहिली. म्हणून त्या खद्योताच्या आकारा एवढ्या एका निःशक्त कलेनें तुला सांप्रत काळीं मीं सांगितलेलें वेदपाठाचें ग्रहण करितां येत नाहीं. असो.

आता तूं भोजन कर म्हणजे तुला मी जें काय सांगेन त्याचें निःशेष ग्रहण-
करितां येईल ॥ ३ ॥

---

### मंत्र चवथा.

**स हाऽऽशाथ हैनमुपससाद तꣳ ह यत्किंच पप्रच्छ सर्वꣳ ह प्रतिपेदे ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थ— स आश ह** ( त्यानें भोजन केलें ) **अथ एनं उपससाद ह** (आणि नंतर श्वेतकेतु आपल्या पित्यासंनिध जाऊन बसला) **यत्किंच तं पप्रच्छ ह सर्वं प्रतिपेदे ह** (नंतर त्याला पित्यानें जें जें काय विचारलें त्या सर्वांचीं उत्तरें श्वेतकेतूनें यथास्थित दिलीं ) ॥ ४ ॥

स ह तथैवाऽऽश भुक्तवानथानन्तरं हैनं पितरं शुश्रूषुरुपससाद तं होपगतं पुत्रं यत्किंचर्ग्गादिषु पप्रच्छ ग्रन्थरूपमर्थजातं वा पिता स श्वेतकेतुः सर्वं ह तत्प्रतिपेद ऋगाद्यर्थतो ग्रन्थतश्च ॥ ४ ॥

सिध्दांतीः—श्वेतकेतूनें लागलीच भोजन केलें आणि पितृसेवा करून विद्या-श्रवणासाठीं तो पित्यासंनिध गेला, त्या वेळीं ऋग्वेदादिकांच्या संहितेसंबंधानें व अर्थासंबंधानें पित्यानें जे जे प्रश्न विचारले त्यांचीं श्वेतकेतूनें यथास्थित उत्तरें दिलीं. तसेंच पित्यानें जे पाठ दिले तेहि त्याला उत्कृष्टरीतीनें ग्रहण करितां आले ॥ ४ ॥

---

### मंत्र पांचवा.

**तꣳ होवाच यथा सोम्य महतोऽभ्याहितस्यैकमङ्गारं खद्योतमात्रं परिशिष्टं तं तृणैरुपसमाधाय प्राज्वलयेत्तेन ततोऽपि बहु दहेत् ॥ ५ ॥**

**अन्वय व अर्थः— तं उवाच ह** ( पिता त्याला म्हणाला ) **सोम्य, यथा महतः अभ्याहितस्य एकं खद्योतमात्रं परिशिष्टं तं अंगारं तृणैः उपसमाधाय प्राज्वलयेत, तेन ततः अपि बहु दहेत्** ( हे सौम्य, मोठ्या प्रमाणावर पेटविलेल्या अग्नीचा तो शिल्लक राहिलेला खद्योताएवढा तो निखारा तृणांच्या साह्यानें पुन्हा पेटविला तर त्या अंगाराहून मोठ्या आकाराची असणारी वस्तु सुद्धां ज्याप्रमाणें जाळतां येते ) ॥ ५ ॥

तं होवाच पुनः पिता यथा सोम्य महतोऽभ्याहितस्यैकमङ्गारं खद्योतमात्रं परिशिष्टं तं तृणैरुपसमाधाय प्राज्वलयेत्तेन ततोऽपि बहु दहेत् ॥ ५ ॥

सिद्धांतीः—श्वेतकेतूचा बाप त्याला पुन्हां म्हणाला; मोठ्या प्रमाणावर पेटविलेल्या परंतु शांत झालेल्या अग्नीपैकीं काजव्याच्या आकाराची शिल्लक राहिलेली एक ठिणगी पुन्हां तृणाशीं व इतर दाह्य पदार्थांशीं संगत झाल्यामुळें पुन्हा महत् स्वरूप झाली, तर त्या विस्तीर्ण झालेल्या अंगाराला त्या ठिणगीलाआपल्या पूर्व परिमाणाच्या आकाराहून मोठ्या वस्तू ज्याप्रमाणें जाळतां येतात ॥ ५ ॥

---

मंत्र सहावा.

**एवँ सोम्य ते षोडशानां कलानामेका कलाऽतिशिष्टाऽभूत्साऽन्नेनोपसमाहिता प्राज्वालीत्तयैतर्हि वेदाननुभवस्यन्नमयँ हि सोम्य मन आपोमयः प्राणस्तेजोमयी वागिति तद्धास्य विजज्ञाविति विजज्ञाविति ॥ ६ ॥**

इति षष्ठाध्यायस्य सप्तमः खण्डः ॥ ७ ॥

अन्वय व अर्थः—सोम्य, एवं ते **षोडशानां कलानां एका कला अतिशिष्टा अभूत्, सा अन्नेन उपसमाहिता प्राज्वाली, तया एतर्हि वेदान्** अनुभवसि ( हे सौम्य, त्याचप्रमाणें तुझ्या १६ कलांपैकीं अवशिष्ट राहिलेली एक कळा अन्नाशीं संगत झाल्यामुळें पुष्ट होऊन प्रज्वलित झाली. म्हणून त्या पुष्ट झालेल्या कलेच्या सामर्थ्यानें वेदांचें ग्रहण तुला करितां येऊं लागलें आहे, आणि तुझी प्रत्याभिज्ञा ( स्मरणशक्ति ) जाग्रत झाली आहे, ) सोम्य, हि मनः **अन्नमयं** ( म्हणून हे सौम्य मन अन्नमय आहे असें श्रुति म्हणते ) **प्राणः आपोमयः; वाक् तेजोमय इति** ( याचप्रमाणें प्राण आपोमय आहेत व वाणी तेजोमय आहे, असें पित्यानें श्वेतकेतूस सांगितलें. ) **अस्य तत् ह विजज्ञौ इति** ( हें पित्याचे सिद्धांत श्वेतकेतूला समजले आणि उमजलेही ) ॥ ६ ॥

एवं सोम्य ते षोडशानामन्नकलानां सामर्थ्यरूपाणामेका कलाऽतिशिष्टाऽभूदतिशिष्टाऽऽसीत्पञ्चदशाहान्यभुक्तवत एकैकेनाह्नैकैका कला चन्द्रमस इवापरपक्षे क्षीणा साऽतिशिष्टा कला तवान्नेन भुक्तेनोपसमाहिता वार्धितोपचिता प्राज्वाली दैर्घ्यं छान्दसं प्रज्वलिता वर्धितेत्यर्थः । प्राज्वालीदिति पाठान्तरं तदा तेनोपसमाहिता स्वयं प्रज्वलितवतीत्यर्थः । तया वर्धितयैतर्हीदानीं वेदाननुभवस्युपलभसे । एवं व्यावृत्त्यनुवृत्तिभ्यामन्नमयत्वं मनसः सिद्धमित्युपसंहरत्यन्नमयं हि सोम्य मन इत्यादि । यथैतन्मनसोऽन्नमयत्वं तव सिद्धं तथाऽऽपोमयः प्राणस्तेजोमयी वागित्येतदपि सिद्धमेवेत्यभिप्रायः । तद्धैतद्धास्य पितुरुक्तं मनआदीनामन्नादिमयत्वं विजज्ञौ विज्ञातवाञ्श्वेतकेतुः द्विरभ्यासस्त्रिवृत्करणे प्रकरणसमाप्त्यर्थः ॥ ६ ॥

इति षष्ठाध्यायस्य सप्तम खण्डः ॥ ७ ॥

**सिध्दांतीः**—पिता श्वेतकेतूला म्हणाला पूर्वोक्त दृष्टांताप्रमाणेंच आतां ही वस्तुस्थिति घडून आलीच. पुत्रा ! सोळा सामर्थ्यशाली अन्नकलांपैकीं एकच कला ( अंश ) अवशिष्ट राहिली होती; तूं पंधरा दिवस निराहारी होतास. प्रत्येक दिवशीं एकेक कला क्षीण होत गेली. वद्यपक्षांत चंद्राची एकेक कला नाहींशी होते त्याप्रमाणेंच येथें स्थिति झाली. पण १६ कलांपैकीं जी कला ( भाग ) अवशिष्ट राहिली होती तीच कला तूं भोजन केल्यामुळें वृद्धिंगत झाली, आणि सतेज झाली.

**शिष्यः**—" प्राज्वाली ' हा आर्ष प्रयोग आहे.

**सिध्दांतीः**—" प्राज्वालीत् " असाहि एक पाठ आहे. हा पाठ घेतला तर ती कला आपण स्वतः तेजस्वती झाली असा अर्थ करावा. असो. ह्या पुष्ट झालेल्या कलेच्या सामर्थ्यानें तुला वेदांचे प्रतिभान होत आहे. याप्रमाणें अन्वयव्यतिरेकाच्या साह्यानें ( अन्न सेविलें नाहीं तर मनाच्या कलांची क्षीणता होणें हा व्यतिरेक आणि अन्न सेविलें तर मनःकलांची वृद्धि होणें हा अन्वय होय ) मनांचे अन्नमयत्व सिद्ध करून पित्यानें उपसंहार केला आहे कीं, हे सौम्य, मन हें अन्नमय आहे. त्या मनाचें अन्नमयत्व सिद्ध केलें व तुझ्या प्रत्ययास आणून दिलें, त्याप्रमाणेंच प्राण आपोमय आहे, वाणी तेजोमय आहे, हे सिद्धांतही स्पष्ट करून दाखवितां येतील " हें मनादिकांचें अन्नादिमयत्व पित्यानें सिद्ध केलें, तें सर्व श्वेतकेतूला उत्तमरीतीनें समजलें. 'विजज्ञौ' या पदाची आवृत्ति श्रुतीनें केली आहे, ती त्रिवृत्करणाचें प्रकरण संपलें हें दाखविण्याकरितां आहे ॥ ६ ॥

खंड सातवा समाप्त.

---

## अध्याय सहावा; खंड आठवा.

### मंत्र पहिला.

**उद्दालको हाऽऽरुणिः श्वेतकेतुं पुत्रमुवाच स्वप्नान्तं मे सोम्य विजानीहीति यत्रैतत्पुरुषः स्वपिति नाम सता सोम्य तदा संपन्नो भवति स्वमपीतो भवति तस्मादेनꣳ स्वपितीत्याचक्षते स्वꣳ ह्यपीतो भवति ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—आरुणिः उद्दालकः श्वेतकेतुं पुत्रं उवाच ह** ( उद्दालक आरुणी आपल्या श्वेतकेतु पुत्राला म्हणाला ) **सोम्य, मे स्वप्नांतं विजानीहि इति** ( हे सौम्य ! माझ्यापासून स्वप्नांत म्हणजे काय असतें हें समजून घे.) **यत्र एतद् पुरुषः स्वपिति नाम, सोम्य, तदा सता संपन्नः भवति** ( जेव्हा जेव्हां कोणताहि जीव झोप घेतो तेव्हां हे सौम्य, तो सताशीं संपन्न होतो ) **स्वं अपीतः भवति** ( तो स्व-स्वरूपाकडे जातो ) **तस्मात् एनं 'स्वपिति' इति आचक्षते** ( म्हणून तो झोंप घेत आहे, सुप्त आहे, असें म्हणतात ) **हि स्वं अपीतः भवति** (कारण या वेळीं तो स्वस्वरूपाकडे गेलेला असतो.)॥ १ ॥

यस्मिन्मनसि जीवेनाऽऽत्मनाऽनुप्रविष्टा परा देवताऽऽदर्श इव पुरुषः प्रतिबिम्बेन जलादिष्विव च सूर्यादयः प्रतिबिम्बैः । तन्मनोऽन्नमयतेजोमयाभ्यां वाक्प्राणाभ्यां संगतमधिगतम् । यन्मयो यत्स्थश्च जीवो मननदर्शनश्रवणादिव्यवहाराय कल्पते तदुपरमे च स्वं देवतारूपमेव प्रतिपद्यते । तदुक्तं श्रुत्यन्तरे—ध्यायतीव लेलायतीव सधीः स्वप्नो भूत्वेमं लोकमतिक्रामति स वा अयमात्मा ब्रह्म विज्ञानमयो मनोमय इत्यादि, स्वप्नेन शारीरमित्यादि, प्राणश्चेव प्राणो नाम भवतीत्यादि च । तस्यास्य मनस्थस्य मनआख्यां गतस्य मनउपशमद्वारेणेन्द्रियविषयेभ्यो निवृत्तस्य यस्यां परस्यां देवतायां स्वात्मभूतायां यदवस्थानं तत्पुत्रायाऽऽचिख्यासुरुद्दालको ह किलाऽऽरुणिः श्वेतकेतुं पुत्रमुवाचोक्तवान् ।

सिध्दांतीः—काणी पुरुषानें एखादा आरसा घेतला असतां प्रतिबिंबरूपानें तो आपणच जसा त्या आरशामध्यें प्रवेश करितो किंवा सूर्यादि तेजोगोल जलांमध्यें प्रतिबिंबरूपानीं प्रवेश करितात, त्या प्रमाणें परादेवता जीवात्मरूपानें ज्या मना मध्यें प्रवेश करितें तें मन अन्नमय आहे आणि तेजोमय वाणीशीं व जलमय प्राणाशीं संगत झालेलें आहे असें आपल्यास समजलें. मनामध्यें जीवानें प्रवेश करून तो मनोमय झाला असतां मनन, दर्शन, श्रवण, इत्यादि व्यवहार त्याला करितां येतात. आणि तेथून तो निघाला, मनाची संगति त्यानें सोडली म्हणजे तो आपले स्वयंभू दिव्यरूपच प्राप्त करून घेतो. श्रुतीनें दुसरीकडेही म्हटलें आहे 'तो ध्यान करतोसा व क्रीडा करतोसा दिसतोसा दिसतो,' 'ज्ञानी स्वप्नरूप होऊन लोकाचें अतिक्रमण करितो' 'तो हा आत्मा ब्रह्म आहे, विज्ञानमय आहे, मनोमय आहे, इत्यादि श्रुतीप्रमाण आहेत. [ वृहदारण्यक पहा. ] " स्वप्नांच्या योगानें शरीद्वारा निश्चेष्ट होतो, [ बृड. ४-३-११ ] आणि प्राणनक्रिया करीत असतां ' प्राण ' या नांवानें संबोधिला जातो [ १-३-८ ] इत्यादिही श्रुती वरील विचारास प्रमाण आहेत. त्या ह्या मनांत राहणाऱ्या आणि मन हें नांव प्राप्त झालेल्या आत्म्यानें मनाचा उपशम करून इंद्रियें आणि त्यांचे विषय यांपासून तो निवृत्ति झाला, तात्पर्य आत्मा मनोरूपी आरशापासून निवृत्त झाला असतां तो ज्या अतिश्रेष्ठ व स्वात्मभूत देवतेमध्यें प्रवेश करून तो तेथें स्वस्वरूप होतो, ती देवता व तें त्याचें स्वरूप स्वपुत्राला विशद करून दाखविण्याच्या इच्छेनें उद्दालक आरुणी आपल्या श्वेतकेतु नामक पुत्राला म्हणाला.

स्वप्नान्तं स्वप्नमध्यं स्वप्न इति दर्शनवृत्तेः स्वप्नस्याऽऽख्या तस्य मध्यं स्वप्नान्तं सुषुप्तमित्येतत् । अथवा स्वप्नान्तं स्वप्नसतत्त्वमित्यर्थः। तत्राप्यर्थात्सुषुप्तमेव भवति । स्वमपीतो भवतीति वचनात् । न ह्यन्यत्र सुषुप्तात्स्वमपीतिं जीवस्येच्छन्ति ब्रह्मविदः । तत्र ह्यादर्शापनयने पुरुषप्रतिबिम्ब आदर्शगतो यथा स्वमेव पुरुषमपीतो भवत्येवं मनआद्युपरमे चैतन्यप्रतिबिम्बरूपेण जीवेनाऽऽत्मना मनसि प्रविष्टा नामरूपव्याकरणाय परा देवता सा स्वमेवाऽऽत्मानं प्रतिपद्यते जीवरूपतां मनआख्यां हित्वा। अतः सुषुप्त एव स्वप्नान्तशब्दवाच्य इत्यवगम्यते।यत्र तु सुप्तः स्वप्नान्पश्यति तत्स्वाप्नं दर्शनं सुखदुःखसंयुक्तमिति पुण्यापुण्य कार्यम् ।पुण्यापुण्योर्हि सुखदुःखारम्भकत्वं प्रसिद्धम् । पुण्यापुण्ययोश्चाविद्याकामोपष्टम्भेनैव सुखदुःखतद्दर्शनकार्यारम्भकत्वमुपपद्यते नान्यथेत्यविद्याकामकर्मभिः संसारहेतुभिः संयुक्त एव स्वप्न इति न स्वमपीतो भवति । अनन्वागतं पुण्येनानन्वागतं पापेन तीर्णो हि तदा सर्वाञ्छोकान्हृदयस्य भवति तद्वा अस्यैतदतिच्छन्दा एष परम आनन्द इत्यादिश्रुतिभ्यः । सुषुप्त एव स्वं देवतारूपं जीवत्वविनिर्मुक्तं दर्शयिष्यामीत्याह

स्वप्नान्तं मे मम निगदतो हे सोम्य विजानीहि विस्पष्टमवधारयेत्यर्थः ।

सिद्धांतीः—स्वप्न म्हणजे येथें झोंप किंवा गाढनिद्रा नव्हे. व्यवहारांत आपण ज्याला स्वप्न म्हणतों तेथें आपल्यास विषयादिकांचें दर्शन होत असतें. तें दर्शन संपून मध्यस्थिति प्राप्त झाली, त्याला स्वप्नान्त असें म्हणतात. स्वप्नान्त म्हणजे सुषुप्तीची स्थिति किंवा स्वप्नरूपी कार्याचें कारण जी सुषुप्ति तिलाहि स्वप्नान्त म्हणतां येईल. कोणतीहि पद्धति घेतली तरी अर्थ सुषुप्ति म्हणजे गाढ निद्रा हाच होतो. श्रुतीनेंहि पुढें स्वं अपीतः भवति ( स्वस्वरूपाकडे जातो ) असें म्हटलें आहे. यावरून स्वप्नान्त म्हणजे सुषुप्तिच होय असें ठरतें. गाढ निद्रेव्यतिरिक्त इतर अवस्थेंत ' जीव स्वस्वरूपाकडे जातो ' असें ब्रह्मवेत्ते जीवासंबंधें म्हणत नाहींत.तात्पर्य,स्वप्नन्त शब्दाचा अर्थ गाढ निद्रा असा आहे. असो. पुरुषाच्या हातांतील आदर्श काढून घेतला असतां आरशांत प्रतिबिंबित झालेलें पुरुषाचें बिंब ज्याप्रमाणें त्याच बिंबरूपी पुरुषांत प्रविष्ट होऊन लीन होतें त्याप्रमाणें मनादिकांचा उपरम झाला असतां, मनादि शांत अथवा लीन झालीं असतां, जी श्रेष्ठ देवता नामरूपांच्या व्याकरणासाठीं जीवात्मरूपानें म्हणजे चैतन्याच्या प्रतिबिंबरूपानें मनामध्यें प्रविष्ट झाली होती ती देवता स्वात्मरूपाकडे जाऊन तेथें राहते. अर्थात् मन नांवाची जी जीवरूपता प्राप्त झाली होती, ती सोडून देऊन ही श्रेष्ठ देवता स्वस्वरूपी होते. म्हणून स्वप्नान्त या शब्दाचा वाच्यार्थ सुषुप्ति असाच असला पाहिजे. आतां निद्रा घेणारा पुरुष ज्यावेळीं स्वप्नं पाहतो, त्यावेळीं तें स्वप्नदर्शन सुखदुःखांनीं संयुक्त झालेलें असतें. सुखदुःख हें पुण्यापुण्याचें कार्य आहे. पुण्यकर्म केलें असतां सुखारंभ होतो, पापकर्म केलें असतां दुःखारंभ होतो, हें प्रसिद्धच आहे. पुण्यापुण्यात्मक कर्मे अज्ञानापासून उत्पन्न होणाऱ्या कामानें म्हणजे वासनेनें उत्पन्न होतात आणि तीं पुण्यापुण्यात्मक कर्मे सुखदुःख आणि त्यांचें दर्शन ह्या कार्यास आरंभ करितात हें ह्मणणें योग्यच आहे. सुखदुःखाची पुण्यापुण्याशिवाय उत्पत्ति होत नाहीं. तात्पर्य अविद्या, काम, आणि कर्म ह्या जन्ममरण देणाऱ्या निमित्तांनी आपलें स्वप्न युक्त असतें, म्हणून स्वप्नं पाहत असणारा जीव स्वस्वरूपाला गेला असें म्हणतां येत नाहीं. "ज्यावेळीं पुण्य अनुगत होत नाहीं व पापही अनुगत होत नाहीं; तात्पर्य ज्यावेळीं जीव पापपुण्यातीत होतो त्यावेळीं तो हृदयांत वास्तव्य करणारा विस्तीर्ण शोकसागर तरून जातो." "तें हें अतिच्छंद ( कामातीत, अथवा कामशून्य ) स्वरूप होय. हाच अत्यंत आनंद. आहे." इत्यादि श्रुती प्रमाण आहेत. सुषुप्त झालेला पुरुषच जीवदशा सोडून आपलें स्वतःचें दिव्य स्वरूप प्राप्त करून घेतो हें श्वेतकेतुला समजून द्यावें असा पित्याचा अभिप्राय आहे. म्हणून तो येथें म्हणत आहे कीं, स्वप्नांताचें स्वरूप मीं सांगत आहे तें स्पष्ट रीतीनें समजून घे.

---

कदा स्वप्नान्तो भवतीत्युच्यते । यत्र यस्मिन्काल एतन्नाम भवति पुरुषस्य स्वप्स्यतः । प्रसिद्धं हि लोके स्वपितीत्याह । यदा स्वपितीत्युच्यते पुरुषस्तदा तस्मिन्काले सता सच्छब्दवाच्यया प्रकृतया देवतया संपन्नो भवति संगत एकीभूतो भवति । मनसि प्रविष्टं मन आदिसंसर्गकृतं जीवरूपं परित्यज्य स्वं सद्रूपं यत्परमार्थसत्यमपीतोऽपिगतो भवति । अतस्तस्मात्स्वपितीत्येनमाचक्षते लौकिकाः । स्वमात्मानं हि यस्मादपीतो भवति । गुणनामप्रसिद्धितोऽपि स्वात्मप्राप्तिर्गम्यत इत्याभिप्रायः । कथं पुनर्लौकिकानां प्रसिद्धा स्वात्मसंपत्तिर्जाग्रच्छ्रमनिमित्तोद्भवत्वात्स्वापस्येत्याहुः । जागरिते हि पुण्यापुण्यनिमित्तसुखदुःखाद्यनेकायासानुभवाच्छ्रान्तो भवति ततश्चाऽऽयस्तानां करणानामनेकव्यापारनिमित्तग्लानानां स्वव्यापारेभ्य उपरमो भवति । श्रुतेश्च श्राम्यत्येव वाक्श्राम्यति चक्षुरित्येवमादि । तथा च गृहीता वाग्गृहीतं चक्षुर्गृहीतं श्रोत्रं गृहीतं मन इत्येवमादीनि करणानि प्राणग्रस्तानि प्राण एकोऽश्रान्तो देहे कुलाये यो जागर्ति तदा जीवः श्रमापनुत्तये स्वं देवतारूपमात्मानं प्रतिपद्यते । नान्यत्र स्वरूपावस्थानाच्छ्रमापनोदः स्यादिति युक्ता प्रसिद्धिर्लौकिकानां स्वं ह्यपीतो भवतीति । दृश्यते हि लोके ज्वरादिरोगग्रस्तानां तद्विनिर्मोके स्वात्मस्थानां विश्रमणं तद्वदिहापि स्यादिति युक्तम् । तद्यथा श्येनो वा सुपर्णो वा विपरिपत्य श्रान्त इत्यादिश्रुतेश्च ॥ १ ॥

सिद्धांती:—स्वप्नान्त म्हणजे सुषुप्ति अथवा गाढ निद्रा केव्हां प्राप्त होते तें सांगतात: जेव्हां ' स्वपिति ' हें नांव निद्रा घेणाऱ्या मनुष्यास प्राप्त होतें, तेव्हां त्याला ' सुषुप्ति ' असें म्हणतात. तो निद्रा घेत आहे, सुषुप्त स्थितींत आहे असें व्यवहारांतहि आपण म्हणत असतों हें प्रसिद्ध आहे. हें नाम गौण आहे. जेव्हां एखादा पुरुष निद्रित आहे, असें आपण म्हणतों तेव्हां तो पुरुष आपली जी प्रस्तुत ' सत् ' नामक श्रेष्ठ देवता आहे, तिच्या स्वरूपामध्यें जाऊन एकरूप होतो; म्हणजे मनादिकांच्या संसर्गानें प्राप्त झालेलें जीवरूप सोडून देऊन आपलें स्वतःचें सद्रूप तें प्राप्त करून घेतो. तात्पर्य, परमार्थ सत्यस्वरूप प्राप्त करून घेतो, म्हणून तो मनुष्य ' स्वपिति ' ( गाढ निद्रा घेत आहे ) असें व्यावहारिक लोक म्हणतात. कारण ज्या अर्थी तो

आपल्या स्वात्मस्वरूपामध्यें प्रवेश कारतो; त्या अर्थी त्याला ' स्वं अपीति ' ( स्वरूपा-प्रत प्राप्त झाला आहे, ' व्यवहारतः गाढ निद्रा घेत आहे असें होतें. तात्पर्य 'स्वपिति' हें गौण नाम आहे, हें गौण, गुणवाचक नाम प्रसिद्ध आहे. तथापि या नांवाचा मुख्य अर्थ निद्रित मनुष्याला स्वात्मप्राप्ति होते असाच समजून घ्यावयाचा आहे. आतां हें नांव व्यवहारांत कोणत्या रीतीनें प्रसिद्ध आहे तें पहा. जागृतकालीं अनंत श्रम देणारीं, श्रांत करणारीं, कारणें उत्पन्न होत असतात, तीं सर्व निद्रेमध्यें विनिष्ट होतातशीं दिसतात. तात्पर्य; दिवसभर प्राप्त होणाऱ्या दगदगीनें निद्रा येते, अशी व्यवहारांत प्रसिद्धि आहे. जागृत स्थितीमध्यें पुण्यापुण्यकर्माच्या योगानें उत्पन्न होणारे सुख-दुःखादिकांचे आयास म्हणजे श्रम अनुभवणारा पुरुष श्रांत होतो ( थकतो ) आणि थकलेल्या, अनेक व्यापार केल्यामुळें ग्लानीपणा प्राप्त झालेल्या इंद्रियादिकांचा उपरम स्व-व्यापारापासून होत असतो हें आपण नित्य पाहतों. " वाणी थकल्यासारखी होते, नेत्र थकल्यासारखे होतात " इत्यादि श्रुती प्रमाण आहेत. तदनंतर निवृत्त झालेली वाणी, निवृत्त झालेले नेत्र, निवृत्त झालेले कर्ण, निवृत्त झालेलें मन, इत्यादि सर्व अवयव प्राणग्रस्त ( प्राणामध्यें लीन झालेले होतात, एक प्राण मात्र श्रांत न होतां, देहामधें ( देह हाही एक पिंजराच आहे ) जागृत राहतो, आणि जीव श्रमाच्या विनोदनासाठीं, ( श्रम नाहींसे करण्यासाठीं श्रमाचा अपनोद करण्यासाठीं, आपलें स्वतःचें जे दिव्य स्वरूप आहे त्यांत प्रवेश कारितो. खरेंच आहे. आपण आपल्या स्वरूपांत प्रवेश करून तेथें राहिलों असतां जसा श्रमाचा परिहार होतो तसा इतरत्र कोठेंहि जाऊन होत नाहीं; म्हणून व्यवहारांतसुद्धां " स्वपिति " स्वस्वरूपाकडे गेला असें म्हणतात तें योग्य आणि उपपन्न आहे. व्यवहारांत आपण नित्य पाहतों कीं, ज्वरादि रोगांनीं ग्रस्त झालेले पुरुष ज्वरशांति झाल्यानंतर बरे होतात आणि त्यांना स्वस्वरूप प्राप्त झाल्यामुळें उत्कृष्ट विश्रांति मिळते. तात्पर्य स्वपिति हा शब्द अत्यंत योग्य आणि सार्थ आहे हें ठरतें. ' ज्याप्रमाणें श्येन अथवा सुपर्ण पक्षी आकाशामधें विहार करून श्रांत होतो " इत्यादि श्रुतीहि प्रमाण आहेत. (बृहदारण्यक ४–३–१९) ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**स यथा शकुनिः सूत्रेण प्रबद्धो दिशं दिशं पति-त्वाऽन्यत्राऽऽयतनमलब्ध्वा बन्धनमेवोपश्रयत एव-व खलु सोम्य तन्मनो दिशं दिशं पतित्वाऽन्य-**

**त्राऽऽयतनमलब्ध्वा बन्धनमेवोपश्रयते प्राणबन्धनꣳ हि सोम्य मन इति ॥ २ ॥**

अन्वय व अर्थः—यथा **सूत्रेण प्रबद्धः सः शकुनिः दिशं दिशं पतित्वा, अन्यत्र आयतनं अलब्ध्वा बन्धनं एव उपश्रयते** ( ज्याप्रमाणें सूत्रानें घट्ट बांधलेला एखादा पक्षी चारी दिशेला उडून जातो, पण त्याला कोठेंहि विश्रांतीस्थान मिळत नाहीं असें पाहून तो सूत्रबद्ध पक्षी, बांधलेल्या स्थानीं येतो. ) **एवं एव खलु सोम्य तत् मनः दिशं दिशं पतित्वा, अन्यत्र आयतनं अलब्ध्वा प्राणं एव उपश्रयते** ( त्याचप्रमाणें हे सौम्य, तें आपलें मन दशदिशेला भ्रमण करितें, पण त्याला कोठेंहि विश्रांतिस्थान आढळत नाहीं ह्मणून तें प्राणाचा आश्रय करितें. ) **हि सोम्य प्राणबंधनं मनः इति** ( कारण हे सौम्य मन हें प्राणबंधन आहे. प्राण हाच त्याचा आश्रय आहे ) ॥ २ ॥

तत्रायं दृष्टान्तो यथोक्तेऽर्थे स यथा शकुनिघातकस्य हस्तगतेन सूत्रेण प्रबद्धः पाशितो दिशं दिशं बन्धनमोक्षार्थी सन्प्रतिदिशं पतित्वाऽन्यत्र बन्धनादायतनमाश्रयं विश्रामणायालब्ध्वाऽप्राप्य बन्धनमेवोपश्रयते। एवमेष यथाऽयं दृष्टान्तः खलु ह सोम्य तन्मनस्तत्प्रकृतं षोडशकलमन्नोपचितं मनो निर्धारितं तत्प्रविष्टस्तत्स्थस्तदुपलक्षितो जीवस्तन्मन इति निर्दिश्यते मञ्चाक्रोशनवत्। स मनआख्योपाधिर्जीवोऽविद्याकामकर्मोपदिष्टां दिशं दिशं सुखदुःखादिलक्षणां जाग्रत्स्वप्नयोः पतित्वा गत्वाऽनुभूयेत्यर्थः। अन्यत्र सदाख्यात्स्वात्मन आयतनं विश्रमणस्थानमलब्ध्वा प्राणमेव प्राणेन सर्वकार्यकरणाश्रयेणोपलक्षिता प्राण इत्युच्यते सदाख्या परा देवता। प्राणस्य प्राणं प्राणशरीरो भारूप इत्यादिश्रुतेः। अतस्तां देवतां प्राणं प्राणाख्यामेवोपश्रयते। प्राणो बन्धनं यस्य मनसस्तत्प्राणबन्धनं हि यस्मात्सोम्य मनः प्राणोपलक्षितदेवताश्रयं मन इति तदुपलक्षितो जीव इति ॥ २ ॥

सिद्धांतीः—आपलें म्हणणें स्पष्ट करण्यासाठीं श्रुतीनें एक पक्ष्याचा दृष्टांत घेतला आहे पहा. पक्ष्यांस धरणारा जो शकुनिघातक ( पारधी ) त्याच्या हातांतील दोरीनें ( पाशांनीं ) बद्ध झालेला पक्षी बंधविमोचनास्तव दाही दिशांकडे जाऊन पाहतो; परंतु पारध्याच्या पाशाशिवाय त्याला दुसरें कोठेंहि विश्रांतिस्थान न आढळल्यामुळें आपल्या बंधनाच्या जागीं येऊन स्तब्ध होतो, हा दृष्टांत येथें कसा उपयोगी पडतो पहा. हें सौम्य, आपला वादाचा विषय जें मन, हें अन्नानें पुष्ट होऊच षोडशकलात्मक होतें हें कसें, तें आपण मागच्या प्रकरणांत पाहिलें व ठरविलें आहे. या अन्नपुष्ट मनामध्यें प्रवेश करून तेथें राहणारा आणि मन या वस्तूनें व नांवानें लक्षिला जाणारा हा आपला जीव आहे. त्याचें निदर्शन करावयाचें असल्यास आपण मनाचा निर्देश करितों. मंचकावर बसलेले पुरुष आक्रोश करीत आहेत, असें स्पष्ट न म्हणतां 'मंच ( मंचक, माचे ) ओरडतात' असें आपण म्हणतों. त्याप्रमाणेंच जीवाचाहि निर्देश 'मनरूपी' वस्तूनें करितों. असो. तो मनोनामक उपाधीनें ग्रस्त झालेला जीव अविद्या, तज्जन्य काम आणि तज्जनित कर्म या सर्वांनीं दाखविलेल्या सुखदुःखादि लक्षणात्मक दाही दिशांस जागृत काळीं आणि स्वप्नस्थितीमध्यें भ्रमण करीत असतो. तथापि ह्या जीवाला शांत करणाऱ्या 'सत्' नामक आत्मस्थानासारखें दुसरें कोणतेंहि विश्रांतिस्थान सांपडत नाहीं. म्हणून तो विश्रांतिसाठीं प्राणरूपांत प्रवेश करितो. सर्व कार्यकारणांचें आश्रयस्थान असणारा जो प्राण, तोच सत् नामक जी श्रेष्ठ देवता आहे, तिचें उपलक्षण आहे. या 'सत्' नामक परादेवतेला येथें प्राण या नांवानें उल्लेखिलें आहे.

"प्राणाचा प्राण, प्राण शरीर आहे ज्याचा असा, तेजोरूप" इत्यादि सताचीं नांवें श्रुतिप्रसिद्ध आहेत. म्हणून येथेंहि श्रुतीनें सन्नामक श्रेष्ठ देवतेला प्राण या नांवानें उल्लेखिलें आहे. असो; आपलें मन प्राणाचा आश्रय करितें. तें प्राणबंधन आहे, म्हणजे प्राणानें उपलक्षिलेली जी श्रेष्ठ देवता ती या मनाचा आश्रय आहे. अर्थात् येथें 'मन' या शब्दाचा लक्ष्यार्थ जीव हा आहे. तात्पर्य विश्रांतीसाठीं जीव स्वस्वरूपांत प्रवेश करितो ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**अशनापिपासे मे सोम्य विजानीहीति यत्रैतत्पुरुषोऽशिशिषति नामाऽऽप एव तदशितं नयन्ते तद्यथा गोनायोऽश्वनायः पुरुषनाय इत्येवं तदप**

**आचक्षतेऽशनायेति तत्रैतच्छुङ्गमुत्पतितꣳ सोम्य विजानीहि नेदममूलं भविष्यतीति ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थः**—सोम्य, हे अशनापिपासे विजानीहि इति ( हे सौम्य, अशना ह्मणजे क्षुधा व पिपासा म्हणजे तृषा यांचें स्वरूप माझेपासून समजून घे, असें उद्दालक आपले पुत्राला ह्मणाला ) **यत्र एतत् पुरुषः अशिशिषति** नाम, **आपः एव तत् अशितम् नयन्ते** ( जेव्हां कोणा पुरुषाला खाण्याची इच्छा होऊन ती तृप्त होते तेव्हां त्यानें खाल्लेलें अन्न जलें उदरांत घेऊन जातात; आणि तें पचून पुन्हा क्षुधा उत्पन्न करितात ) **यथा गोनायः, अश्वनायः इति** ( ज्याप्रमाणें गोनाय, अश्वनाय, पुरुषनाय इत्यादि शब्द सिद्ध होतात तसाच हा ) **एवं 'अशनाय' इति तत् अप आचक्षते** ( त्याचप्रमाणें जलाला 'अशनाय' असें नांव मिळतें ) **तत्र एतत् शुंग उत्पतितं विजानीहि सोम्य** ( हे सोम्य, असें झाल्यानंतर हें शुंग म्हणजे हा अंकुर उत्पन्न होतो ) **इदं अमूलं न भविष्यति इति** ( हा अंकुर केव्हांहि मूलशून्य नसतें ) ॥ ३ ॥

एवं स्वपितिनामप्रसिद्धिद्वारेण यज्जीवस्य सत्यस्वरूपं जगतो मूलं तत्पुत्रस्य दर्शयित्वाऽऽहान्नादि कार्यकारणपरम्परयाऽपि जगतो मूलं सद्दिदर्शयिषुः अशनापिपासे अशितुमिच्छाऽशनां यालोपेन । पातुमिच्छा पिपासा ते अशनापिपासे अशनापिपासयोः सतत्त्वं विजानीहीत्येतत् । यत्र यस्मिन्काले एतन्नाम पुरुषो भवति । किं तदाशिशिषत्याशितुमिच्छतीति । तदा तस्य पुरुषस्य किंनिमित्तं नाम भवतीत्याह । यत्तत्पुरुषेणाशितमन्नं कठिणं पीता आपो नयन्ते द्रवीकृत्य रसादिभावेन विपरिणमयन्ते तदा भुक्तमन्नं जीर्यति । अथ च भवत्यस्य नामाशिशिषतीति गौणम् । जीर्णे ह्यन्नेऽशितुमिच्छति सर्वो हि जन्तुः ।

सिध्दांतीः—याप्रमाणें मागच्या मंत्रांत प्रसिद्ध केलेल्या 'स्वपिति' नामक नाम द्वारानें जीवाचें जें सत्य स्वरूप आहे व जें जगताचें मूळ आहे, तें उद्दालकानें आपल्या

पुत्रास स्पष्ट करून दाखविलें आणि नंतर अन्नादिकांच्या कार्यकारणपरंपरेनेंहि जगताचें मूळ कारण आपल्या पुत्रास विशद करून दाखवावें, या इच्छेनें तो पुत्रास म्हणाला.

अशनापिपासा या द्वयांचेंही तुला स्पष्ट स्वरूप विशद करून दाखवितों. तात्पर्य, कारणासह त्यांचें स्वरुप तुला सांगतों. खाण्याची इच्छा म्हणजे क्षुधा. इला अशना असें म्हणावें; पिण्याची इच्छा ती पिपासा; अशनाया या शब्दांतील याचा लोप झाला आहे तो आर्ष होय. असो. जेव्हां कोणी पुरुष खाण्याची इच्छा करितो, तेव्हां त्या पुरुषाला खाण्याची इच्छा कां होते तें ऐक. त्या पुरुषानें भक्षिलेलें जें कठिण अन्न असतें तें प्यालेल्या पाण्यामुळें द्रवीभूत होऊन ( घट्ट अन्नाचें पातळ अन्न होऊन ) त्याचें रस, रक्त, मांस इत्यादि निरनिराळे परिणाम होतात. हे परिणाम पूर्ण झाले; म्हणजे त्या पुरुषानें खाल्लेलें अन्न जिरतें आणि तें अन्न जिरलें म्हणजे त्या पुरुषाला 'अशीशिषति' ( खाण्याची इच्छा करीत आहे ) असें गौण म्हणजे गुणजन्य नाम प्राप्त होतें. आपल्यास ठाऊक आहे कीं, अन्न जिरलें म्हणजे प्रत्येक जीवाला भूक लागत असते. म्हणून श्रुतीनें त्या पुरुषाला अशनाची इच्छा करणारा असें म्हटलें आहे.

**तत्रापामशितनेतृत्वादशनाया इति नाम प्रसिद्धमित्येतस्मिन्नर्थे । यथा गोनायो गां नयतीति गोनाय इत्युच्यते गोपालः । तथाऽश्वान्नयतीत्यश्वनायोऽश्वपाल इत्युच्यते । पुरुषनायः पुरुषान्नयतीति राजा सेनापतिर्वा । एवं तत्तदाऽप आचक्षते लौकिका अशनायेति विसर्जनीयलोपेन । तत्रैवं सत्यद्भी रसादिभावेन नीतेनाशितेनान्नेन निष्पादितमिदं शरीरं वटकणिकायामिव शुङ्गोऽङ्कुर उत्पतित उद्गतस्तमिमं शुङ्गं कार्यं शरीराख्यं वटादिशुङ्गवदुत्पतितं हे सौम्य विजानीहि । किं तत्र विज्ञेयमित्युच्यते । शृण्विदं शुङ्गवत्कार्यत्वाच्छरीरं नामूलं मूलरहितं भविष्यतीत्युक्त आह श्वेतकेतुः ॥ ३ ॥**

**सिध्दांती:**—या ठिकाणा अन्नाला उदरांत नेणाऱ्या जलांस 'अशनाया' हें नांव प्राप्त होऊन आतांच सांगितलेल्या अर्थानें सिद्धहि म्हणजे सार्थ होतें. गाई नेणाऱ्यास गोनाय ( गोपाल ), अश्व नेणाऱ्यास अश्वनाय ( अश्वपाल ) असें आपण म्हणतों, पुरुषास नेणारा, नियंत्रित करणारा, तो पुरुषनाय म्हणजे राजा अथवा सेनापति होय. हीं नांवें जशीं सार्थ आहेत, तसेंच जलांचें 'अशनाया' हें नांव व्यवहारांत उपयोजिलें आहे. मंत्रांत "अशनायेति" ( अशनायाः इति ) असें जें पद दिसतें तें

अशनाया इति असें हवें, पण श्रुतीनें विसर्गाचा लोप करून संधी केला आहे. असो. जलानीं आपण खाल्लेल्या अन्नाचे रसादि सत्परिणाम केल्यानंतर त्या भक्षित अन्नापासून हें शरीर उत्पन्न होतें. वटवृक्षाच्या बीजांतून अंकुराची उत्पत्ति होते, अंकुर बाहेर येतो, त्याप्रमाणें हें आपलें शरीररूपी कार्य वडाच्या अंकुरासारखेंच उत्पन्न झालें आहे, हें समजून ठेव. समजून घ्यावयाची गोष्ट ती हीच आहे. ज्याअर्थी शरीर हें अंकुराप्रमाणें कार्यरूप आहे, त्याअर्थी तें मूलरहित नसलेंच पाहिजे. त्याला कांहीं तरी मूळ (कारण असलेंच पाहिजे.) पित्याचें हें बोलणें ऐकून श्वेतकेतु जें म्हणाला तें पुढच्या मंत्रांत सांगितलें आहे ॥ ३ ॥

---

## मंत्र चवथा.

**तस्य क्व मूलँ स्यादन्यत्रान्नादेवमेव खलु सोम्यान्नेन शुङ्गेनापो मूलमन्विच्छाद्भिः सोम्य शुङ्गेन तेजो मूलमन्विच्छ तेजसा सोम्य शुङ्गेन सन्मूलमन्विच्छ सन्मूलाः सोम्येमाः सर्वाः प्रजाः सदायतनाः सत्प्रतिष्ठाः ॥ ४ ॥**

**अन्वय व अर्थः—तस्य क्व मूलं स्यात्** ( त्याचें मूलकारण कोठें आहे ) **तस्य अन्नात् अन्यत्र क्व मूलं स्यात्** ( अन्नाशिवाय त्याचें दुसरें कोणतें मूळ असणार ? ) **एवं एव खलु सोम्य अन्नेन शुंगेन आपः मूलं अन्विच्छ** ( याप्रमाणें, अन्नरूपी कार्य पाहून त्याचें जळ हें कारण आहे असें जाण ) **सोम्य अद्भिः शुंगेन तेजः मूलं अन्विच्छ, सोम्य तेजसः शुंगेन सत् मूलं अन्विच्छ** ( याचप्रमाणें जळरूपी अंकुराच्या साह्यानें जलाचें तेज हें कारण आहे आणि तेजोरूपी अंकुर साह्यानें सत् हें तेजः कारण आहे, असें समजून घे ) **सोम्य, इमाः सर्वाः प्रजाः सन्मूलाः सदायतनाः; सत्प्रतिष्ठाः** ( हे सौम्य, या सर्व प्रजा सतापासून उत्पन्न झालेल्या, सताच्या आश्रयानें राहणाऱ्या आणि सतामध्यें लीन होणाऱ्या आहेत ) ॥ ४ ॥

यथेदं समूलमिदं शरीरं वटादिशुङ्गवत्तस्यास्य शरीरस्य क्व मूलं स्यादित्येवं पृष्ट आह पिता । तस्य क्व मूलं स्यादन्यत्रान्नादन्नं मूलमित्यभिप्रायः । कथम् । अशितं ह्यन्नमद्भिर्द्रवीकृतं जाठरेणाग्निना पच्यमानं रसभावेन परिणमते । रसाच्छोणितं शोणितान्मांसं मांसान्मेदो मेदसोऽस्थीन्यस्थिभ्यो मज्जा मज्जायाः शुक्रम् । तथा योषिद्भुक्तं चान्नं रसादिक्रमेणैवं परिणतं लोहितं भवति । ताभ्यां शुक्रशोणिताभ्यामन्नकार्याभ्यां संयुक्ताभ्यामन्नेनैवं प्रत्यहं भुज्यमानेनाऽऽपूर्यमाणाभ्यां कुड्यमिव मृत्पिण्डैः प्रत्यहमुपचीयमानोऽन्नमूलो देहशुङ्गः परिनिष्पन्न इत्यर्थः । यत्तु देहशुङ्गस्य मूलमन्नं निर्दिष्टं तदपि देहवद्विनाशोत्पत्तिमत्त्वात्कस्माच्चिन्मूलादुत्पतितं शुङ्ग एवेति कृत्वाऽऽह । यथा देहशुङ्गोऽन्नमूल एवमेव खलु सोम्यान्नेन शुङ्गेन कार्यभूतेनापो मूलमन्नस्य शुङ्गस्यान्विच्छ प्रतिपद्यस्व । अपामपि विनाशोत्पत्तिमत्त्वाच्छुङ्गत्वमेवेति अद्भिः सोम्य शुङ्गेन कार्येण कारणं तेजोमूलमन्विच्छ । तेजसोऽपि विनाशोत्पत्तिमत्त्वाच्छुङ्गत्वमिति तेजसा सोम्य शुङ्गेन सन्मूलमेकमेवाद्वितीयं परमार्थसत्यम् । यस्मिन्सर्वमिदं वाचाऽऽरम्भणं विकारो नामधेयमनृतं रज्ज्वामिव सर्पादिविकल्पजातमध्यस्तमविद्यया तदस्य जगतो मूलमतः सन्मूलाः सत्कारणा हे सोम्येमाः स्थावरजङ्गमलक्षणाः सर्वाः प्रजा न केवलं सन्मूला एवेदानीमपि स्थितिकाले सदायतनाः सदाश्रया एव । नहि मृदमनाश्रित्य घटादेः सत्त्वं स्थितिर्वाऽस्ति । अतो मृद्वत्सन्मूलत्वात्प्रजानां सदायतनं यासां ताः सदायतनाः प्रजाः । अन्ते च सत्प्रतिष्ठाः सदेव प्रतिष्ठा लयः समाप्तिरवसानं परिशेषो यासां ताः सत्प्रतिष्ठाः ॥ ४ ॥

सिद्धांतीः—पुत्रानें विचारिलें, वटादिकांच्या अंकुराप्रमाणें हें आपलें शरीर समूल आहे, असें आपण म्हणतां, तर त्या शरीराचें मूळ कारण कोणतें आहे, तें आपण मला सांगा. हा पुत्र-प्रश्न ऐकून पिता म्हणाला; श्वेतकेतो, अन्नाशिवाय दुसरीकडे कोठें शरीराचें कारण असणार आहे? अन्न हेंच शरीराचें कारण होय. पहा. आपण खाल्लेलें अन्न द्रवीभूत म्हणजे पातळ होतें आणि तें जठराग्नीनें पचून जाऊन रसरूप होतें. या अन्नापासून रक्त, रक्तापासून मांस, मांसापासून मेद, त्यापासून अस्थी, अस्थीपासून

मज्जा आणि मज्जेपासून शुक्र म्हणजे वीर्य उत्पन्न होतें. त्याचप्रमाणें स्त्रीभुक्त अन्नाचें आतांच सांगितलेल्या रसादिक्रमानें लोहित, ( शोणित, रक्त ) होतें. या अन्ननिर्मित शुक्रशोणीतांच्या संगमापासून आपल्या देहाचा अंकुर निष्पन्न होतो आणि प्रत्येक दिवशीं आपण जें अन्न भक्षण करितों त्याच्या रसपरिपाकानें हा अन्नमूलक अंकुर प्रतिदिवशीं पुष्ट होत जातो. एखादी भिंत किंवा भिंतीवरील गिलावा मृत्पिंडांनीं (विटांनीं अथवा मातीच्या सारवणानें ) पुष्ट होत जातो, त्याप्रमाणें अन्नापासून उत्पन्न झालेल्या शुक्रशोणीतसंयोगानें देहाचा अंकुर उत्पन्न होऊन पुष्ट होत जातो. आतां देहशुंगाचें ( देहाच्या अंकुराचे ) मूळ कारण अन्न आहे म्हणून सांगितलें; तें सुद्धां देहाप्रमाणें उत्पत्ति व लय पावणारें आहे. म्हणून ' कोणत्या कारणापासून तें उत्पन्न झालें ? ' याला उत्तर म्हणून पुढील मंत्राची योजना आहे. ज्याप्रमाणें देहशुंग अन्नमूलक आहे त्याप्रमाणेंच अन्न हें जें कार्य त्याचें जल हें मूल कारण आहे, असें शोधाअंतीं तुला कळेल; जल उत्पत्तिविनाशवंत आहे, म्हणून कार्यरूप आहे. तेव्हां जल हें कार्य धरून त्याचें कारण तेज आहे हें जाणून घे. आणि याच न्यायानें उत्पत्तिविनाशात्मक तेजाचे हे सौम्य ' सत् ' हें एकच अद्वितीय कारण आहे; आणि तें मात्र परमार्थतः सत्य आहे, असें ज्ञान करून घे. रज्जूवर जसा आपण सर्पादिकांचा भ्रांतीनें, संशयानें अथवा अविद्येनें आरोप करितों त्याप्रमाणें या परमार्थतः सत्य असणाऱ्या सतावर तेज, जल, अन्न इत्यादिकांचा व सर्व जगताचा आरोप करितों; परंतु अन्नादि सर्व कार्यरूप, वाचारंभणमात्र, म्हणजे शब्दमात्र आहेत, आणि वस्तुतः अनृत आहेत, हे समजून घेतलें पाहिजे. असो. सत् हें जगताचें मूल आहे; म्हणून हे सौम्य, ह्या सर्व स्थावरजंगमात्मक ( चराचर ) प्रजा म्हणजे वस्तू केवळ सन्मूलक आहेत, इतकेंच नव्हे तर आतां स्थितिकाळीं सुद्धां सताचा मात्र आश्रय करणाऱ्या आहेत. उघडच आहे कीं, मातीचा आश्रय केल्याविना घटाची उत्पत्ति अथवा स्थिति असणें शक्य नाहीं. म्हणून मृत्तिका जशी घटमूलक आणि घटाश्रय आहे, त्याप्रमाणें येथील सर्व दृश्य व कल्प्य वस्तू सन्मूलक व सदायतन आहेत. सत् आहे आयतन म्हणजे स्थान ज्यांचें त्या सदायतन होत. आणि शेवटीं असें म्हटलें पाहिजे कीं, त्या सर्व वस्तू सत्प्रातिष्ठित आहेत. सत् आहे प्रतिष्ठा ज्याची तें सत्प्रतिष्ठ होय. प्रतिष्ठा म्हणजे लय किंवा समाप्ति किंवा शेवटची स्थिति होय. याप्रमाणें सर्व वस्तू सन्मूल, सदायतन आणि सत्प्रतिष्ठ आहेत असें ठरलें. ॥ ४ ॥

## मंत्र पांचवा.

अथ यत्रैतत्पुरुषः पिपासति नाम तेज एव तत्पीतं नयते तद्यथा गोनायोऽश्वनायः पुरुषनाय इत्येवं तत्तेज आचष्ट उदन्येति तत्रैतदेव शुङ्गमुत्पतितं सोम्य विजानीहि नेदममूलं भविष्यतीति ॥ ५ ॥

**अन्वय व अर्थः**— अथ यत्र एतत् पुरुषः पिपासति नाम, तेजः एव तत् पीतं नयते; यथा गोनायः, अश्वनायः, पुरुषनायः, इति, एवं तत् तेजः उदन्येति इति आचष्टे ( जेव्हां हा पुरुष पाणी पिण्याची इच्छा करितो तेव्हां ती इच्छा तेजानेंच होते. आपण जे पेय पितों तें तेजानें नियमित झालेलें असतें. ज्याप्रमाणें गोनाय, अश्वनाय, पुरुषनाय इत्यादि शब्द आहेत त्याप्रमाणेंच तेजाला उदन्य असें म्हणतात ) तत्र एतत् एव उत्पतितं शुंगं सोम्य, न इदं अमूलं भविष्यति इति विजानीहि ( तेव्हां हें उत्पन्न झालेलें कार्य आहे; आणि तें अमूल नाहीं हें जाणून घे ) ॥ ५ ॥

अथेदानीमप्शुङ्गद्वारेण सतो मूलस्यानुगमः कार्य इत्याह । यत्र यस्मिन्काल एतन्नाम पिपासति पातुमिच्छतीति पुरुषो भवति । अशिशिषतीतिवदिदमपि गौणमेव नाम भवति । द्रवीकृतस्याशितस्यान्नस्य नेत्र आपोऽन्नशुङ्गं देहं क्लेदयन्त्यः शिथिलीकुर्युरब्बाहुल्याद्यदि तेजसा न शोष्यन्ते । नितरां च तेजसा शोष्यमाणास्वप्सु देहभावेन परिणममानासु पातुमिच्छा पुरुषस्य जायते तदा पुरुषः पिपासति नाम तदेतदाह । तेज एव तत्तदा पीतं भवति शोषयद्देहगतलोहितप्राणभावेन नयते परिणमयति । तद्यथा गोनाय इत्यादि समानमेवं तत्तेज आचष्टे लोक उदन्येत्युदकं नयतीत्युदन्यम् । उदन्येतीति छान्दसं तत्रापि पूर्ववत् । अपामप्येतदेव शरीराख्यं शुङ्गं नान्यादित्येवमादि समानमन्यत् ॥ ५ ॥

**सिद्धांती:**—आतां येथें आप हें कार्य आहे. त्याच्या द्वारानें त्याचें मूल जें सत् त्या कारणाचा अनुगम करावयाचा आहे. जेव्हां हा कोणी पुरुष पाणी पिण्याची इच्छा करितो—

**शिष्य:**—मागें खाण्याची इच्छा करणाराचें अशिशिषति हें गौण (गुणमूलक) नांव आहे असें ठरविलें त्याचप्रमाणें येथेंहि पिपासति हें नांव गौण असलें पाहिजे.

**सिद्धांती:**—ठीक आहे. आतां द्रवीभूत झालेल्या अशित अन्नाचें नेतृत्व जलांकडे असतें. पण अन्नकार्य जो देह त्याला हें जल भिजवून, कुजवून टाकण्याचा संभव आहे; कारण जलाचें येथें बाहुल्य आहे. परंतु हीं जलें तेजानें शोषून घेतलीं जातात. तेजानें शोषित झालेल्या जलांचा परिणाम देहभावानें झाल्यावर (शोषित झालेलीं जलें देहामध्यें मुरून जाऊन देहरूप झाल्यामुळें शरीर निर्जल झाल्यावर) जीवाला पाणी पिण्याची इच्छा उत्पन्न होते आणि ही इच्छा झाली ह्मणजे आपण हा पुरुष पाणी पिऊं इच्छिणारा आहे असें आपण ह्मणतों. पिपासा ह्मणजे तेजच होय. हें तेजच प्यालेले जलाला शुष्क करून त्यापासून रक्त, प्राण इत्यादि उत्पन्न करितें; अथवा रक्त, प्राण इत्यादिकांस पुष्ट करितें. तेव्हां गोनाय ह्मणजे गोपाल इत्यादि शब्द सिद्ध होतात त्याप्रमाणेंच तेजाला उदन्य (उदक नेणारें) असें ह्मणतात. मंत्रांतील 'उदन्येति' हें रूप छांदस् ह्मणजे आर्ष आहे. बाकी शेष राहिलेल्या मंत्राचा अर्थ याच खंडांतील तिसऱ्या मंत्राच्या अर्थाप्रमाणें आहे. ह्मणजे शरीरनामक कार्य वस्तु जलापासूनच उत्पन्न झाली आहे व हें जलहीं असूल नाहीं, इत्यादि सांगल्याप्रमाणें समजून घ्यावयाचें आहे ॥ ५ ॥

---

## मंत्र सहावा.

**तस्य क्व मूलँ स्यादन्यत्राद्भ्योऽद्भिः सोम्य शुङ्गेन तेजो मूलमन्विच्छ तेजसा सोम्य शुङ्गेन सन्मूलमन्विच्छ सन्मूलाः सोम्येमाः सर्वाः प्रजाः सदायतनाः सत्प्रतिष्ठा यथा नु खलु सोम्येमा-स्तिस्रो देवताः पुरुषं प्राप्य त्रिवृत्त्रिवृदेकैका भवति तदुक्तं पुरस्तादेव भवत्यस्य सोम्य पुरुषस्य प्रयतो वाङ्मनसि संपद्यते मनः प्राणे प्राणस्तेजसि तेजः परस्यां देवतायाम् ॥ ६ ॥**

अन्वय व अर्थः—तस्य अद्भ्यः अन्यत्र क्व मूलं स्यात् ( त्याचें कारण जळाशिवाय दुसरीकडे कोठें सांपडणार ) **सोम्य अद्भिः शुंगेन तेजः मूलं अन्विच्छ, सोम्य तेजसा शुंगेन सन्मूलं अन्विच्छ; सोम्य इमाः सर्वाः प्रजाः सन्मूलाः सदायतनाः सत्प्रतिष्ठाः** ( हे सौम्य जल या कार्याचें तेज हें कारण आहे; आणि तेज या कार्याचें सत् हें मूल कारण आहे, असें जाणून घे. ह्या सर्व प्रजा सन्मूल सदायतन आणि सत्प्रतिष्ठ आहेत. ) **सोम्य यथानु खलु इमाः तिस्रः देवताः पुरुषं प्राप्य एका एका त्रिवृत् त्रिवृत् भवति तत् पुरस्तात् उक्तं भवति एव** ( हे सौम्य, ह्या तीन देवता आहेत; आणि त्या जीवाजवळ आल्यानंतर त्यापैकीं प्रत्येकीचें त्रिवृत्करण कसें होतें, तें पूर्वीच सांगितलें आहे) **सोम्य अस्य प्रयतः पुरुषस्य वाक् मनसि, मनः प्राणे, प्राणः तेजसि, तेजः परस्याम् देवतायां संपद्यते** ( हे सौम्य जेव्हां कोणी जीव आसन्नमरण होतो तेव्हां त्याची वाणी मनामध्यें लीन होतें आणि मन प्राणामध्यें प्राण तेजामध्यें आणि तेज सर्वश्रेष्ठ देवतेमध्यें लीन अथवा तत्स्वरूपी होतें ) ॥ ६ ॥

सामर्थ्यात्तेजसोऽप्येतदेव शरीराख्यं शुङ्गम् । अतोऽप्शुङ्गेन देहेनाऽऽपो मूलं गम्यते। अद्भिः शुङ्गेन तेजो मूलं गम्यते । तेजसा शुङ्गेन सन्मूलं गम्यते पूर्ववत् । एवं हि तेजोबन्नमयस्य देहशुङ्गस्य वाचारम्भणमात्रस्यान्नादिपरम्परया परमार्थसत्यं सन्मूलमभयमसंत्रासं निरायासं सन्मूलमन्विच्छेति पुत्रं गमयित्वाऽशिशिषति पिपासतीति नामप्रसिद्धिद्वारेण यदन्यादिहास्मिन्प्रकरणे तेजोबन्नानां पुरुषेणोपयुज्यमानानां कार्यकरणसंघातस्य देहशुङ्गस्य स्वजात्यसांकर्येणोपचयकरत्वं वक्तव्यं प्राप्तं तदिहोक्तमेव द्रष्टव्यमिति पूर्वोक्तं व्यपदिशति । यथा नु खलु येन प्रकारेणमास्तेजोबन्नाख्यास्तिस्रो देवताः पुरुषं प्राप्य त्रिवृत्त्रिवृदेकैका भवति तदुक्तं पुरस्तादेव भवत्यन्नमशितं त्रेधा विधियत इत्यादि । तत्रैवोक्तमन्नादीनामशितानां ये मध्यमा धातवस्ते साप्तधातुकं शरीरमुपचिन्वन्तीत्युक्तम् । मांसं भवति लोहितं भवति मज्जा भवत्यस्थि

भवति ये त्वणिष्ठा धातवो मनः प्राणं वाचं देहस्यान्तःकरण-संघातमुपचिन्वन्तीति चोक्तं तन्मनो भवति स प्राणो भवति सा वाग्भवतीति ।

**सिद्धांती:**—ह्या व मागच्या मंत्रांत जो न्याय सांगितला आहे, त्या न्याय–सामर्थ्यानें हें शरीरनामक कार्य तेजापासून व तेज सतापासून उत्पन्न होतें, हें समजून घेतां येतें, असो. जलकार्य जो देह तो जलमूलक आहे असें समजतें. तेजःकार्य जें जल तें तेजोमूलक आहे आणि सताचें कार्य जें तेज, तें सन्मूलक आहे असें पूर्वीच्या व्याख्यानावरून आपल्यास समजतें. याप्रमाणें तेज, आप आणि अन्न यांनीं घटित झालेल्या देहकार्याला 'वाचारंभण मात्र आहे' तें हें कार्य शब्दमात्र आहे. देह हा शुद्ध विकार आहे. कारण अन्न, आप, आणि तेज हीही सताचीं कार्यपरंपरा आहे. सर्व सन्मूलक आहे. ह्मणून परमार्थसत्य जें सत् तें शोधून समजून घे. कारण सत् हें निर्भयकारी, त्रासशून्य आणि श्रम न देणारें असें आहे हा उपदेश उद्दालकानें आपल्या पुत्रास केला. तसेंच "अशिशिषाति" 'पिपासति' ह्या प्रसिद्ध नामांच्या द्वारानें ह्या प्रकरणांत जें काय सांगावयाचें होतें तेंहि येथें सांगून टाकलें असें गृहीत धरून पूर्वी जें काय सांगितलें होतें त्याचा व्यपदेश (निर्देश) श्रुति करीत आहे. उपर्युक्त असणाऱ्या तेज, आप, अन्न यांचा कार्यकारणसंघात असणारें जें देहरूपी कार्य त्या कार्याला तेजादि तिन्ही वस्तु स्वतःमध्यें संकर होऊं न देतां पुष्ट करितात हेंही मागें सांगितलें. त्याचाच अनुवाद येथें केला आहे. तो असा कीं हे सौम्य, तेजादि नामें असणाऱ्या तिन्ही देवता जीवाजवळ आल्यानंतर त्यांपैकीं प्रत्येकीचें त्रिवृत्करण कोणत्या पद्धतीनें होतें हें पूर्वींच सांगितलें आहे आणि भुक्त अन्नाचे तीन प्रकार कसे होतात हेंही सांगितलें आहे. मागें असेंही सांगितलें आहे कीं, भक्षिलेल्या अन्नादिकांचे जे मध्यम धातू असतात ते या सप्तधातूंनीं घटित झालेल्या शरीरास पुष्ट करितात. ह्मणजे मांस, रक्त, मज्जा, अस्थि इत्यादि शरीरपोषक जे धातू त्यांपासून उत्पन्न होतात असें सांगितलें. तसेंच तेजादिकांचे जे अत्यंत सूक्ष्म अंश आहेत, ते देहाचा अंतःकरणसंघात (ह्मणजे मन, प्राण, आणि वाणी) पुष्ट करितात असें सांगितलें आहे आणि ह्मटलें आहे कीं, ते ते परमाणू मनोरूपी, प्राणरूपी आणि वाग्रूपी होतात.

सोऽयं प्राणकरणसंघातो देहे विशीर्णे देहान्तरं जीवाधिष्ठितो येन क्रमेण पूर्वदेहात्प्रच्युतो गच्छति तदा ह्यस्य हे सोम्य पुरुषस्य प्रयतो म्रियमाणस्य वाङ्मनसि संपद्यते मनस्युपसंह्रियते । अथ तदाऽऽहुर्ज्ञातयो न वदतीति । मनःपूर्वको हि वाग्व्यापारः । "यद्वै मनसा ध्यायति तद्वाचा वदति" इति श्रुतेः । वाक्युपसं-

हृतायां मनसि मनो मननव्यापारेण केवलेन वर्तते । मनोऽपि यदोपसंह्रियते तदा मनः प्राणे संपन्नं भवति सुषुप्तकाल इव तदा पार्श्वस्था ज्ञातयो न विजानातीत्याहुः । प्राणश्च तदोर्ध्वोच्छ्वासी स्वात्मन्युपसंहृतबाह्यकरणः संवर्गविद्यायां दर्शनाद्धस्तपादादीन्विक्षिपन्मर्मस्थानानि निकृन्तन्निवोत्सर्जन्क्रमेणोपसंहृतस्तेजसि संपद्यते । तदाऽऽहुर्ज्ञातयो न चलतीति मृतो नेति वा विचिकित्सन्तो देहमालभमाना उष्णं चोपलभमाना देह उष्णो जीवतीति यदा तदप्यौष्ण्यलिङ्गं तेज उपसंह्रियते । तदा तत्तेजः परस्यां देवतायां प्रशाम्यति ।

सिद्धांतीः—हा जो प्राणकरण संघात आतांच सांगितला, तो जीवाधिष्ठित आहे. जीव हेंच त्याचें अधिष्ठान आहे असें समजून घेतलें पाहिजे. पूर्वदेह विशीर्ण झाल्यानंतर दुसऱ्या देहांत प्रवेश करतांना जीव ( प्राण ) पूर्वदेह कसा सोडतो तो क्रम येथें सांगितला आहे. श्रुति ह्मणते अथवा उद्दालक ह्मणतो; हे सौम्य, मरणोन्मुख जीवाची वाणी मनामध्यें जाऊन बसते, मनामध्यें तिचा उपसंहार होतो. या वेळीं त्या जीवाच्या सभोंवार जमलेले बंधुबांधव ह्मणतात कीं, हा जीव आतां बोलत नाहीं. कारण जीवाचे सर्व बोलण्याचे व्यापार मनाचे साह्यानें चालतात. " मनानें ज्याचें चिंतन करितो तें वाणीनें बोलतो " ही श्रुति प्रमाण आहे. तात्पर्य वाणीचें कारण जें मन त्यांत वाणी लीन झाली ह्मणजे तो मुमूर्षु जीव मनानें ( मननानें ) मात्र व्यवहार करण्यास समर्थ असतो. हें मनही जेव्हां लीन होतें, तेव्हां तें प्राणाशीं एकरूप होतें. आपल्याला नित्याचा अनुभव आहे कीं, गाढनिद्रेमध्यें आपलें मन प्राणरूप होऊन मात्र राहतें; असो; त्याप्रमाणें मुमूर्षूची स्थिति झाली ह्मणजे जवळ असणारे बंधुबांधव ह्मणतात 'याला आतां कांहीं समजत नाहीं,' 'याची ज्ञानशक्ति लुप्त झाली.' त्या वेळीं प्राण ऊर्ध्व मार्गानें जात असतो. हा ऊर्ध्वगामी प्राण आत्म्यामध्यें लीन होतो. हें कसें तें संवर्गविद्येमध्यें मुमूर्षु जीवाचीं सर्व बाह्य इंद्रियें प्राणामध्यें उपसंहृत होतात ( लीन होतात )-आत्म्यांत लीन होतात, हेंहि सांगितलें आहे. असो हा प्राण हस्तपादादिकांचा त्याग करून व सर्व मर्मस्थानें कापून काढून उत्सर्जन मार्गानें तेजोरूप होतो असें संवर्गविद्येमध्यें सांगितलें आहे. ही स्थिति प्राप्त झाली ह्मणजे जीवाची हालचाल संपली असतां, जीव आहे कीं गेला याची मीमांसा करणारे बांधव देहामध्यें उष्णता असेल तर अद्यापि जीव आहे असें ह्मणतात. सारांश, प्राण तेजामध्यें लीन होतो, याचें चिन्हच मुमूर्षूचा देह उष्ण असणे हें होय. तदनंतर तें तेज श्रेष्ठ देवतेमध्यें प्रवेश करून शांत होतें.

तदेवं क्रमेणोपसंहृते स्वमूले प्राणे च मनसि तत्स्थो जीवोऽपि सुषुप्तकालवन्निमित्तोपसंहारादुपसंह्रियमाणः सन्सत्याभिसंधिपूर्वकं चेदुपसंह्रियते सदेव संपद्यते न पुनर्देहान्तराय सुषुप्तादिवोत्तिष्ठति । यथा लोके सभये देशे वर्तमानः कथंचित्तदभयं देशं प्राप्तस्तद्वत् । इतरस्त्वनात्मज्ञस्तस्मादेव सुषुप्तादिवोत्थाय मृत्वा पुनर्देहजालमाविशति यस्मान्मूलादुत्थाय देहमाविशति जीवः ॥ ६ ॥

**सिद्धांतीः**—या क्रमानें स्वमूलकारणांत लीन झालेल्या मनामध्यें राहणारा जीव जर सत्याभिसंधिपूर्वक ( सद्रूप जो आत्मा त्याची अभिसंधि-आत्मा हाच माझा पुरुषार्थ आहे असा निश्चय करून ) उपसंहृत होईल, कारणांच्या उपसंहारानें उपसंहृत होणारा जीव आत्मरूप होईल, तर तो जीव सद्रूप म्हणजे आत्मरूप होतो. पुनः त्याला देहांतराची उपाधि राहत नाहीं. निजलेला पुरुष पुनः उठतो तसा हा पुनः कधींहि उठत नाहीं. यद्यपि जीव मनामध्यें वास्तव्य करणारा आहे तथापि देहांतराला निमित्त असणारें जें मन त्याचा सर्वथा लय झाला असतां जीवाला आत्मस्वरूप मिळतें. तात्पर्य भीति असलेल्या देशांत राहणारा मनुष्य सुदैवानें भीति-शून्य देशांत गेला असतां जसा निर्भय होतो तसा आत्मरूप झालेला जीवही निर्भय होतो. परंतु अनात्मज्ञ पुरुष मात्र निद्रेंतून जाग्रत झालेल्या पुरुषाप्रमाणें पुनः देह धारण करितो, मरतो आणि पुनः देहरूपी पाशांत शिरतो. तात्पर्य, सद्रूपापासून भ्रष्ट होऊन जीव देहामध्यें पुन्हा प्रवेश करितो. ॥ ६ ॥

---

## मंत्र सातवा.

**स य एषोऽणिमैतदात्म्यमिदꣳ सर्वं तत्सत्यꣳ स आत्मा तत्त्वमसि श्वेतकेतो इति भूय एव मा भगवान्विज्ञापयत्विति तथा सोम्येति होवाच ॥७॥**

**इति षष्ठाध्यायस्याष्टमः खण्डः ॥ ८ ॥**

**अन्वय व अर्थः**—यः एषः सः अणिमा ( ज्याचें आतांपर्यंत वर्णन केलें, तोच हा अणिमा म्हणजे अणुरूपी सर्वकारण आत्मा होय. ) **इदं सर्वं ऐतदात्म्यं** ( हें सर्व दृश्य विश्व तदात्मकच आहे ) **तत् सत्यं** ( तेंच सत्य आहे) **सः आत्मा** ( तोच आत्मा आहे ) **श्वेतकेतो तत् त्वं असि** ( हे श्वेतकेतो तें तूं आहेस ) **इति** ( असें उद्दालकानें श्वेतकेतूला सांगि-

तलें. ) मा भूयः एव भगवान् विज्ञापयतु इति ( बाबा, हाच सिद्धान्त मला पुनः एकवार समजून सांगावा, असें श्वेतकेतु ह्मणाला) सोम्य तथा इति उवाच ह ( हें सौम्य, तथास्तु असें उद्दालक ह्मणाला ) ॥ ७ ॥

स यः सदाख्य एव उक्तोऽणिमाऽणुभावो जगतो मूलमैतदात्म्यमेतत्सदात्मा यस्य सर्वस्य तदेतदात्मा तस्य भाव एतदात्म्यम्। एतेन सदाख्येनाऽऽत्मनाऽऽत्मवत्सर्वमिदं जगत्। नान्योऽस्य-स्याऽऽत्मा संसारी। " नान्यदतोऽस्ति द्रष्टृ नान्यदतोऽस्ति श्रोतृ" इत्यादिश्रुत्यन्तरात्। येन चाऽऽत्मनाऽऽत्मवत्सर्वमिदं जगत्तदेव सदाख्यं कारणं सत्यं परमार्थसत्। अतः स एवाऽऽत्मा जगतः प्रत्यक्स्वरूपं सतत्त्वं याथात्म्यम्। आत्मशब्दस्य निरुपपदस्य प्रत्यगात्मनि गवादिशब्दवन्निरूढत्वात्। अतस्तत्सत्त्वमसीति हे श्वेतकेतो इत्येवं प्रत्यायितः पुत्र आह भूय एव मा भगवान्विज्ञापयतु यद्भवदुक्तं तत्संदिग्धं समाहन्यहनि सर्वाः प्रजाः सुषुप्ते सत्संपद्यन्त इत्येतद्येन तत्संपद्य न विदुः सत्संपन्नाः वयमिति। अतो दृष्टान्तेन मां प्रत्याययत्वित्यर्थः। एवमुक्तस्तथाऽस्तु सोम्येति होवाच पिता ॥ ७ ॥

इति षष्ठाध्यायस्याष्टमः खण्डः ॥ ८ ॥

सिद्धांतीः---ज्या सत् नामक वस्तूचें आपण विवेचन केलें तोच हा अणिमा आहे. हा अणुरूपी आत्मा, सर्वांच्या अंतर्यामी असणारा आत्मा, जगताचें मूलकारण आहे. या सर्व जगताचाही हा आत्मा हीच सद्वस्तु आहे. ह्मणून तिला 'एतदात्म ह्मणतात. एतदात्म्याचा भाव तें ऐतदात्म्य. तात्पर्य, ह्या सत् नामक आत्म्यानें हें सर्व जगत् आत्मवत् झालें आहे. या जगताचा संसारी असा दुसरा कोणी आत्मा नाहीं. " आत्म्याशिवाय दुसरा द्रष्टा नाहीं, " " दुसरा श्रोता नाहीं " ह्या श्रुती प्रमाण आहेत. ज्या या आत्म्याच्या सत्तेनें सर्व जगत् आत्मवत् झालें आहे, तोच सत् नामक आत्मा सर्व कारण आहे, तोच सत्य वस्तु आहे ह्मणजे परमार्थतः तेंच सत्य आहे. ह्मणून तोच आत्मा जगताचे प्रत्यक् स्वरूप ( अंतर्यामीचें स्वरूप ) असून, जगताचें तेंच तत्व आहे. परमार्थतः जगताचें जें प्रत्यक् स्वरूप तोच परमात्मा आहे. ध्यानांत ठेव कीं, ज्या वेळीं आत्मशब्दाच्या मागें किंवा पुढें उपपद नसतें, तेव्हां त्याचा प्रत्यगात्मा हा अर्थ असतो. गवादि शब्द जसे गोपदार्थाच्या ठिकाणीं रूढ

झाले आहेत, तसाच रूढीनें आत्मशब्दाचाहि प्रत्यगात्मा असा अर्थ ठरविला आहे. ह्मणून हे श्वेतकेतो, तोच सद्रूपी आत्मा तूं आहेस. " असा श्वेतकेतूला प्रत्यय आणून दिला, तरी तो ह्मणाला, ' पिताजी, पुन्हा एकवार आपण हा सिद्धांत मला समजून द्यावा. आपण जें काय सांगितलें आहे तें मला निश्चितपणानें समजलें नाहीं. माझ्या मनांत संशय राहिला आहे. पहा कीं, सर्व प्रजा गाढ निद्रेची स्थिति उपभोगित असतां सत्स्वरूपाशीं एकरूप होतात. तथापि ह्मणजे त्या सद्रूपी झाल्या असतांही त्यांस आपण ' सद्रूप झालों आहों ' असें ज्ञान नसतें. असें कां होतें, हें मला समजत नाहीं. यास्तव दृष्टांत घेऊन मला आपलें ह्मणजे श्रुतीचें ह्मणणें स्पष्ट समजेल, त्याची सत्यता पटेल, असें करावें. मुलाचें हें बोलणें ऐकून बाप ह्मणाला; हे सौम्य, ' तथास्तु ' ह्मणजे दृष्टांत देऊन तुला आत्मस्वरूपाचा प्रत्यय आणून देतों ॥ ७ ॥

साहाव्या अध्यायाचा ८ खंड समाप्त.

---

## अध्याय साहावा; खंड नववा.

### मंत्र पहिला.

**यथा सोम्य मधु मधुकृतो निस्तिष्ठन्ति नानात्ययानां वृक्षाणाꣳ रसान्समवहारमेकताꣳ रसं गमयन्ति ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—सोम्य, यथा मधुकृतः नानात्ययानां वृक्षाणां मधु निस्तिष्ठन्ति, समवहारं एकतां रसं गमयन्ति** (नानाठिकाणचे वृक्षापासून उत्पन्न होणारे रस एकत्र करून व त्या सर्वांस एकरस करून ज्याप्रमाणें मधुकर मधु उत्पन्न करितात— ) ॥ १ ॥

यत्पृच्छस्यहन्यहनि सत्संपद्य न विदुः सत्संपन्नाः स्म इति तत्कस्मादित्यत्र शृणु दृष्टान्तम् । यथा लोके हे सोम्य मधुकृतो मधु कुर्वन्तीति मधुकृतो मधुकरमक्षिका मधु निस्तिष्ठन्ति मधु निष्पादयन्ति तत्पराः सन्तः । कथम् । नानात्ययानां नानागतीनां नानादिक्कानां वृक्षाणां रसान्समवहारं समाहृत्यैकतामेकभावं मधुत्वेन रसानां गमयन्ति मधुत्वमापादयन्ति ॥ १ ॥

सिद्धांती:—उद्दालक ह्मणाला; मुला, रोजच्या रोज निद्रासमयीं सत्संपन्न होणाऱ्या प्रजांस निद्रेंत 'आपण सत्संपन्न झालों" असें ज्ञान कां असत नाहीं, याचें स्पष्टीकरण मीं दृष्टांत देऊन सांगतों, ऐक. हे सौम्य, व्यवहारांत आपण पाहतों कीं, मधुकर-मक्षिका ( मधमाशा ) अत्यंत श्रम करून मध निष्पन्न करतात. नानाप्रकारच्या व नानादिशांस असणाऱ्या वृक्षांच्या रसांचा समवहार करून ( सर्व रसांस एकेजागीं आणून ) सर्वांस एकरस करितात, सर्वांस रसमधुरत्वानें एकरूप करितात; आणि ज्या-प्रमाणें त्या एकरसापासून मध उत्पन्न होतो—॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**ते यथा तत्र न विवेकं लभन्तेऽमुष्याहं वृक्षस्य रसोऽस्म्यमुष्याहं वृक्षस्य रसोऽस्मीत्येवमेव खलु सोम्येमाः सर्वाः प्रजाः सति संपद्य न विदुः सति संपद्यामह इति ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः—ते यथा तत्र अमुष्य वृक्षस्य रसः अहं अस्मि इति विवेकं न लभन्ते** (आणि ज्याप्रमाणें 'मीं अमूक वृक्षांचा रस आहे, मीं तमुक वृक्षांचा रस, असा विवेक त्या निरनिराळ्या रसांस असत नाहीं) **एवं एव खलु सोम्य, सति संपद्य इमाः सर्वाः प्रजाः "सति संपद्यामहे" इति न विदुः** (त्याच प्रमाणें हे सौम्य, सत्संपन्न होऊन सुद्धां ह्या सर्व जीवजंतूंस कळत नाहीं कीं, आम्ही सत्संपन्न झालों आहोंत ) ॥ २ ॥

ते रसा यथा मधुत्वेनैकतां गतास्तत्र मधुनि विवेकं न लभन्ते। कथम्, अमुष्याहमाम्रस्य पनसस्य वा वृक्षस्य रसोऽस्मीति । यथा हि लोके बहूनां चेतनावतां समेतानां प्राणिनां विवेकलाभो भवत्य-मुष्याहं पुत्रोऽमुष्याहं नप्ताऽस्मीति । ते च लब्धविवेकाः सन्तो न संकीर्यन्ते न तथेहानेकप्रकारवृक्षरसानामपि मधुराम्लतिक्तकटुका-दीनां मधुत्वेनैकतां गतानां मधुरादिभावेन विवेको गृह्यत इत्यभि-प्रायः । यथाऽयं दृष्टान्त इत्येवमेव खलु सोम्येमाः सर्वाः प्रजा अहन्यहनि सति संपद्य सुषुप्तकाले मरणप्रलययोश्च न विदुर्न विजा-नीयुः सति संपद्यामह इति संपन्ना इति वा ॥ २ ॥

सिद्धांती:—मधुरत्वानें एकरस झालेले जे ते सर्व रस मधुस्वरूपांत असतांना त्यांपैकीं कोणासही विवेक करितां येत नाहीं. कीं मी आंब्याच्या अथवा फणसाच्या वृक्षाचा रस आहे. असो. हा विवेक त्यांस असत नाहीं, व्यवहारामध्यें चेतनावंत पुष्कळ लोक किंवा प्राणी एकत्र जमले असतां मीं अमक्याचा पुत्र आहे; अमक्याचों नातु आहें, हा विवेक मनुष्यप्राण्यास करितां येतो, तसा विवेक या मधुकरकृत रसांस करितां येत नाहीं. मनुष्यप्राण्यास विवेक असतो; म्हणून त्यांचा संकर होत नाहीं; पण तसा प्रकार रसांच्या संबधानें नसतो. अनेकप्रकारच्या मधुर आंबट, तिखट, कडु इत्यादि वृक्षरसांस मधुरत्वानें एकच रूप प्राप्त झाल्यानंतर व माधुर्य प्राप्त झाल्यानंतर त्या रसांत विवेक असत नाहीं. आपलें मूळ स्वरूप काय हें सांगतां येत नाहीं. दृष्टांतांतील न्यायानेंच ह्यां सर्व प्रजांसहि विवेक असत नाहीं. रोजच्यारोज गाढनिद्रेमध्यें सतामध्यें संपन्न होणाऱ्या आणि मरणकाळीं व प्रलयकाळीं हीं सत्संपन्न होणाऱ्या जीवांस आपण सत्संपन्न झालों आहोंत, किंवा सत्संपन्न होत आहोंत, हा विवेक मुळींच असत नाहीं ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**त इह व्याघ्रो वा सिꣳहो वा वृको वा वराहो वा कीटो वा पतङ्गो वा दꣳशो वा मशको वा यद्यद्भवन्ति तदाभवन्ति ॥ ३ ॥**

**अन्वय व अर्थः—इह व्याघ्रः वा सिंहः; वा वृकः, वा वराहः, कीटः, वा पतंगः, वा दंशः, वा मशकः, ते यत् भवन्ति तत् आभवन्ति** ( येथें, जें काय वाघ, सिंह, लांडगा, वराह कीटक, पतंग, दंश—डांस,—किंवा मशक असतात, तेच होऊन पुन्हां ते जन्म लोकास येतात ) ॥ ३ ॥

यस्माच्चैवमात्मनः सद्रूपतामज्ञात्वैव सत्संपद्यन्ते । अतस्त इह लोके यत्कर्मनिमित्तां यां यां जातिं प्रतिपन्ना आसुर्व्याघ्रादीनां व्याघ्रोऽहं सिंहोऽहमित्येवं ते तत्कर्मज्ञानवासनाङ्किताः सन्तः सत्प्रविष्टा अपि तद्भावेनैव पुनराभवन्ति पुनः सत आगत्य व्याघ्रो वा सिंहो वा वृको वा वराहो वा कीटो वा पतङ्गो वा दंशो वा मशको वा यद्यत्पूर्वमिह लोके भवन्ति बभूवुरित्यर्थः । तदेव पुनरागत्य

**भवन्ति युगसहस्रकोट्यन्तरिताऽपि संसारिणो जन्तोर्या पुरा भाविता वासना सा न नश्यतीत्यर्थः । " यथाप्रज्ञं हि संभवाः " इतिश्रुत्यन्तरात् ॥ ३ ॥**

**सिद्धांती**:—असें आहे म्हणून म्हणजे आत्म्याची (आपली) सद्रूपता न जाणतांही हे सर्व जीव सतामध्यें लीन होत असतात; म्हणून त्या लोकामध्यें त्यांना विशेष कर्मानुरूप जी विशेष जाति व्याघ्रादि प्राप्त होत असते: आणि मीं व्याघ्र आहें, मी सिंह आहें, अशा प्रकारचें ज्ञान त्यांस असतें, ते हे जीव त्या त्या कर्मांपासून आणि ज्ञानापासून उत्पन्न होणाऱ्या वासनांनीं घेरलेले असल्यामुळें, यद्यपि ते सतामध्यें प्रवेश करितात तथापि, पुन्हां जन्म घेतांना ते जीव आपापल्या वासनानुसार त्या त्या जातींतच प्रवेश करितात; म्हणजे निद्रेमध्यें अथवा मरणानंतर यद्यपि या ज्ञानी जीवांचा सतामध्यें प्रवेश होतो. तथापि मी व्याघ्र आहे, मी सिंह आहे, असें त्यांचे जागृतकाळचें अगर मरणानंतरचें ज्ञान गुप्ततः जिवंत असते: म्हणून सिंहव्याघ्रसंबंधी वासनांनीं त्यांचा जीव व्यापृत झालेला असतो. अर्थात् हे जीव जागे झाल्यानंतर किंवा पुन्हां देह घेतल्यानंतर मीं व्याघ्र आहें, सिंह आहें, वृक आहें, वराह आहें, कीटक आहें, पतंग आहें, दंश आह, मशक आहें, असें स्ववासनाजन्य संस्कारांनीं उत्पन्न झालेलें ज्ञान त्यास असतें. तात्पर्य; सतांत प्रवेश झाला तरी पूर्वकर्म, पूर्वज्ञान आणि पूर्ववासना यांच्या अनुरूप या जीवांचें कर्म, ज्ञान आणि वासना असतात. तात्पर्य जशी वासना तसें फल मिळतें. वासनानुरूप जन्म प्राप्त होणें, हा विश्वन्याय आहे. फार काय सांगावें, संसारी जीवाची पूर्वकाळीं जी वासना असते तीच वासना हजारों कोटींयुगें मध्यंतरी येऊन गेलीं तरी ती वासना–नाहींशी होत नाहीं. " जसें ज्ञान असतें तशी संभूती होते, तसा जन्म प्राप्त होतो, ही श्रुतिहि येथें प्रमाण आहे ॥ ३ ॥

---

## मंत्र ४ अथवा.

**स य एषोऽणिमैतदात्म्यमिदꣳ सर्वं तत्सत्यꣳ स आत्मा तत्त्वमसि श्वेतकेतो इति भूय एव मा भगवान्विज्ञापयत्विति तथा सोम्येति होवाच ॥ ४ ॥**

**इति षष्ठाध्यायस्य नवमः खण्डः ॥ ९ ॥**

**अन्वय व अर्थः**—( या मंत्राचा अर्थ ८ व्या खंडांतील ७ व्या मंत्राप्रमाणेंच आहे. कारण तो आणि हा मंत्र एकच ) ॥ ४ ॥

ताः प्रजा यस्मिन्प्रविश्य पुनराविर्भवन्ति । ये त्वितोऽन्ये सत्स-त्यात्माभिसंधा यमणुभावं सदात्मानं प्रविश्य नाऽऽवर्तन्ते स य एषोऽणिमेत्यादि व्याख्यातम् । यथा लोके स्वकीये गृहे सुप्त उत्थाय ग्रामान्तरं गतो जानाति स्वगृहादागतोऽस्मीत्येवं सत आगतोऽस्मीति च जन्तूनां कस्माद्विज्ञानं न भवतीति भूय एव मा भगवान्विज्ञा-पयत्वित्युक्तस्तथा सोम्येति होवाच पिता ॥ ४ ॥

इति षष्ठाध्यायस्य नवमः खण्डः ॥ ९ ॥

सिद्धांतीः सतामध्यें प्रवेश करून पुन्हा आपल्या अज्ञानामुळें जन्म घेणाऱ्या ह्या सर्व प्रजा आहेत; परंतु यांच्यापेक्षां निराळे असणारे अनेक सत्पुरुष असतात. त्यांचें ध्यान सत्स्वरूपाचें, सत्य वस्तूचें, अथवा आत्म्याचे ठायीं सप्रमाण झालेलें असतें. अर्थात् ते जेव्हां ह्या सत् नामक कारणामध्यें प्रवेश करितात, तेव्हां सताचें ज्ञान असणाऱ्या त्यांस पुन्हां जन्म घ्यावा लागत नाहीं; ते मुक्तच होतात. ज्या सत् स्वरूपा-मध्यें प्रवेश करून ते मुक्त होतात त्याचें स्वरूप ८ व्या खंडाच्या ७ मंत्रात सांगितलें आहे. इतकें प्रवचन झाले तरी श्वेतकेतूचें समाधान झालें नाहीं. तो ह्मणाला; आपण आपल्या घरांत निद्रा घेऊन जागृत झालों, आणि दुसऱ्या गांवास गेलों, तर मीं आपल्या घराहून येथें आलों, असें जसें आपल्यास ज्ञान असतें, तसें सतापासून मीं आलों आहे, हें ज्ञान जीवांस असत नाहीं, याचें कारण मला समजत नाहीं; म्हणून पुन्हा दृष्टांत सांगून मला या सिद्धांताची समजूत करून द्यावी, अशी श्वेतकेतूनें प्रार्थना केली; आणि उद्दालक म्हणाला; आणखी कांहीं दृष्टांत सांगतों, ऐक; आणि हा सिद्धांत समजून घे ॥ ४ ॥

सहाव्या अध्यायाचा नववा खंड समाप्त.

---

## अध्याय सहावा खण्ड १० वा

### मंत्र पहिला.

**इमाः सोम्य नद्यः पुरस्तात्प्राच्यः स्यन्दन्ते पश्चात्प्रतीच्यस्ताः समुद्रात्समुद्रमेवापियन्ति स समुद्र एव भवति ता यथा तत्र न विदुरियमहम-स्मीयमहमस्मीति ॥ १ ॥**

अन्वय व अर्थ —सोम्य, इमाः प्राच्यः पुरस्तात् स्यन्दन्ते पश्चात् प्रतीच्यः; ताः समुद्रात् समुद्रं एव अपियन्ति; सः समुद्रः एव भवति यथा तत्र ताः 'इयं अहं अस्मि, इयं अहं अस्मि' इति न विदुः (हे सौम्य, ज्या ह्या नद्या पूर्वेकडे वाहतात आणि कांहीं नद्या पश्चिमेकडे जाऊन पश्चिमदिशेनें वाहतात, त्या नद्या समुद्रांतून उत्पन्न होऊन समुद्रालाच जाऊन मिळतात; पुढें ह्या सर्व नद्या समुद्ररूपच होतात; पण ही नदी मीं आहे, ही नदी मीं आहे. असें जसें ज्ञान त्यांस नसतें) ॥१॥

शृणु तत्र दृष्टान्तं, यथा सोम्येमा नद्यो गङ्गाद्याः पुरस्तात्पूर्वां दिशं प्रति प्राच्यः प्रागञ्चनाः स्यन्दन्ते स्रवन्ति । पश्चात्प्रतीच्यः दिशं प्रति सिन्ध्वाद्याः प्रतीचीमञ्चन्ति गच्छन्तीति प्रतीच्यस्ताः समुद्रादम्भोनिधेर्जलधरैराक्षिप्ताः पुनर्वृष्टिरूपेण पतिता गङ्गादिनदीरूपिण्यः पुनः समुद्रमम्भोनिधिमेवापियन्ति स समुद्र एव भवति ता नद्यो यथा तत्र समुद्रे समुद्रात्मनैकतां गता न विदुर्न जानन्तीयं गङ्गाऽहमस्मीयं यमुनाऽहस्मीतीयं मह्यहमस्मीति च ॥ १ ॥

सिद्धांतीः—आणखी दृष्टांत सांगतों ऐक, असें म्हणून उद्दालक ऋषीनें बोलण्यास आरंभ केला. तो म्हणाला हे सौम्य, ज्या ह्या गंगाप्रभृति पूर्वगामी नद्या पूर्वेकडे वाहत जातात; आणि सिंधु—आदि, पश्चिमगामी नद्या पाठीमागें म्हणजे पश्चिमेकडे जातात, या सर्व नद्या म्हणजे काय पहा! मेघांनीं आकर्षित केलेलें समुद्राचें जें जळ तेंच जल पर्जन्यरूपानें खाली येऊन गंगा, सिंधु आदि स्वरूपें धारण करितें; आणि तेंच जल अंभोनिधि जो महासागर त्यास जाऊन मिळतें; आणि सर्वांस समुद्ररूप प्राप्त होतें, याप्रमाणें समुद्रांशीं तादात्म्य पावलेल्या त्या नद्यास ज्याप्रमाणें मीं गंगानदी आहें, मीं यमुना नदी आहें; मीं सिंधु नदी आहें, मी मही नदी आहें, असें कळत नाहीं ॥१॥

---

## मंत्र दुसरा.

**एवमेव खलु सोम्येमाः सर्वाः प्रजाः सत आगम्य न विदुः सत आगच्छामह इति त इह व्याघ्रो वा सिंहो वा वृको वा वराहो वा कीटो वा पतङ्गो वा दंशो वा मशको वा यद्यद्भवन्ति तदाभवन्ति ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः**—सोम्य, एवं, एव खलु इमाः सर्वाः प्रजाः सतः आगम्य " सतः आगच्छामहे " इति न विदुः; तेभ्यः इ. इ. ( हा मंत्र व नवव्या खंडांतील दुसरा व तिसरा मंत्र हे तात्पर्यतः एकच आहेत. विशेष फरक एवढाच कीं, सतापासून उत्पन्न झालेल्या सर्व अज्ञानी जीवांस आम्ही सतापासून उत्पन्न झालों आहों, असें ज्ञान नसतें. बाकीचा अर्थ तोंच आहे ) ॥२॥

---

## मंत्र तिसरा.

**स य एषोऽणिमैतदात्म्यमिदꣳ सर्वꣳ तत्सत्यꣳ स आत्मा तत्त्वमसि श्वेतकेतो इति भूय एव मा भगवान्विज्ञापयत्विति तथा सोम्येति होवाच ॥३॥**

**इति षष्ठाध्यायस्य दशमः खण्डः ॥ १० ॥**

**अन्वय व अर्थः**—( हा मंत्र व ९ व्या खंडातील ४ मंत्र म्हणजे ८ व्या खंडातील ७ वा मंत्र एकरूपच आहेत ) ॥ ३ ॥

एवमेव खलु सोम्येमाः सर्वाः प्रजा यस्मात्सति संपद्य न विदुस्तस्मात्सत आगम्य न विदुः सत आगच्छामह आगता इति वा त इह व्याघ्र इत्यादि समानमन्यत् । दृष्टं लोके जले वीचीतरङ्गफेनबुद्बुदादय उत्थिताः पुनस्तद्भावं गता विनष्टा इति । जीवास्तु तत्कारणभावं प्रत्यहं गच्छन्तोऽपि सुषुप्ते मरणप्रलययोश्च न विनश्यन्तीत्येतत् । भूय एव मा भगवान्विज्ञापयतु दृष्टान्तेन । तथा सोम्येति होवाच पिता ॥ २ ॥ ३ ॥

**इति षष्ठाध्यायस्य दशमः खण्डः ॥ १० ॥**

**सिद्धांतीः**—हे सौम्य, याचप्रमाणें सतामध्यें जाऊन लीन होणाऱ्या या अज्ञानी प्रजांस आपण सत्संपन्न झालों असें ज्यापक्षीं कळत नाहीं, त्यापक्षीं आपण सतापासून येत आहों, अथवा आलों आहोंत, हें सतापासून येऊनहि त्यास कळत नाहीं, व्याघ्रादिकांचीं उदाहरणें मागें स्पष्ट झालींच आहेत. व्यवहारांतही आपण पाहतों कीं,

नदीच्या अथवा समुद्राच्या जलांत लाटा, तरंग, फेस, बुडबुडे इत्यादि जळापासून उत्पन्न होऊन जलामध्येंच पुन्हा प्रवेश करितात; आणि नष्ट होतात; परंतु जीव हे प्रतिदिवशीं स्वकारणरूप जो आत्मा त्यामध्यें निद्राकाळीं लीन होतात, व मरणकाळानंतर व प्रळयकाळानंतर सद्रूप होतात, तथापि त्यांचा नाश होत नाहीं, हा लहरीआदिमध्यें व जीवामध्यें विशेष आहे. असो श्वेतकेतु पुन्हां म्हणाला; मला अद्यापि सिद्धांताचें स्वरूप निश्चितरीतीनें समजलें नाहीं; म्हणून पुन्हा एकदा समजून द्यावें. ऋषी म्हणाले; ठीक आहे ॥ २ ॥ ३ ॥

साहाव्या अध्यायाचा १० वा खंड समाप्त.

---

## अध्याय साहावा खण्ड अकरावा.

### मंत्र पहिला.

**अस्य सोम्य महतो वृक्षस्य यो मूलेऽभ्याहन्याज्जीवन्स्रवेद्यो मध्येऽभ्याहन्याज्जीवन्स्रवेद्योऽग्रेऽभ्याहन्याज्जीवन्स्रवेत्स एषजीवेनाऽऽत्मनाऽनुप्रभूतः पेपीयमानो मोदमानस्तिष्ठति ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः—सोम्य, अस्य महतः वृक्षस्य मूले यः अभ्याहन्यात्** ( हे सौम्य, ह्या आपल्यापुढें असणाऱ्या वृक्षाच्या मूळाशीं कोणी धाव घातला ) **जीवन् स्रवेत्** ( तरी तो वृक्ष जीवंत राहून त्याच्यापासून रसस्राव होत राहील ) **यः मध्ये अभ्याहन्यात्, जीवन् स्रवेत्; यः अग्रे अभ्याहन्यात जीवन् स्रवेत्** ( मध्ये घाव घातला तरी तो वृक्ष जीवंत राहून रसस्राव करील; आणि शेंड्याशीं घाव घातला तरी वृक्षाचें जीवित कायम राहून रसस्राव होईल. ) **सः एषः जीवेन आत्मना अनुप्रभूतः, पेपीयमानः मोदमानः तिष्ठति** ( तो हा वृक्ष जीवरूपी आत्म्यानें अनुव्याप्त झाला असल्यामुळें विविध रस पीत होत्साता आनंदामध्यें राहतो; तात्पर्य जिवंत राहतो ) ॥१॥

शृणु दृष्टान्तमस्य हे सोम्य, महतोऽनेकशाखादियुक्तस्य वृक्षस्याऽस्यत्यग्रतः स्थितं वृक्षं दर्शयन्नाह । यदि यः कश्चिदस्य मूलेऽभ्याह-

न्यात्परश्वादिना सकृद्धातमात्रेण न शुष्यतीति जीवन्नेव भवति तदा तस्य रसः स्रवेत् । तथा यो मध्येऽभ्याहन्याज्जीवन्स्रवेत्तथा योऽग्रेऽभ्याहन्याज्जीवन्स्रवेत्स एष वृक्ष इदानीं जीवेनाऽऽत्मनाऽनुप्रभूतोऽनुव्याप्तः पेपीयमानोऽत्यर्थं पिबन्नुदकं भौमांश्च रसान्मूलैर्गृह्णन्मोदमानो हर्षं प्राप्नुवंस्तिष्ठति ॥ १ ॥

सिद्धांतीः—उद्दालक म्हणतो; तुला दृष्टांत हवा आहे, तो हा ऐक. हे वत्स, ह्या आपल्यासमोर असणाऱ्या अनेकशाखासंपन्न वृक्षाचें स्वरूप पहा! आतां कोणी परशु-आदि ( कुऱ्हाड वगैरे ) शस्त्रानें ह्या वृक्षाच्या मुळाशीं एखादा मात्र घाव घातला, तरी तो वृक्ष शुष्क होणार नाहीं ( सुकणार नाहीं ); इतकेंच नव्हें तर तो जिवंत राहून त्याच्यापासून रसस्राव मात्र होईल. तसेंच मध्यें घाव घातला अथवा शेंड्याशीं घाव घातला तरी हा वृक्ष जिवंत राहून त्याच्या मध्यस्थानांतून व अग्रस्थानांतून कांहीं वेळ रसाचा स्राव होईल, तात्पर्य तो वृक्ष मरणार नाहीं. कारण ह्या वृक्षामध्यें जीवरूपी आत्म्याची सध्यां सर्वत्र अनुव्याप्ति आहे ह्मणून हा वृक्ष आपल्या मुळांच्या साह्यानें पुष्कळ उदक पिऊन व भूमिगत रसांचें ग्रहण करून अति आनंदाच्या स्थितीचा लाभ घेऊन राहत आहे. ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**अस्य यदेकाꣳ शाखां जीवो जहात्यथ सा शुष्यति द्वितीयां जहात्यथ सा शुष्यति तृतीयां जहात्यथ सा शुष्यति सर्वं जहाति सर्वः शुष्यति॥२॥**

**अन्वय व अर्थः—अस्य, यत् एकां शाखां जीवः जहाति** ( पण ह्या वृक्षाची एखादि शाखा जीवानें सोडिली ) **अथ सा शुष्यति** ( तर ती शुष्क होते ) **द्वितीयां जहाति अथ सा शुष्यति; तृतीयां जहाति, अथ सा शुष्यति; सर्वं जहाति सर्वं शुष्यति** ( दुसऱ्या शाखेचा जीव गेला, तर ती सुकते, तिसरीचा जीव गेला तर ती सुकते सर्व वृक्षाचा जीव गेला तर तोहि सुकतो )॥ २ ॥

तस्यास्य यदेकां शाखां रोगग्रस्तामाहतां वा जीवो जहात्युपसंहरति शाखायां विप्रसृतमात्मांशम् । अथ सा शुष्यति । वाङ्म-

नःप्राणकरणग्रामानुप्रविष्टो हि जीव इति तदुपसंहार उपसंह्रियते । जीवेन च प्राणयुक्तेनाशितं पीतं च रसतां गतं जीवच्छरीरं वृक्षं वर्धयद्रसरूपेण जीवस्य सद्भावे लिङ्गं भवति । अशितपीताभ्यां हि देहे जीवस्तिष्ठति ते चाशितपीते जीवकर्मानुसारिणी इति । तस्यैकाङ्गवैकल्यनिमित्तं कर्म यदोपस्थितं भवति तदा जीव एकां शाखां जहाति शाखाया आत्मानमुपसंहरति। अथ तदा सा शाखा शुष्यति । जीवस्थितिनिमित्तो रसो जीवकर्माक्षिप्तो जीवोपसंहारे न तिष्ठति । रसापगमे च शाखा शोषमुपैति । तथा सर्ववृक्षमेव यदाऽयं जहाति तदा सर्वोऽपि वृक्षः शुष्यति । वृक्षस्य रसस्रवण-शोषणादिलिङ्गाज्जीववत्त्वं दृष्टान्तश्रुतेश्च चेतनावन्तः स्थावरा इति बौद्धकाणादमतमचेतनाः स्थावरा इत्येतदसारमिति दर्शितं भवति ॥ २ ॥

**सिद्धांती:**—पिता ह्मणतो, पण जर एखादी शाखा रोगग्रस्त झाली किंवा झाडा-पासून तोडून निराळी काढली, तर त्या शाखेचा जीव मरतो. त्या शाखेमध्यें जो आत्म-रूपी अंश प्रसृत झालेला असतो तो नाहींसा होतो; व ह्मणून ती शाखा सुकते. याच-प्रमाणें वाणी मन व प्राण हा करणग्राम ( इंद्रियें ) यांमध्यें प्रविष्ट झालेला जीव उपसंहृत झाला; ह्मणजे इंद्रियग्राम जीवशून्य होतो. तेथून नाहींसा होतो. कारण उघड आहे कीं, प्राणयुक्त असणाऱ्या जीवानें जें भक्षिलें, जें पान केलें त्याचाच रस होऊन तो रस जिवंत असणाऱ्या वृक्षशरीराची रसरूपानें वृद्धि करितो; आणि हा रस, जीव विद्यमान आहे ( वृक्ष जिवंत आहे ), ह्याचें चिन्ह होतो. देहामध्यें जीव राहतो तो अशनपानांच्या योगानें मात्र राहतो; आणि अन्नपान हें तर जीवाच्या कर्मानुसार चाललेलें असतें; पण जेव्हां वृक्षाच्या एका अंगाला विकलता आणणारें कर्म उपस्थित होतें, ( एक शाखेला जेव्हां अन्नरस मिळत नाहीं, अथवा तिचा छेद होतो ) तेव्हां वृक्षांत असणारा जीव त्या छिन्नभिन्न झालेल्या शाखेचा त्याग करितो. अथवा त्या शाखेपासून आपला उपसंहार करून घेतो. नंतर ती शाखा सुकते. सारांश रस हा जीवाची विद्यमानता हें कारण आहे. जीवाची विद्यमानता कायम ठेवणारा जो रस तो रस जीवकर्मापासून आक्षिप्त झाल्यामुळें,ह्मणजे जीवानें आपला उपसंहार केल्या-मुळें त्या शाखेंत राहत नाहीं. रसाचा अपगम झाला, रस नाहींसा झाला; ह्मणजे शाखा शुष्क होते. याच न्यायानें जेव्हां जीव सर्व वृक्षाचा त्याग करतो तेव्हां सर्व वृक्ष सुकून जातो. मुला, ध्यानांत ठेव कीं, ह्या दृष्टांत-श्रुतींत ( दृष्टांत देण्यासाठीं अव-

तीर्ण झालेल्या श्रुतींत ) वृक्षाला रसस्रवण, शोषण, इत्यादि जीवचिन्हें आहेत, ह्मणून तेथें जीवत्व असतें, असें सांगितलें आहे. ह्मणजे स्थावरवस्तूही ( जडवस्तूहि ) चेतनायुक्त आहेत, त्यांना जीव असतो, असा ह्या दृष्टांतावरून श्रुतीचा अभिप्राय दिसतो. अर्थात् बौद्ध व काणाद ' स्थावर वस्तू अचेतन आहेत ' असें ह्मणतात, तें मत असार आहे, पोकळ आहे, असें ह्मटल्यासारखें होतें. जीवाची व्याप्ति वृक्षामध्येंही आहे, हें श्रुतीनें येथें सहज सांगून दिलें आहे ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**एवमेव खलु सोम्य विद्धीति होवाच जीवापेतं वाव किलेदं म्रियते न जीवो म्रियत इति स य एषोऽणिमैतदात्म्यमिदꣳ सर्वं तत्सत्यꣳ स आत्मा तत्त्वमसि श्वेतकेतो इति भूय एव मा भगवान्विज्ञापयत्विति तथा सोम्येति होवाच ॥ ३ ॥**

**इति षष्ठाध्यायस्यैकादशः खण्डः ॥ ११ ॥**

अन्वय व अर्थः—**सोम्य एवं एव खलु विद्धि इति ह उवाच** ( हे सौम्य, याप्रमाणें हें सत्य जाणून घे, असें त्यानें पुत्रास सांगितलें ) **इदं किल जीवापेतं वाव म्रियते जीवः न म्रियते इति** ( खरोखर पाहिलें असतां निर्जीव वस्तु मरते, जीव मरत नाहीं हें सत्य समजून घे ), **यः एषः सः अणिमा** ( इत्यादि मंत्राचा अन्वय व अर्थ मागें झाला आहे ) ॥ ३ ॥

यथाऽस्मिन्वृक्षदृष्टान्ते दर्शितं जीवेन युक्तो वृक्षोऽशुष्को रसपानादियुक्तो जीवतीत्युच्यते तदपेतश्च म्रियत इत्युच्यते । एवमेव खलु सोम्य विद्धीति होवाच—जीवापेतं जीववियुक्तं वाव किलेदं शरीरं म्रियते न जीवो म्रियत इति । कार्यशेषे च सुप्तोत्थितस्य ममेदं कार्यशेषमपरिसमाप्तमिति स्मृत्वा समापनदर्शनात् । जातमात्राणां च जन्तूनां स्तन्याभिलाषभयादिदर्शनाच्चातीतजन्मा-

न्तरानुभूतस्तन ( न्य ) पानदुःखानुभवस्मृतिर्गम्यते । अग्निहोत्रादीनां च वैदिकानां कर्मणामर्थवत्त्वाच्च जीवो म्रियत इति । स य एषोऽणिमेत्यादि समानम् । कथं पुनरिदमत्यन्तस्थूलं पृथिव्यादिनामरूपवज्जगदत्यन्तसूक्ष्मात्सद्रूपान्नामरूपरहितात्सतो जायत इत्येतद्दृष्टान्तेन भूय एव मा भगवान्विज्ञापयत्विति । तथा सोम्येति होवाच पिता ॥ ३ ॥

इति षष्ठाध्यायस्यैकादशः खण्डः ॥ ११ ॥

**सिद्धांतीः**—पिता पुत्रास ह्मणतो; ह्या वृक्षाच्या दृष्टांतामध्यें जीवानें युक्त असलेला वृक्ष अशुष्क असतो, ह्मणजे रसस्राव व रसपानाचें सामर्थ्य त्यास असतें; ह्मणून तो वृक्ष जिवंत आहे, असें आपण ह्मणतों; व हें सामर्थ्य नसेल तर जीव गेला; आणि ह्मणून हा वृक्ष मेला, असें जसें आपण ह्मणतों, त्याप्रमाणेंच मनुष्यदेहाची स्थिति आहे, असें जाण. ह्मणजे जीवानें टाकून दिलेलें, जीववियुक्त झालेलें हें शरीर मरतें, जीव कधींहि मरत नाहीं, हें सत्य जाणून घे. आणखी पहा कीं, निद्रेंतून जागृत झालेल्या मनुष्याचें कांहीं कार्य करणें शिल्लक राहिलें असेल तर " हें माझें काम संपलें नाहीं, अजून कांहीं करण्याचें शेष राहिलें आहे " असें स्मरण होऊन तो जागा झालेला मनुष्य आपलें काम शेवटास नेतों. आतां ज्या जीवांचा जन्म होऊन एक क्षणहि लोटला नाहीं ते जीव आईच्या दुधाची इच्छा करितात, विलक्षण गोष्ट दिसली असतां भितात,इत्यादि चिन्हांवरून त्या लहान बालकांस जन्मजन्मांतरीं अनुभविलेल्या स्तनपानाचें व दुःखांचे स्मरण होतें,असेंच अनुमानशः समजलें पाहिजे.झोंपेंतून उठलेला मनुष्य अवशिष्ट राहिलेलें काम करितो, त्याप्रमाणें नुकताच जन्मलेला प्राणी पूर्वजन्मांतील अवशिष्ट कर्मांचे अनुष्ठानाला आरंभ करितो. ह्यावरून युक्तीनें पूर्वजन्मसिद्धि होतें. शिवाय अग्निहोत्रादि जीं वैदिक कर्में आहेत, त्यांचें फल कोठें तरी उपभोगिलें पाहिजे आणि या जन्मांत उपभोग मिळाला नाहीं, तर तो दुसऱ्या जन्मांत मिळाला पाहिजे, यावरूनही जीव मरत नाहीं असें सिद्ध होतें.

( जन्मावरोबरच जीवाला प्रिय वस्तूचा अभिलाष आणि अप्रिय वस्तूचा द्वेष आहे, असें दिसून येतें, आणि या जन्मीचा अनुभव तर त्यास नसतो, यावरून आणि सर्व वैदिक कर्मांच्या फलांचा उपभोग एकाच जन्मीं घेतां येणें शक्य नाहीं यावरून जीव नित्य आहे असें सिद्ध होतें. भूतकाळाचें स्मरण, पूर्वजन्मस्थ अनुभवांतील स्मरण आणि भावी जन्माचें अनुमान जीवनित्यत्वाची सिद्धि करितात )

मंत्राच्या पुढील भागाचें विवेचन पूर्वीं आपण केलेंच आहे. शेवटीं मुलगा ह्मणाला ' पिताजी हें पृथ्वीआदि स्थूल जगत् व नामरूप असणारें जगत् अत्यंत सूक्ष्म जें सत् त्यापासून व तसेंच नामरूपरहित जें सत् त्यापासून कसें निष्पन्न होतें हें दृष्टांत घेऊन मला समजावून द्या. ही प्रार्थना ऐकून पित्यानें होय ह्मटलें. या प्रश्नाचें उत्तर पुढील खंडांत आहे ॥ ३ ॥

साहाव्या अध्यायाचा ११ वा खंड समाप्त.

---

## अध्याय सहावा खण्ड १२ वा.

---

### मंत्र पहिला.

**न्यग्रोधफलमत आहरेतीदं भगव इति भिन्द्धीति भिन्नं भगव इति किमत्र पश्यसीत्यण्व्य इवेमा धाना भगव इत्यासामङ्गैकां भिन्द्धीति भिन्ना भगव इति किमत्र पश्यसीति न किंचन भगव इति ॥१॥**

**अन्वय व अर्थः**—**अतः न्यग्रोधफलं आहर इति** (पिता ह्मणाला; त्या ह्या न्यग्रोधाचें एक फळ घेऊन ये ) **भगवः इदं इति** ( भगवन् हें फळ आणलें ) **भिन्द्धि इति** ( तें फोड असें बाप ह्मणाला ) **भगवः भिन्नं इति** ( भगवन् हें फळ फोडिलें, असें पुत्र ह्मणाला ) **किं अत्र पश्यसि इति** ( पित्यानें विचारिलें येथें तुला काय दिसतें आहे ) **भगवः अण्व्यः इमाः धानाः** ( जणुं कांहीं अति सूक्ष्म अशीं धान्यासारखीं हीं बीजें आहेत, असें मुलानें उत्तर दिलें ) **अंग आसाम् एकां भिन्द्धि** ( मुला, यापैकीं एक बीं फोड असें उद्दालक ह्मणाला ) **भगवः भिन्ना इति** ( भगवन् ही बीं मीं फोडली, असें मुलानें उत्तर दिलें ) **अत्र किं पश्यसि इति** ( येथें तुला काय दिसतें आहे, असें उद्दालकानें श्वेतकेतूला विचारिलें ) **भगवः न किंचन** ( भगवन् मला येथें कांहीं दिसत नाहीं ) ॥ १ ॥

यद्येतत्प्रत्यक्षीकर्तुमिच्छस्यतोऽस्मान्महतो न्यग्रोधात्फलमेकमाहरेत्युक्तस्तथा चकार स इदं भगव उपहृतं फलमिति दर्शितवन्तं प्रत्याह फलं भिन्द्धीति । भिन्नमित्याहेतरः । तमाह पिता किमत्र पश्यसीत्युक्त आहाण्व्योऽणुतरा इवेमा धाना बीजानि पश्यामि भगव इति । आसां धानानामेकां धानामङ्ग हे वत्स भिन्द्धीत्युक्त आह भिन्ना भगव इति । यदि भिन्ना धाना तस्यां भिन्नायां किं पश्यसीत्युक्त आह न किंचन पश्यामि भगव इति ॥ १ ॥

सिद्धांतीः – उद्दालक ह्मणाला, हे श्वेतकेतो जर तुला ह्या प्रश्नाचें उत्तर प्रत्यक्ष प्रमाणानें समजून घ्यावें अशी इच्छा असेल तर हा जो मोठा न्यग्रोधाचा ह्मणजे वडाचा वृक्ष दिसतो आहे, त्याचें एक फळ घेऊन ये. पित्याची ही आज्ञा ऐकून मुलानें एक फळ आणिलें. आणि ह्मणाला भगवन् ! हें मी फळ आणिलें आहे. प्रत्यक्ष फल दाखविणाऱ्या मुलाला उद्दालक ह्मणाला; हें फळ फोड. ‘ फोडिलें ’ असें मुलानें उत्तर दिलें. तेव्हां बापानें विचारलें; तुला या फळांत काय दिसतें आहें ? त्यावर मुलगा ह्मणाला; जणूं कांहीं अति सूक्ष्म असणाऱ्या धान्याप्रमाणें बिया येथें दिसत आहेत. उद्दालक ह्मणाला, मुला ह्या बियांतील एक बी घे, आणि ती फोड. मुलगा ह्मणाला ‘ फोडली ’ मीं एक बी. शेवटीं बाप ह्मणाला; जर तूं बी फोडली आहेस तर तिच्या आंत तुला काय दिसत आहे तें सांग. तेव्हां मुलानें उत्तर दिलें; भगवन् ! येथें मला कांहीं दिसत नाहीं ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**तꣳ होवाच यं वै सोम्यैतमणिमानं न निभालयस एतस्य वै सोम्यैषोऽणिम्न एवं महान्यग्रोधस्तिष्ठति श्रद्धत्स्व सोम्येति ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः—** **तं उवाच ह** ( पिता पुत्रास ह्मणाला ) **सोम्य, यं एतं अणिमानं न निभालयसे वै** ( हे सौम्य, ज्या ह्या अति सूक्ष्म वस्तूला पाहण्याचें सामर्थ्य तुला नाहीं ) **सोम्य एतस्य अणिम्नः एष एवं महान्यग्रोधः तिष्ठति** ( हे सौम्य त्या ह्या अति सूक्ष्म वस्तूपासून हा उभा असलेला मोठा स्थूल न्यग्रोध वृक्ष उत्पन्न झाला आहे ) **सौम्य श्रद्धत्स्व** ( ह्या प्रयोगावर विश्वास ठेव ) ॥ २ ॥

तं पुत्रं होवाच वटधानायां भिन्नायां यं वटबीजाणिमानं हे सोम्यैतं न निभालयसे न पश्यसि। तथाऽप्येतस्य वै किल सोम्यैष महान्यग्रोधो बीजस्याणिम्नः सूक्ष्मस्यादृश्यमानस्य कार्यभूतः स्थूलशाखास्कन्धफलपलाशवांस्तिष्ठत्युत्पन्नः सन्नुत्तिष्ठतीति वोच्छब्दोऽध्याहार्योऽतः श्रद्धत्स्व सोम्य सत एवाणिम्नः स्थूलं नामरूपादिमत्कार्यं जगदुत्पन्नमिति । यद्यपि न्यायागमाभ्यां निर्धारितोऽर्थस्तथैवेत्यवगम्यते तथाऽप्यत्यन्तसूक्ष्मेष्वर्थेषु बाह्यविषयासक्तमनसः स्वभावप्रवृत्तस्यासत्यां गुरुतरायां श्रद्धायां दुरवगमत्वं स्यादित्याह श्रद्धत्स्वेति । श्रद्धायां तु सत्यां मनसः समाधानं बुभुत्सितेऽर्थे भवेत्ततश्च तदर्थावगतिः । "अन्यत्रमना अभूवम्" इत्यादिश्रुतेः ॥ २ ॥

**सिद्धांतीः**—उद्दालक ह्मणाला; ह्या फोडलेल्या वट-बीजामध्यें ( वडाच्या बीमध्यें ) जें अत्यंत सूक्ष्म वट-बीजाचें बीज आहे, तें हे पुत्र, तुला दिसत नाहीं. तथापि ह्या अत्यंत सूक्ष्म, अणुतम आणि अदृश्यमान बीजापासून हा महा न्यग्रोध वृक्ष उत्पन्न झाला आहे. ह्या अतिसूक्ष्म कारणाचें हा वटवृक्ष कार्य आहे. पहा कीं, हा वृक्ष अत्यंत स्थूल असून त्याला अनेक शाखा, उपशाखा, फळें व पानें पुष्कळ आहेत. हा वृक्ष उत्पन्न झाला आहे इतकेंच नव्हे तर मोठ्या समारंभानें विद्यमान आहे. येथें 'तिष्ठति' या क्रियापदाच्या पाठीमागें 'उत्' हा उपसर्ग लावून अर्थ करावा. असो, या उदाहरणावरून हे श्वेतकेतो, सत् ही जी अति सूक्ष्म वस्तू आहे तिच्यापासून हें नामरूप असणारें स्थूल जगत् कार्यरूपानें उत्पन्न झालें आहे, असें समज. उद्दालकानें श्वेतकेतूला श्रद्धा ठेवण्यास सांगितलें, त्याचें कारण उघड आहे. यद्यपि अनेक श्रुति आणि अनेक युक्ती यांच्या साह्यानें कोणत्याही वस्तूचा निश्चय होऊन श्रुति युक्ती ह्मणतात तशीच ती वस्तू असली पाहिजे असें अनुमान निघतें; तथापि जे अत्यंत सूक्ष्म अर्थ ह्मणजे सिद्धांत आहेत त्यांच्या निश्चयासाठीं मायेच्या योगानें बाह्य विषयांशीं स्वभावतांच आसक्त झालेल्या मनाला श्रेष्ठ आणि अधिकारी श्रद्धेची जोड दिली नाहीं, तर श्रुतियुक्तीनें सिद्ध झालेले सिद्धांतहि समजून घेणें दुःशक्य आहे; ह्मणून पित्यानें सांगितलें कीं मुला, श्रद्धा ठेव. श्रद्धा असली ह्मणजे मनाचें समाधान राहून ( मन निःसंशय होऊन ) कळून घेण्याच्या अर्थाकडे मनाची प्रवृत्ति होते. आणि नंतर तो अर्थ किंवा ती वस्तु समजते. "माझें मन दुसरीकडे होतें" इत्यादि श्रुति येथें प्रमाण आहे ॥ २ ॥

---

### मंत्र तिसरा.

स य एषोऽणिमैतदात्म्यमिदꣳ सर्वं तत्सत्यꣳ स आत्मा तत्त्वमसि श्वेतकेतो इति भूय एव मा भगवान्विज्ञापयत्विति तथा सोम्येति होवाच ॥ ३ ॥

इति षष्ठाध्यायस्य द्वादशः खण्डः ॥ १२ ॥

**अन्वय व अर्थः**—( याचा अर्थ मागें झाला आहे ) ॥ ३ ॥

स य इत्याद्युक्तार्थम् । यदि तत्सज्जगतो मूलं कस्मान्नोपलभ्यत इत्येतद्दृष्टान्तेन मा भगवान्भूय एव विज्ञापयत्विति । तथा सोम्येति होवाच पिता ॥ ३ ॥

इति षष्ठाध्यायस्य द्वादशः खण्डः ॥ १२ ॥

**सिद्धांतीः**—मंत्राचा अर्थ तर मागें सांगितलाच आहे. श्वेतकेतूची पुनः शंका आहे. जगताचें सत् हेंच मूळ कारण असेल, तर तें दिसत कां नाहीं? एखादा दृष्टांत घेऊन या शंकेचें निवारण करावें, अशी श्वेतकेतूची प्रार्थना आहे. उद्दालकानें ही प्रार्थना मान्य करून पुत्राचें समाधान केलें. समाधान पुढील खंडांत आहे.

साहाव्या अध्यायाचा १२ खंड समाप्त.

---

## अध्याय सहावा खण्ड १३ वा.

---

### मंत्र पहिला.

लवणमेतदुदकेऽवधायाथ मा प्रातरुपसीदथा इति स ह तथा चकार तꣳ होवाच यद्दोषा लवणमुदकेऽवाधा अङ्ग तदाहरेति तद्धावमृश्य न विवेद ॥ १ ॥

**अन्वय व अर्थः—एतद् लवणं उदके अवधाय अथ मा प्रातः उपसीदथाः इति** ( उदकामध्यें हें मीठ टाकून दे; आणि मला उद्यां प्रातःकाळीं येऊन भेट, असें उद्दालकानें श्वेतकेतूस सांगितलें ) **स तथा चकार ह** ( मुलानें त्याप्रमाणें केलें ) **तं उवाच ह** ( उद्दालक पुत्राला ह्मणाला ) **अंग, दोषा यत् लवणं उदके अवाधाः तत् आहर** ( हे पुत्रा, रात्रीं जें लवण उदकांत घातलेंस, तें आतां बाहेर काढ ) **अवमृश्य तत् न विवेद वाव** ( तें लवण काढण्याची इच्छा करणाऱ्या पुत्राला विचार करूनही लवण सांपडलें नाहीं ) ॥ १ ॥

विद्यमानमपि वस्तु नोपलभ्यते प्रकारान्तरेण तूपलभ्यत इति शृण्वत्र दृष्टान्तम्। यदि चेममर्थं प्रत्यक्षीकर्तुमिच्छसि पिण्डरूपं लवणमेतद्घटादावुदकेऽवधाय प्रक्षिप्याथ मा मां श्वः प्रातरुपसीदथा उपगच्छेथा इति। स ह पित्रोक्तमर्थं प्रत्यक्षीकर्तुमिच्छंस्तथा चकार। तं होवाच परेद्युः प्रातर्यल्लवणं दोषा रात्रावुदकेऽवाधा निक्षिप्तवानस्यङ्ग हे वत्स तदाहरेत्युक्तस्तल्लवणमाजिहीर्षुर्ह किलावमृश्योदके न विवेद न विज्ञातवान्यथा तल्लवणं विद्यमानमेव सदप्सु लीनं संश्लिष्टमभूत् ॥ १ ॥

सिद्धांतीः—श्वेतकेतु आपल्या पुत्रास ह्मणाला; विद्यमान असलेली वस्तु सुद्धां प्राप्त होत नाहीं. दुसऱ्या कांहीं प्रकारानें तिचें अस्तित्व मात्र प्रत्यक्ष करून घेतां येतें, हें तुला समजून देण्यासाठीं एक प्रत्यक्ष उदाहरण दाखवितों. तुला विद्यमान वस्तु दिसत कशी नाहीं ? हें प्रत्यक्ष जर पहावयाचें असेल, तर एक मिठाचा खडा या घटांतील उदकामध्यें टाकून ठेव व उद्यां सकाळच्या प्रहरीं नित्य क्रमाप्रमाणें माझ्याकडे ये. पित्याचें हें बोलणें ऐकून आपल्यास आतां प्रत्यक्ष प्रयोग पहावयास मिळणार, असें समजून बापानें जें काय सांगितलें तें त्यानें केलें. दुसरे दिवशीं सकाळीं तो मुलगा पित्यासंनिध गेला. तेव्हां उद्दालक ह्मणाला! रात्रीं जें लवण तूं उदकामध्यें टाकलें होतेंस तें हे वत्स ! आतां बाहेर काढून आण. मुलानें तो लवणपिंड बाहेर काढण्याची इच्छा केली; तें मीठ तेथें आहे हें त्यास कळलें; तथापि तें त्याला बाहेर काढतां येईना आणि त्या मिठाचें दर्शन आपण पाण्यांत टाकण्यापूर्वीच्या स्वरूपानें होईना. कारण उघड आहे. तें लवण यद्यपि विद्यमान होतें; तथापि तें जलामध्यें लीन झालें होतें. जलांत मिसळून विरून जाऊन तें जलरूप झालें होतें ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

यथा विलीनमेवाङ्गास्यान्तादाचामेति कथमिति लवणमिति मध्यादाचामेति कथमिति लवणमित्यन्तादाचामेति कथमिति लवणमित्यभिप्रास्यैतदथ मोपसीदथा इति तद्ध तथा चकार तच्छश्वत्संवर्तते तँ होवाचात्र वाव किलसत्सोम्य न निभालयसेऽत्रैव किलेति ॥ २ ॥

**अन्वय व अर्थः—यथा विलीनं एव** ( ज्यापक्षीं तें लवण पाण्यामध्यें विरून गेलें होतें, त्यापक्षीं तें नेत्रस्पर्शादिकांला अग्राह्यच होतें ) **अंग, अस्य अंतात् आचाम इति** ( मुला, या लवणोदकांतील अंताचें आचमन कर, असें बापानें सांगितलें ) **कथं इति, लवणं इति** ( बापानें कशी चव लागते असें विचारल्यावर तें खारट आहे असें मुलगा ह्मणाला ) **मध्यमात् आचाम इति, कथं इति, लवणं इति; अंतात् आचाम इति, कथं इति, लवणं इति** ( नंतर मध्यमभागाचें आचमन घे आणि तें कसें आहे तें सांग; आणि दुसऱ्या अंताचें अथवा कडेचें आचमन घे आणि तें कसें आहे तें सांग, असें दोनदां विचारल्यावर मुलानें आचमन करून दोन्ही ठिकाणचीं जलें खारट आहेत ह्मणून सांगितलें ) **एतद् अभिप्रास्य अथ मा उपसीदथाः इति, तथा तत् ह चकार** ( हें उदक बाहेर टाकून दे; आणि माझ्याजवळ ये, अशी आज्ञा झाल्यावर मुलानें त्याप्रमाणें केलें ) **तत शश्वत् संवर्तते** ( आणि ह्मणाला तो मिठाचा खारटपणा त्या उदकांत कायमचा राहिला आहे ) **तं ह उवाच** ( त्याला बाप ह्मणाला ) **अत्र वाव किल सोम्य सत् न निभाळयसें, अत्र एव किल** ( हे सोम्य मुला येथें सत् स्वरूपतः दिसत नाहीं, तथापि ते येथें आहे यात शंका नाहीं ) ॥ २ ॥

यथा विलीनं लवणं न वेत्थ तथाऽपि तच्चक्षुषा स्पर्शनेन च पिण्डरूपं लवणमगृह्यमाणं विद्यत एवाप्सूपलभ्यते चोपायान्तरेणेत्येतत्पुत्रं प्रत्याययितुमिच्छन्नाहाङ्गास्योदकस्यान्तादुपरि गृहीत्वाऽऽ

चामेत्युक्त्वा पुत्रं तथाकृतवन्तमुवाच कथमितीतर आह लवणं स्वादुत इति । तथा मध्यादुदकस्य गृहीत्वाऽऽचामेति कथमिति लवणमिति । तथाऽन्तादधोदेशाद्गृहीत्वाऽऽचामेति कथमिति लवणमिति । यद्येवमभिप्रास्य परित्यज्यैतदुदकमाचम्याथ मोपसीदथा इति तद्ध तथा चकार लवणं परित्यज्य पितृसमीपमाजगामेत्यर्थ इदं वचनं ब्रुवंस्तल्लवणं तस्मिन्नेवोदके यन्मया रात्रौ क्षिप्तं शश्वन्नित्यं संवर्तते विद्यमानमेवं सत्सम्यग्वर्तते । इत्येवमुक्तवन्तं तं होवाच पिता । यदिदं लवणं दर्शनस्पर्शनाभ्यां पूर्वं गृहीतं पुनरुदके विलीनाभ्यामगृह्यमाणमपि विद्यत एवोपायान्तरेण जिह्वयोपलभ्यमानत्वात् । एवमेवात्रैवास्मिन्नेव तेजोबन्नादिकार्ये शुङ्गे देहे । वाव किलेत्याचार्योपदेशस्मरणप्रदर्शनार्थौ । सत्तेजोबन्नादिशुङ्गकारणं वटबीजाणिमवद्विद्यमानमेवेन्द्रियैर्नोपलभसे न निभालयसे । यथाऽत्रैवोदके दर्शनस्पर्शनाभ्यामनुपलभ्यमानं लवणं विद्यमानमेव जिह्वयोपलब्धवानसि । एवमेवात्रैव किल विद्यमानं सज्जगन्मूलमुपायान्तरेण लवणाणिमवदुपलप्स्यस इति वाक्यशेषः ॥ २ ॥

**सिद्धांतीः—**यद्यपि विरून गेलेलें मीठ पूर्वस्वरूपामध्यें श्वेतकेतूला दिसलें नाहीं; तथापि नेत्रांनीं व स्पर्शेंद्रियानें गोचर न होणारा जो लवणपिंड पाण्यामध्यें विद्यमान होता, तो उपायांतरानें ‘ विद्यमान आहे ’ अशी पुत्राची खात्री करून द्यावी; ह्मणून उद्दालक आपल्या पुत्रास ह्मणाला; मुला, या उदकाच्या एका कडेचें आचमन कर. मुलानें तसें केल्यावर बापानें रुचि कसली आहे; ह्मणून विचारलें, मुलगा ह्मणाला; रुचि खारट आहे. तसेंच उदकाच्या मध्यापासून आचमन कर ह्मणून सांगितल्यावर; व मुलानें तें तसें केल्यावर बापानें रुचि विचारली, तेव्हां उदक खारट आहे, असें मुलगा ह्मणाला, त्याच उदकाचें दुसरीकडून आचमन केल्यानंतर तोही भाग खारट आहे असें मुलास समजलें. नंतर बापानें मुलास सांगितलें कीं, हें उदक बाहेर टाकून आचमन करून मजजवळ ये. मुलानें तसें केलें; ह्मणजे उदक टाकून पित्याजवळ येऊन बसला;आणि ह्मणाला; कीं, त्या घटांतील उदकामध्यें काल रात्रीं जें मीठ टाकलें होतें तें जलाशीं एकरूप होऊन तेथें तें नित्य वास्तव्य करीत आहे. त्यावर उद्दालक ह्मणाला; मुला पूर्वीं जो मिठाचा खडा नेत्रेंद्रियाला व स्पर्शेंद्रियाला गोचर होता तोच खडा उदकांत टाकल्यानंतर विरून गेला; आणि नेत्रस्पर्शेंद्रियांस अगोचर झाला;

यद्यपि तो या इंद्रियांस गोचर नाहीं, तथापि तो खडा ह्मणजे मीठ त्या उदकामध्यें आहे, हें तुला तुझ्या स्वाद घेणाऱ्या जिभेनें समजलें.

( तात्पर्य एका इंद्रियास गोचर नसणारी वस्तु ' मुळींच नाहीं ' असें ह्मणतां येत नाहीं; कारण ती वस्तु दुसऱ्या इंद्रियाला प्रत्यक्ष होत असते )

असो. येथेंहि ह्मणजे सताच्या संबंधानेंही असाच प्रकार आहे. ह्या तेज, जल, अन्न इत्यादिकांपासून उत्पन्न होणारा जो देहांकुर त्याच्यासंबंधानें पाहिलें असतां तेजादि कार्यांचें कारण असणारी सद्वस्तू वटबीजाच्या अत्यंत सूक्ष्म बीजाप्रमाणें विद्यमान असतेच असते; पण तिचें ज्ञान तुझ्या अथवा माझ्या इंद्रियांस होत नाहीं. ह्याच उदकामध्यें स्पर्शनेत्रादि-इंद्रियांस अगोचर असणारें लवण तुझ्या जिव्हेला गोचर झालें, त्याचप्रमाणें येथें ह्मणजे या विश्वांत विद्यमान असणारें जगताचें मूळ कारण जें सत् तें अन्य उपायांनीं गोचर होण्यासारखें आहे, असे जाण. लवण जिव्हेनें उपलब्ध झालें, वटबीजाचें बीज अनुमानानें ( असूनहि इंद्रियागोचर होतें ह्मणून अनुमान ) गोचर झालें, तसें हें सत् ही तुला दुसऱ्या उपायांनीं गोचर होईल. मंत्रांत ' वाव, किल ' हे दोन शब्द आहेत त्यांत 'वाव' हा आचार्योपदेशाचे स्मरणाचा वाचक आहे; आणि किल स्मरणाचा प्रदर्शक आहे ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**स य एषोऽणिमैतदात्म्यमिदꣳ सर्वं तत्सत्यꣳ स आत्मा तत्त्वमसि श्वेतकेतो इति भूय एव मा भगवान्विज्ञापयत्विति तथा सोम्येति होवाच ॥ ३ ॥**

**इति षष्ठाध्यायस्य त्रयोदशः खण्डः ॥ १३ ॥**

**अन्वय व अर्थः**—( या मन्त्राचा अर्थ पूर्वीं झाला आहे ) ॥ ३ ॥

स य इत्यादि समानम् । यद्येवं लवणाणिमवदिन्द्रियैरनुपलभ्यमानमपि जगन्मूलं सदुपायान्तरेणोपलब्धुं शक्यते यदुपलम्भात्कृतार्थः स्यामनुपलम्भाच्चाकृतार्थः स्यामहं तस्यैवोपलब्धौ क उपाय इत्येतद्भूय एव मा भगवान्विज्ञापयतु दृष्टान्तेन तथा सोम्येति होवाच ॥ ३ ॥

**इति षष्ठाध्यायस्य त्रयोदशः खण्डः ॥ १३ ॥**

**सिद्धांती**:—मंत्राचें विवेचन पूर्वी झालेंच आहे. मुलाचा अभिप्राय हा आहे कीं, लवण आणि अणिमा ( वटबीज ) यांसारखे इंद्रियांस अगोचर असणारें जगताचें मूल-कारण 'सत्' अन्य उपायानें गोचर होऊं शकतें, हें जर खरें आहे; व या सद्रूपी कारणाचें ज्ञान झालें असतां मी कृतार्थ होईन; आणि कारणाचें ज्ञान झालें नाहीं तर मीं अकृतार्थ राहीन, असे जर आहे, तर त्या सद्रूपी कारणाच्या ज्ञानप्राप्तीला कोणता उपाय आहे, हें आपण मला कृपा करून सांगावें. इष्ट असेल तर दृष्टांतहि द्यावा, अशी मुलानें प्रार्थना केली व बापानें 'तथास्तु' ह्मटलें ॥ ३ ॥

साहाव्या अध्यायाचा १३ वा खंड समाप्त.

---

## अध्याय सहावा खण्ड १४ वा

---

### मंत्र पहिला.

**यथा सोम्य पुरुषं गन्धारेभ्योऽभिनद्धाक्षमानीय तं ततोऽतिजने विसृजेत्स यथा तत्र प्राङ्वाऽधराङ्वा प्रत्यङ्वा प्रध्मायीताभिनद्धाक्ष आनीतोऽभिनद्धाक्षो विसृष्टः ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थ**:—**सौम्य यथा अभिनद्धाक्षं पुरुषं गंधारेभ्यो आनीय तं ततः अतिजने विसृजेत्** ( एकाद्या मनुष्याचे डोळे बट्ट बांधून त्याला गंधारनामक देशांतून बाहेर आणला; आणि एखाद्या विजन-प्रदेशामध्यें सोडून दिला तर ) **सः यथा तत्र प्राङ् वा उदङ्, वा अधराङ् वा, प्रत्यङ् वा अभिनद्धाक्षः अनीतः अभिनद्धाक्षः विसृष्टः—प्रध्मायीत** ( तो जसा तेथें पूर्वेकडे, उत्तरेकडे, पश्चिमेकडे अथवा दक्षिणेकडे तोंड करून " अहो माझे डोळे मला बांधून आणिला आहे, व मला डोळे बांधून तसाच येथें ठेवला आहे, असें मोठ्यानें ओरडेल, मोठा आक्रोश करीत राहील ) ॥ १ ॥

यथा लोके हे सोम्य पुरुषं यं कंचिद्गन्धारेभ्यो जनपदेभ्योऽभिनद्धाक्षं बद्धचक्षुषमानीय हृतद्रव्यहर्ता तस्करस्तमभिनद्धाक्षमेव

बद्धहस्तमरण्ये ततोऽप्यतिजनेऽतिगतजनेऽत्यन्तविगतजने देशे विसृजेत्स तत्र दिग्भ्रमोपेतो यथा प्राङ्वा प्रागञ्चनः प्राङ्मुखो वेत्यर्थः । तथोदङ्वा प्रध्मायीत शब्दं कुर्याद्विक्रोशेत् । अभिनद्धाक्षोऽहं गन्धारेभ्यस्तस्करेणाऽऽनीतोऽभिनद्धाक्ष एव विसृष्ट इति ॥ १ ॥

सिद्धांतः—हे सौम्य, व्यवहारांत एखादा धनापहारी चोर कोणा पुरुषाचे डोळे व हात बांधून गांधार देशांतून घेऊन येतो; आणि जेथें मनुष्याचा प्रवेश नाहीं, अशा एखाद्या जीर्णारण्यांत त्याला सोडून देतो. तेव्हां दिग्भ्रम झालेला तो दुर्दैवी पुरुष पूर्वेकडे जाऊन अथवा प्राङ्मुख होऊन किंवा दक्षिण, पश्चिम किंवा उत्तर दिशांकडे तोंड करून 'अहो माझे डोळे बांधून चोरानें गांधारदेशांतून मला येथें आणलें आहे; आणि डोळे बांधलेले ठेवूनच मला येथें सोडून दिला आहे,' असें मोठ्यानें ओरडून आक्रोश करीत राहील ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**तस्य यथाभिनहनं प्रमुच्य प्रब्रूयादेतां दिशं गन्धारा एतां दिशं व्रजेति स ग्रामाद्ग्रामं पृच्छन्पण्डितो मेधावी गन्धारानेवोपसंपद्येतैवमेवेहाऽऽचार्यवान्पुरुषो वेद तस्य तावदेव चिरं यावन्न विमोक्ष्येऽथ संपत्स्य इति ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः—तस्य यथा अभिनहनं प्रमुच्य " एतां दिशं गंधाराः एतां दिशं व्रज' इति प्रब्रुयात्** ( त्याचें सर्व बंधन सोडून 'गंधारदेश इकडे आहे ह्या दिशेनें तूं जा' असें जसें एखादा सत्पुरुष त्यास सांगतो )—**आणि सः पण्डितः मेधावी ग्रामात् ग्रामं पृच्छन् गंधारान् एव उपसंपद्येत** ( या उपदेशानें पंडित व मेधावी झालेला तो पुरुष गंधाराचा मार्ग विचारीत विचारीत ह्या गांवाहून त्या गांवीं असा गंधार देशास जातो ) **एवं एव आचार्यवान् पुरुषः वेद.** ( त्याच-प्रमाणें आचार्यवान् पुरुषाला, गुरूपदेश झाला आहे अशा पुरुषाला,

सताचें पूर्ण ज्ञान होतें ) **तस्य तावत् एव चिरं यावत् न विमोक्ष्ये** ( जोंपर्यंत त्याचा देह-मोक्ष होत नाहीं, तोंपर्यंत मात्र अवधी असतो ) **अथ संपत्स्ये' इति** ( देहमोक्ष झाल्याबरोबर तो सत्स्वरूपाशीं संपन्न होतो ) ॥ २ ॥

एवं विक्रोशतस्तस्य यथाभिनहनं यथाबन्धनं प्रमुच्य मुक्त्वा कारुणिकः कश्चिदेतां दिशमुत्तरतो गन्धारा एतां दिशं व्रजेति प्रव्रयात्स एवं कारुणिकेन बन्धनान्मोक्षितो ग्रामाद्ग्रामान्तरं पृच्छन्पण्डित उपदेशवान्मेधावी परोपदिष्टग्रामप्रवेशमार्गावधारणसमर्थः सन्गन्धारानेवोपसंपद्येत नेतरो मूढमतिर्देशान्तरदर्शनतृड्वा। यथाऽयं दृष्टान्तो वर्णितः स्वविषयेभ्यो गन्धारेभ्यः पुरुषस्तस्करैरभिनद्धाक्षोऽविवेको दिङ्मूढोऽशनायापिपासादिमान्व्याघ्रतस्कराद्यनेकभयानर्थव्रातयुतमरण्यं प्रवेशितो दुःखार्तो विक्रोशन्बन्धनेभ्यो मुमुक्षुस्तिष्ठति स कथंचिदेव कारुणिकेन केनचिन्मोक्षितः स्वदेशान्गन्धारानेवाऽऽपन्नो निर्वृत्तः सुख्यभूत्। एवमेव सतो जगदात्मस्वरूपात्तेजोबन्नादिमयं देहारण्यं वातपित्तकफरुधिरमेदोमांसास्थिमज्जाशुक्रक्रिमिमूत्रपुरीषवच्छीतोष्णाद्यनेकद्वंद्वदुःखवच्चेदं मोहपटाभिनद्धाक्षो भार्यापुत्रमित्रपशुबन्धवादिदृष्टादृष्टानेकविषयतृष्णापाशितः पुण्यापुण्यादितस्करैः प्रवेशितोऽहममुष्य पुत्रो ममैते बान्धवाः सुख्यहं दुःखी मूढः पण्डितो धार्मिको बन्धुमाञ्जातो मृतो जीर्णः पापी पुत्रो मे मृतो धनं मे नष्टं हा हतोऽस्मि कथं जीविष्यामि का मे गतिः किं मे त्राणमित्येवमनेकशतसहस्रानर्थजालवान्विक्रोशन्कथंचिदेव पुण्यातिशयात्परमकारुणिकं कंचित्सद्ब्रह्मात्मविदं विमुक्तबन्धनं ब्रह्मिष्ठं यदाऽऽसादयति तेन च ब्रह्मविदा कारुण्याद्दर्शितसंसारविषयदोषदर्शनमार्गो विरक्तः संसारविषयेभ्यो नासि त्वं संसार्यमुष्य पुत्रत्वादिधर्मवान्किं तर्हि सद्यत्तत्त्वमसीत्यविद्यामोहपटाभिनहनान्मोक्षितो गन्धारपुरुषवच्च स्वं सदात्मानमुपसंपद्य सुखी निर्वृतः स्यादित्येतमेवार्थमाहाऽऽचार्यवान्पुरुषो वेदेति तस्यास्यैवमाचार्यवतो मुक्ताविद्याभिनहनस्य

**तावदेव तावानेव कालश्चिरं क्षेपः सदात्मस्वरूपसंपत्तेरिति वाक्यशेषः । कियान्कालश्चिरमित्युच्यते यावन्न विमोक्ष्ये न विमोक्ष्यत इत्येतत्पुरुषव्यत्ययेन । सामर्थ्यात् । येन कर्मणा शरीरप्रारब्धं तस्योपभोगेन क्षयाद्देहपातो यावदित्यर्थः । अथ तदैव सत्संपत्स्ये संपत्स्यत इति पूर्ववत् । न हि देहमोक्षस्य सत्संपत्तेश्च कालभेदोऽस्ति येनाथशब्द आनन्तर्यार्थः स्यात् ।**

**सिद्धांतीः—**उद्दालक आपल्या मुलास पुढें सांगतो; मुला ! त्या आक्रोश करणाऱ्या पुरुषाला जसा बांधला होता, तसें तें त्याचें बंधन मोकळें करून कोणी दयाघन पुरुष त्याला ह्मणतो ' गधांर देश येथून उत्तरेकडे आहे, त्या उत्तर दिशेनें जा. ' याप्रमाणें त्या करुणहृदयी पुरुषानें बंधनमोक्ष केल्यावर एका गांवाहून दुसऱ्या गांवाची वाट विचारीत विचारीत तो पंडित ह्मणजे उपदेश झालेला आणि मेधावी ह्मणजे दुसऱ्यांनीं उपदेश केलेला तात्पर्य, ग्रामप्रवेशाचा आणि ग्रामाचा मार्ग ध्यानांत ठेवण्यास समर्थ असणारा गंधार देशासच जातो. इतर कोणी मूढमति किंवा दुसरे देश पाहण्याची इच्छा करणारा गंधार देशालाच जाऊं शकत नाहीं. असो. आपला जो गंधार देश त्या देशांतून चोरांनीं अरण्यांत नेलेला, हस्तनेत्रादिकांनीं बद्ध झालेला, अविवेकी व दिशाभूल झालेला, अन्नपानादि न मिळाल्यामुळें ग्लानी पावलेला, व्याघ्र, तस्कर इत्यादि अनेक भयंकर अनर्थ—समूह विद्यमान असलेल्या अरण्यांत आणून सोडलेला, दुःखार्त पुरुष आक्रोश करितो; आणि बंधनमुक्त होण्याची इच्छा करितो; व पुढें कोणी तरी दयाघन पुरुषाची गांठ पडून बंधनमुक्त होतो; आणि आपला जो स्वदेश ह्मणजे गंधार देश तेथें येऊन पोंहोचला, ह्मणजे शांतिसुखाचा अनुभव घेतो, हा व्यावहारिक दृष्टांत ध्यानांत ठेव. मुला, याचप्रमाणें जगताचें आत्मस्वरूप जी सद्वस्तू, तिच्यापासून तेजादि तीन पदार्थांनीं घटित झालेलें हें जें देहारण्य त्यांत जीव येऊन पडतो. या देहरूपी अरण्यांत वात, पित्त, कफ, रुधिर ( रक्त ) मेद, मांस, अस्थि, मज्जा, शुक्र, कीटक, मूत्र, पुरीष इत्यादिक तोंडातोंड भरलेली असतात, शीतोष्णादि अनेक द्वंद्वदुःखें वास्तव्य करतात, तसेंच जीवाची सर्व नेत्रादि इंद्रियें मोहपटानें ( मोहरूपी जें वस्त्र त्यानें ) घट्ट बांधलेलीं असतात. येथें भार्या, पुत्र, मित्र, पशु, बंधु इत्यादि अनेक दृष्ट आणि अदृष्ट विषयांसंबंधीं जी तृष्णा तिच्या दृढ रज्जूंनीं हा जीव बद्ध झालेला असतो. पापपुण्यादि तस्करांनीं ( शुभ किंवा अशुभ कर्म सकामतः झालें ह्मणजे कर्मफळाचा उपभोग घेण्यासाठीं जीवाला देहप्रवेश करावा लागतो ! ) देहारण्यांत आणून सोडलेला हा जीव ' मीं अमक्याचा पुत्र. हे माझे बांधव, मीं सुखी आहें, मीं दुःखी आहें, मीं मूढ आहें, पंडित आहें, धार्मिक आहें, मला बंधु आहेत, मीं

जन्मलों, मीं मेलों, मीं वृद्ध झालों, मीं पापी आहें, माझा मुलगा मेला, माझें धन नष्ट झालें, माझा सर्वस्वी घात झाला, मीं आतां जिवंत कसा राहूं, माझी गति काय होईल, माझें संरक्षण करणारा कोण आहे, असा आक्रोश हजारों हजार अनर्थांच्या जाळ्यांमध्यें सांपडलेला पुरुष करीत असतो. तेव्हां अपूर्व सौभाग्यानें अथवा कांहीं पूर्व पुण्याईनें त्याची व एखाद्या अत्यंत दयावन ब्रह्मात्मवेत्त्या सत्पुरुषाची गांठ पडते. हा सत्पुरुष स्वतः बंधनमुक्त, जीवन्मुक्त, ब्रह्मज्ञानी असतो. जेव्हां अशा सत्पुरुषाची गांठ पडते, तेव्हां तो ब्रह्मवेत्ता सत्पुरुष कारुण्यानें या बद्धपुरुषाला ह्या संसाराचें व त्यांतील विषयांचें क्षणभंगुरत्वादि दोष दाखविणारा मार्ग सांगून देतो, हा उपदेश ऐकून संसार-विषयासंबंधानें बद्ध पुरुषाला वैराग्य प्राप्त होतें. नंतर "तूं संसारी नाहींस', 'अमक्याचा पुत्र' 'तमक्याचा बंधु' इत्यादि धर्म तुझ्याठिकाणीं नाहींत; तर सत् हें जें आत्मतत्व तेंच तूं आहेस, असा उपदेश झाला; म्हणजे अविद्येनें उत्पन्न होणारें जें मोहपटल त्याच्या बंधनापासून हा चित्तशुद्ध झालेला पुरुष मुक्त होतो; आणि गंधार-देशाला पोहोंचलेल्या पुरुषाप्रमाणें आपल्या स्वतःचें जें सद्रूप तें प्राप्त करून घेतो; व सुखी आणि शांत होतो. हा तात्पर्यार्थ दृष्टांतानें समजून घ्यावयाचा आहे. म्हणूनच श्रुति म्हणते, तें 'गुरुंचा उपदेश झाला तरच पुरुषाला ब्रम्हज्ञान होतें' हें ध्यानांत ठेवावयाचें आहे. याप्रमाणें आचार्यवान् आणि अविद्येच्या बंधापासून मुक्त झालेला पुरुष तोंपर्यंत मात्र सद्रूपी जें शुद्ध आत्मस्वरूप तें प्राप्त करून घेत नाहीं.' कोठपर्यंत हा अवधी असतो? असें विचारशील तर श्रुति सांगते, जावत्कालपर्यंत प्रारब्धकर्मानें प्राप्त झालेल्या देहामध्यें त्यास राहावें लागतें, त्यांतून मुक्त होतां येत नाहीं, तोंपर्यंत तो सद्रूप होत नाहीं. ज्या कर्मानें आपल्यास हें शरीर प्राप्त झालें आहे, त्या कर्मांचीं फलें उपभोगानें क्षीण होत तोंपर्यंत जीवाचा वर्तमान देह सुटत नाहीं;पण देहमोक्ष झाला कीं तत्क्षणींच जीवाला स्वस्वरूप प्राप्त होतें. येथें अथ या शब्दाचा अर्थ नंतर हा नाहीं. देह मोक्ष होतांक्षणीं जीव मुक्तच होतो. सारांश, कालावधि नाहीं. असो; या मंत्रांत " विमोक्ष्ये संपत्स्ये, अशीं उत्तमपुरुषीं रूपें आहेत, तथापि वाक्यसंदर्भानें या क्रियापदांचा संबंध जीवाशीं ह्मणजे तृतीयपुरुषाशींच असला पाहिजे.

ननु यथा सद्विज्ञानानन्तरमेव देहपातः सत्संपत्तिश्च न भवति कर्मशेषवशात्तथाऽप्रवृत्तफलानि प्राग्ज्ञानोत्पत्तेर्जन्मान्तरसंचितान्यपि कर्माणि सन्तीति तत्फलोपभोगार्थं पतितेऽस्मिञ्छरीरान्तरमारब्धव्यम्। उत्पन्ने च ज्ञाने यावज्जीवं विहितानि प्रतिषिद्धानि वा कर्माणि करोत्येवेति तत्फलोपभोगार्थं चावश्यं शरीरान्तरमारब्धव्यं ततश्च कर्माणि ततः शरीरान्तरमिति ज्ञानानर्थक्यं कर्मणां

फलवत्त्वात् । अथ ज्ञानवतः क्षीयन्ते कर्माणि तदा ज्ञानप्राप्तिसमकालमेव ज्ञानस्य सत्संपत्तिहेतुत्वान्मोक्षः स्यादिति शरीरपातः स्यात् । तथाचाऽऽचार्याभाव इत्याचार्यवान्पुरुषो वेदेत्यनुपपत्तिर्ज्ञानान्मोक्षाभावप्रसङ्गश्च । देशान्तरप्राप्त्युपायज्ञानवदनैकान्तिकफलत्वं वा ज्ञानस्य । न । कर्मणां प्रवृत्ताप्रवृत्तफलवत्त्वविशेषोपपत्तेः । यदुक्तमप्रवृत्तफलानां कर्मणां ध्रुवफलवत्त्वाद्ब्रह्मविदः शरीरे पतिते शरीरान्तरमारब्धव्यमप्रवृत्तकर्मफलोपभोगार्थमित्येतदसत् । विदुषस्तस्य तावदेव चिरमिति श्रुतेः प्रामाण्यात् ।

पूर्वपक्षीः—प्रारब्धकर्माचें फळ भोगावयाचें असतें ह्मणून ज्या अर्थी सताचें विज्ञान होतांक्षणींच देहपात होऊन जीवाला सद्रूपत्व प्राप्त होत नाहीं, तात्पर्य कर्मफलाचा कांहीं भाग उपभोगावयाचा राहिला असतो; ह्मणून देहपात होऊन सद्रूपहीं प्राप्त होत नाहीं, त्या अर्थींच असेंही ह्मटलें पाहिजे कीं, हा देह पडला तरी जीवाला सताचें ज्ञान होऊनही त्याला दुसरा देह घेतला पाहिजे. केलेल्या कर्मांचें फळ उपभोगिलें पाहिजे, असा निराबाध वैदिक सिद्धांत आहे; ह्मणून ह्या जीवाच्या अनंत पूर्वजन्मींच्या देहांत जीं कर्में जीवानें केलीं; व जीं हा जन्म घेतांना फलोन्मुख झालीं नव्हतीं, त्या कर्मांचें फल जीवानें केव्हांतरी भोगलेंच पाहिजे. ज्ञानाच्या उत्पत्तीपूर्वींची यद्यपिहि कर्में असलीं, तथापि ज्ञान झाल्यानंतरही ह्या कर्मांचा फलोपभोग घेण्यासाठीं जीवाला जन्म आलाच पाहिजे. ज्ञान उत्पन्न झाल्यानंतरही यावज्जीव तो ज्ञानी पुरुष जीं विहित अथवा प्रतिषिद्ध कर्में करतो त्यांच्या फलोपभोगासाठींही त्या पुरुषाला दुसरा देह धारण केला पाहिजे. ह्या दुसऱ्या देहांतही त्याचेकडून कर्में होणार ह्मणून तिसरा जन्म घेतला पाहिजे. पुढें चवथा,याप्रमाणें अनंत जन्म घेतले पाहिजेत.तात्पर्य; कर्मांचीं फलें भोगलींच पाहिजेत;ह्मणून अनंत जन्म घ्यावयास लागणाऱ्या जीवाचें ज्ञान निष्फळ होऊन मोक्ष मिळणें अशक्य होतें. आतां, ज्ञान्याचीं सर्वच कर्में संपतात असें ह्मणाल, तर सताचें स्वरूप देणारें ज्ञान प्राप्त होतांक्षणींच मोक्ष मिळाला पाहिजे, ह्मणून देहपातही झालाच पाहिजे. ज्ञान होतांक्षणींच देहपात होतो, हें सिद्ध झालें तर ब्रह्मोपदेश करणारा ब्रह्मज्ञ आचार्य मिळणें अशक्यच होणार. अर्थात् " आचार्यवान् पुरुषो वेद ( ज्याला ब्रह्मज्ञ आचार्यांनें ब्रह्मोपदेश केला तो ब्रह्मज्ञ होतो )" ही श्रुति अनुपपन्न होते. आणि ज्ञानानें मोक्ष मिळण्याचा प्रसंग नष्ट होतो. तसेंच देशांतराला जाण्याचे जसे अनेक मार्ग असतात, तसे मोक्षालाही प्राप्त करून घेण्याचे अनेक उपाय असले पाहिजेत. तात्पर्य, ज्ञानानें मात्र मोक्ष होतो, हें सिद्ध होत नाहीं. कर्में नष्ट झालेंच पाहिजे. यासाठीं अन्य उपाय हवा.

( पूर्वपक्षाचे तीन आक्षेप आहेत. १ प्रारब्धकर्माचा क्षय झाल्याखेरीज जर ज्ञान्यालाही ब्रह्मत्व प्राप्त होत नाहीं, तर पूर्वसंचित व ज्ञानानंतर आवश्यकता होणारी कर्में (क्रियमाण यांचा उपभोग घेतल्याखेरीजही मोक्ष मिळणें अशक्य आहे, असें होतें. जीव आहे तोंपर्यंत कर्म व्हावयाचेंच; आणि एक देह पडला तरी त्या देहांत न उपभोगिलेलीं कर्मफलें जिवंत राहावयाचींच; ह्मणून मोक्ष मिळणें अशक्य आहे. २ ज्ञान होतांक्षणीं कर्में संपत असलीं, तर त्या क्षणींच देहपात झाला पाहिजे. अर्थात् ब्रह्मज्ञ पुरुष जिवंत राहणें शक्य नाहीं; आणि ह्मणून ब्रह्मज्ञ आचार्य मिळणें शक्य नाहीं. आचार्याशिवाय मोक्षही मिळत नाहीं. ३ कर्म निःशेषच झालें तर मात्र ज्ञानानें मोक्ष मिळणें शक्य आहे, नुसत्या ज्ञानानें नाहीं. यावरून केवळ ज्ञानानेंच मात्र मोक्ष होतो हें ह्मणणें सिद्ध होत नाहीं )

सिद्धांतीः--तुमचें ह्मणणें बरोबर नाहीं. फलोन्मुख आणि अफलोन्मुख अशीं दोन-प्रकारचीं कर्में असतात. फलोन्मुख कर्मांनीं विद्यमान देह प्राप्त होतो; आणि त्याच देहांत या फलोन्मुख कर्मफलांचा उपभोग होतो. याच प्रारब्धाच्या उपभोगासाठीं ज्ञान होऊनही जीवाचा तत्काळ देह पडत नाहीं. आतां जीं कर्में फलोन्मुखच झालीं नाहींत, त्या कर्मांच्या फलांचा निश्चितरीतीनें उपभोग घेण्यासाठीं ब्रह्मवेत्त्यालाहि शरीरपातानंतर दुसरें शरीर धारण करावें लागतें;आणि संचितकर्मांचा फलोपभोग घ्यावा लागतो, असें जें तुमचें ह्मणणें आहे तें असत् आहे; कारण " फलोन्मुख कर्मांचा उपभोग घेईपर्यंत मात्र विद्वानाचा देहपात होत नाहीं " असें श्रुति प्रत्यक्ष ह्मणत आहे. श्रुतीचें वाक्य सर्वथा प्रमाण असतें. कर्मांला प्रारब्ध कर्म ह्मणतात. असो; प्रारब्ध कर्म संपलें कीं ज्ञानी ब्रह्मरूप होतो.

ननु "पुण्यो वै पुण्येन कर्मणा भवति" इत्यादिश्रुतेरपि प्रामाण्यमेव । सत्यमेवम् । तथाऽपि प्रवृत्तफलानामप्रवृत्तफलानां च कर्मणां विशेषोऽस्ति । कथम् । यानि प्रवृत्तफलानि कर्माणि यैर्विद्वच्छरीरमारब्धं तेषामुपभोगेनैव क्षयः । यथाऽऽरब्धवेगस्य लक्ष्यमुक्तेष्वादेर्वेगक्षयादेव स्थितिर्न तु लक्ष्यवेधसमकालमेव प्रयोजनं नास्तीति तद्वत् । अन्यानि त्वप्रवृत्तफलानीह प्राग्ज्ञानोत्पत्तेरूर्ध्वं च कृतानि वा क्रियमाणानि वाऽतीतजन्मान्तरकृतानि वाऽप्रवृत्तफलानि ज्ञानेन दह्यन्ते प्रायश्चित्तेनेव । " ज्ञानाग्निः सर्वकर्माणि भस्मसात्कुरुते तथा " इति स्मृतेश्च । " क्षीयन्ते चास्य कर्माणि " इति चाऽऽथर्वणे । अतो ब्रह्मविदो जीवनादिप्रयोजनाभावेऽपि

प्रकृतफलानां कर्मणामवश्यमेव फलोपभोगः स्यादिति मुक्तेषुवत्तस्य तावदेव चिरमिति युक्तमेवोक्तमिति यथोक्तदोषचोदनानुपपत्तिः । ज्ञानोत्पत्तेरूर्ध्वं च ब्रह्मविदः कर्माभावमवोचाम ब्रह्मसंस्थोऽमृतत्वमेतीत्यत्र तच्च स्मर्तुमर्हसि ॥ २ ॥

**पूर्वपक्षीः**—" पुण्यकर्म केलें असतां जीव पुण्यवान् होतो " इत्यादि श्रुती प्रमाणच आहेत ना ?

**सिद्धांतीः**—खरें आहे; तथापि प्रवृत्त फलकर्में ( फलोन्मुख कर्में ) आणि अप्रवृत्त फलकर्में हा विशेष विसरूं नका. पहा कीं, ज्या प्रारब्धकर्मांनीं जीवाला हा देह प्राप्त झाला; व याच देहांत एखाद्याला ज्ञान प्राप्त झालें, तीं कर्में मात्र उपभोगानें क्षीण होतात. उदाहरणार्थः-लक्ष्याचा वेध करण्यासाठीं सोडलेला बाण ज्या वेगानें आपण सोडतों तो वेग संपतांक्षणीं मात्र खालीं पडतो; ह्मणजे लक्ष्याचा वेध झाल्याबरोबर बाणाची गति संपते, असें नाहीं; कारण त्याची गति संपण्याला कोणतेंहि प्रयोजन नाहीं, गती कां संपावी याला कांहीं हेतू नाहीं. त्याचप्रमाणें ज्या प्रारब्धकर्मानें हा देह प्राप्त झाला, त्या कर्मांचीं फलें उपभुक्त झाल्याशिवाय हा देहरूपी बाण स्तब्ध होण्याचें कारणच नाहीं. फलोन्मुख कर्मासंबंधानें हा विचार झाला. आतां ज्ञानोत्पत्तीच्या पूर्वीं झालेलीं पण फलोन्मुख नसणारीं किंवा ज्ञानोत्पत्तीनंतर झालेलीं व होणारीं कर्में त्याचप्रमाणें पूर्वजन्मांमध्यें झालेलीं अफलोन्मुख कर्में या सर्वांचा ज्ञानाग्नि दाह करतो. प्रायश्चित्तानें पापें जळतात, त्याचप्रमाणें आत्मज्ञानविज्ञानानें सर्व कर्में आणि कर्महेतु जें अज्ञान तें दग्ध होतें. " ज्ञानाग्नि सर्व कर्मांस भस्मसात् करितो " असें श्रीमद्भगवद्गीता सांगते. तसेंच " त्याचीं सर्वकर्में क्षीण होऊन नष्ट होतात " असें आथर्वणश्रुति ह्मणत आहे. ह्या श्रुति स्मृति-कथित प्रमाणांनीं आणि युक्तीच्या प्रमाणानें असें ठरतें कीं, यद्यपि ब्रह्मवेत्त्याला जीवनादि योगक्षेमाचें प्रयोजन नाहीं; तथापि फलोन्मुख कर्मांचा उपभोग त्यानें अवश्य घेतलाच पाहिजे. सोडलेल्या ह्या बाणाचें उदाहरण हाच न्याय सिद्ध करितें.

( तात्पर्य हें आहे कीं, अफलोन्मुख असणारीं जन्मजन्मांतरीं केलेलीं सर्व कर्में ज्ञानविज्ञान झाल्यानंतर नाहींशी होतात. ज्ञानप्राप्तीनंतर झालेलींही सर्व कर्में जीवन्मुक्त करीतच नाहीं; ह्मणून त्याच्या हातून घडणाऱ्या कर्मांबद्दल तो जबाबदार असत नाहीं. केवळ ज्या फलोन्मुख कर्मांनीं जीवन्मुक्ताला वर्तमान देह प्राप्त झाला, त्यांचीं कर्मफलें भुक्त होऊन तीं कर्में नष्ट झालीं, ह्मणजे जीवन्मुक्ताचा देह पडतो; आणि जीवन्मुक्त तत्क्षणीं ब्रह्म होतो )

ह्मणून ' देहपाताला अवधी आहे तोंपर्यंत ' इत्यादि श्रुतीनें ह्मटलें आहे, तें सर्वथा योग्य आहे. अर्थात् तुम्हीं काढलेल्या आक्षेपाला येथें अवकाशच नाहीं. ज्ञानोत्पत्ती-

नंतर व तत्समयीं ब्रम्हवेत्ता कर्मशून्य असतो, तो ब्रम्हसंस्थ असतो, अमृत असतो, असें आम्हीं मागें सांगितलें आहे, तेंही या वेळीं स्मरणांत आणणें हें योग्य आहे ॥२॥

---

## मंत्र तिसरा.

**स य एषोऽणिमैतदात्म्यमिदꣳ सर्वं तत्सत्यꣳ स आत्मा तत्त्वमसि श्वेतकेतो इति भूय एव मा भगवान्विज्ञापयत्विति तथा सोम्येति होवाच ॥ ३ ॥**

**इति षष्ठाध्यायस्य चतुर्दशः खण्डः ॥ १४ ॥**

**अन्वय व अर्थः**—(ह्याचा अन्वय व अर्थ पूर्वीच केला आहे) ॥३॥

स य इत्याद्युक्तार्थम् । आचार्यवान्विद्वान्येन क्रमेण सत्संपद्यते तं क्रमं दृष्टान्तेन भूय एव मा भगवान्विज्ञापयत्विति । तथा सोम्येति होवाच ॥ ३ ॥

सिद्धांतीः—मंत्राचें विवेचन पूर्वींच झालें आहे. श्वेतकेतूची प्रार्थना या वेळीं अशी आहे कीं, गुरुकडून उपदेश झालेला विद्वान् ज्या क्रमानें सद्रूपाला जातो तो क्रम दृष्टांतरूपानें आपल्यास समजावा. नंतर 'बरें आहे' असें म्हणून उद्दालकानें दृष्टांत सांगण्यास आरंभ केला. या दृष्टांताचें विवेचन पुढील खंडांत होईल.

सहाव्या अध्यायाचा १४ वा खंड समाप्त.

---

## अध्याय सहावा खण्ड १५ वा.

## मंत्र पहिला.

**पुरुषꣳसोम्योतोपतापिनं ज्ञातयः पर्युपासते जानासि मां जानासि मामिति तस्य यावन्न वाङ्मनसि संपद्यते मनः प्राणे प्राणस्तेजसि तेजः परस्यां देवतायां तावज्जानाति ॥ १ ॥**

**अन्वय व अर्थः**—सोम्य उपतापिनं पुरुषं ज्ञातयः पर्युपासते उत सौम्य दोषी ज्वरानें पीडलेल्या पुरुषाजवळ बसून त्याची सेवा बंधुबांधव

करितात; आणि त्याला विचारतात ) **"जानासि मां" "जानासि मां" इति**,( मला तूं ओळखतोस कां ? माझी ओळख तुला आहे कां ? )**यावत् तस्य वाक् मनसि न संपद्यते, मनः प्राणे न,प्राणः तेजसि न, तेजः परस्याम् देवतायाम्, तावत् जानाति** ( जोंपर्यंत त्याच्या वाणीनें मनांत, मनानें प्राणांत, प्राणानें तेजांत, आणि तेजानें अतिश्रेष्ठ देवतेंत प्रवेश केला नाहीं, तोंपर्यंत त्याला वरील प्रश्न समजतात व माणसेंही ओळखतां येतात ) ॥ १ ॥

पुरुषं हे सोम्योतोपतापिनं ज्वराद्युपतापवन्तं ज्ञातयो बान्धवाः परिवार्योपासते मुमूर्षुं जानासि मां तव पितरं पुत्रं भ्रातरं वेति पृच्छन्तस्तस्य मुमूर्षोर्यावन्न वाङ्मनसि संपद्यते मनः प्राणे प्राणस्तेजसि तेजः परस्यां देवतायामित्येतदुक्तार्थम् ॥ १ ॥

**सिद्धांती:**—हे सौम्य, एखाद्या पुरुषाला भयंकर ताप येऊन तो मरणोन्मुख होतो, तेव्हां त्याचे बंधुबांधव त्याच्याजवळ सेवाचाकरी करण्याकरितां बसून त्याला "मीं तुझा बाप, किंवा हा तुझा भाऊ किंवा हा तुझा पुत्र, यांस ओळखतोस का ?" असें विचारतात; आणि जोंपर्यंत त्या मुमूर्षूच्या वाणीनें मनांमध्यें, मनानें प्राणामध्यें, प्राणानें तेजामध्यें, आणि तेजानें ह्या अतिश्रेष्ठ देवतेमध्यें ( आत्मस्वरूपामध्यें ) प्रवेश केलेला नसतो, तोंपर्यंत मुमूर्षूला ओळख पटते. देवता इत्यादिकांचें विवेचन मागें झालेंच आहे. ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**अथ यदाऽस्य वाङ्मनसि संपद्यते मनः प्राणे प्राणस्तेजसि तेजः परस्यां देवतायामथ न जानाति ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थ:—अथ यदा अस्य वाक् मनसि, मनः प्राणे, प्राणः तेजसि, तेजः परस्याम् देवतायाम् संपद्यते अथ न जानाति** (परंतु जेव्हां वाणी मनामध्यें, मन प्राणांत, प्राण तेजामध्यें,आणि तेज त्या श्रेष्ठदेवतेंत प्रवेश करितात, तेव्हां त्याला कांहीं समजत नाहीं ) ॥ २ ॥

संसारिणो यो मरणक्रमः स एवायं विदुषोऽपि सत्संपत्तिक्रम इत्येतदाह परस्यां देवतायां तेजसि संपन्नेऽथ न जानाति । अविद्वांस्तु सत उत्थाय प्राग्भावितं व्याघ्रादिभावं देवमनुष्यादिभावं वा विशति । विद्वांस्तु शास्त्राचार्योपदेशजनितज्ञानदीपप्रकाशितं सद्ब्रह्मात्मानं प्रविश्य नाऽऽवर्तत इत्येष सत्संपत्तिक्रमः । अन्ये तु मूर्धन्यया नाड्योत्क्रम्याऽऽदित्यादिद्वारेण सद्गच्छन्तीत्याहुस्तदसत् । देशकालनिमित्तफलाभिसंधानेन गमनदर्शनात् । न हि सदात्मैकत्वदर्शिनः सत्याभिसंधस्य देशकालनिमित्तफलाद्यनृताभिसंधिरुपपद्यते । विरोधात् । अविद्याकामकर्मणां च गमननिमित्तानां सद्विज्ञानहुताशनावप्लुष्टत्वाद्गमनानुपपत्तिरेव । "पर्याप्तकामस्य कृतात्मनस्त्विहैव सर्वे प्रविलीयन्ति कामाः" इत्याद्याथर्वणे । नदीसमुद्रदृष्टान्तश्रुतेश्च ॥ २ ॥

सिद्धांतीः—संसारी पुरुषाचा जो मरणक्रम आहे, त्याची वाणी आणि उपकरणें ज्या क्रमानें स्वकारणांत लीन होतात त्याप्रमाणेंच विद्वानाचा ही सत्संपत्तिक्रम आहे. (सतामध्यें तो ह्याच क्रमानें प्रवेश करितो) असें दाखविण्यासाठीं या मंत्रामध्यें "त्याचें तेज श्रेष्ठदेवतेमध्यें प्रविष्ट झाल्यानंतर त्याला कांहीं समजत नाहीं" असें श्रुति येथें ह्मणत आहे. तथापि उभयतांमध्यें एक विशेष आहे. अविद्वान् जीव सतापासून उठल्यानंतर अथवा च्युत झाल्यानंतर, व्याघ्रादि भावनांचे संस्कार अथवा देवमनुष्यादि भावनांचे संस्कार त्याचे अंतःकरणावर झाले असतील, त्या त्या व्याघ्रादिमध्यें अथवा देवमनुष्यादिमध्यें—अविद्वान् जीव—प्रवेश करितो, त्याला पूर्वसंस्काराप्रमाणें देह येतो; पण शास्त्रें व आचार्य यांनीं उत्पन्न केलेल्या ज्ञानप्रदीपानें प्रकाशित झालेल्या सतामध्यें ह्मणजे परब्रह्मामध्यें विद्वानाचा प्रवेश झाला; ह्मणजे त्याला पुनः परत यावें लागत नाहीं; ह्मणून त्याच्या उत्क्रांतीला सत्संपत्तिक्रम असें ह्मणतात. (अविद्वानाच्या उत्क्रांतीला मरणक्रम असें ह्मणतात.) आतां कित्येक लोक असें ह्मणतात कीं, विद्वानाचा जीव ऊर्ध्वनाडीनें बाहेर जाऊन आदित्यादि द्वारांनीं सत्स्वरूपास जाऊन मिळतो; पण हें ह्मणणें शास्त्रयुक्त नाहीं. गमन असा शब्द उच्चारिला कीं देश, कालनिमित्त आणि फळ यांच्या आकांक्षांचें ग्रहण करावें लागतें; परंतु सत् व आत्मा (परमात्मा आणि आत्मा; परमात्मा आणि जीवात्मा) हे एकच आहेत, असें निश्चित ज्ञान होऊन जो सताशीं अभियुक्त झाला, त्याला देश, काल, निमित्त, फल इत्यादि अनृत (असत्य) संबंध शिल्लक राहतील, हें ह्मणणें उपपन्न होत नाहीं; योग्य असत नाहीं; कारण उभयतांमध्यें विरोध आहे. अविद्या (अज्ञान) तज्जन्य कामना आणि तत्प्रेरित कर्मे हीं सर्वे गमनाचीं ह्मणजे जाण्याचीं;

कर्माचीं निमित्तें आहेत, आणि सताच्या विज्ञानरूपी अग्नीनें ज्यानें आपलें जाणें-येणें (कर्म) दग्ध करून टाकलें आहे, त्याला जाणेंयेणें संभवतच नाहीं. तात्पर्य, विद्वानाचें गमन संपलेलें असतें. "जो आप्तकाम झाला, कृतार्थ झाला, त्याचे सर्व काम (अभिलाषबुद्धि) येथेंच विलीन होतात, सर्वथा नष्ट होतात" ही आथर्वण-श्रुति प्रमाण आहे. नदीसमुद्राचा दृष्टांत देणारी श्रुतिहि प्रमाण आहे. तात्पर्य, पूर्णकामाला सद्योमुक्ति मिळते ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**स य एषोऽणिमैतदात्म्यमिदꣳ सर्वं तत्सत्यꣳ स आत्मा तत्त्वमसि श्वेतकेतो इति भूय एव मा भगवान्विज्ञापयत्विति तथा सोम्येति होवाच ॥ ३ ॥**

**इति षष्ठाध्यायस्य पञ्चदशः खण्डः ॥ १५ ॥**

**अन्वय व अर्थः**—(या मंत्राचा अर्थ मागें झाला आहे) ॥ ३ ॥

स य इत्यादि समानम् । यदि म्रियतो मुमुक्षतश्च तुल्या सत्संपत्तिस्तत्र विद्वान्सत्संपन्नो नाऽऽवर्तते अवर्तते त्वविद्वानित्यत्र कारणं दृष्टान्तेन भूय एव मा भगवान्विज्ञापयत्विति तथा सोम्येति होवाच ॥ ३ ॥

इति षष्ठाध्यायस्य पञ्चदशः खण्डः ॥ १५ ॥

सिद्धांतीः—मंत्रविवेचन पूर्वीच झालें आहे. श्वेतकेतूचा अभिप्राय हा आहे कीं, मरणाऱ्या जीवाचा व मोक्षोन्मुख जीवाचा सत्क्रम (सताकडे जाण्याचा क्रम) जर एकच आहे, तर सद्रूप झालेला विद्वान् कर्मभूमीवर परत येत नाहीं; आणि अविद्वान् परत येतो, याचें कारण काय? हें दृष्टांत घेऊन समजून द्यावें. पिता ह्मणाला; ठीक आहे.

साहाव्या अध्यायाचा १५ वा खंड समाप्त.

---

## अध्याय सहावा खण्ड १६ वा.

### मंत्र पहिला.

पुरुषꣳ सोम्योत हस्तगृहीतमानयन्त्यपहार्षी-त्स्तेयमकार्षीत्परशुमस्मै तपतेति स यदि तस्य कर्ता भवति तत एवानृतमात्मानं कुरुते सोऽनृताभिसंधोऽनृतेनाऽऽत्मानमन्तर्धाय परशुं तप्तं प्रतिगृह्णाति स दह्यतेऽथ हन्यते ॥ १ ॥

**अन्वय व अर्थः—सौम्य, पुरुषं उत हस्तगृहीतं आनयंति** (हे सौम्य–चोरीचा आरोप आलेल्या पुरुषाचे हात बांधून आणतात ) **अपहार्षीत, स्तेयं अकार्षीत्** ( यानें अपहार केला आहे, चोरी केली आहे–असा त्यावर आरोप करितात)**अस्मै परशुं तपत इति**(याच्यासाठीं न्यायाधीश कुऱ्हाडीचें लोखंड तापत घाला, असा हुकूम करितात ) **यदि सः तस्य कर्ता भवति, ततः एव आत्मानं अनृतं कुरुते** ( जर तो अपराधकर्ता असेल,—आणि अपराधी नाहीं असें म्हणेल–तर आपण एक असतांना दुसरा आहे, असें तो सांगतो ) **अनृताभिसंधः सः आत्मानं अनृतेन अंतर्धाय तप्तं परशुं प्रतिगृह्णाति सः दह्यते अथ हन्यते**(असत्यभाषणानें युक्त असलेला हा चोर आपलें स्वरूप असत्यभाषणानें अंतर्हित करतो ( झांकतो ) आपल्या हातांत तापलेला परशु घेतो, भाजला जातो; आणि मरतो, तात्पर्य; असत्य बोलणारा चोर दिव्य करण्यास तयार होतो; व त्या दिव्यांत मरतो ॥ १ ॥

शृणु यथा सोम्य पुरुषं चौर्यकर्मणि संदिह्यमानं निग्रहाय परीक्षणाय वोतापि हस्तगृहीतं बद्धहस्तमानयन्ति राजपुरुषाः । किं कृतवानयमिति पृष्टाश्चाऽऽहुरपहार्षीद्धनमस्यायम् । ते चाऽऽहुः किमपहरणमात्रेण बन्धनमर्हति । अन्यथा दत्तेऽपि धने बन्धनप्रसङ्गादित्युक्ताः पुनराहुः स्तेयमकार्षीच्चौर्येण धनमपहार्षीदिति ।

तेष्वेवं वदत्स्वितरोऽपह्नुते नाहं तत्कर्तेति । ते चाऽऽहुः संदिह्यमानं स्तेयमकार्षीस्त्वमस्य धनस्येति । तस्मिंश्चापह्नुवान आहुः परशुमस्मै तपतेति शोधयत्वात्मानमिति । स यदि तस्य स्तैन्यस्य कर्ता भवति बहिश्चापह्नुते स एवंभूतस्तत एवानृतमन्यथाभूतं सन्तमन्यथाऽऽत्मानं कुरुते स तथाऽनृताभिसंधोऽनृतेनाऽऽत्मानमन्तर्धाय व्यवहितं कृत्वा परशुं तप्तं मोहात्प्रतिगृह्णाति स दह्यतेऽथ हन्यते राजपुरुषैः स्वकृतेनानृताभिसंधिदोषेण ॥ १ ॥

सिद्धांतीः—हे सौम्य ! ऐक. चोरीचा आळ आलेल्या कोणा पुरुषाला निग्रह करून न्यायाधीशाकडे चौकशी करण्यासाठीं त्या आरोपीचे हात बांधून राजसेवक त्याला न्यायमंदिरांत घेऊन येतात. 'यानें काय केलें आहे ?' असें विचारतां 'अमुक मनुष्याच्या धनाचा या आरोपीनें अपहार केला आहे' असें ते राजपुरुष सांगतात, तेव्हां 'केवळ अपहारच केला असेल, तर या आरोपीला तुह्मी बांधून कां आणलांत ? असें न्यायाधीश विचारतो. खरेंच आहे. कोणी आपल्यास दान दिलेल्या धनाचा प्रतिग्रह आपण केल्यास आपणा सर्वांसहि बंधन होण्याचा प्रसंग प्राप्त होईल, अपहारच आहे.' अशी न्यायाधीशांनीं शंका काढल्यानंतर राजसेवक पुन्हा ह्मणतात; प्रतिग्रह हीं कीं, चोरी करून या आरोपीनें या धनाचा अपहार केला आहे. राजपुरुषांचें हें भाषण ऐकल्यानंतर न्यायाधीश आरोपीस 'तूं चोरी केलीस काय ?' असें विचारतात. तेव्हां 'मीं चोरी केली नाहीं,' असें तो ह्मणतो. नंतर न्यायाधीश आरोपीस सांगतात कीं, 'ही संशयित असलेली चोरी तूंच केली आहेस;' तथापि ती तो 'नाहीं' ह्मणतो. तेव्हां न्यायाधीश आज्ञा करितात कीं, 'याच्यासाठीं एक परशु-कुऱ्हाड-तापवा, याला आपली शुद्धी करून घेऊं दे' आतां त्या चोरीचा कर्ता हा आरोपी खराच असेल तर आणि तोंडानें मात्र 'मीं चोरी केली नाहीं' असें ह्मणत असेल तर हा पुरुष ह्मणजे आपलें स्वरूप एकप्रकारचें असून तें दुसऱ्याप्रकारचें आहे, असें सांगणारा खोटा पुरुष आहे असें होतें. असो. असत्याशीं संग केलेला हा पुरुष स्वस्वरूपावर असत्याचें पांघरूण घालतो, आणि मोहानें तापलेला परशु हातांत घेतो. अर्थात् तो तेथल्या तेथें भाजून जातो; आणि नंतर त्याला राजपुरुष ठार मारून टाकतात. येथें आरोपीला किंवा वस्तुतः गुन्हेगाराला दंड झाला आहे. तो त्याच्याच असत्याच्या अभियोगामुळें होय. असत्याची संगति हा मोठा दोष आहे ॥ १ ॥

---

## मंत्र दुसरा.

**अथ यदि तस्याकर्ता भवति तत एव सत्यमात्मानं कुरुते स सत्याभिसंधः सत्येनाऽऽत्मानमन्तर्धाय परशुं तप्तं प्रतिगृण्हाति स न दह्यतेऽथ मुच्यते ॥ २ ॥**

**अन्वय व अर्थः**—**अथ यदि तस्य अकर्ता भवति ततः एव आत्मानं सत्यं कुरुते सः सत्यसंधः आत्मानं सत्येन अंतर्धाय तप्तं परशुं प्रतिगृह्णाति; सः न दह्यते अथ मुच्यते** ( आतां तो आरोपी जर त्या चोरीचा अकर्ता असेल, त्यानें चोरी केली नसेल, तर तो आपलें खरें स्वरूप मात्र प्रकट करितो आणि **सत्यसमागम** करणारा तो आरोपी स्वस्वरूपावर **सत्याचें** मात्र पांघरूण घालून तप्त परशू हातांत घेतो; पण तो भाजला जात नाहीं, अर्थात् न्यायाधीश त्याला सोडून देतात. ) ॥ २ ॥

अथ यदि तस्य कर्मणोऽकर्ता भवति तत एव सत्यमात्मानं कुरुते स सत्येन तया स्तैन्याकर्तृतयाऽऽत्मानमन्तर्धाय परशुं तप्तं प्रतिगृह्णाति स सत्याभिसंधः सन्न दह्यते सत्यव्यवधानादथ मुच्यते च मृषाभियोक्तृभ्यः । तप्तपरशुहस्ततलसंयोगस्य तुल्यत्वेऽपि स्तेयकर्त्रकर्त्रोरनृताभिसंधो दह्यते न तु सत्याभिसंधः ॥ २ ॥

सिद्धांतीः—आतां, जर त्या आरोपीनें त्या चोरीचा अपराध केलाच नसेल, तर तो आपलें जें खरें स्वरूप आहे, तेंच प्रकट करतों असें होतें; आणि चोरी न केल्यामुळें प्रकट होणारें त्याचें जें सत्य त्या सत्यानेंच स्वरूपावर पांघरूण घालून अथवा स्वरूपामध्यें आणि तप्त परशूमध्यें सत्य ठेवून तो तप्त परशूचें ग्रहण करितों. तथापि तो सत्यवक्ता असल्यामुळें त्याचा दाह होत नाहीं. तें मध्यें असणारें सत्यच त्याचें रक्षण करितें. अर्थात् फिर्याद देणाऱ्या राजसेवकांच्या ताब्यांतून तो मोकळा होतो. या दृष्टांतावरून हें स्पष्ट होईल कीं, दोन्ही पुरुषांमध्यें तप्त परशु व त्याचा हस्ततलाशीं संयोग या दोन्ही गोष्टी सारख्या होत्या, तरी एकानें चोरी करून अनृताचा आश्रय केला, ह्मणून तो दग्ध होतो; आणि दुसरा चोरी न करणारा सत्याचाच आश्रय घेणारा होतो; ह्मणून दग्ध होत नाहीं ॥ २ ॥

---

## मंत्र तिसरा.

**स यथा तत्र नादाह्येतैतदात्म्यमिदꣳ सर्वं तत्सत्यꣳ स आत्मा तत्त्वमसि श्वेतकेतो इति तद्धास्य विजज्ञाविति विजज्ञाविति ॥ ३ ॥**

**इति षष्ठाध्यायस्य षोडशः खण्डः ॥ १६ ॥**

**इति छान्दोग्योपनिषदि षष्ठोऽध्यायः समाप्तः ॥ ६ ॥**

**अन्वय व अर्थः—सः यथा तत्र न अदाह्येत** (तो सत्याभिसंध पुरुष ज्या प्रमाणें त्या उदाहरणांत दग्ध होत नाहीं ) ऐदात्म्यं इत्यादि पुढील मंत्राचा अर्थ मागें झाला आहे. मात्र **तत् ह अस्य विजज्ञौ इति** ( आणि तें हें सर्व श्वेतकेतू जाणता झाला ) मंत्रांतील द्विरुक्ति अध्यायसमाप्तीसाठीं आहे ॥ ३ ॥

स यथा सत्याभिसंधस्तप्तपरशुग्रहणकर्मणि सत्यव्यवहितहस्ततलत्वान्नादाह्येत न दह्येतेत्येतदेवं सद्ब्रह्मसत्याभिसंधीतरयोः शरीरपातकाले च तुल्यायां सत्संपत्तौ विद्वान्सत्संपद्य न पुनर्व्याघ्रदेवादिदेहग्रहणायाऽऽवर्तते । अविद्वांस्तु विकारानृताभिसंधः पुनर्व्याघ्रादिभावं देवतादिभावं वा यथाकर्म यथाश्रुतं प्रतिपद्यते । यदात्माभिसंध्यनाभिसंधिकृते मोक्षबन्धने यच्च मूलं जगतो यदायतना यत्प्रतिष्ठाश्च सर्वाः प्रजा यदात्मकं च सर्वं यच्चाजममृतमभयं शिवमद्वितीयं तत्सत्यं स आत्मा तवातस्तत्त्वमसि हे श्वेतकेतो इत्युक्तार्थमसकृद्वाक्यम् । कः पुनरसौ श्वेतकेतुस्त्वंशब्दार्थः । योऽहं श्वेतकेतुरुद्दालकस्य पुत्र इति वेदाऽऽत्मानमादेशं श्रुत्वा मत्वा विज्ञाय चाश्रुतममतमविज्ञातं विज्ञातुं पितरं पप्रच्छ कथं नु भगवः स आदेशो भवतीति । स एषोऽधिकृतः श्रोता मन्ता विज्ञाता तजोबन्नमयं कार्यकरणसंघातं प्रविष्टा परैव देवता नामरूपव्याकरणायाऽऽदर्श इव पुरुषः सूर्यादिरिव जलादौ प्रतिबिम्बरूपेण स आत्मानं कार्यकरणेभ्यः प्रविभक्तं सद्रूपं सर्वात्मानं प्राक् पितुः श्रवणान्न विजज्ञौ । अथेदानीं पित्रा प्रतिबोधित-

स्तत्त्वमसीतिदृष्टान्तैर्हेतुभिश्च तत्पितुरस्य ह किलोक्तं सदेवाहमस्मीति विजज्ञौ विज्ञातवान् । द्विर्वचनमध्यायपरिसमाप्त्यर्थम् ।

**सिद्धांतीः**—तो सत्याची अभिसंधि करणारा पुरुष यद्यपि तप्त परशूचें ग्रहण करितो तथापि तेथें सत्यानें संरक्षित असल्यामुळें ( तप्त परशु आणि हस्तद्वय यांच्यामध्यें सत्य असल्यामुळें ) त्याचा तळहात भाजत नाहीं. त्याचप्रमाणें ज्याला सत् ब्रह्माची सत्याभिसंधि प्राप्त झाली; आणि ज्याला ही प्राप्त झाली नाहीं; त्या उभयांसही शरीरपाताच्या वेळीं सत्स्वरूपाकडे एकाच क्रमानें जावयाचें असतें; व उभयतांहि सत्संपन्न होतात; पण येथें जरी समानता आहे; तथापि विद्वान् सद्रूप झाला ह्मणजे पुन्हां तो व्याघ्र-मनुष्य-देवादिकांचे देह घेण्यासाठीं पुन्हां येत नाहीं, परंतु अविद्वान् विकाररूपी ( लोभमोहादि मनोविकाररूपी ) अनृताशीं संलग्न झाल्यामुळें वासनानुसार व्याघ्रादिकांच्या अथवा देवतादिकांच्या देहांत प्रविष्ट होण्यासाठीं पुन्हां मृत्युलोकीं येतो; आणि जसें ज्ञान व कर्म असेल तसा देह त्याला प्राप्त होतो, असो. ज्या आत्मस्वरूपाशीं अभिसंधि असेल तर मुक्ति मिळते; आणि अभिसंधि नसेल तर जीव बद्ध होतो, जो आत्मा ह्या सर्व विश्वाचें आदिकारण आहे, जो ह्या सर्व प्रजाचें आयतन ह्मणजे आश्रयस्थान आहे, ज्या आत्मस्वरूपांत ह्या सर्व प्रजा लीन होतात, जो ह्या सर्वांचा अंतरात्मा आहे, जो अज, अमर, अभय, कल्याणकर आणि अद्वितीय आहे, तोच सत्यस्वरूप आहे, तोच तुझाहि आत्मा आहे, ह्मणून हे श्वेतकेतो! " तोच तूं आहेस. " इत्यादि अनेक वेळां उच्चारिलेल्या महावाक्याचा उद्दालकानें उच्चार केला.

**पूर्वपक्षीः**—असें कसें होईल? त्वं शब्दाचा अर्थ श्वेतकेतु कसा होईल?

**सिद्धांतीः**—ऐका. मी उद्दालकाचा पुत्र श्वेतकेतु आहे, असें ज्याला ज्ञान होतें, आणि 'आत्म्याचा आदेश ऐकून, मनन करून, निदिध्यासून सिद्धता झाली असतां, न ऐकलेलें, न मनन केलेलें व न अनुभाविलेलें पदार्थज्ञान होतें' हें ऐकून ज्यानें आपल्या पित्याची प्रार्थना केली कीं, तो आदेश कसा आहे तो मला सांगा, तोच नंतर ह्या अधिकार पावलेला, श्रोता, मंता ( मनन करणारा, ) विज्ञाता होय. नामरूपाचें व्याकरण करण्यासाठीं तेज-आप-अन्न घटित कार्यकरणसंघातामध्यें ( देहामध्यें )—आदर्शामध्यें, पुरुषाचें प्रतिबिंब प्रवेश करितें; किंवा जलादिकांमध्यें सूर्यादि प्रतिबिंबरूपानें प्रवेश करितात, त्याचप्रमाणें या देहसंघातांत-प्रविष्ट झालेली श्रेष्ठ देवता, हें आपलें स्वरूप आहे, आपण आत्मरूपानें कार्यकारणापासून अत्यंत निराळे आहों; आपण सद्रूप आणि सर्वात्मक आहों, हें ज्ञान त्याला प्रथम नव्हतें. उद्दालकानें आत्मरूपाचें विवेचन करून " तें तूंच आहेस " असा अनेक दृष्टांत देऊन व अनेक युक्ती

सांगून उपदेश केला, तो ऐकल्यानंतर "मीं सद्रूप मात्र आहें, असा त्याला बोध झाला." विजज्ञौ या पदाची आवृत्ति दोनदां केली आहे, ती हा अध्याय संपला ह्याचें दर्शक आहे.

**किं पुनरत्र षष्ठे वाक्यप्रमाणेन जनितं फलमात्मनि, कर्तृत्वभोक्तृत्वयोरधिकृतत्वविज्ञाननिवृत्तिस्तस्य फलं वयमवोचाम । त्वंशब्दवाच्यमर्थं श्रोतुं मन्तुं चाधिकृतत्वमविज्ञातविज्ञानफलार्थम् । प्राक्चैतस्माद्विज्ञानादहमेवं करिष्याम्यग्निहोत्रादीनि कर्माण्यहमत्राधिकृतः । एषां च कर्मणां फलमिहामुत्र च भोक्ष्ये कृतेषु वा कर्मसु कृतकर्तव्यः स्यामित्येवं कर्तृत्वभोक्तृत्वयोरधिकृतोऽस्मीत्यात्मनि यद्विज्ञानमभूत्तस्य यत्सज्जगतो मूलमेकमेवाद्वितीयं तत्त्वमसीत्यनेन वाक्येन प्रतिबुद्धस्य निवर्तते । विरोधात् । न ह्येकस्मिन्नद्वितीय आत्मन्ययमहमस्मीति विज्ञाते ममेदमन्यदनेन कर्तव्यमिदं कृत्वाऽस्य फलं भोक्ष्य इति वा भेदविज्ञानमुपपद्यते । तस्मात्सत्यस्त्याद्वितीयात्मविज्ञाने विकारानृतजीवात्मविज्ञानं निवर्तत इति युक्तम् । ननु तत्त्वमसीत्यत्र त्वंशब्दवाच्येऽर्थे सद्बुद्धिरादिश्यते यथाऽऽदित्यमनआदिषु ब्रह्मादिबुद्धिः । यथा च लोके प्रतिमादिषु विष्ण्वादिबुद्धिस्तद्वन्नतु सदेव त्वमिति यदि सदेव श्वेतकेतुः स्यात्कथमात्मानं न विजानीयाद्येन तस्मै तत्त्वमसीत्युपादिश्यते । न । आदित्यादिवाक्यवैलक्षण्यात् । आदित्यो ब्रह्मेत्यादाविति शब्दव्यवधानान्न साक्षाद्ब्रह्मत्वं गम्यते । रूपादिमत्त्वाच्चाऽऽदित्यादीनामाकाशमनसोश्चेतिशब्दव्यवधानादेवाब्रह्मत्वमिह तु सत एवेह प्रवेशं दर्शयित्वा तत्त्वमसीति निरङ्कुशं सदात्मभावमुपदिशति ।**

**पूर्वपक्षीः**—सर्वप्रकाशक जो आत्मा त्याच्या स्वरूपस्पष्टतेसंबंधानें या सहाव्या अध्यायांत जें वाक्यप्रमाण सांगितलें आहे, त्याचें आत्मविषयक काय फल निष्पन्न झालें?

**सिद्धांतीः**—आत्म्याला कर्तृत्वाचा अधिकार आहे, भोक्तृत्वाचाही अधिकार आहे, असें जें सामान्य लोकांस ज्ञान असतें ( अज्ञानच कां म्हणानांत? ) त्याची निवृत्ति हें या अध्यासाचें फल आहे, असें आम्हीं मागेंच सांगितलें आहे. त्वं शब्दाचा वाच्यार्थ श्रवण करणें, मनन करणें हा अधिकार असून या अधिकाराचें फल अविज्ञात वस्तूचें

विज्ञान होणें, हा आहे. न ऐकिलेली गोष्ट ऐकणें, न मनन केलेल्या गोष्टींचें व अविज्ञात गोष्टींचे विज्ञान करून घेणें, मनन करणें; हे अधिकार असणें, हा त्वंपदाचा वाच्यार्थ आहे. पण हें समजण्यापूर्वीं अग्निहोत्रादि जीं कर्में आहेत, तीं करण्याच्या अधिकार मलाच आहे, मींच तीं कर्में वेदानें सांगितल्याप्रमाणें करीन, येथें किंवा अन्यत्र या कर्मांचे फल भोगीन, हीं कर्में माझ्या हातूनच झालीं म्हणजे मीं कृतार्थ होईन, तात्पर्य, मीं कर्तृत्वभोक्तृत्वाचा अधिकारी आहे,' मीं (आत्मा) या शब्दाचें ज्ञान ब्रह्मज्ञानापूर्वीं असतें. आतां जेव्हां सत् हेंच जगताचें मूल आहे, तें एकच असून अद्वितीय आहे; आणि तेंच सत्‌ही मीं आहे, असें "एकमेवाद्वितीयं," "तत्व मसि" ह्या महावाक्यांनीं ज्ञानविज्ञान होतें, तेव्हां त्या प्रतिबुद्धाचें 'आत्मा कर्ता, भोक्ता आहे,' हें ज्ञान निरस्त होतें. कारण उभयतांमध्यें अत्यंत विरोध आहे. एक आणि अद्वितीय आत्मस्वरूपाचें ज्ञान होऊन 'मींच तो आहें' असा साक्षात्कार झाल्यानंतर त्या ब्रह्मज्ञाला "हें माझें आहे; हें माझ्याहून निराळें आहे, याच्या साह्यानें मला प्राप्त होणारें फल मीं भोगीन" इत्यादि प्रकारचें भेदमूलक विज्ञान असणें, शक्यच नाहीं. एकाच पुरुषाला हीं दोन परस्पर-विरुद्ध ज्ञानें एक काळीं असणें शक्य नाहीं म्हणून सत्, सत्य, आणि अद्वितीय जो आत्मा त्याचें ज्ञानविज्ञान झाल्यानंतर "मीं विकारी आहें" अशाप्रकारचे असत्य जीवात्मविज्ञान निवृत्त होतें, असें म्हणणें व असें होणें योग्यच आहे.

**पूर्वपक्षी:**—"तत्वमसि" या वाक्यांत त्वंपदाच्या वाच्यार्थानें सत्-बुद्धीचा आदेश मात्र केला असतो. "आदित्य ब्रह्म आहे, मन ब्रह्म आहे" इत्यादि वाक्यांत "आदित्यादिकांवर ब्रह्मबुद्धि ठेवा" असा श्रुति उपदेश करिते. त्याप्रमाणें त्वंपदावर ब्रह्मभावना ठेव, असें श्रुति उपदेशते, हें म्हणणें ठीक दिसतें. व्यवहारामध्यें प्रतिमादींवर (मूर्त्यादिकांवर) विष्णु आदि देवांची स्थापना आपण करितों त्याप्रमाणें त्वंपदार्थावर भावनेची स्थापना करितें, असें श्रुति सांगत आहे. "तूं सत्‌मात्र आहेस, हा मात्र अर्थ श्रुतीला अभिप्रेत नाहीं. उघड आहे कीं, श्वेतकेतु जर सत् असता तर "मी सत् आहें' असें ज्ञान त्याला कां झालें नाहीं व हें ज्ञान नव्हतें म्हणून तर त्याला 'ते तूं आहेस असा उपदेश करावा लागला? तात्पर्य 'त्वंचे ठिकाणीं ब्रह्मबुद्धीची भावना ठेव' हा 'तत्वमसि' या वाक्याचा अर्थ असला पाहिजे.

**सिद्धांती:**—नाहीं. कारण आदित्यादि वाक्यें; आणि 'तत्वमसि' इत्यादि वाक्यांत अत्यंत वैलक्षण्य आहे "आदित्यो ब्रह्म इति" इत्यादि वाक्यांत 'इति' शब्द आहे त्यावरूनच आदित्यादि साक्षात् आणि स्वरूपतः ब्रह्म नाहींत, असें समजतें. शिवाय, आदित्यादि सर्व रूपवंत आहेत, आत्मा रूपवंत नाहीं. तसेंच आकाश, मन यांच्या पुढें इति हा शब्द असल्यामुळें तें ब्रह्म नाहीं हें स्पष्ट होतें; परंतु येथें सताचा कार्यकारणसंघातांत

( देहांत ) प्रवेश दाखवून "तत् त्वं असि" ह्या वाक्यानें त्वं हा आत्माच आहे असें निरंकुशत्वानें (कोणताही बाध येणार नाहीं, अशारीतीनें, स्वतंत्रतः, पूर्णत्वानें) उपदेश केला आहे. तात्पर्य; तुम्ही उद्धृत केलेल्या वाक्यांत 'इति' शब्द आहे, येथें तो नाहीं, हें अत्यंत वैलक्षण्य आहे. तुमच्या वाक्यांत 'इति' शब्दावर जोर आहे,येथें 'इति' शब्दच नाहीं. म्हणून तत् व त्वं यांचे पूर्ण सामानाधिकरण्य आहे; म्हणून तुमची कल्पना खोटी आहे

ननु पराक्रमादिगुणः सिंहोऽसि त्वमितिवत्तत्त्वमसीति स्यात् । न । मृदादिवत्सदेकमेवाद्वितीयं सत्यमित्युपदेशात् । न चोपचारविज्ञानात्तस्य तावदेव चिरमिति सत्संपत्तिरुपदिश्येत । मृषात्वादुपचारविज्ञानात्तस्य । त्वमिन्द्रो यम इतिवत् । नापि स्तुतिरनुपास्यत्वाच्छ्वेतकेतोः । नापि सच्छ्वेतकेतुत्वोपदेशेन स्तूयेत । न हि राजा दासस्त्वमिति स्तुत्यः स्यात् । नापि सतः सर्वात्मन एकदेशनिरोधो युक्तस्तत्त्वमसीति देशाधिपतेरिव ग्रामाध्यक्षस्त्वमिति । न चान्या गतिरिह सदात्मत्वोपदेशादर्थान्तरभूता संभवति । ननु सदस्मीति बुद्धिमात्रमिह कर्तव्यतया चोद्यते न त्वज्ञातं सदसीति ज्ञाप्यत इति चेत् । नन्वस्मिन्पक्षेऽप्यश्रुतं श्रुतं भवतीत्याद्यनुपपन्नम् । न । सदस्मीतिबुद्धिविधेः स्तुत्यर्थत्वात् । नाऽऽचार्यवान्पुरुषो वेद । तस्य तावदेव चिरमित्युपदेशात् । यदि हि सदस्मीति बुद्धिमात्रं कर्तव्यतया विधीयते न तु त्वंशब्दवाच्यस्य सद्रूपत्वमेव तदा नाऽऽचार्यवान्वेदेति ज्ञानोपायोपदेशो वाच्यः स्यात् । यथाऽग्निहोत्रं जुहुयादित्येवमादिष्वर्थप्राप्तमेवाऽऽचार्यवत्त्वमिति तद्वत् । तस्य तावदेव चिरमिति च क्षेपकरणं न युक्तं स्यात् । सदात्मतत्त्वेऽविज्ञातेऽपि सकृत्बुद्धिमात्रकरणे मोक्षप्रसङ्गात् । न च तत्त्वमसीत्युक्ते नाहं सदितिप्रमाणवाक्यजनिता बुद्धिर्निवर्तयितुं शक्या नोत्पन्नेति वा शक्यं वक्तुम् । सर्वोपनिषद्वाक्यानां तत्परतयैवोपक्षयात् । यथाऽग्निहोत्रादिविधिजनिताग्निहोत्रादिकर्तव्यताबुद्धीनामतथार्थत्वमनुत्पन्नत्वं वा न शक्यते वक्तुं तद्वत् ।

पूर्वपक्षीः--एखादा पुरुष पराक्रमादि गुणांनीं विशिष्ट असला; ह्मणजे आपण त्याला 'तूं सिंह आहेस' असें ह्मणतों; ह्मणजे तो खरोखर सिंह आहे, असें होत नाहीं. तसें "तें तूं आहेस" या ह्मणण्यानें जीव खरोखर ब्रह्म आहे, असेंहि होत नाहीं.

सिद्धांतीः—तुमचें ह्मणणें शास्त्रोक्त नाहीं. या अध्यायांत मृदादि (मातीचे वगैरे) जे अनेक दृष्टांत दिले आहेत; आणि 'माती सत्य, विकार असत्य,' असें सांगितलें आहे, त्याचप्रमाणें एकच असून अद्वितीय असणारें सत्य हेंच काय तें सत्य आहे, असाच उपदेश केला आहे. शिवाय, येथें जर श्रुतीला उपचार ह्मणजे लक्षणा अभिप्रेत असती, तर "त्याला ब्रह्म होण्याला शरीरपाताचा काय तो अवकाश आहे" असा उपदेश श्रुतीनें केला नसता. लक्षणा केव्हांहि यथार्थवादी नसते. तूं इंद्र आहेस, यम आहेस, हीं वाक्यें वस्तुप्रतिपादक नाहींत, तसें 'तत्त्वमसि' हें वाक्य वस्तु प्रतिपादक नसतें, तर शरीरपात होतांक्षणीं जीवन्मुक्त ब्रह्म, मुक्त, होतो, असें श्रुतीनें कधींही सांगितलें नसतें; आणखी श्वेतकेतु उपास्य नव्हता, उपास्याची आपण स्तुति करितों. तेव्हां 'तत्त्वमसि' असें ह्मणून बापानें त्याची स्तुति करणें शक्य नाहीं. पुनः सत् श्वेतकेतु आहे, अशा सताचा स्तुतिपर उपदेशही येथें मानणें शक्य नाहीं. "तूं दास आहेस,' अशी राजाची आपण केव्हांही स्तुति करीत नाहीं. पुनः एकदां, सर्वात्मक जें सत् त्यास तत्त्वमसि (सता, तूं श्वेतकेतू आहेस) असा एकदेश-निरोधही करणें शक्य नाहीं. देशाधिपतीला "तूं ग्रामाध्यक्ष आहेस," असें ह्मटलें तर जसें आपल्या सत्तेचा निरोध झाला, असें राजाला वाटेल, तसाच 'सता, तूं श्वेतकेतू आहेस' या वाक्यानें सत्तेचा निरोध होऊन सर्वव्यापी सत् एकदेशी होईल. पुनः आणखी एकदां; "तूं सत् आणि आत्मा आहेस" या वाक्याचा आणखी कोणताही अर्थ होणें शक्य नाहीं. तात्पर्य हें वाक्य वास्तविक आहे, येथें लक्षणा नाहीं, किंवा स्तुति, उपचार, निंदाही नाहीं.

पूर्वपक्षीः—तत्त्वमसि हें वाक्य श्वेतकेतूला उपदेश करितें कीं, "मी सत् आहे' अशी भावना मात्र करावयाची आहे. अज्ञात असलेलें सत "तूं आहेस." असें येथ सांगावयाचें नाहीं.

सिद्धांतीः—हें तुमचें ह्मणणें कबूल केलें तर "अश्रुत श्रुत होतें" इत्यादि वाक्यें अयोग्य ठरतील, असत्य होतील.

पूर्वपक्षीः—तीं वाक्यें केवळ जी सद्बुद्धि आपल्यास उत्पन्न करावयाची आहे, तिच्या स्तुतीसाठीं आहेत.

सिद्धांतीः—सद्बुद्धिच उत्पन्न करण्याकरितां 'अश्रुत श्रुत होतें' असें ह्मटलें आहे, असें जर आपण गृहीत धरलें तर 'आचार्यवान् पुरुषो वेद' हें वाक्य खोटें ठरेल.

पूर्वपक्षीः—हीं वाक्यें 'तस्य तावदेव चिरं' हें दाखविण्याकरितां उपदिष्ट केलीं आहेत. 'आचार्यवान् पुरुषो वेद' ह्या वाक्यांचा निषेध करण्याकरितां नाहींत.

सिद्धांतीः—जर सद्बुद्धि उत्पन्न होण्याकरितांच त्या वाक्यांचा उपदेश केला आहे असें जर आपण ह्मणाल तर 'त्वं' ह्या शब्दानें संबोधिल्या जाणाऱ्या मुमुक्षु जीवाला सद्रूपत्व प्राप्त होणार नाहीं; व 'आचार्यवान् पुरुषो वेद' हा जो ज्ञानप्राप्तीचा उपाय सांगितला, तो सांगण्याची जरूरी उरली नाहीं. जसें 'अग्निहोत्रं जुहुयात्' वगैरे वाक्यांनीं आचार्यत्व प्राप्त होतें. त्याप्रमाणें वरील वाक्यें 'आचार्यवान् पुरुषो वेद' ह्या वाक्यांचा निषेध करणारीं आहेत, असें सिद्ध होतें; व त्या निषेधाच्या समाधाना-करितां 'तस्य तावदेव चिरं' असें वाक्य प्रक्षिप्त केलें आहे; पण तें योग्य होणार नाहीं. कारण आत्म्याचें सद्रूप न जाणतांहि एकवार सद्बुद्धि उत्पन्न झाल्यानेंच मोक्ष-प्राप्ति होण्याचा मुमुक्षूवर दुर्घट प्रसंग येऊन ओढवेल; करितां तुमचें ह्मणणें योग्य नाहीं; 'तत्त्वमसि' हें वाक्य उच्चारिलें असतां 'नाहं सत्' ह्या प्रमाणवाक्यानें उत्पन्न झालेली साधकाची बुद्धि परावृत्त करणें शक्य नाहीं; व अशी बुद्धि उत्पन्न झाली; हें ह्मणणेंहि चुकीचेंच ठरेल. कारण सर्व उपनिषदांतून दिलेलीं वाक्यें मोक्षपरच असल्यामुळें इतर शंकांचें निरसन होत आहे. जसें अग्निहोत्राच्या विधीनें उत्पन्न झालेली जी बुद्धि व अग्निहोत्र आचरण करण्याविषयीं ठाम असलेली जी बुद्धि, त्या बुद्धीचें मिथ्यात्व कथन करणें अयोग्य आहे, त्याप्रमाणेंच मुमुक्षूची 'नाहं सत्' अशी बुद्धि निवृत्त करणें शक्य नाहीं.

**यत्तूक्तं सदात्मा सन्नात्मानं कथं न जानीयादिति । नासौ दोषः । कार्यकरणसंघातव्यतिरिक्तोऽहं जीवः कर्ता भोक्तेत्यपि स्वभावतः प्राणिनां विज्ञानादर्शनात्किमु तस्य सदात्मविज्ञानम् । कथमेवं व्यतिरिक्तविज्ञाने सति तेषां कर्तृत्वादिविज्ञानं संभवति दृश्यते च तद्वत्तस्यापि देहादिष्वात्मबुद्धित्वान्न स्यात्सदात्मविज्ञा-नम् । तस्माद्विकारानृताधिकृतजीवात्मविज्ञाननिवर्तकमेवेदं वाक्यं तत्त्वमसीति सिद्धमिति ॥ ३ ॥**

**इति षष्ठाध्यायस्य षोडशः खण्डः ॥ १६ ॥**

**इति श्रीगोविन्दभगवत्पूज्यपादशिष्यस्य परमहंसपरिव्राजका-चार्यस्य श्रीशंकरभगवतः कृतौ छान्दोग्योपनिषद्विवरणे षष्ठोऽध्यायः संपूर्णः ॥ ६ ॥**

**पूर्वपक्षीः**—आपण पूर्वी सांगितलें कीं, आत्मा सद्रूप असूनही आत्म्याला जाणत नाहीं, हें कसें? ह्याचा आपण उलगडा करावा.

**सिद्धांतीः**—ह्यांत कांहीं गैर नाहीं. कारण कार्यकारणसंघाताहून निराळा असा; मीच जीव असून कर्ता आहे; व भोक्ता आहे, असें जो साधक ह्मणतो. त्याला स्वभावतः आनुभविक ज्ञान नाहीं, असेंच समजलें पाहिजे. त्यामुळें त्या अज्ञानी जीवाला सद्रूपज्ञान कोठून असणार? तो जीव विज्ञानव्यतिरिक्त असल्यामुळें त्यास कर्तृत्व, भोक्तृत्व ज्ञान असणें योग्य आहे; व तसेंच आपणांसहि दिसतें. त्याप्रमाणें त्याला देहादिकांचे ठिकाणीं आत्मबुद्धि असल्यामुळें त्यांस सद्रूप आत्म्याचें आनुभविक ज्ञान असणें संभवत नाहीं; ह्मणून विकारानें मिथ्या ठरलेल्या जीवाला 'मी आहे' अशी असलेली त्याची ठाम बुद्धि निरस्त करण्याकारितांच 'तत्त्वमसि' ह्या महावाक्याचा साधकाला उपदेश केला आहे, हें सिद्ध होतें ॥ ३ ॥

**अध्याय ६ व खंड १६ समाप्त**

अध्याय सहावा समाप्त ॥ ६ ॥